# श्रीमन्महाभारत

या ग्रंथाचें

# मराठी सुरस भाषांतर.

पुस्तक नववें



## हरिवंशपर्व.

उत्तरार्ध



हा ग्रंथ

रा. रा. महादेव हरी मोडक, बी. ए.

व

विद्यावाचस्पति, विद्यालंकार, महोपदेशक अप्पाशास्त्री राशिवडेकर

यांनीं लिहिला.


प्रकाशकः—गणेश विष्णु चिपळुणकर आणि मंडळी,

बुधवार पेठ, पुणें.

मुद्रकः—केशव रावजी गोंधळेकर, जगद्धितेच्छु छापखाना, पुणें.

शके १८२४ परिधावीनाम संवत्सरे.

हा ग्रंथ **गणेश विष्णु चिपळुणकर** आणि **मंडळीचे** व्यवस्थापक रा॰ **बाळकृष्ण पांडुरंग ठकार** यांनीं पुणें पेठ शनिवार येथील रा॰ रा॰ **केशव रावजी गोंधळेकर** यांच्या **जगद्धितेच्छु** छापखान्यांत छापवून पुणें पेठ बुधवार, घर नंबर १५९, येथें प्रसिद्ध केला.

---



देवास १ ( सिनीयर ) राज्याधिपति, श्रीमत्क्षत्रियकुलावतंस सप्तसहस्र
सेनापति प्रतिनिधि सर तुकोजीराव पवार महाराज.
के. सी. एस्. आय्.

*



नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम् ।
देवीं सरस्वतीं चैव ततो जयमुदीरयेत् ॥

ज्या अखिलब्रह्मांडनायकाच्या लीलेनें या जगाचीं यच्चयावत्
कार्यें घडतात, ज्याच्या कृपेनें ह्या अनिवार मायामोहाचें
निरसन करितां येतें व अल्पशक्ति जीवांना परमपद
प्राप्त करून घेतां यावें म्हणून जो त्यांस
बुद्धिसामर्थ्य देतो, त्या

परमकारुणिक

## श्रीमन्नारायणाचे प्रेरणेनें

श्रीमत्क्षत्रियकुलावतंस सप्तसहस्रसेनापतिप्रतिनिधि
**श्री० तुकोजीराव पवार के. सी. एस्. आय्. महाराज सरकार,**
**राज्य देवास १ (सिनियर)** यांच्या पूर्ण आश्रयाखालीं तयार
झालेला हा शेवटचा कळसादाखल भाग, महाराज साहेब
यांची स्वधर्मप्रीति, अनेक ग्रंथांच्या वाचनानें त्यांचे
ठिकाणीं उत्पन्न झालेली रसज्ञता व मार्मिकता, प्राक्-
जन्म संस्कारानें वाढत्या प्रमाणांत असलेला
त्यांचे ठिकाणचा स्वधर्माभिमान इत्यादि
सद्गुण पाहून व त्यांची परवानगी घे-
ऊन हा भाग भगवदंश महाराज
साहेब यांस कृतज्ञतापूर्वक
अर्पण केला आहे. त्याचा
ते स्वीकार करोत.

# हरिवंश.

यानि यानीह कर्माणि यैर्यैः स्वच्छंदजन्मभिः ।
चक्रे करोति कर्ता वा हरिस्तानि ब्रुवन्तु नः ॥
शृण्वन् सुभद्राणि रथांगपाणेर्जन्मानि कर्माणिच यानि लोके
गीतानि नामानि तदर्थकानि गायन्विलज्जो विचरेदसंगः ॥

श्रीमद्भागवत.

जन्म कर्मच मे दिव्यमेवं यो वेत्ति तत्वतः ।
त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन ॥

भगवद्गीता.

# श्रीमन्महाभारत.

" The names and memories of great men are the dowry of a nation.

*P. Villari.*

" You can never read good literature too much. "

*Schopenhauer.*

" What a sense of security is an old book, which Time has criticised for us ! "

*Lowell.*

" A great book that comes from a great thinker, it is a ship of thought, deep freighted with truth, with beauty too.

*Theo-Parker.*

" You despise books, you whose whole lives are absorbed in the Vanities of ambition, the pursuit of pleasure or in indolence.

*Voltaire.*

" Those only are great things which tend to render life more happy or which pave the way to a state of future bliss more permanent and more pure. "

*Milton.*

# प्रकाशकांचे दोन शब्द

## अथवा

# ग. वि. चिपळूणकर आणि मंडळीची कहाणी.

प्रिय वाचकहो, आह्मी आज अघटित-घटना-पटु, सर्वव्यापक श्रीगोपाळकृष्णाच्या अनुपम कृपेनें आपल्या पुढें **"श्रीमन्महाभारताच्या मराठी सुरस भाषांतराचा"** हा शेवटचा ( नववा ) भाग सादर केला आहे.

यांत एकोणिसावें जें खिल हरिवंश पर्व त्याचा उत्तरार्ध ( भविष्य पर्व ) असून त्यांशिवाय त्यांतच पुष्कर–प्रादुर्भाव म्हणून जें प्रकरण आहे त्यांतील विषयाच्या स्पष्टीकरणार्थ एक इंग्रजी निबंध व पातंजल योगसूत्रांतील तिसऱ्या अध्यायाच्या बहुतेक तिसऱ्या पादाचें भांषातर इतका विषय देऊन पुस्तक पुरें केलें आहे. त्याप्रमाणें पुस्तकाचे आरंभींही आमच्या प्रस्तुतच्या स्थितीचें विवरण करणारे विषय घातले असून " **ग्रंथपरिचय** " या नावानें एक खंडनमंडनात्मक लेखही दिला आहे.

येथें श्रीमन्महाभारत हा मूळ ग्रंथ संपूर्ण झाला व पूर्वसंकल्पाप्रमाणें परमेश्वराच्या अतुल कृपेनें आह्मीं सर्वथैव आपल्या वचनांतून मुक्त झालों. नव्हे–त्याच गोपाळकृष्णानें आम्हांस मुक्त केलें. नाहींतर, दोन वर्षांच्या मुदतींत आह्मी हें काम पूर्ण करण्याचें ठरवून तसें प्रसिद्धहि केलें होतें. पण तेंच काम आज आठ वर्षांनीं परिपूर्ण होण्याची वेळ आली.

आतां हा आनंददायक दिवस पाहण्यास जरी खुद्द **चिपळुणकर** व त्यांचे सर्व अनुयायी मंडळ हयात नाहीं तरी हें सर्व काम चिपळुणकर आणि मंडळीपैकींच एकाच्या हातानें पूर्ण जाहलें आहे ही गोष्टही आजच्या स्थितींत बरीच संतोषदायक आहे. बाकी सांपत्तिक दृष्टीनें याच गोष्टीचा विचार करणें तर याचें सर्व श्रेय चिपळुणकर आणि मंडळीकडे नसून या कार्याचें महत्व जाणून त्यास ज्यानीं ज्यानीं हातभार लावून मदत केली ते सावकार, भाषांतरकार, छापखान्याचे मालक, कागदाचे वगैरे व्यापारी, आणि मुख्यतः द्रव्यद्वारा सहानुभूति व्यक्त करणारे **मुंबई सरकार, छत्रपति करवीर सरकार, व बडोदा, इंदूर, देवास, बावडा, कागल इ. इ. संस्थानचे उदार व गुणज्ञ अधिपति, तसेच कित्येक जहागिरदार, इनामदार, धनिक, शेटसावकार व अगाऊ ग्राहक होऊन साह्य देणारे अनेक वर्गणीदार** यांचेकडेच आहे.

वाचकहो, मानवी जीवित किती क्षणभंगुर आहे, याचा आह्मी अज्ञान जीव आपल्याशीं पुरापुर मुळींच विचार न करितां आणि आपली स्थिति कोणत्या प्रकारची आहे हेंहि मनांत न आणितां अज्ञानपणानें एखाद्या महत्कार्यास हात घालून प्रतिज्ञाबद्ध होऊन बसतों, हा आमचा केवढा बरें अविचार ? या गोष्टीस मागील इतिहासाची साक्ष न देतां आह्मींच आपला इतिहास साक्षिभूत म्हणून आपल्या पुढें ठेवितों. वास्तविक पहातां, चिपळु-

णकर मंडळीनें हें येवढें प्रचंड काम अंगावर घेण्याचें धाडस केलें त्यावेळीं, आपण कोण, आपली परिस्थिति काय, ज्या कार्यास आपण प्रवृत्त होत आहोंत त्यास लागणारी साधनसंपत्ति किती मोठ्या प्रमाणावर पाहिजे व ती आपले जवळ आहे कीं नाहीं आणि हें काम पूर्ण होण्यास वास्तविक किती काल लागेल या व आणखी इतर गोष्टींचा पुरापुर विचार करणें किती जरूरीचें होतें इत्यादि गोष्टी आज मनांत उभ्या राहून ग्रंथसमाप्तीस लागलेल्या कालावधीचा विचार केला असतां आमच्या अविचाराचें चित्र मूर्तिमंत डोळ्यापुढें उभें रहातें. बांधवहो, आपण सर्व सहृदय आहांत, यांत मुळींच शंका नाहीं. आपण सर्व तसे उदार अंतःकरणाचे नसतां तर आज परिपूर्ण झालेलें हें प्रचंड काम पहाण्याचा सुयोग खरोखरच आला नसता. सन १९०४ सालांत या कामास आरंभ होऊन १९०६ पर्यंत याचे दोन भाग प्रसिद्ध झाले, तोंच चिपळुणकर मंडळीचे मुख्य पुरस्कर्ते रा० रा० गणेश विष्णु चिपळुणकर यांनीं एकाएकीं सर्व ऐहिक पसारा सोडून कोणाचीहि गांठ भेट न पडतां प्लेगरूपी सर्वभक्षक कालाचें आतिथ्य स्वीकारून जेव्हां हा दुःखमय मृत्युलोक सोडिला तेव्हांच हें काम दुसऱ्या भागावर थबकून रहाण्याचा दुर्योग आला होता. पण त्यावेळीं ज्या सुमारें २९० वर्गणीदारांची अगाऊ ग्राहक ह्मणून मदत झाली होती, त्यांच्याच पुण्याईनें व त्यांनीं दिलेल्या धैर्यानें आज हें काम पूर्ण झालें आहे. कै० चिपळुणकर यांच्या मृत्यूनंतर जी खळबळ उडाली, त्यावेळीं हयात असलेल्या भागीदारांवर जें आकाश कोसळून त्या खालीं त्यांना दडपून जाण्याचा प्रसंग आला, तो समग्र वृत्तांत सांगण्याचा हा प्रसंग व स्थळहि नसल्यामुळें तें सांगून आम्ही वाचकांच्या कोमल मनोवृत्ति कंपित करीत नाहीं. पण हें म्हणत असतांना हेंहि सांगितल्यावांचून रहावत नाहीं कीं, "चिपळूणकर आणि मंडळी" हे शब्द कागदावर असून मंडळीपैकीं आज एकच माणूस हयात आहे. मंडळीचीं कसलेलीं व होतकरू मिळून गेल्यासालच्या मार्च महिन्याच्या तेवीस तारखेपर्यंत प्लेग वगैरे निमित्तानें नऊ माणसें सर्वभक्षक कालाचे भक्ष्यस्थानीं पडलीं आहेत. यावरून हयात असलेल्या एकट्याच माणसावर आज कशी पाळी येऊन पडली आहे, त्याच्या मनोवृत्ति कशा झाल्या असतील व विश्वबंधुत्वाच्या नात्यानें त्यास आज हातभार लावण्याची तुम्हां सदय आश्रयदात्यांवर केवढी जबाबदारी येऊन पडली आहे? या सर्व गोष्टींचा सांगोपांग विचार करण्याबद्दल तो दुर्दैवी प्राणी तुम्हां सर्वांस आपला फाटका पदर पसरून आग्रहपुरःसर विनंति करीत आहे. तर त्याच्या या विनंतीचा तुम्हीं कोणींहि अनादर करून व त्याला निराधार सोडून आपल्या पदरीं अदयत्वाचा संग्रह करूं नका.

प्रिय बंधुभगिनीहो, चिपळूणकर मंडळीनें आजपर्यंत मोठाले तीन धर्मग्रंथ पूर्णपणें प्रसिद्ध करून आपल्यापुढें ठेविले आहेत व ते तुम्ही भक्तियुक्त मनानें वाचून त्यांचीं मननपूर्वक पारायणेंहि केलीं असतील. तेव्हां भूतदया, परोपकार, विश्वबंधुत्वाची भावना, चौऱ्यायशीं लक्ष योनी फिरून प्राप्त झालेल्या मानवी तनूची योग्यता व मुख्य कर्तव्य, निःसार संसारांत जन्मून दयादाक्षिण्यादि गुणांच्या प्रतिपालनानें या जन्मांत प्राप्त होणारें अनुपमेय सौख्य व त्याची महति, काय केलें असतां परमेश्वरानें निःसीम कृपा करून दिलेल्या मानवजीविताचें सार्थक होतें, इत्यादि उदात्त विचार तुमच्या हृत्पटलावर खोदल्यासारखे उमटले नसतील काय? नाहीं कसे, उमटलेच पाहिजेत. तर मग सांगा बरें, ज्या मंडळीनें वरील तीन संस्कृत ग्रं-

थांतील रत्नभांडार तुम्हांस उघडें करून देऊन मनसोक्त रत्नसंचय करण्यास अवसर दिला, व त्यांतील उदात्त प्रमेयांचें मनन, निदिध्यासन करून स्वर्गादि लोकांचीं द्वारें खुलीं करून देण्यास जीं मंडळी बहुंशीं कारणीभूत झाली त्या मंडळीतील एका दुर्दैवी मनुष्यास तुम्ही सर्व निःसीम शांतिसौख्याचा व उच्च कोटींतील दर्जाचा अनुभव घेत असतां " पूर्वोक्त ग्रंथत्रयांतील रत्न-भांडार खुलें करून देतांना " त्याच्या गळ्याभोंवतीं जो ऐहिक ऋणाचा बळकट फांस बसला आहे, त्यांतून मोकळें केल्यावांचून आणि तुम्ही ज्या शांतिसौख्याचा अनुभव घेत आहांत किंवा घ्याल त्याचा वांटेकरी केल्यावांचून तें भोगणें तुम्हांस शोभेल काय? याकरितां तुम्हीं ज्या सौख्याचा अनुभव घेत आहांत आणि घ्याल त्याचा अल्पांश तरी तुमच्या द्वारांत धरणें घेऊन बसलेल्या त्या अतिथीचा भाग त्याचे पदरांत घालून मग सौख्योपभोगाची तयारी करा. तो भाग त्या अतिथींचे पदरांत टाकण्याकरितां तुम्हांस एकाच गोष्टींत स्वार्थत्याग केला पाहिजे. ती गोष्ट पैशाच्या खर्चाची नसून शब्द खर्च करण्याची आहे. तो खर्च करून तुम्ही सर्वांनीं मिळून एकेक वर्गणीदार मिळवून दिला तर व तुम्ही जो वर्गणीदार मिळवून द्याल त्यानेंहि तुमच्याच मार्गाचें अवलंबन केलें तर खरोखर एक वर्षाचे अवधींतच त्या दुर्दैवी प्राण्याच्या गळ्याभोंवतीचा फांस मोकळा होऊन तोहि तुमच्या बरोबर शांतिसुखाचा अनुभव घेईल. यानें हीच एक गोष्ट साधेल असें नसून याहीपेक्षां अत्यंत महत्वाची पण अज्ञात गोष्ट साधल्यासारखें होईल. ती कोणती म्हणाल तर—तितक्याच प्रमाणावर धर्मग्रंथाच्या प्रसाराचें पुण्य तुमच्या पदरीं पडेल. तर हें त्याचें लडिवाळपणाचें मागणें तुम्ही सर्वांनीं पूर्ण केलें पाहिजे. हें मागणें तुमच्यापाशीं मागण्याचा चिपळूणकर मंडळीस परमेश्वरी न्यायानें आतां हक्क प्राप्त झाला आहे.

ज्या फांसाबद्दल आम्ही तुम्हांस इतकी सक्तीची मागणी करीत आहोंत त्याचें स्वरूप थोडक्यांत कसें आहे तें पहा. आजपर्यंत महाभारताचे नऊ भाग प्रसिद्ध झाले आहेत. त्यास खर्च सुमारें साठ हजार रुपये झाला आहे. त्यापैकीं आतांपर्यंत सुमारें बत्तीस हजार वसूल झाला असून सुमारें अठ्ठावीस हजार रुपये मूळ खर्च झालेल्या रकमेपैकीं देणें व या रकमेवरील आठ वर्षांचें व्याज ( नऊ टक्क्याप्रमाणें आहे ) तें मिळून आज चिपळुणकर मंडळींतील शेवटच्या माणसावर सावकारी देण्याचा केवढा मोठा बोजा आहे याचा आमचे सुज्ञ आश्रयदाते जरा शांत चित्तानें विचार करतील तर वर जी आम्ही त्यांना दिसण्यांत कांहींशी सक्तीची शिफारस केली आहे ती युक्त कीं अयुक्त याचा उलगडा सहज होईल. याकरितां बंधुजनहो, आमच्या मागणीचा अव्हेर अगर तिरस्कार न करितां आम्हांस वर सुचविल्याप्रमाणें मदत करण्यास आपण निःसंशय पुढें याल, अशी आम्हांला खात्री आहे व असें केल्यानें चिपळुणकर मंडळींतील गेलेल्या माणसांच्या अनाथ व पोरक्या झालेल्या बायकामुलांस तारल्याचें श्रेय आपल्या पदरांत पडेल.

वाचकहो, येथें आणखी एक हिशोबी गोष्ट आम्ही तुमच्यापुढें ठेवितों तिकडे लक्ष द्या. महाभारताच्या भाषांतराचे भाग नऊ असून प्रत्येक भागाच्या प्रती पांच हजार आहेत. असे नऊ भाग मिळून संपूर्ण ग्रंथ होत असून त्याची किंमत अवघी २४ किंवा १६ रुपये ( लायब्ररी एडिशन २४ रुपये व पातळ कागदावरील नंबर २ ची प्रत रुपये १६ ) म्हणजे आमच्या मतें स्वस्ताईची कमाल आहे. कारण नऊ भाग मिळून रॉयल [illegible]

कालमी एकंदर सर्व पुस्तकांचीं मिळून पानें सुमारें सहा हजार आहेत. एवढें प्रचंड काम महाराष्ट्रांत ( एकाच ग्रंथाचें ) चिपळुणकर मंडळीवांचून अन्य कोणी केलें नाहीं असें म्हटल्यास त्यांत गर्वोक्ति केल्याचा दोष आमच्या पदरीं येतो असें आम्हांस वाटत नाहीं. जो खरा प्रकार आहे तोच आम्ही आपल्या आश्रयदात्या बंधुभगिनीपुढें मांडला आहे. पण यामुळें आज आमची स्थिति कशी झालेली आहे व येथून पुढें तरी आमच्यावर कोणता प्रसंग येणार आहे तें एका सर्वेश्वरासच माहीत ! पण अजुनहि आम्ही अशी खात्री बाळगितों कीं, ज्या जगच्चालकानें आम्हांस निमित्त मात्र पुढें करून आमच्याकडून असलें आह्मांस दुःसाध्य असें काम करविलें तोच सर्वसाक्षी, पूर्णब्रह्म गोपाळकृष्ण पांडवांप्रमाणें—महाराष्ट्रांतील बंधुभगिनीकडून आमच्या सर्व संकटाचा परिहार करवून व मंडळीच्या सर्व आशा सफल करून—मंडळीस आपल्या चरणकमलीं प्रेमानें स्थान देईल यांत मुळींच शंका नाहीं.

प्रिय वाचकहो, या ९ व्या भागांत खिल जें हरिवंशपर्व त्या पैकीं **भविष्यपर्व** पूर्णपणें आलें आहे. व हरिवंशपर्व आणि विष्णुपर्व हीं दोन पर्वें मागील ८ व्या भागांत आलीं आहेत. हीं तीन पर्वें मिळून ग्रंथ सुमारें सोळा हजार आहे. हा सोळा हजार व आदिपर्वापासून स्वर्गारोहणपर्वा——अखेर चवऱ्यायशीं हजार मिळून मूळ भारत ग्रंथ एक लक्षावर कांहीं थोडा भरतो; अशा या त्रिकालाबाधित सिद्धांतांनीं ओथंबलेल्या व अखिल जगांतील सुविचारी विद्वानांस मान्य झालेल्या ग्रंथाचें भाषांतर आठ वर्षांनीं कां होईना पण एकदांचें आमूलाग्र प्रसिद्ध झालें. तेव्हां आतां आह्मी आपल्या मूळ प्रतिज्ञेंतून मोकळे झालों आहोंत. पूर्वीं प्रसिद्ध झालेल्या संकल्पांपैकीं आतां फक्त उपसंहारच शिल्लक राहिला. परंतु मध्यंतरींच्या काळांत अपूर्वतर्कित अशा कांहीं अडचणी उत्पन्न झाल्या आहेत. तरी या बाबीसंबंधानें आमचा विचार चालू आहे. व कांहीं तरी योजना करून हेंही काम पूर्ण करून वाचकवर्गास दिलेल्या अभिवचनांतून मुक्त होण्याचा आमचा संकल्प आहे. इतकें येथें नमूद करण्यापलीकडे अधिक बोलवत नाहीं.

आतां आठवा भाग जो हरिवंश त्याकडे वळूं. वांईकर मंडळी हरिवंश प्रसिद्ध करीत असतां, आपले गळ्याला सावकाराची तांत लावून घेऊन चिपळूणकरांनीं निराळें भाषांतर कां प्रसिद्ध करावें असें कोणास वाटेल तर त्यांतील वास्तविक प्रकार असा आहे कीं, आम्ही हें आपसुखानें केलें नाहीं. पण **शतसाहस्र्यां संहितायां** या शब्दाची यथार्थता हरिवंशावांचून होत नाहीं, अर्थात् समग्र भारताचें सुरस भाषांतर देण्याची आमची प्रतिज्ञा अपूर्ण राहते अशी जेव्हां कांहीं वाचकांनीं हाकाटी केली तेव्हां तिची न्याय्यता लक्षांत बाणल्यानें आम्हांस कर्तव्यैकशरण होऊन असा ऋण काढून सण करावा लागला. शिवाय वांईकरांनीं हरिवंशाचा अंक काढण्यापूर्वींच आमचे भाषांतराचा प्रथमपर्वाचा खर्डा लिहून पडला होता. खेरीज वांईकराची भाषांतरपद्धति आमच्या एकूण भारताचे भाषासरणीशीं भिन्न असल्यानें त्यांचें भाषांतर आम्हांस सामील करणें शक्य नव्हतें. एतावता अगतिक होऊन आम्हांला हा मार्ग स्वीकारावा लागला. असो.

या ग्रंथाचें भाषांतर आमचे परममित्र व आम्हांबद्दल पूर्ण सहानुभूति ( स्वतःच्या

अशक्तपणाकडे लक्ष न देतां ) बाळगणारे रा. रा. **महादेव हरि मोडक बी. ए.** यांनीं केलेलें आहे व अगदींच निरुपाय झाल्यामुळें मोडक यांच्या विनंतीवरून शेवटचे सुमारें पन्नास अध्याय वे. शा. सं. रा. **विद्यावाचस्पती, विद्यालंकार महोपदेशक आप्पाशास्त्री राशिवडेकर** यांनीं केलेले आहेत. हें भाषांतर कसें झालें आहे व त्यांत विशेष गुणधर्म काय आहेत हें ठिकठिकाणीं ज्या टीपा व पाठभेद रा. मोडक यांनीं दिले आहेत त्यावरूनच सहृदय वाचकांच्या ध्यानांत येईल.

प्रियवाचकहो, रा. मोडक यांस आह्मी एवढेच श्रम देऊन राहिलों नाहीं तर त्यांच्या प्रकृतीकडेहि न पहातां स्वार्थपर बुद्धीनें आम्हीं त्यांना प्रुफाकडे पहाण्याबद्दल विनंति करून तेंहि काम करावयास लाविलें व त्यांनींहि आमच्यावरील प्रसंग जाणून शक्ति नसतांनाहि तसेंच तें शेवटास लाविलें. त्याबद्दल मोडक यांचे व त्याचप्रमाणें विद्यावाचस्पती यांचे आम्ही फार फार आभारी आहोंत. आतां आपणांस अशी शंका येईल कीं, इतके तुम्ही निष्ठुर कसे व असा तुमचेवर प्रसंग तरी कोणता कीं मोडक यांच्या अशक्तपणाकडे दुर्लक्ष्य करून तुम्ही त्यांना प्रुफाचेंहि काम सांगितलें? तर तो प्रसंग म्हटला म्हणजे रा. रा. रघुनाथ गंगाधर गद्रे यांचा अकालीं मृत्यु हा होय. कै० गद्रे यांस सन १९१० सपटंबर ता० १९ रोजीं एकाएकीं सुमारें एक तास त्यांची प्रकृति बिघडून काळजाचे विकारानें देवाज्ञा झाली. रा० गद्रे यांनीं भागवताच्या आरंभापासून भारताचे सात भाग प्रसिद्ध होईपर्यंत प्रेसकडील काम किती चोख रीतीनें केलें त्याचें वर्णन करावयास आमचेजवळ शब्दच नाहींत म्हटलें तरी चालेल. त्यांनीं नुसतें छापखान्यांतीलच काम केलें असें नसून कै० चिपळूणकर यांचे पश्चात् तर स्वार्थत्यागपूर्वक मंडळीस जी मदत केली ती फारच महत्वाची होती. अशा रीतीच्या माणसाचा ऐन आणीबाणीच्या वेळीं वियोग झाल्यानें जी हानी होते ती शब्दांनीं व्यक्त करतां येत नाहीं. रा. गद्रे यांस पुरे दोन महिने झाले नाहींत तोंच आमच्यावर आणखीही एक दुःखाचा प्रसंग ओढवला. कंपनीच्या व्यवस्थापक मंडळीपैकीं रा. रा. माधवराव दिनकर गोखले यांस ता० १७ नवंबर १९१० रोजीं देवाज्ञा झाली. यांच्या मृत्यूनेंहि कंपनीच्या दुःखांत व दौर्बल्यांत भरच पडली आहे. तात्पर्य १९१० सालांत हे जबरदस्त दोन प्रसंग गुदरल्यामुळें आम्ही असहाय झाल्यानें गद्रे यांचे कामाकडे रा. मोडक यांस लक्ष्य देण्याबद्दल विनंति करणें भाग पडलें.

महाभारताच्या छपाईचे वगैरे कामीं जगद्धितेच्छु छापखान्याचे मालक रा. रा. केशवरावजी गोंधळेकर व त्यांचे चिरंजीव रा. दत्तात्रय केशव गोंधळेकर यांनीं आमचेवरील प्रसंग जाणून केवळ धंद्याच्या दृष्टीनें या कार्याकडे न पहातां हें प्रचंड काम अंगावर घेतलें ह्मणूनच तें आज पूर्णपणें तडीस गेलें, सबब त्यांचे आभार मानावे तितके थोडे आहेत.

**कंपनीचे सावकार वे. शा. सं. रा. रा. श्रीधर विनायकशास्त्री राजवैद्य भोरकर, श्रीमंत काशिनाथ विनायक बावडेकर मुनसफ, कोर्ट पिरंगुट, संस्थान भोर; रा. रा. काशिनाथ मनोहर माचवे, रा. रा. माधवराव बाबुराव किबे, रा. रा. रामचंद्र भिकाजी जोशी, रा. रा. सदाशिव महादेव दिवेकर** प्रभृतींनींच हें काम शेवटास नेलें आहे, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. चिपळुणकर मंडळींनें अनेक खटपटी करून चोहोंकडून लोकाश्रय मिळविला, परंतु लोकाश्रय मिळेल तेव्हांच काम संपवावयाचें असेंच धरून आह्मी

चालतों असतों तर हें काम आज कधींच शेवटास लागलें नसतें. तात्पर्य, वरील मंडळीनीं व्यवहार करितांना सुद्धां सहानुभूतीनेंच आह्मांस वागविलें तेव्हां त्यांचे व मुख्यतः श्रीधरशास्त्री यांचे आभार मानणें हें आमचें कर्तव्य आहे. श्रीधरशास्त्री यांच्या निरपेक्षतेचें शब्दांनीं वर्णन करितां येत नाहीं. तेव्हां सर्वेश्वर आमचे हातून या सर्वांचे गळे लवकर मोकळे करवो, अशी त्याची आह्मी अनन्यगतिकत्वानें प्रार्थना करितों.

येथवर आह्मी आमचे अनेक हितेच्छु, स्नेही आणि मुद्रक, भाषांतरकार इत्यादिकांचे आभार मानिले. परंतु, " सर्वे गुणाः कांचनमाश्रयंते " या न्यायाप्रमाणें ज्या महात्म्यांनीं आम्हांस निरपेक्ष बुद्धीनें कांचनदान देऊन हें कार्य तडीस लाविलें, त्यांचे आभार विशिष्ट रीतीनें मानणें प्राप्त आहे. चालू भागाला ज्या उदारधींनीं द्रव्यदान दिलें त्यांत एक ध्यानीं मनीं स्वप्नीहि नाहीं असें नांव देण्याचा सुयोग आला आहे. तो ऐकून अनेक वाचक आम्हांप्रमाणेंच साश्चर्यानंदभरित होतील. हें नांव म्हणजे महाराष्ट्राचे पूर्व भूपती **श्रीमंत कै० बाजिराव साहेब पेशवे** यांच्या आज जीवमान असलेल्या अत्यंत वयोवृद्ध कन्या श्रीमती——गंगारूप मातोश्री **सरस्वतीबाई उर्फ बयाबाई साहेब महाराज आपटे.** बाईसाहेबांची सांपत्तिक स्थिति कालविपर्ययानें बदलली असतांनाही त्यांनीं केवळ हे आपले पुराणग्रंथ व हीं आपलीं माणसें असें म्हणून आम्हांस साह्य दिलें याबद्दल आम्हीं त्यांचें अभिनंदन किती करावें तें समजत नाहीं.

यापुढें, **श्रीमंत सरकार बापूसाहेब कागलकर संस्थान कागल, (सीनियर) व फलटण संस्थानचे अधिपति श्रीमंत सरकार बापूसाहेब निंबाळकर**—यांपैकीं श्रीमंत कागलकर यांजकडून रकम हातीं आली असून निंबाळकर यांचा आश्वासनपर ठराव आला आहे; याही गुणग्राही व उदारमती संस्थानिकद्वयाचे तसेंच **श्री० सरदार गुलाबराव रामराव वाघोलीकर जहागिरदार मु० पुणें** यांनींही यथाशक्ति मदत केली आहे म्हणून त्यांचेही आम्ही अत्यंत आभारी आहों.

कृतज्ञाचे वाणीला उपकर्त्यांचे गुण गाण्यापेक्षां प्रियतर कामगिरी दुसरी कोणतीच नाहीं व तिचा तिला कधीं कंटाळाही नाहीं. ती एकप्रकारचें तिला पौष्टिक खाद्यच आहे. व तें तिला जों जों मिळेल तों तों तिची शक्ति अधिकच वाढते. याच न्यायानें या स्थळीं आणखीहि दोन महाशयांचें स्तोत्र करण्याचें सुखकर कर्तव्य आमचे वाणीचे वाट्यास आलें आहे व तें आह्मी परमोत्साहानें करितों.

या स्तोत्राला विषयीभूत नांवें म्हणजे **श्रीमत्क्षात्रियकुलावतंस तुकोजीराव पवार के. सी. एस्. आय्. महाराज सरकार राज्य देवास १ ( सिनीयर ) व महाराज साहेबांचे कनिष्ठ बंधु श्रीमत्क्षत्रियकुलावतंस जगदेवराव पवार ऊर्फ भाऊसाहेब महाराज विश्वासराव बहादूर संस्थान सुपें—जामगोद**, हीं होत.

या पैकीं श्रीमंत देवास सरकार यांनीं आमचे कामगिरीबद्दल जी आदरबुद्धि व्यक्त केली व आमची हकीकत ऐकून घेण्याचे कामीं जें सौजन्य व कळकळ दाखविली ती शब्दांनीं व्यक्त करण्याचें आम्हांस सामर्थ्य नाहीं. आमचे वाणीचे या दौर्बल्याबद्दल आम्हांस फार खेद होतो, परंतु निरुपाय आहे. खरोखर महाराजांचें अल्प वय ध्यानांत घेतां त्यांचे ठायीं इतकी रसवत्ता व गुणज्ञता पाहून आम्हाला साभिमान कौतुक वाटतें. परमात्मा म-

हाराजांना सहपरिवार दीर्घायु करो. कोणी म्हणेल "मृदंगो मुखलेपेन करोति मधुरध्वनिम्" तुम्हाला महाराजांनीं खाद्य दिलें म्हणून तुह्मी त्यांचें स्तोत्र करितां. परंतु अशांतली गोष्ट सुतराम् नव्हे. खरोखरच महाराजांचे गुण कोणाहि सहृदयाची वाणी पल्लवित करावयास रहाणार नाहींत असें आह्मी खात्रीनें सांगतों. ज्यांस अनुभव येईल ते आमचे वाणीची सत्यता पहातील. तूर्त आह्मी असल्या सद्गुणमंडित महाराजांची मूर्ति तरी आमचे वाचकांस पहावयास मिळावी म्हणून त्यांची छबी त्यांचे परवानगीनें या खंडासोबत देत आहों. श्रीमन्महाराजसाहेब यांनीं या भागाचे प्रकाशनास योग्य साहाय्य देऊन आह्मी आरंभिलेल्या वाग्यज्ञाच्या सांगतेचें बरेंच श्रेय संपादन केलें म्हणून आह्मी हा खंड त्यांस त्यांची परवानगी घेऊन सादर अर्पण करीत आहोंत त्याचा ते स्वीकार करोत.

वरील महाराजांचे कनिष्ठ बंधुत्वाला सर्वथा साजे अशीच कृति **श्रीमंत जगदेवराव ऊर्फ भाऊसाहेब महाराज** यांनींहि आमचे ग्रंथासंबंधें केली, एवढें येथें सांगितलें म्हणजे पुनरुक्तीचा दोष न येतां महाराज भाऊसाहेब यांचाही योग्य गौरव केलासें होईल, असा आम्हांस भरंवसा वाटतो.

याशिवाय या प्रचंड सत्कार्यास आजपर्यंत जशी अनेकांनीं मदत केली तशी करण्यास आम्हीं बरेच महाराजे, राजे, संस्थानीक, सरदार, जहागीरदार आणि शेटसावकार यांजकडे पुस्तकें व अर्ज पाठवून आह्मांस मदत करण्याबद्दल विनंति केली आहे तर तेही आम्हांस निराश न करितां पुढील पुस्तकांत ( उपसंहाराचे प्रस्तावनेमध्यें ) त्यांचा नामनिर्देश करण्याची संधी देतील, अशी आशा आहे.

येथपर्यंत आह्मी शक्य तो प्रयत्न करून प्रत्येक पुस्तक सर्वांगसुंदर करण्याचा प्रयत्न केला आहे. तथापि, मानवी कृति सर्वथैव निर्दोष असते असें कसें ह्मणतां येईल ? तेव्हां यांत जर कांहीं हस्तनेत्रादि दोषानें उणीव राहिली असेल तर तीबद्दल सुज्ञ व सहृदय वाचक क्षमा करतील अशी आशा आहे. अखेरीस श्रीदयाघन प्रभूच्या चरणीं नम्र भावानें लीन होऊन महाराष्ट्रवाचकवर्गाची रजा घेतों.

प्रकाशक.

# भाषांतर व आभारवचन.

प्रस्तुत खंडाचे म्हणजे हरिवंशाचे भाषांतरांत भाषेचें वळण मागील खंडांप्रमाणेंच बहुतेक आहे; तथापि, मागील भागवत, रामायण व भारत पर्वे १८ हीं सर्व अखेर आमचे सुहृत् व सहकारी रा. रा. रघुनाथ गंगाधर गद्रे यांच्या एकट्याच्याच दृष्टीखालून गेल्यानें त्या सर्वांत जो एकसारखेपणा होता तो, ते दुर्दैवानें या खंडाचे वेळीं परलोकवासी झाल्यामुळें यांत आला असेलसें म्हणवत नाहीं. शिवाय 'पुष्करखंड' म्हणून भविष्यपर्वांतील अध्याय ७ ते अध्याय ३२ पर्यंत जो खंड आहे, त्याचें विषयस्वरूपच भिन्न असल्यामुळें, व विशेषतः त्यांतील बरेच शब्द रूपकी, श्लिष्ट व पारिभाषिक असल्यामुळें, पुष्कळ ठिकाणीं त्या भागाचा तर्जुमा करितांना इतर ठिकाणांइतकें स्वातंत्र्य राहिलें नाहीं. शब्दाचे मर्जीला संभाळूनच वाक्यरचना करावी लागली व इतकें करूनहि त्यांतील सांकेतिक अर्थ, व एकूण विषयाचा भाव विशद होऊं शकला नाहीं, त्यामुळें पुष्कळ ठिकाणीं पायथ्याशीं बारीक टीपा, व विशेषतः प्रति-अध्यायारंभीं अध्यायांतील विषयाचें सामान्यस्वरूप दाखविणाऱ्या पोक्त टीपा दिल्या आहेत. याचेच पुढील कांहीं अध्याय आमचे निःशक्ततेमुळें एका विद्वान् स्नेह्याचे हवालीं केले होते. त्यांची सरणी अर्थातच वेगळी आहे, व आमचे मतें वाईकरांचे भाषांतराची छटा घेऊन उठली आहे. परंतु ही गोष्ट आमचे निदर्शनास कॉपीला छापखान्याचें मागणें आल्यावर आली, तेव्हां पुनः सृष्टि करण्याला अवकाश उरला नाहीं, हें पाहून स्वस्थ बसावें लागलें. तथापि झाला प्रकार प्रांजलपणें जाहीर करणें न्याय्य समजून तसें केलें आहे.

हा मुख्य पुराणाचे भाषांतराचा प्रकार झाला. आतां या ग्रंथाला अखेर 'योगखंड' म्हणून एक मोठें परिशिष्ट जोडिलें आहे, त्याचा मुख्य हेतु पुष्करखंडाचे आरंभीं पुढें दिलाच आहे. फक्त त्यांतील भाषांतरा संबंधानें सांगावयाचें. त्यांत जो इंग्रजी खंड दिला आहे, त्यांतील इंग्रजी उताऱ्यांचें जें भाषांतर आहे, तें प्रयोजन नसल्यामुळें, शद्बशः केलें नसून, केवळ तात्पर्यसूचक आहे. आणि मराठी बाजूंतील एकंदर विषय व पातंजल सूत्राचें भाषांतर हीं मुख्यतः हेमाडपंतकृत 'पातंजलयोगदर्शन' यांतून व प्राणायाम-क्रिया, मुंबई येथील 'हल्लीं बंद पडलेल्या' आर्य- धर्म नामक मासिकांतून घेतली आहे. या उताऱ्यांबद्दल त्यांचे मूळ कर्त्यांचे आम्हीं फार आभारी आहों. पहिले गृहस्थांबद्दल आह्मी मुद्दाम शोध केला, पण ते शांत झाल्याबद्दल आमचे एका मित्राचें खाजगी पत्र आलें, व दुसरे मासिकांत लेखकाचें नांव नाहीं व मासिकही बंद पडलेलें त्यामुळें प्रत्यक्ष भेटीची फारशी सोय उरली नाहीं. तथापि सद्ग्रंथ हे जनकार्यार्थच लिहिले असतात, ही लेखकवर्गाची नेहमीची उदारबुद्धि ध्यानीं आणून आह्मी गैरपरवाना सदर ग्रंथांतून मनमुक्त उतारे घेतले आहेत. पण ही गोष्ट आह्मी मोठ्या आनंदानें, प्रांजलपणें व साभार प्रसिद्ध करितों. हें योगसूत्रांचें भाषांतर कै० व्यंकटराव रामचंद्र यांनींहि केलें आहे. पण कोणी केलें तरी व्यासभाष्याचा तर्जुमा, मग आपण आणखी एक आपल्या शब्दांनीं 'आमचें' ह्मणून एक निराळें करून

विद्वत्ता मिरविणें यापेक्षां पूर्वसूरींचे उतारे घेऊन उघडपणें त्यांचे आभार मानणें हें कांहीं गैर नाहीं, किंबहुना हेंच अधिक श्रेयस्कर असें वाटून आह्मी तेंच केलें आहे. 'ग्रंथपरिचय' ह्मणून जो प्रास्ताविक भाग जोडला आहे त्यांत अनेकांचे उतारे घेतले आहेत व त्यांचे सर्वांचे आह्मी ऋणी आहों. अष्टादशपुराणांचें सार हा भाग बंगाली गृहस्थ दुर्गादास लाहिडी यांच्या ' पृथ्वीर इतिहास ' या बंगाली ग्रंथावरून घेतला आहे. व पुराणासंबंधीं कांहींशी माहिती पंडित ज्वालाप्रसाद मिश्र यांचे ग्रंथांतून घेतली आहे, या सर्वांचेही आह्मी कृतज्ञतापूर्वक आभार मानितों.

वाई येथील पुराणप्रकाशक मंडळी 'हरिवंशाचें' भाषांतर करीत असतां आम्ही पुनरुक्तींत पडलों नसतों. पण सगळेंचचमत्कारिक झालें. वाईकर मंडळीची आजपर्यंतची रीति स्वतंत्र पुराणांची भाषांतरें करण्याची आणि' हरिवंश ' हें आज मितीस तरी स्वतंत्र पुराण नसून 'भारताचें' केवळ एक पर्व म्हणून गणिलें जातें. अर्थात् अठरा पर्वे सोडून मंडळी एकटेंच व तेंहि अखेरचें पर्व हातीं घेतीलशी आम्हांस कल्पनाहि नव्हती. व अजूनहि त्यांचे कृतीचें रहस्य उलगडलें नाहीं. शिवाय हरिवंशाशिवाय, भारत संपूर्ण होतच नाहीं असें अनेक विद्वानांनीं आमचे पदरीं माप घातल्यामुळें अगतिक होऊन आम्हांस हें काम पत्करावें लागलें, हें सुप्रसिद्धच आहे. त्यांतूनहि वाईकरांची भुमका आमचे कानावर येण्यापूर्वी 'हरिवंश पर्वाचे ' भाषांतराचा खर्डा होऊन पडला होता. व एकूण भाषांतरहि त्यांचे आधींच पूर्ण झालें असतें, परंतु दरम्यान शांतिपर्व, व श्रीमद्भगवतद्गीता—पुनरावृत्ती—हीं कामें आम्हांवरच येऊन पडल्यामुळें हरिवंशाचें काम बराच वेळ बंद ठेवावें लागलें. पुढील कामास आरंभ झाल्यानंतर कांहीं वेळीं वाईकरांचें अंकांतील भाग जेथें आमच्याशीं मिळते आले तेथें, **"अथवा, कृतवाग्द्वारे ग्रंथेस्मिन् पूर्वसूरिभिः"** या कालिदासोक्तीवर दृष्टि देऊन आम्ही त्याचा फायदा घेतला आहे. व ही गोष्ट आम्ही वाईकर मंडळी व त्यांचे भाषांतरकर्ते वे.शा.सं. विष्णुशास्त्री बापट यांस साभार प्रदर्शित करितों. या ठिकाणीं याच संबंधीं दुसरीहि एक गोष्ट, स्नेहभावानें या मंडळीस सुचवितों. त्याबद्दल त्यांनीं रोष मात्र न करावा. कारण, त्यांचें दोषाविष्करण करावें असा हेतु नसून त्यांनीं पुढें सावध व्हावें एवढ्यासाठींच ही सूचना आम्ही देत आहों. आमचे भाषांतरांत आम्ही तळाशीं ज्या अनेक टीपा दिल्या आहेत, त्यांत पुष्कळ ठिकाणीं वाईकरांचे अर्थाची नापसंती दाखविली आहे. पण हिचें मूळ कारण पहातां भाषांतरकर्त्यांचें अज्ञान नसून पाठाचें गचाळपणच आहे. त्यांनीं आधारभूत घेतलेली पोथी अपपाठपूर्ण असावी असें त्यांच्या मूळावरूनच दिसतें. अर्थात् पाठच चुकीचा असल्यानें अर्थहि चुकीचा झाला. असो. पुढील पुराणांचे भाषांतराचे वेळीं त्यांनीं प्रथम पाठशुद्धि करवून मग भाषांतर करवावें इतकेंच त्यांस नम्रपणें सुचविणें आहे.

या खेरीज आभारवचन म्हणजे आमचे परम विद्वान्, शास्त्रांत केवळ गुरुस्थानीय असे गृहस्थ मित्रवर्य विद्यावाचस्पति अप्पाशास्त्री राशिवडेकर यांसंबंधें. अंगीकृत कार्याचा प्रकृतिदौर्बल्यानें आमच्यानें जेव्हां निर्वाह होईना, तेव्हां विनंति केल्यावरून सदर गृहस्थांनीं हस्तावलंब केला म्हणून आम्ही उत्तीर्ण झालों.

---

१ वे. अप्पाशास्त्रीनीं भविष्यपर्व अ० ८०–१३५ यांचें भाषांतर केलें आहे.

याशिवाय रा.रा. त्र्यं. गु. काळे व ए.आर. जोशी. बी.ए.एल्.एल्.बी. यांनींहि साह्य केलें आहे. तेव्हां त्यांचें आम्ही आभार मानितों. छापील खर्डा तपासण्याचे कामीं छापखान्याचे व्यवस्थापक द.के.गोंधळेकर व दुसरे एक कै. नाना खरे नांवाचे गृहस्थ यांनीं बरीच बाजू संभाळली. व अखेर सर्वचपरी आमचा सांभाळ ज्यांनीं केला असे गृहस्थ म्हणजे चिपळूणकर मंडळीचे उर्वरित भागीदार—रा. रा. बाळकृष्ण पांडुरंग ठकार. या गृहस्थासंबंधें आम्ही जें लिहीत आहों तें ते आम्हांला भाषांतराचें मूल्य देतील.—कारण अजून सारा भविष्यकाळच आहे, आणि त्याला त्यांनीं तरी काय करावें ?—यासाठीं नव्हे; तर खरोखरच या गृहस्थांचे लायकीचा चिपळूणकरांचे मृत्यूनंतर जो आम्हांस पावलोपावलीं अनुभव आला आहे त्याचे जोरावर हें आम्ही लिहित आहों. यांचे नामस्मरणाबरोबर डोळयांस पाणी येतें. व आम्हांस वाटतें कीं या प्रचंड भारतानें या गृहस्थांची त्यांचा लेशहि अपराध नसतां जी दैना दैना करून सोडिली आहे तिची आमच्या समर्थ व सदय वाचकांपैकीं कोणाला तिळभर जर कल्पना येईल तर एका कवीनें ह्मटलें आहे 'दद्यात् स्वपिशितान्यपि' कीं दाता आपले अंगचें मांस देखील काढून देईल अशी स्थिति होईल. आह्मांस स्वतः ठाऊक आहे कीं हे गृहस्थ भोरास कोणाची पायरी न चढतां शाल्योदन जेवून स्वगृहीं सुखानें होते. परंतु, यांचे चिरमित्र चिपळुणकर यांस अकाल मृत्यूनें नेतांच वस्तु स्थितीकडे न पाहतां, केवळ आपले मित्रानीं आरंभलेलें राष्ट्रीय काम मध्यें पडूं द्यावयाचें नाही, तडीस लावावयाचें, मग आपलें कांहींही होवो असा उदार संकल्प करून उडी घालून हे पुढें आले. परंतु गतमित्राचे पश्चात् यांचे हातीं सूत्रें येईतों मध्येंच अनेक बखेडे उत्पन्न होऊन एकंदर स्थिति इतकी भयंकर झाली कीं, दुसरा तर मूर्च्छितच पडता; पण यांनीं असाधारण धैर्य धरून कार्यावलंब केला व घरदार, चीज, वस्त, सर्व सावकाराला वाहून व त्याशिवाय घेणें शक्य होतें तितकें ऋण अंगावर घेऊन हा ग्रंथ तडीस पोंचविला. कांहीं स्नेह्यांनीं यांस हें काम सोडून देण्याबद्दल बुद्धिवाद दिला पण ते कृतमति असल्यामुळें त्यांनीं आपला निश्चय सोडिला नाहीं.ते ह्मणाले या अभागी राष्ट्रांत असला दिव्य ग्रंथ वारंवार निपजत नसतो, तेव्हां एकानें हातांत करवंटी घेऊन जर एवढें राष्ट्रीयकाम होत आहे तर आळस कां ?—आणि या वज्रनिभ दृढनिश्चयाचे बळावरच त्यांनीं या ग्रंथाचा पल्ला पोंचविला.

याप्रमाणें त्यांची बाजू त्यांनीं केली. याबद्दल आम्हांस वाटतें कीं सर्व सहृदय महाराष्ट्रीयांनीं कृतज्ञ असलें पाहिजे. आणि एवढी कृतज्ञता जर महाराष्ट्रीयांजवळ असेल, तर त्यांचे श्रमाचें चीज होण्यास राहूं नये. आतां परीक्षेचीच वेळ आली आहे. कित्येकांस असा भास आहे कीं, या काहाणींत आहे काय ? ते एक पोटाचा धंदा करीत आहेत. आज सावकार काढिला तर उद्यां ग्रंथ विकून लाट मारितील. सावकाराचें ऋण फेंकून देऊन खिसा भरून स्वस्थ बसतील. हा भ्रम. कै० मल्लापा बसाप्पा वारद यांस होता. ( यांचे औदार्याची माहिती सर्वांस आहेच. ) या सबबीवर हे प्रथम कांहीं आश्रय देईनात. परंतु पुढें जेव्हां लायक गृहस्थांकडून खरी खरी स्थिती त्यांजपुढें येऊन या सर्व व्यवसायांत या ब्राह्मणास तीन कवड्या देखील मिळत नाहींत.—तुरीची काठी तुरीवर झाडली म्हणजे भाग्य, असें त्यांचे गळां उतरलें.—, तेव्हां त्यांनीं त्यास शंभर रुपये बक्षीस दिले. आणि आम्हांस खात्री आहे कीं, अशा रीतीनें साहाय्य करणारे दुसरेहि गृहस्थ निघतील. मात्र त्यांस या ग्रंथाची अनन्य साधारण वस्तुस्थिति कळली पाहिजे. आमचे परिचयांतील एका गृहस्थास आह्मी ग्रंथाची

एक प्रत—रु. १६ ची घेण्याविषयीं विनंति केली. ते म्हणाले मजजवळ **द्रविडाचें सार** आहे. आह्मी म्हटलें हा **समग्र ग्रंथ** आहे. आणि हा निर्माण करण्यास **आज आठ वर्षेपर्यंत अनेक विद्वान् लेखक, व्यवस्थापक, मुद्रक, यांचे श्रम होऊन शिवाय जवळ जवळ पाऊणलक्ष रुपये भांडवल खर्चावें लागले आहे.** विचार करा. १६ किंवा २४ रु. आपण शंभरदां मिळवाल. पण वरील गोष्ट जुळून येऊन असला ग्रंथ या अभागी देशांत दोन पिढ्यांत तरी निघेल काय ? त्याबरोबर त्या गृहस्थांचें काळीज हललें व त्यांनीं म्हटलें ' आपलें म्हणणें अक्षरशः खरें आहे. मला प्रत द्याच आणि ती पुनः टिकाऊ कागदाची व बांधणीची द्या. मी रु. २९ खुषीनें देतों." असा प्रकार आहे. तेव्हां देशांतील यावत् गुणज्ञ, सुखवस्तु, धर्माभिमानी लोकांनीं वरील गोष्टी ध्यानीं घेऊन रा. ठकार यांचे श्रमाचें सार्थक करावें, एवढी सविनय प्रार्थना आहे.

दुसरे एकदोन गृहस्थ म्हणाले, ग्रंथ चांगला आहे; पण वाचण्यास वेळ नाहीं. आह्मी म्हटलें, ' मेहेरबान, आपणासाठीं हा यत्नच नाहीं. खरें पुसाल तर हा यत्न असंस्कृतज्ञ व विशेषतः स्त्रीवर्गासाठीं आहे. कारण, मागील पिढींत आपल्या आयाबहिणी, त्यांना तुम्ही भोळ्या म्हणा, वेड्या म्हणा, खुळ्या म्हणा, देवालयांत जाऊन पोथीपुराण ऐकत त्यामुळें तरी आपल्या पूर्वजांच्या भक्ति, ज्ञान, विज्ञान, नीति, व्यवहार इत्यादिकांनीं पूर्ण अशा ह्या गोष्टी त्यांच्या कानीं पडत; पण हल्लींच्या पिढींतल्या ह्या तुमच्या गळपट्टे विणणाऱ्या देवळांतहि जात नाहींत आणि घरींहि मनोरंजना पलीकडे त्यांचे हातीं कांहीं पडत नाहीं. त्यांना इच्छा नाहीं असें नाहीं. देवळांत मात्र जाण्यास त्या भिडावतात. पण घरीं साधन झाल्यास त्या त्याचा फायदा अवश्य घेतील. आणि अशा मर्यादशील, मितज्ञानी, जिज्ञासुवर्गाकरितांच मुख्यतः आमचा यत्न आहे व तो त्यांना मान्यहि आहे. परंतु हा ग्रंथ त्यांचे हातीं घालण्याचें साधन आहे तुमचे स्वाधीन, एथें त्यांनीं काय करावें ?

हें बोलणें आमचे स्नेहास पटलें व तो म्हणाला, खरी गोष्ट. ग्रंथ घेतला पाहिजे. पुनः मिळणार नाहीं. व भावी पिढीचें शिक्षकत्व आयांकडे असल्यानें स्त्रियांचाच या ग्रंथाशीं परिचय अधिक पाहिजे.

सारांश, ज्यांना ज्यांना ग्रंथाची खरी योग्यता कळली त्यांनीं त्यांनीं त्याचे अल्प मूल्याची पर्वा न करितां त्याचा स्वीकार केला आहे व अशीच इतरांची प्रवृत्ति या अमोल व वारंवार न मिळणाऱ्या ग्रंथाचे संग्रहाकडे व्हावी, म्हणून त्याची अंतस्थिति आह्मी वाचकांपुढें मांडिली आहे. याहि उपर असल्या ग्रंथाचे संग्रहाचे कामीं जे उपेक्षा करितील, त्यांचा योग नाहीं असें म्हणावें लागेल.

असो. अखेर ज्या जगच्चालक प्रभूनें हातपायांस शक्ति देऊन आज आठ वर्षीनीं का होईना, हा प्रचंड ग्रंथ तडीस नेवविला, त्याचे चरणीं अनंत प्रणाम करून व त्याचे अनंत उपकार बोलून हें आभारवचन पुरे करितों.

" काय म्यां पामरें बोलावीं उत्तरें,
परि त्या विश्वंभरें बोलविलें—"

महादेव हरी मोडक.—भाषांतरकार.

# मुद्रकाची प्रार्थना.



मे. ग. वि. चिपळुणकर आणि मंडळीनें प्रकाशित केलेल्या श्रीमन्महाभारताचे भाषांतराच्या छपाईचे कामीं आह्मीं आपल्याकडून निरनिराळ्या माणसांवर ( कॉपी लिहिणार, कंपाझीटर वगैरेंवर ) देखरेख ठेवून शक्य तितक्या काळजीनें हें काम करून घेतलें आहे. तथापि आह्मीं कितीही व्यवस्था ठेविली असली तरी ती मनुष्यकृतीच असल्यामुळें जर कोठें नजर चुकीनें वाक्यरचना करण्यांत किंवा टाइप जुळण्यांत ' ध च्यां जागीं मा ' असें होऊन अर्थांतर होत असल्यास किंवा विपरीतार्थप्रतीती भासल्यास अधिकारी वाचकांनीं ही अपरिहार्य गोष्ट आहे हें ध्यानांत वागवून त्याबद्दल आम्हां सर्व मंडळीवर रुष्ट न होतां कृपाच करावी एवढी सर्वांस नम्रपणें प्रार्थना आहे.

सर्वांचा कृपाकांक्षी,

केशव रावजी गोंधळेकर,

जगद्धितेच्छु प्रेस पुणें.

# सद्गृहस्थांचें विनंतिपत्र.

## " श्रीमन्महाभारताचें मराठी सुरस भाषांतर "

श्रीमद्व्यासकृत महाभारताचें महत्व हिंदुधर्मीयांपैकीं तरी कोणास वर्णून सांगावयास नको. संस्कृत पंडित, अपंडित, बाल, वृद्ध, स्त्री, पुरुष कोणी असो, प्रत्येकास या पूज्य ग्रंथांतील कांहीं तरी आख्यानें कोणत्या तरी रूपानें माहीत असतात. या ग्रंथांतले श्रीमद्भगवद्गीतेसारखे भाग तर तोंडपाठ करून रोज त्यांचें आवर्तन करणारे कितीतरी लोक आहेत.

वेदतत्त्वें प्राकृतांस सुलभ करण्याच्या हेतूनें श्रीमद्व्यासांनीं **हा पांचवा वेदच** निर्माण केला अशी समजूत आहे. यांत देवांचा व त्यांच्या भक्तांचा इतिहास मनोरंजक रीतीनें मुख्यतः सांगितला आहे, तरी त्यांत प्रसंग साधून अध्यात्मविद्या विस्तारिली आहे. धर्माधर्म विचार सांगितला आहे. व्यवहार नीति पढविली आहे, राजनीति उपदेशिली आहे. सारांश अनंत कालापासून आजपर्यंत मनुष्याच्या चित्ताला थक्क करून टाकणाऱ्या अत्यंत गहन अशा धर्मतत्त्वांच्या विवेचनापासून तों रोजच्या व्यवहारांत येणाऱ्या अडचणीच्या प्रसंगीं उपयोगीं पडणाऱ्या उपदेशापर्यंत सर्व कांहीं यांत आलेलें आहे. गूढ तत्त्वांचें उद्घाटन करणारे वादविवाद व प्रश्नोत्तरेंहि आहेत. तशाच इसापनीतिसारख्या नीत्युपदेशपूर्ण पशुपक्ष्यांच्या लहानसहान गोष्टीहि आहेत. समाजरचनेच्या इतिहासाचें संशोधन करूं पाहणारास तर हा ग्रंथ केवळ रत्नांची खाण आहे.

आजपर्यंत जुन्या कवींचीं ओवीबद्ध किंवा आर्यावृत्तांतील सारें वाचूनच लोक आपली तृषा भागवित होते. पुढें गद्यांतही एकदोन सारग्रंथ प्रसिद्ध झाले. **परंतु मूळ मुळींच न सोडतां, त्यांतलें मर्म स्पष्ट करून, सोप्या, सरळ व सुंदर मार्गेत लिहिलेला हा एवढाच ग्रंथ आहे.** याच्या प्रकाशनानें चिपळूणकर मंडळीनें एक मोठें राष्ट्रकार्य केलें आहे. या कामीं या मंडळींनीं जवळ जवळ साठ हजार रुपये खर्च करून हा प्रचंड ग्रंथ महाराष्ट्रीयांपुढें ठेविला आहे.

हें भाषांतर विद्वद्वर्य **डॉ० सर भांडारकर** प्रभृतींनी ठिकठिकाणीं मुळाशीं ताडून पाहून त्याच्या शुद्धपणाबद्दल व मार्मिकतेबद्दल उत्तम शिफारसपत्रें दिलीं आहेत; परंतु खेदाची गोष्ट ही आहे कीं, या ग्रंथास जितका जरूर लोकाश्रय मिळावा तितका अद्यापि मिळाला नाहीं. चिपळूणकर मंडळींनीं परिश्रम अतोनात केले, आणि सावकार काढून द्रव्य अतोनात गुंतविलें असूनही शिवाय थोडेंसें काम ( उपसंहार ) शिल्लक आहे. तें लोकाश्रयाच्या अभावीं पूर्ण होणें अशक्य आहे असें निदर्शनास आल्यावरून हें विनंतिपत्र काढलें आहे. या पत्राच्या द्वारें एवढीच विनंति आहे कीं, या प्रचंड सत्कार्यास साहाय्य करून चिपळूण-

कर मंडळीच्या श्रमाचें चीज करावें. ऐपत असेल त्यांनीं देणगी म्हणून कांहीं तरी मोठी ठोकळ रकम द्यावी.

हें शक्य नसेल त्यांनीं पुस्तकाच्या प्रती–निदान एक प्रत–घ्याव्या.

ज्यांना स्वतः ग्रंथ घेण्याची सवड नसेल, त्यांनीं परहस्तें तरी हातभार लावावयाचा म्हणून शक्य ती खटपट करावी.

सारांश, कोणत्या तरी मार्गानें, परंतु त्वरित, साहाय्य केल्यास मंडळीस आपले आंगावर घेतलेलें काम संपविण्यास फार सोपें जाणार आहे. अगदीं अखेरचें व कळकळीचें सांगणें हें आहे कीं, पैसा मिळून जाईल. परंतु ज्या ग्रंथाला अनेक विद्वानांचा संहतप्रयत्न व जवळ जवळ पाऊण लक्ष रुपये भांडवल लागतें असला हा ग्रंथ निदान एकदोन पिढ्यांतही पुनः छापविण्याचें सामर्थ्य या सध्याच्या महाराष्ट्रांत नाहीं. सबब हा प्रश्न आहे तों सहृदयांनीं याचा संग्रह करावा. सूज्ञास याहून अधिक काय लिहावें ?—कळावें.

गोपाळ कृष्ण गोखले.
दाजी आबाजी खरे.
भालचंद्र कृष्ण भाटवडेकर.
सिताराम विश्वनाथ पटवर्धन.
मोरो विश्वनाथ जोशी.
पुरुषोत्तम परशुराम खरे.
हरि नारायण आपटे.

रंगनाथ नरसिंह मुधोळकर.
हरि सिताराम दीक्षित.
मोरेश्वर गोपाळ देशमुख.
गणेश व्यंकटेश जोशी.
गणेश श्रीकृष्ण खापर्डे.
महादेव वामन भट.
दामोदर सांवळाराम यंदे.

# प्रकाशकाची प्रार्थना.



सदैव त्वय्येवार्पित-सकलचिंताभरमिमं ।
यदित्वं मामंब त्यजसि समयेऽस्मिन् सुविषमे ।
तदा विश्वासोऽयं त्रिभुवनतलादस्तमयते ।
निराधारा चेयं भवति खलु निर्व्याजकरुणा ॥

—जगन्नाथ—

**सा० न० वि० वि० सकल महाराष्ट्र-भाषाबंधुहो:—**

आपल्या शास्त्रांत यावत् पुरुषार्थांत धर्माला आद्यस्थान दिलें आहे. धर्म हा व्यक्तीचें समाजाचें, देशाचें, राष्ट्राचें व यावत् मानवीजातीचें केवळ चैतन्य आहे—जीवन आहे. आमचेकडे तर प्रत्यक्ष **परमात्म्यानें अवतार** घेण्यास "धर्मपरित्राण" हें एकच कारण आहे. राजशासनहि धर्मशासनावांचून लंगडें आहे. कोणत्याही देशांत हजारों दंपत्यें किंवा कुटुंबें जीं नीतीनें वागतात तीं केवळ पिनलकोडाचे भयानें नसून व्यास, वाल्मिकि, मनु, वसिष्ठ, ख्रिस्त, बुद्ध, महंमद, झोरास्तर इत्यादि धर्माचार्यांचेच कायदे त्यांस नीतीचे मार्गांत राखीत आहेत. अर्थात् या सत्पुरुषांचीं वचनें ज्यांत संगृहीत आहेत असले ग्रंथ त्या त्या राष्ट्राचें सर्वस्व होत. व म्हणून प्रत्येक जीवानें ते सर्वात्मना राखिले पाहिजेत.

आपले देशांत हे ग्रंथ म्हणजे विशेषतः पुराणें होत. त्यांचे योग्यतेविषयीं नारद म्हणतात:—**वेदाःप्रतिष्ठितादेवि पुराणैर्नात्रसंशयः** ॥ म्हणजे वेदांना देखील निःसंशय पुराणांनीं बळकटी आणिली आहे. या सर्वहि पुराणांत 'श्रीमन्महाभारत श्रेष्ठ आहे.' आपण प्रत्यहीं पितृतर्पणाचे वेळीं "**भारत व भारताचार्य**" यांस उदक देतों. याहून या ग्रंथाची परममान्यता काय वर्णावी ?

**श्रीज्ञानेश्वर भारताविषयीं म्हणतात:**—"हें काव्य सर्व काव्यांचा राजा, सर्व ग्रंथांतील श्रेष्ठ ग्रंथ होय. रसाला रसाळपणा येथेंच आला, चातुर्य येथेंच शहाणें झालें, तत्वार्थाला येथेंच गोडी चढली, सुखाचें सौभाग्य येथेंच वृद्धि पावलें, येथेंच कलांना कौशल्य आलें, याचा पराक्रम फार अपूर्व आहे; म्हणूनच याचे केवळ श्रवणानें जनमेजय मुक्त झाला.

**श्रीज्ञानेश्वरांचे** हे शब्द मनांत घेऊन आह्मी आठ वर्षांपूर्वीं ह्या प्रचंड ज्ञानाकरांतील रत्नें सर्वांपुढें उघडी करून मांडण्याचा प्रयत्न आरंभिला व तो जनमान्य होऊन सांप्रत अवसितप्रायहि झाला आहे. परंतु, दुर्दैवानें या प्रयत्नांत आमची स्थिति कस्तुरीमृगाप्रमाणें झाली आहे. कस्तुरीचा परिमल देवासुर-मनुष्यांना गुंगवून सोडितो खरा, परंतु, तोच परिमल तिच्या जनक मृगाचे प्राणघातास कारण होतो. त्याचप्रमाणें ज्या ह्या प्रचंड महाग्रंथाचे सुरस महाराष्ट्रस्वरूपानें आज मराठी भाषेलाहि सौभाग्य चढलें आहे असें विद्वान

कबूल करितात, त्याच ग्रंथाचे निर्माणकार्यांत आमचे अनेक बळी पडले! ही जीवहानी व द्रव्य-हानीचा आंकडेबंद हिशोब तपासणारांनीं वर अभिप्राय दिलाच आहे.

आतां कोणी ह्मणेल कीं, ही उठाठेव तुह्मी मूळ केलीत कां, आणि आतां आमचे-पुढें रडतां कां? ( बाकी असला प्रश्न ज्या हृदयांत लेशतरी कृतज्ञता व कौतुक वसत अ-सतील त्याकडून नाहींच येणार ) तर त्याचें उत्तर असें आहे कीं, असलीं महत्कार्यें कोणी तरी प्राणसंकट स्वीकारण्यास तयार झाल्याशिवाय होतच नसतात. असा आमचा अनुभव आहे ह्मणूनच—

**डॉक्टर सर भांडारकर** यांनीं म्हटलें आहे कीं या तोडीचा ग्रंथ या देशांत इंग्रजी राज्य सुरू झाल्यापासून अद्याप झाला नव्हता. कारण, हें साहस करण्यास कोणी धजेना. आतां साहस हें कुशलपरिणामी झालें असतां शूरत्वाचे सदरांत पडतें. विपरित झालें असतां मूर्ख-त्वाचें पडतें. हा न्याय लोकांनीं ध्यानांत घ्यावा. शिवाय स्त्रीपुरुषांचे सौंदर्याला सौभाग्य चढविणारीं मुक्तारत्नें वर आणण्यासाठीं जर कोणी समुद्रतळीं बुडी घेतली आणि त्याचा तेथें प्राण गुदमरूं लागला तर त्या मुक्तारत्नांनीं भूषित होणाऱ्या उपरिस्थानीं त्याचे साह-साचें योग्य प्रायश्चित्त म्हणून त्यास तेथेंच मरूं देणें हें मनुष्यतेस उचित होईल कीं, त्याला वर काढणें उचित होईल? याचाहि न्याय सुज्ञ, सहृदय व दयार्द्र वाचकांनींच करावा.

चतुःखंडाला ललामभूत असा **ताजमहाल** जरी एका प्रेमी वेड्यांपिराचा अविचार असला तरी तो सर्वांना चिररक्षणीय आहे यांत संशय नाहीं. त्याचप्रमाणें प्रस्तुत ग्रंथ जरी आमचे अविचारानें फळ असलें तरी तें रक्षणार्ह आहे, हें काय सांगावें? व रक्षणाचें श्रेय अर्जनापेक्षांहि जास्त आहे.

सारांश, सर्व महाराष्ट्राला अभिमानास्पद असा हा ग्रंथ निर्माण करून आपले पुढें ठेवून ह्मणजे आपली चाकरी करून नंतर आपणापाशीं भाकरी मागत आहों ती आह्मांस घाला; व जिकडे द्रव्यांश तिकडे पुण्यांश हें ध्यानीं घेऊन सर्व जनतेचा उद्धार करणारा हा ग्रंथ घरोघरीं करण्याचें श्रेय जोडा. हें श्रेय जोडण्यास स्वार्थत्याग ह्मणजे उभ्या हयातींत एकवार वीस पंचवीस ( रु० १६ साधी प्रत. रु० २४ लायब्ररी एडिशन ). रुपये खर्चणें या पलीकडे नसून श्रेय मात्र अनिर्वचनीय होणारें आहे. सुज्ञांस अधिक काय सुचवावें? कळावें लोभ असावा हे विनंति.

आपला कृपाकांक्षी

**बाळकृष्ण पांडुरंग ठकार,** सेक्रेटरी,

**ग. वि. चिपळूणकर आणि मंडळी.**

बुधवार पेठ पुणें सिटि.

# ग्रंथपरिचय.

वसुदेव-सुतं देवं कंसचाणूरमर्दनम् ।
देवकी-परमानंदं कृष्णं वंदे जगद्गुरुम् ।

संकल्पमात्रानेंच अनंत ब्रम्हांडांचे उत्पात्ति-स्थितिलय करणाऱ्या व सर्वशक्तिमान् अशा ज्या परमात्म्याच्या कृपेनें, अनेक संकटांतून, अनेक दुर्योगांतून व नैकविध विपज्जालांतूनहि आमचा रस्ता सुधरून या महाभारत ग्रंथाचें भाषांतररूपी मजलीचे अंतिम सीमेस आठवर्षांचे अखेर कां होईना, आम्ही सुखरूप पोंचलों, त्याचे चरणीं प्रथम प्रेमपुरःसर हें शिर लववून पुढील दोन शब्द लिहितों.

कविकुलमुकुटमणि कालिदासाचे कृतींत एका कंचुकीनें म्हटलें आहे कीं:—

आचार इत्यधिकृतेन मया गृहीता । या वेत्रयष्टिरवरोधगृहेषुराज्ञः ।
काले गते बहुतिथे मम सैव जाता । प्रस्थान-विक्लव-गतेरवलंबनाय ॥

अर्थः—राजाच्या अंतःपुरावर जेव्हां माझी नेमणूक झाली तेव्हां त्या अधिकाराची निशाणी म्हणून, सांप्रदायाप्रमाणें, ही माझे हातांतील वेताची काठी मी हातीं धरली. परंतु, याप्रमाणें बरींच वर्षें लोटून आज मला वार्धक्य प्राप्त झालें असतां, हीच काठी, मी चालतांना माझे पाय लटपटूं लागले म्हणजे मला टेंका देण्याचे उपयोगास आयतीच येऊं लागली. किंवा प्रसिद्ध प्लूतार्क नामक ग्रंथकारानें म्हटलें आहे कीं ' प्रथम प्रथम मी केवळ उदरनिर्वाहाचें साधन म्हणून सन्मान्य व स्मरणीय अशा सत्पुरुषांची चरित्रमाला लिहिण्याचे नादीं लागलों; परंतु, चमत्कार असा झाला कीं, अशा रूपानेंहि मी त्यांचे चरित्रांचें परिशीलन करण्यांत कांहीं वर्षें घालविलीं असतां पुढें पुढें मला स्वतःच आपले वर्तनांत त्या महात्म्यांचें अनुकरण करण्याची इच्छा उत्पन्न होऊं लागली व कांहीं कालानें ती प्रबळ होत जाऊन आपणही तद्रूप व्हावें अशी उत्कंठा झाली व तीमुळें माझ्या एकूण वर्तनाचें धोरणच बदललें. ' असाच कांहींसा प्रकार प्रस्तुत लेखकाचाहि झाला. सात वर्षांपूर्वी, एक पोटाचा धंदा म्हणून **चिपळूणकर मंडळीकरितां भारताचें भाषांतर** करण्याचें काम मी पत्करलें; व यथामति, यथाशक्ति तें आज सात वर्षेपर्यंत चालवून, ईशदयेनें, तें माझ्याच हातून अवसितही झालें. वास्तविक पहातां आतां या ग्रंथाचा माझा संबंध सुटलाच; परंतु, मौज ही आहे कीं, या भाडोत्री परिचयांतच या ग्रंथावर इतकें प्रेम जडलें व त्याबद्दल इतका आदर वाढला कीं या आदराचीं कारणें अंशतः तरी आपले प्रिय वाचकांसहि सांगावीं अशी एक प्रकारची अंतःप्रेरणाच झाली आणि म्हणूनच, ही कामगिरी भाषांतरकरविणाऱ्या मंडळीनें उद्दिष्ट नसतां किंवा मला तिनें सांगितली नसतांहि, मी केवळ स्वप्रेमानें करीत आहें. तर याबद्दल भारताचे वाचक व भाषांतरप्रयोजक मंडळी या उभयांनींहि मला क्षमा करावी.

पुढील पानें वाचीत असतां त्यांत कांहीं मजकूर असा आढळेल कीं ज्यासंबंधें ऊहापोह करण्याचें अभिवचन, आमचे या भारताचे भाषांतराचे प्रथमखंडाचे प्रस्तावनेंत आमचे चिरंतन-मित्र, प्रसिद्ध विद्याव्यसनी व लेखनपटु सुप्रसिद्ध कादंबरीकार रा. रा. हरिभाऊ आपटे यांनीं लोकांस दिलें आहे, व त्यामुळें वाचकांस पुनरुक्तीचें भय पडेल. परंतु वाचकांस हें येथें स्पष्ट-पणें कळविलें पाहिजे कीं, येथें माझे मतीस आलें तें मी आपल्या जबाबदारीवर लिहिलें आहे. माझीं मतें हरिभाउंचे मताशीं संवादी किंवा विरोधी कशींहि असलीं तरी त्याचें श्रेय किंवा दोष त्यांजकडे नाहीं.

लेखाचे मथळ्यावर ‘ ग्रंथपरिचय ’ अशीं अक्षरें लिहिलीं आहेत, तीं पाहून, कदा-चित कांहीं वाचकांना असें वाटेल कीं, या लेखांत मीं प्रस्तुतच्या पुस्तकांत किंवा खंडांत ज्या ग्रंथाचें हरिवंशाचें-भाषांतर दिलें आहे, त्या संबंधानें कांहीं विशेष ओळखीच्या गोष्टि सांग-णार असेन. असें वाटणें हें साहजिक आहे; पण वाचकांस येथें हें सांगितलें पाहिजे कीं, प्रस्तुत लेख केवळ इतक्या संकुचित स्वरूपाचा करून माझी मनीषा पूर्ण होत नाहीं. शिवाय ‘ हरि-वंश ’ हा जरी सामान्य जनतेच्या समजुतीला एक स्वसिद्ध ग्रंथ भासतो, तरी विद्वानांचे दृष्टीनें तो तसा नसून एकलक्षसंख्याक जो अत्यंत सुप्रसिद्ध कौरव-पाण्डवीय संग्रामाचा ‘ महा-भारत ’ संज्ञक इतिहास त्याचा केवळ एक अंश किंवा भाग आहे. मात्र तो फार महत्वाचा, मोठ्या योग्यतेचा व विशिष्ट आदरणीय भाग आहे, इतकेंच. अर्थात् ग्रंथ या शब्दाची व्याप्ति एका अंशाला देणें म्हणजे तिचा संकोच करणें आहे. म्हणून असा संकोच न करितां, हा आमचा ‘ ग्रंथपरिचय ’ म्हणणे महाभारताचा व तदंगभूत म्हणून प्रकृत अंशाचा—हरिवं-शाचा—परिचय आहे, असें समजावें. इतकेंच नव्हे तर ‘ हरिवंश ’ या भागाला **पुराण** ही संज्ञा असल्यानें अंशतः पुराणांचाहि विचार करणें आहे.

‘ महाभारत ’ हें नांव ऐकून तरी माहीत नाहीं व त्यांतील एकादी तरी गोष्ट ज्यास ठाऊक नाहीं अशी व्यक्ति या भरतभूमींतील वैदिकधर्मी स्त्रीपुरुषांत, निदान त्यांतील साक्षर किंवा सुशिक्षित अंशांत तरी सांपडणें विरळा. श्रुतिस्मृतींची माहिती ज्यांस नाहीं अशीं पुष्कळ मनुष्यें आहेत, पण भारताचा अंशतः तरी परिचय व्यक्तिमात्राला आहेच. इतकी या ग्रंथाची व्यापकता व लोकप्रियता आहे. व ती सकारण आहे. कारण, ‘ वेद ’ जरी आर्य सनातन धर्माचा आद्य किंवा मूलाधार ग्रंथ आहे, तरी तो अति गूढ असल्यानें, व त्याचे पठन पाठनास कांहीं विशिष्ट मर्यादा असल्यानें अर्थातच तो सर्वांचे परिपाठांत नाहीं. परंतु भारताचें पठनपाठन आचाण्डाल अप्रतिबंध असून तद्गतज्ञानाची योग्यता वैदिक ज्ञानाचे तोडीची असल्यानें व तशांतहि तो इतिहास असल्यामुळें जनरुचीस सहजच अधिक अनुकूल पडल्यानें, त्याचा प्रचार व आदर सार्वत्रिक आहे.

‘ महाभारताचा ’ हा आदर केवळ जनरुचीचे आनुकूल्यास्तवच नसून त्याचे उत्पत्ती-पासून मोठमोठ्या ऋषींनीहि त्याचा तसाच गौरव केला आहे. तैत्तिरीयशाखीय लोकांत ‘ देवर्षिपितृ-तर्पण समयीं ‘ इतिहासपुराणं ’ तर्पयामि म्हणून याला पाणी देतात. शिवाय भगवान् मनूंनीं श्राद्धकालीं आलेल्या पितरांनाहि ‘ इतिहास ’ ऐकवावा अशी आज्ञा केली आहे. मनु म्हणतातः—

"स्वाध्यायं श्रावयेत् पित्रे धर्मशास्त्राणि चैवहि।
आख्यानानीतिहासांश्च पुराणान्यखिलान्यपि"

अर्थः—पितरांना वेद, धर्मशास्त्रें, आख्यानें, इतिहास व सर्व पुराणेंहि ऐकवावीं. याहून कोणत्याहि ग्रंथाचा अधिक आदर तो कसा करावा आणि कोणत्या देशांत कोणत्या युक्तीनें करूं शकतील? या औपचारिक आदराशिवाय, 'महाभारताचे' अध्ययनाबद्दल एक प्रकारचा सक्तीचा हुकूम देखील आहे. कारण एके ठिकाणीं म्हटलें आहे कीं,

'इतिहासपुराणाभ्यां वेदं समुपबृंहयेत्'।
'बिभेत्यल्पश्रुताद्वेदो मामयं प्रहरिष्यति।'

म्हणजे वेदाचे ज्ञानाला इतिहास व पुराणें यांच्या अध्ययनानें विस्तृत करून बळकटी द्यावी. कारण, केवळ वेदमात्र ओरखाडणाऱ्या तुटपुजी विद्यार्थ्याचें वेदाला भय वाटतें कीं, हा अल्पज्ञ कदाचित् माझे हाल करील

यावरून वेदाची योग्यता जर पुरापुर लक्ष्यांत यावयास पाहिजे तर विद्यार्थ्यानें इतिहास पुराणांचा परिचय केलाच पाहिजे; नाहीं तर अज्ञानामुळें त्याजकडून वेदाची बेअदबी होईल. अर्थात् इतिहास पुराणें हें वेदाचें वैभव आहे. आणि सार्वभौम राजा जरी झाला तरी भोंवतालचे वैभवसामग्रीमुळेंच जसा तो जनदृष्टींत भरतो, तसा 'वेदाचा' प्रभाव जनतेचे हृदयांत ठसविण्यास हे ग्रंथ अत्यवश्यक आहेत आणि म्हणून युगायुगाचे ठायीं वेदांबरोबरच त्यांचीहि उत्पत्ति किंवा पुनरुपलब्धि यत्नपूर्वक केली जाते. श्रीमच्छंकराचार्यांनीं आपल्या शारीरक भाष्याचे प्रथमाध्यायाचे तृतीय पादांतील एकुणतिसावे सूत्रावरील भाष्यांत व्यासोक्ति म्हणून एक श्लोक दिला आहे, तो असाः—

युगांतेऽन्तर्हितान् वेदान् सेतिहासान् महर्षयः।
लेभिरे तपसा पूर्वमनुज्ञाता स्वयंभुवा॥

अर्थः— युगाचे अंतीं इतिहासासह वेद गडप झाले होते. परंतु, महर्षींनीं प्रथम ब्रह्मदेवाची त्या कामीं अनुज्ञा घेऊन आपल्या तपोबलानें ते सेतिहास वेद पुनरपि मिळविले.

कोणास असें वाटेल कीं, इतिहासाचा अगदीं श्रुतीचे पाटाशीं पाट थाटून दिला आहे एवढी इतिहासाची योग्यता कां असावी? वेद किंवा श्रुति म्हणजे श्रेष्ठतमज्ञान, त्याचे पंक्तीस इतिहास बसवावा कीं काय? पण बसवावा काय? हा इत उत्तर प्रश्न शिल्लक नसून भागवतांत स्पष्टच म्हटलें आहे कीं,

'इतिहासपुराणंच पंचमो वेद उच्यते'

ह्म० इतिहास व पुराणें हा पांचवा वेद म्हटला जातो; व हें ठीकच आहे. न्यायी राजांचे *मुत्सदीमंडळांत किंवा कायदेकर्तेसभांत राजपक्षीयांचे खुर्चीशीं खुर्ची लावून लोकपक्षीय सभा*सदांस मान दिला जातो, ह्याचप्रमाणें सनातन धर्माच्या परमन्यायी संस्थापकानें वेदाबरोबरच इतिहास-पुराणालाहि जागा दिली.

वरील उपमा कोणास चमत्कारिक वाटेल; पण तसें वाटण्याचें कारण नाहीं. श्रुति ही ईशाज्ञा असल्यानें तो राजपक्ष उघडच आहे. आणि इतिहासाला लोकपक्षीय ह्मणण्यांत *अनर्थ होत नाहीं. कारण, वात्स्यायन ऋषींनीं न्यायसूत्रांवरील भाष्यांत म्हटलें आहेः—*

**यथाविषयं प्रामाण्यं । यज्ञो मंत्रब्राह्मणस्य लोकवृत्तमितिहासस्य । लोकव्यवहारस्थापनं धर्मशास्त्रस्य विषयः**

अर्थात् यज्ञाचे कामीं मंत्र-ब्राम्हणाचें प्रामाण्य, लोकवृत्ताचे कामीं इतिहासाचें व लोकव्यवहारस्थापनाचे कामीं धर्मशास्त्राचें; याप्रकारें यथाविषय प्रामाण्य समजावें. तेव्हां, इतिहासाचें प्रधानस्वरूप लोकवृत्तकथन हें आहे. आणि तें तसें असल्यामुळेंच व्यवहारदृष्टीचे लोकांना इतिहास फार प्रिय असतो. आजकालचे व्यवहारनिपुण इंग्रजादि पाश्चात्य लोकांत जें इतिहासाचें एवढें स्तोम आहे, त्याचें रहस्य तरी हेंच आहे. कित्येक ज्ञात्यांचें म्हणणें कीं इतिहास हें सगुण तत्वज्ञान आहे. आणि यामुळें ज्याप्रमाणें निर्गुणापेक्षां जनतेंत सगुणाचे उपासक अधिक, त्याचप्रमाणें केवळ सोंवळया तत्वज्ञानापेक्षां इतिहासरूपी सगुणरूपधारी तत्वज्ञानाचे भक्त अधिक; आणि तें ठीकच आहे. नीरु तत्वज्ञान हें सामान्य जीवांना नीरस व अरमणीय वाटतें; परंतु त्याच तत्वज्ञानानें इतिहासरूप शरीराचा आश्रय करून तें विग्रहि झालें कीं जनतेशीं खेळतें बोलतें आहेसें होऊन परिचयाला अधिक सुलभ जातें. आणि प्रत्यक्ष ईश्वराचेहि अनेक अवतारांत श्रीकृष्ण परमात्म्याचा अवतार जो इतका प्रिय झाला याचें रहस्य तरी यांतच आहे. अनीबेझांट बाईनीं आपल्या ‘ अवतार ’ नामक पुस्तकांत म्हटलें आहे.

Shri Krishna is the God of the house-hold, the God of family life, the God whose manifestations attract in every phase of his self revelations. He is human to the very core; born in humanity, as he has said, He acts as a man. As a child, He is a real child, full of playfulness, of fun, of winsome grace. Growing up into boyhood, into manhood, He exercises the same human fascination over the hearts of men, of women, of children; the God in whose presence there is always joy, the God in whose presence there is continual laughter and music. When we think of Shri Krishna, we seem to hear the ripple of the river, the rustling of the leaves in the forest, the lowing of the kine in the pasture, the laughter of happy children playing round the parent's knees. He is so fundamentally the God who is human in every thing; who bends in human sympathy over the cradle of the babe, who sympathises with the play of the youth, who is the friend of the lover, the blesser of the bride groom and the bride, who smiles on the young mother, when her first-born lies in her arms: every where the God of love and of human happiness; what wonder that his winsome grace has fascinated the hearts of men.

भावार्थः—श्रीकृष्ण हा घरगुती, कुटुंबांतील, नित्य व्यवहारांतील देव होय. आणि त्याच्या लीला त्याच्या प्रत्येक कृतींत जनचित्ताचें आकर्षण करितात कारण तो नखशिखांत मनुष्यरूप असून, त्यानें म्हटल्या प्रमाणेंच, मनुष्यरूप धरिल्यामुळें तो कृतीहि मनुष्यांचीच करून दाखवितो. बाळपणीं पहावें तो खरोखरच अल्लड, खेळकर गमती व मोहक लीला करणारा पोर वाटतो. बाळपणांतून तो क्रमानेंच पौगंडपणास येतो, तेथून नंतर तारुण्यास पोंचतो. बरें त्याच्या लीला स्त्री, पुरुष, मुलें

या सर्वांच्या अंतःकरणास एकाद्या मानवी लीलेप्रमाणेंच चटका लावून सोडितात. तो कृष्णदेव असा मौजदार कीं त्याचे सहवासांत असलें कीं सर्वदा आनंदाचा सुकाळ आणि हास्यविनोद, गायन नर्तन इत्यादिकांची अखंड रेलचेल. या श्रीकृष्णाचें स्मरण झालें पुरे कीं त्या बरोबर जणूं यमुनाजलाचें खुळखुळणें, वनांतील वृक्षपर्णांचें सळसळणें, कुरणांतून गाईचें हंबरणें, व आईबापाभोंवतीं भोवतीं खेळणाऱ्या आनंदी लेंकरांचें अनिमित्त हास्य या गोष्टीचें चित्र आपले पुढें उभें राहतें. मुख्यतः हाच देव प्रत्येक गोष्टींत इतका मानवी आहे कीं अर्भकांचे पाळण्याकडे तो मनुष्याप्रमाणेंच कळवळ्यानें धांवण्याला तयार, पुनः तरूण मंडळीचे फंदांत मिसळावयास एका पायावर उभा, प्रणयिजनाचा दोस्त, वधूपक्षाचाहि हितचिंतक, वरपक्षाचाहि वऱ्हाडी, बरें; त्या वधूला अल्पवयांतच मूल होऊन ती त्याला आपल्या हातांत खेळवितांना दृष्टीस पडल्यास तिची टवाळी करून तिला हंसावयालाहि सिद्ध. सारांश, देव खरा, पण मानवी प्रेमाच्या व सुखदुःखाच्या प्रत्येक गोष्टींत मिसळलेला; असा असल्यामुळें त्यानें मनुष्यमात्राच्या हृदयाला वेड लावून सोडावें, यांत आश्चर्य तें कोणतें? हें सहजच आहे.

असो; या लीलाविग्रही सगुणकृष्णमूर्तीप्रमाणेंच इतिहास हें तत्वज्ञानाचें सांवळें सगुणरूप असल्यामुळें तें सहजच कोरड्या तत्वज्ञानापेक्षांहि अधिक हृद्यंगम होईल; व केवळ आदेशापेक्षां उदाहरण अधिक परिणामकारक होतें, हें रहस्य ध्यानांत घेऊन, लोकबंधु जगन्नायक परमात्म्यानें कल्पारंभीं सृष्ट्युत्पत्ति—समकालींच मनुष्यजातीचे हिताकरितां सेतिहास वेद ब्रह्मदेवांचे स्वाधीन केले. अर्थातच इतिहासहि वेदा इतकाच जुना आहे. कारण, आजकाल जरी इतिहास या संज्ञेनें " महाभारत व रामायण " हेच ग्रंथ प्रामुख्यानें समजले जातात, तरी इतिहास शब्दाची मूळ व्याप्ति इतकी संकुचित नाहीं. प्रत्यक्ष वेदांतहि अनेक जुने इतिहास उपलब्ध आहेत. वामनाख्यान, अहल्यासंवाद, पुरूरवा उर्वशीसंवाद, हरिश्चंद्र व शुनःशेप आख्यान, शर्यातिचरित, आत्रेय कथा, अजीगर्ताख्यान इत्यादि अनेक इतिहास आज वेदांत दृष्ट आहेत. आणि यांचा अंतर्भाव इतिहास शब्दांत करितां येतो, असा सायनाचार्यांचा अभिप्राय दिसतो. कारण, ऐतरेय ब्राह्मणाचे प्रस्तावनेंत सायनाचार्य म्हणतात. " **देवासुराः संयत्ता आसन्नित्यादयः इतिहासाः । इदंवा अग्रे नैव किंचिदासीदित्यादिकं जगतः प्रागवस्थामुपक्रम्य सर्गप्रतिपादकं वाक्यं पुराणजातः।**—भावार्थः—वेदामध्यें " देवासुराः संयत्ता आसन् " म्हणजे देव व असुर यांचें युद्ध जुंपलें. इत्यादि वर्णनें आढळतात, त्यांस इतिहास म्हणावें; व सृष्टीचे पूर्वीं आज दिसतें आहे यापैकीं कांहींएक नव्हतें,' एथपासून उपक्रम करून सृष्टीची पुरातन अवस्था सांगणारा जो ग्रंथ त्याला पुराण असें म्हणावें.

श्रीमच्छंकराचार्यांनींहि आपले बृहदारण्यक भाष्यांत म्हटलें आहेः—

" **इतिहास इत्युर्वशीपुरूरवसोः संवादादिरुर्वशीहाप्सरा इत्यादि ब्राह्मणमेव । पुराणमसद्वाइदमग्र आसीदित्यादि** "

---

१ यो ब्रह्माणं विदधाति पूर्वं ।
यो वै वेदांश्च प्रहिणोति तस्मै ( श्रुति ) म्हणजे, जो ब्रह्मदेवाला प्रथम निर्माण करून त्याचे बुद्धीचे ठिकाणीं वेदांची प्रेरणा करितो.

म्हणजे—उर्वशीनामक अप्सरा व राजा पुरुरवा यांच्या संवादात्मक जें ब्राह्मणग्रंथांत वर्णन दिलें आहे, तें ब्राह्मणच इतिहास होय. आणि हें सर्व जगत् सृष्टिपूर्वी असद्रूप होतें." अशा प्रकारचीं जीं श्रुतिवाक्यें तींच पुराणें, असें समजावें.

अर्थात् 'महाभारत व रामायण' हे ग्रंथ त्यांचे लेखक जे व्यास व वाल्मीकि मुनी यांनीं स्वतः आपल्या डोळ्यांनीं पाहिलेल्या गोष्टी त्यांत लिहिलेल्या असल्यानें जरी विशेषतः इतिहास ग्रंथ समजले जातात, तरी आमचेकडे इतिहासाची व त्याचे योग्यतेची कल्पना प्राचीनतमकालापासून—नव्हे—सृष्टिसमकालच होती हें स्पष्ट आहे. आणि परम कारुणिक प्रभूनें लोकांना '**सत्यं वद**'। **सत्यान्नास्ति परोधर्मः। सत्यान्नप्रमदितव्यम्। सत्यमेव जयते**। इत्याकारक आदेश किंवा उपदेश करीत बसण्यापेक्षां, हरिश्चंद्रासारख्या एकाद्या सत्यसंध राजाचा मूर्तिमान् इतिहासच त्यांचे डोळ्यांपुढें मांडावा म्हणजे तो अधिक परिणाम करील, हें रहस्य ध्यानीं घेऊनच सृष्ट्यादौ जेव्हां मनुष्यांकरितां वेद प्रकट केले त्यावेळीं त्या वेदांतच कांहीं इतिहासहि गुंफून ठेविले.

येथें पुष्कळांना अशी शंका येईल—नव्हे, ती आलेलीच आहे—यामुळें आम्हांस पुष्कळजण असा प्रश्न करतील कीं, बाकीचें हें तुमचें म्हणणें कबूल; परंतु ईश्वरानें वेद निर्माण केले किंवा दिले हें सिद्ध कराल तर पुढले म्हणण्याला जोर आहे, नाहीं तर एवढा वेळ गाइलेलें सर्व व्यर्थ आहे. वास्तविक पहातां आमच्या आजच्या लेखांतला **वेदांचें अपौरुषेयत्व** हा जरी मुख्य मुद्दा नाहीं तर तो प्रश्न प्रसंगानें पुढें आलाच आहे, तेव्हां त्या कामीं आमचें उत्तर आम्ही वाचकापुढें मांडल्यास अंशतः विषयांतराचा उद्भवणारा दोष क्षम्य होईल अशी आशा आहे.

आमचेकडे अनादिकालापासून अनेक मतांचे अनेक समर्थ वादी जन्मले, शंकराचार्यांबरोबरहि अनेकांनीं दारूण वाग्युद्ध केलें तथापि श्रुतींचें अपौरुषेयत्वावर घाव घालणारे लोक विरळाच आढळतात. कालकालचे सर्व एकाकार करूं पाहणारे व जुक्तीसे चालणारे **दयानंदसरस्वती** यांनीं आमच्यांत प्रचलित असलेल्या अनेक प्रमाण ग्रंथांत मनुष्यकृत म्हणून जरी फांटा दिला, तरी ईशनिश्वासभूत श्रुतीचा अत्यादर केला. किंबहुना, श्रुतिवचनांचें इतपत कौतुक अलीकडे कोणी केलें नसेल, असें ह्मटल्यास चूक होणार नाहीं. असें असतां, आमची अशी पूर्वपरंपरा असतां, श्रुतींचेच आभिजात्यावर गदा आणण्याची बुद्धि ही अलीकडे आमच्यांतील कांहीं विद्वानांत कोठून शिरली ? याप्रश्नाचें उत्तर उघडच आहे कीं, आम्ही आपलेच अकलेनें व हिमाइतीनें क्रमशः शहाणे झालों; आह्माला एकदम अकलेचें किंवा ज्ञानाचें गाठोडें कोणीहि दिलेलें नाहीं' अशाप्रकारची घमेंडी मारणारे व जेथें तेथें एव्होल्यूशन किंवा क्रमविकाशवादानें केवळ भारून गेलेले जडवादी जे कांहीं पाश्चात्य देशांतील विद्वान् त्यांचे मेंदूंत ही भेदबुद्धी निपजून, संसर्गधर्मामुळें ती आमच्यांतहि शिरली. परंतु ही बुद्धि केवळ विपरीत आहे, असें पुढील विवेचनावरून ध्यानांत येईल.

प्रथमतः ही एक गोष्ट नमूद केली पाहिजे कीं, ज्या कल्पनेनें गेल्या शतकांत इतकी *प्रचंड क्रांति केली व अनेक विद्वानांना एक मोठें कोडेंच उलगडलें असें वाटूं लागलें, ती* **डार्विन साहेबांची** *उत्क्रांतीची कल्पना हिला लौकरच* **तिळांजुळी** मिळण्याचा रंग आला आहे.

या कामीं ज्यांस खात्री करून घेणें त्यांनीं:—At the Death-Bed of Darvinism—हें ई. डेनर्ट—नामक जर्मन विद्वानानें लिहिलेलें पुस्तक वाचावें; अर्थात् आम्ही आपल्याच अकलेनें शहाणे झालों या वादास आतां भीक घालण्याचे दिवस लवकरच नाहींसे होणार हें खास.

दुसरी गोष्ट:—उत्क्रान्तिपक्षाचा वाद एकवेळ बाजूस ठेवून—जे कोणी वेद हा ईशप्रणीत नसून पौरुषेय म्हणजे मनुष्यकृतच आहे असें प्रतिपादन करितात, त्यांचे मुख्य मुद्दे कोणते व ते कितपत टिकतात हें आपण या स्थळीं तपासून पाहूं. पौरुषेयवाद्यांचा एक मुद्दा असा आहे कीं, वेदामधील " **अग्निमीळेपुरोहितं** " इत्याकारक संहिता किंवा आनुपूर्विघटित वर्णरचना किंवा संयोग हा मनुष्याशिवाय, ' **नामरूप हें तूजला नसे** ' अशा प्रकारच्या एका निराकार भूताला—महद्भूताला—ईश्वराला—कसा साधेल ? त्यांचा दुसरा मुद्दा कीं वेदांतील मण्डलें, ऋचा, सूक्तें, मंत्र, यांच्यावर मालकी सांगणारांच्या उघड उघड सहीशिक्याच्या निशाण्या आहेत. **विश्वामित्रऋषिः मधुछंदसऋषिः गोतमऋषिः** इत्यादि इत्यादि जर राजरोस अनेक ऋषींचे शिक्के आहेत, तर त्यांचा अर्थ काय करावयाचा ? व त्यांना धाब्यावर बसवून त्यांची मत्ता ईश्वराकडे द्यावयाची, या न्यायाला काय म्हणावें ? त्यांचा तिसरा मुद्दा असा कीं, वेदांतील कित्येक मंत्र अश्लील आहेत, कित्येक ज्ञानाची क्रमिक प्रगति दाखविणारे आहेत, कित्येक अनेक देवतांच्या किंवा ईश्वराच्या स्तुतीनें भरले आहेत, कित्येकांत अर्वाचीन स्थलांचा, पुरुषांचा उल्लेख आहे. अर्थात् वेदासारख्या पवित्र ग्रंथाला व विशेषत: तो जर ईशमुखांतून आला असेल तर अशाला ही अश्लीलवाणी अनुरूप कशी दिसावी ? दुसरें—ईश्वर सर्वज्ञ आहे—त्याचे ठिकाणीं जर अतीत, अनागत, वर्तमान या तिन्ही कालांचें किंबहुना अनंत कालाचें निखिलज्ञान समुच्चयानें अखंड स्थित आहे, आणि तें मोठ्या प्रेमानें अपल्या प्रिय जीवांस मिळावें या सद्धेतूनें जर वेदरूपानें त्यांस दिलें आहे, तर त्यांत एकदमच अखेरची पूर्णत्वाची कमालीची—गोष्ट कां सांगितली नाहीं ? तींत पायऱ्या कशाला ? त्याला अगम्य कांहींच नाहीं. मग असें चांचपडत मार्ग शोधित जाणाऱ्याच्या बोलीचें अनुकरण त्यांत कां ? तिसरें—आपल्या अंकित देवताची, किंवा आपली स्वत:ची स्तुति करावयास आपणच सांगावें, हें *अश्लाघ्य नव्हे काय !*

*यापलीकडे किरकोळ मुद्दे असतील पण,* हा वाद प्रकृत स्थळीं मुख्य नसून केवळ प्रासंगिक असल्यामुळें त्यांजकडे आह्मी विशेष लक्ष्य देत नाहीं; शिवाय वरील आक्षेपांचें सयुक्तिक किंवा सप्रमाण निवारण झाल्यास बहुधा आपली इष्ट सिद्धि होईल अशी आशा आहे, म्हणून तेवढ्यांचाच विचार करितों.

*या एकंदर प्रश्नांचा विचार करण्यापूर्वी विशेषत: या प्रश्नमालेंतील जी आद्यशंका* कीं केवळ मानवीमुखगत विशिष्ट स्थानाश्रयानेंच उत्पन्न होणारे असे जे **अकारगकारादि** वर्ण, व त्यांहीपेक्षां त्यांची विशिष्ट अनुक्रमपूर्वक घटना जींत अवश्यक आहे अशी ही वैदिक संहिता, त्या निरवयव व निर्तोंडच्या महद्भूताला बोलतां येईल कशी ? हिचा उलगडा करण्यापूर्वी, अशा त्या ईश्वरानें वेदसंहिता मनुष्यांस देणें हें जरूर किंवा समंजस आहे कीं नाहीं, *हें प्रथम पाहूं. कारण मूळ कोणत्याही क्रियेला प्रयोजनच नसेल तर ती शक्य असूनहि* कोणी करणार नाहीं. म्हणच आहे कीं, '**प्रयोजनमनुद्दिश्य न मंदोऽपि प्रवर्तते**—मङ-

बुद्धीचा माणूस देखील निष्प्रयोजन क्रिया करीत नाहीं, मग सर्वज्ञ ईश्वराबद्दल तर शंकाच नको. तस्मात् सृष्टिकर्त्या ईश्वरानें लोकांस, किंवा तत्प्रीत्यर्थ दुसरे कोणास हे वेद देणें जरूर आहे कीं नाहीं, हें आपण अगोदर छेडूं.

त्यानें ब्रह्मदेवास ( हिरण्यगर्भास ) प्रथम निर्माण करून त्याला वेद दिले अशा बद्दलचा लेखी पुरावा आम्ही वर दिला आहेच. शिवाय ही वेदरूपी कल्याणवाणी[1] आपण सर्वांस सांगावी अशी ईशेच्छाहि वेदांत स्पष्ट आहे. आणि लेखी पुराव्यापुढें इतर पुरावे वास्तविक रद्द समजले पाहिजेत. असें जरी खरें आहे, तरी लेखी पुराव्याचेहि विश्वसनीयतेबद्दल शंका येईल, अशांस युक्तिवादानें सिद्धि दिसली पाहिजे; म्हणून तिचा स्वीकार आपण करून काय बनतें तें पाहूं. सनातन धर्माची गोष्ट तूर्त एकीकडे ठेवून इतर कोणत्याही धर्मग्रंथांकडे किंवा तदनुयायी लोकांचे समजुतीकडे पाहिलें तरीहि ईश्वर हा जगत्कर्ता, जगन्नियंता, न्यायात्मा, परम दयाळु व ज्ञानसिंधु आहे, ही गोष्ट सर्वांस निरपवादरीतीनें मान्य आहे. त्याचप्रमाणें आज उपलब्ध असलेल्या निखिल पृथ्वीवरील वाङ्मयांत वेदाहून पुराणतर असा कोणताहि ग्रंथ नाहीं, ही गोष्टहि सर्ववादिसंमत आहे. अर्थात् मनुष्यांना सर्वांआधीं मिळालेला ग्रंथ वेदसंहिता हाच होय. आणि ' वेद ' हा शब्दच आपली कामगिरी सांगतो आहे. वेद म्हणजे ज्ञान अर्थात् उपयुक्त ज्ञान. आणि ह्याची उपयुक्तता कोणाला? अर्थात् मनुष्याला. आणि ही उपयुक्तता कशाकामीं? अर्थात्, ज्या सृष्टींत किंवा ज्या संसारसिंधूंत तो पडला आहे किंवा त्याला ईश्वरानें घातलें आहे, त्यांतून त्यानें मार्ग कसकसा क्रमावा, या कामींच ती असली पाहिजे. आणि ती तशी आहे ही, असें जो कोणी साग्रवेद वाचून पाहील त्याचे प्रत्ययास येईल. आणि हें असेंच असावें हें परम दयार्द्र परमात्म्याचे न्यायीपणास अनुसरूनच आहे, हें कोणीहि कबूल करील. कारण—आपल्यांत एक म्हण आहे कीं, ज्यानें चोंच दिली त्यानें चाराहि निर्माण केला आहेच; किंवा दुसरी एक कांहींशी असभ्य—पण आमचे दार्ष्टांतिकाला अधिक मिळती अशी म्हण आहे, कीं जो विजार शिवील तो शंकानिवृत्तीचीहि सोय ठेवीलच. या म्हणीप्रमाणें ईश्वरानें जर ह्या आह्मां जीवांस केवळ स्वेच्छेनें या संसारनदींत ढकललें, तर त्या बरोबरच त्यांतून आम्ही तरावें कसें, हेंही आम्हांस त्यानें शिकविलेंच पाहिजे, एरव्हीं तो करुणामय किंवा न्यायमूर्ति या विशेषणांस अपात्र होईल. मग त्याला लोक निर्दय, कसाई असें म्हणतील. पण हीं विशेषणें आजपर्यंत त्याला कोणी देऊं धजला नाहीं. कोणतेंहि न्यायी सरकार झालें तर प्रथम कायदा करून तो सर्वांस जाहीर करितें. आणि मग तदनुसार वर्तन न केल्यास लोकांस जबाबदार धरतें. असें न करितां तें जर वागेल तर त्यास जुलमी, अन्यायी, झोटिंग अशीं लोक नांवें ठेवितात, तीच गत ईश्वराची होईल. हल्लीं समुद्राचे पाण्याचे पोटांत किंवा खोलखोल कोळशांचे खाणींत काम करण्यासाठीं मजुरांस उतरवितात, पण ते आंत बिनधोक रहावे याविषयीं किती तरतुदी अगाऊ केलेल्या असतात, आणि करणें हेंच उचित आहे. कोणतीहि आई आपल्या मुलाला दूर गांवीं प्रवासास पाठविणें तर त्या बरोबर अगोदर पुरापुर पाथेय किंवा फराळाचें देते. मग, संसाराटवींतील दीर्घ व बिकट प्र-

---

१ " यथेमांवाचं कल्याणिमावदानिजनेभ्यः "

वासास जर आपलीं इतकीं ल्हान मोठीं मुलें पाठविण्याचीं, तर त्या जगन्मातेनें त्यांजबरोबर वेदरूपी ज्ञानमय पाथेय दिलें असावें यांत नवल तें काय ?

वरील विवेचनावरून जगत्पित्यानें मनुष्यांस त्यांचे रक्षणाकरितां उत्पत्तिसमकालींच वेदरूपी सामग्री द्यावी हें समंजस आहे एवढा मुद्दा सहृदय वाचकांच्या गळीं उतरला, असें आम्ही धरून चालतों. बाकी शास्त्रावर ज्याचा विश्वास असेल त्याला असें स्पष्ट आढळून येईल कीं, सर्वदर्शी परमेश्वराच्या कृतींत प्रत्येक गोष्टीचा बंदोबस्त इतका अटोकाट व आगाऊ केलेला असतो कीं, तें मनुष्याला साधणें मुष्किल आहे. सांप्रत वैवस्वत मन्वंतर आहे व त्याचीं अजून किति किति तरी वर्षें लोटावयाचीं आहेत, तेव्हां या पुढील म्हणजे आठवा मनु सुरू होणार. पण त्या मन्वंतरांतील व्यवस्थेचे मुख्य मुख्य कामगारांच्या नेमणुका एव्हापासून ठरून राहिल्या आहेत. विरोचनपुत्र बलि हा पुढील मन्वंतरांत इंद्र होणार, अश्वत्थामा हा व्यास होणार, दीप्तिमान् गालवादिक सप्तर्षि होणार, व सावर्णि हा मनु होणार, अशा प्रकारचा ठरावबंद केव्हांच होऊन चुकला आहे. यापैकीं मनूची कामगिरि लोकांना कायदे घालून देण्याची असते. म्हणूनच त्याची नेमणूक मूळारंभींच, किंबहुना, आगाऊच असते; आणि तो मग आपल्या मन्वंतराकारितां ‘ मानवधर्मशास्त्र ’ किंवा ज्याला ‘ मनुस्मृति ’ असें म्हणतात तो ग्रंथ रचितो. चालू मनूनेंहि रचलेला ‘ मनुस्मृति ’ हा ग्रंथ याची साक्ष देतच आहे. आणि ‘ स्मृति ’ म्हटली कीं ‘ **श्रुतिमूलाः स्मृतयः** ’ हा शेरा कपाळीं ठेविलेलाच आहे. अर्थात् आधीं श्रुति असेल तेव्हां पुढें स्मृति. तेव्हां स्मृति जर उपलब्ध आहे तर तत्पूर्वीं श्रुतिहि असलीच पाहिजे. ‘ स्मृति ’ शब्दाचा अर्थही या गोष्टीची साक्ष देतो. कारण, ऐकलेल्या ‘ श्रुति ’ पैकीं जें कांहीं, **स्मरणांत** राहिलें त्यालाच **स्मृति** असें म्हणतात. अर्थात् ‘ मनुस्मृति ’ आहे व ती मन्वंतरारंभींच घडली, हें जर कबूल आहे तर तन्मूलभूत ‘ श्रुति, ही तिच्याहि पूर्वीं असलीच पाहिजे; व ‘ मनु ’ हाच ‘ मानव ’ जातीचा आदिपुरुष आहे, ही गोष्ट कबूल न करून चालावयाचेंच नाहीं. कारण जलप्रलय, मत्स्य व मनु, ही दंतकथा सर्वेहि भिन्न भिन्न धर्मपुस्तकांत कोण्यानां कोण्या रूपानें आहेच. शिवाय ‘ मानव ’ हा शब्दच ‘ मनु ’ शब्दापासून साधला आहे, ही या कामीं मोठीच साक्ष आहे. अर्थात् मनु हाच जर मानव जातीचा आद्य पुरूष आहे, व तो जर आपले ग्रंथास स्मृति म्हणतो व स्मृति हा शब्द जर श्रुतीची सापेक्षता व पूर्वगामिता पटवितो, तर: कल्पारंभींच वेद किंवा श्रुतिमंत्र घडण्याला समर्थ अशी मानवजात उत्पन्न होण्यापूर्वींच श्रुति होती, हें सिद्ध झालें आणि मानवांपूर्वींच जर श्रुति सिद्ध होती तर तिचा कर्ता ईश्वरावांचून अन्य कोणी असणेंच शक्य नाहीं, हें उघड आहे.

असो, आतां निरवयव नितोंड्या परमेश्वरानें मनुष्यांना वेद द्यावा असें मानणें हें सयुक्तिक ठरलें असलें, तरी त्याला वर्णानुपूर्वीघटित वेदसंहिता सांगतां येतील कीं नाहीं हें आपण पाहूं. त्याला जर तोंड नाहीं तर तो बोलेल कसा व त्याला हात नाहीं तर तो लिहील कुठून, हें कोडें पुष्कळांपुढें उभें रहातें. परंतु हा त्यांचा संशय पाहून हंसूं येतें. कारण हा त्यांचा संशय म्हणजे, अन्नपूर्णेला पोटभर अन्न कसें मिळत असेल किंवा सूर्याचे घरीं उजेडाची सोय कशी असेल, असल्या प्रकारचा विलक्षणच म्हटला पाहिजे. जर श्रुतिशास्त्रांत

ईश्वरासंबंधें:—श्रोत्रस्य श्रोत्रमुतचक्षुषःचक्षुः। पश्यत्यचक्षुः सशृणोत्यकर्णः। यस्य-भासा सर्वमिदंभाति। यन्नवाचाभ्युदितं येनच वागभ्युद्यते। म्हणजे; जो कानाचाहि कान व डोळ्याचाहि डोळा आहे; जो डोळ्यावांचूनच पहातो व कानावांचून ऐकितो; ज्याचे तेजानें वस्तु मात्र भासमान होते; ज्याचे वाचेनें उद्घाटन करवत नाहीं, परंतु ज्याचे योगानें वाणी बोलूं शकते,' असे अनेक पुरावे आहेत; व एकवेळ शास्त्रवचनें एकीकडे ठेविलीं तथापि, चतुर्दश भुवनांतील प्राण्यांच्या अनंतावधी जिव्हा किंवा वाचा ज्याच्या सत्तेनें हालतात, असें आपण पत्करितों, त्याच गृहस्थाला बोलतां कसें येईल, हें गूढ वाटणें म्हणजे निव्वळ अज्ञान नव्हे तर काय? बायकांची एक म्हण आहे कीं, 'गांवभर सुना आणि पाणी मागूं कोणा,' तशांतलीच अडचण त्या 'विश्वतोमुखाला' पडली म्हणावयाची.

Occult किंवा गूढविद्येचा ज्यांना थोडा बहुत अनुभव त्यांच्या भुक्तबलानें आला असेल, अशांना असल्या प्रकारची शंका कधीं येणारच नाहीं. कारण, त्यांना ही गोष्ट सहज सिद्ध आहे, असें उघड दिसेलच. परंतु, ज्यांची दृष्टि जडदेहापलीकडे गेली नाहीं म्हणजे जे केवळ बहिर्दृष्टि लोक आहेत, अशानांच ही शंका बाधणार आहे. तर अशांनीं हा विचार करावा कीं, आपण निद्रिस्त असतांना आपले तोंडांतली जीभ हालत नसते, गप्प असते. असें असतांना आपण व्याख्यानेचीं व्याख्यानें स्वप्नांत देतों; इतकेंच नव्हे तर यावत् इंद्रियांचे व्यवहार जागृतीप्रमाणें करितों व आपल्याशीं इतर इष्टमित्र जे अनेक कोसांचे अंतरावर आहेत, किंवा प्रसंगीं परलोकाला गेले आहेत, असलेहि लोक जागृतीप्रमाणेंच सर्वेंद्रियाचे व्यवहार करितात. हें आपण नित्य अनुभवितों; तर, त्याचें उत्तर काय? जागृतींतील सर्व इंद्रियें स्तिमित असतां, त्यांचे हे व्यापार करितो कोण? कोणी म्हणेल सूक्ष्म देह. ठीक. परंतु हा सूक्ष्म देह तुम्ही पाहिला आहे काय व तो तुमचे ताब्यांत आहे काय? व त्याचे व्यापार तुमच्या संकल्पानुरूपच होतात काय? जर नाहीं, तर तुमच्या जडजिव्हेपलीकडे कांहीं वाणीचें द्वार अनुभवास येतें, येवढें मानणें प्राप्त आहे. तेव्हां असल्या सूक्ष्म जिव्हा ज्याला चालवितां येतात, त्याला स्वतः शब्दाचें किंवा वाणीचें कांहीं साधन नसेल असें मानणें समंजस होईल काय? याही पलीकडे पुष्कळांनीं ग्रंथांत 'आकाशवाणी,' अशरीरिणीवाणीबद्दल वांचलें असेल. ही आकाशवाणी म्हणजे कांहीं तरी गप्प नव्हे, असें प्रस्तुतचा लेखक स्वानुभवावरून व त्याचे परिचयांतील कांहीं गृहस्थांचे अनुभवावरूनहि खात्रीनें सांगूं शकतो. त्याला अनृत बोलण्याचें कांहीं कारण नाहीं. शिवाय या कामीं ज्यांना संदेह असेल त्यांनीं ड्रेसर नामक विद्वानानें लिहिलेलें Power of silence. हें पुस्तक, मॅडमब्लव्हट्स्कीनें लिहिलेलें Voice of silence, इलिझाबेथटोन या बाईनें लिहिलेले ग्रंथ व त्या ग्रंथांत तिनें दिलेले स्वानुभव वाचावे म्हणजे खात्री[१] होईल. ही अशरीरिणी वाणी कोणाची? अर्थात् परमेश्वराची किंवा हृदयस्थ जनार्दनाची आहे, असें म्हणणेंच भाग आहे. आणि असलीं साधनें ज्याचे ताब्यांत आहेत, त्याला वेद हा मनुष्यांना देणें[२] अशक्य कां जावें? आणि अशाच

१ हा लिंगदेह देहापासून वेगळा करणारे योगी आहेत हें खरें; पण आम्ही वर निर्दिष्ट केलेले त्याचे चमत्कार योगहीनांचे ठिकाणींहि होत असतात, ते त्यांचे हुकूमानें होत नाहींत.

२ परक्यांचे, वेदबाह्यांचे, ग्रंथाचे हवाले आम्हीं सर्वत्र दिले आहेत, याला कारण कालमहिमा. आमचे ग्रंथ प्रमाण वाटत नाहींत असा काळ आला आहे, म्हणून हा द्राविडी प्राणायाम प्राप्त झाला.

वाणीचे आश्रयानें ईश्वरानें मनुष्यांस—ऋषींस—वेद दिला आहे, या गोष्टीची साक्ष ग्रंथांत शोधावयास नको. वेदांचा जो सुप्रसिद्ध पर्याय श्रुति—हा शब्द आहे, हाच या गोष्टीची साक्ष पुरवितो आहे. कारण, ईश्वरानें मनुष्याला वेद दिले ते म्हणजे एखाद्या कागदावर, ताडपत्रावर किंवा ताम्रपटावर लिहून दिले, असें कोणी म्हटलें नाहीं. तर त्रिकालज्ञ ऋषींचे बुद्धींत स्फूर्तिरूपानें ते प्रकट झाले किंवा ते अशरीरिणी वाणीनें ऐकविले आणि म्हणून त्यांनीं त्यांना ‘ श्रुति ’ म्हणजे ‘ श्रवण केलेले ’ असें अन्वर्थक नाम दिलें.

एवंच देवाला माणसाचें तोंड नसलें तरी त्याला मानवी वाणीनें बोलतां येतें, हें अनुभव व शास्त्रप्रमाणानेंहि सिद्ध होतें. शिवाय अनेक शास्त्रांचा व ज्ञात्यांचा आनुभविक सिद्धांत असा आहे कीं, शब्दमात्राची उत्पत्ति व लय हीं अनंतांतच आहेत. त्या विरहित त्यास आधेष्ठान नाहीं. ‘ कार्य हें कारणांत लीन व्हावयाचें, ’ हा सिद्धांतच आहे आणि त्याप्रमाणें आपण मनुष्यें जे शब्द उच्चारितों, ते शब्द आपण उच्चारतांच नाहींसे होतात किंवा लय पावतात. हे नाहींसे होतात कोठें ? आपले तोंडांतून निघाले म्हणून तोंड हेंच त्यांचें कारण म्हणावें तर ते परत तोंडांतच नाहींसे झाले पाहिजेत; परंतु तसा अनुभव नाहीं. तर ते शब्द त्यांचें मूळ कारण जें आकाश त्यांत लीन होतात. आणि या आकाशाचा अखेर लय, त्याचें कारण जो आत्मा त्यांत होतो. कारण “ **तस्माद्वा एतस्मादात्मन आकाशःसंभूतः** ” अशी स्पष्ट श्रुति आहे व ती आजकालचे पुष्कळ तत्त्ववेत्यांनीं पतकरलीच आहे. दिक्, काल, हे आत्म्यापलीकडे कांहीं नाहींत, असें अनेकांस कबूल करावें लागलें आहे. यावरून पहातां जरी आपण उच्चारलेले शब्द आपले मुखांतून निघाल्यामुळें आपण त्याचें कारण आहों, असें आपणांस वाटतें; तरी जे कोणी प्रांजलपणें विचार करतील त्यांस कबूल करावें लागेल कीं, आपण केवळ त्या शब्दाचें द्वार आहों; वाणीचे मालक नाहीं. तर साधु तुकारामानें म्हटलें आहे कीं, “ **सखा भगवंत वाचा त्याची** ” हेंच वाक्य प्रमाण आहे. अर्थात् ईश्वराला मनुष्यवाणीनें बोलतां येतें. अवतारी श्रीज्ञानेश्वरांनीं रेड्याचे मुखानें वेद बोलविला ही जर नुकते नुकतेची साक्ष जगजाहीर आहे, तर ईश्वराला वेद बोलणेंच तर मनुष्यवाणीचीच पर्वा करण्याचें कारण नाहीं, हें पतकरणें भाग आहे.

अर्थात्, ईश्वराचे मनांत लोकांस वेद द्यावेसें आल्यास त्यास ते बोलतां येणें अशक्य नाहीं व तेहि विशिष्ट वर्णव्यवस्थेनें युक्त असेंहि बोलतां येणें शक्य आहे, कारण शब्दाची योजना ही मनुष्यांत देखील अंतःस्फूर्तीनेंच होते. आजपर्यंत शेंकडों हजारों माणसांचे व साधुसंताचे अनुभव असे आहेत कीं ही अशरीरिणी वाणी—संघटित ऐकूं येऊं शकते. इलिझाबेथ टौन या अमेरिकन बाईनें लिहिलें आहे कीं, मला एक मासिक पुस्तक काढावयाचें असतां, मी असा निश्चय केला होता कीं, या पुस्तकाला कोणतें नांव द्यावें तें आपणांस या अमूर्त किंवा ईशवाणीनेंच समजलें पाहिजे. त्याशिवाय नांव ठेवावयाचें नाहीं. मग या निष्ठेनें मी षण्मास यत्न करीत राहिलें; परंतु यश आलें नाहीं. तथापि, मी निश्चय न सोडतां तसेंच ध्यान राखलें असतां माझी जी अखेरची तारीख ठरली होती त्या तारखेस पटदिशीं Nautelus हें नांव द्यावें अशी वाणी कानीं पडली; व हेंच नांव देऊन या अमेरिकन बाईनें आपलें हें

मासिक हल्लीं चालविलें आहे. या खेरीज Occult Literature वाचावें म्हणजे शेंकडों गोष्टी मिळतील.

एतावता, मनुष्यजातीला तिचे रक्षणार्थ वेद देणें हें उचित असून, तें देणें ईश्वरास इष्ट वाटल्यास, तें करतां येणें शक्य आहे, हें सिद्ध झालें. आतां उरलेल्या आक्षेपांचा आपण विचार करूं.

मागें दिल्याप्रमाणें दुसरा आक्षेप म्हणजे वेदांतील मंत्रांवर भिन्न भिन्न ऋषींची स्पष्ट नांवें असतां ते मंत्र ईश्वरानें दिले, हें कसें संभवतें हा. याचें उत्तर असें आहे कीं, यास्कादिकांनीं 'ऋषि' या शब्दाचें जें निर्वचन केलें आहे, त्याप्रमाणें ऋषि हे मंत्राचे कर्ते–घडविते–नसून 'द्रष्टे' किंवा 'साक्षात्कारी' किंवा 'प्रकाशक' होत. म्हणजे ते ते मंत्र त्या त्या ऋषींस प्रतीयमान झाले. आणि हे मंत्र मूळ जरी ईश्वरानें दिले असले तरी जनदृष्टीला ते ते ऋषीच त्या त्या मंत्राचा लौकिकांत प्रचार करण्यास कारण झाल्यानें त्याचेच नांवानें ते मंत्र प्रसिद्ध झाले. आणि असे प्रकार हमेष आजकाल देखील जगतांत चालतात. कोणी साहसी शोधक एखादा अज्ञात देश शोधून काढितो, आणि मग त्यास आपलेंच नांव देतो. अशीं नांवें आजच्या नकाशांत किती तरी मिळतील. वास्तविक पाहतां तो देश किंवा तें स्थान त्यानें निर्माण केलें नाहीं, तें पूर्वीं विद्यमानच होतें. पण तें जनदृष्टीला त्यानें आणिलें एवढ्या मानाबद्दल त्या स्थानास त्याचें नांव दिलें जातें, व दुनियाही या कृतीस अन्याय असें समजत नाहीं. इंग्रजी ज्योतिष शास्त्रावरील ग्रंथांत सूर्यादि ग्रहांचे गतींबद्दल कांहीं नियम दिले आहेत व या नियमांस Kepler's laws of motion–म्हणजे केपलरकृत गतीचे नियम असें म्हणतात. म्हणून एवढ्यावरून केपलरनें ते नियम निर्माण केले असें म्हणणें असमंजस होईल. कारण सृष्टींतील पदार्थांनीं अमुक कायद्यानें चालावें अशी हद्द केपलरला किंवा त्याचे काकालाहि करितां येणें शक्य नाहीं. तिचा कर्ता सर्वशक्तिमान् जगन्नियंता परमात्माच होय. त्यानें जेव्हां सृष्ट पदार्थ केले तेव्हांच त्यांचे गतीचे नियमहि केले व त्या नियमांप्रमाणेंच ग्रहादिकांच्या गति चालू आहेत. 'मग केपलरकृत गतीचे नियम' या शब्दाचा अर्थ काय म्हणून कोणी विचारल्यास त्याचें उत्तर हेंच कीं, केपलर या शोधक पुरुषानें अवलोकन करून जगांत प्रसिद्ध केलेले जे गतीचे नियम ते. याच न्यायानें या मंत्रांस ऋषींचीं नांवें दिलीं गेलीं आहेत.

याच गोष्टीचा आणखी पुरावा कोणास पाहिजे असल्यास सुप्रसिद्ध अशा रामरक्षा स्तोत्रांत आहेः—या स्तोत्रांत, "अस्य श्रीरामरक्षास्तोत्रमंत्रस्य, बुधकौशिक ऋषिः" असें आरंभीं लिहीलें आहे. अर्थात् "नांव, तोच कर्ता" हा वाद सांगण्याचे हिशोबाप्रमाणें रामरक्षेचा कर्ता 'बुधकौशिक' ऋषिच ठरतो. परंतु हेंच स्तोत्र पुढपर्यंत वाचलें, म्हणजे खरोखर ही कृती कोणाची आहे आणि बुधकौशिकाची मालकी त्यावर कितपत आहे, हें स्पष्ट होतें. त्यांतच पुढें लिहीलें आहे कीं:—

**आदिष्टवान् यथा स्वप्ने रामरक्षामिमां हरः।**
**तथा लिखितवान् प्रातः प्रबुद्धो बुधकौशिकः ॥**

म्हणजे—हर जो शंकर त्यानें स्वप्नांत येऊन हें स्तोत्र असें उपदेशिलें तसेंच्या तसेंच

बुधकौशिक ऋषीनें प्रातःकाळीं जागा होऊन लिहून ठेविलें:—असा रामरक्षेंतील पुरावा आहे. हुबेहूब याच, किंबहुना याहीपेक्षां अधीक, स्पष्ट प्रकारानें आमच्या एका दृढ परिचित गृहस्थाला एक बारीकसें १।७ श्लोकांचें स्तोत्र रात्रौ झोंपेंतून जागें करून त्याचे उपास्य देवतेनें त्याचे कडून लिहून घेवविलेलें, आम्हांस ठाऊक आहे. तेव्हां आत्मप्रतीतीपलीकडे कोणताही पुरावा फिका असल्यानें, आम्हांस तरी या गोष्टीविषयीं संदेह उरला नाहीं. सारांश, मंत्रावर ऋषींचीं नांवें असल्यानेंच ते या मंत्राचे निर्माणकर्ते ठरत नाहींत.

तिसरा मुद्दा अश्लीलत्वाचा:—याचा परिहार असा आहे कीं आजकालच्या अश्लीलत्वाच्या कल्पना आणि पुराणकालच्या अश्लीलत्वाच्या कल्पना भिन्न होत्या. तें कशाला, आज देखील विशिष्ट लोकांस जे विशिष्ट आचार संमत वाटतात किंवा ज्यांत त्यांचे दृष्टीला कांहींच गैर वाटत नाहीं किंवा त्यांबद्दल त्यांचे मनांत विपरीत भावना येत नाहीं, तेच आचार अन्यधर्मीयांस किंवा अन्यजातीयांस गैर वाटतात. उघड्या पावलानें चौघांत जाणें हें इंग्रजांस " Barbarous, " अशिष्ट वाटतें. आपणास तसें वाटत नाहीं. बरें, परस्त्रीशीं नुसतें बोलणें आपणांस अमर्याद वाटतें. पाश्चात्यांत तिजबरोबर नाचणें सभ्य वाटतें. तेव्हां अश्लीलत्वाचा किंवा सभ्यासभ्यतेचा निर्णय पुष्कळ अंशीं भिन्न कल्पनांवर अवलंबून आहे. देशस्थांत प्रत्यक्ष मामेबहीण आपली पत्नी होऊं शकते, परंतु, जिला आजपर्यंत बहीण म्हणून लेखीली तिलाच आपली उपभोग्य वस्तु म्हणून स्वीकारणें हें कोकणस्थांस गोड लागणार नाहीं. बरें, अन्य जातींकडे पाहिलें म्हणजे देशस्थाचे कृतीस नांव ठेवण्याचें कारण रहात नाहीं. कारण, मुसलमानांत भावंडाभावंडांत लग्नें होऊं शकतात; फक्त दूध बदललें म्हणजे संपलें. म्हणजे हा प्रश्न बराचसा कल्पनेवर आहे. आजकाल सुधारलेलें इंग्रजी राज्य आहे व सुधारलेल्या रीतीभातींचा सर्वत्र नगारा वाजून राहिला आहे. तथापि, मद्रासेकडे एका शहरीं गामस्थ लोक प्रातर्विधीला गेले असतां निःशंकपणें अनावृत शरीरानें चालत जाऊन एकाच जलाशयांत क्षालन करितात. हा प्रकार एखादे महाराष्ट्रीयानें पाहिला असतां त्याला उमासाच येतो. कालपर्यंत धुरीण अशा जपानच्या स्त्रिया परकी पुरुषासमक्ष देखील वस्त्र टाकून निःशंक स्नान करीत किंवा पाण्यांत पोहत, असें एका अमेरिकनानें लिहिलेलें वाचल्याचें आम्हांस स्मरतें. गुजराथेंतील रामनारायणपंथी नागर ब्राम्हणांत परपुरुषाचें मुख दृष्टीस पडल्यास त्या दिवशीं उपोषण करणाऱ्या स्त्रिया आहेत. त्याचेच उलट परपुरुषाशीं हातांत हात घालून सहल करण्यास जाण्याचा प्रचार सुधारलेल्या राष्ट्रांत आढळतो. बरें, हे सर्व प्रकार त्यांच्या त्यांच्या दृष्टीनें उचितच असतात, निदान दिसतात. याचप्रमाणें पुराण कालच्या शिष्टाशिष्टतेच्या कल्पनांत आणि आजच्या कल्पनांत अंतर असलें म्हणून नवल नाहीं. " When Adam dwelved and Eve span who was then the gentleman " हें इंग्रजी वाक्य सुप्रसिद्धच आहे. अशा वेळीं सभ्यतेची कल्पना कसली होती. मिल्टननें आपल्या Paradise lost मध्यें Adam & Eve चे जातरूपत्वाचें वर्णन मोठें मनोरंजक रीतीनें केलें आहे. त्याप्रमाणें पहातां आजच्या सभ्यतेच्या कल्पना आणि पुरातनकालच्या कल्पना यांत अंतर असल्यास तें क्षम्य आहे असें पतकरलेंच पाहिजे.

शिवाय हा प्रकार कांहींसा द्रष्ट्याच्या योग्यतेवर व लायकीवर अवलंबून आहे. सुप्रसिद्ध

अवतार श्रीज्ञानेश्वर यांची यथार्थनाम्नी भगिनी मुक्ताबाई ही निर्वस्त्र न्हातांना पाहून चांगदेव मुरडला असतां तिनें त्याला जो टोला दिला ती गोष्ट सर्वश्रुतच आहे. आतां या ठिकाणीं मुक्ताबाई ही काय जंगली होती म्हणावी कीं निष्कलंकवृत्तीची होती म्हणावी? आमच्यानें तरी तिला पहिलें विशेषण देववत नाहीं.

दुसरी गोष्टः-आर्यधर्म नांवाचें जें मासिक पुस्तक श्यामराव आणि मंडळी, ठाकूरद्वार, मुंबई, यांजकडून प्रसिद्ध होत असे, त्यांत कित्येक वेदमंत्राचा अर्थ महीधरासारख्या अपात्र किंवा अश्लील टीकाकारांनीं आपल्या मूर्खत्वानें कसा अपभ्रंश केला आहे व वास्तविक त्या मंत्रांचा अर्थ कसा शिष्टसंमत होऊं शकतो, हें सोदाहरण स्पष्ट दाखविलें आहे. तें जिज्ञासूंनीं पहावें. या शिवाय श्रीमच्छंकराचार्यांचे वेळीं बरोबरीनें गाजलेला वेदाभिमानी कुमारिल भट्ट यानें आजकालच्यांना अश्लील वाटणाऱ्या ज्या कांहीं वेदांत आख्यायिका किंवा गोष्टी आहेत उदाहरणार्थः---प्रजापतीचें स्वकन्यागमन, इंद्राचें अहल्याजारत्व इत्यादि, यांचा खरा सांकेतिक अर्थ करून दाखवून हा अश्लीलत्वाचा दोष साफ साफ उडविला आहे. मासल्याकरितां एकच उतारा देतों.

कुमारिल म्हणतोः---प्रजापतिस्तावत् प्रजापालनाधिकारादादित्य एवोच्यते। सचारुणोदयवेलायामुषः समुद्यन्नभ्येति। सा तदागमनादेवोपजायत इति दुहितृत्वेन व्यपदिश्यते ॥ तस्यांचारुणकिरणाख्य---बीजनिक्षेपात् स्त्रीपुरुषसंयोगवदुपचारः ॥ १ ॥ एवं समस्ततेजःपरमेश्वरत्वनिमित्तेन्द्रपदवाच्यं। सवितैव अहनिलीयमानतया रात्रेरहल्यशब्दवाच्यायाः। क्षयात्मकजरणहेतुत्वाज्जीर्यत्यस्मादनेनेवोदितेनवेत्यहल्याजार इत्युच्यते न परस्त्रीव्यभिचारात् ॥ २ ॥

भावार्थः---प्रजेचें पालन करणारा म्हणून सूर्यालाच येथें प्रजापति म्हटलें आहे. व त्याचे पासून उषेचा ( उषःकालाचा ) संभव असल्यामुळें त्या उषेला त्याची कन्या म्हटलें आहे. व पुढें त्या उषेचेच पोटांतून अरुणोदयरूपानें सूर्याचेंच तेज लोकांपुढें प्रकट होतें. हा प्रकार ध्यानीं घेऊन, हें जनदृष्टीला कांहीसें गैर परंतु, मूळांत सर्वतोपरी शुद्ध व सत्यस्वरूप, असें रूपक केलेलें आहे. अर्थात् सत्यार्थाकडे पाहील त्यास यांत मूळावर अश्लीलत्वाला थारा दिसणार नाहीं. ( २ ) इन्द्र या पदाचाहि अर्थ समस्त तेजोनिधित्वामुळें सूर्य असाच होतो. आणि अहल्या या शब्दाचा अर्थ 'रात्रि' असा होतो. कारण अहः म्हणजे दिवस हा तिच्यांत दडी मारतो---लीन होतो---किंवा ती दिवसाचे ठिकाणीं लीन होते, किंवा गडप होते म्हणून; आणि अशी जी रात्र तिचें जरण करणारा म्हणजे तिला क्षीण करणारा सूर्यच असतो म्हणून त्याला अहल्येचा जार असें म्हटलें आहे. कुमारिल म्हणतोः---वास्तविक सूर्यानें म्हणजे कोणा परस्त्रीचा संभोग केला आहे, म्हणून त्याला जार म्हटलें अशांतला प्रकार नव्हे.

या पुढला आक्षेपः-वेदांत अत्यंत मूढांना साजेशा शंकांपासून तो परम प्रबुद्धाचेहि बुद्धींत चढण्यास अवघड असे विषय कां यावे? यास उत्तर फारच सोपें आहे. शाळा घातली कीं तींत अत्यंत सुलभ अशा शब्दांपासून तों अत्यंत दुर्बोध अशा ग्रंथापर्यंत विद्या-

ध्यांच्या अधिकारपरत्वें संग्रह अवश्य पाहिजे. त्याचप्रमाणें अधिकारीभेदावर दृष्टी देऊन लहान मोठे विषय वेदांत घालणें वेडेपणाचें म्हणण्याचें कारण आम्हांस तरी दिसत नाहीं.

या नंतरचा आक्षेप म्हणजे, इंद्र, वरुण, अर्यमा, उषा, इत्यादिक प्राकृतिक देवतांची स्तोत्रें, वर्णनें कशाकरितां व स्वतःची स्तुति कशा करितां ? याचें उत्तर असें आहे कीं, एक तर इन्द्र, मित्र, वरुण वगैरे भिन्न नांवानें भासणारा जो तो एकच आहे. कारण, " **इन्द्रं मित्रं वरुणमग्निमाहुरथो दिव्यः ससुपर्णो गरुत्मान् । एकं सद्विप्राबहुधा वदन्त्यग्निं यमं मातरिश्वानमाहुः** । ( ऋग्वेद ), असें म्हटलें आहे.

याखेरीज दुसरी अशी गोष्ट आहे कीं, हे इन्द्रादि भिन्न व्यक्ती मानिले तरीही आजकाल व्यवहारात देखील केवळ एका वरिष्ठ अधिकाऱ्याची उपासना करून भागत नाहीं. कॉन्झरव्हेटर ऑफ फॉरेस्टची प्यार मोहबत संपादावयाची असल्यास बीटगार्डापासून मर्जी धरावी लागते. हाच प्रकार देवादिकांतहि आहे. सुप्रसिद्ध रसिक व मार्मिक कवि विठोबा अण्णा दप्तरदार हे आपले एका पद्यांत म्हणतात. " **विनंती करुनि चित्त वळवा । प्रभूला कैव माझी कळवा । लंकानाथ बिभीषण जी । द्या प्रभुपाशीं दाद माझी । लक्ष्मणजी एवढी करा सवडी । द्या मज रामचरणीं आवडी । अहो तुम्हीं थोर थोर संत । घ्या मज आत्ममंडळांत । विठ्ठलपंत उभा दारीं । भिकारी दीन हांका मारी ।**

अर्थात्, प्रभू रामचंद्राची भेट पाहिजे तर बिभीषण, मारुतीपासून वळण बांधावें लागतें. तुळशीदासाला भुतानें रामभेट करून दिल्याची गोष्ट सुप्रसिद्धच आहे. याखेरीज या मुद्यांत पोटबाब अशी आहे कीं आपले हस्तकाचा बोज राखविण्याची काळजी घेणें हें जो सुज्ञ वरिष्ठ अधिकारी असतो तो आपलें स्वतःचें कर्तव्य समजतो. व अशा अधिकाऱ्यांशीं कसें वागावें, काय अदबीनें चालावें, या कामीं आपले सहीनें वर्तनाचे मायने देखील घालून देतो. आजकाल देखील मामलेदारापासून तो समस्त चक्रवर्ती पर्यंत कोणास अर्जी कोणत्या शब्दांनीं करावी हें सरकारी रीतीनें ठरवून जाहीर केलेलें असतें व त्याला सोडून चालेल तर तो दण्डच समजला जातो. उदाहरणार्थ—राष्ट्रीयगीत म्हणतांना जर कोणी उभा न राहील तर त्यास शासन होईल. आणि हें असें करणें जरूर नाहीं असें कोण म्हणेल ? हाच न्याय ईश्वरी दरबारांतहि आहे. राजनिष्ठेची भाषा ज्यांस स्वतः होऊन स्फुरत नाहीं, आणि नाहीं असेच फार, अशांना सायास करूनहि शिकविणें हें एक कर्तव्यच नव्हे काय ?

वरील आक्षेपनिरसनाखेरीज आणखी एक महत्वाची गोष्ट आक्षेपकांनीं ध्यानांत ठेवावी म्हणजे त्यांचे किरकोळ आणखी आक्षेप असतील ते स्तब्ध होतील. ती गोष्ट म्हणजे ही कीं, आजकालचे जे वेद म्हणून उपलब्ध आहेत ते संपूर्ण ग्रंथ नाहींत. कारण, " **अनंता वै वेदाः** " असें म्हटलें आहे. व आज उपलब्ध असणारे वेद तर सहज बगलेंत मावतील इतकेच आहेत; अर्थात् हे अपूर्ण आहेत. ' चरणव्यूह दि ग्रंथांकडे पाहिलें असतां त्यांत प्रत्येक वेदांच्या किती तरी शाखा व त्याच्या संहिता दिल्या आहेत. नुसत्या सामवेदाच्याच सहस्र शाखा दिल्या आहेत. या आज उपलब्ध कोठें आहेत. अर्थात्, आज उपलब्ध असलेल्या वेदसंहितांचा पूर्ण अर्थ करण्याचीं साधनें लंगडीं पडलीं आहेत. कारण, विद्वानांची अशी एक आनुभविक म्हण आहे कीं, " **ग्रंथस्य ग्रंथांतरे टीका** " म्हणजे एका

ग्रंथाचा अर्थ दुसरे ग्रंथांत असतो. त्याप्रमाणें सर्व वेद आज उपलब्ध असते तर वेदार्थाचा उलगडा अधिक प्रकारें होऊन आज जीं कांहीं भ्रामक किंवा दुर्बोध स्थलें भासत आहेत तीं समंजसशीं वाटलीं असतीं. कारण, 'मेडम सॅव्हिनी' ही विदुषी असें म्हणते कीं, 'To know all, is to pardon all.' म्हणजे जी गोष्ट आपणांस अर्धवट किंवा एकांगी समजली असतां सदोषशी वाटते व ती करणारास आपण अपराधी ह्मणावयास तयार होतों, तीच गोष्ट सर्वांगीं पूर्ण समजली असतां पुष्कळदां आपलें गैरसमजाचें कारण दूर होऊन तिचा कर्ता निर्दोष आहे अशी खात्री होते; व आपला अविचारहि मागून ध्यानांत येतो. याचीं उदाहरणें प्रत्येकाचे अनुभवास पटतील. जुन्या मराठी क्रमिक पुस्तकांत 'गांवेढकरी आणि साप' ह्मणून दिलेली गोष्ट सर्वांस आठवतच असेल. तींत त्या इमानी कुत्र्यानें त्या गांवढेकऱ्याचे मुलाचें सापापासून रक्षण केलें असतांहि सर्व गोष्टीची पुरापुर चौकशी न करितां, केवळ त्याचें तोंड रक्ताळलेलें पाहून त्या शेतकऱ्यानें आपले इमानी नोकराचा प्राण घेतला. परंतु मग स्वस्थपणें त्यानें जेव्हां सर्व प्रकार पूर्णपणें दृष्टीखालीं घातला तेव्हां त्याला आपली चूक आढळून तो तोंडांत मारून घेऊं लागला. हा न्यायहि वेदाचे आजचे स्थितींत त्यावर आक्षेप घेणारांनीं ध्यानांत घेण्याजोगा आहे.

असो; येणेंप्रमाणें वेदाचे ईश्वरप्रणीतत्त्वावर येणारे प्रधान आक्षेपाचें यथामति निराकरण केलें आहे. मात्र हें निराकरण सामान्य वाचकांसही समजावें म्हणून चालचलाऊ लौकिकी युक्तिवादानें केलें आहे. या पलीकडे ज्या कोणास शास्त्रीय प्रमाणानें व युक्तीनें वेदांचें प्रामाण्य व अपौरुषेयत्व ठरविणें इष्ट असेल त्यांनीं या कामीं महर्षि जैमिनीकृत पूर्वमीमांसा वाचावी व तींतील, "बबरःप्रावहणिरकामयत" इत्यादि श्रुति घेऊन त्यांचे साह्यानें अनित्य संयोगाचा आक्षेप वेदावर आणून वेद पौरुषेय ठरविण्याचा पूर्व पक्षकाराचा यत्न, व "परंतु "श्रुतिसामान्यमात्रम्" इत्यादि सूत्रांनीं त्या आक्षेपांचें केलेलें खंडन, हें वाचावें. तसेंच व्यास महर्षींच्या शारीर सूत्रांतील "शास्त्रयोनित्वात्" हें सूत्र व त्यावरील श्रीशंकराचार्यांचें भाष्य वाचावें. व या शिवाय सायनमाधवकृत ऋग्वेदसंहितेच्या भाष्याचें विस्तीर्ण उपोद्घात प्रकरण वाचावें म्हणजे त्यांत या गोष्टी शास्त्रीय प्रमाणांनीं स्थापित केल्या आहेत. आणि जैमिनी महर्षि व सायन माधव यांच्या निरसनापुढें कोणाचे आक्षेप टिकतील, असें आम्हांस तरी वाटत नाहीं.

असो; वेद हे कल्पारंभीं ईश्वरानें मनुष्याकरितां ऋषिद्वारा दिले. व त्या वेदांतच ऐतिहासिक भागहि आहे. एवढें आपण ध्यानांत घेतलें असतां आम्हां लोकांना इतिहासाची माहिती किंबहुना इतिहासाचे अभ्यासाचा धडा प्रत्यक्ष सृष्टिकर्त्यानेंच घालून दिला आहे, असें दृष्टीस येईल. या बोलण्यावर कित्येकांचा असा सवाल होईल कीं इतकें जर अनादिसिद्ध इतिहासाचें वळण तुम्हांस आहे म्हणतां, तर आजकाल इतर राष्ट्रांकडे पहावें व हिंदुस्थाकडे पहावें, तर हिंदुस्थानाइतकें इतिहासाचें दारिद्र्य कोठेंहि नसेल. आज जर एखाद्या इंग्रजी पुस्तकालयांत गेलें तर नुसते इग्लंडचेच इतिहास एक आगगाडीच्या डबाभर मिळतील. पण हिंदुस्थानचा, विशेषतः हिंदूनें केलेला, एखादा देखील इतिहास मिळणें मुष्किल. कांहीं कांहीं पुस्तकें दिसलींच तर तीं देखील परस्थांनींच लिहिलेलीं; असें कां ? इंग्रज तर नुकतेपर्यंत रानटी स्थितींत

होते असें तुम्हीं त्यांस हिणावतां, असें असतां इतक्याशा अल्पकाळांत त्यांची इतिहासशास्त्रांत इतकी प्रगति व्हावी; व ह्यूम, हॅलम, गिबन, ग्रोट, असे अनेक नामांकित व तात्त्विक दृष्टीचे इतिहासकार त्यांत निपजावे आणि तुम्हां लोकांना ब्रह्मदेवाचे मुंजीपूर्वीपासून इतिहासाचें वळण आहे अशी तुम्ही बढाई मारीत असून, तुमच्यांत एकहि इतिहासकार होऊं नये हें काय?

या प्रश्नाचें उत्तर असें आहे कीं, आह्माला जर इतिहासाची कला माहीत नसती तर 'रामायण व महाभारत' या सारखे अद्वितीय इतिहास आह्मी कसे लिहिले असते? कारण, कोणी कितीहि घमेंड मारिली तरी **इतिहास** या दृष्टीनें घ्या, **काव्य** या दृष्टीनें घ्या, **कल्पित कथा** या दृष्टीनें घ्या, **नीतिशिक्षक** या दृष्टीनें घ्या, **सामाजिक इतिहास** या दृष्टीनें घ्या, **तत्त्वज्ञान** या दृष्टीनें घ्या, किंवा **विविध व्यावहारिक विद्या व कला** यांचे दृष्टीनें घ्या, **महाभारताचे** किंवा **रामायणाचे तोडीचा** ग्रंथ आजकाल तरी पृथ्वीवर नाहीं. हें *निर्विवाद आहे.

मग असेल अप्रतिम इतिहास लिहिण्याची आमचे लोकांतील अक्कल गेली कुठें? तर याचें उत्तर एका सुभाषित भाष्यकारानें ह्मटलें आहे कीं, "**मतिः स्फुरतिहि स्वस्थे नृणां-चेतसि**" ह्मणजे मनुष्याचें चित्त जर स्वस्थ असेल, तर त्याला सगळी अक्कल सुचणार, तें जर सदा '**भ्रमतसे सदा चाकसें**' अशा स्थितींत असेल, तर त्याला अक्कल सुचावी कशी? हें जर खरें आहे, तर महाभारतानंतर तसला इतिहास आम्ही लोक कां लिहूं शकलों नाहीं याचें उत्तर उघड आहे. कारण महाभारताचे कालानंतर लौकरच या देशावर परकीयांच्या

---

* यावत् जगतांत इतिहास या संज्ञेस पात्र जर कांहीं ग्रंथ असतील तर आमचें 'भारत व रामायण' हेच दोन ग्रंथ आहेत. हें आमचें ह्मणणें आह्मी खालीं दिलेल्या मोठमोठ्या पाश्चात्य विद्वानांच्या लेखांतील इतिहासाच्या व्याख्या या ग्रंथांस व इतर कोणत्याहि ग्रंथांस जे लावून पहातील, त्यांस सत्य आहे असें कळून येईल व मग ते आह्मांवर वृथाभिमानाचा आरोप करणार नाहींत; ह्मणून या व्याख्या खालीं देतों.

( 1 ) History, as it lies at the root of all Sciences, is also the first *distinct* product of man's *Spiritual nature*, his Earliest Expression of what can be called Thought.

Carlyle, Essays on His.

( 2 ) History, at least in its state of ideal perfection is a compound of *poety and philosophy*. It impresses general truth on the mind by a vivid representation of particular characters and incidents.

Macaulay. Essays.

( 3 ) History, like religion, unites ali learning and power.

*Ritcher*; Levana.

( 4 ) History is a cyclic poem written by time upon the memories of man. The past, like an inspired rpapsodist fills the theatre of everlasting generations with her harmony.

*Shelley*.

( 5 ) Must not a great history be always an *epic ?*

*W. C. Smith.*

या ग्रंथांच्या योग्यतेसंबंधें स्वामी विवेकानंद ह्मणतातः—

These are the two encyclopœdia of the ancient Aryan life and wisdom, portraying an ideal civilization which humanity has yet to aspire after.

स्वाऱ्यांवर स्वाऱ्या येऊन देशाची दैना दैना झाली व येथील लोकांना स्वस्थतेचें नांव देखील उरलें नाहीं. याची साक्ष पुढील उताऱ्यांत आहे.

Destroying waves of invasion [ swept ] over [ India ] time after time. Alexander came and swept over the northern lands, and his armies rolled back again to Greece, enriched with eastern thought. Still bitterer the passion, still more cruel the humiliation, when wave after wave of the Northern Asian nations from Mangolia, from Turkasthana, holding the fiercest form of the faith of Islâm, the Islam of the sword, not of the pen, rolled over her and strove to overwhelm the faith of the Hindu people, and the Moghul throne was set upon the very site where Yudhisthira had reigned. Later still, one European nation after another played with the dice of war and commerce for the ruling of India. Her embankments were gone. No warriors or armaments, however heroic, were strong enough to stem the flood, the waves of the ocean of invasion swept from coast to coast and submerged the whole. "

सारांश, गेले दोन हजार वर्षांत जर या भूमीला स्वस्थतेचा एकहि दिवस लाभला नाहीं, ताटांतलें अन्न तोंडांत पडेल कीं नाहीं अशी जर प्रतिक्षणीं तिला अस्वस्थता वाटत होती, आज काय ग्रीसचा शिकंदर आला तर उद्यां उत्तरेकडोन कोणी तैमुरलंग आला, कोणी नादिरशहा आला, टॉर्टर आला, मोंगल आला व हिंदुधर्माची राखरांगोळी करूं लागला. पुढें पश्चिमेकडून पोर्तुगीज आले, फ्रेंच आले, दच आले, इंग्रज आले; नित्य नवी गर्दी. असा जर प्रकार चालू होता तर या भूमींत जन्मलेल्या कोणाहि मनुष्याला इतिहासासारखें गहन शास्त्र लिहिण्याला अवश्य लागणारी स्वस्थता व मानसोन्नति आणि साधनसंपन्नताहि कोठून असावी ? आणि याच्या अभावीं त्यानें हें महत्वाचें काम केलें नाहीं तर त्यास दोष कसा द्यावा. ' भर्तृहरीनें ' म्हटलें आहे कीं, ' अवस्था वस्तूनि प्रथयतिच संकोचयतिच ' म्हणजे कोणतेहि वस्तूचा संकोच किंवा विकास परिस्थितीप्रमाणें होत असतो. आजकाल योगायोगानें, या आर्यभूमींत परकीयांचें कां होईना, परंतु एकछत्री राज्यहोऊन सर्वत्र शांतता व साधनसंपन्नता प्राप्त झाल्यानें, आतां आम्हाला हे प्रश्न सूचूं लागले आहेत, कीं आमचे पूर्वजांनीं अमुक कां केलें नाहीं आणि तमुक कां केलें नाहीं, आपला इतिहास लिहून ठेवावा इतकी अक्कल यांस कशी नव्हती, इत्यादि. पण आमचे कडील इतिहासाचा अभाव समर्थ लेखकांचे अभावाचा नसून शांततेच्या अभावाचा पुष्कळसा परिणाम आहे.

या खेरीज इतिहासाच्या अभावाचें दुसरें एक सबळ कारण आहे तें हें कीं, " मान सांगावा जनांत व अपमान सांगावा मनांत " अशी एक प्रसिद्ध व सर्वसंमत म्हण आहे. तीप्रमाणें पाहतां गेल्या दोन हजार वर्षांचा काळ जर या देशांतील लोकांचे अपमानाचा, अवनतीचा, पडते दशेचाच काळ आहे, तर त्या काळाचा इतिहास लिहिणें म्हणजे त्यांत पदोपदीं आपले लोकांचें हीनत्वच वर्णीत बसणें आहे. आणि असें करण्याची उमेद भूतलावरील कोणत्याही राष्ट्रांत कोणी समंजस-नव्हे-अडाणी मनुष्य देखील धरूं शकेल, असें वाटत नाहीं. ज्याचा प्रभुकृपेनें उत्कर्षाचा काल येतो त्याला अनेक ढंग सुचतात. आपल्यांत म्हण आहे कीं, सोळावीची कला अंगीं चढली म्हणजे गर्दभीला देखील अप्सरेचे मुरके मारावेसे वाटतात व शोभतातहि. हाच न्याय यावत् मनुष्यकृतीचा आहे. आपला कमीपणा उत्साह-

पूर्वक चौघांपुढें मांडण्याची कोणालाहि होस किंवा उमेद नसते. आणि यामुळेंच गेला काळ हा आमचे अवनतीचा असल्यानें त्याचा इतिहास लिहिण्याला फारसें कोणी न धजावें यांत कांहीं आश्चर्य नाहीं. इतकें होतें तरी अवसर मिळाला तेव्हां आमचे लोकांनीं 'राजतरंगिणी' 'श्रीहर्षचरितासारखे' लिहिलेले इतिहास आज सांपडतात व याहूनहि अनेक ग्रंथ त्यांनीं लिहिले असावे अशी शोधक लोकांना साक्ष पटते. जैनग्रंथभांडार शोधितां नवीन नवीन चरित्रग्रंथ सांपडले आहेत. परंतु हिंदूंची राजसत्ता नसल्यामुळें असल्या ग्रंथाला आश्रय किंवा त्याचे रक्षणाची काळजी घेणारा कोणी नसल्यानें त्यांतील पुष्कळांचा लोप झाला आहे. मुसलमानांनीं हिंदूंचे देवतांची, धर्माची, धार्मिक ग्रंथांची कशी व किती नासाडी केली आहे ती प्रत्येक इतिहासज्ञास सुविदितच आहे. प्रसिद्ध पंडित बुल्हर आपले ' विक्रमांकदेवचरिताचे ' प्रस्तावनेंत म्हणतो कीं,

The reason why the Sanskritist longs in vain for works that could serve as foundations for his historical researches, lies not, therein, that *the rulers of India found no contemporaries willing* to *chronicle their deeds*, but *therein that nobody cared to preserve historical works from destruction* or make them accessible by copying and recopying the original Mss.

म्हणजे, ऐतिहासिक शोधकाला आधारभूत ग्रंथ मिळण्याची हल्लीं निराशा होते, याचें कारण हिंदुस्थानांतील राज्यकर्त्यांला तत्कालीन इतिहास लिहिण्यास समर्थ असे विद्वान मिळाले नाहींत हें नव्हे. परंतु, ग्रंथ लिहिले असतां ते बिनधोक राखण्याची व त्या ग्रंथाच्या अनेक प्रती करून त्यांस शाश्वती आणण्याची खटपट करणारा कोणी नव्हता हें होय.

एतावता, इतिहासाचें महत्व आम्हा लोकांस कळतें व ते लिहिण्याइतकी अक्कलहि आम्हांस आहे; हें वरील विवेचनावरून सिद्ध झालें; व असें असतां आमच्यांत इतिहास कां नाहींत याचीहि थोडीं कारणें आम्हीं सांगितलीं. याच कारणांत अप्रत्यक्ष रीतीनें अंशतः तरी भर घालणारें असें दुसरें एक कारण आहे. मोरोपंतांनीं म्हटलें आहें, " **घृत सांडुनि कारिल कोण आ तेला** " तूप असतां तेलाचा आदर कोण करणार ? किंवा अखिल जगत्पावनी श्रीगंगानदीचे उपकंठीं वस्ती असतांना खारेकुंव्याची पर्वा कशी वाटावी ? त्याचप्रमाणें निखिल जगताला कौतुकाधानकारक व सर्वांगस्पृहणीय व महनीय असे रामायण, महाभारतासारखे इतिहास आम्हाजवळ असतां, या अलिकडल्या म्हणजे आमचे अवनतीचे काळांतील लुंग्या सुंग्यांच्या कर्मकाहाण्यांचा आदर कोणी करावा ? अर्थातच, असल्याचे इतिहास मिळाले तरी ते आम्हांस उपेक्ष्यच वाटणार. जर्मन संस्कृतज्ञ बुल्हर म्हणतोः—

For the Pandit, Rama, Arjuna, and Nala are as much historical persons as Shiwaji or Bajrao Peshva, only they appear so much more interesting to him, because their deeds are more marvellous and they are surrounded by the halo of sanctity that encircles the happier yugas in which they are *supposed* to have lived.

**भावार्थः**—हिंदुस्थानांतील पंडिताला राम, अर्जुन, किंवा नल हे शिवाजी किंवा बाजीराव यांच्या इतकेच ऐतिहासिक वाटतात; इतकेंच नव्हे, तर त्यांचे चरित्रांत त्याला शिवाजी, बाजीरावापेक्षां अधिक गोडी लागते. कारण एक तर त्यांचीं कृत्यें आधुनिकांपेक्षां-

हि अद्भुत असून ते ज्या चांगल्या काळांत जन्मले होते असें मानिलें जातें, त्या काळाच्या प्रभावामुळें त्यांचे भोंवतीं एक पवित्र तेजाचें मण्डल असल्या पंडिताला दिसतें. यामुळें त्याला राम, नल, युधिष्ठिर हेच अधिक प्रिय व आदरणीय वाटतात.

बुल्हरचें हें म्हणणें जरी खरें आहे तरी, त्याचें कारण, इतिहासाचेच अनास्थेचें आह्मी वर जें दुसरें म्हणजे अवनतिस्थितिरूपी कारण दिलें त्यांतच बहुतांशीं आहे. समजा, आमचा आज साम्राज्यवैभवाचा दिवस असता व Union Jack फडकत असता तर आम्हांलाही नळ रामांची इतकी आठवण झाली नसती. स्वसामर्थ्यानें जर भरजरी पोषाख करून वावरण्याची ऐपत असेल तर वडिलांची जुनी शालजोडी कोण धुंडीत बसतो. परंतु, दीड रुपयाचे धाबळी पलीकडे जर स्वतःचें ऐश्वर्य नाहीं तर सामान्यतः मनुष्य जुनीच कां होईना पण शालजोडी सांवरून चौघांत बसूं इच्छितो. हाच न्याय अंशतः तरी रामायण महाभारतावरील आजकालचे हिंदूंचे आदरबुद्धीस लागू आहे. कारण महाभारताचे दिवस, युधिष्ठिराचे दिवस, म्हणजे या भरतभूमीचे सर्वांगीण वैभवशिखराचे दिवस. त्यानंतर तसे दिवस आलेच नाहींत. त्यामुळें याच दिवसांची कीर्ति गाऊन आमची बढाई सांगणें आम्हांस इष्ट वाटावें, हें मनुष्यस्वभावास अनुसरूनच आहे.

एवंच, आमचे लोकांत अर्वाचीन काळीं इतिहासाचा दुष्काळ कां, याचीं कारणें वर दर्शविलीं; त्यावरून असें दिसेल कीं, इतिहास–प्रियता व इतिहासलेखन–क्षमता हीं उभयहीं आम्हांमध्यें होतीं व आहेत. पण त्यांचा वापर करण्याचा प्रसंगच आला नाहीं.

आमचे मुद्याचे समर्थनार्थ म्हणून आम्हीं जे कांहीं उतारे दिले आहेत त्यांत अखेरचा जो बुल्हर पंडिताचा उतारा दिला आहे तो एक दृष्टीनें जरी आम्हांस कार्यसाधक झाला, तरी दुसरे बाजूनें पाहिलें तों 'निमाज पढावयास गेलों तों मशीद गळ्यांत आली.' असा अनिष्ट प्रकार झाल्याचें आमचे ध्यानांत आलें. कारण या विदेशी पंडितानें एकापक्षीं आमचा कैवार दाखविला. परंतु दुसरे पक्षीं '**मूलेकुठारः**' असा प्रकार केला आहे. त्याचे उताऱ्यांत जे 'as much Historical' ( तितकेच ऐतिहासिक ) व 'supposed' हे शब्द त्यानें वापरले त्यांत त्यानें नल, राम, युधिष्ठिर हे काल्पनिक आहेत असें ध्वनित केलें. आणि या पंडिताप्रमाणेंच ध्वनी काढणारे कित्येक तरी पाश्चात्य, व त्यांचे शागिर्द बनलेले एतद्देशीय कित्येक आधुनिक पंडितहि आहेत. 'ॲनिबझंट बाईच्या देखील ही गोष्ट ध्यानांत येऊन त्या म्हणतातः—

Now specially in modern days, when western thought is so much swaying and colouring the eastern mind, Indians as well as Europeans are apt to shrink from the idea of historical truths being conveyed in much of the sacred literature, those enormous periods, those long reigns of kings, those huge and bloody battles, surely they are all allegory, they are not history.

**भावार्थः**—विशेषतः सांप्रतच्या काळीं म्हणजे जेव्हां पाश्चात्य विचारांची पूर्वेकडील लोकांचे विचारांवर छाप पडून ते बदलत आहेत अशा वेळीं यूरोपियन व इंडियन या दोघांनाहि हिंदूंच्या पवित्र पुराणग्रंथांत सांगितलेले मन्वंतरादि दीर्घ काळ, त्यांतील अनेक राजांच्या लांब लांब कारकीर्दी, प्रचंड आणि रक्तपातमय युद्धें, हीं सर्व ऐतिहासिक म्हणजे

खरोखरच्या घडलेल्या गोष्टी आहेत असें वाटत नसून या सर्व गोष्टी म्हणजे केवळ कल्पनेच्या भराऱ्या किंवा कविकृत रूपकें आहेत, असें वाटतें.

बरें, आमच्या खऱ्या इतिहासाला " कल्पना " म्हणून ते थांबते तरी पुरवतें. पण या कल्पनेचें स्वामित्वसुद्धां ते आम्हांस देण्यास कबूल नाहींत. ती देखील आम्ही उसनी आणली आहे. आमचें रामायण हें होमरचे इलियडवरून रचलें आहे. आमची भगवद्गीता येशूचे बायबलावरून घेतली आहे. अशा प्रकारचीं धडधडीत विधानें हे लोक करतात. याला काय म्हणावें? ही काय यांची परोत्कर्षासहिष्णुता म्हणावी, कीं असूया म्हणावी? आमचे मतें असले अनुदार हेतु असल्या विद्वानांचे ठिकाणीं असण्याचा संभव कमीच असावा. यांना असे आक्षेप घेण्यास कारण आमची आजची हीन स्थितीच होय. हा मानवी स्वभावच आहे कीं, गरिबाचे कपाळीं खरा कस्तुरीचा टिळा जरी असला तरी ती काळी माती असेल असेंच सामान्यतः माणसें धरून चालतात. एखादे भिक्षुकाचे बायकोचे गळ्यांत जर कोणी मोत्यांचें पेंडें पाहिलें तर तें बहुधा खोट्या मोत्याचें असावें असें मानण्याकडे माणसाची सहज प्रवृत्ति असते. कदाचित् तें खरें ठरूं लागल्यास चोरीचें आहे असेंहि कित्येक धाडशी म्हणतात. त्याचप्रमाणें आजकालची आमची शरीरानें, संपत्तीनें, विद्येनें, पराक्रमानें, कलाकौशल्यानें, राष्ट्रीयत्वानें–सर्वच बाजूंनीं पराकाष्ठेची हीन स्थिति ज्यांचे धडधडीत डोळ्यापुढें उभी आहे, अशांना आम्हींच लोक पूर्वीं " आसमुद्रक्षितीशानां। आनाकरथवर्त्मनां। " अशा वर्णनास पात्र होतों, हें पतकरणें अवघड जावें हें स्वाभाविकच आहे व याबद्दल आम्हीं त्यांस नावेंहि ठेवीत नाहीं. मात्र त्यांनीं जरी आपल्या समजुतीला अनुसरूनच आरोप केला असला किंवा प्रसंगीं नुसता विनोद केला असला, तरी त्याचें परिमार्जन करणें हें आमचें कर्तव्य आहे. नाहीं तर " मस्करीची झाली कुस्करी " असा अनिष्ट परिणाम व्हावयाचा. यासाठीं हे आक्षेप कितपत टिकाऊ आहेत तें आपण पाहूं.

यापैकीं, आम्ही हे ग्रंथ परक्यांपासून उतरून घेतले आहेत काय? या प्रश्नास सणसणीत उत्तर म्हणजे कै. नामदार तेलंग यांनी रामायण हें होमरवरून घेतलें आहे काय? या आपल्या निबंधांत पुरविलें आहेच. तसेंच ' गीता ' ही बायबलावरून घेतली आहे या विधानाचा परिहार आम्ही याच लेखांत पुढें एफ् टी. ब्रुक्सचे उतारे दिले आहेत त्यांवरून होईल; व याहून वाद करीत बसण्यास या स्थलीं अवकाशहि नाहीं.

आतां दुसरा मुद्दा राहिला कल्पितत्वाचा–भारत रामायण हे खरे इतिहासच आहेत, कीं केवळ कल्पित रचना आहेत? या आक्षेपास कांहींसें सविस्तर उत्तर देणें भाग आहे.

पहिलें उत्तरः ह्या जर केवळ कल्पित रचना असल्या व त्या परम कुशल लेखकानें किंवा कल्पकानें केल्या असल्या तर त्या 'अरेबियन नाइट्स' किंवा 'शेक्सपिअर' प्रमाणें केवळ लोकप्रिय होऊं शकल्या. परंतु, लोकपूज्य होऊं शकल्या ना. 'अरेबियन नाइट्स' आपले बिछान्यांत कुशीस घेऊन देखील निजणारा भगत भेटेल, परंतु त्याला देवघरांत ठेवून त्यावर गंधफूल वाहून कोणी नमस्कार करील, असें आम्हांस वाटत नाहीं. दुसरें: अरेबियन नाइट्स गोष्टींतील वर्णनाचे स्थानिक पुरावे वस्तुसृष्टींत कितीसे आढळतील? परंतु आमचे ग्रंथांत वर्णिलेल्या अनेक गोष्टींचे पुरावे इतक्या कालानंतरहि आजचे सृष्टींत किती तरी आढळतात.

तिसरें: अरेबियन नाईटमध्यें किंवा शेक्स्पिअरच्या केवळ कल्पित नाटकांत एखाद्या राजाचें वैभव कितीहि लोकोत्तर वर्णिलें असलें तरी त्यांतील एखाद्या राजाचा 'शक' लोकांनीं मानिला आहे, असें उदाहरण आहे काय? परंतु आमचे युधिष्ठिराचा 'शक' या भरतभूमींत अनेक शतकेंपर्यंत राजरोस चालू होता, याबद्दल अनेक शिलालेख ताम्रपट इत्यादिकांत व ज्योतिषग्रंथांत विश्वसनीय पुरावे आढळतात. तर ही गोष्ट युधिष्ठिर नांवाचा खराखुराच राजा व तोही विश्वजयी होऊन गेला असल्याशिवाय शक्य आहे काय?

चौथें: या रचना जर काल्पनिक असतील तर कल्पना ही निष्प्रतिबंध असते. तिला इतिहासासारखी सत्याची अट नसते, हें सर्वांस कबूलच आहे. अर्थात् जेथें मन मानेल तसें बोलण्यास सवड आहे. तेथें कोणीहि शहाणा मनुष्य उत्तम व सर्वमान्य होईल असेंच बोलेल. व त्यांतहि विशेषतः स्वतःविषयीं किंवा स्वकीयांविषयीं कांहीं बोलणें झाल्यास शक्य तितकें निर्दोष व प्रशंसनीय असेंच बोलेल. मानसपूजेंतीलच नैवेद्याची तयारी व ब्राह्मणभोजन असेल तर नैवेद्याला नुसतें कडबोळेंच कां? सगळीं पक्वान्नें करावयाला कोणती नड? व एकच ब्राह्मण कां? लक्ष किंवा कोटीला आळस कशाला? हें उघडच आहे. त्याचप्रमाणें भारत गोष्टी या काल्पनिक असतील तर आमचें म्हणणें या अजब गोष्टी ज्या चतुर कल्पकानें रचिल्या किंवा निर्मिल्या तो स्वतःचे व स्वकीयांचें वर्णन तरी होतां होईल तों सर्वतोपरी अच्छिद्रच करील. व त्यांतलें त्यांतहि स्वतःचे उत्पत्तिसंबंधानें तर तो फारच जपून बोलेल. कारण प्रत्येक जीवाला स्वतःचे उत्पत्तीबद्दल किंवा जातकुळीबद्दल जो अभिमान असतो त्याचे पुढें इतर गोष्टींबद्दलचे अभिमान न्यून आहेत, हा सर्व जीवांचा नित्याचा अनुभव आहे. आजकाल आमचे चर्मकाराला देखील जाती कोण म्हणून विचारलें तर तो सोमवंशी ब्राह्मण म्हणून सांगण्याचा यत्न करण्यांत तरी कसर करणार नाहीं. आणि यांत त्याचा दोष नाहीं; हें सहज आहे. हें जर खरें, तर व्यासासारख्या अखिलज्ञानसंपन्न व साक्षात् नारायणपदाची बरोबरी करणाऱ्या गृहस्थानें, स्वतःचें जन्म सांगतांना आपण, आपला बाप, आपली आई सर्वांसच ज्यांत कमीपणा आहे, असलें वर्णन देणें संभवतें काय? पराशरासारखा त्रिकालज्ञ जितेंद्रिय ऋषि तो एखाद्या विषयी पामराप्रमाणें विवश होऊन नावेंतल्या नावेंत आणि तोहि जिच्या अंगाला वसवस मासळीची घाण सुटली आहे, अशा एका कोळ्याच्या पोरीवर आशक झाला व आपणास निर्माण करिता झाला, व नंतर आपणांस जन्मदाती हीच कोळीण पुढें शंतनु नांवाचा दुसरा नवरा करती झाली व आपला स्वतःचा वर्ण आपल्या कोळीण आईप्रमाणेंच काळा असल्यानें आपणास कृष्णद्वैपायन असें म्हणत; इत्यादिक आपणा स्वतःहास कमीपणा आणणाऱ्या व विशेषतः आपल्या उत्पत्तीचे बाबतींत हीनत्व देणाऱ्या गोष्टी, वर्णनाचें पूर्ण स्वातंत्र्य असतां व्यासासारखा सर्वज्ञ कल्पून मांडील, हें संभवतें काय? मी 'अयोनिसंभव' आहें, असें ज्यानें म्हटलें असतें तरी एक वेळ पचून जातें, असा ज्याचा दैवी अधिकार, तो नांव हांकणाऱ्या कोळ्याच्या पोरीवर जबरी करून आपली उत्पत्ति झाली असलें वर्णन आपण होऊन कां पुकारील बरें! त्याकाळीं मर्जीस आल्यास दोन नवरे करणें कांहीं हरकतीचें कलम नव्हतें, म्हणून व्यासांस असल्या वर्णनांत कांहीं शंका आली नाहीं, असें म्हणावें तर पुढें 'अंबेनें' 'शाल्वराजाला मी

मनानें वरलें आहे ' असें सांगतांच भीष्मांनीं व तत्रस्थ महर्षींनींहि तिला अडकाठी आणली नाहीं, इतका अव्यभिचारित्वाबद्दल त्याकाळीं सर्वत्र मान होता. मग व्यास आपलेच आईचें असलें कुलंगडें जगापुढें कां मांडतात? बरें, स्वतःबद्दल हें झालें. आतां स्वकीयांबद्दलहि तेंच. पुढले पिढीला विचित्रवीर्य मृत होऊन त्याच्या स्त्रिया वांझ राहिल्या तेव्हां मात्राज्ञेवरून आपणच त्यांस गर्भदान केलें असें व्यासच सांगतात. बरें, त्याचे पुढील पिढींत असलाच कांहीं गोंधळ. कुंतीला कुमारपणींच कर्ण झाला. मग नवऱ्याचे घरांत आल्यावर—नवऱ्यापासून नव्हे, देवांपासून तीन पुत्र झाले व तिच्या सवतीला त्याच युक्तीनें दोन मुलगे झाले: हा तिसऱ्या पिढीचा मासला. आतां पिढी चवथी: तेथेंहि जवळ जवळ तोच प्रकार. याज्ञसेनी कृष्णभगिनी, कृष्णप्रिया, इत्यादि उंची उंची विशेषणें जिला दिलीं तिला नवरे पांच करून दिले, हें काय या कल्पकाचें शहाणपण? हे काय तिच्या जिवाचे धिंडवडे. आणि हें असलें मुद्दाम उकरून काढावयाला या शहाण्या व्यासाला कोणी सांगितलें? कल्पनेचेंच जर साम्राज्य तर प्रत्येक पठ्ठ्याला वेगळी वेगळी बायको करून द्यायला पोरींचा दुष्काळ कां होता? निदान कल्पनेच्या राज्यांत तरी हें संभवत नाहीं. अर्थात् मग द्रौपदीसारख्या सुकोमल तन्वंगीचे भोंवतीं हे पांच दांडगे कां ठेवावे? निदान व्यासासारख्या कवीच्या सहृदयतेला तरी हें जाचावें? परंतु, सत्यच असलें तर तेथें तो काय करील? आजकालचे इंग्रज लोकांना नुसतें पावलाचें नख उघडें दिसलें तर असभ्यपणा वाटतो, असले लोक आपण दीड हजार वर्षांपूर्वीं कातडीं पांघरीत होतों असें मोठ्या प्रेमानें कां सांगत असतील? पण सत्यापुढें अशरण झाल्यामुळें सांगणें भाग येतें, तेथें काय करणार! हाच प्रकार व्यासांचा समजला पाहिजे, दुसरें उत्तर नाहीं.

आपण आजकालचे न्यायाचे कोर्टांत प्रतिदिवशीं पहातों कीं, जो बनावट साक्षीदार असतो त्याची जबानी अत्यंत टापटिपीची व साफसूफ असते. कारण तेथें त्यास स्वातंत्र्य असल्यानें वाटेल तसें सुरस व सोईकर आख्यान रचितां येतें. परंतु ज्याला खरी जबानी द्यावयाची असते त्याचे बोलण्यांत किती तरी हास्यास्पद किंवा कमीपणा आणणारे प्रकार निष्पन्न होतात. यांतील बीजहि हेंच आहे. यावरून व्यासांची ही कल्पनासृष्टि असती तर असलें वेडेपण ते करतेना, हें पांच वर्षांचे पोरास देखील पटलें पाहिजे; हें उघड झालें. रामायणकर्त्या वाल्याकोळ्या संबंधेंहि हाच विचार समजावा.

बरें, हें स्वतःबद्दल व स्वकीयांबद्दल झालें. आतां या कल्पनासृष्टींतील किंवा नाटकांतील इतर पात्रांबद्दल पाहूं. लुंगीसुंगी पात्रें बाजूस ठेवा. या भारत नाटकांतील सूत्रधाराचेंच अर्थात् प्रधानतम असें पात्र घेऊं. हें पात्र म्हणजे परमात्मा श्रीकृष्ण. श्रीकृष्ण म्हणजे अखिल—ब्रह्मांड—नायक, सकल सूत्रधार, काळाचाहि काळ अशा अधिकाराचें त्याचें महत्व स्थापण्याचा व्यासांचा झोंक आणि असें असतां त्याला कोठें अर्जुनाचा खासदार, कोठें धर्मराजाचा उष्टेंकाढ्या, असें त्यांनीं रंगवावें हें काय? अशानें त्याचें लोकांस महत्व वाटावें कसें व व्यासांचें इष्टकार्य साधावें कसें? नांव घेण्यांत अर्थ नाहीं. पण एका उमेदवार गृहस्थाला कुठें पंधरा रुपयांची नोकरी लागली, त्याबरोबर मेहेरबानांनीं मातोश्रीस फर्मान काढिला कीं, " आई, आजपासून माझीं धोतरें तूं धूत जा. ( लग्न झालेलें नव्हतें ), कारण

आतां मी स्वहस्तें धोतरें धुगें म्हणजे कमीपणा आहे. अशानें रुबाब रहाणार नाहीं." पंधरा रुपड्यांचे ऑफिसरची अब्रू राखण्याला जर जन्मदात्रीला धोतरें बडविण्यास फर्मावें लागतें, तर त्रिभुवनाचे नियंतृत्व ज्याचेकडे स्थापित करावयाचें अशाला मोतद्दारी आणि ब्राह्मणजनकी सारखीं कामें सांगून त्यांचा बोज कसा राहील, हें व्यासांचे लक्षांत आलें नाहीं म्हणावें, कीं ते सत्यापुढें परवान् होऊन त्यांस असें वर्णन करणें प्राप्त झालें असें म्हणावें, याचा विचार वाचकांनींच करावा.

याच वर्गातला, परंतु अंशतः भिन्न स्वरूपाचा आणखी एक मुद्दा आहे. तो असा कीं, हे सुप्रसिद्ध कल्पक, व्यास, वाल्मीकि, यांनीं असले हे जगड्वाळ काल्पनिक ग्रंथ निर्माण करून काय केले? यांत त्यांनीं प्रधानतः स्वतःचें महत्व स्थापित केलें कीं इतरांचें केलें आहे? आमचे दृष्टीला तर साफ दिसतें कीं, ब्राह्मणापेक्षांहि क्षत्रियांचेच गौरव त्यांनीं एकंदरींत अधिक केलें आहे. बरें, असें त्यांनीं कां करावें? भार्गव परशुरामानें एकवीस वेळां निःक्षत्रिय पृथ्वी केली, असें जसें त्यांनीं सांगितलें, तसेंच या क्षत्रियास जिंकून तोच सार्वभौम झाला व दिल्लीचे किंवा कोणते तरी तक्तावर बसून ब्राह्मणशाई करूं लागला, असें म्हणण्यास त्यांस कोणी मनाई केली होती? बरें, क्षत्रियांचा अशा प्रकारें जर ब्राह्मणांनीं विध्वंस केला होता, इतकें जर ब्राह्मण क्षत्रियांचें उघड उघड वैर जुंपलें होतें, तर त्याच जातींत उत्पन्न झालेले जे श्रीराम व श्रीकृष्ण यांस तारक परमात्मरूप समजून त्यांचे चरण मस्तकीं धरावे व त्यांचें नाम अहर्निश त्यांनीं हृदयसंपुटांत वागवावें व इतरांसहि अभेदानें तोच उपदेश करीत सुटावें या कृतीस काय म्हणावें? दुर्वासाचा रथ जर कृष्ण रुक्मिणी ओढीत आहेत, तर 'श्रीकृष्ण, जयकृष्ण' या नामांचा घोष करण्याचें दुनियेला शिकविण्यापेक्षां श्रीदुर्वास, जयदुर्वास असें शिकविणें अधिक समंजस दिसलें नसतें काय? पण ब्राह्मणांना जरी देव वंद्य मानीत होते व ब्राह्मणांमुळेंच त्यांचीं नांवें अलंदुनियेला त्रिकाळीं माहीत होत आहेत, तरी असल्याहि ब्राह्मणांनीं 'आमचे' नांवाचा जप करीत जा किंवा आमचे नांवानें माळा ओढीत जा असा दुनियेला कोठेंहि उपदेश केला नाहीं. तसा केला असता तरी साफ पचण्याजोगा होता. तसें नकरितां

पुण्यश्लोको नलो राजा पुण्यश्लोको युधिष्ठिरः।
पुण्यश्लोकोच वैदेहः पुण्यश्लोको जनार्दनः ॥

असेंच लोकांस शिकविलें. हें ब्राह्मणांचें आत्मश्लाघेचें, जातिद्वेषाचें, आप्पलपोटेपणाचें, स्वार्थसाधुत्वाचें द्योतक आहे कीं त्यांच्या सत्यप्रियतेचें, सात्विकपणाचें, द्वेषराहित्याचे गुणादराचें द्योतक आहे, याचा विचार वाचकांनींच करावा. हा मागला दाखला राहो. परंतु अलिकडील दाखले घ्या. आळंदी पंढरी येथील वारकरी पंथांत हजारों ब्राह्मण टाळकरी आहेत. व ते, 'तुकाराम नामदेव' हे शूद्र—वाणी व शिंपी—होते हें पूर्ण जाणत असतांहि "नामदेव तुकाराम" म्हणून कंठ कोरडा पडेपर्यंत त्यांचा घोष करीत असतात व चोरुया-

---

१ "स्मृतिमपि नते यांतिक्ष्मापाविना यदनुग्रहम्। भावः—व्यास वाल्मीक लिहून न ठेवते, तर राम तरी कोठें होता आणि कृष्णाचा गलबला कोणत्या गल्लींत, माहीत पडला होता!

मेळ्या रोहिदासाचेहि पालखीला उजवी घालून जातात, हें काय म्हणावें ? हें काय ब्राह्मणाचे जातिद्वेषाचें व आत्मप्रतिष्ठेचें लक्षण म्हणावें किंवा गुणपूजेचें व सत्यप्रियतेचें समजावें ?

आणखींहि अलिकडील उदाहरणें देतां येतील. पहिला बाजिराव हा ब्राह्मण होता व शिवाजी सारखाच शूर होता तरी बाजिरावजयंती करण्याचें कांहीं कोणा ब्राह्मणाला सुचलें नाहीं. असें कां ? जातीचा दुरभिमान व सत्याविषयीं उपेक्षा असती तर ब्राह्मणांत बाजिराव–जयंती पुढें आली असती. व मराठ्यांनीं किंवा क्षत्रियांनीं पाहिजे तर शिवजयंती करावयाची होती. परंतु तसें ब्राह्मणांनीं केलें नाहीं.

असो, याहूनहि आणखी पुरावे देतां येतील. परंतु सवड नाहीं. दिलेल्या पुराव्यावरून लक्ष्यांत येईल कीं, केवळ कल्पनास्वातंत्र्य असतें तर आपला कमपक्ष दाखविणारीं, निदान क्षत्रियादिकांचें आधिक्य व पूज्यत्व दाखविणारीं वर्णनें, हे ज्ञाते ब्राह्मण, कवी व इतिहासकार करतेना. अर्थात्, त्यांनीं जीं वर्णनें केलीं तीं सत्यापुढें निरुपाय होऊन किंवा सत्यप्रियतेस्तव केलीं. फलतः त्यांनीं लिहिलेले हे ग्रंथ कादंबऱ्या नसून खरेखुरे घडलेले इतिहास आहेत, हें सिद्ध झालें.

असें आहे तरी आमच्यांतील–परक्यांचें दूर राहो–पण आमच्यांतील, कित्येक आंग्लसंपृष्ट लोक ह्मणतात. कसलीं हीं पुराणें आणि इतिहास–कांहीं तरी बाडें आहेत. काय गप्पा–काय बाडा–काय असंभाव्य गोष्टी त्यांत लिहिल्या आहेत. ह्या खऱ्या कोणत्या दृष्टीनें मानाव्या? यांस पुरापूर उत्तर बिझांट बाईनें दिलें आहे. ती ह्मणतेः—

" When you read the *Puranas you consistently get the fact on the higher plane described in terms of the lower, with the result that it seems unintelligible, seems incomprehenseble; then you have what is called an allegory, that is, a reality which looks like a fancy down here, but is a deeper truth than the illusion of physical matter, aud is nearer to the reality of things than the things which you call objective and real. If you follow that line of thought at all, you will read the Puranas, with more intelligence and certainly with more reverence than some of the modern Hindus are apt to show in the reading, and you will begin to understand that when another vision is opened one sees things differently from the way that one sees them on the physical plane, and that, that which seems impossible on the physical is what is really seen when you pass beyond the physical limitations. From the Puranas then the stories come. "

" Let me take the first three Avataras apart from the remainder, Three animal forms; how strange ! Thinks the modern graduate. How strange that the supreme should take the form of these lower animals, a fish, a tortoise, a boar ! What childish folly ! ' The babbling of a race in it in fancy ! It is said by the Pandits of the western world; ' Do not be so sure.' Why this wonderful conceit as to the human form ? Why

---

१ हें उदाहरण येथें जात्याभिमानानें दिलें नाहीं तर सर्वच जातींनीं या गोष्टिकडे लक्ष देऊन अलीकडे बळावत चाललेली जातिभेदाची दृष्टि मंद करावी व गुणपूजेची दृष्टि वाढवावी या सद्धेतूनें दिलें आहे.

* महाभारत हें पुराणहि आहे व इतिहासही आहे. ( आदिपर्व, उपोद्घात पहा. )

should you and I be the only worthy vessels of the deity that have come out of the illimitable mind in the course of ages ? What is there in this particular shape of head, arms, and trunk which shall make it the only worthy Vessel to serve as a manifestation of the supreme ishvara ! + +– From whose stand point, in the vast hierarchies from tho menial to the loftiest Deva, ths distinctions are but as anthills in comparison with Himself, and one form or another is equally worthy, so that it suits His purpose and manifests His will. "

* * * *

" You have in the Matsyavatar what geologists call the Silurian Age, the age of fishes, when the great divine manifestation in the form of the fish. Not so very ridiculous after all, you see, when read by knowledge instead of by ignorance, a truth as the Puranas are full of truth, if they were only read with intelligence and not with prejudice. "

* * * *

After proving with the help of science the truth of the fish, the Tortoise and the Boar manifestation, Anne Besant remarks:—

" Not so very ignorant after all, you see, the ancient writings ! For men are only rediscovering today what has been in the hands of the followers of the Rishis for thousand, tens of thousands of years. "

Speaking of Pralhada and the man-lion incarnation, She remarks.

" Hari, Hari, " cried the boy, and the pillar burst asunder and the mighty form came forth and slew the Daitya &c. A story ?—*Facts, not fiction;* truth, not imagination.

वरील उताऱ्यांचा सारांश.—पुराणांमध्यें अति उच्च कल्पना सामान्य दर्जाच्या मनुष्यांस समजाव्या ह्मणून खालच्या दर्जाच्या भाषेंत वर्णन केलेल्या असल्यामुळें ती वाचतांना वाचकांना उदात्त कल्पना समजणें बहुतेक अशक्यसें वाटतें. शिवाय त्यांत पुष्कळशा नीति–गर्भित–रूपकवजा कथा आहेत. त्या केवळ काल्पनिक भाकडकथा असाव्यात असें वाटण्याचा संभव असतो. पण विचारांतीं त्या भौतिक वस्तूंइतक्या भ्रामक नाहींत, इतकेंच नव्हे तर ज्या वस्तूंना आपण प्रत्यक्ष व सत्य समजतों त्याच्यापेक्षां त्या ज्यास्त सत्य आहेत, असें दिसून येईल. अशा दृष्टीनें पुराणांकडे पाहिल्यास त्यांतील रहस्यें आपल्याला उलगडूं लागतील, त्या ग्रंथाबद्दल अलीकडच्या कांहीं हिंदूपेक्षांही तुमच्या अंतःकरणांत ज्यास्त पूज्य बुद्धि उत्पन्न होईल व केवळ जड दृष्टीनें पहातां ज्या गोष्टी उकलत नाहींत त्या उच्च दृष्टीनें सुसंगत दिसूं लागतील. तसेंच ज्या गोष्टी प्रारंभीं अशक्यशा भासतात त्या भौतिक बंधनाच्या पलीकडे गेल्यानंतर प्रत्यक्ष घडत असलेल्या दिसून येतात. पुराणांवरून आपण आतां अवतारकथांकडे वळूं.

आपण प्रथम पहिल्या तीन अवतारांचाच विचार करूं. हे अवतार पशुयोनींत झालेले आहेत असें वाचतांच आधुनिक ग्रॅज्युएटाच्या मनांत येतें कीं, 'हें काय आश्चर्य आहे! ईश्वराचे अवतार ह्मणावयाचे आणि ते माशाच्या, कांसवाच्या, आणि डुकराच्या जातीचे ! हा काय बालिश मूर्खपणा! पाश्चात्य पंडित हें वाचून ह्मणतात कीं, ही केवळ रानटी लोकांची रानटी बडबड आहे, झालें! ' परंतु असलीं मतें ठोकून देणें बरें नव्हे. मनुष्यत्वाच्या आकाराबद्दल इतका विलक्षण अभिमान कां? ईश्वराच्या अनंत कल्पनेंतून निरनिराळ्या युगांत

निर्माण झालेल्या योनीमध्यें तुमची आमची मनुष्ययोनी हीच कायती श्रेष्ठ असा हट्ट कां ? ईश्वरानें अवतार मनुष्ययोनीमध्येंच घ्या ा असा विशेष या देहामध्यें आहे तरी काय ? खनिज पदार्थांपासून देवलोकांपर्यंत ईश्वरानें केलेल्या अफाट रचनेचा विचार करतां ईश्वराच्या मनानें सृष्टींतील प्राणिमात्रांमध्यें फरक असला तर तो अत्यल्प आहे. व ईश्वरास सर्व देह सारखेच आहेत. मत्स्यावतार यांत मत्स्ययुगाची कल्पना आहे. यावेळीं मत्स्यरूपानें ईश्वर अवतीर्ण झाला. ही कल्पना इतकी उपहासास्पद नाहीं, मात्र अज्ञदृष्टीनें न पहातां ज्ञानदृष्टीनें तिचा विचार केला पाहिजे. व अशा दृष्टीनें पुराणें वाचलीं तर तीं सत्य आहेत असेंच दिसून येईल.

शास्त्रांच्या दृष्टीनें मत्स्य, कूर्म व वराह या अवतारांचें समर्थन केल्यावर ॲनि बिझांटबाई लिहितात:—एकंदरींत प्राचीन ग्रंथ हे अडाणी कल्पनांनीं भरलेले नाहींत. कारण, हजारों, लाखों वर्षांपूर्वीं ऋषींनीं ज्या गोष्टी लिहून ठेवल्या व ज्या त्यांच्या अनुयायांपाशीं चालत आल्या आहेत त्याच आज मितीस शास्त्रीय शोधानें पुन्हां जगासमोर येत आहेत.

प्रल्हाद व नारसिंह अवतार यांसंबंधानें बाई ह्मणतात:—प्रल्हादानें हरिनामाचा उच्चार करतांच स्तंभ दुभंग होऊन त्यांतून नारसिंह प्रकट झाला व त्यानें दैत्यवध केला, ही काय नुसती काल्पनिक गोष्ट आहे ? नाहीं. ही कादंबरी नाहीं तर प्रत्यक्ष घडलेली वस्तुस्थिति आहे. ही कल्पना नाहीं, तर भूतार्थ आहे.

सारांश:—महाभारतादि पुराण ग्रंथ हीं बांडें नव्हत. हे खरेखरे इतिहास आहेत व हे आपणांसच नव्हत तर सर्व जगाला मार्गदर्शक आहेत.

पुराणांचे सत्यतेबद्दल हीं प्रमाणें दिलींच आहेत. त्यांतहि महाभारताचे ऐतिहासिकत्वाविषयीं म्हणजे कौरव पांडव व त्यांचें युद्ध या खरोखर घडलेल्या गोष्टी अशाबद्दल एक प्रत्यक्ष साक्षी मिळाल्याची चमत्कारिक गोष्ट एके ठिकाणीं मिळाली ती आम्ही येथें सादर करितों. ही गोष्ट अविश्वसनीय मानणारे आजचे काळांत पुष्कळ निघतील, हें जरी आह्मी जाणून आहों, तरी आम्हांस ती श्रद्धेय वाटते, म्हणून आह्मी देत आहों. जालवण येथील सुप्रसिद्ध साधु नारायण महाराज यांचे ग्रंथ रावसाहेब शंकर व्यंकटेश टांकी यांनीं प्रसिद्ध केले आहेत. या पुस्तकाचे आरंभीं नारायण महाराजांचा जीवनवृत्तांत दिला आहे, त्यांत असें लिहिलें आहे कीं:—

" एके दिवशीं महाराज आपले शिष्य नारायण भटजी (रत्नागिरींत नारायण पेठेंत राहणारे देवरुखे ब्राह्मण ) यांसह धौम्यारण्यांत फिरत असतां त्यांस एक प्रचंड शिळा एका गुहेच्या तोंडावर ठेवलेली आढळली. जवळ जाऊन पाहातात तों त्यांस दरवाज्याची फट नजरेस पडली व त्यांतून त्यांनीं मोठ्यानें हांक मारतांच आंत राहणारे मनुष्यानें दार उघडून त्यांस आंत घेतलें. त्या मनुष्याचा देह फारच मोठा असल्यावरून हा कोणी पुरातन काळचा हठयोगी असावा अशी महाराजांच्या व नारायणभटजीच्या मनांत कल्पना येणार, इतक्यांत त्यानें कर्णाच्या व अर्जुनाच्या युद्धाचा परिणाम काय झाला ? म्हणून संस्कृत भाषेंत प्रश्न केला. व त्यास द्वापर सरून कलियुग चाललें आहे असें महाराजांनीं उत्तर दिलें. नंतर

त्यानें आपण कर्णार्जुनाच्या युद्धाचे वेळीं पळून या गुहेंत येऊन लपून राहिलों व हटयोगाचे सामर्थ्येंकरून प्राणांताची वेळ प्रत्येक खेपेस टाळून आजपर्यंत देहरक्षण केलें असें सांगितलें."

याशिवाय त्यावेळचा चिरंजीवी अश्वत्थामा याचें नर्मदातीरीं प्रत्यक्ष दर्शन झाल्याचेंहि सांगणारे लोक आहेत. बाकी या आख्यायिका आहेत. त्यांवर विश्वास ठेवणें न ठेवणें हा वाचकांचे भावनेचा भाग आहे. आणि आह्मीहि ह्या आख्यायिका म्हणजे मुख्य आधार या दृष्टीनें घेत नाहींच. पण भरींत भर म्हणतात त्या न्यायानेंच यांचा आश्रय केला आहे.

एफ्. टी. ब्रूक्स हे आपल्या ' गॉस्पेल ऑफ लाईफ ' नामक पुस्तकाचे प्रस्तावनेंत महाभारत व गीता यांबद्दल बोलतांना म्हणतात:—

" What a peculiar-nay, extraordinary Book the Mahabbarat is: what far reaching issues of unwritten History it deals with, in its curious dramatic Symbolism; and above all, how radically different, how dimetrically opposite, I should say the vital spirit of those Ancient Scriptures is, from *what India's prolonged degeneracy has misrepresented it to be.*

ह्मणजे, महाभारत हा केवढा विलक्षण, नव्हे, लोकोत्तर ग्रंथ आहे व त्यांतील अनेकविध पात्रांच्या सांकेतिक वर्णनपर चरित्ररूपानें किती दीर्घ परिणामी असा अग्रथित इतिहास तो सुचवित आहे. व याहीपेक्षां अधिक लक्ष्यांत ठेवण्याजोगी गोष्ट म्हणजे, या पुराण ग्रंथाचा खरा रहस्यार्थ—गेलीं अनेक शतकें पर्यंत अवनत स्थितींत वाढत आलेल्या सांप्रतच्या हिंदुस्थानवासीयांस वाटतो त्यापासून तत्वतः किति तरी भिन्न, नव्हे—केवळ उलट असा आहे!

आणि या अद्वितीय इतिहासांतील प्राणभूत जें गीतारत्न त्याबद्दल त्याच गृहस्थांचे पुढील अहमहमिकेचे शब्द वाचून आपले हृदयांत आनंदासह ईर्ष्या जागी झाल्यावांचून रहात नाहीं. ब्रूकस् म्हणतात कीं गीता हें हिंदुधर्मरूपी विशिष्ट धर्माचें पुस्तक नव्हे तर ज्याला सनातनधर्म म्हणतात, व जीव—विश्व—परमेश्वरांचा एकभाव घडून आणणारा जो या भूतलावर एकटाच व्यावहारिक धर्म आहे, त्या विश्वव्यापी शाश्वत धर्माचें हें पुस्तक आहे व त्या दृष्टीनें हिंदुस्थानांतील आर्यांपेक्षां आह्मां युरोपीयनांचाच वारसा त्यावर अधिक आहे. या पुस्तकांत जें ज्ञान चालत आलें आहे, तें सांप्रतचा मनु आपली मानव संतति मागील मन्वंतरांतील—अटलँटीन द्वीपांतील संततीपासून—वेगळी काढण्याचेही पूर्वीपासून म्हणजे अति अतिपुराणकालीं या आर्यभूमींत उत्कर्ष पावलें होतें*.

यांचें गीतेचें वर्णन एवढ्यानेंच संपलें नाहीं. ते पुढें म्हणतात:—

For myself I had rather call the book a record of spiritual divine Life-experience, a document of univesral Redemptions, a Poem of Poems by a Poet of poets, a gracious gift of super-man to yearning, striving

---

* ( The Gita ) is not really a ' Hindu ' Book at all unless you take Hinduism to mean, not ' Hindusm ' in a sectarian sense, but universalism, the one practical Religion ( re-linking ) of Man-God-Nature into one. An Aryan Book some of you might call it but it makes it almost more European than India. Also the wisdom which ' it hands on flourished, even here in India, ages before the *Menu* ever hatched out this Aryan Race of ours from its hoary Atlantean predecessor. '

man. And far brighter is the glory to India that her great, Ancients should have been such men and should have written such Books, than if these things were private Shibboleths for any narrow sects or jaundiced hereditary clique to keep under their own bushel & gloat over.

ह्मणजे "माझा खुद्द अभिप्राय पुसाल तर हा ग्रंथ हा दैवी आध्यात्मिक अनुभवच आहे. हा निखिल विश्वाचें उद्धारसाधन आहे. मुक्तिहेतु आहे. हें काव्यांतील श्रेष्ठतम काव्य आहे व तें कवींच्याहि कवीनें केलें आहे. हा ग्रंथ म्हणजे सिद्धाची धडपडणाऱ्या मुमुक्षूंस सदय देणगी आहे. आणि या भरतभूमींतील पुराण पुरुषांनीं केवळ आपल्याच छापात राहणाऱ्या विशिष्ट पंथाच्या बगलबच्चांकरितां न लिहितां अखिल विश्वोद्धारक असे ग्रंथ लिहिले, यास्तव या भूमीचें स्तोत्र गावें तेवढें थोडें आहे."

हा गीता–भारतादिकांविषयीं ब्रूक्सचा पूज्यभावाचा भाग झाला आणि आतां या गीतेबद्दल त्यांचें उत्कट प्रेम किती आहे तें पाहिलें म्हणजे एक प्रकारें सादर कुतूहलच वाटतें. सृष्टिप्रेमी रसिक कविमणी वर्डस्वर्थ यांचीं एका धनगराची सद्गुणी व चारुंगी कन्या पाहून जी कांहीं स्थिति झाली व त्या भरांत—

"हे मधुरे, तूं मला आपला बंधु समज, बाप समज, भाऊ समज, शेजारी समज कांहींही समज; पण गडे, तूं कशी तरी माझी आहेस एवढी सुखकर कल्पना मला पचेल अशी सोय कर." अशा प्रकारचा गळांपडू णा त्या म्हाताऱ्यानें आरंभलें, तशांतली अवस्था, या सुंदर गीतारत्नाला पाहून या विदेशी बैराग्यांची झाली आहे. प्रियवल्लभ रोमिओसाठीं ज्युलिएट जशी स्वकुल-नाम-त्यागालाहि तयार झाली-तशांतला ह्या रसिकाचा प्रकार दिसतो. वेणीसंहारांतील एका पात्रानें जसें म्हटलें कीं, "एषा जातिरपि परित्यक्ता"–खरें आहे, ही मी आपली जात देखील सोडली, तोच मासला येथें झाला आहे. ब्रूकस् म्हणता:—

I may fairly consider myself entitled to speak as an Indian, since I have neither home nor interests outside this land of my adoption, and am devoting my whole life to it and to Humanity through it–according to my lights may not be a Hindu ( in the sectarian sense )–nor would I care to be. But I am certainly more of a Hindu than 'Hindus' who know and honour their scriptures less than I do, and occasionally displace Hinduism in their own lives. Hinduism ( as we, friend Reader, understand it ) is safe beyond the reach of these.

ह्मणजे "या गीतेबद्दल बोलण्याचा कोणाहि भरतवासीया इतकाच मलाही न्यायानें हक्क आहे. कारण, या माझ्या स्वयंवृत भूमिपलीकडे एक जन्म माझें वसतिगृह नाहीं किंवा हितसंब-

*" And I would have
" Some claim upon thee, if I could
" Though but of common neighbourhood
" What joy to hear thee and to see
" Thy elder-brother I would be
" Thy father anything to thee.
Highlanders Girl, Wordsworth.

धहि नाहीं. आणि माझे ज्ञानाप्रमाणें माझें सर्व आयुष्य या भूमीच्या आणि तद्द्वारा यावान्मनुष्यजातीच्या सेवेला मी अर्पण केलें आहे. मग माझे हिंदुत्वाला काय बाध आहे? आतां मला विशिष्टग्रंथी हिंदु समजूं नका. व मला तसलें हिंदुपण नकोही. पण खचितच या भूमींत जन्मास आले असूनाहे जे आपल्या पवित्र ग्रंथांचा मजपेक्षां कमी परिचय करितात व त्यांस कमी मान देतात, इतकेंच नव्हे तर प्रसंगीं आपल्या वर्तनानें त्या धर्मास कालिमा आणितात, **असल्या आडनांवी हिंदूंपेक्षां मी कितीतरी पटीनें खास हिंदु आहें.** आणि प्रिय वाचकहो, माझ्या समजुतीप्रमाणें जो खरा खरा हिंदुधर्म आहे त्याचें असल्या नालायकांचे उपेक्षेनें बालाग्रही महत्व ढळणारें नाहीं."

स्वामी विवेकानंद या गीतेबद्दल म्हणतात कीं:—

If you want to know the source of Emerson's inspiration, it is this book-the Gita. He went to see Carlyle, and Carlyle made him a present of the Gita, and this book is responsible for the concord-movement.

एकंदरींत 'इमर्सनचे' उपदेशावरून आजकाल अमेरिकेंत जी सर्वात्मतेची मोठी लाट उसळली आहे तिचा उगम कशांत तर या गीतेंत आहे. कारण इमर्सन हा प्रसिद्ध तत्त्ववेत्ता कार्लाईल याजकडे गेला असतां त्यानें त्यास गीता दिली. आणि त्यावरून इमर्सनला ही कल्पना आली.

याप्रकारें महाभारत व गीता यांचें महत्व पाश्चात्यहि केवढें मोठें मानितात हें दाखवून आतां प्रस्तुतचे खंडाचा विषय जो हरिवंशपुराण त्याजकडे वळूं.

भारताचे आदिपर्वांत (२·८२) पाहिलें असतां "**हरिवंशस्ततः पर्व पुराणं खिलसंज्ञितम्** ।" असा उल्लेख आहे. अर्थात् 'हरिवंश—पुराण' हें भारतांतीलच एक पर्व आहे. (व म्हणूनच याचें आम्हांला भाषांतर करावें लागलें) अर्थात्, हा एक भारताचाच भाग किंवा खंड आहे. परंतु, याचें स्वरूप थोडें निराळें आहे. एक तर याचा 'पुराण' अशी विशिष्ट संज्ञा आहे. व ती ठीक आहे. कारण पुराणाचीं जीं प्रसिद्ध पंचलक्षणें तीं यांत आढळतात. पण याशिवाय याला 'खिलपर्व' असें एक लांछन आहे आणि 'खिल' याचा अर्थ नीलकंठांनीं दिला आहे तो असाः—**यच्चशाखांतरस्थं शाखांतरे प्रयोजनवशात्पठ्यते यथा बव्हृचेषु श्रीसूक्तमेधा सूक्तादि तत्खिलमुच्यते । तत्राष्टादशपर्वात्मनीतिहासे हरिवंशाख्यं खिलं विष्णुपुराणं भविष्यपुराणरूपं तत्रतत्र सूचितस्य कृष्णमहात्म्यस्य मोक्षधर्मोपयोगिनो वैराग्यस्योपबृंहणार्थं पठितम् पुराणं खिलसंज्ञितम् ।**

म्हणजे वास्तविक अन्यत्र असणारा एखादा विषय प्रयोजनवशात् उसना घेऊन अन्यत्र पठन केला असतां त्याला 'खिलं' असें म्हणतात. आणि अष्टादशपर्वात्मक जो भारत इतिहास त्यांत ठिकठिकाणीं वर्णिलेलें जें कृष्णचरित्र त्याला बळकटी आणण्यासाठीं हें पर्व यास जोडलें असल्यामुळें याला 'खिल' असें म्हटलें आहे. अर्थात्, हें मूळ भारताकरितां रचलेलें नसावें. पण सर्व भारत म्हणजे कौरवपांडवांचें कलहरूप कारस्थान ज्या सूत्रधारावर उभें राहिलें त्या सूत्रधाराचें वर्णन केवळ पराश्रयानें यावें हें त्याचे वैभवास कमीपणा आणणारें होईल, असें कवीस वाटून त्यानें त्याचें वर्णन प्राधान्यानें ज्यांत दिलें आहे

असा एक वेगळाच भाग या भारतग्रंथांत सामील केला. व हें करणें न्यायाचेंहि आहे. नाहीं तर 'धन्याचें नांव गण्या आणि नोकराचें नांव रुद्राजीबोवा' अशांतला न्याय व्हायचा.

याप्रकारें हरिवंशरूपानें श्रीकृष्णाचें चरित्र भारतांत सामील झालें आहे. व तसें करणें न्याय्यहि आहे. तथापि, हें सामील केलें आहे इतकें मात्र ध्यानांत धरिलें पाहिजे. मूळचें त्यांतलें नव्हे. म्हणजे ज्या टांकानें ज्या बैठकीला बाकीचें भारत लिहिलें त्याच टांकानें व त्याच बैठकीला हा हरिवंशात्मक भाग लिहिला असावा असें वाटत नाहीं. निदान व्यासांनीं जो चोवीस हजार संक्षिप्त भारत ग्रंथ लिहिला त्यावेळीं तरी हा भारताचा भाग म्हणून लिहिला नसावा. शिवाय भारतांत जो पर्वसंग्रहांत जमा धरला आहे त्याची श्लोक-संख्या बारा हजार दिली असून आज जो उपलब्ध आहे त्याची संख्या सोळा हजार आहे व ती तशी असणें आजचे वस्तुस्थितीस अनुरूप आहे. कारण आजचें भारत म्हणजे एक लक्षात्मक आहे. त्यापैकीं पहिले अठरा पर्वांत चौऱ्यायशीं हजारांहून कांहींसे अधिक श्लोक आहेत. तेव्हां लाखाला कमी पडणारी सुमारें सोळा हजार संख्या, तितका सांप्रत ग्रंथ असणेंच भाग आहे. परंतु ही स्थिति मूळची खास नसावी. सोळा हजार संख्या तर नव्हती हें भारतांतील बारा हजाराचे उल्लेखावरून स्पष्टच आहे. पण भारतांत देखील ह्या हरिवंशाचा समावेश मागून केला असावा. व्यासांचे वेळचा असता तर मग महाभारत लिहूनहि समाधान होईना, तेव्हां नारदोपदेशावरून त्यांनीं भागवत ग्रंथरूपानें श्रीकृष्णचरित्र गाइलें ही आख्यायिका खोटी ठरते. कारण हरिवंश हा जर भारताचा भाग त्यांनीं लिहिलेलाच होता तर यांत कृष्णचरित्र पुष्कळच आहे. मग पुनरपि भागवताचें प्रयोजन काय होतें ? आतां भागवतांत तेंच चरित्र भक्तिप्राधान्यानें व अधिक विस्तारानें सांगितलें आहे, ही गोष्ट वेगळी. तथापि, जें थोडें हरिवंशांत त्यांनीं गाइलें होतें तेवढ्यानें त्यांची तळमळ मोडणें जरूर होतें.

दुसरी गोष्टः—त्याला 'खिल' ही संज्ञा दिली त्याचे उदाहरणांत नीलकंठानेंच म्हटलें आहे कीं, "**तथाऽध्वर्युवेदविहितोपि सोमयागो वेदांतरविहिताभ्यां स्तोत्र-शस्त्राभ्यां विना न पूर्यते एवं भारतपारायण-मपि हरिवंशं विना न पूर्यते इति ज्ञापनार्थं पर्वसंख्यायां श्लोकसंख्यायां चास्यांतर्भाव उक्तः। अन्यथा तत्र संख्यां-तरमेवावक्ष्यदिति।**

भावार्थः—वास्तविक सोमयाग हा अध्वर्यु वेदाचा विषय आहे, तथापि, त्याची पूर्तता अन्य वेदांत असलेल्या स्तोत्र व शस्त्रांच्या ( हे मंत्र आहेत ) संग्रहावांचून जशी होत नाहीं, त्याप्रमाणें भारताचे पारायणाचीहि पूर्तता हरिवंशपठनावांचून होत नाहीं. हें कळविण्यासाठींच या पर्वाचा भारताचेच पर्वांत व त्यांतील श्लोकसंख्येंत देखील अंतर्भाव करून टाकिला आहे. तसें नसतें तर या हरिवंशपर्वाला निराळी संख्या दिली असती. यावरून पहातां जरी भारतपूर्तीला हरिकथन अवश्य असलें तरी ज्याप्रमाणें स्तोत्र शस्त्रें हीं सोमयागाला अवश्य खरीं, तथापि, तीं घरचीं नसून उसनीं आणलीं आहेत, त्याप्रमाणें हरिवंश हा भाग उसना आणिला आहे. आतां त्याची योग्यता पाहून त्याला केवळ पाहुण्याप्रमाणें न वागवितां अगदीं घरांतल्याप्रमाणें वागवितात, ही गोष्ट वेगळी. पण तसें असलें तरी पाहु-

ण्याचें 'उपनांव' काय याचा शोध केला कीं, खरी गोष्ट उघडकीस येते. तसाच प्रकार येथें आहे.

आमचे या म्हणण्यास या उभय ग्रंथाचें तुलनात्मक अवलोकन केल्यानें बराच पुरावा मिळेल. तो असा:—व्यासांनीं जर सदरचा कृष्णचरित्रात्मक भाग त्याच बैठकीला व मूळच्याच संकल्पानें लिहिला असता तर भारतांत म्हणजे त्याच ग्रंथाचे पूर्वभागांत व हरिवंशांत म्हणजे भारताचेच उत्तर भागांत, असें आपण म्हणूं—पुनरुक्ति व परस्परविरोध न येते. कारण अष्टादशपुराणें ज्याच्या डोक्यांत मावलीं त्याची स्मृति कांहीं लेचीपिची नव्हे. व जो प्रत्यक्षदर्शी म्हणवितो तो एकदां एक सांगतो व एकदां एक सांगतो आणि तेंहि पुनः त्याच बैठकींत व त्याच ग्रंथांत, हें म्हणणें गोड दिसत नाहीं. आणि वास्तविक प्रकार तर तसा आहे. उदाहरण:—'धुंधुचरित्र' हें भारतांतील वनपर्वांत २०१ व २०४ या अध्यायांत आलें आहे. व तेथें असा शेरा आहे कीं, हे राजा, हें धुंधुमारोपाख्यान मी तुला पूर्णपणें सांगितलें आहे. असें असतां तीच गोष्ट, मात्र संक्षेपानें, हरिवंश अध्याय ११ यांत सांगितली आहे. पुनरुक्तीचेंहि असो; पुराणांत ती सर्वत्रच आहे. आणि अष्टादश पुराणांची परस्पर तुलना केली. तर एका पुराणांतील किती तरी गोष्टी किती तरी दुसऱ्या पुराणांत आहेतच. उदाहरणार्थ:—रामायणकथा, कृष्णचरित्रें, मन्वंतरवर्णनें, आदिसर्गवर्णनें, सूर्यचंद्रवंशाचीं वर्णनें, वास्तविक एकच कर्त्याचे हे ग्रंथ असतील तर या पुनरुक्ति कां पाहिजे होत्या. पण त्या वादांत आम्ही पडत नाहीं. कल्पकल्पांतर कल्पनेनें त्याचें समर्थन केलें जातें हें आम्हांस माहीत आहे. असो, पण एकाच ग्रंथांतील पूर्वोत्तर भागांत विरोध आणि तोहि वर्णनांतील रंग भरण्यांत नसून मुख्य मुद्यांच्या गोष्टींत असणें हें एक कर्तृत्वाचें खचित विघातक आहे. व याकामीं भारत व हरिवंश यांत भक्कम पुरावा आहे. मात्र तो सर्व मांडण्यास अवकाश नाहीं. मासला देतों. भारतांत:—नहुषाचे पांच पुत्रांचीं नांवें:—

१ यति २ ययाति ३ संयाति ४ आयाति ५ अयति व ६ ध्रुव अशीं आहेत. तींच हरिवंशांत पाहतां १ यति २ ययाति ३ संयाति ४ आयाति ५ याति व ६ सुयाति अशीं आहेत. अर्थात् अखेरचे दोहोंत मेळ नाहीं. बरें, हेही असो. एकाला दोन भिन्न नांवें असतील. पण पुढील कोडें तर याहून बिकट आहे. भारतांत पुरुवंशवर्णन आदिवंशाचे अध्याय ९४ व ९५ यांत आहे. पैकीं ९४ चा ९५ शीं विरोध आहेच, पण तो संकोच विस्तार या सबबीवर सोडून देऊन ९५ त जी विस्तृत यादी दिली आहे, तीच प्रमाण धरून हरिवंशांतील यादी तिशीं मिळवून पाहूं.

---

१ यावर कोणी म्हणतील कीं, भवभूतीचे, महावीरचरित, मालतीमाधव व उत्तररामचरित्र यांत कांहीं श्लोक व वाक्यें पुनरुक्त आहेत. पण वाक्यांची पुनरुक्ति निराळी व प्रसंगांची व कथांची पुनरुक्ति निराळी. विशेषतः तोच श्रोता असतांना.

पूरु

| भारत | हरिवंश |
|---|---|
| १ जनमेजय | १ जनमेजय |
| २ प्रचिन्वान् | २ प्रचिन्वान् |
| ३ संयाति | ३ प्रवीर |
| ४ अहंयाति | ४ मनस्यु |
| ५ सार्वभौम | ५ अभयद |
| ६ जयत्सेन | ६ सुधन्वा |
| ७ अवाचीन | ७ बहुगव |
| ८ अरिह | ८ शम्याति |
| ९ महाभौम | ९ रहस्याति |
| १० अयुतनायी | १० रौद्राश्व |
| ११ अक्रोधन | ११ ऋचेयुप्रभृति १० |
| १२ देवातिथि | १२ मतिनार |
| १३ अरिह | १३ तंसु |
| १४ ऋक्ष | १४ सुरोध |
| १५ मतिनार | १५ दुष्यंत |
| १६ तंसु | |
| १७ इलि | |
| १८ दुष्यंत | |

येथेंहि संकोच विस्ताराची सबब आणली तरी दिलेले नांवांत तरी मेळ असावा तोहि

नाहीं. कोणी म्हणतात पुत्र म्हणजे वंशज, एवढ्यावर हे जुळवावे. आमची तयारी आहे. तथापि, हे सर्वत्र जुळत नाहीं. याचप्रमाणें पुराण पुराणांतरांतील वंशावळींतहि मेळ बसत नाहीं. उदाहरणार्थः—सूर्यवंशवर्णनांत वैवस्वतमनू यावरून पहातां श्रीरामचंद्राची पिढी खुद्द रामायणांत ३२ वी, ब्रह्मपुराणांत ५८ वी, विष्णुपुराणांत ६४ वी, हरिवंशांत ६० वी, अग्निपुराणांत ५१ वी, शिवपुराणांत ५० वी, श्रीमद्भागवतांत ६३ वी, बृहद्धर्मपुराणांत ३६ वी; याचप्रमाणें चंद्रवंशवर्णनांत युधिष्ठिर राजाचा क्रमांक चंद्रपुत्र बुधापासून भारतांत २८ वा, हरिवंशांत ३४, विष्णुपुराणात ४७, श्रीमद्भागवत ४६, अग्निपुराणांत ३६, ब्रह्मपुराणांत ५९, याप्रमाणें येतो. या प्रकारास काय म्हणावें ? एकाच गृहस्थानें इतकीं भिन्न विधानें करण्याचें कारण काय ? हें समजणें कठीण आहे.

आम्हांस तर असें वाटतें कीं, आजचीं अठरा पुराणें व्यासांनीं लिहिलेलीं नव्हत. मात्र त्या पुराणांना मूळभूत जो मजकूर तो व्यासांनीं आपले शिष्यांस सांगितला असावा. फार तर तो लिहून कांहीं ग्रंथ तयार केला असावा व पुढें त्यांच्या शिष्यांनीं प्रशिष्यांनीं भिन्न पुराणें बांधिलीं असावीं. तींहि आज उपलब्ध आहेत, त्यापेक्षां कांहीं तरी अल्परूपांत असावीं. कारण, पुढें शैव वैष्णवादि सांप्रदायांचे अभिमान बळावल्यावरहि पुराणांतून कांहीं मजकूर सामील केला असावा, असें म्हणणें प्राप्त आहे. तेव्हां व्यासांनीं या पुराणांना आश्रयभूत मूळ मजकूर जींत आहे असा एक ग्रंथ " पुराणसंहिता ' म्हणजे ज्यांत जुनीं सर्व पुराणें एकत्र गाइलीं आहेत असा एक पेंड तयार करून दिला व त्यांचे प्रबुद्ध शिष्यांनीं कदाचित् गुरूंची मनीषा जाणून हे अष्टादश प्रकार केले असें वाटतें व या तर्काला विष्णुपुराणांतील पुढील श्लोकांवरून बरीच बळकटी येते. विष्णुपुराणांत म्हटलें आहेः—

**" आख्यानैश्चाप्युपाख्यानैर्गाथाभिः कल्पशुद्धिभिः । पुराणसंहितांचक्रे पुराणार्थविशारदः । प्रख्यातो व्यासशिष्योऽभूत् सूतो वै रोमहर्षणः । पुराणसंहितां तस्मै ददौ व्यासो महामुनिः । सुमतिश्चाग्निवेश्यश्च मित्रयुः शांशपायनः अकृतव्रणोऽथ सावर्णिः षट्शिष्यास्तस्यचाभवन् । काश्यपः संहिताकर्ता सावर्णिः शांशपायनः । रोमहर्षणिकाश्चान्यास्तिसृणां मूलसंहिताः । चतुष्टयेनाप्येतेन संचितानामिदं मुने । आद्यं सर्वपुराणानां पुराणं ब्राह्ममुच्यते । अष्टादश पुराणानि पुराणज्ञाः प्रचक्षते ॥ "**

यावरून पहातां श्रीव्यासांनीं असले प्रख्यात रोमहर्षण शिष्याला ही मूळ पुराणसंहिता सांगितली व त्याजपासून कश्यप, सावर्णि, शांशपायन यांनीं एकएक पृथक् संहिता केली. बाकीच्या रोमहर्षणानें स्वतः विभागून केल्या. व या चौघांच्याहि प्रकृतीचा समुच्चय होऊन हें ब्राह्म पुराण निर्माण झालें. हें सर्व पुराणांचें आद्य आहे. आणि पुराणज्ञ एकूण पुराणें अठरा असें ह्मणतात.

पुराणसमुच्चयनामक ग्रंथांतील एका उताऱ्यांत हा प्रकार थोडासा भेदानें लिहिला आहे. तो असा—

**त्रय्यारुणिकश्यपसावर्ण्याकृतव्रणवैशंपायनहारीतेभ्यः षड्भ्यः षट् पुराणानि । रोमहर्षणाच्चत्वारि । व्यासात्सप्त । एवं सप्तदश पुराणानि व्यासाश्रमेऽ**

धीत्य भागवतं शुको वदिष्यतीति व्यासाज्ञप्त उग्रश्रवा अपि शुकमुखात् शुश्राव ।

यांत—त्रय्यारुणि, कश्यप, सावर्णि, अकृतव्रण, वैशंपायन व हारीत या सहां पासून सहा, रोमहर्षणापासून चार व स्वतः व्यासांपासून सात याप्रमाणें सतरा पुराणें ऐकून झाल्यावर आतां अठरावें पुराण, श्रीमद्भागवत, हें शुकापासून ऐक, अशी व्यासाज्ञा झाल्यामुळें ते अठरावें, रोमहर्षण पुत्र जो उग्रश्रवा त्यानें शुकापासून ऐकलें, असें ह्मटलें आहे. याशिवाय पद्मपुराणांत या रोमहर्षणाची एक कबुली आहे. ती अशीः

वेदव्यासान्मया पुत्र पुराणान्यखिलानिच ।
तवाख्यातानिप्राप्तानि मुनिभ्यो वरविस्तरात् ।

यांत 'वरविस्तरात्' हे शब्द लक्ष्यांत ठेवण्याजोगे आहेत. त्यांवरून व्यासांचें मूळ त्यांचे शिष्यांनीं फैलावून सांगितलें असें स्पष्ट आहे. व त्यानंतरहि वेळोवेळीं विद्वानांनीं त्यांवर फिरून हात दिला आहे, व हेंच मत समंजस आहे. एरव्ही भिन्न भिन्न पुराणांत इतकी विसंगति व पुनरुक्ति असणें शक्य नाहीं. आतां याचें उत्तर एके ठिकाणीं असें लिहिलें आहे कीं,

क्वचित् क्वचित् पुराणेषु विरोधो यदि लभ्यते ।
कल्पभेदादिभिस्तत्र व्यवस्था सद्भिरिष्यते ।

कोठें कोठें पुराणांत जेथें विरोध दिसेल तेथें कल्पभेद समजून त्याचा परिहार समजावा. व या मताला पुष्टि आणण्यास कित्येक पुराणांत भिन्न भिन्न कल्पांचा उल्लेख दिसतो.

कूर्मपुराण हें 'लक्ष्मीकल्पांतील' चरित्रास धरून आहे. मत्स्यपुराण हें सत्यकल्पाला धरून आहे. गरुडपराण, तार्क्ष्यकल्पास; ब्रह्मांडपुराण, श्वेतकल्पास; लिंगपुराण, ईशानकल्पास; वराहपुराण, मानवकल्पास; स्कंदपुराण, तत्पुरुषकल्पास, वामनपुराण, कूर्मकल्पास; वायुपुराण, श्वेतकल्पास; भागवत, सारस्वतकल्पास; नारदपुराण, बृहत्कल्पास;व अग्निपुराण, ईशानकल्पासः—धरून आहे. आणि व्यासांना ही जी माहिती मिळाली तिचे गर्भीत हा प्रकार असावा असेंहि ह्मणणें भाग येतें. पण "धाता यथा पूर्वमकल्पयत्" असा जर निर्णय आहे, तर कल्पभेदानें तरी इतका फरक कां व्हावा हें सांगणें कठीण आहे. त्यापेक्षां शिष्यप्रशिष्यांनीं आपले स्मृतीप्रमाणें हीं भिन्न पुराणें लिहिल्यामुळें आज दिसून येणारीं विरोध व पुनरक्ति उद्भवलीं असावीं, हें ह्मणणें आह्मांस बरें वाटतें.

पुराणकर्त्याचा याप्रकारें जरी निर्णय मानिला तरी पुराणांचे पूर्वापर काळाबद्दल निर्णय करणें फार कठीण पडत आहे. कारण अठरापुराणांपैकीं बारा पुराणांत एकूण अष्टादश पुराणांचीं नावें, व सहांत तर त्यांची ग्रंथसंख्याहि दिली आहे. तेव्हां अठरापैकीं बारांनीं एकमेकांच्या सठीच्या भुगऱ्या खालेल्या दिसतात. तेव्हां यांत आतां वडील धाकुटपण तरी कसें ठरवावें?—फार कठीण आहे. प्रसिद्ध विद्वान् कै. का. त्रिं. तेलंग यांनीं "पूर्वेचे पवित्र ग्रंथ' या मालेंत जे भगवद्गीता, अनुगीता व सनत्सुजातीय यांचें भाषांतर करून दिलें आहे, त्यांत तिन्ही ग्रंथांपूर्वीं कालनिर्णयार्थ पुष्कळ पुष्कळ झटपट करून अखेर असें ह्मटलें आहे कीं, एकमतानें 'सिद्ध' ह्मणतां येईल अशी एकहि गोष्ट ठरवितां येत नाहीं. आणि हेंच कपाळ या कालनिर्णयाचे बहुतेक वादांचें आहे. भारतकालाबद्दल तर तर्कवितर्कच सारे;

जुनें मत द्वापारांतीं व कलीचे आरंभीं ह्मणजे पांच हजार वर्षांपूर्वीं, असें आहे. पण तें अलीकडे पुष्कळांस मान्य नाहीं. असा घोटाळा आहे. ह्मणून आह्मी या वादांत येथें तरी पडत नाहीं. पुनरुक्तीची कल्पना यावी ह्मणून अठराहि पुराणांतील मुख्य मुख्य विषय खालीं दिले आहेत.

१ ब्रह्मपुराण–हें सूत व शौनक यांचे संवादरूपानें सांगितलें आहे. याचे पूर्व व उत्तर असे दोन विभाग आहेत. पैकीं पूर्वार्धांत सृष्ट्युत्पत्ति, देवासुर जन्मकथन व चंद्र-सूर्य-वंशवर्णन आहे. सूर्यवंशवर्णन प्रसंगीं श्रीरामचंद्राचें चरित्र दिलें आहे. तें बरेंच आहे. त्याचप्रमाणें चंद्रवंशवर्णनप्रसंगीं श्रीकृष्णाचें चरित्र वर्णिलें आहे. प्रियव्रत, उत्तानपाद, वेन, पृथु, पुरूरवा प्रभृति राजन्य वर्गाचाहि परिचय येथें होतो. याशिवाय दक्षप्रजापतीचा जन्मवृत्तांत, पार्वतीचा जन्म व विवाह, हेही यांत आहेत. उत्तरार्धांत, पुरुषोत्तम तीर्थाचें सविस्तर वर्णन, श्रीकृष्णाचे गुणानुवाद, व धार्मिक व दार्शनिक तत्वांची आलोचना हे विषय आहेत. पुरुषोत्तम तीर्थवर्णनाचे ओघांत ओडिया जगन्नाथ या देवाचें पुरातन मंदिराचें वर्णन व त्या मंदिराचें सूर्य, शिव व जगन्नाथ यांचे उद्देशानें उत्सर्जनहि दिलें आहे. आतां या उत्तरखंडांत जें श्रीकृष्ण चरित्र दिलें आहे तें विष्णुपुराणांतर्गत श्रीकृष्ण-चरित्राशीं फारच मिळतें आहे. या पुराणाच्या अखेरचे अंशांत योगाची माहिती दिली असून युगधर्म, तीर्थप्रसंग, गंगेची उत्पत्ति, वर्णाश्रमधर्म, मृत्यु व पितृश्राद्धासंबंधें विवेचनहि दिलें आहे.

२ पद्मपुराण—–हें स्कंदपुराणाचे खालोखाल विस्तृत आहे. याचे पांच खंड आहेत ते १ सृष्टिखंड, २ भूमिखंड, ३ स्वर्गखंड, ४ पातालखंड, ५ उत्तरखंड. सृष्टिखंडांत, भीष्माचे प्रश्नावर पुलस्त्यऋषींनीं केलेली धर्मतत्वाची व्याख्या आहे. पुष्करतीर्थमाहात्म्य, ब्रह्मयज्ञ, वेदपाठविधि, दानतत्व, विविधव्रतकथा, पार्वतीचा विवाह, गोमाहात्म्य, ताडकेचें उपाख्यान, कालकेय-प्रभृति दैत्यवध, ग्रहगणांची पूजापद्धति, हे मुख्यतः विषय आहेत २ भूमिखंडांत–पृथ्वीवर्णन, पृथु, नहुष, ययाति प्रभृति राजांचीं उपाख्यानें; शिवशर्मा, सुव्रत, च्यवन इत्यादिकांचे वृत्तांत, पितृमातृ--पूजा, धर्माची समालोचना, व हुण्डप्रभृति दैत्यांचा वध. एवंच या खंडांत इतिहास व भूगोल या दोहोंचा समावेश असून हा खण्ड सूत—शौनकाचे संवादरूपानें आहे. या खंडाचे एकशेंसत्तावीस अध्याय आहेत. या पुढील ( ३ ) स्वर्गखण्ड. याचे ४९ अध्याय असून शौनकाचे प्रश्नावर रोमहर्षणसूतानें स्वर्गाचें वर्णन दिलें आहे. यांत प्रथम सृष्टितत्व देऊन पुढें तीर्थमाहात्म्य, धर्मप्रभाव, वर्णाश्रमधर्म, योगधर्म व व्रतवैकल्यें इत्यादि वर्णिलीं आहेत. या खंडाचे तिसरे अध्यायांत भारतवर्षाची लांबी रुंदी, त्यांतील नद—नद्या, पर्वत व रहिवासी लोक यांचें वर्णन आहे. चतुर्थाध्यायांत समग्र भूमण्डलाचें संक्षिप्त वर्णन आहे. यांतच दिलीप, पृथु, युधिष्ठिरप्रभृति ( २ ) राजांचें वर्णन आहे. शिवाय, निःसंतानत्व कां येतें, त्याचा परिहार कसा करावा, हें सांगण्यासाठीं श्रीधर राजाचें उपाख्यान, लक्ष्मीव्रत प्रसंगानें भद्रश्रवा राजाचें उपाख्यान, दीननाथ राजाचा नरमेध, श्रीकृष्णाचे जन्माष्टमीप्रसंगानें चित्रसेन राजाचें उपाख्यान इ. इ. ( ४ ) पातालखंडाचे ७२ अध्याय आहेत. यांत सूतानें

१ हा संक्षेप 'दुर्गादास लाहिडी' यांचे बंगाली ग्रंथावरून घेतला आहे. याहून विस्तार इष्ट असेल त्यांनीं ज्वालाप्रसादकृत 'अष्टादशपुराणदर्पण' किंवा रा. काळे यांचें 'पुराणनिरीक्षण' पहावें.

**ऋषिगणांस रामचंद्राचें वर्णन** सांगितलें आहे. **रामाचा राज्याभिषेक** व **अश्वमेध** येथूनच या खंडाचा प्रारंभ. यांतच अनेक तीर्थांचें व **श्रीकृष्णाचें वर्णन आहे.** श्रीरामचंद्र भरद्वाजाश्रमांत आतिथ्य घेऊन पुढें अयोध्येस जातात व तेथें कौसल्येचें मासिकश्राद्ध करितात. एथें हा खंड संपतो. ह्यांतील वर्णन शेषनामक नागानें केलें आहे. ( ५ ) उत्तरखंड—यांत शिवपार्वतीसंवादरूपानें अनेक धर्मतत्त्वांचें विवरण. सगराचें उपाख्यान, देवशर्म्याचें उपाख्यान, **जालंधराचें**[1]आख्यान. नानातीर्थमाहात्म्य, **श्रीभागवतमाहात्म्य, गीतामाहाम्य, भक्तिमाहात्म्य,** विष्णुसहस्रनाम, श्रीरामशतनाम, नृसिंह—मत्स्यादि अवतारवर्णन इ. इ. विषय आहेत.

३ **विष्णुपुराणः**—अठराही महापुराणांत हें पुराण सर्वशिष्टसंमत व विरोधशून्य आहे. याचे सहा अंश ( भाग ) आहेत. पराशर व मैत्रेय यांच्या प्रश्नोत्तररूपानें यांत धर्मतत्त्वांचा ऊहापोह आहे. प्रथमांशांत—सृष्टिवर्णन, ध्रुवाख्यान, वेन व पृथु यांचें आख्यान, प्रचेता व कंडु ( महर्षि ) यांचें चरित्र, प्रल्हाद चरित्र, व ईश्वरविभूतिराजाचें वर्णन आहे. दुसऱ्या अंशांत, प्रियव्रत राजाचे पुत्र व भारतवंशीय राजांचें वर्णन आहे. जम्बुद्वीप, भारतवर्ष, सप्तपाताल, सूर्यादि ग्रह, सप्तलोकसंस्थान, जडभरताचें उपाख्यान, ऋभुनिदाघसंवाद, हे विषय आहेत. तिसऱ्यांत—मन्वंतरवर्णन, वेदव्यासमाहात्म्य, चार्वाक बौद्धधर्माची उत्पत्ति, शतधन्वाचरित्र, इ० आहे. चवथ्यांत—वंशविस्तारकथन, ब्रह्मा व दक्षप्रजापतीची उत्पत्ति, पुरूरवा व इक्ष्वाकूचा जन्म, ककुत्स्थवंश, कुशध्वजवंश, चंद्रवंश, पुरूरवा व जन्हु धन्वंतरी, क्षत्रवृद्ध नहुष, यदु, तुर्वसु, द्रुह्य, व यांचे वंश, अनूचा वंश व जनमेजयाचा वंश सांगून भविष्यमाण राजांचे वर्णनात परीक्षिती, इक्ष्वाकू, बृहद्रथ व नंद यांचे भावी वंशांचें वर्णन आहे. पांचव्यांत—वसुदेव देवकी विवाह, व **श्रीकृष्णाचा जन्मापासून देहत्यागापर्यंत वृत्तांत,** कलियुगारंभीं अर्जुनास व्यासांचा उपदेश व परिक्षितीला राज्याभिषेक. हे विषय आहेत. सहाव्या अंशांत—कलिस्वरूप. कलिधर्म, प्रलयवर्णन त्रिविध दुःखनाशाचे उपाय, विराट्स्वरूप, केशिध्वजकृत बाह्य ज्ञानोपदेश व विष्णुपुराणाची फलश्रुति इ० विषय आहेत.

४ **शिवपुराणः**—हा महापुराणग्रंथही मोठा प्रचंड आहे. याचे लक्ष श्लोक व बारा खंड होते. असा एके ठिकाणीं उल्लेख आढळतो. महर्षि कृष्णद्वैपायनानें प्रथम सर्व पुराणें मिळून शतकोटी ग्रंथ रचला होता. परंतु पुढें मनुष्ये अल्पबुद्धि व अल्पायु पाहून त्यांतील चार लक्ष ग्रंथ मात्र त्यानें अवशेष राखिला. आणि छाटाछाटीमुळें मूळच्या लक्षापैकीं आजचे शिवपुराणांत केवळ २४००० च ग्रंथ आहेत; व त्याचे १ ज्ञानसंहिता, २ विद्येश्वरसंहिता ३ कैलाससंहिता ४ सनत्कुमारसंहिता ५ वायवीयसंहिता ( पूर्वोत्तर भाग ) व ६ धर्मसंहिता—असे ६ च खंड आहेत. या पुराणाचा प्रधान उद्देश शिवाचें तत्व व शिवाचें माहात्म्य सांगणें हाच जरी आहे, तरी प्रसंगानें अनेक गोष्टींचा समावेश यांत आहे. नैमिषारण्यांतील ऋषींना सूतानेंच ह्या पुराणांतील विषय सांगितले आहेत. त्यानें ब्रह्मांडाची

---

१ अष्टादश पुराणानंतर श्रीमद्भागवत लिहिलें या आख्यायिकेस विरोध येऊं पहातो. तसेंच भारतांत सर्वांहि अठरा पराणें लघुरूपानें घुसलीं. अर्थात्–भारत सर्वांनंतरचें, मग तद्गत भगवद्गीतेचें माहात्म्य पद्मपुराणांत कसें यावें ?

उत्पत्ति, ऋषि वगैरेंची सृष्टि सांगून पार्वतीची तपस्या, शिवाचा विवाह, कार्तिकेयाचा जन्म, गजाननाचें चरित्र, काशीमाहात्म्य, शिवपूजाविधि, शिवरात्रीपूजा, लिंगपूजा, इ. इ. सांगून, पुढें विविध पातकांचें फल, अन्नदान, जलदान इत्यादिकांचें फल, व प्रजापतिकृत सृष्टिरचनेचा प्रकार सांगितला आहे. पुढें पृथुचरित्र, अंग-वंगेशचरित्र, सूर्यवंश, सत्यव्रत व सगर यांचें उपाख्यान आहे. शिवसहस्रनाम व अष्टोत्तरनाम आहे. यांतील ज्ञानसंहितेचे ३३।३४ अध्यायांत गणेशाचें शिरच्छेदन व त्याशीं गजशीर्षाची योजना हे विषय आहेत. हे ब्रह्मवैवर्तातील गणेशखंडाचे १८–२० अध्यायांशीं मिळत नाहींत.

५ **लिंगपुराण**—यांत शिवमाहात्म्य, लिंगपूजा, हे मुख्य विषय असून याचे पूर्व व उत्तर असे दोन भाग आहेत. पहिल्यांत–सृष्टिविवरण, लिंगाची उत्पत्ति, दक्षयज्ञ, मदनदाह, शिवविवाह, वराहचरित्र, नृसिंहचरित्र, सूर्य व सोम-वंशवर्णन, इ. आहे. उत्तरभागांत, विष्णु-माहात्म्य, शिवमाहात्म्य, स्नानदानमाहात्म्य, गायत्रीमाहात्म्य इ० विषय. यांतच अष्टविंशति अवतारकथा **श्रीकृष्णजन्म** व आर्यावर्तांतील **राजवंशांचें वर्णन आहे.** या पुराणाचे मतें प्रलयानंतर वन्हिमय लिंग उत्पन्न होऊन त्यापासून वेदादिग्रंथ निर्माण होतात व ब्रह्माविष्णु यांना ज्योतिर्लिंगापासूनच तेज मिळतें असें आहे. या देशांत चालत असलेली शिवपूजा, लिंग-पूजा ही या पुराणांत सांगितलेल्या विधिप्रमाणेंच आहे असें पुष्कळांचें म्हणणें आहे.

६ **गरुडपुराण**—याचे पूर्वोत्तर असे दोन भाग आहेत. सृष्टिकथा, प्रजापतीची उत्पत्ति, सूर्य, विष्णु-लक्ष्मी, शिव-पादुका, गोपाल-हयग्रीव, दुर्गाप्रभृतींची पूजा-पद्धति; दीक्षाविधि, प्रायश्चित्त, तर्पण, सन्ध्या, श्राद्ध-स्नान-विधि, नानाव्रतें; रत्नोत्पत्ति, रत्न-परीक्षा; गृहधर्म, यतिधर्म, गयाकृत्य, सूर्यवंश, चंद्रवंश, जनमेजयवंश, **रामायण-हरिवंश-भारतकथन;** आयुर्वेदकथन सर्वरोगनिदान, विष्णु-नारायणध्यान, नृसिंहस्तव, व्याकरण-नियम, छन्द-शास्त्र, एवढेंच नव्हे तर–स्त्री वशीकरण, मशकानिवारण असल्या देखील गोष्टी यांत आहेत. पुढें, नरकवर्णन, प्रेतवर्णन, सपिण्डीकरण इ० या पुराणाचे मतें अवतार एकवीस आहेत. याची ग्रंथसंख्या भागवताप्रमाणें एकुणीस हजार आहे. परंतु याच पुराणाचे प्रथमाध्यायीं ही संख्या आठहजार आठशें दिली आहे. या पुराणांत अनेक तांत्रिकीमंत्र, आयुर्वेदिक ओषधिप्रकरण आहे. रत्नप्रकरणाचे संबंधानें हिमालय, मातंगपर्वत, सुराष्ट्र, पुण्ड्र, कलिंग, कोशल, वेण्यातट व सौवीर हीं आठ हिऱ्याचे खाणींचीं स्थानें दिलीं आहेत. हिमालयांतील हिरे किंचित् लालसर, सौवीरांतील नीलकमलसदृश, सुराष्ट्रांतील ताम्रवर्ण, कलिंगांतील सोनेरी झांकीचे, मतंगदेशांतील पिवळट. हिऱ्याची परिक्षा क्षारांचे साह्यानें करावी. पृथ्वींतील सर्व रत्नें व लोहादि धातु हिऱ्यानें ओरखाडले जातात, परंतु हिरा दुसऱ्या कशानेंहि कापला जात नाही. इतर रत्नांचें मूल्य वजनदारीवर, परंतु हिऱ्याचें मोल त्याचे हलकेपणा-वर असें सांगितलें आहे. याच प्रकर्णीं मोत्यांचें वर्णन, त्यांची उत्पत्ति, मूल्य इत्यादि गोष्टि, सूर्यादिग्रहांचें प्रमाण, ज्योतिषसार, लग्नमान, प्रश्नगणना, व अनेक प्रकारची नीति, चाणक्य-नीति व विष्णुशर्म्याचे हितोपदेशांतील बरेच श्लोक या भागांतून उतरलेले आढळतात. राज-नीतीहि फार उंची प्रकारची दिली आहे, असे यांत अनेक उपयुक्त विषय आहेत.

७ **नारदपुराण**—याचे चार पाद आहेत. पहिल्यांत मोक्षधर्म, मोक्षोपाय, दीक्षाग्रहण,

विष्णु-शिव-शक्ति यांची वर्णनें, व अनेक स्तोत्रें मंत्र दिले आहेत. दुसऱ्यांत—गाणपत्य, सौर, वैष्णव शैवप्रभृति संप्रदायाचे धर्म. तिसऱ्यांत—नारदसनत्कुमारांचे संवादमिषानें पुराणकथावर्णन, दानधर्ममीमांसा व व्रतवर्णनें आहेत. चवथ्यांत—काशी, पुरुषोत्तम, प्रयाग, हरिद्वार, कामाक्षी इ० अनेक पवित्र स्थलांचें वर्णन व वसिष्ठ, मांधाता, गौतम व मोहिनी यांचें वर्णन आहे, तथापि विष्णूचें गुणकीर्तन हा या पुराणाचा मुख्य कटाक्ष असल्यामुळें अनेक विषयांचे कथानकांचे साह्यानें श्रीहरीची उपासना कशी सिद्ध करावी हें यांत सांगितलें आहे. सांप्रत नारदीय व बृहन्नारदीय असे दोन ग्रंथ आढळतात. तथापि दोहोंचें लक्ष्य एकच आहे.

८ **श्रीमद्भागवत**—याचे द्वादश स्कंध आहेत. अनेक पुराणें व महाभारत गाऊनहि जेव्हां व्यासांस शांति येईना, तेव्हां श्रीहरीचे गुणकीर्तनावांचून शांति प्राप्त होणें नाहीं, असें अनुभवी नारदांनीं व्यासांस सांगितल्यावरून भक्तिरसपरिप्लुत हें काव्यरूप पुराण व्यासांनीं निर्माण केलें अशी अख्यायिका आहे. ( हें पुराण प्रचारांत असल्यानें याचा सारांश देऊन जागा आडवीत नाहीं ).

९ **अग्निपुराण**—हें पुराण सूतशौनकसंवादात्मक असून यांतील विषय प्रथम अग्नीनें वसिष्ठास सांगितले व व्यासांस वसिष्ठांनीं सांगितले अशी अख्यायिका आहे. इतर पुराणांप्रमाणेंच यांतहि मत्स्य, कूर्म, वराहादि अवतारवर्णनें; **रामायण, महाभारत, हरिवंशप्रभृति** स्थूल आख्यायिका; नानाविध पुजा व व्रतपद्धति, तीर्थमाहात्म्य व मंत्रमाहात्म्य दिले असून विशिष्ट विषय म्हणून युद्धविद्या, धनुर्विद्या, साहित्यविद्या, पशुचिकित्सा, व्याकरण, छंदःशास्त्र, राजधर्म, रत्नवर्णन इ. दिले आहेत. यांतील कांहीं भाग गद्यरूपानें दिले आहेत. यांत तंत्रोक्त अनेक बीजमंत्र दिले आहेत. युद्धांतील अस्त्रनिर्माणपद्धति, युद्धपद्धति, यांत दिली असून नगर, ग्राम, दुर्गादि निर्माणकामीं शिल्पशास्त्राची माहिती आहे. सांप्रत ज्या दशावतारांच्या मूर्ति आपण मानितों त्याला अनुसरूनच या पुराणांतील दशावतारवर्णन आहे. यांत अनेक देव-देवींच्या मूर्तिचीं लक्षणें व संस्था सांगितल्या आहेत. यांत शब्दकोशहि दिला आहे. त्यांतून अमरसिंहानें कांहीं अंश घेतला असावा, असा पुष्कळांचा तर्क आहे.

१० **स्कंदपुराणः**—हें सर्वांत मोठें आहे. याचे सहा खण्ड आहेत. १ काशीखण्ड २ उत्कलखंड ३ प्रभासखंड ४ महेश्वरखंड ५ वैष्णवखंड व ६ ब्रह्मखंड. हे सहा खण्ड म्हणजे सहा स्वतंत्र ग्रंथ शोभतील; व हे भिन्न भिन्न काळीं भिन्न व्यक्तींनीं रचिले असावे असें अनुमान होतें. यांतील ( १ ) काशीखंडांत—काशीसंबंधी तीर्थांचें वर्णन फारच बारकाईनें दिलें आहे. याच वर्णनाचे ओघानें गंगामाहात्म्य, गगासहस्रनाम, सदाचार, स्त्रीवर्णन इत्यादि विषय दिले आहेत. दिवोदास राजाचें प्रतापवर्णन, पतिव्रतेचें आख्यान, शिवशर्म्याला मोक्षप्राप्ती इत्यादि विषय मोठे गमतीचे आहेत २ उत्कलखंडांत श्री जगन्नाथाचें माहात्म्य, व पुजापद्धति, उत्कलदेशाचें वर्णन, पुरी ( जगन्नाथ )—स्थापन, पुरुषोत्तमक्षेत्राचें पारमाण, पुण्डरीक व अंबरीष यांचें जगन्नाथदर्शन, इंद्रद्युम्नराजाचें यज्ञानुष्ठान व स्वप्नांत भगवद्दर्शन, नंतर राजानें केलेला मूर्ति निर्माण करण्याचा उद्योग, काष्टमय मूर्तिचे ठायीं जगन्नाथदेवाचा आविर्भाव, इंद्रद्युम्नास वरप्रदान, स्नानयात्रा, रथयात्रा, इत्यादि जगन्नाथासंबंधीं अनेक गोष्टी, या खंडांत आहेत. ३ प्रभासखंडांत—प्रभासतीर्थवर्णन—४ महेश्वरखंडांत

शिवमाहात्म्य, दक्षयज्ञ, लिंगपूजा, इंद्रद्युम्न व दमनक यांचीं उपाख्यानें व विशेषतः हरगौरी-लीला हीं असून वासुदेवमहिमा व पांडवांचीं उपाख्यानेंहि यांतच आहेत. ५ वैष्णवखंडांत प्रधानतः विष्णुमाहात्म्य असून तदनषंगानें मार्कंडेय, अंबरीष, इंद्रद्युम्न, जैमिनी, नीलकंठ, नृसिंहप्रभृति अनेक उपाख्यानें, तीर्थमाहात्म्य, व्रतमाहात्म्य इ० फळ, फूल, तुलसीदल, नैवेद्य इत्यादिकांचे अर्पणानें प्राप्त होणारे फळांचें यांतच विशेष वर्णन आहे. ६ ब्रह्मखंडांत सेतुबंधरामेश्वरादि तीर्थवर्णन, श्रीरामचरित्र, विष्णुपूजामाहात्म्य, शालग्रामनिरूपण, उमा-महेश्वर व्रत व नानाविध दानधर्म-व्रतें आहेत. स्कंदपुराणाची ही मौज आहे कीं, त्यांत एकी-कडे शिवमाहात्म्य व दुसरीकडे विष्णुमाहात्म्य, एकीकडे विश्वेश्वर–अन्नपूर्णा माहात्म्य तर दुसरीकडे जगन्नाथ, बलराम, सुभद्रा यांचें माहात्म्य. यांचेंच एक 'अवंती–खण्ड' म्हणून ही एक खण्ड असून त्यांत तर तीर्थांची गर्दी आहे असें कोणी सांगतात.

११ **भविष्यपुराण**—याचीं पांच पर्वें आहेत. प्रथम पर्वीं–सृष्टिप्रक्रिया, तिथि माहात्म्य, शिव–विष्णु–सूर्य पूजावर्णन. दुसऱ्या, तिसऱ्या व चवथ्यांत शिव, विष्णु व सूर्य यांचेंच माहात्म्य अधिक विस्तरानें सांगितलें आहे. पांचव्यांत–स्वर्गवर्णन आहे. या पुराणांत भिन्न भिन्न धर्मांची एकवाक्यता करण्याचा प्रयत्न दिसतो असें कित्येक समज-तात. तथापि मुख्यतः ब्रह्मवर्णनाकडेच मुख्य कटाक्ष आहे. या पुराणांत शाकद्वीपवासी सूर्यो-पासक 'मग' जातीचा उल्लेख पाहून वुल्सनसाहेब तर्क करितात कीं, इराण ( पारस्य ) देशांतील अग्न्युपासक लोकांचा यांत 'निर्देश' असावा. असो. इतर सर्व पुराणांप्रमाणेंच यांतहि प्राचीन राजमंडळ व विशेषतः चंद्र–सूर्यवंशीय राजे यांचें वर्णन आहेच. परंतु, मौजेची गोष्ट ही कीं कांहीं प्रतींत मोंगल बादशाहा अकबर, कलकत्ता शहर व तेथील सुप्र-सिद्ध ब्राह्मो केशव चंद्रसेन यांचाहि उल्लेख आढळतो ! हें पाहून ह्यांतील बरेच भाग प्रक्षिप्त असावे असें म्हणणें भाग येतें.

१२ **ब्रह्मवैवर्तपुराणः**—याचे ब्रह्मखण्ड, प्रकृतिखंड, गणेशखंड, श्रीकृष्ण-जन्मखंड असे चार खण्ड आहेत. हें पुराण नैमिषारण्यांत शौनकादि ऋषींस पौराणिक सौतीनेंच सांगितलें आहे. यांत श्रीकृष्ण राधिकेचा लीलाप्रसंग विशेष खुलवून लिहिला आहे. याशिवाय इतर कोणत्याहि पुराणांत हा विषय असा रंगविला नाहीं. याच पुराणांतील ब्रह्मखंडांत सृष्टि–निरूपण प्रसंगीं श्रीकृष्णाचे शरीरापासून नारायणादि देवांचा आविर्भाव, रासमंडलाचे ठायीं राधेची उत्पत्ति, राधा–कृष्णांचे देहापासून गाई, गोप, गोपी इत्यादि-कांची उत्पत्ति व त्यापुढें चराचर विश्वाची उत्पत्ति वर्णिली आहे. प्रकृतिखंडांत सृष्टिकार्य प्रसंगांत दुर्गा, राधा, लक्ष्मी, सरस्वती, सावित्री या पंच–प्रकृतिभूत देवतांचें माहात्म्य वर्णिलें आहे. प्रसंगवशात् सावित्री, सत्यवान्, सुरभि, स्वाहा व स्वधा यांचीं उपाख्यानें, देवीमाहात्म्य, सुरथवंशवर्णन, गंगेचें उपाख्यान, रामायणी कथा, दुर्वासाचा इंद्रास शाप व लक्ष्मीपूजाविधि हे विषय आहेत. गणेशखंडांत–प्रधानतः गणेशमाहात्म्य देऊन प्रसं-गानें जमदग्नि, कार्तवीर्य, परशुराम इत्यादिकांच्या कथा दिल्या आहेत. श्रीकृष्णजन्म-खंडांत–कृष्णलीला पाल्हाळानें सांगितली असून त्यांतच व्रजलीला, मथुरेंतील वर्तन, राधा-कृष्णांचे पुनर्मिलन, गोकुलवासी जनांचें गोलोकगमन हे विषय आहेत. अवशिष्ट ब्रह्मवै-

वर्तांत महापुराण व उपपुराण यांचीं लक्षणें, सर्व महापुराणांची श्लोक संख्या, व सर्वहि महापुराणें व उपपुराणें यांचीं नांवें दिलीं आहेत; व ह्या गोष्टींत श्रीमद्भागवताशीं बहुंशीं मेळ पडतो. याचे अखेर उपांत्य अध्यायांत ब्रह्मवैवर्तांतील एकंदर विषयांचा संकलित नाम निर्देश आहे. ब्रह्मवैवर्ताचे मतें महापुराणाचें लक्षण दशविध ( १० ) म्हणजे:–१ सृष्टि, २ स्थिति, ३ प्रलय, ४ पालन, ५ कर्म, ६ वासनावर्णन, ७ चौदा मनूंचें नामवंशादि कीर्तन, ८ मोक्षनिरूपण, ९ श्रीहरिगुणकीर्तन १० इतर पृथक् देवतांचीं वर्णनें–असें आहे. तथापि सर्ग, प्रतिसर्ग, वंश, मन्वंतरें व चंद्रसूर्यवंशवर्णन, असें पंचविध लक्षणच बहुतेक पुराणोपपुराणांत आढळून येतें.

१३ **मार्कंडेयपुराणः**—यांत देवीमाहात्म्य, चण्डीपाठ, चण्डीचे आराधनेनें सकल विपत्तींचें दूरीकरण इत्यादि गोष्टी प्रामुख्यानें सांगितल्या आहेत. शिवाय हरिश्चंद्र, दत्तात्रय, द्रुपद, नहुष, ययाति, पुरूरवा, इक्ष्वाकु, रामचंद्र यांच्या कथा आहेतच. दर्शनाचें तत्व, सृष्टिरहस्य, तीर्थमाहात्म्य, द्वीपें, वर्ष यांचीं वर्णनें व पापपुण्याचें विवरण हे विषय आहेत. तथापि देवीमाहात्म्यावरच मुख्य भर आहे. सुप्रसिद्ध सप्तशति याच पुराणांतर्गत आहे.

१४ **वामनपुराणः**—प्रख्यात दानशौण्ड प्रल्हादपौत्र बलिराजा ह्यानें श्रीकृष्णाची निंदा केल्यामुळें त्याचा आजा प्रल्हाद यानें "तूं राज्यभ्रष्ट होशील" म्हणून त्याला शाप दिला; व परमात्मानें वामनरूपानें त्या दानशूर बळीचे यज्ञांत जाऊन त्यापासून त्रिपादभूमि मागून त्या प्रसंगांत त्याला पाताळीं घातलें, ही सर्वश्रुत कथाच या पुराणाचा मुख्य विषय आहे. याखेरीज ब्रह्मदेवाचा शिरच्छेद, कपालमोचनाचें आख्यान, दक्षयज्ञ, देवदानव युद्ध, महिषासुरवध, बलिवंशवर्णन, प्रल्हादकृत बलिशापदान, चण्ड–मुण्ड–वध, शुंभ–निशुंभ–वध, इत्यादि विषय आहेत. देवर्षि नारदाचे प्रश्नास उत्तररूपानें पुलस्त्य महर्षींनीं ह्यांतील विषय सांगितले आहेत.

१५ **वराहपुराणः**—परमात्म्यानीं वराहरूपानें या वसुधेचा समुद्रजलांतून उद्धार कसा केला हें यांत मुख्य वर्णन आहे. शिवाय, यांत पुराणाचें लक्षण, सृष्टिप्रकरण, प्रियव्रताचें उपाख्यान, दशावतारतत्व, अनेक व्रतकथा, तीर्थमाहात्म्य, जम्ब्वादिद्वीपवर्णन, अनेक देश, नद्या यांचीं वर्णनें, देव व देवी यांचें प्रतिमा–निर्माणविधान, इत्यादि विषय असून अखेर या पुराणांतील एकंदर विषयांची यादी दिली आहे. अन्नदान, जलदान, धेनुदान इत्यादि दानांचें माहात्म्य या पुराणांत आहे. यांतील एकशें बाराव्या अध्यायांत सर्व पुराणांची नांवें व त्यांतील श्लोकसंख्या आहे. यांतील पुराणलक्षण पंचविधच आहे. यांत अवतार म्हणजे मत्स्यादि दहाच दिले आहेत. यांत बुद्धद्वादशीव्रत सांगितलें आहे. त्यांत बुद्धाची सुवर्ण प्रतिमा करून पुजावी असें आहे. परंतु, हा बुद्ध म्हणजे कपिलवस्तु येथें जन्मलेला आधुनिक बुद्ध अर्थातच नव्हे. यास येथें हृषीकेश, दामोदर, चक्रपाणी इत्यादि विशेषणें *दिलीं असून सत्ययुगांतहि हें बुद्ध–द्वादशीचें व्रत चालू होतें* असें लिहिलें आहे.

१६ **मत्स्यपुराणः**—*महाप्रलयकाळीं भगवंतांनीं मत्स्यरूप* घेऊन मनु व सृष्टीची बीजसामग्री कशी राखिली तें यांत मुख्यतः सांगितलें आहे. मनु व मत्स्य यांचें

जें आख्यान शतपथब्राह्मणांत आढळतें तेंच पल्लवित करून या पुराणांत दिलें आहेसें वाटतें. शिवाय या पुराणांत नृसिंहमाहात्म्य, विष्णूचे दशावतार, अनन्ततृतीयादि व्रतें, व प्रयागादि तीर्थे, चंद्रवंश, सूर्यवंश, कुरुवंश, हुताशनवंश, व ययाति आणि कार्तवीर्यादिकांचीं उपाख्यानें; कल्प व युग यांचें वर्णन; प्रतिमा—लक्षण, देवमण्डप—लक्षण, सावित्री—चरित्र, ग्रहवर्णन, शुभाशुभयात्राफळ; पार्वतीजन्म, मदनदहन, शिवविवाह, कार्तिकेयजन्म, राजधर्म व भावी राजांचें विवरण हेंही यांत आहे. यांतच पूर्वोक्त सप्तकल्पांचें वर्णन आहे. या पुराणावरूनच ख्रिस्ताचे जुने करारांतील 'नोहा व त्याची नांव' ही कथा घेतली असली पाहिजे.

१७ कूर्म—पुराणः—हें पुराण कूर्मरूपधारी भगवंतानेंच प्रथम नारद महर्षींना सांगितलें, तेंच सूतानें शौनकादि ऋषींस कथन केलें. पूर्वकाळीं या पुराणाच्या ब्राह्मी, भागवती, सौरी व वैष्णवी अशा चार संहिता होत्या असें दिसतें. परंतु प्रस्तुत ब्रह्मसंहिता तेवढी उपलब्ध आहे व हिलाच कूर्मपुराण समजून बसणें भाग आहे. हींत सृष्ट्युत्पत्तीपासून आरंभ होऊन, वंशानुकीर्तन, दक्षयज्ञ, वामनावतार, कृष्णचरित्र, युगधर्मादिकथन, दानधर्म, तीर्थमाहात्म्य, नित्यकर्म, अशौचविचार व ज्यांत अनुक्रमें ज्ञानयोग व ब्रह्मचारिधर्म सांगितले आहेत, अशा ईश्वरगीता व व्यासगीताहि आहेत. पैकीं ईश्वरगीतेचे अकरा अध्याय असून चारशें अठ्ठाविस श्लोक आहेत व सांख्ययोग, ज्ञानयोग, भक्तियोग इत्यादिकांचें वर्णन श्रीमद्भगवद्गीतेचे तोडीचें आहे. शिवाय या पुराणांत शिव—दुर्गा माहात्म्याचें प्राधान्य आहे. या पुराणाचे मतीं वायुपुराण व शिवपुराण हीं महापुराणांत गणलीं पाहिजेत. या पुराणांत देवीसहस्रनामयुक्त देवीस्तव आहे.

१८ ब्रह्माण्डपुराणः—स्कंदपुराणाप्रमाणेंच हेंही पुराण अठरा धान्याचें कडबोळें आहे. त्यांतूनहि संपूर्ण ब्रह्माण्डपुराण तर आज मित्तीस दुष्प्रापच वाटतें आहे. सुप्रसिद्ध अध्यात्मरामायण याच पुराणाचे अंतर्गत आहे; परंतु, प्रस्तुत उपलब्ध झालेल्या प्रतींत हें अध्यात्मरामायण सांपडत नाहीं. शिवाय मूळ या पुराणाचे—प्रक्रियापद, अनुषंगपाद, उपोद्घातपाद व उपसंहारपाद असे चार पाद होते. परंतु प्रस्तुतचे प्रतींत पाहतां प्रक्रियापद व अनुषंगपाद यांचे कांहीं भाग आढळतात. अध्यात्मरामायण हा केवळ स्वतंत्र ग्रंथ म्हणूनच मिरवतो आहे. हें पुराण दृषद्वती नदीकाठीं यज्ञक्षेत्रांत महानुभव सूतानेंच सांगितलेलें आहे. तें पुराण आपण वेदव्यासांपासून ऐकिलें. व्यासांनीं तेंच वायुपासून ऐकिलें असें सूताचें म्हणणें. असो. यांतील विषयः—सृष्टिप्रकरण, कल्पनिरूपण, युगभेद, मन्वंतरक्रम, जंबुद्वीपवर्णन, भारतवर्षवर्णन, किंपुरुषवर्ष, अनुद्वीप, केतुमालवर्ष इ० वर्णन; भरतवंश, पृथुवंश, देववंश, ऋषिवंश, अग्निवंश, व संहिताकाराचे वंश; इ० इ० यांतच अंतर्भूत असलेला अध्यात्मरामायण ग्रंथ सुप्रसिद्धच असल्यामुळें त्यांतील विषय येथें देत नाहीं.

ही अठरा पुराणांची एकमेकांत घालमेल झाली. आतां महाभारत तर अठरा पुराणें रचल्यानंतर व्यासांनीं केलें हें तर सर्वसंमत आहेना ? तथापि महाभारती कथांचा अनेक पुराणांत उल्लेख आहे.

---

अष्टादश पुराणानि अष्टौव्याकरणानिच ।
ज्ञात्वा सत्यवती सूनु श्चक्रे भारतसंहिताम् । भविष्यपुराण ।

**श्रीमद्भागवतांत** युधिष्ठिरास राज्याभिषेक यासंबंधानें एकाच अध्यायांत याचा उल्लेख आहे. त्याचप्रमाणें अश्वत्थाम्याची दण्डकथा व कुंतीस्तव या दोन अध्यायांत संक्षेपानें भारताचा उल्लेख आहे. **देवीभागवतांतील** चार अध्यायांत भारतीय प्रसंगांचें वर्णन आहे. तेथें भीष्म, कर्ण, युधिष्ठिर व परीक्षितीची उत्पत्ति व पाण्डवांचे वनवास समयीं जयद्रथानें केलेल्या द्रौपदीहरणाचा उल्लेख आहे. **अग्निपुराणांत** तिसरे अध्यायांत एकुणसत्तर श्लोकांतच आदिपर्वापासून तो स्वर्गारोहणापर्यंत यावत् अष्टादश पर्वांचा संग्रह आहे. **शिवपुराणांतहि** महाभारताचा उल्लेख आढळतो. दुर्वासपारणा, अर्जुनाची इंद्रकील पर्वतावरील तपस्या, इंद्रसमागम, किरातअर्जुनयुद्ध, शिवकृतवरदान हे महाभारतोक्त प्रसंग शिवपुराणांत आहेत. परंतु महाभारतांतील मुख्य गोष्ट जी कुरु–पाण्डवांची वैरघटना तिचा उल्लेख मात्र कोणत्याहि पुराणांत प्रामुख्यानें नाहीं. यावरून भारतांतील बरीचशीं उपाख्यानें अन्यपुराणांतून घेतलीं असावीं असें दिसतें. सावित्री–सत्यवान्, नल–दमयंती, हरिश्चंद्र, शकुंतला हीं अन्य पुराणांतूनहि बहुतेक अशींच आढळतात. **ब्रह्मवैवर्तपुराणांत** कुरु पाण्डवांचे मूल वैराची हकीकत नाहीं, तथापि महाभारताचे आदिपर्वांतील जनमेजयाचा सर्पयज्ञ, जरत्कारूचें आख्यान, हे विषय किंचित् विस्तारानें दिले आहेत. **वामनपुराणांत** चित्रांगदेचा विवाह म्हणून एक प्रसंग आहे; परंतु तो भारतांतील चित्रांगदेचे प्रसंगाशीं सदृश नाहीं. कारण महाभारतांतील चित्रांगदा ही मणिपूर राजाची कन्या असून तिचा अर्जुनाशीं विवाह आहे; वामनपुराणांतील चित्रांगदा आपणास विश्वकर्म्याची कन्या म्हणवीत असून तिचा सुरथाशीं विवाह आहे. एवंच नामसादृश्यापलीकडे कांहीं नाहीं. भारताचे नमुन्यावर भारत–संहिता किंवा ज्याला लोकांत जैमिनीभारतच म्हणतात असा एक ग्रंथ महर्षि जैमिनींनीं लिहिलेला म्हणून प्रसिद्ध आहे. परंतु याचा एकूण विस्तार आश्वमेधिकपर्वाएवढा असून त्यांत बऱ्याचशा आधुनिक विषयांचा समावेश आहे.

इतर पुराणांप्रमाणेंच महाभारत व त्याचाच भाग म्हणविला जाणाऱ्या हरिवंशांतहि पुनरुक्ति व विसंगति आहेत. व याचें समाधान म्हणजे भारत ( आजचे स्वरूपांत तरी ) व हरिवंश हीं व्यासांनींच लिहिलेलीं नसावीं. भारत हें व्यासांचें नाहीं म्हणण्याची सोयच नाहीं व तें नाहीं म्हणण्याचें कारणहि नाहीं. कारण चोवीस हजार संक्षिप्त भारत व्यासकृत आहे असाच स्पष्ट उल्लेख आहे व तो कोणालाहि जाचण्याजोगा नाहीं. परंतु, हरिवंशाबद्दल तसा स्पष्ट शेरा नाहीं हें एक व त्याला ' खिल ' म्हटलें आहे; यावरून तें दुसरेकडून उसनें आणिलें आहे हें उघडच आहे. आतां ही उसनवारीहि आजकालची नव्हे, एवढें मात्र खास. कारण, **गरूडपुराण** व **अग्निपुराण** यांत हरिवंशाचें स्पष्ट कथन आहे. जैमिनीअश्वमेधांतहि हरिवंशाचा उल्लेख आहे. तेव्हां याचेपूर्वी तें असलेंच पाहिजे व तें असेलहि. मात्र सोळा हजार श्लोकांचें तर तें नव्हतें हें उघडच आहे. कारण पर्वसंग्रहांत बारा हजार संख्या सांगितली आहे. तेव्हां चार हजार ही अगदीं मागील मिळवणी आहे हें उघड आहे. व आंतील मजकूर पहातांहि तसा भास होतो. आमचे मतें भविष्यपर्वांतील वामनप्रादुर्भावा-

---

**१ जैमिनीकृत समग्र भारत व्यासांनींच बुडवून टाकिलें. मात्र त्यांतील ' अश्वमेध ' प्रकर्ण तेवढें शिल्लक ठेविलें, तेंच हें जैमिनीकृत भारत, असाहि समज आहे.**

पुढील ( अध्याय ७२ ) हरिहरैक्यवर्णनाचा भाग मागून जोडलेला असावा. कारण, हरि व हर यांचें ऐक्य दाखविणें हें कांहीं कृष्णचरित्र सांगणाराला प्रतिज्ञात होत नाहीं. दुसरी गोष्ट, कलकत्याचे मन्मथनाथ दत्तांनीं हरिवंशाचें जें इंग्रजी भाषांतर प्रसिद्ध केलें आहे त्यांत वामनावतारापर्यंतच ग्रंथ आहे. तेव्हां त्यांच्या प्रतींत पुढील ग्रंथ नसावा. बाकी हा आमचा तर्क आहे. आमचें भाषांतर पान सातशें एकेचाळीस, अध्याय ब्याहत्तरावा, यावर प्रारंभींची टीप पहा. हींत वामनअवतारवर्णनाअखेर श्रीकृष्णाचे गुण कथन करणारें भारत समाप्त केलें असा शेरा आहे. तथापि सिद्धांत देण्याइतकी आमची तयारी नाहीं.

असो; कसेंहि असलें तरी ' हरिवंश ' हा जोड दुसरेकडील साराच उसना आहे, तर त्यांत भेळ घालण्यालाहि फारशी खंत वाटण्याचें कारण नाहीं. व भारत हें अष्टादश पुराणांचें सार असल्यानें तें त्याचे वैभवाला शोभे असें भव्य म्हणजे एक लक्षात्मक बनवावयाचें असें ज्या कोणा सुमतीच्या मनांत आलें असेल त्यानें हा जो जोड दिला आहे तो देण्यांत शिताफी बरीच केली आहे. त्याला आनुशासनिक पर्वांतून एक दोरा उगवून त्यांत गुंफून दिले आहे व अखेर अध्याय १३२ यांत तर मागल्या अष्टादशपर्वात्मक भारताच्याच मुसक्या आंवळल्या आहेत. कारण, महाभारतश्रवणाचें पर्वशः फलकथन या अध्यायांत सांगितलें. अर्थात् कोणतेहि कृतीची मर्यादा कालिदासानें म्हटल्याप्रमाणें ' आफलोदय ' असलीच पाहिजे. तेव्हां अठराहि पर्वें भारत वाचलें तरी वाचकास आपले कृतीचें फल दिसेपर्यंत पुढील वाट चाललीच पाहिजे. तेव्हां भारताचें फल या पल्यावर आणून दोन्ही ग्रंथाचा एक जीव दाखवून दिला आहे. व तें करणें हें ठीकच आहे. कारण, अंगीकृत वस्तूचा निर्वाह करून दाखविणें हेंच शहाणपणाचें लक्षण आहे.

आतां प्रश्न एकच राहिला कीं, हरिवंश ' जर उसना आणिला तर आणला कुठून ? याचेंहि उत्तर कठीणच आहे. कारण, कुठें संक्षेप, कुठें विस्तार मिळून कृष्णचरित्र, ब्रह्म, विष्णुपुराण, श्रीमद्भागवत, देवीभागवत, मार्कंडेय, ब्रह्मवैवर्त व ( भारत ) इतक्या ठिकाणीं सांगितलें आहे. तेव्हां या हरिवंशांत यांपैकीं तें कोठून घेतलें, हें सांगतां येणें कठीण. तथापि, पुढील तीन कारणांस्तव हें ' ब्रह्मपुराणांतून ' घेतलें असावें, असा आमचा तर्क आहे. एक कारण–' ब्रह्मपुराण ' हें सर्व पुराणांत पहिलें आहे असा बहुत ठिकाणीं उल्लेख आहे. व सायनाचार्यांनींहि 'पुराण' या शब्दावर 'ब्राह्मादि' अशी व्याख्या दिली आहे. दुसरें कारण, हरिवंशांत दिलेले श्रीकृष्णचरित्रांत ब्राह्मपुराणांतील वर्णनाशीं बरेंच साम्य आहे. मुख्यतः भागवत व ब्रह्मवैवर्तांत ' गोपीक्रीडन ' ज्या मासल्याचें आहे तसें नसून फारच मर्यादित आहे. तिसरें कारण, ब्रह्मपुराण व हरिवंश यांत एकंदर जवळ जवळ श्लोक ३७९–४०० तेच ते आहेत. इतकी उसनवारी जर धडधडीत दिसते आहे तर आतां संदेह कां पाहिजे. शिवाय खुद्द महाभारतांतहि ब्राह्मांतून कांहीं श्लोक जसेच्या तसेच घेत, लेले आढळतात. उदाहरणः–ब्रह्मपुराणांतील २२३, २२९ अध्याय. अनुशासन–( भारत ) पर्वांतील १४३, १४९, तसेच ब्राह्माचा २२६ अध्याय व अनुशासनाचे १४६ अध्याययांत श्लोकसाम्य आहे. बाकी भारताला उसनवारीचा स्पष्टच हक्क आहे. कारण, भारत

१ कोणी ' **वायुपुराण** ' आद्य समजतात.

म्हणजे अठरा पुराणें मिळूनच केलें आहे. तें असो; पण यावरून व विशेषतः जर एक नव्हे दोन नव्हे ४१९ श्लोक एकसारखे मिळतात तर उसनवारीबद्दल संदेह नाहीं.

आतां याच पुराव्यावरून कोणी उलट पक्ष धरील कीं, हरिवंशावरून ब्राह्म कां नव्हे ? एक तर, हरिवंश ज्याचा अंश म्हणविते तें भारत अठरा पुराणानंतरचें आहे. व दुसरें, हरिवंश हें ' खिल ' म्हणजे ग्रंथांतरांतील असतां, प्रयोजनपरत्वें इकडे घेतलें आहे, असें धडधडीत विधानच आहे. तेव्हां आमचे अल्प शोधाप्रमाणें तरी हरिवंश हें प्रकरण ब्रह्मपुराणाचे आधारानें बरेचसें रचिलें आहे व त्यांतील कृष्णकथा तरी त्यांतीलच खास घेतली आहे विष्णुपुराणांत जें कृष्णचरित्र आहे तेंहि ब्रह्मपुराणांतून घेऊन कांहींसें वाढवून लिहिलें[1] आहे. एतावता हरिवंशाला ब्रह्मपुराणाचा आधार असावा असें आमचें मत आहे.

असो; एथवर हरिवंशासंबंधानें आम्हांस काय दिसलें तें आम्ही यथामति लिहिलें आहे. आतां हरिवंशाचे संबंधानें कृष्णचरित्राचा उल्लेख सहजीं आला आहे. पण त्यांतील कृष्णलीलेंत आधुनिकांनीं ' हुर्यो ' करण्याजोगा कांहींहि भाग नाहीं, हें सुदैव आहे. व आम्हांला या कामीं तरफदारी करण्याचें संकट नाहीं हें ठीक आहे. तथापि, एकतर आमचे वाचकांचे वाचनांत श्रीकृष्णचरित्र अनेक ठिकाणीं येतें, व विशेषतः आमचेच मंडळीनें श्रीमद्भागवताचें भाषांतर करून वाचकांस दिलें आहे. व त्यांतील कृष्णचरित्रावर तर आधुनिकांचा गिल्ला आहे. तेव्हां एका अर्थीं कांहींसा अप्रस्तुतपणाचा आरोप पतकरूनहि त्याचा परामर्श घेणें आम्हांस वाचकांचे कल्याणाचें वाटतें. करितां वाचकांनीं या मर्यादातिक्रमाबद्दल क्षमा करावी. व पुढील खंडनमंडन लक्षपूर्वक वाचावें, म्हणजे त्यांची खात्री होईल कीं, श्रीकृष्णपरमात्म्याचे विमल यशावर जे शिंतोडे उडवूं पहातात ते केवळ अनधिकारी होत. त्या कामीं योग्य न्याय देण्याचा त्यांचा अधिकारच नाहीं. कारण अधिकारी लोकांचा निवाडा येणेंप्रमाणें आहे.

हीरेंद्रनाथ दत्त हे ' श्रीकृष्ण ' नामक ग्रंथाचे प्रस्तावनेंत म्हणतातः—

It is quite possible that in the same way as the boy God frolicked and played with his youthful companions, the boys of Bindravan, He sported and danced with the girls there. Everybody, whether young or old felt attracted by his charms which were simply irresistible and it is small wonder that the girls of Brindravan should be impelled to seek his company and take part in the songs, dances organised by him or that they should disregard the warning of their guardians and come out to join with him.

\+ \+ \+ \+

But, why, it may be asked were the incidents and the accessories of love-making of sensual physical love, superadded to the simple story of the sportive dances of the innocent boys and girls ? The answer is obvious Spirtual writers in other times and lands recoursed to the same

१ ब्रह्मपुराण अध्याय १८ श्लोक २१–२४ हे विष्णुपुराण अध्याय ( ५।१३ ) यांतील श्लोक २३–२८ आणखी ८२ श्लोक पहा. कांहीं श्लोक तर अक्षरशः तच आहेत.

devise. What is the wine and the love of the *Sufi* mystic but the ecstacy of spiritual longing symbolised by means of the liquor and the woman?

\+ + + +

Any one who feels shocked by the voluptious description of the Rasa-Lila in the later Puranas, would do well to read through the 'Songs of Soloman' and then he will be in a position to say which is more voluptuous. The christian song or the Heathen Purana.

\+ + + +

When we consider that in the eyes of the pious writers who composed these accounts, Shri Krishna or Christ was nothing less than the Divine made flesh, who is by nature immaculate and beyond the reach of sin, we are able to understand why they did not hesitate to attibute to him such conduct, as would certainly be blameworthy in an ordinary mortal, with the object, no doubt, of enforcing and adorning the spiritual verity, which it was their aim to give out to the world; and so we find saintly beings like Ramanuja and Shri Chaitanya who were the very incarnations of purity and sexual continence derived the highest spiritual joy and comfort from the Puranic account of the Rasa-lila, which the educated Hindu of the nineteenth century shudders at and rejects with scorn.

\+ + + +

The Krishna who was the beloved of Chaitanya, was not the Krishna of Kurukshetra or of Prabhas but the Krishna as we know him in the Brindavan. This is not to be wondered at, Because in his Brindaban Lila it is that we find him as the ideal master, friend, son and lover fulfilling ideally all the relations in which one being may stand towards anotner and thus giving full scope for all the gradations of Bhakti from शांत through दास्य, वात्सल्य and सख्य to माधुर्य, that sweetest of relation which exists between lover and beloved.

याचा भावार्थ:—बालरूपी परमात्मा ज्याप्रमाणें वृंदावनांतील संवगडी अल्पवयी मुलाशीं खेळे वागड, तसाच अल्लड पोरीशींहि नाचे बागडे. त्या मुलाचा मोहकपणाच असा होता कीं, वृद्ध असो, तरुण असो, त्याचें चित्ताकर्षणच होई. मग अल्लड पोरींचा ओढा त्याजकडे व्हावा व पालकांस न जुमानितांहि त्यांनीं त्याचे नादीं लागावें, असें म्हणण्यांत आश्चर्यकारक तें काय?

कोणी म्हणतील, येथपर्यंत ठीक आहे. पण पुढील लेखकांनीं या अल्लड पोरखेळांत कामुकतेचा रंग भरला, हें काय शहाणपण. तर त्याचें उत्तर असें आहे कीं, सर्व देशांत सर्वकालीं सर्व लेखकांनीं जीवांची परमात्मगत अत्युत्कंठा दाखविण्यास हीच युक्ति योजिली आहे. गूढज्ञानी सुफि पंथांत स्त्री आणि मदिरा यांचें वर्णन आहे. त्याचा अर्थ तरी दुसरा काय आहे? बरें, ख्रिस्त्यांचें 'सॉंग ऑफ सालोमन' यांत तरी काय आहे?

रासलीलेचा अश्लीलपणा पाहून ज्याला चीड येत असेल त्यानें हें ख्रिस्त्यांचें 'सॉंग ऑफ सालोमन' वाचावें, म्हणजे त्यास वाटेल कीं, आपले रासांतील इष्कबाजी याचे पासंगालाहि उतरणार नाहीं.

परंतु खरी दृष्टि अशी आहे कीं, ज्या भाविकांनीं या गोष्टी कृष्णावर लादल्या त्यांची भावना कृष्ण हा मनुष्यरूप दिसला तरी स्वभावतः निष्पाप, निर्विकल्प, निरंतर परमात्मा; तेव्हां अशाबद्दल कांहीं बोललें तरी त्याला बाधा कशाची ?–या गोष्टी पामरांना दूषणीय अशा होत्या आणि यामुळेंच पावित्र्याचे व ब्रह्मचर्याचे जे केवळ पुतळेच होते, असले श्रीमहाभागवतः श्रीरामानुजाचार्य व श्रीचैतन्यः हे पुराणांतील प्रभूच्या ज्या रासलीलेचा आजच्या १९।२० व्या शतकांतील पुढील शहाण्यांला सकंप तिरस्कार वाटतो, ती मोठ्या आनंदानें व सुखानें ऐकत व त्यामुळें त्यांचे अध्यात्मिक प्रेमाला भरतें येई.

चैतन्याचा लाडका जो श्रीकृष्ण तो कुरुक्षेत्रींचा किंवा प्रभासक्षेत्रींचा कृष्ण नव्हे; तर वृंदावनांतील खेळाडू कृष्ण. आणि असें असणें स्वाभाविक आहे. कारण, येथेंच परमात्म्यानें आपलें धनीपण, मित्रपण, पुत्रत्व व वल्लभ्य हीं पूर्णपणें व्यक्त करून भक्तीच्या ज्या शांतापासून दास्य, वात्सल्य, सख्य, माधुर्य इत्यादि पायऱ्या आहेत, त्या सर्वांची पूर्तता केली.

आजकालचे अंत्यजोद्धारकांसहि जे परमपूज्य व आश्रयणीय आहेत असे परमभागवत साधु एकनाथ श्रीकृष्णावताराचे अद्भुतपणाविषयीं म्हणतातः—

“ बहुत अवतारीं अवतरला देवो । परी या अवतारींचा नवलावो ।
“ देवां न कळे अभिमावो । अगम्य पहा हो हरिलीला ॥ ८५ ॥
“ उपजतांचि माये वेगळा । वाढिन्नला स्वयें स्वलीला ।
“ बाळपणीं मुक्तीचा सोहळा । पूतनादि सकळां निजांगें ॥ ८६ ॥
“ मायेसि दाविलें विश्वरूप । गोवळां दाविलें वैकुंठद्वीप ।
“ परी गोवळेपणाचें रूप । नेदीच अल्प पालटों ॥ ८७ ॥
“ बाळ बळियातें मारी । अचाट जगा देखतां करी ।
“ परी बाळपणा बाहेरी । तिळभरी नव्हेची ॥ ८८ ॥
“ ब्रह्म आणि करी चोरी । देवो आणि व्यभिचारी ।
“ पुत्र कलत्र आणि ब्रह्मचारी । हेही परी दाखविली ॥ ८९ ॥
“ अधर्में वाढविला धर्म । अधर्में तारिलें कर्म ।
“ अनेमें नेमिला नेम । अति निःसीम निर्दुष्ट ॥ ९० ॥
“ तेणें संगेंचि सोडिला संगु । भोगें वाढविला भोगु ।
“ त्यागेंविण केला त्यागु । अति अव्यंगु निर्दोष ॥ ९१ ॥
“ कर्मठ व्हावया बोधू । कर्म जाड्याचे तोडिले भेदु ।
“ भोगांनीं मोक्षपदू । दाविलें विशदू प्रकट करूनी ॥ ९२ ॥
“ भक्ति भुक्ति मुक्ति । तिन्ही केलीं एक पंक्ति ।
“ काय वानूं याची ख्याती । खाऊनि माती विश्वरूप दावी ॥ ९३ ॥
“ त्याचिया परमचरित्रा । तुज सांगेन पवित्रा ।
“ परी निजबोधाचा खरा । या अवतारीं पुरा कवाडू केला ॥ ९४ ॥

अर्थतच, एकनाथांच्या या ह्मणण्याचा श्लोक पुष्पदंतांनीं महिम्नांत ह्मटल्याप्रमाणेंच आहे. ते ह्मणतातः—

अतर्क्यैश्वर्येत्वय्यनव सरदुःस्थोहताधियः ।
कुतर्कोऽयं कांश्चिन्मुखरयति मोहाय जगतः ।

ज्याचें सामर्थ्य केवळ अतर्क्य आहे अशाबद्दल असल्या अस्थानी कल्पना काढणें म्हणजे जगताला भुरळ घालण्यासाठीं कांहीं मूर्खांनीं आपली जीभ लांबवणें आहे.

अनिबिझांट बाईची तयारी तर याहि पलिकडील आहे. रासक्रीडेसंबंधांत ती म्हणतेः—

" In all ages love between husband and wife has been the Symbol of union between the supreme and his devotees:—Where will you find a better image of the merging of the soul in its God ?

What but an unclean mind can see aught that is impure in the child dancing as lover and beloved ? It is as though he looked forward down the ages, and saw what later would be said, and it is as though he kept the child form in the Lila, in order that he might breathe harmlessly into men's blind unclean hearts the lesson that he would fain give.

\+ + + +

Let us turn from this, remembering that still the nineteenth century this story provoked only devotion not ribaldry; and it is only with the coming in of the grosser type of western thought that you have these ideas put into the Bhagvat Purana. I would to God that the Rishis had taken away the Shrimad Bhagvat from a race that is unworthy to have it; that as they have already withdrawn the greater part of the Vedas, the greater part of the ancient tooks, they would take away also this story of the love of Shri Krishna, until men are pure enough to read it without blasphemy and clean enough to read it without ideas of sexuality.

भावार्थः—" अनादिकालापासून भज्य आणि भजक यांतील ऐक्य दाखविणें म्हणजे दांपत्यप्रेमाचाच दाखला घेतला आहे. कारण जीवाचे परमात्म्याशीं एक जीव होऊन जाण्यास याहून अधिक समर्पक उपमा आणावी कोठून ? "

दुसरी गोष्टः—" कृष्ण म्हणजे सात वर्षांचें तर मुळीं पोर. तें पोरींशी नाचलें बागडलें—नव्हे,—आशुक माशुक खेळलें, तरी त्यांत कांहीं निंद्य आहे, असें पाप्यांशिवाय दुसऱ्या कोणास भासणार ? तरी बरें, कीं त्या दूरदर्शी प्रभूला जणू कळून चुकलें होतें कीं, पुढील युगांतील शहाणे आपणास नांवें ठेवतील आणि म्हणूनच कीं काय, ज्ञानहीन व पापी मनुष्यांना इष्ट उपदेश देण्यासाठीं, रासक्रीडेचे काळीं तो कुकुलाबाळच राहिला—सोळवर्षा वळ झाला नाहीं. "

" पुरे पण, हा विचार नको; एवढेंच मात्र ध्यानांत ठेवावें कीं, आजच्या या एकूणिसावे शतकांत तुमच्यावर पश्चिमेकडील रजोगुणी विचारांची छाप पडण्याच्या पूर्वींपर्यंत भागवत पुराणांतील या रासलीलेचें वर्णन ऐकून या देशांत कोणाहि मनुष्याचे हृदयांत कामवासना किंवा चावटपणा उभा न राहतां केवळ भक्तिभाव मात्र बळावत असे. हरि !

हरि ! ऋषि जनहो, आपण आजकालच्या असल्या या अपात्रांच्या हातीं आपलें श्रीमद्भागवत लागूं दिलें, यापेक्षां तें लपविलें कां नाहीं ? नाहीं तरी तुम्ही बरेचसे वेदाचे भाग, पुष्कळसे पवित्र पुराणग्रंथ लपविले आहेतच ना ? मग त्याचप्रमाणें या प्रभुकृष्णाच्या प्रेमलीला निंदेवांचून व काम दृष्टीवांचून वाचण्या इतपत मनुष्यें निर्मल व पवित्र होईतों, हा भागवत ग्रंथहि आड कां करांना ? दुसरें आतां काय म्हणूं ?"

या बाईला या लीलांबद्दल इतका कढ घेऊन बोलण्याला कोणी जबरी केली होती, याचा विचार वाचकांनींच करावा.

पुनः कृष्णावतारांतील **गोपी वस्त्रहरण** व रासक्रीडा या संबंधांत ती ह्मणते.—

"They came and worshipped and he gave them back their robes. An immoral story, with a child of six as the central figure. He is spoken of as though he were a full-grown man, insulting the modesty of women.

But there is a profound occult lesson below the story-viz. when the soul is approaching the supreme Lord at one great stage of initiation, it has to pass through a great ordeal; stripped of all external aid or covering, the soul itself must stand naked (before the Lord). And it is that nakedness of the soul as it approaches the supreme goal, that is told of here."

\+ + + +

" गोपी येऊन श्रीकृष्णाचें वंदन करितांच त्यानें त्यांचीं वस्त्रें परत केलीं. हें ऐकून आजकालचे शहाणे रोमांचित होऊन कानांत बोटें घालतात व 'शांतंपापं' म्हणून ओरडत सुटतात. परंतु, त्यांना असें कळत नाहीं कीं हा प्रकार करणारा खेळाडु केवळ सहा वर्षांचा अर्भक होता. तरुणींची बेहुर्मत करण्यास योग्य असा कोणी टोण्या नव्हता.

शिवाय या वस्त्रहरणाचे बाह्यांगीं गोष्टींत फार गूढ सत्य भरलें आहे. तें हें कीं, जीव हा परमेश्वराशीं एकीभाव पावतांना अशा एका अवस्थेला येऊन पोंचतो कीं, त्याला सर्व बाह्योपाधींचा त्याग करून केवळ नंगेच बनावें लागतें व तेव्हांच तो प्रभूशीं समरस होऊं शकतो. आणि हाच धडा या गोष्टीनें दाखविला आहे. या पलीकडे, यांत पांचटपणाचा हेतु मुळींच नाहीं."

याहून लीलाधारी पूर्णपरब्रह्म प्रभूच्या कृतीचें समर्थन अनेक मार्गांनीं करितां येईल. परंतु विस्तार फार होतो. याबद्दल आंवरतें घेतों. पण दोन गोष्टी सांगणें भाग आहे. एकतर श्रीकृष्ण किंवा गोपी यांपैकीं कोणीहि जर आजकालचे लंपट जीवांचे वर्गांतील असतीं तर जन्मपर्यंत त्यांचे हे चाळे जातेना. पण कृष्णानें मथुरा सोडल्यावर त्या गोपी इतर पुरुषांशीं संसक्त झाल्या किंवा कृष्णहि द्वारकेंत कोणाच्या गरती धुंडीत सुटला आहे, असें कोठें लिहिलें नाहीं. वास्तविक पाहतां एकदां जो जीव चटावला त्याला मग क्ष काय आणि ब काय ? वासनापूर्तीशीं कारण. दुसरी गोष्टः—बहुधा स्त्रीस्वभाव मोठा प्रेमांतरासहिष्णु असतो. एकाच पुरुषावर दोन स्त्रियांना राजरोस वैवाहिक विधीनें प्रेम करण्यास हक्क असतांहि एकमेकी परस्परांस पाण्यांत पहातात. आणि तें ठीकच आहे व्यंकटाध्वरींनीं 'लक्ष्मीसहस्रांत' म्हटलें आहे " **द्वयोरेकत्रेच्छा जनयति मिथोद्वेषमधिकम्,** " 'एकेच वस्तूवर दोघांचा डोळा असला म्हणजे परस्परांत द्वेष वाढतो.' आणि येथें तर एकाच लालावर

किती तरी उमेदवारिणी आषक होत्या. तथापि, त्यांत कधीं आपसांत वैर किंवा द्वेष उत्पन्न झाल्याचें वर्णन नाहीं. आतां कवींनीं प्रणयेर्ष्येचीं वर्णनें क्वचित् दिलीं आहेत. पण तीं विनोदाचे सदरांत जातात. द्वेष किंवा अदखाईत येत नाहींत. बरें हेंहि असो; त्या पोरींचे नवरे कांहीं कृष्णावर आषक नव्हते. त्यांना जर हा पोरटा आपल्या बायका भ्रष्ट करतो असें दिसून आल असतें, तर ते असल्या भ्रात्य पोरट्यास चोपून काढायला कमी करते काय? किंवा पोरटा दुसऱ्याचा. पण सत्तेच्या बायका होत्या त्यांचे खून करण्यास कमी करते काय? कारण फौजदारी कचेरींत, कोठेंहि दप्तरें चाळलीं तरी कनक आणि कांता—त्यांतू हि स्त्रियांचें जारकर्म—हाच खुनाला प्रधानहेतु दिसून येतो. पण अशांतला कांहीं प्रकार त्या गोपानीं केल्याचें. कोठें वर्णन नाहीं. यावरून काय समजावें?

आणखी पुरावा:—कृष्णाशीं गट्टी करणाऱ्या इतर कितीहि झाल्या तरी राधे इतकी थेट कोणी भिडली नसेल पण ब्रह्मवैवर्त पुराण जो वाचील त्यास ही राधा म्हणजे एवढी असेल तरी कसली असें होऊन जातें. तथापि, त्याच ब्रह्मवैवर्तांत श्रीकृष्णानें याच आपल्या प्राणवल्लभेला आ यात्मिक ज्ञानोपदेश दिल्याबद्दल विशेष वर्णन आहे. आम्ही एवढेंच विचारतों कीं, आजकाल आडगल्ली भटकणाऱ्या एखाद्या इष्की गुलजारानें एखाद्या छेलबटाऊ मोहनेला अशा प्रकारचा उपदेश दिल्याचें कोठें आढळांत आहे काय? स्वामी विवेकानंदांनीं आपल्या भक्तियोगांतहि एका गोपीबद्दल अवतरण दिलें आहे:—

'तदप्राप्ति-महादुःखविलीनाशेषपातका ।
निरुच्छ्वासतया मुक्तिंगतान्या गोपकन्यका ॥

म्हणजे, श्रीकृष्णाचे विरहाग्नीनें तिचीं सर्व पातकें भस्म होऊन जाऊन ती गोपकन्या **मुक्त झाली**. हें सामर्थ्य आजकालच्या कोणा बदफेलींत आहे काय?

वर आह्मी दाखविलेंच आहे कीं, रामानुज, श्रीचैतन्यासारखेहि भक्त कृष्णाचे रासलीलेचे चाहते होते. स्वामी जयदेव याच्या अष्टपद्या व त्यांबद्दलची आख्यायिका सुप्रसिद्ध आहे. या अष्टपद्या म्हणजे आमचे दूषकांना केवळ नाकाला पदर लावावयाचा प्रसंग. परंतु, त्यांचे अखेर शेरे पाहिले तर '**इतिजयदेवे कृतहरिसेवे भणति परम रमणीयं**।' याप्रमाणें, ही केवळ हरिसेवा आहे, असें शुद्ध भावानें म्हटलें आहे. आजकाल वऱ्हाडांतील सुप्रसिद्ध वरदी कवी '**गुला॰राय**' कात्यायनी व्रत करितात. व स्वतः मळवट भरून बांगड्या भरितात. स्वामी **रामकृष्ण-परमहंसहि** परमात्मा भोक्ता व आपण भोग्य अशी भावना ठेवीत व **स्त्रीवेष**[१] घेत असत. मीराबाईची गोष्ट तर सुप्रसिद्धच आहे. "विसरूं कसा मी गुरुपादुकाला" हे सुप्रसिद्ध श्लोक ज्यांचे तोंडचे, ते परमविरक्त साधु जालवणकर नारायण महाराज यांनीं देखील श्रीकृष्णाचे द्वाडपणाचें व गोपीविलासाचें अत्यंत प्रेमळपणानें वर्णन केलें आहे. पण त्या पदांचा अखेर शेरा असा आहे "म्हणे नारायण हाचि निरंजन, याचा अंत न

---

१ *(वृंदावनांतील राधागोपीसारखी अव्यभिचारिणी भक्ति साधण्याकरितां)* **रामकृष्ण परमहंसांनीं** *कित्येक दिवस* **स्त्रीचा वेष सुद्धां** *परिधान केला.*

**(सुलभवेदांत, पान ३५ पहा)**

पार" आणि गोपींचे कृतीचें रहस्य सांगतांना ते म्हणतातः—"काम एवहि गोपीनाम् निजधामप्रदोऽभवत् " ॥ प्राकृत ॥ गोपी असतां कामिनी । करोनी कामाची अडसणी । कृष्णरंगीं रंगोनीं । जोडिलें प्रेम ॥ ५२ ॥ काम गेला विरोनी । प्रेम राहिलें भरोनि । त्याच प्रेमें श्रीकृष्णचरणीं लीन झाल्या ॥ ५३ ॥ निमित्त करोनी काम । निरालंबी ठेविलें प्रेम । जैसा गगनीं धरणीचा विश्राम । आडयोगें ॥ ५४ ॥ तो काम झाला निष्काम । भोग झाला उपरम । ऐशी या प्रेमें परम धाम । पावत्या झाल्या ॥ ५५ ॥

( परमार्थदीपिका )

सारांश, या भक्तरहस्याच्या गोष्टीचा निर्णय करणें हा प्राकृतांचा अधिकारच नाहीं.

गोपी या जर श्रीकृष्णाकडे केवळ परमात्मभावानें जात होत्या आणि त्यासाठींच त्यांनीं अवतार घेतला होता असा स्पष्ट उल्लेख आहे, तर त्यांनीं एक वेळ घरच्याबद्दल बेपर्वाई दाखविली तरीहि क्षम्य आहे.—भगवंतीं घडे जेणें अंतराय । होका बाप, माय त्यजावीते ॥ येरा प्रिया पुत्रा असे कोण लेखा । करिती ते दुःखा पात्र शत्रु ॥ १॥ इत्यादि अभंग प्रसिद्धच आहेत. आम्हांस वाटतें कीं, हा आमचे साधूंचा उपदेश खिस्ताचे उपदेशापेक्षां थोडा सौम्यच आहे. खिस्त आपले शिष्यांस म्हणतोः—

" If any man come to me and hate not his father and mother and wife and children and brother and sisters-yea-and his own life also, he cannot be my disciple. "

म्हणजेः—( खिस्त म्हणतो ) मातापिता, स्त्री ( पति ) पुत्र, बंधु, भगिनी, इतकेंच नव्हे, तर स्वतःचे प्राण देखील तुच्छ केल्याशिवाय जर मजकडे कोणी येईल, तर तो माझा शिष्यच नव्हे. तेव्हां कृष्णदूषकांनीं याहि वाक्यांचा विचार करावा.

अस्तु, विषय फार लांबला. आतां तरी वाचकांची खात्री झाली असेल कीं, श्रीकृष्णाला दिलेलीं दूषणें अयोग्य आहेत व त्याचें विमल यश अबाधित चमकतें आहे व " स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रा येचान्ये पापयोनयः " । किंवा, अपिचेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् साधुरेव स मंतव्यः " । असें अखिल जगताला नगारा वाजवून सांगणारा गृहस्थ, पातकी, बाऱ्या किंवा पाजी नसून खरा खरा जगदुद्धारक व अशेषजनसंसेव्यच आहे.

" यद्यदाचरतिश्रेष्ठस्तत्तदेवेतरोजनः ।
सयत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ।"
" मम वर्त्मानुवर्तंते मनुष्याः पार्थ सर्वशः " ।

याप्रकारें आपलें लोकमान्यत्व, व उदाहरणीयत्व स्वमुखानें आपले शिष्यांस ठांसून सांगणारा गृहस्थ, आपणच असें अपवादक व दुष्यवर्तन करील. असें संभवतें काय ? याचा सुज्ञांनीं विचार करावा.

याच सगुण परब्रह्मानें गोकुलांत जी रासक्रीडा केली तिच्यांत पाश्चात्यांना किंवा आमच्यांतील कांहीं आधुनिकांनाही बाष्कळ दिसणाऱ्या ' गोपी प्रेमाबद्दल ' भक्त साधु

किंवा विचारी लोकांत किती आदर आहे व त्यांचे दृष्टीनें त्याचें आध्यात्मिक महत्व केवढें आहे हें आम्ही येथवर अनेक उतारे देऊन सिद्ध केलें आहे, तथापि आणखीहि एक उतारा देतों. हा उतारा सर्वमान्य साधु कबीर यांचा आहे. कबीराची निस्पृहता, सत्यप्रियता, व बाणेदारी हीं सर्वमान्य व सर्वश्रुत असल्यानें आम्ही हा उतारा मुद्दाम देत आहों. कबीर म्हणतातः—

> " कबीर कबीर क्या करो, जावो जमनाके तीर " ।
> " एक एक गोपीके प्रेममें हो गये कोटि कबीर " ॥

यमुनातीरस्थ एक एका गोपीचे प्रेमापुढें कोटि कबीरांचें प्रेम ( ईशभक्ति ) फिकें आहे ! या कबीराचे साक्षीपुढें कोणाचा वाचाळपणा चालेलसें आम्हांस तरी वाटत नाहीं.

परमविरक्त व पूर्णनिर्विषयी योगिसम्राट् श्रीज्ञानेश्वर महाराज यांनींहि भगवद्गीतेच्या बाराव्या अध्यायांतील चवदावे श्लोकावरील आपल्या भावार्थ टीकेंत देवाला भक्त कसा आवडतो तें सांगतांना, श्रीकृष्णाचे मुखानें पुढील ओवी वदवली आहेः—

> ' अर्जुना तो भक्तु । तो योगी, तोचि मुक्तु ।
> तो वल्लभा मी कांतु । ऐसा पढिये ॥

हिचें ' साखरे ' कृत भाषारूपः—

" अर्जुना, तोच भक्त, तोच योगी आणि तोच मुक्त. फार काय सांगावें ! तो स्त्री व मी पति इतका मला तो आवडता आहे !

अर्थात् पतिपत्नी प्रेम हीच मानवी प्रेमाची किंबहुना—सर्व प्रेमाची—परिसीमा आहे. हिच्यापुढें वाणीचा प्रसरच बंद पडतो आणि यामुळेंच गोपिप्रेम हें कोणाहि खऱ्या मर्मज्ञ भगवद्भक्तांस उपहास्य न वाटतां उदाहरणीयच वाटतें यांत नवल नाहीं.

श्रीकृष्णावर जसे आक्षेप आहेत, तसेच तदुक्त ' गीतेवर ' हि आहेत. आधुनिकांपैकीं कित्येक विद्वान् ' गीता ' ही प्रक्षिप्त व अप्रासंगिक आहे असें म्हणतात. यांपैकीं गीता प्रक्षिप्त म्हणणारांस विवेकानंद म्हणतात.

The worship of Krishna is much older than that of Budha, and if the Gita be not of the same date as the Mahabharat, it is surely much earlier and not later. The style of language of the Gita is the same as that of the Mahabharat. Most of the adjectives used in the Gita to explain matters spiritual are used in the Vana and other Parvas of the Mahabharat, respecting matters temporal. Such coincidence is impossible without the most general and free use of these words at one and the same time. Again the line of thought in the Gita is the same as in the Mahabharat.

*सारांशः—कृष्णभक्ति ही बुद्धाचे बहुत पूर्वींची आहे. व गीता ही महाभारताचे बैठकीलाच लिहिली नसलीच तर तत्पूर्वींच लिहिली आहे, पश्चात् घुसडलेली नव्हे.* गीतेंत जे आध्यात्मिक दृष्टीनें कांहीं शब्द वापरले आहेत, तेच वन व इतर पर्वांत व्यावहारिक दृष्टीनें

वापरले आहेत. ही गोष्ट तीच भाषा उभय ग्रंथांचे वेळीं प्रचलित असल्या शिवाय होणें नाहीं. शिवाय भारताची व गीतेची विचारसरणी अगदीं एक आहे.

आतां गीता अप्रासंगिक म्हणजे गीतेसारख्या गंभीर व अविकंपयोगाचा उपदेश कृष्णासारख्या शहाण्यानें रणभूमीवर लढाईच्या ऐन गर्दींत केला असेल हें संभवतच नाहीं, असें म्हणणारांस उत्तर पाहूं.

ब्रूकस लिहितोः—

" Whether we consider the Book ( The Gita ) as actual History, or prefer to look upon it as a gem of mystic Teaching introduced by Veda Vyasa as an episode in his immortal epic, the choice of the setting is too unusual not to be deliberate.

Why did Shri Krishna choose such an unquiet moment " प्रवृत्ते शस्त्रसंपाते, " when he had and would have, countless opportunities of initiating His life-long friend at leisure, in some quiet secluded spot ?

" We, would be Yogis, almost instinctively seek communion with God in *outer* quiet and silence and clean *forget* Him in the heat of action; whereas, Shri Krishna, the perfect Yogi, is thrown into most intimate communion with His cosmic self precisely at the moment of most strenuous action, by the taking up of the heaviest responsibility. Else he is quite content-knowing the Depths, secure to linger on the surface of Himself. Not until we become conformed to His type and can commune with God most closely in most strenuous action, do we in turn become true Yogis. "

( सारांश )—" गीता हा इतिहास समजा किंवा व्यासांनीं आपल्या अजरामर काव्यांत गुंफलेलें गुह्य विद्यारूप रत्न समजा, त्याला दिलेलें कोंदण मात्र इतकें विलक्षण आहे कीं तें मुद्दाम योजूनच दिलें असलें पाहिजे.

अर्जुन हा कृष्णाचा मित्र असल्यानें त्याला उपदेश करण्याला दुसरे शेकडों प्रसंग मिळण्याजोगे असून ऐन शस्त्रांची कचाकची सुरू झाली आहे, असल्या अस्वस्थ वेळीं असला गंभीर उपदेश करण्यांत कृष्णाची चतुराई काय ?

चतुराई हीच कीं, आम्हा प्राकृतांना आत्म्याशीं एकांत करण्यास अगदीं निवांत स्थळ लागतें, परंतु कामाचे गर्दींत आम्हांला आत्म्याची विस्मृति होते. पण खरा योगी जो होणारा, त्याला चहूंकडून काहूर उसळलें असतांहि अभंगशांति राखतां येणें जरूर आहे; व हें सोदाहरण शिकवावें म्हणूनच कृष्णानें हा समय योजिला. " [ स्थिर जलांतच पोहावयास शिकलेला, खवळलेल्या नदींत गांगरून जाण्याचा संभव आहे; परंतु मूळच त्याला क्षुब्ध समुद्रांत शिकविलें असल्यावर चिंताच उरली नाहीं, हें उघड आहे.

याच मुद्यावर विवेकानंद म्हणतात कीं:—

" *He who in the midst of the greatest activity finds the sweetest peace, and in the midst of the greatest calmness is most active, he has known the secret of life.* " Krishna shows the way how to do this.

म्हणजे, ऐन लगबगींत जो मधुर शांततेचा अनुभव घेऊं शकतो व बाह्यतः अत्यंत

स्वस्थ दिसत असतां अंततः पूर्ण व्यापृत असूं शकतो, त्यालाच आयुष्यांतील रहस्य कळलें म्हणावें. हें रहस्य ओळखण्याचा मार्ग श्रीकृष्णाला माहीत आहे.

असो; विस्तार फार झाला. येथपर्यंत आम्हीं आमचे इतिहासाची प्राचीनता, वेदांचें अपौरुषेयत्व, आमचे इतिहास ग्रंथांचे अल्पत्वाचीं कारण, महाभारत रामायणादिकांचें अनुपम इतिहासत्व, त्यांची उपयुक्तता, हे ग्रंथ कल्पित कीं ऐतिहासिक याचा निर्णय, भारताचे परिशिष्ट म्हणविलें जाणाऱ्या हरिवंश पुराणाबद्दल विचार, तद्वत श्रीकृष्णाचें स्वरूप, त्याचा उगम, श्रीकृष्णचरित्रावर येणारे अपवाद व त्यांचें निरसन, श्रीमद्भगवद्गीतेची योग्यता, तिजवरील प्रक्षिप्तत्व व अप्रासंगिकत्व या दोन आक्षेपांचा परिहार, इत्यादि अनेक विषयांचा यथामति उहापोह केला. इतकी काथ्याकूट करून व वाचकांचा वेळ घेऊन आम्हांस कर्तव्य काय? असा कोणी प्रश्न करील, तर त्यास उत्तर असें आहे कीं, एक तर आम्हीं आज सहा सात वर्षें परिश्रम करून एक ओझेंभर वजनाचा ग्रंथ वाचकांचे पदरीं घालीत आहोंत व त्याचेबद्दल त्यांजपासून त्यांनीं निढळचे घामानें मिळविल्यापैकीं वीस पंचवीस रुपये घेत आहों; या व्यवसायाचें महत्व काय व आम्ही जो माल त्यांचे पदरीं बांधला आहे त्याचें खरें मूल्य काय आहे, हें त्यांचे नजरेस यावें व वाचकांस योग्य विनिमयावांचून द्रव्यव्यय करावा लागत नाहीं हें त्यांच्या प्रत्ययास यावें हा एक आमचा उद्देश. पण, हा उद्देश म्हणजे, आमचे कृतीची सफाई करून दाखविण्याचा उद्देश, हा केवळ गौण आहे. या विवेचनाचा प्रधान उद्देश विचारला असतां एकच आहे. तो हा कीं, आमचे हिंदुस्थानाला जर बरे दिवस यावयास पाहिजे असतील तर त्यांनीं आपले पुराण ग्रंथांचाच आश्रय केला पाहिजे; व तसें केलें असतां हे ग्रंथ भक्तांचा उद्धार करण्यास समर्थ आहेत, हें दाखविणें. याकामीं आम्ही महाभारत व भगवद्गीता यांस, परके किती मान देतात हें थोडेसें वर दाखविलेंच आहे. आतां जुन्या ग्रंथाचे अध्ययनाचे योग्यतेबद्दल सामान्य सिद्धांत सांगतों.

प्रोफेसर मॅक्सम्यूलर म्हणतातः—

"A people that can feel no pride in the past, in its history and literature, loses the main stay of its national character. When Germany was in the very depth of degradation, it turned to its ancient literature and drew hope for the future from the study of the past."

भावार्थः—"ज्या लोकांना आपला गतकाल, जुना इतिहास व आपले पुराणवाङ्मय याबद्दल अभिमान वाटत नाहीं, त्यांचे राष्ट्रीयशीलाला मुख्य अधिष्ठान तेंच नाहीं. जर्मनी ज्या काळीं अवनतीचे तळास पोंचला, तेव्हां त्या देशानें आपले पुराणवाङ्मयाचा परिचय करून त्या पासून भावीकालाकरितां उमेद पैदा केली."

आणि हिंदुस्थानाला जर पुनरुन्नतीची इच्छा असेल तर त्यालाहि ह्याच मार्गाचा अवलंब केला पाहिजे, म्हणजे आपले पुराणग्रंथांचाच परिचय केला पाहिजे.

येथें आमचे नवीन शिकलेले लोक अशी शंका काढितात कीं, कसलेहो तुमचे पुराणग्रंथ—त्यांत काय आहे. आजकालचें युरोपचें, अमेरिकेचें वैभव पहा, त्यांतलें या ग्रंथांत कांहीं आहे काय? येऊन जाऊन, देव आणि धर्म. त्याला घेऊन काय करावें? तर या शंकेला उत्तर असें आहे कीं, एकतर त्यांत युरोप अमेरिकेंतील आजकालची मोहक सुधारणा, साधन-

समृद्धि यांची गुरुकिल्ली नसेल, (बाकी ती नाहीं असें नाहीं, तीहि आहेच.) तथापि, त्या सुधारणेसारख्या अनेक सुधारणांचे बारशाचे आणि बाराव्याचे इतिहास त्यांत आहेत; कीं जे वाचले असतां आजकालचा हा उत्कर्षम्हणजे, "तुरतुरं फुरफुरं तीन मासं" अशांतला दिसतो व तेणेंकरून आपल्या सांप्रतच्या अवनतीबद्दलचें दुःख व इतरांच्या क्षणिक भरभराटीची स्पर्धा नाहींशी होऊन वृत्ति स्थिर होते. आणि तेणेंकरून अर्जुनाला भगवंतांनीं महत्कार्याचा अगदीं पहिला धडा म्हणून शिकविलेली 'सुखदुःखेसमेकृत्वा' ही स्थिति बाणते व ती बाणली म्हणजे या जीवनसंग्रामाला बेदिक्कत तोंड देण्याची उमेद येते. आणि ही कांहीं हलकी गोष्ट नव्हे. पुराणांचे अवलोकनानें, हें ब्रह्मांड म्हणजे केवढी अफाट गोष्ट आहे; याच्या कर्त्याचें अनंतशक्तित्व कसें आहे; या सर्वंकष कालाचे दाढेंत कशाकशांचा चुराडा झाला; इत्यादिक, क्षुद्र मानवांचे अकलेला थक्क करून सोडणाऱ्या गोष्टी समजतात; व त्या समजल्या म्हणजे ओघानेंच या सकल प्रपंचाचा कर्ता जो अपरिमेय व अतर्क्यशक्ति परमात्मा त्याचे भक्तीकडे अंतर्याम ओढतें व तसें झालें म्हणजे सहजच सांसारिक दुःखांचा विसर होऊन वृत्ति 'आनंदमग्न होते. आणि याहून दुसरें काय पाहिजे? मात्र या कामीं हे ग्रंथ शोधक व गुणग्राहक दृष्टीनें वाचले पाहिजेत. म्हणजे त्यांविषयीं आदर उत्पन्न होण्यास रहाणार नाहीं पण आजकालचे कित्येक लोक पहावे, तों पुराणें म्हणजे बाडें आहेत, त्यांत कांहीं तरी असंभाव्य, लंब्यालंब्या गप्पा लिहिल्या आहेत, त्यांत कशास कांहीं मेळ नाहीं. काय म्हणे '**सप्तद्वीपा वसुंधरा**' आजचे भूगोलांत तर चारच खंडें आहेत. फार तर आस्ट्रेलिया जमा धरा, तरी सात कोठें आहेत? असें ते विचारितात. पण पुराणें सांगतात कीं, जलप्रलय झाला त्यांत कांहीं बुडालीं. "पूर्वीं विमानें होतीं, किमया होती, अचाट योगबलें होतीं." या सर्व गोष्टी अशांना मिथ्या वाटतात. परंतु जे शोधकपणानें अभ्यास करितात त्यास पुराणांतील प्रत्येक गोष्ट सत्य आहे असें कळून येतें. हीं सात द्वीपें व जलप्रळय व पुराणकालीं—म्हणजे पांच किंवा दहाहजार वर्षांपूर्वीं नव्हे, तर जवळ जवळ नऊ लक्ष वर्षांपूर्वीं या सृष्टीची स्थिति कशी होती, याबद्दल कांहीं पुराणसंशोधकांचे ग्रंथांतील उतारे देतों.

"Seven Great continents and (seven great Races.). I need not trouble with the first of these two continents, the men whereof were embryos of humanity. But there are four great continents that I would ask you to glance at, for a moment: two of the past that have largely vanished; one of the present that is threatening to change; one of the future that is beginning to emerge. The names are all given in the Puranas; but they are there one after another, without caring whether they be of the past or the future. They are then recognised as part of the world story and each has its own name. Three of them you will recognise: The two of the past and the one of the present. The first Lemuria, which streched where now the Pacific rolls Australia forms the southern part of that mighty continent. New zealand also was related to it; Easter Island was a mountain top, the rest submerged beneath the ocean The Madagaskar was also a part of that great land; and so up northwards where the mighty Pacific ocean stretches, there in far off

days lay the continent of Lemuria, which the great German, Hœckel speaks of as the cradle of the Human race. + + +

It has passed away. It was destroyed by Volcanic outbreaks, by fire, by tremendous Explosions, as the Sea rushed into the Gulfs rent by the subterranean fires. And so Lemuria was torn into pieces and vanished; ı aving played its past and the mighty waves rolled over it, leaving only here and and there a remnant, and a tradition in the older story· of mankind.

Then growing humanity passed from then. Lemuria to another continent that has also disappeared, the continent that stretched from Europe to America, the mighty continent of Atlantis Atlantis after having sent its children over the whole world of to-day also perished, whelmed under floods, leaving myths and legends behind in many a country. The flood of Noah, the flood of Ducalion, and many other stories spread over practically the whole world.

Then another great continent slowly rising was prepared for the habitation of the next great Race, the fifth. Europe, swampy for ages after it rose above the level of the Sea, began to be prepared for inhabitants that should live upon its surface. The great country of Hindustan rising also south of the Himalayas, was, for long, one mass of swamp uninhabitable by man, until before the Aryans entered it. Some of the outlying nations of the Atlantean people had poured through the Him. alayan Ranges, and made a mighty civilisation, where now India stretches and her Aryan people are found. The fifth race, the Aryans, was taken away from Altantis *nearly 80,000 years before the Chrtstian era,* led out by their leader *the Manu,* stopping for a short while in Arabia, then Northwards to the North of Asia and finally settling where now the Gobi Desert spreads, where at that time was a great island sea, and the land was fertile, fitted for the dwelling and the support of a huge population. That was the cradle-land of our race. Let me turn to the coming continent, which according to H. P. Blavatsky is to rise above the waves of the Pacific, where Lemuria disappeared. *The British association for the Advancement of science* holds that that continent is already beginning to rise. The rapid emergence of the Bogoslog Islands, near Alaska has caused some alarm among geologists; for, they think that if the new continent should emerge at the same rate at which these islands have arisen, a tidal wave would be created which would practically engulf the whole world in a flood, to which the flood, of Noah was but as nothing.

The new continent is to stretch from the Philiphine Islands, Japan, and the Atlentian Islands to the Islands of south-eastern Asia, the Malaya Peninsula and Borneo, being about some 4000 miles long, so far as the fomative forces are concerned.

" *The Immediate future.* "

"सप्तद्वीपांपैकीं पहिलीं दोन द्वीपें मानवी जातीच्या बाल्यावस्थेंतील लोकांनीं वसलेलीं, असल्यामुळें त्यांच्याबद्दल फारसा विचार करण्याचें कारण नाहीं. परंतु पुढील चार द्वीपें

महत्वाचीं असून त्यांच्याबद्दल विचार करणें जरूर आहे. त्यापैकीं दोन तर पूर्वींचीं असून तीं बहुतेक नामशेष झालीं आहेत. हल्लींचें एक नाहींसें होण्याच्या बेतांत आहे; व एक भविष्यकालीन असून त्याचा उदय व्हावयाचा आहे. या सर्वांचीं नांवें पुराणांत दिलेलीं आहेत, परंतु तीं भूतकालीन किंवा भविष्यकालीन यांचा विचार न सांगतां त्यांचीं नांवें एकापुढें एक दिलीं आहेत. सृष्टीच्या उत्पत्तिवर्णनापैकीं तो एक भाग असून त्यांचीं नांवें पृथक् आलेलीं आहेत. त्यापैकीं पहिलें **लेमूरिया**. हें आज ज्या ठिकाणीं पासिफिक महासागर आहे त्या जागीं होतें. त्या अफाट द्वीपकल्पाचा आस्ट्रेलिया हा दक्षिणभाग होय. न्यू झीलंड हें त्याशीं संलग्न होतें. ज्याला हल्लीं ईस्टर आयलंड म्हणतात, तें पूर्वीं एक पर्वतशिखर असून त्या द्वीपकल्पाचा बाकीचा भाग समुद्राच्या पोटांत होता. माडागास्कर हाही त्यापैकीं एक भाग होता. अशा रीतीनें तें द्वीपकल्प पूर्वीं थेट उत्तरेकडे पासिफिक महासागरापर्यंत पसरलें होतें. हें द्वीपकल्प हीच मनुष्यजातीची आद्य जन्मभूमि, असें प्रसिद्ध जर्मन पंडित हेकेल म्हणतो. हें द्वीपकल्प ज्वालामुखी पर्वत, अग्नि वगैरे उत्पातांमुळें नामशेष झालें व एकाकालीं अस्तित्वांत असलेल्या या द्वीपकल्पाचा बहुतेक भाग समुद्राच्या पोटांत गडप झाला असून त्याचे कांहीं भाग मात्र अवशेष राहिले आहेत. व त्यावरून मनुष्य जातीच्या प्राचीन स्थितीचें फक्त अनुमान करतां येतें.

पुढें मनुष्यजातीची वाढ झाल्यामुळें तिनें दुसऱ्या द्वीपकल्पाकडे मोर्चा फिरविला, परंतु हेंही आज अस्तित्वांत नाहीं. हें दुसरें द्वीपकल्प, **आटलांटिस** असून त्याचा विस्तार अफाट म्हणजे यूरोपापासून अमेरिकेपर्यंत होता. कालांतरानें यांतील मनुष्यें सर्व पृथ्वीभर पसरल्यानंतर तेंही जलप्रलयानें नष्ट झालें. नोव्हाचा जलप्रलय, डुकेलियनचा पूर वगैरे अनेक दंतकथा यासंबंधानें जगांत प्रचलित आहेत.

या नंतर कांहीं कालानें यूरोप हें द्वीपकल्प पांचव्या मानववंशाच्या वसतिस्थानासाठीं उदयास आलें. समुद्रांतून उत्पन्न झाल्यानंतर बराच कालपर्यंत यूरोप हें दलदलीचें ठिकाण होतें. त्याचप्रमाणें हिमालयाच्या दक्षिणेस उद्भूत झालेलें हिंदुस्थान हेंही दलदलीचें अतएव मनुष्यवस्तीस नालायक होतें व त्या ठिकाणीं आटलांटिस द्वीपकल्पांतील अनेक लोकांनीं हिमालयांतून हिंदुस्थानांत प्रवेश केला व तेथें आपली उच्च संस्कृति स्थापित केली. पुढें कालांतरानें या जागीं आर्य लोकांनीं प्रवेश केला व हेंच हल्लींचें हिंदुस्थान व त्या ठिकाणीं आर्य लोक आहेत. आर्यांचा वंश पांचवा मानववंश असून आटलांटिस द्वीपकल्पामधून तो खिस्ती शकापुर्वीं सुमारें ८०,००० वर्षांपूर्वीं बाहेर पडला. आर्यांचा मुख्य नायक मनु होता. आर्य लोक अरेबिया, आशियाखंडाचा उत्तरेकडचा प्रदेश, यांत कांहीं दिवस मुक्काम करून अखेरीस आज ज्या ठिकाणीं गोबी नांवाचें अरण्य आहे त्या ठिकाणीं कायमची वस्ति करण्यास गेले. त्या काळीं तेथें समुद्र असून तेथील जमीन सुपीक होती. एकंदरींत तें लोकसंख्येच्या वाढीला व राहण्याला योग्य स्थान होतें. व तीच आमची जन्मभूमि होती.

आतां भविष्यकाळच्या द्वीपकल्पाकडे वळूं. मॅडम ब्लॅव्हॅट्स्की यांच्या मताप्रमाणें हें द्वीपकल्प पुर्वीं ज्या जागीं लेमूरिया द्वीपकल्प नामशेष झालें, त्या जागीं पासिफिक महा-

सागराच्या पोटांतून बाहेर पडणार आहे. शास्त्रीय ज्ञानाच्या वृद्धीसाठीं विलायतेंत निघालेल्या ब्रिटिश असोसिएशनच्या म्हणण्याप्रमाणें हें द्वीपकल्प हल्लींच उदय पावूं लागलें आहे. आलास्का शेजारीं बॉगोस्लॉफ नामक बेटें उत्पन्न झालीं आहेत व यामुळें भूगर्भशास्त्रवेत्त्यांना मोठी भीति वाटूं लागली आहे. कारण त्यांचें मत असें आहे कीं, जितक्या झपाट्यानें हीं बेटें उद्भूत झालीं इतक्या झपाट्यानें हें भावी द्वीपकल्प तयार झालें तर त्यामुळें एवढा जलप्रलय होईल कीं, त्या योगानें सर्व जग बुडून जाण्याचा संभव असून, नोहाचा प्रलय हा त्याच्यापुढें कःपदार्थ आहे, असें म्हणावें लागेल !

हें नूतन द्वीपकल्प त्याच्या उद्गमसामर्थ्यावरून पहातां फिलिपाईन बेटें, जपान, ॲल्यूशियाखंडाच्या आग्नेय दिशेचीं बेटें, मलाया द्वीपकल्प, तसेंच बोर्नियो बेट वगैरे सुमारें चार हजार मैल प्रदेशावर पसरलें जाणार आहे. ''

दुसरे शोधकाचे ग्रंथांतील उतारा:—

The configuration of the earth at that time was such that land stretched in an unbroken, continued mass from ( which is now ) Mexico to Scotland. Southward it included tha greater part of what is now Brazil, and stretches across to what is now Africa, then sea for the most part, except for its northern portion. This northern portion stretched out a tongue of land, of which the present Canary Islands were the mountain tops, towards the great Atlantean continent, and a narrow strait between its extremity and the Atlantean shore was the only water it would have been necessary to cross in a journey·from China to Peru. The greatest capital of this vast continent, was situated in what is now mid-ocean; between the cape Deyerde Islands and the West Indies. There was plenty of other land about the world. Australia, for instance, was three or four times as large as it is now, and was incalculably older land than Atlantis; for, going back many millions of, world's years ago there was a completely different configuration of the world's geography from that of the Atlantean period. But no where, except in the Atlantean continent was there any civilazation.

The people were innocent enough. They were under the very, benign rule of wise and loftyminded emperors; + + they were docile, industrious and peaceful, so that there was no Extreme poverty amongst them, no fretful discontent. Public institutions were designed for the welfare of all and life was much smoother all arround than with us. The arts and sciences were developed to a high degree. Writing, painting, architecture, and sculpture were all practised as freely as amongst ourselves, and the engineering work accomplished was on a scale that would dazzle the builders of the Forth Bridge or the Nile Dam. Though they had no steam machinery, they had control of some natural repulsive force which enabled Atlanteans to navigate the air in a way we have not yet been able to imitate. Their airboats emitted an energy that at the same time kept them suspended above the earth's surface, and could be employed to drive them in any required direction. Theia chemistry had advanced to a point which we have not yet reached: they

ıad got the secret of transmutation, so that manufacture of gold was a egular branch of industry. "

" त्यावेळीं भूगोलरचना अशी होती कीं, आजच्या मेक्सिकोपासून तों स्कॉटलंडपर्यंत :कसारखा अविच्छिन्न भूप्रदेश पसरला होता. दक्षिणेकडे आजमित्तीच्या ब्राझिलपासून आ- फ्रिकेपर्यंतचा सर्व भाग त्यांत अंतर्भूत झाला होता व उत्तरेकडील भागाशिवाय बाकीचा भाग ालमय होता. उत्तरेकडील भाग म्हणजे आज ज्याला कॅनरी बेटें म्हणतात तो त्या काळीं ार्वतशिखरासारखा होता व हा उत्तरेकडील विस्तार अॅल्यूशियन द्वीपकल्पापावेतों पसरला ़ोता. हा पर्वत व अॅल्यूशियन द्वीपकल्पाचा किनारा यांच्या दरम्यान खाडी होती. व चीन- ासून पेरूपर्यंतच्या प्रवासांत त्या वेळीं इतकाच काय तो जलमय भाग होता. या अफाट ़ीपकल्पाची बडी राजधानी वेस्ट इंडिज व केपर्डी-व्हर्डीज् बेटें यांच्या दरम्यान समुद्राच्या ाध्यभागीं होती. या द्वीपकल्पाखेरीज जगांत इतर पुष्कळ भूप्रदेश होता. उदाहरणार्थ, ऑस्टेलिया हा आजच्या पेक्षां तेव्हां चौपट किंबहुना पांचपट मोठा होता. व ऑटलांटिस ़ीपकल्पापेक्षांही तो देश जुनापुराणा होता. कारण, लाखों वर्षांपूर्वीची भूगोलरचना पहातां ी आटलांशियन कालापेक्षां अगदीं भिन्न असल्याचें दिसतें. परंतु त्या काला इतकी सुधा- रणा मात्र कोणत्याहि कालांत दिसून येत नाहीं.

त्या काळचे लोक अगदीं निरुपद्रवी असत. व त्यांच्यावर राज्य करणारे बादशहा सुज्ञ ı उदात्त विचारांचे असल्यामुळें लोक सुखी होते. * * * * ते हाडाचे गरीब, उद्योगी व शांतचित्त असल्यामुळें ते अत्यंत दारिद्र्यांत नसत, व तीव्र असमाधान त्यांना माहीत नव्हतें. पच्चयावत् सर्व लोकांच्या उपयोगीं पडतील अशा सार्वजनिक संस्था त्यांच्यांत होत्या व आ- युष्य आजच्यापेक्षां सुरळीत व सुखावह होतें. कला व शास्त्रें यांची प्रगति बऱ्याच उच्च दर्जाची होती. लेखनकला, चित्रकला व शिल्पकला आजमितीप्रमाणें होत्या. व त्यावेळचीं इमारतीचीं कामें आजकालच्या इंजिनियरिंग कामांना खालीं मान घालण्यास लावणारीं होतीं. त्यांना वाफेच्या शक्तीनें यंत्रें चालविण्याची कला अवगत नव्हती हें खरें; परंतु हवेंतून विमानें त्यांना इतकीं हु मी चालवितां येत कीं, त्याचें अनुकरण आजकालच्या स्थितींतही करतां येत नाहीं. शिवाय त्यांच्या विमानांत अशी कांहीं शक्ती होती कीं, तीं पाहिजे तशीं हवेंत तरंगू शकत व त्यांना तीं हव्या त्या दिशेनें नेतां येत असत. रसायनशास्त्रामध्यें त्यांनीं इतकें प्रावीण्य सपादन केलें होतें कीं, तें आपणामध्यें आजही दिसून येत नाहीं. त्यांना किमया करण्याचीही विद्या अवगत होती व तिचा प्रसार इतका होता कीं तो एक धंदाच होऊन बसला होता.

ईजिप्त किंवा मिसर देशांतील थोरली पिरामिड ही किति पुराणी आहे, याबद्दल सिनेट म्हणतो.

" The great pyramid was built, not in the reign of Kufu or Ceops, 4000 or 5000 years before Christ, but at a period more like 200,000 years ago, under the direction of authorities, who foresaw that in the changes with which geography was threatened, it would for a time lie under water. They wished it to survive any such experience and there- fore, adopted the very stable form we see.

तो ( मिसर देशांतील ) भव्य मनोरा ख्रिस्तापूर्वीं चार पांच हजार वर्षांपुर्वीं कुफू किंवा क्लीऑप्स याच्या कारकीर्दींत बांधला नसून आजमासें **दोन लाख वर्षांपूर्वीं** बांधला होता. तो बांधणारांनीं जलप्रलयाची भावी स्थिति लक्षांत आणून त्यांतून त्याचें संरक्षण व्हावें एतदर्थ त्याची इतकी मजबूत रीतीनें उभारणी केली व ती आज आपल्या समोर आहे.

A human skeleton beneath the chalky Boulder clay of Eastern England has been found. If we take the age of the skelelton anterior to the C. B. cley its age may be anything 10,000 to 1,00,000 years.

*The Bombay Gazette Feb. 26-1912.*

" ईस्टर्न इंग्लंडमधील चॉकी बंदर क्लेमधील भागाच्या पोटांत मनुष्याच्या हाडांचा एक सांगाडा सांपडला आहे. तो चॉकी बंदर क्लेच्या पूर्वीं किती वर्षांचा असावा याचा विचार केल्यास तो **दहा हजारपासून एक लाख** वर्षांच्या पूर्वींचा असावा असें दिसतें.

बॉंबे गॅझिट, फेब्रुअरी २६ सन १९१२,

( या दोन उताऱ्यांवरून हें जग होऊन सहा हजार वर्षें झालीं हें बायबलाचें मत खरें कीं त्यास अनेक युगें झालीं हें पुराणमत खरें, याचा निवाडा दिसून येईल. )

पुराणांत वर्णिलेल्या गूढ विद्यांच्या ज्ञानानें अंगीं काम सामर्थ्य येऊं शकतें याबद्दल हा उतारा पहा.

" It is quite within the power of ocultist to disintegrate physical objects, transport them to a distance, and reintegrate them there, so that, in effect, a person possessing this power would possess himself practically of anything he coveted; The gold in the cellars of the Bank of England, for example-without stirring out of his arm-chair at home. "

सृष्टींतील गूढ शक्ति ज्यांनीं आपल्या स्वाधीन करून घेतल्या असतील त्यांना जड भौतिक वस्तू आपल्या सामर्थ्यानें एका ठिकाणाहून उचलून दूर अंतरावर नेणें, त्या परत जागच्या जागीं नेऊन ठेवणें हें अगदीं शक्य आहे. याचा अर्थ हा कीं, असल्या ज्ञानानें संयुक्त असलेला मनुष्य आपल्या खुर्चीवरून न हालतां पाहिजे ती वस्तू त्या ठिकाणीं उत्पन्न करूं शकेल. उदाहरणार्थ, इंग्लंडच्या बँकमधील तळघरांत सांठविलेलें सोनेंही आपल्यापाशीं तो काढूं शकेल.

यावरून ' बाणकन्या ' उषा हिचे रंगमहालांत तिच्या प्रियसखी चित्रलेखेनें तिचा हृदयवल्लभ अनिरुद्ध गुप्तपणें आणून पोंचविला असेल हें असंभाव्य कां वाटावें ?

हे उतारे वाचले असतां वाचकांची खात्री होईल कीं ' सृष्टि उत्पन्न झाल्यालाच मुळीं सहा हजार वर्षें झालीं. पूर्वीं माणसें रानटी होतीं. पुराणांतील गोष्टी म्हणजे कांहीं तरी काल्पित रचना आहेत, इत्यादि समज चुकीचे आहेत. पुराणांत लिहिलेल्या गोष्टी खऱ्या आहेत. आणि आपल्याला जर आपली उन्नति करून घेणें असेल, तर पुराणोक्त मार्गाचाच अवलंब केला पाहिजे. आणि इतकी खात्री पटली म्हणजे या पुराणांचा एकंदर कटाक्ष काय हें शोधण्याचें त्याचे मनांत येईल. व तें आलें म्हणजे त्यास आढळेल कीं पुराणांचा सर्व कटाक्ष ' धर्मनिश्चय व धर्मरक्षण ' करणें इकडे आहे आणि हा असणें जरूरच आहे. कारण हींच पुराणें जर आमचे ध्यानीं मनीं नव्हत्या अशा अनेक जुन्या

जुन्या गोष्टी काढून व अनंत ब्रह्मांडाच्या घडामोडी आणि उत्पत्ति–स्थिति–लय आमचे पुढें मांडून यावत् दृश्याचे क्षणिकत्व उभें करणार व तेणेंकरून आमचे मनाला नसती असंष्ठुलता किंवा चंचलता उत्पन्न करणार तर त्या त्यांच्या कृतीचें परिमार्जनहि त्यांनींच–केलें पाहिजे, नाहीं तर, तीं अपराधी ठरतील. आणि हेंच या पुराणांनीं केलें आहे. यांनींच निष्कल, निर्विकार, अनश्वर, शाश्वत, अविनाशि व सनातन असें पद जीवांस कसें प्राप्त होईल; या संसारासिंधूंतील क्षणोक्षणीं आथडणाऱ्या लाटांच्या गचक्यांतून पार पडून अभंग अशा खडकावर मनुष्य कसा जाऊन बसेल, याची आनुभविक आणि खात्रीची युक्ति, जर ब्रह्मांडांत कोणत्याहि ग्रंथांनीं दाखविली असेल तर ती याच ग्रंथांनीं दाखविली आहे. अर्थात्, परमात्म्याला जसें ' भयकृत्, भयनाशनः ' म्हटलें आहे, त्याप्रमाणेंच हे ग्रंथ दृश्याची असंष्ठुलता दाखवून प्रवृत्तिपर जीवांची वृत्ति क्षणक्षर विचलित झाली असेल तर तेच पुढें असा रामबाण उपाय सुचवितात कीं, जेणेंकरून सदैव ती अविचलच राहील. " **यस्मिन् स्थितो न दुःखेन गुरुणापि विचाल्यते** " असा अविकंपयोग हेच ग्रंथ आम्हांस शिकवितात. अर्थात् हे ग्रंथ निर्दोष आहेत इतकेंच नव्हे तर आम्हांस सर्वथा आश्रयणीय आहेत. आणि या ग्रंथांनीं हें अविनाशित्व, हें अविकंपित्व संपादण्याचा आम्हांला कोणता उपाय सुचविला तर ' धर्म ' आणि विशेषतः या आर्यभूमीला तर धर्म हा एकच पुरुषार्थ आहे असें म्हटलें तरी चालेल, अर्थ, काम हीं आमचीं मुख्य ध्येयेंच नव्हत. ही भूमी व हींतील लोक हे केवळ धर्माकरितांच निर्माण केले आहेत. बिझांटबाई म्हणतेः—

" When the Nations of the earth were sent forth one after the other, a special word was given by God to each. To Egypt in old days the word was Religion; to Persia, Purity, to Chaldia, Science, to Greece Beauty; to Rome, Law; and to India, the eldest born of His children, He gave a word that summed up the whole in one, the word *Dharma*. That is the word of India to the world.

भावार्थः—ईश्वरानें राष्ट्रांच्या उत्पत्तीबरोबर भिन्न भिन्न राष्ट्रांना पृथक् कामगिऱ्या सांगितल्या. जुन्या मिसरदेशाला, ईशभक्ति; इराणाला, शुचिर्भूतता; कॅल्डियाला, शास्त्राभ्यास, ग्रीसला, सौंदर्य; रोमला, कायदेबाजी; आणि या सर्वहि राष्ट्रांत वयानें वडील अशा या भरतभूमीला वरील सर्वहि राष्ट्रांचीं ध्येयें ज्यांत एकवटलीं आहेत, असा एकच मंत्र सांगितला आणि तो मंत्र म्हणजे " धर्म "

स्वामी विवेकानंद म्हणतात:

" *In religion* lies the vitality of India and so long as the Hindu race do not forget the great inheritance of their fore-fathers, there is no power on earth to destroy them. "

Now a days every-body blames those who constantly look back to their past. It is said that so much looking back to the past is the cause of all India's woes. To me on the contrary, it seems that the opposite is true. The more, the Hindus study the past, the more glorious will be their future, and whoever tries to bring the past to the door of every one is a great benefactor to his nation. "

भावार्थः—" हिंदुस्थानचें सर्व चैतन्य धर्मांत आहे. जोपर्यंत भारतवासीय आपल्या

या वडलार्जित संपत्तीची उपेक्षा करणार नाहींत, तोंपर्यंत त्यांचा नायनाट भूतलावरील कोणतीहि राष्ट्रशक्ति करूं शकणार नाहीं.

अलीकडे गतकाळाकडे बघणारांस जो तो दोष देतो आणि म्हणतो कीं या पुराणप्रियतेमेंच तर ही सारी विपत्ति आली. पण माझें मत उलट आहे, मला वाटतें भारतवासी जन आपल्या गत इतिहासाचें जों जों अधिक परिशीलन करूं लागतील तों तों त्यांचा उत्कर्ष होईल. व जे कोणी या कालाचे अभ्यासाचीं साधनें त्यांचे हातीं देतील ते आपले राष्ट्राचे फार मोठे उपकर्ते आहेत, असें मी समजेन. स्वामी विवेकानंदांचें हें म्हणणें केवळ प्रेमभरांतलें किंवा अभिनिवेशानें प्रेरित नव्हे. आमचे सनातन धर्माची महती व व्याप्ति अशीच कांहीं विलक्षण आहे. बिझांटबाई आमचे सनातन धर्माविषयीं बोलतांना म्हणते:—

" It had served as the model, a world-model for a nation. A religion, embracing the heights and depths of human thought, able to teach the ryot in his field, able to teach the philosopher and metaphysician in his secluded study, a world-embracing religion, had been proclaimed through the lips of the Rishis of this first offshoot of the Race. Not only a religion but also a polity, an economic and a social order, planned by the wisdom of a *Manu*, ruled at first by that Manu himself. Not only a religion and a polity, but also the shaping of the individual life on the wisest lines—*The successive Varnas, the successive Ashramas* the stages of life, in the long life of the individual were marked in the castes, and each caste-life of the embodied Jivatma reproduced in its main principles, in the individual life, the Ashramas through which a man passed between birth and death. Thus, prefectly thought out, thus marvellously planned this infant civilization was given to the Race as a world model to show what might be done when wisdom ruled and love inspired.

भावार्थ:—हा सनातन धर्म म्हणजे यावत् जगतांतील राष्ट्रांचा कित्ता—कारण त्यांत सर्वांची सोय आहे. तो इतका विश्वव्यापी आहे कीं, त्यांनीं मानवी विचारांची सर्व उंची खोली व्यापिली असून शेतांतल्या शेतकऱ्यालाहि तो ज्ञान शिकवितो; बरें, एकांतांत तात्त्विक किंवा अधिभौतिक विचार करीत बसलेल्या जिज्ञासूनांहि अक्कल सांगतो आणि असला हा सर्वव्यापी धर्म मानवजातींतील प्रथमशाखेंतील ऋषिवर्यांचे मुखांतून प्रकट झाला. बरें. हा केवळ धर्मच नव्हे. तर यांत व्यवहारांतील सांपत्तिक व सामाजिक व्यवस्थेचीहि सर्व घटना आहे. ही व्यवस्था शहाण्या मनूनें स्वतः बसवून आपण स्वतः ती वापरून दाखविली. बरें, इतकेंच करून या धर्माची कर्तबगारी संपली नाहीं. तर प्रत्येक जीवात्म्याचे उन्नतीचाहि मार्ग, त्यानें क्रमशः चढत जाणारे वर्णाश्रम धर्माचे नियम घालून, फारच चतुराईनें आंखून दिला. या वर्णाश्रमाचे अंगभूत जातीभेद ठरले व प्रत्येक जीवात्म्यानें आपले कर्मानुसार या जातींतून वर चढत जावें असें केलें. याप्रकारें अद्भुत चतुराईनें आंखलेला व पूर्ण विचारांतीं निर्माण केलेला हा धर्म जगताला कित्ता देण्यासाठीं जेथें शहाणपणाचाच अंमल व

प्रेमाची स्फूर्ति हीं नियामक आहेत अशा स्थितींत मनुष्याचा उत्कर्ष कसा होतो हें दाख-विण्यासाठींच मानवी जातीला दिला गेला आहे.

असा जर सर्वकामप्रद धर्म सुदैवानें आपले ऋषिवर्यांनीं आपली हक्काची दौलत म्हणून आम्हांस दिला आहे, तर तो सोडून आपण दीन होऊन दुसऱ्याचे दारीं भिक कां मागावी ? आपण असे परप्रत्ययनेय कां व्हावें ? पण आजकाल पहावें तों परप्रत्ययनेयतेची अगदीं परमावधी झाली आहे. रामकृष्ण परमहंसापुढें एक तरुण मनुष्य अक्षय युरोपियांची प्रशंसा करी व आमचे शास्त्रांची निंदा करी. असें असतां एक दिवशीं तो म्हणाला, ' गीतेसारखा ग्रंथ नाहीं. ' तें ऐकून परमहंस म्हणाले, " मला वाटतें कोणा युरोपियन पंडितानें गीतेची स्तुति केली असावी; म्हणून हा बेटा त्याची री ओढतो आहे."

या स्थितीकडे पाहून स्वामी विवेकानंद म्हणतात.

" O India, this is your terrible danger. Ths spell of imitating the west is getting such a strong-hold upon you, that what is good or what is bad is no longer decided by reason, judgement, discrimination, or reference to the shastras. Whatever ideas, whatever manners the white men praise or like, are good; whatever things they dislike or censure are bad ! Alas ! What can be a more tangible proof of foolishness than this ?

The westerners disapprove of our dress, decorations, food and ways of living therefore, they must be very bad; the westerners condemn image-worship as sinful, surely then image worship is the greatest sin, there is no doubt of it.

* * * *

The westerness hold caste distinctions to be obnoxious-therefore, let all the different casts be jumbled in to one !

भावार्थः-हिंदुस्थाना, ही परप्रत्ययनेयता तुला मोठा दगा करील. परंतु हिचा तुजवर एवढा जबर अंमल बसत चालला आहे कीं, हिजपुढें सुविचार, न्याय, विवेक किंवा शास्त्रोक्ति यांच्या आधारानें बऱ्या वाइटाचा निवाडा करण्याचें तुला सुचेनासें झालें आहे. गोरे लोक ज्या रीतीभाती पसंत करतील त्या काय त्या चांगल्या; ते नापसंत करतील त्या वाईट; हेंच तुझें शास्त्र. हरहर ! अरे ! मूर्ख मूर्ख तो याहून दुसरा कसा असतो ?

" आपला पोषाख, आपले अलंकार, आपलें खाणें, आपली रहाणी पाश्चात्यांला नापसंत आहे. त्या अर्थीं अलबत हीं सर्व वाईटच असलीं पाहिजेत, ते मूर्तिपूजेचा निषेध करितात. त्या अर्थीं मूर्तिपूजा हें महत्पातक असलेंच पाहिजे. त्यांत शंका कशाची ?

" आपल्यांतील जातीभेद पाहून ते नाकें मुरडतात, तेव्हां त्याला तिळांजली देऊन सबगोलंकार केलाच पाहिजे. अशी तुझी मति फिरून गेली आहे."

स्वामींच्या या वर्णनांत तिळप्राय अतिशयोक्ति नाहीं. हा प्रकार सर्वत्र बळावत आहे. पण कोणीहि असा विचार करीत नाहीं कीं एकाला जें भक्ष्य होतें तेंच दुसऱ्याला

---

१ आम्हांस तरी आमचे ग्रंथाचे मंडनार्थ हे परक्यांचे अभिप्राय यावे लागत आहेत, या प्रसंगाचें कारण हेंच आहे. सर्व वाचक आमचे शास्त्रावर विश्वास ठेवणारेच असते तर ' घरीं कामधेनु, पुढें ताक माग ' असा अनिष्ट प्रसंग आम्हांवर येताना.

विष असतें अशा अर्थाची इंग्रजींत एक म्हण आहे, तोच प्रकार येथें आहे. पाश्चात्यांच्या रीतिभाति त्यांना हितकर झाल्या म्हणून तुम्हांलाहि त्या हितकारक होतीलच हा न्याय कोठून आणिलांत? एका जातीचें झाडाचें खत दुसऱ्या जातीचे झाडाला मानवत नाहीं, ही जर वनस्पतींत देखील प्रतीति येते, तर परक्याचें प्रत्येक कलम तुम्हांस सुखावह होईल हें कशावरून ? लॅपलंडांतील रेनडिअर व एस्किमो आणि सहारा वाळवंटांतील उंट व सारवान या दोहोंना एकच रहाणी सारखी सुखावह होईल काय ? मोरोपंत म्हणतात. "यज्जीवन जीवन तो दुग्धीं वांचेल काय हो मीन" ? दूध हें पाण्यापेक्षां दिसण्यांत अधिक मनोहर, जिव्हेस मधुरतर, व जीवनास अत्यंत पुष्टिप्रद, असें जरी आहे; तरी केवळ पाण्यांतच ज्याची उपजनिपज अशा मत्स्याला पाण्याचे ऐवजीं दुधाचें भांड्यात सोडलें तर तो त्यांत जगेल काय ? याचा कांहीं विचार करा. ही आपली आर्यभूमि ही भोगभूमीच नव्हे. हींतील कुरुक्षेत्र ( field of action ) देखील धर्मक्षेत्र आहे, इकडे लक्ष पोंचवा. विवेकानंदाचें वरील म्हणणें हें कांहींसें धर्मदृष्टीचें म्हणून व्यवहारांत विशेष आदरणीय नव्हे, असें कोणास वाटेल; तर आजकाल आम्हीं आपली पूर्वापार आलेली रहणी सोडून खाणें पिणें इत्यादिकांत परकीयांचें अनुकरण करीत आहा, तेंहि आम्हांस किती घातक होत आहे, याबद्दल सुप्रसिद्ध डॉक्टर कुन्हे यांनीं आपले ग्रंथांत एक समान स्थितींतल्या लोकांचें उदाहरण दिलें आहे. तें त्यांच्याच शब्दांनीं येथें वाचकांकरितां देतों. त्याकडे वाचकांनीं लक्ष्य द्यावें.

" I cannot refrain here from publishing part of a letter received by me from a distant land, from an enthusiastic missionary in Henolulu. He wrote—" The natives here before the white man was known, lived exclusively upon Poi ( consisting of Taro root beaten into paste with water ), with bananas and other fruits. *Their only drink was pure water. They thus lived on a purely natural diet and their stature was gigantic, they were overflowing with health and strength.* But in the annals of Hawaii, the name is even recorded, of the Hawaiian chief who first-on May 18th 1819-openly changed his manner of living Pork has now became the national food and gin the national beverage; *but with what results !* The majority of the natives ( Kanakas ) suffer from eruption of the skin, and asthma; sexual diseases are common and there is a great tendency to leprosy, which reaps a rich harvest amongst them. "

We see, then, how the natives on the new manner of living. brought to them by our much lauded civilization, at once became diseased. * * In this case, the *warm tropical climate* was most favorable to the propagation of the disease, which in a cold climate like ours, would have been much slower in making its appearance. "

भावार्थः—' होनोलुलु येथील एका उत्साही मिशनऱ्यानें लिहून पाठविलेली हकीगत येथें दिल्यावांचून मला रहावत नाहीं. तो मिशनरी लिहितो कीं, या देशांतील रहिवासी, गोरे लोकांची माहिती होण्यापूर्वीं कंदमूळफळावर रहात आणि शुद्ध पाणी हेंच कायतें त्यांचें पेय होतें. या स्वाभाविक आहारावर असतांना, ते शरीरानें फार धिप्पाड असत. व त्यांची शक्ति व आरोग्यता जणूं उतास जात आहे, असें वाटे. परंतु सन १८१९ सालीं ता० १८ मे

रोजीं तेथील राजानें उघड उघड आपली पूर्वीची रहाणी टाकून युरोपियन तऱ्हा पत्करिली. मग काय, ' यथा राजा तथा प्रजा. ' तेव्हांपासून तेथें सर्वत्र मांसाहार व मद्यपान यांचा प्रघात पडला. परंतु, त्याचे परिणाम किती भयंकर सांगावे ! यामुळें तेथील रहिवाशांपैकीं अधिक संख्येला त्वग्रोगानें व्यापिलें आहे. शेंकडोंना दमे लागले आहेत. जननेंद्रियांचे रोग तर घरोघर झाले आहेत. आणि रक्तपितीवर बहुतेक प्रकृतींची धांव गेली आहे. '

कुन्हे म्हणतोः—" एतावता, आमच्या अत्यंत नांवाजलेल्या सुधारणेनें साध्या राहणीच्या लोकांत रोगाचा फैलाव कसा झाला याचें रहस्य असें आहे कीं, तो देश उष्ण हवेचा असल्यानें आमचे थंड हवेंत जे परिणाम होण्यास अत्यंत दीर्घ काल लागेल ते तेथें तावडतोब झाले. "

आह्मी वर म्हटलें आहे कीं, ' एकास अमृत तें दुसऱ्यास विष ' त्याचेंच हें उदाहरण आहे. गोरे लोकांना तें खाद्यपेय हितावह झालें म्हणून त्यांनीं त्याची सहजच प्रशंसा केली असेल यांत त्यांचा दोष किंवा कुभाव कांहीं नाहीं. परंतु ज्या भिन्न हवेंतील लोकांनीं अनुकरण केलें त्याना आपला विचार पाहणें जरूर होतें, इकडे वाचकांनीं लक्ष पोंचवावें.

स्वामी विवेकानंदाचें परानुकरणाविरुद्धचे म्हणणेंहि खरेंच आहे. तथापि, त्यांचे इतका या परानुकरणाचा तीव्र निषेध आह्मी केला नसता; परंतु दुर्दैवानें या अनुकरणांत प्रकार झाला आहे तो कोंकणांत पिकलेल्या फणसाचे वाटणींत म्हणतात " गरेगरे मालकाला व शेंडे बुडखे रेडकाला ' तशांतला आहे. युरोपियनांचें खरें युरोपियनत्व ज्या गुणांत आहे, त्यापैकीं एकहि गुण आह्मी उचलिला नाहीं. आमचे वाङ्मयांत व क्रमिक पुस्तकांत पाश्चात्यांचे सद्गुणाचे प्रशंसेचे लेख देखील तुटपुंजेच आढळतात! त्यांची **उद्यमपरता**, त्यांची **चिकाटी**, **त्यांचें कालनेमित्व**, त्यांची **ज्ञानलालसा**, त्यांची **सर्वगामिता**, त्यांचें **साहस**, त्यांचा **कल्पकपणा**, त्यांची **दीर्घदृष्टि**, त्यांची **स्वदेशप्रीति**, त्यांचा **नेमस्तपणा**, त्यांची **दक्षता**, त्यांचा **धोरणीपणा**, त्यांची **दमदारी**, त्यांचा **नियमितपणा**, त्यांची **महत्वाकांक्षा**, त्यांची **स्वालंबनप्रियता**, त्यांची **प्रसरणशीलता**, त्यांची **कार्यैकपरता**, त्यांची **विद्याव्यसनिता**, त्यांची **टेंक**, त्यांचा **पोंच**, त्यांची **सफाई** इत्यादि इत्यादि जे अनेक स्पृहणीय व उदाहरणीय गुण त्यांच्यांत आहेत व जे **भगवत्कृपेनें** आपणांस नुसत्या दूरच्या आख्यायिका नसून आज प्रत्यक्ष दरघडी पहावयास सांपडत आहेत, त्यांतील एक एक तरी आमच्यांतून कोणी उचलिला आहे काय? निदान असल्या गुणांचें प्रेम तरी आमचे हृदयांत अधिरूढ झालें आहे काय ? सांगावें. हें जर नाहीं, आंतील दाणा किंवा मगजी जर आमचे हातीं लागत नाहीं, तर केवळ वरील सालपटें किंवा टरफलें आह्मी पोटांत कोंबल्यानें आम्हांला पुष्टि कशी येईल ? वाल, मूग हरभऱ्यांच्या उसळी खातांना आंतील दाण्यांमुळें, वरील टरफलेंहि खाल्लीं तरी रुचतात व पचतात; परंतु, आंतील मगज वेगळे करून फक्त सालेंच खाल्लीं तर हितकारक होतील काय? याचा विचार पहा. नुसतें बाह्यांग युरोपियन केल्यानें तुह्मी विटंबनेस मात्र पात्र व्हाल. प्रसिद्ध लेखक अडिसन किंवा विष्णुशास्त्री हे अबोल होते, म्हणून एखाद्या अक्षरशत्रु मुखस्तंभास अडिसनची योग्यता येईल काय ? याचा विचार करा. मुखस्तंभता ही जरी अडिसनची एक आनुषंगीक खुण असली तरी त्याचें खरें अडिसनत्व लेखनपटुतेंत होतें, हें लक्ष्यांत पाहिजे.

त्याचप्रमाणें इंग्रजांचें इंग्रजत्व त्याचें चहा, कॉफी, सोडा, लेमोनेड पिण्यांत, मटन खाण्यांत किंवा बूट पाटलोणींत नाहीं. आम्हांस तर वाटतें कीं, असे जे बाह्यात्कारीं इंग्रजाचा वायफळ आव आणणारे आहेत, ते एका अर्थीं दण्डच्यच आहेत. इंडियन पिनलकोडांतील कलम १७० चे टापूंत असे लोक येतात असें म्हटलें पाहिजे. कारण इंग्रजांचें इंग्रजत्व अंगीं नसतां त्याचा वेष घालून बाह्य आव आणणें म्हणजे नसता अधिकार मिरवणें, अशांतलेंच आहे. याकरितां हा नसता आरोप आणण्याचा धंदा सोडून आपलें जें निर्विवाद वडिलार्जित वतन आहे त्याचीच वहिवाट करून तें उर्जित दशेस आणण्याचा आम्ही यत्न करावा. तें वतन म्हणजे " धर्मरक्षण, धर्माचें पुनरुज्जीवनः कारण आपली शेती म्हणजे धर्मक्षेत्र, धर्माची खेती " आहे, हें विसरतां कामा नये. आणि ती जशी आपणांस श्रेयस्कर होईल, तसा इतर धंदा व्हावयाचा नाहीं. याकरितां आपले वर्णाश्रम धर्म उजळा. आपले देव, देवतें, तीर्थें, क्षेत्रें, मंत्र, तंत्र यांचें पुनः प्रतिष्ठापन करा. ब्राह्मण्य उजवा.

हा आमचा उपदेश ऐकून पुष्कळजण आम्हास हंसतील. ते म्हणतील कीं, आम्ही कोणत्या रंगांत आहों आणि हा भ्रमिष्ट गृहस्थ आम्हास हें नुसतेंच काय सांगत बसला आहे ! आम्ही शेंड्या साफ काढल्या, बाल राखले, कोट जाकिटें, बुटपाटलोणी चढविल्या, नेकटाय देखील ठांसले. इराण्याचा चहा, मेसांतलें डीश, चिरूट, पेग सर्व कांहीं अभ्यस्त झालीं. आतां, फक्त मडम बायको करावयाची राहिली आहे, म्हणजे झालों साहेब. किंवा ' म्हणजे तरी कशाला ? मडम बायको नाहींच झाली, तर बायकोच मडम करूं. करूं नाहीं, केल्यासारखीच आहे. तिलाहि बूट, स्टॉकिंग, जॅकीट, पॅरॅसोल वगैरे चढविलेच आहेत. आतां लहंगा आणि बॉनेट राहिलीं आहेत. तेवढीं चढवावयाची; आणि जुन्या वेडगळ धर्मापैकीं मंगळसूत्र व टिकली हीं राहिलीं आहेत तीं उडवायाचीं इतकीच शिलकी आहे. म्हणजे, बहुतेक बारा आणेवर उभयपक्षीं साहेबी अंगीं भिनली देखील, आणि आतां हे भ्रमिष्ट म्हणणार कीं, त्या जुन्या जख्खड, खप्पड, मृतप्राय धर्माचें पुनरुज्जीवन करा ! ( घोडा आजारी झाला तर त्याला एका गोळीस दुःखमुक्त करण्याचा आजकालचा विसावे शतकांतील सिधा उपाय सोडून, म्हणे त्या सांगाड्याला ओषध पाजीत बसा; काय शहाणपण ! ) त्या जुन्या, जख्खड, खप्पड धर्माचें पुनरुज्जीवन कसलें कारितां ?

यावर आमचें असें म्हणणें आहे कीं, ठीक आहे. तब्येत गरम होऊं देऊं नका. साहेब, युरोपिअन होतां काय? व्हा. पण मात्र खरे खरे अस्सल जातिवंत युरोपिअन व्हा. ज्यांनीं जडाला देखील चेतनाची कामगिरी दिली आहे, ज्यांनीं समुद्रावरून पायवाट केली आहे, ज्यांनीं चतुःखंड पृथ्वीचें ओसरी आंगण करून सोडिलें आहे, ज्यांनीं सूर्यमालेंतील जगड्वाळ गोलांचेंहि वजनमाप काढिलें आहे, ज्यांनीं विद्युल्लतेसारख्या चपल जघनेलाहि दासी करून वारा घालावयास लाविलें आहे किंवा दूतीप्रमाणें संदेशवाहिनी करून सोडिली आहे, ज्यांची ज्ञानतृष्णा अखंड विजृंभिणी आहे, असल्या आश्चर्यकारक करणीचे कर्ते इंग्रजयुरोपिअन–तुम्ही होऊन दाखवा. म्हणजे मग आम्ही आपलें हें जख्खड धर्माचें, हें वर्णाश्रमाचें, हें ब्राह्मण्याचें घोडें मागें घेतों. मुळींच पुढें आणीत नाहीं. कारण आमची साफ खात्री आहे कीं खरा खरा इंग्रज आहे तो

आज नाहीं उद्यां ब्राह्मण होणारच. अमेरिका तर ब्राह्मण होण्याचे नादीं पक्की भरली आहे. आणि त्याचे मागून, अवकाशानें कां होईना, इंग्लंडहि होणार. इंग्लंडांत मद्यपाननिषेध सुरू झाला. इंग्लंडांत वनस्पत्याहाराविषयीं आदरबुद्धि सुरू झाली. प्राणायामाच्या शाळा सुरू होणार. योगाविषयीं प्रेम वाढत चाललें. अध्यात्मविचार बळावत चालला. भगवद्गीतेसारख्या ग्रंथांचा अभ्यास सुरू झाला. पुनर्जन्मादि गोष्टी लोक मानूं लागले.

या भगवद्गीतेबद्दल तर ब्रूकस्‌साहेब आम्हांस विलक्षण धास्ती घालितो आहे. तो म्हणतोः—

" If ( *Gita* ) is preeminently a *scripture* of the *future world-Religion, a gift of Indias' glorious past to the moulding of the still more-glorious future of mankind. To think to hold it back is futile now: it has gone forth. Let Indians only see to it that they are not outstripped by the Barobarians of* the west in the vital understanding, in the consistent practice of the *live Yoga* of their own ancient Rishis. To understand and practise this means mastery, means Power–the one indisputable mastery of perfect service, the irresistible Power which alone the practical mystic, the Yogi after Shri Krishna's heart–can wield on Earth. Where he appears, things change and mould themselves. That which seemed distant, past all reach, comes near; what seems impossible is done. "

भावार्थः—" भगवद्गीता हें हिंदुस्थानचेंच नव्हे तर यावत् जगताचें भावी धर्मपुस्तक आहे. व गतकालींच्या वैभवशाली आर्यावर्ताची पुढील मानवी उत्कर्षाला कारण होणारी अशी ही एक मानवजातीला देणगीच आहे, ही देणगी आतां आर्यावर्ताचे हातून सुटली; ती दुसऱ्याचे हातीं लागली. ती आतां दाबून ठेवूं पहाणें व्यर्थ आहे. आतां हिंदूंनी—भारतीयांनीं—एवढें तरी जपावें कीं, ते ज्यांना पश्चिमेकडील रानटी लोक किंवा म्लेच्छ म्हणून हिणवीत ते लोक आतां भारतीयांच्या पूर्वज ऋषींनीं या ग्रंथांत दाखवून दिलेला चालता बोलता योग तत्वतः समजून घेऊन तसा नित्यक्रमांत वागवून दाखविण्याचे कामीं या भारतीयांची आघाडी न मारोत; एवढी तरी बाजू आतां त्यांनीं संभाळावी. कारण, भगवद्गीतेचें खरें खरें मर्म समजणें व त्याप्रमाणें चालणें म्हणजे थट्टा नव्हे. त्याला अंगीं प्रभुत्व लागतें, सामर्थ्य लागतें, लुंग्या सुंग्यांचें, लेचापेचांचें तें काम नव्हे. अखंड लोकसंग्रह किंवा लोकसेवा करण्याची अंगांत ताकद लागते. आणि श्रीकृष्णाचे तालमींतला जो कोणी योगी असेल—"नानवाप्तमवाप्तव्यं वर्त एवच कर्माणि" हें ज्यांचें ब्रीद बनलें असेल, असला मनुष्यच ही धमक बाळगूं शकेल. असला मनुष्य जेथें उभा राहील तेथील परिस्थिति तत्काल बदलून त्याला अनुकूल होते. जी कोणती गोष्ट पूर्वीं दूर किंवा अप्राप्तशी भासत होती, ती हाता-

१ जे शास्त्राचे नादीं लागले ते धार्मिक झालेच पाहिजेत, आज ना उद्यां. चॅनिंग म्हणतोः—"All true science is essentially religious : ' आणि इंग्रज लोक जरी आज अनावर विषयतृष्णेनें, भौतिकसुखाचे लालसेनें पछाडले आहेत, तरी ते सत्यशोधक व शास्त्रप्रिय असल्यानें कालांतरानें तरी ब्राह्मण होतील.

२ डा० खेडकर यांनीं नुकतेंच एका व्याख्यानांत सांगितलें कीं इंग्लंडांत एक लक्ष माणसें हिंदुस्थानापेक्षांहि अधिक आवडीनें आमचे वेदांताचें अध्ययन करीत आहेत.

पाशी येऊन उभी रहाते. जी अशक्यशी वाटत असेल ती सिद्ध होऊन बसते. असलें कांहीं विलक्षण सामर्थ्य या गीतेंतील उपदेशाप्रमाणें वागणाऱ्याचें आहे. ( तेव्हां भारतीयांस म्हणावें, सावध असा ) ”

वरील उताऱ्यावरून वाचकांचे ध्यानांत येईल कीं, भारतीयांची स्थिति कशी वड-वाघुळाप्रमाणें होणार आहे. ज्यांचें सोंग ते आणूं पहात आहेत त्यांची दृष्टि या सोंगाड्याचेच दौलतीकडे वळली आहे. मग आतां आपलें आहे तेंच आंवळून धरावें, तेंच राखावें, किंवा आपलें हातचें सोडून भारतीयांनीं दुसऱ्याचे मार्गे लागावें आणि मग ‘तेल नाहीं तूप नाहीं धुपाटणें मात्र हातीं,’ अशांतली गत होऊन बसावें, याचा त्यांनीं वेळींच विचार करावा. आम्हांला कोणी वेडे म्हणो, खुळे म्हणो. आम्हांस तर वाटतें कीं, आपलें जुनें वतनच वहिवाटावें. आमची ही भूमि, आमचीं हीं हाडें, धर्मकार्यार्थेच जर ईश्वरानें बनविलीं आहेत, तर तेंच कार्य आमचे हातून अधिक चांगल्या रीतीनें सिद्धीस जाईल. यांतच आम्ही यशस्वी होऊं, आणि आमचा धर्मोत्कर्ष झाला असतां, आमची आ यात्मिक संपत्ति, आध्यात्मिक दृष्टि, वाढली असतां आम्हांला कशाचीच वाण पडणार नाहीं. शास्त्रांत म्हटलें आहे:—

‘धर्मे सर्वं प्रतिष्ठितं, तस्माद्धर्मं परमं वदंति”

किंवा

धर्मादर्थश्च कामश्च स धर्मः किं न सेव्यते ॥

म्हणजे, “धर्मावर सर्व उभें आहे म्हणूनच धर्मास सर्वांत श्रेष्ठ गणतात.” ‘धर्मापासून अर्थ, कामही मिळतात. मग असला धर्म कां न सेवावा ?

या धर्मरक्षणासंबंधें स्वामी विवेकानंद म्हणतात:—

“The Indian nation cannot be killed. Deathless it stands, and it will stand so long as that spirit shall remain as the back-ground, so long as her people *do not give up their spirituality*. Beggars they may remain, poor and poverty stricken; dirt and squalor may surround them perhaps through-out all time, but let them not give up their *God*, let them not forget that they are the children of the sages.”

‘*My Master*’

भावार्थ:—“हिंदुस्थान कधींहि नामशेष होणार नाहीं, तो अमर आहे. निदान जोंपर्यंत त्यानें आपलें अध्यात्म सोडिलें नाहीं, तोंपर्यंत त्याला भंग नाहीं. त्याला अठरा विश्वे दरिद्र येवो, अखंड चिंध्या वल्कलें नेसण्याची वेळ येवो, पण त्यानें आपल्या देवाला टाकूं नये; व त्यांतील लोकांनीं आपण ऋषींची संतति आहों ही गोष्ट विसरूं नये.”

विवेकानंदासारखे जगन्मान्य, शास्त्रपरिष्कृत व उत्कट देशाभिमानी उपदेष्टे जर असें सांगतात तर आमच्या सारख्यानें अधिक काय सांगावें ? कांहीं लोक म्हणतात अहो, पुराणें वाचून वाचून तुम्ही आम्हांस असले उपदेश करतां, पण तो काळ वेगळा; तें युग वेगळें. हल्लीं कलियुग आहे; आतां या जुन्या गोष्टी आपण करूं म्हटलें तर आपल्याला फायदेशीर व्हावयाच्या नाहींत. काळाचे ओघाबरोबरच ढकलत गेलें पाहिजे. या कलिकाळांत “न देवे देवत्वं, कपटपटवस्तापसजनाः” असें लक्षणच दिलें आहे. आणि अशा काळांत कसलें पुढें आणीत बसला आहां? हें आध्यात्मिक आणि धार्मिक; आणि तीर्थें व व्रतें; वर्णाश्रम-

धर्म आणि देवदैवतें! सारा भ्रम. या काळांत देव देखील गप्प गप्प बसला आहे. ते अवतार नि बिवतार, सगळी बोली रद्द आहे. तर अशांसाठीं आम्ही पुढील उतारे देतों.

" What then was the temple in those days ? "

" The Temple was then the centre of Divine influence. The place where the presence of the Gods was known and felt, where the glory of the Gods would now and again shine forth in the eyes of the worshippers and where the love of the Bhakta would draw down a visible manifestation of the compassion of Deity. * * *

So mighty a power was there that even the most careless man who came there was for the moment changed and spiritualized, by the wondrous force which dwelt in the Temple by the power radiated from the image of the God within it.

भावार्थः—प्राचीन कालांत देवालयांची कल्पना काय होती? देवालयें हीं त्या वेळीं ईश्वरी सामर्थ्याचीं केंद्रस्थानें होतीं; ईश्वराचें ज्ञान होण्याच्या आणि त्याच्या साक्षात् अनुभवाच्या त्या जागा होत्या, भक्तजनांच्या अंगीं ईश्वराचें तेज प्रादुर्भूत होण्याचीं व भक्तांच्या प्रेमासाठीं दयाघन परमेश्वराचें प्रत्यक्ष दर्शन घेण्याचीं तीं स्थानें होतीं. * * * *

देवालयामध्यें असलें कांहीं अद्भुत सामर्थ्य होतें कीं, एखादा मनुष्य जरी सहज-गत्या त्या ठिकाणीं आला असला तरी देवालयाच्या एकंदर वातावरणांत भरून राहिलेल्या व देवालयांतील मूर्तीच्या ठायीं वसत असलेल्या विलक्षण शक्तीच्या योगानें, त्याची बुद्धी त्या वेळेपुरती तरी भारली जाऊन तिच्यावर ईश्वरी सामर्थ्याचा प्रभाव उमटे.

याप्रमाणें देवालयांचें पूर्वकालीन वैभव, वर्णून, पुढें मंत्र, देवता ब्राह्मण इत्यादिकांसंबंधें आजकालचे धर्मभ्रष्ट मनुष्यांस म्हटलें आहे.

" Do you dream, because you live in modern days, that these great things are but shadows of their former selves ? Do you dream that they have lost their real force, that the great truths have lost their vital energy, *that the holy mantras have now no power, that the sacred scriptures have now no magic and no strength ?—The change is not in them, but in those who use them*, in whose hands they are as forms, empty of all life, these things, which once brought down the very powers of God before the senses of men. I who speak to you bear you witness that the scriptures, which are yours but whose powers you do not know, are still as mighty as they were in ancient days; that these *Mantras have as much of their ancient power as ever, if only they are rightly uttered*. For, I know where sacred shlokas have been chanted by lips that were wise and pure, all that is said of the old days is true to-day, as real as ever it was in the past, even *now to hear such chanting, the Devas throng from every quarter* making the air vibrant with the rustle of their celestial garments, filling the whole air with perfume, while the silver tinklings of the bells of the heavenly choriders chime hormoniously with the sonorous chanting of the Sanskrit shlokas by the priest. *That still is true. It is not the form that is wanting. It is the life that should animate the form. There is the difficulty. It is that which we have to seek.*

भावार्थः—" तुम्ही आजकालचे दिवसांत रहातां, म्हणून मागील धार्मिक गोष्टी म्हणजे केवळ गतगोष्टींचे भास आहेत, असें समजतां काय ? तुम्ही असें मानतां काय कीं त्या गोष्टींतील पूर्वींचा खरा जोम नाहींसा झाला आणि त्यांत पूर्वींचें अद्भुत सामर्थ्य राहिलें नाहीं ? असें समजत असाल तर माझें उत्तर असें आहे कीं, आजकाल मंत्रादिकांचें सामर्थ्य तुमचे प्रत्ययास येत नसेल तर त्याचें कारण ते मंत्रादि नसून तुम्ही आहां. तुम्ही निर्जीव झाल्यामुळें ते मंत्र निर्जीव झाले आहेत. बाकी हेच मंत्र पूर्वी ईश्वरीशक्तीचे खेळ सर्वांचे प्रत्ययास आणून देत. मी स्वानुभवानें तुम्हांला साक्ष देतें कीं, हे तुमचे जुने वैदिक मंत्र पूर्वींप्रमाणेंच समर्थ आहेत. मात्र ते यथाविधि जपले पाहिजेत. मी असें पाहिलें आहे कीं, वेदशिक्षेप्रमाणें जर पवित्र आणि सुविद्य ब्राह्मणमुखानें या मंत्राचा जप होईल तर आजचे मितीस देखील जपाबरोबर त्या स्थानीं स्वर्गीय देवता सर्व दिशांनीं येऊन उभ्या रहातात, त्या वेळीं त्यांचे दिव्य वस्त्रांचा खडखड शब्द ऐकूं येतो. सर्व दिशा सुवासानें भरून जातात. व गंधर्वादिकांचे अंगावरील किंकिणी पुरोहिताचे तोंडांतून येणाऱ्या मंत्राचे तालावर वाजत रहातात. सारांश, मंत्रांचे रूपांत बदल झाला नाहीं, त्यांतलें चैतन्य तुम्हीं नाहींसें केलें आहे. आणि हें त्यांत घालण्याची पात्रता संपादन कोण करणार, हाच मोठा प्रश्न पडला आहे; दुसरें कांहीं नाहीं.

ह्या मागील गोष्टी जर खऱ्या, तर आजकाल अवतार वगैरे कां होत नाहींत असें कोणी पुसतील. त्यांस बिझांट म्हणते:—

" Why not an Avatar now, or if not an Avatar, why do not the great Rishis come forward to speak their golden words in the ears of men ? why do they desert us ? + + + +

The answer is, they are waiting, waiting, waiting, with tireless patience, in order to find some one willing to be taught, and when one human heart opens itself out and says. " O Lord, teach me " then the teaching comes down in a stream of divine energy and floods the heart. And if you have not the teaching, it is because your hearts are locked with the key of power and with the key of desire of the enjoyments of this world. Throw away these and you will find yourselves flooded with a wisdom which is ever waiting to come in. "

भावार्थः—" कोणी असें म्हणतील कीं, अलीकडे ईश्वरी अवतार कां नाहीं ? किंवा ऋषिजन आपला दिव्य उपदेश आमच्या कानांत कां सांगत नाहींत ? त्यांनीं आमच्यावर अवकृपा कां केली ?

याचें उत्तर असें आहे कीं, परमेश्वर किंवा ऋषि हे तर उलटे आपला उपदेश ऐकण्यास उत्सुक असा कोणी मिळेल कां ? म्हणून वाट पाहून पाहून दमले, आणि अजूनही एखादा मनुष्य जर आपलें अंतर्याम खोलून म्हणेल कीं, ' परमेश्वरा, मला आपलें ज्ञान दे ' तर विनंतीबरोबर दिव्य शक्तीचा ओघ वाहत येऊन त्याचें अंतःकरण भरून टाकील. असें असतां तुम्हांला जर उपदेश मिळत नाहीं, तर याचें वर्म हेंच कीं, तुमचे हृन्मंदिरास वित्तैषणा, लोकैषणा, दारैषणा, व अधिकारतृष्णा यांचीं टाळीं पडलीं आहेत. तीं तुम्हीं

काढा, म्हणजे तुम्हीं पहाल कीं, जो तुम्हांकडेच सतत ओढ घेत आहे, असा दिव्य ज्ञानाचा ओघ तुमच्या हृदयांत येऊन सांठवेल. "

हें वरील उताऱ्यांतील विधान अक्षरशः खरें आहे. आपले मंत्र, तंत्र, तीर्थें, देव-दैवतें सर्व कांहीं हयात आहेत. नष्ट झालीं नाहींत. मात्र लीन आहेत, पडून आहेत, निद्रिस्त आहेत. आणि याचें कारण उघडच आहे. त्यांनीं आपला कायदा एकदांच सरकारी ग्याझिटांत छापून दिला आहे. ' ये यथा मां प्रपद्यंते तांस्तथैव भजाम्यहं '—' जशास तसें—हाच आमचा कायदा, ' ' तुम्हांला आमची जरूर नाहीं. तर आम्हांलाहि कारण नाहीं. ' तुम्ही हांक मारा, आम्ही तयार आहों. गीतेच्या बाराव्या अध्यायांत स्पष्ट सांगितलें आहे.

" येतु सर्वाणि कर्माणि मयिसंन्यस्य मत्पराः ।
अनन्येनैव योगेन मांध्यायंत उपासते ।
तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात् ।
भवामिनचिरात्पार्थ मय्यावेशितचेतसाम् ॥"

कीं, जे मत्पर असतील त्यांना मी ताबडतोब वर काढतों. आणि पुराणें वाचून जर कांहीं लक्ष्यांत घेणें असेल तर हीच गोष्ट आहे कीं, या भूमींत जेव्हां जेव्हां विपरीत काल आला, जेव्हां जेव्हां विपन्नावस्था आली, तेव्हां तेव्हां जे ज्ञाते, मननशील, लोकनायक होते त्यांनीं परमात्म्याकडे धांव घेतली, उग्र तपश्चर्या केल्या, क्षीरसागरीं शरण गेले आणि त्या दीनपालकानें त्यांचे हांकेसरशी उडी घालून त्यांना उचलून धरलें. ध्रुवाला सापत्नमातेनें लाथेनें उडविलें. तेव्हां तो इतर फंदांत न पडतां जगन्मातेला ( परमात्मा ) हांक मारावयास गेला व तिनें त्याला कळवळून उचलून धरिलें व कायमचें अढळपद दिलें. तेव्हां इतर सर्व फंद सोडून परमात्म्यास शरण जाणें, तप करणें, हींच आमची स्वदेशी. हाच आमचा बहिष्कारयोग, हेंच आमचें स्वराज्य. हें ज्यांनीं साध्य केलें, त्यांचा परमात्मा घररिघा झाला. पांडवांचा रथ त्यानेंच हांकला. एकनाथाचें पाणी वाहिलें, दामाजीची रसीद भरिली. नरसिंह मेथ्याची हुंडी पटविली. कबीराचे शेले विणले. चोख्यामेळ्यांचीं ढोरें ओढलीं, जनाबाईचें दळण दळलें. अशा अनेक साक्षी त्यानें आजपर्यंत अनेक वेळीं अनेकांस पटविल्या आहेत. करितां अशा शहाजोग गृहस्थास हांका मारा, त्याला आपलासा करा म्हणजे तुमची सर्व चिंता दूर होईल, हाच तुमचा परमोत्कर्ष, हें निश्चयवाक्य समजा.

आतां या गृहस्थाला आपलासा करावयाचा म्हणजे एकच मार्ग आहेः धर्माचा आश्रय. कारण, ' धर्मस्य प्रभुरच्युतः " असें म्हटलें आहे. म्हणजे परमात्मा धर्माचा मालक आहे. धर्मत्राणार्थ त्याचा संभव आहे. करितां त्याला धर्मानें आपलासा करा. अनन्य भावानें त्याला शरण जा. आतां धर्म म्हणजे वेदविहित धर्म, वर्णाश्रम धर्म, ह्यांचें पालन कालविपर्यासामुळें तुमच्या हातून यथावत् होणार नसेल, तर त्यांवांचूनहि कांहीं अडलें नाहीं. इतक्या बारकाव्यांत, इतक्या खवदवींत पडणें नसेल, तर एक फार मोठा, सर धोपट रस्ता आहे तो तरी पत्करा. तो रस्ता म्हणजे, सर्वजण ब्राह्मण व्हा.

ताननाक, चांगनाक, पिऱ्या मांग, नथ्या चांभार, सर्वजण ब्राह्मण व्हा. कारण,

देव म्हणतो ' ब्राह्मणो मम दैवतं " ब्राह्मण हा देवाचेंहि दैवत आहे. तेव्हां ब्राह्मण्याहून अधिक उच्च तें उरलें काय ? बरें, हें मिळविण्यास कोणाची आडकाठी नाहीं—आजपर्यंत हें पुष्कळांनीं मिळविलें आणि त्यांच्या त्यांच्या दारीं देव सेवक बनला, असा स्पष्ट दाखला आहे. धर्मव्याध, चोखामेळा, रोहिदास, सांवता माळी, सेना न्हावी, गोरा कुंभार, नामा शिंपी, तुका वाणी, नरहरि सोनार हे सर्व ब्राह्मण होते व देव त्यांचा किंकर होता. यासाठीं अशेषजात ब्राह्मण व्हा. नुसते आर्यावर्तवासीच नव्हे तर चतुःखंड पृथ्वींतील सर्व मनुष्य जर ब्राह्मण होतील तर आम्ही खातरी सांगतों कीं, त्या सुखाला पारावार राहींसा होईल. स्वर्ग देखील या मृत्युलोकापुढें लाजून मान खालीं घालील. करितां ब्राह्मण व्हा.

वरील वाक्य ऐकून आमचा ग्यानबा चांभार, गोंदनाक म्हार, गेन्या मोची, म्हणतील कीं, ठीक आहे आमची तयारी आह्मी बहुतेक सिद्धता केलीच आहे. आडवीं गंधें लावूं लागलों आहों. पांच कांसटच्याचें धोतर बामणावाणी नेसलों आहों, कपडेलत्ते चढविलेच आहेत. आतां आह्मासनी तुह्मीं आपले ताटांत घ्या म्हणजे संपलें. आमचे ब्राह्मणांतील सुधारक बंधु म्हणतील. आह्मी तर तुमचे पूर्वीच ही गोष्ट ओळखून तजवीज केली आहे. अंत्यजोद्धाराचें काम आह्मीं चालू देखील केलें, आह्मी बुटलेराचे हातचें फराळाचें खातों, महाराचेहि पंक्तीस बसूं शकतों. आतां काय म्हणतां ? तर या मंडळीस आमचें सविनय असें उत्तर आहे कीं, हें ब्राह्मण होणेंहि नव्हे, आणि करणेंहि नव्हे. या ब्राह्मण्यापासून दुसरा तर कांहीं फायदा होणार नाहीं, परंतु, ' तुका म्हणे दोघे नरका जाति ' अशांतली ती गोष्ट होणार आहे. हें ब्राह्मण्य नव्हे. आह्मी जे मागें अवर जातींतील ब्राह्मण सांगितले, रोहिदास, चोखामेळा, सजनकसाई इत्यादिक जे लोक यांनीं कधीं असले ब्राह्मण्याची हांव धरिली नाहीं. ते कधीं ब्राह्मणाचे पंक्तीस येतों म्हणाले नाहींत, जानवें घालण्याचे भरीस पडले नाहींत आणि ब्राह्मणांनींहि या उठाठेवी केल्या नाहींत. रोहिदासानें आपलें पोट चिरून आंतून जानवें काढून दाखविलें, अर्थात् तो इतर ब्राह्मणजातीय ब्राह्मणापेक्षांहि किती तरी पटीनें खरा ब्राह्मण झालेला होता, तथापि, त्यानें ब्राह्मण मंडळीचे पंक्तीस बसण्याचा कधीं हट्ट घेतला नाहीं. तुकारामाचें, नामदेवाचें नांव घेऊन पायां पडणारे आज शेंकडों हजारों ब्राह्मण आहेत, परंतु तुकारामानें मला कधीं ब्राह्मण म्हणा किंवा ब्राह्मणाचें जानवें द्या म्हणून मागितलें नाहीं. उलट तो आपले कुणबटपणांतच खूष होता. तो म्हणतो:

" बरा झालों कुणबी केलों ।
नाहीं तर गर्वें असतों मेलों ॥ "

यावरून विचारी वाचकांचे लक्षांत येईल कीं, आजकालचा प्रकार हा केवळ बाष्कळ आहे. दुसऱ्याला ब्राह्मण करणाऱ्यांनीं अगोदर आपलें ब्राह्मण्य झळझळीत उजळलें पाहिजे. नुसतें पावरोटी एकत्र खाऊन अब्राह्मणाचे ब्राह्मण बनत नसतात. दुसऱ्याला ब्राह्मण्य देणें, हा अधिकार आजकालच्या बिसकीटखाबूंचा नव्हे. ती कामगिरी अवतारी पुरुषांची आहे.

दुसरें, "चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः" या शब्दांनीं ज्या भगवंतानें 'ब्राह्मणादि वर्णांचें भिन्नत्व मी केलें आहे' असें बेधडक जगास जाहीर केलें, त्यानेंच या भेदांची सीमांतरेखाहि आंखून दिली आहे. ज्ञानेश्वरींत भगवान् म्हणतात:

'तेचि भलतेणें भावें । मन मज आंतु येतें हो आवें ॥
आलें तरी आघवें । मागील वावो ॥ ४५७ ॥
× × क्षत्री वैश्य स्त्रिया । कां शूद्र अंत्यजादि इया ॥
जाति तंव वेगळेलिया । जंव न पावती मातें ॥ ४६० ॥ इ०

यावरून पहातां वर्णभेद हे सहेतुक, सावधि व समाजकल्याणार्थच कर्त्यानें केले असून, त्यांची मर्यादाहि त्यानेंच ठरविली आहे. म्हणजे हा प्रकार अंधन्यायाचा किंवा अेरावीचाहि नसून जाणतपणाचा व सावधगिरीचाच आहे. मग यापुढें आम्ही पामरांनीं आपलें शहाणपण मिरविणें हा अविचार तरी किंवा उद्दामपणा तरी म्हटला पाहिजे. गुणकर्मांनीं योग्य असल्यास अवर जातीला वरिष्ठ जातींत सामील करण्यास काय हरकत आहे, हा प्रश्न आजकाल वारंवार विचारला जातो, यावर त्रिझाट विदुषींचें स्पष्ट उत्तर असें आहे:—

Frankly speaking, I do not believe that it is practicable, until a great authority, a great spiritual authority, is once more manifested and recognised through India, which will speak with the Divine Voice and be able to give the recognition which is based on knowledge.

\+ + + +

Rather would I suggest the old and the wise way of looking at this matter, whatever be the body one is born with, one should, cheerfully accepting the Karma of the body, work in that body, with all its advantages and disadvantages, whatever they may be.

भावार्थ:—" मला माझा खुला अभिप्राय विचाराल, तर ब्राह्मणेतरांस ब्राह्मण जातींत घेण्याचें काम सोपें नाहीं. त्याला अलम भरतखंडाला मान्य होईल असा जेव्हां कोणी अवतारी पुरुष निपजेल आणि तो आपल्या दैवी दृष्टीनें जीवांचा अंतर्गत अधिकार ओळखून आपले दैवीवाणीनें जेव्हां त्याचें उच्चजातित्व सर्वांस महशूर करील, तेव्हांच ही गोष्ट संभवेल.

तोंपर्यंत मला वाटतें कीं, लोकांनीं शहाणपणाचा जुना मार्गच स्वीकारावा. म्हणजे त्यांचे पूर्वकर्मामुळें त्यांना ज्या कोणत्याहि जातींतला देह मिळाला असेल व त्या पायीं ज्या कांहींहि सोई गैरसोयी असतील त्यांतच आनंद मानून, त्यांनीं आपले उन्नतीचा मार्ग चोखळीत रहावें.

बिझांट बाईनीं हा जो जातिमर्यादेबद्दल अभिप्राय दिला, तो फार दूर विचार करून दिला आहे. नुसत्या जन्मावरून ब्राह्मणादिकत्व देणें ही थट्टा आहे, किंवा अन्याय आहे ही गोष्ट आजकालच्यानींच समजाऊन देण्यास पाहिजे असें नाहीं. ती कोणाहि विवेकी मनुष्यास केव्हांहि पटणारी आहे. ब्राह्मणवर्णाची तरफदारी करणाऱ्या मन्वादिकांनीं देखील न्यायास आलें तें बोलण्यास कमी केलें नाहीं. "ब्राह्मण होऊन वेदाध्ययन न करील तर तो लांकडाचा हत्ती किंवा चामड्याचा हरिण, यापैकींच समजावा. अनधियान विप्र ह्याच जन्मीं शूद्रत्वास

जातो, " इत्यादि साफ साफ स्मृतिवचनें आहेत. धर्मविवरणांत अत्यंत कुशल अशा कुरु-वृद्ध भीष्मांनीं देखील स्वच्छ सांगितलें आहे कीं, ज्याचे अंगीं ब्राह्मणाचीं लक्षणें असतील तो शूद्र असूनहि ब्राह्मण समजावा. व ज्याचे अंगीं शूद्राचीं लक्षणें असतील तो ब्राह्मण असूनहि शूद्र समजावा." तेव्हां ही गोष्ट कोणाहि विवेकी मनुष्याला कबूल करावी लागणारी आहे. परंतु, शास्त्र आणि प्रयोग, कल्पना आणि व्यवहार यांत जें अंतर सदा पडतें, तें तेंथेंच. अशा कितीतरी गोष्टी आहेत कीं, त्या शास्त्राला किंवा कल्पनेला सुलभ आहेत, परंतु व्यवहाराला दुर्घट आहेत. अशा ठिकाणीं निर्णय इतकाच कीं, अन्यायाचे पोटांत न्याय सोधावयाचा. न्यायाचे पोटांत न्याय पाहूं गेल्यास व्यवहारांत फारच अडचणी येतात व त्या टाळण्यासाठीं एक बाजूनें अन्याय पत्करावा लागतो ! हाच सर्वत्र प्रकार दिसून येतो. व तो स्वीकारल्याशिवाय गतीच नाहीं. ब्राह्मण्याविषयीं पात्रता ठरविणें हा तर फारच अवजड प्रश्न आहे. तो सोडविण्यास बिझांटबाई म्हणते त्याप्रमाणें खरोखरच अंतर्दृष्टीचा अवतारी पुरूषच पाहिजे. परंतु यत्किंचित शुष्क गोष्टी, गांव सभेचे सभासद निवडणें, हें तरी काम खऱ्या पात्रतेचे दृष्टीनें सर्वत्र होन असतें, असें म्हणण्यास कोणी सत्यप्रिय मनुष्य धजेल काय? प्रत्येक ठिकाणीं ऐकावें तों अन्याय, असमाधान, नाइलाज हीच अंतर्भावना असते. ज्याला पुरी सही कारितां येत नाहीं असा कोणी खाटीक, कोणी विडीवाला, कोणी कोंबडीवाला असे लोक मेंबर होऊन अनेक विद्या-विशारद अशा विद्वानांचे मांडीशीं मांडी लावून बसतात व सारखे हक्क मिरवितात. ही गोष्ट, खरें पुसतां, कोणाला रुचणारी आहे काय ? परंतु, अनवस्थाभयात् पत्करावी लागते. तोच न्याय येथेंहि पत्करणें जरूर आहे. निदान तूर्तेचे स्थितींत तरी असलाच न्याय जाणून बुजून पत्करण्यांत सुख आहे. आतां पोटांतले पोटांत शक्य ती सुधारणा करावी. कारण ती अधिक सुखानें—निदान—न्यायानें होण्यासारखी आहे. ती अशीः—ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या चार जाती अति अतिच प्राचीन आहेत. केवळ युगयुगांतरापासून आहेत आणि त्या गीतेंत सांगितल्याप्रमाणें खचितच ईशकृत आहेत व शास्त्रीय पायावरहि उभारलेल्या आहेत. तेव्हां त्या उमळून पाडणें हा पुष्कळ अंशीं अविचार, निदान साहस, तरी होणार. परंतु या चहूंचे पोटांत ज्या देश, काल, पंथ, व्यक्त्यभिमान इत्यादि कारणांनीं असंख्य उपजाती झाल्या आहेत, त्या अर्थातच शास्त्रमूलक नाहींत. याकरितां त्या प्रथम सर्व मिटवून केवळ वेदोक्त ढळढळीत चार वर्ण कायम करावे; आणि ही स्थिति सात पिढ्या, चौदा पिढ्या, नांदली म्हणजे मग या मूळभूत चतुर्वर्णांतहि परस्पर व्यवहारांत, मागील पुरावे पाहून, जेवढें सौकर्य साधेल तेवढें अमलांत आणावें. असें न कारितां आजच वर्णाश्रमाचें निर्मूलन कोणी करूं जातील तर त्यांचे हातून उपकारापेक्षां अपकारच अधिक होतील, असें आमचें तरी ठाम मत आहे.

श्रीगुरुचरित्रांत अध्याय २७ त एका मातंगासा ब्राह्मण्य देऊन त्याचे मुखानें सर्वांसमक्ष वेद बोलविल्याची कथा प्रसिद्ध आहे. पण तेथें समर्थ श्रीगुरूंनीं त्या मातंगाचे अंगीं ब्राह्मण्य तत्क्षणीं उमटवून तें लोकांचे व त्या मातंगाचे प्रतीतीस आणून दिलें. आजकाल या सामर्थ्याचा जर कोणी असेल तर त्यानें श्रीगुरूंप्रमाणें प्रत्यय पटवून खुशाल अंत्यजोद्धार करावा, व सबंदचे संबद महारवाडे ओस पडून वेदमूर्तींचे खानेसुमारींत वाटेल तितकी

भर टाकावी. आम्ही अशाचे उपकार मानूं, अशाला प्रेमालिंगन देऊं; नव्हे, अशाचे पाय धरून किंकर होऊन राहूं.

असो; या परधर्मी बाईचा, कीं जिच्या धर्मांत जातीचा विचार मुळींच नाहीं, अशीचा देखील हा अभिप्राय आहे, तेव्हां हा ' अव्यापारेषु व्यापार ' करण्याच्या कोणींच नादीं लागूं नये. बाईचें म्हणणें हिशोबी आहे. लोखंडाचें सोनें करणें हें सामर्थ्य सोन्याचें नव्हे, परिसाचें आहे, कारितां सोन्यांत लोखंड मिळविल्यानें जसें लोखंडाचें सोनें न होतां सोनें मात्र हिणकस होईल, तसाच प्रकार आजचे ब्राम्हणांनीं पिऱ्या मांगाला पंक्तीस ओढल्यानें होणार आहे. ही कामगिरी निराळ्या अधिकाऱ्याची आहे. बरें, हिजवांचून अडलें नाहीं. आम्ही जे ब्राम्हण म्हणतों आहों ते तयार करून घेण्यास कोणत्याहि धर्मशास्त्राची आडकाठी नाहीं व आम्हीं म्हणतों तें ब्राम्हणत्व जर खरोखर लोक संपादतील, तर मग आमच्या या वरपांगीं ब्राम्हणांची त्यांना किंमतहि उरणार नाहीं. तेहि तुकारामाप्रमाणें म्हणतील कीं, ' बरा झालों, मोची केलों ' इत्यादि.

आतां हें आमचें ब्राम्हण्य काय आहे व कोठें आहे? तर हें ब्राम्हण्य भगवद्गीतेंत आहे तेथें त्याचें वर्णन दिलें आहे. तें असें:—

" शमो दमस्तपः शौचं क्षांतिरार्जवमेवच ।
ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजं ॥ अ० १८ श्लो० ४२

**अर्थः**—चित्ताचें नियमन, बाह्येंद्रियनिग्रह, तप, शुचिर्भूतपणा, सहनशीलता, सरळपणा, आनुभविक व शास्त्रीयज्ञान, परलोकाविषयीं व परमेश्वराविषयीं श्रद्धा, भक्ति, हें ब्राह्मणाचें उपजत कर्म समजावें. **किंवा एका शब्दांत हें ब्राह्मण्य सांगावयाचें म्हणजे ' सत्वगुणाचा प्रकर्ष ' संपादणें हेंच होय. ह्याशिवाय खरें खरें सौख्य केव्हांहि होणार नाहीं.** अर्थात् अस्सल ब्राह्मणाचीं, जातिवंत ब्राह्मणाचीं, हीं लक्षणें आहेत. व हीं अंगीं आणण्यास कोणालाहि मज्जाव नाहीं. याला सामाजिक परिषदा नकोत. पतितपरावर्तनें नकोत. अंत्यजोद्धाराची थट्टा नको. कशाचीच जरूर नाहीं. वाटेल त्याला हीं लक्षणें अंगीं आणण्याचा पूर्ण अधिकार आहे, याला शंकराचार्य आडवे येऊं शकत नाहींत. यांत राजविरोध नाहीं, कोणतीच अडचण नाहीं. बरें कार्यसिद्धि मात्र उदंड आहे.[१]

यास्तव, या भारतभूमींतील सर्व जातींनीं हें ध्येय आपले पुढें ठेवून हें ब्राह्मण्य अंगीं

---

१ स्वामी विवेकानंद म्हणतात.

" Just as sanskrit has been the linguistic solution, so Brahmanhood is the solution of the varying degrees of progress and culture as well as that of all social and political problems. "

**सारांशः**—" सर्व भाषांचा उलगडा जसा संस्कृत भाषेंत मिळतो त्याचप्रमाणें कोणत्याहि जातीची प्रगति व शिक्षण आणि यावत् सामाजिक व राजकीय कोड्यांचा उलगडा ब्राह्मण्यांत आहे. "

२ पावशेर भस्म फांसून गोमुखींत हात घालून बसणारें ब्राह्मण्य जरी विहित असलें तरी तें आजच्या स्थितीला फार उपकारक नाहीं, म्हणून आम्ही त्याचा विचारच येथें करीत नाहीं.

आणण्यास झटावें व सर्वांनीं हें आपले बंधूचे मनावर ठसविण्यास साह्य करावें. अशा रीतीनें जर हें ब्राह्मण्य बळावलें तर चिंता, शोक, दरिद्र, दुःख, ज्या कांहीं अनिष्ट गोष्टी या भूमींत कोणास दिसत असतील, त्यांचें ठाणें उठलेंच असें समजावें. व शांति, आनंद, उत्कर्ष समाधान यांनीं मुक्काम येथें ठोकलाच, असें निश्चित ओळखावें.

वर आम्ही ब्राह्मण्याविषयीं इतकी बळकट शिफारस केली व ती यथार्थहि आहे. तथापि फिरून असें ध्यानांत आलें कीं, आजकाल कांहीं विशिष्ट कालधर्मामुळें ब्राह्मण्य हें खरें असलें तरी बरें नाहींसें झालें आहे. ब्राह्मण जातींतच अगोदर ब्राह्मण्याचा पुष्कळांना कंटाळा किंवा वीट आला आहे. व अन्य जातींत जरी ब्राह्मण्य आणि वेदोक्त इत्यादिकांची हौस आली आहे, तरी जुलिएटला जसा रोमियो सर्व प्रकारें आवडत होता परंतु त्याचें तें आडनांव तेवढें जाचत होतें, त्याचप्रमाणें हल्लीं हल्लीं ब्राह्मण्याची जरी अंतर्यामीं इच्छा असली तरी इतउत्तर तें आडनांव नको आहे. कारण तें व्यवहारांत नुकसानीला कारण होत आहे, असा अनुभव येत चालला आहे. आणि म्हणून आम्हींहि आपली शिफारस परत घेतों. व जेथें आजकाल जाचणारे जातिभेदाचे कल्पनेची छायाहि नाहीं, असा सर्वांगसुंदर, सर्वार्थसाधक, सर्वांस विहित, व इहपरत्रीं कल्याणकर्ता राजमार्ग श्रीमन्महाभारतकर्ते व्यासमहर्षींनीं सांगितला आहे, त्याचा सर्वांनीं—सर्व जातींनीं, हिंदु, मुसलमान, पारशी, यहुदी, इंग्रज, फ्रेंच, हांटेंटाट, पृथ्वीतलावर ज्या अशेष जाती असतील त्यांनीं स्वीकार करावा असें सुचवितों. व हा केल्यानें खरोखरच या पृथ्वीपुढें स्वर्ग ठेंगणा होईल. तो मार्ग म्हणजे ' सनातन धर्म '.

या सनातनधर्माचें स्वरूप त्याच सदय महर्षींनीं दिलें आहे तें असें:—

" सत्यं दमस्तपः शौचं संतोषो ऱ्हीः क्षमार्जवं ।
ज्ञानं शमो दया ध्यानमेष धर्मः सनातनः ॥ "

**अर्थः**—सत्य म्हणजे प्राण्यांना हितकारक असें बोलणें, दम म्हणजे मनाचें संयमन. तप म्हणजे स्वधर्मपरता, शौच म्हणजे शुद्धता किंवा पवित्रता, संतोष, ऱ्ही म्हणजे गैरकर्माचा अव्हेर, क्षमा म्हणजे शीतोष्णादि सहन करणें, आर्जव म्हणजे समचित्तत्व, ज्ञान म्हणजे तत्वार्थाचा बोध, शम म्हणजे चित्ताची प्रशान्तता, दया म्हणजे भूतमात्रांविषयीं हितबुद्धि आणि ध्यान म्हणजे निर्विषय मन, हा सनातनधर्म होय. व याचा अवलंब करण्याविषयीं कोणालाहि प्रतिबंध नाहीं. हींच लक्षणें कांहींशा फरकानें याज्ञवल्क्यांनीं दिलीं आहेत. तीं तितकींच प्रशस्त असून अधिक सोईचीं आहेत.

" अहिंसा सत्यमस्तेयं शौचमिंद्रिय—निग्रहः ।
दानं दमो दया क्षान्तिः सर्वेषां धर्मसाधनम् ॥ "

पदांचा अर्थ वर आलाच आहे. विशेष मुद्याचे अधिक शब्द आहेत ते ' सर्वेषां-धर्मसाधनम् ' म्हणजे सर्वांना हें धर्मसाधन आहे. यांत वर्ज्यावर्ज्य किंवा भेद हा नाहींच. मग तो कोणत्याहि जातीचा किंवा धर्माचा असो; त्याचा विचार करण्याचें कारण नाहीं. आणि जो कोणी मननपूर्वक वरील गोष्टींचा विचार करून पाहील, त्याला असें आढळून येईल कीं,

व्यक्तिहितदृष्टीनें पहा, समाजहिताचे दृष्टीनें पहा, किंवा राष्ट्रहिताचे दृष्टीनें पहा, वरील सार्वजनिक म्हटलेल्या धर्मसाधनांपैकीं एक एक साधनच इतकें व्यापक, प्रशस्त व हितकारक आहे कीं, त्याचें अल्पस्वल्प प्रमाणावरही कोणी पालन करील, तर गीतेंत भगवान् म्हणतात:—

स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात् ।

त्याप्रमाणें केवढा तरी अनर्थ दूर होईल. आणि मग त्यांतील सर्वच गोष्टी मनुष्यानें जर पाळल्या, तर स्वर्ग येथेंच उभा राहील; याबद्दल आह्मी ग्वाही देऊं शकतों. आणि याचे उलट हेंहि सांगतों कीं, या लक्षणाकडे पाठ करून म्हणजे धर्माला पराङ्मुख राहून मग तुम्ही वाटतील तितके कायदे कानू करवा, सामाजिक परिषदा करा, राष्ट्रीय सभा करा, जातीसमिती करा, व्यवहारनियम बांधा, करारनामे लिहा, नोंदबुकें ठेवा—जनतेला सुख व्हावयाचें नाहीं. विचार करा कीं, जनांत जर एक सत्य, अढळ सत्य, अखंड सत्य असेल तर व्यवहारांत किती किती तरी सौख्य होईल. जी गोष्ट आपणांस जशी माहीत असेल तशीच जर प्रत्येकजण सांगेल, मग तीबद्दल शत्रु पुसो, मित्र पुसो, राजा पुसो, कीं स्वस्त्री पुसो; जी वस्तु आपली नव्हे ती उभ्या रस्त्यावर पडली असो, मालकाखेरीज इतर मनुष्यप्राणी मिळून तिला हात लावणार नाहींच, अशी जर मनुष्यें नीतिमत्ता वागवितील, तर प्रवास किती तरी सुखकर होईल? कड्या कुलुपांचे, लोखंडी तिजोऱ्या आणि 'सेफा' वगैरे वस्तुरक्षणार्थ लागणारे हजारों रुपयांचे, खर्च वांचतील. व शिवाय प्रत्येकाचें मनहि निघोर निश्चित राहिल्यानें मनुष्यांची आयुष्यवृद्धि देखील होईल. बरें, केवळ इतका नाहीं तरी आजचेपेक्षां शतपटीनें अधिक सत्यप्रियतेचा काळ ह्या आर्यभूमींतच होता. आणि तो देखील फार फार दूर, म्हणजे रामकाळीं नव्हे. नुकता नुकता होता. या देशावर स्वारी करणारा जो प्रसिद्ध शिकंदर बादशहा त्याजबरोबर एरिअन म्हणून एक इतिहासकार होता. त्यानें साफ असें लिहिलें आहे कीं, हिंदुमनुष्य मिळून त्रिकाळीं अनृत भाषण करितांना आम्हांस माहीत नाहीं. त्याचे पुढील उद्गार वाचा.

"No Indian was ever known to tell an untruth."

"They are so honest as neither to require locks to their doors nor writings to bind their agreements."

म्हणजे, भारतवासी हे इतके प्रामाणिक आहेत कीं, त्यांना आपले दारांना कुलुपांचें कारण पडत नाहीं किंवा तोंडचे करार लेखी करून ठेवण्याचाहि प्रसंग येत नाहीं. (कारण परद्रव्याला कोणी हात लावावयाचा नाहीं. बोलले जबाबाला कोणी फिरावयाचा नाहीं.) विशेषत: ब्राह्मणासंबंधें तो म्हणतो.

"*They (the Brahmins) would not tell a lie for anything on earth*"

म्हणजे या भूतलावर अशी कोणतीहि वस्तु नाहीं कीं जिचे लोभास्तव किंवा त्रासास्तव ब्राह्मण हा अनृत भाषण करील.

आजकाल या कसोटीला शेंकडा कितीजण उतरतील तें प्रत्येक वाचकानेंच मनाशीं पहावें. बोलून दाखविण्यांत चव नाहीं. शिकंदराची वेळहि बरीच जुनी झाली. पण अगदीं

अगदीं अलीकडे म्हणजे इंग्रजांचा अम्मल या देशांत सुरू नुकताच होऊन कोर्टाची व्यवस्था झाल्यावरचे, स्लीमन नामक एका इंग्रजी जज्जाचे पुढील उद्गार वाचा. तो म्हणतोः—

" I have had before me hundreds of cases in which a man's property, liberty, life, has depended upon his telling a lie and he has refused to tell it. "

Sleeman-Judge.

म्हणजे—' मजपुढें हजारों हजार असे खटले आले आहेत कीं, त्यांत जर पक्षकार एक शब्द खोटा बोलेल तर त्याचें घरदार, मिळकत सुटत होती, तो बंधमुक्त होत होता, आणखी काय ? पण त्याचा प्राण वांचत होता. तथापि त्यानें मिळून खोटें नाहींच सांगितलें.'

हें अवतरण देऊन, मोक्षमुल्लर साहेब भारतीयांविषयीं एकप्रकारें साभिमान होऊन आपले जातभाईस खोंचून प्रश्न करितात.

" Could many an English Judge say the same ?

म्हणजे अशाप्रकारचें विधान इग्लंडांतील न्याय मंदिरांतील पक्षकारासंबंधें करण्याची छाती कितीशी इंग्रज न्यायाधिशांना होईल बरें ?

भारतीय आर्यहो, हा विचार करा. हें तुमचें सत्यप्रियत्व कोठें गेलें आणि तें गमवून त्याचे बदली तुम्ही काय पैदा केलें ? आम्हाला वाटतें कीं, हल्लींचें अल्पायुत्व, प्लेग, दुष्काळ-परंपरा, इत्यादि अनेक अनिष्ट गोष्टी, यांस आमचें सत्यपराङ्मुख व मलिन आचरणच कारण आहे. कारण, साथीचे रोग, लढाया, भूकंपादि प्रलय असले राष्ट्रीय अनर्थ हे सामान्यपात-कांनीं होत नाहात. मिझांटबाई म्हणते:—

' A plague sweeps thousands of the men of a nation A mighty war scatters its thousands of dead on the field of carnage Why ? Because that nation had disregarded the divine law of it's growth and must learn its lesson by suffering, if it will not learn it by reason. '

भावार्थः—एखाद्या राष्ट्रांत सांथ येऊन या टोंकापासून त्या टोंकापर्यंत हजारों लाखों माणसें घेऊन जाते किंवा एखादें भयंकर युद्ध उद्भवून सर्व रणभूमी प्रेतांनीं भरून निव्वळ लाखो बळी पडतात. या गोष्टींतील रहस्य काय ? रहस्य इतकेंच कीं, त्या राष्ट्रानें स्वोन्नती-बद्दल त्याला ईश्वरानें घालून दिलेला कायदा मोडला. आणि ज्या अर्थीं उपदेशाचे शब्दांनीं तें राष्ट्र शुद्धीवर येत नाहीं, त्याअर्थीं आतां दांडके उगारणें हाच उपाय, असें ईश्वरालाहि वाटून तो तसें करितो.

याप्रमाणें पहाल तर तुमचे ध्यानांत आमचे म्हणण्याची यथार्थता तेव्हांच येईल. सत्यपराङ्मुखता ही या आर्यभूमीला विशेषतः विघातक होते. याचें कारण आम्ही पूर्वींच एका उताऱ्यांत सांगितलें आहे. कीं, ' धर्मपालन ' हीच या राष्ट्रास ईश्वरी आज्ञा आहे. धर्मानेंच या राष्ट्राचा उत्कर्ष व्हावा असा ईश्वरी संकेत आहे. आणि सत्य हें धर्माचें उत्तमांग म्हणजे शिर आहे. इतर गुण हे त्याहून कमी प्रतीचे अवयव म्हटलें तरी चालेल आणि तें सत्य, तें शिरच, जर तुटलें, तर मग अनेक अनर्थ ओढवावे, यांत काय नवल ?

असत्य, कपट, छलवाद, यापासून केवढे अनर्थ होतात याचें उदाहरण प्रत्यक्ष भागवतांतच

आहे. साक्षात् श्रीकृष्णाचे जातभाई, परंतु त्यांनीं आपल्यांतील 'सांब' नांवाच्या एका यादवाला लटकाच स्त्रीवेष देऊन ऋषींपुढें उभा केला व 'ही गरोदर स्त्री आहे' असें खोटेंच सांगून हिला अपत्य काय होईल असें विचारलें; त्याबरोबर त्या अंतर्ज्ञानी मुनींनीं त्यांचें तें खोटें कर्म पाहून कोपानें शाप दिला व तो प्रत्ययास येऊन कोटों यादवांचा संहार होऊन कुलक्षय झाला. अशी धडधडीत गत इतिहासाची साक्ष आहे. याहून या इतिहासांनीं आमचे डोळे उघडावे तरी कसे? आणि किती? तथापि, आम्ही आपले निर्दयतच चाललों आहों. मला वाटतें आम्ही देवालाच मट्ठ बसविण्याची वेळ आणली आहे. हरहर! हें बरें नव्हे, निदान भारतीयांना तरी हें हितकर नाहीं. करितां त्यांनीं मागें पहावें व धर्माची कांस धरावी; हाच त्यांचे उन्नतीचा एकच एक उपाय आहे.

असो; आज इतके दिवस भारतासारख्या महनीय ग्रंथाचा परिचय करून आमचे अल्पमतीला जो कांहीं त्यांतील सारभूत भाग वाटला त्यांतला कांहीं अंश आम्ही प्रेमभावानें व प्रांजलपणानें आमचे वाचकबंधूपुढें मांडिला आहे. तो रुचल्यास त्यांनीं ध्यावा. व अखिल भारतादि पुराणाचें सार म्हणून एकच वाक्य सतत मनांत वागवावें. तें वाक्य हेंच कीं, '**यतोधर्मस्ततोजयः**' आणि त्याप्रमाणें सर्वांनीं वागावें.

आतां अखेर सर्व वाचकांचे वतीनें पुढील आशीर्वाद परमेश्वरापासून मागून घेऊन हा लेख संपवितों.

**सर्वेऽत्र सुखिनः संतु सर्वेसंतु निरामयाः।**
**सर्वेभद्राणि पश्यंतु जीवंतु शरदांशतम्॥**

॥ इति शं ॥



# शुद्धिपत्र.

—:०:—

## भविष्यपर्व.

| अध्याय | पान | रकाना | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|---|
| ७२ | ७४१ | २ | ८ | भागवत | भारत |

## COPY

C. A. Kincaid I. C. S. in his book named "The tale of the Tulsi Plant and other studies" speaks voluntarily of our company and our Translation of the Mahabharat in the following terms, in a footnote on page 12.

"I have not translated from the Sanskrit but from Messrs. Datar & Modak's admirable Marathi rendering. The book has been published at great expense by Messrs., Chiplunkar & Co., at the Indira press, Poona, and the second half of the rendering is delayed for want of funds. I would venture to appeal to the Marathi reading Public to assist by purchasing the parts already translated, in the publication of the second half"

---

श्री.

मेहेरबान **सी. ए. किंकेड.** आय. सी. एस. यांनीं आपल्या 'दि टेल ऑफ दि तुळशी प्लँट अँड अदर स्टडीज' या पुस्तकांत **गणेश विष्णु चिपळुणकर** आणि **मंडळीच्या** महाभारताच्या भाषांतराची आपण होऊन खालीं दिल्याप्रमाणें तरफदारी केली आहे

"सदर्हू गोष्टींतील मजकूर मी मूळ संस्कृतांतून न घेतां रा. दातार व मोडक यांनीं केलेल्या अप्रतिम भाषांतरावरून घेतला आहे हें पुस्तक चिपळूणकर आणि मंडळीनें पुष्कळ द्रव्य खर्ची घालून तयार केलें असून तें पुणें येथील इंदिरा छापखान्यांत छापविलें आहे परंतु द्रव्यसहाय्याच्या अभावीं सदर ग्रंथाचे पुढील भाग छापण्याचें काम लांबणीवर पडलें आहे. तरी मराठी भाषेतील वाचकांना माझी अशी शिफारस आहे कीं त्यांनीं आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या भागांना आश्रय देऊन पुढील प्रकाशनाच्या कामीं अवश्य मदत करावी"

वरील अभिप्राय मि. किंकेड साहेबांनीं लिहिला त्यावेळीं महाभारताचे फक्त चारच भाग प्रसिद्ध झाले होते परंतु आतां जरी सर्व काम पूर्ण झालें आहे तरी या कामीं झालेल्या अवाढव्य कर्जाचा विचार करून महाराष्ट्रभाषाभिमानी वाचकांनीं ग्रंथाच्या प्रती विकत घेऊन मदत करणें अत्यंत जरूर आहे

प्रकाशक

# अनुक्रमणिका.

## हरिवंश ( उत्तरार्ध ).

## योगखंड.

### इंग्रजी भाग.



# हरिवंशमाहात्म्य.

## अध्याय पहिला.

## भविष्यपर्व.

### मंगलाचरण.



**नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम् ।**
**देवीं सरस्वतीं चैव ततो जयमुदीरयेत् ॥ १ ॥**

( श्रीगणेशाला वंदन असो. ) ह्या अखिल ब्रह्मांडांतील यच्चयावत् स्थावरजंगम पदार्थांच्या ठिकाणीं चिदाभासरूपानें प्रत्ययास येणारा जो नरसंज्ञक जीवात्मा, नरसंज्ञक जीवात्म्यास सदासर्वकाळ आश्रय देणारा जो नारायण नामक कारणात्मा, आणि नारायणात्मक कार्यकारणसृष्टीहून पृथक् व श्रेष्ठ असा जो नरोत्तम–संज्ञक सच्चिदानंदरूप परमात्मा, त्या सर्वांस मी अभिवंदन करितों; तसेंच, नर, नारायण व नरोत्तम या तीन तत्त्वांचें यथार्थ ज्ञान करून देणारी जी देवी सरस्वती, तिलाही मी अभिवंदन करितों; आणि त्या परमकारुणिक जगन्मातेनें लोकहित करण्याविषयीं माझ्या अंतःकारणांत जी स्फूर्ति उत्पन्न केली आहे, तिचे साह्यानें या भवबंधविमोचक जय[१] म्हणजे हरिवंशमाहात्म्य. ग्रंथास आरंभ करितों.

### जनमेजयाचे पुत्र.

शौनक म्हणालाः–हे सौते, जनमेजयाचे पुत्र कोण कोण सांगितले आहेत, व त्यांपैकीं महात्म्या पांडवांचा वंश कोणा पुत्राचे द्वारें चालू राहिला, हें ऐकण्याची मला इच्छा आहे. कारण, त्याविषयीं मला मोठें कौतुक वाटतें. तो सर्व वृत्तांत आपण मला सांगितल्यानें अगदीं स्पष्टपणें समजेल.

१ "हरिवंश" हा महाभारताचाच एक अंश असल्यानें महाभारताचेंच मंगलाचरण त्यालाही व्यासांनीं लागू केलें आहे.

सौति म्हणाला:—परीक्षित्पुत्र जनमेजयाच्या काश्या नामक स्त्रीच्या ठायीं दोन पुत्र जन्मले. एक चंद्रापीड, हा राजा झाला; व दुसरा सूर्यापीड, ह्यानें मोक्षज्ञान संपादिलें. चंद्रापीडाला उत्तम धनुर्धर असे शंभर पुत्र होते. या क्षत्रियसंघाला लोकांत 'जनमेजय' अशी संज्ञा होती. या पुत्रांतील ज्येष्ठ पुत्र वाराणस संज्ञक नगरांत राजा झाला. त्या महापराक्रमी राजाचें नांव सत्यकर्ण असें असून त्यानें पुष्कळ दक्षिणा देऊन यथाशास्त्र यज्ञ केला. सत्यकर्णाचा पुत्र प्रतापवान् श्वेतकर्ण हा झाला, पण तो धर्मात्मा पुत्रहीन असल्यामुळें तपोवनांत गेला. तेथें त्याच्यापासून भ्रातृमालिनी या नांवाची यादवी गर्भधारण करती झाली. ती मानिनी सुभ्रु, सुचारु नामक यादवाची कन्या होती. पण तिला गर्भसंभव होतांच तो श्वेतकर्ण राजा, हे धर्मनिष्ठ शौनका, त्याचे पूर्वज पांडव ज्या महाप्रस्थानास गेले होते, तेथें गेला. तो तिकडे जात आहे असें पाहून ती मानिनीही त्याच्या मागून गेली. मार्गांत त्या साध्वीला कमलाप्रमाणें सुंदरनेत्रांचा पुत्र झाला. पण त्या कुमाराला वनांत टाकून, पूर्वीं पतींच्या मागून जाणाऱ्या महाभागा पतिव्रता द्रौपदीप्रमाणें ती पतीच्या मागून चालली. तेव्हां तो राजपुत्र पर्वतावरील कुंजांत पडून रडूं लागला. पण त्याच्यावर छाया करण्याकरितां चोहोंकडून मेघ प्रकट झाले; व चंद्राच्या श्रविष्ठानामक स्त्रीच्या पिप्पलाद व कौशिक या नांवाच्या दोन पुत्रांना त्या बालकास पाहून दया आली. व त्याला उचलून घेऊन त्यांनीं जलानें धुतलें. त्याच्या दोन्ही कुशी रक्तानें माखल्या असल्यामुळें त्यांनीं शिळेवर घांसल्या. तेणेंकरून त्या दोन्ही कुशी बकऱ्याप्रमाणें काळ्या झाल्या व त्या तशाच वाढत गेल्यामुळें तो बकऱ्यासारखा पार्श्वभागांनीं युक्त झाला. म्हणून त्यांनीं त्याचें अजपार्श्व असें नांव ठेविलें. वेमक नांवाच्या स्वर्गस्थ ऋषीच्या शालागृहांत त्या दोघां ब्राह्मणांनीं त्याचें संवर्धन केलें. तेथें वेमकाच्या भार्येनें पुत्ररूपानें त्याचें ग्रहण केलें. त्यामुळें तो वेमकीचा पुत्र झाला; व तेच दोघे ब्राह्मण त्याचे सचिव झाले. या राजासचिवांचे पुत्र व पौत्र एकाच वेळीं तुल्यकाल जिवंत रहात असत. ( दोघांच्या पिढ्या बरोबरीनें चालत. ) अशा रीतीनें हा पांडवांचा वंश प्रतिष्ठित ( स्थिर ) झाला आहे. कारण पूर्वी नहुषाचा पुत्र ययाति याची ( शुक्रशापानें प्राप्त झालेली ) जरा आपले ठिकाणीं घेण्याचें जेव्हां पूरूनें मान्य केलें, तेव्हां त्यावर अत्यंत प्रसन्न होऊन ( आशिर्वादरूपानें ) ययाति म्हणाला, 'एक वेळ ही भूमि चंद्रसूर्यादि ग्रहांविरहितही[1] राहणें शक्य होईल, परंतु पौरववंशीय राजाविरहित मात्र ती कधींही असूं शकणार नाहीं.

## अध्याय दुसरा.

—:०:—

### जनमेजयाचा व्यासांस राजसूयासंबंधें प्रश्न.

शौनक म्हणाला:—पूर्वी बुद्धिमान् व्यासशिष्य वैशंपायनानें जशीं सांगितलीं होतीं, त्याप्रमाणेंच तूं हीं सर्व पर्वें व हरिवंश आम्हांस सांगितला आहेस. इतिहासांसह हें वर्णन तूं सांगूं लागलास म्हणजे सर्व पापांचा नाश करणारें तें आख्यान आह्मांला अमृताप्रमाणें अतिशय संतुष्ट करितें. हे बुद्धिमंता, हें आख्यान सुश्राव्य असल्यानें आमच्या मनालाही जणूं

१ ह्या ठिकाणीं तीन प्रतींचा पाठ 'आचन्द्रार्कग्रहा भूमिर्भवेदपि०' असा आहे. परंतु तो आह्मांस संमत नाहीं. त्यांत "अपि" पदाचा जोर जातो. त्यापेक्षां 'अन्चंद्रार्कग्रहा०' असा पाठ आमचे जवळील पुरातन लेखी पोथींत सांपडला व मन्मथनाथाचाही पाठ या पाठाशीं जुळतो. म्हणून आम्ही तोच स्वीकारिला आहे.

अतिशय आल्हाद देतें. पण, हे सौते, जनमेजय राजानें हें उत्तम आख्यान ऐकून सर्पसत्रानंतर काय केलें ?

सौति म्हणाला:—हें सर्वोत्तम आख्यान ऐकून सर्पसत्रानंतर राजा जनमेजयानें काय आरंभिलें तें सांगतों. तें सत्र संपलें तेव्हां तो परीक्षित्पुत्र अश्वमेध करण्याकरितां साहित्य जमवूं लागला. ऋत्विक, पुरोहित व आचार्य यांस बोलावून आणून तो म्हणाला, "मी अश्वमेध यज्ञ करण्याचा निश्चय केला आहे. यास्तव, घोडा सोडा." पण इतक्यांत हा त्याचा हेतु ओळखून महात्मा सर्वज्ञ व्यासमुनि अकस्मात् त्या उदारबुद्धि परीक्षित्पुत्राला भेटावयास आले. तेव्हां व्यासऋषि भेटावयास आले असें पाहून जनमेजय राजानें अर्घ्य, पाद्य व आसन देऊन त्यांचें यथाशास्त्र पूजन केलें. नंतर ते दोघे समोरासमोर बसले. हे शौनका, सदस्यही आपापल्या जागीं बसले. नंतर त्या दोघांनीं वेदसंबधी नानाप्रकारच्या विचित्र गोष्टी केल्या. गोष्टी बोलून झाल्यावर राजानें पांडवांचा आजा व मानाचा खापरपणजा-अशा त्या मुनीस म्हटलें, "प्रभो ! बद्धार्थयुक्त व वेदाचा आशय पल्लवित करून सांगणारें असें भारत आख्यान कर्णेंद्रिय तृप्त करणारें असल्यामुळें तें ऐकतांना माझें वर्षही एका निमेषासारखें गेलें. तें विभूतीचा विस्तार करणारें, सर्वांचें यश पसरविणारें आहे. ब्रह्मन्, आपण तें फार चांगलें रचलें आहे; व शास्त्रांतील क्षीराप्रमाणें तें योग्य शिष्यांचे ठायीं अर्पण केलें आहे. स्वर्गसुखानें किंवा अमृतानेंही जशी तृप्ति होत नाहीं तशीच ही भारती कथा ऐकून माझी तृप्ति होत नाहीं. हे भगवन्, आपण सर्वज्ञ आहां. यास्तव, आपली अनुमति घेऊन मी आपणांस एक शंका विचारतों. माझी अशी समजूत आहे कीं, हा राजसूयच कुरूंचे नाशाला कारण झाला असावा. कारण, अजिंक्य क्षत्रियांचा या संकटांत नाश झाला, आणि यावरून देवांनीं या राजसूयाची योजना युद्धाकरितांच केली असें मला वाटतें. मी असें ऐकतों कीं, हाच राजसूय पूर्वीं सोमानें केला होता, आणि त्याच्या शेवटीं तारेसंबंधें तुंबळ युद्ध झालें. वरुणानेंही हा महाक्रतु केला. पण त्याच्याही शेवटीं सर्व भूतांस त्रासदायक असें देवासुरांचें महायुद्ध झालें. हरिश्चंद्र राजर्षीनें हा क्रतु केला, पण त्यांतही 'आडीबक'[१] या नांवाचें क्षत्रियांचा नाश करणारें युद्ध झालें. पुढें आमचे परमपूज्य पणजे (युधिष्ठिर) यांनींही हा महाविकट अग्निरूप राजसूय यज्ञ प्रख्यात भारतीय युद्ध जुंपण्यापूर्वी केला होता. (आणि हाच पुढील महायुद्धाला कारण होऊन त्यानें कौरवकुलक्षय झाला.) ह्मणून ह्या कामीं माझा असा प्रश्न आहे कीं, लोकक्षयकारक अशा महाभारती युद्धाला कारण होणारा हा राजसूय यज्ञ आपले समक्ष पांडवांनीं आरंभिला असतां कां निवारिला नाहीं ? (आपणांस ठाऊक असलें पाहिजे कीं,) या राजसूय यज्ञाचीं जीं कांहीं बरींचशी अंगें आहेत तीं यथासांग करतां येणें मोठें अवघड जातें, आणि अशा प्रकारें त्याचे एखादे अंगांत किंचित् कांहीं लंगडें पडलें कीं, तोच यज्ञ (विपरीत फलदायी होऊन) निश्चयानें लोकांचे संहारास कारण होतो. आपणही आमच्या पूर्वजांचे पितामह आहां; आपण भूत व भविष्य जाणणारे, समर्थ आणि आमचे आदिकर्ते आहां. तेव्हां आमचे ते पूर्वज स्वतः

१ ह्या राजसूयात वसिष्ठ व विश्वामित्र यांचा कलह झाला, पण असल्या रूपात झुज खेळणें दोघांचेही मुनित्वाला कमीपणा आणणारें असल्यामुळे वसिष्ठांनी 'आडी' नामक जलचर पक्ष्याचें व विश्वामित्रांनें बकपक्ष्याचें रूप घेऊन युद्ध केले. ह्या युद्धांत उभय मुनींचे पक्षपाती क्षत्रियही झुजले.

बुद्धिमान् व त्यांतूनही आपणांसारखा त्यांना मार्गदर्शक, असें असतां ते योग्य मार्गापासून च्युत कसे झाले ? कारण, जे मनुष्य अनाथ आहेत किंवा ज्यांचा नायक वाईट आहे,असेच गैरमार्गानें जातात.

व्यास म्हणाले:–हे राजन्, तुझ्या पूर्व-पितामहांची बुद्धि कालवशात् फिरली. त्यांनीं मला पुढचें भविष्य कधीं विचारिलें नाहीं व मीही कोणीं न विचारितां सांगत नसतों. शिवाय भावी गोष्टीचा बदल करण्याचें सामर्थ्य माझे पहाण्यांत नाहीं. कारण, कालकृतगतीचा परिहार करतां येणें शक्य नसतें. तथापि तूं ( मला ) आतां विचारीत आहेस म्हणून यापुढें काय होईल तें मी सांगतों. पण बाबारे, काल इतका बलवान् आहे कीं, तूं पुढचें भावीवृत्त ऐकूनही कांहीं करणार नाहींस. कालानें जी रेघ ओढिली ती ओलांडून कोणालाही जातां येत नाहीं; व तुम्हीं कितीही उत्साह धरिला, कसाही उद्योग केला किंवा केवढेंही पौरुष गाजविलें तरी कालकृत नियम तुमच्या ताब्यांत रहाणार नाहींत. क्षत्रियांना अश्वमेध यज्ञ श्रेष्ठ सांगितलेला आहे व यास्तव महत्वाकांक्षेमुळें इंद्र तुझ्या यज्ञाचा नाश करील. म्हणून, हे राजन्! पुरुषप्रयत्नानें दैवाचा परिहार कोणत्याही प्रकारें करतां येणें शक्य असेल तर तूं तो यज्ञ करूं नकोस. होणाऱ्या अनर्थांत इंद्राचा, तुझ्या उपाध्यायवर्गाचा किंवा तुझ्या यजमानाचाही कांहीं अपराध नाहीं. तर या प्रस्तुत प्रसंगीं काल अनावर आहे. त्या परमसमर्थ कालाचा हा ठराव होऊन चुकला आहे कीं, युगांताचा काल प्राप्त झाला असतां अदृष्टानुरूप प्रजासृष्टि नाहींशी व्हावयाचीच. त्याचप्रमाणें ब्राह्मण यज्ञफलाचा विक्रय करतील. हे राजन्, सर्व चराचर त्रैलोक्य कालाधीन आहे, हें तूं समजून ठेव.

जनमेजय म्हणाला:–हे भगवन्, मी आरंभिलेला अश्वमेध मध्येंच सोडून देण्याला मला निमित्त काय होईल, तें, आपणांस मजबद्दल अगत्य असेल, तर आपण कृपा करून मला ऐकवा.म्हणजे मी त्याचा परिहार करीन.

व्यास म्हणाले:––हे प्रभो ! ब्राह्मणाच्या कोपानें तें निमित्त उद्भवेल. यास्तव तूं ब्राह्मण-कोपाचा परिहार करण्याविषयीं यत्न कर. तुझें कल्याण होवो. हे परंतपा, तूं केलेला हा अश्वमेध यज्ञ पुनः कोणी क्षत्रिय पृथ्वी असेपर्यंत करणार नाहीं.

जनमेजय म्हणाला:––ब्राह्मणशापरूपी अग्नीच्या तेजानें अश्वमेधाच्या निवृत्तीस मी निमित्त होणार, हें ऐकून मला फार मोठें भय वाटत आहे. कारण, मजसारखा पुण्यवान् पुरुष अपयशांत गुरफटल्यावर पाशांत सांपडलेला पक्षी जसा आकाशांत संचरण्यास असमर्थ होतो, तसा उत्तम लोकास जाण्यास असमर्थ होईल. प्रभो! ज्याप्रमाणें हा पुढें होणारा यज्ञाचा नाश आतांच आपण पाहिला आहे, त्याप्रमाणेंच या यज्ञाची पुनः या लोकीं आवृत्ति होणार असेल तर ती मला सांगून धीर द्या.

व्यास म्हणाले:–ह्या लोकांत ज्याचा प्रसार आटोपला आहे, असला हा यज्ञ ( ज्ञानरूपानें ) देव व ब्राह्मण यांचे ठिकाणीं राहील. कारण, कोणतेंही तेज दुसऱ्या तेजानेंच लुप्तप्राय झालें असतां तें त्या तेजांतच लपून असतें. काश्यपकुळांतील कोणी एक सेनानायक ब्राह्मण भूविवरांत असतां, ती भूमि कोणीं खणल्याबरोबर बाहेर येऊन कलियुगांत अश्वमेध पुनः प्रवृत्त करील. त्या युगांत त्याच्याच कुळांत उत्पन्न झालेला दुसरा एक राजेंद्र प्रलयकाल जसा श्वेतग्रह नांवाच्या उत्पातास आणतो

त्याप्रमाणें राजसूययज्ञालाही आणील. तो ऋतु मनुष्यांच्या श्रद्धाबलानुरूप त्यांस फल देईल. व ऋषींनीं झांकून टाकिलेल्या युगांतद्वारांत तो प्रवेश करील. तेव्हांपासून मनुष्याचीं इंद्रियें पूर्वीचे आचार सोडून देतील, व या लोकीं नेहमींचे वर्तनांत त्यांचे पूर्वज वागत आले, तसे मनुष्य वागणार नाहींत. अशा समयीं चातुर्वर्णाच्या आश्रममर्यादा ज्यांत शिथिल झाल्या आहेत व ज्यांत अनेक विघ्नें आल्यामुळें जो हातून तडीस जात नाहीं, असा अल्पस्वल्प व दानमूलक धर्म लोकांत राहील; पण त्यापासून अल्पांतच बहुत फल प्राप्त होईल. अशा वेळीं थोड्याशाच तपानें मनुष्यांस सिद्धि प्राप्त होईल. हे जनमेजया, सारांश, या युगांतकालीं जे धर्माचरण करतील ते मानव धन्य होतील.

## अध्याय तिसरा.

—:०:—

### व्यासोक्त कलियुगाचें भविष्य.

जनमेजय म्हणतो:—ज्या अर्थी मोक्षाचा समय जवळ आहे किंवा दूर आहे हें आह्मांस कळत नाहीं, त्या अर्थी धर्म व अधर्म यांची ज्यांत बरोबरी आहे अशा द्वापरयुगाला आपल्या अधर्माधिक्यानें दूषित करणारा जो कलियुगांतील शेवटचा—कलि, त्याचें वर्णन ऐकण्याची माझी फार इच्छा आहे. अल्पकर्मानें सुखकर परमधर्म प्राप्त होईल, या आशेनें तर आम्हीं कलियुगांत जन्माची इच्छा करून या वेळीं जन्मास आलों आहों.

शौनक म्हणाला:—हे धर्मज्ञा, त्रास व उद्वेग यांस उत्पन्न करणारें हें धर्मनष्ट असें अखेरचें युग प्राप्त झालें आहे. याकरितां तूं याचें वर्णन खाणाखुणांसह कर.

सौति म्हणाला:—हे शौनका, याप्रमाणें जनमेजयानें प्रश्न केला असतां या अखेरचे युगांत प्राणिमात्राची अवस्था काय होणार याचा सारदृष्टीनें पूर्ण विचार करून भगवान् व्यासांनीं बोलण्यास प्रारंभ केला.

व्यास म्हणाले:—कलियुगांतील राजे केवळ स्वतःचे रक्षणाविषयीं तत्पर राहून प्रजेचें रक्षण न करितां तिजपासून करभाग तेवढा हरण करणारे असे होतील. कलियुगामध्यें क्षत्रिय नसलेले लोक राजे होतील. ब्राह्मण शूद्रांवर उपजीविका करूं लागतील, व शूद्र ब्राह्मणांच्या आचारानें वागतील. बा जनमेजया, या शेवटच्या युगांत वेदज्ञ ब्राह्मण हातीं बाण घेतील. (क्षात्रकर्म करतील.) यज्ञक्रिया विधिहीन होतील व सर्व जाति एके पंक्तीस भोजन करतील. हे जनमेजया, या कलींत मनुष्य शिल्पकुशल, असत्यप्रिय, मद्य व मांसाचे लालची व स्त्रीलाच मित्र मानणारे होतील. युगांतीं चोर हे राजांचें वेतन घेऊन राहतील किंवा राजांचे थाटानें राहतील. राजे अपहारबुद्धि स्वीकारतील व नोकर न दिलेल्या वस्तूंचा उपभोग घेणारे होतील. द्रव्यच काय तें श्लाघ्य वाटेल. साधूंचे आचरणाचा गौरव कोणी करणार नाहीं; व कोणी धर्मच्युत झाल्यास त्याला कोणी नांवें ठेवणार नाहीं, असा या अखेरचे युगांत प्रकार होईल. मनुष्यांतील जोम नाहींसा होईल ( किंवा धर्मा-

१ या ठिकाणीं व्यंकटेशाचा पाठ "मित्रभार्या भविष्यंति" असा आहे. कलकत्ता—पाठ याहूनही भिन्न "मित्रभाया भजिष्यंति" म्ह० "स्नेहाचे स्त्रीवर प्रेम ठेवतील" अशा अर्थाचा आहे. या दोन्ही पाठांहून आमचे लेखी पोथीचा पाठ "भार्यामित्रा भविष्यंति" म्ह० स्त्रीलाच मित्र मानणारे असा आहे, तोच आह्मी घेतला आहे.

१ या ठिकाणीं "राजवृत्तिस्थिताः" व "राजवृत्तस्थिताः" असे दोन पोथ्यांचे दोन भिन्न पाठ आढळतात. क्षेमेंद्रानें "दस्यवो राजचरिता राजानो दस्युचेष्टिताः" अशा अर्थी धरली आहे, त्याअर्थी राजवृत्त० हाच पाठ बरा.

धर्मविवेक नाहींसा होईल. ) कित्येक पुरुष शेंड्या मोकळ्या सोडतील, कित्येक मुळींच काढून टाकतील व सोळा वर्षांपूर्वींच प्रजोत्पादन करूं लागतील. जनपद ( खेडींपाडीं ) अन्नविक्रय करतील; ब्राह्मणें वेदविक्रय करतील व तरुण स्त्रिया * * विक्रय करणाऱ्या या अखेरचे युगांत होतील. सर्वच तोंडानें ब्रह्म बोलूं लागतील ( आचाराचे नांवानें शून्य ); सर्वच धाम्ये होतील; व शूद्रही " भो " हा शब्द परस्परसंबोधनांत वापरूं लागतील. ब्राह्मण तप व यज्ञ यांच्या फलांचा विक्रय करूं लागतील. वसंतादि ऋतूही बदलतील— ( स्वधर्म सोडतील. ) मांसाशन सोडिल्यामुळें ज्यांचे दांत शुभ्र आहेत व नेत्र सूक्ष्म झाले आहेत असे मुंडन केलेले, काषाय वस्त्रें धारण करणारे, आणि शाक्यमत व बुद्धमत यांवर उपजीविका करणारे शूद्र धर्माचरण करूं लागतील. हिंस्र प्राण्यांची वृद्धि व गाईंचा संहार होईल; व हें युग संपलें असतां गोड रसामध्यें बदल होईल, असें जाण. अन्त्य जन मध्यम स्थितीला येतील व मध्यम प्रतीचे लोक अन्त्य अवस्थेस पोंचतील. सर्व प्रजा नीचमार्गी होतील. हें युग क्षीण झालें असतां दोन वर्षांचे पाडे ( खोंड ) नांगर, गाडा इत्यादि वाहण्यास योग्य होतील. त्याचप्रमाणें ते मत्त होऊन तळीं व नद्या यांचे कांठ (मस्त होऊन) शिंगांनीं उकरूं लागतील; आणि पर्जन्य चमत्कारिक रीतीनें वर्षाव करूं लागेल. जातभामटेच एकमेकांस लुटतील. थोड्याशा संपत्तीनें लोक संपन्न होतील. पण स्वल्पशा संकटानें भिकारीही बनतील. मनुष्य धर्मपराङ्मुख होतील, व शेतजमिनी क्षारप्रचुर होऊन स्वेदयुक्त झाल्यानें नापीक होतील, व मार्ग चोरटयांनीं आडविलेले राहतील. या कलियुगांत सर्वच वर्ण वाणधंदा करतील. बापानें कोणाला जातदेणगी म्हणून कांहीं मिळकत दिली असल्यास तिचेही वांटे मागतील. लोभ व असत्यप्रीति, यामुळें परस्परांचे उरावर बसून एकमेकांचें द्रव्य हरण करूं पाहतील. कलियुगांत खरें सौकुमार्य, रूप व रत्नें हीं नाहींतशीं झाल्यामुळें स्त्रिया आपल्या केशांनींच अलंकृत होतील. पुष्पमाला, चंदन, दिव्य शय्या इत्यादि भोगसामग्री नाहींशी झाल्याकारणानें भूताप्रमाणें दिसणाऱ्या गृहस्थाला स्वभार्येवाचून अन्य भोग्य कांहीं राहणार नाहीं. या कलियुगाचें आणखी लक्षण असें आहे कीं, त्या दुर्वर्तनी व नीच अशा लोकांचा सुळसुळाट माजेल. पुरुषांची संख्या कमी व त्या प्रमाणानें स्त्रियांची संख्या अधिक राहील, व रूप असून व्यर्थ होईल. सर्व लोक

१ या श्लोकाचा चतुर्धरांनीं " मुक्तकेशा " म्हणजे " विधवा " व 'विचूलिनः' ह्याचा अर्थ ' मुंडन केलेले सर्व संन्याशी ' असा धरून विधवा व संन्याशी परस्पर मिळून प्रजोत्पादन करतील, असा केला आहे. पण इतका द्वाड अर्थ धुंडीत बसण्याचें कारण आह्मांस दिसत नाहीं. शिवाय क्षेमेंद्रानें या ओळीचा अर्थ 'केशवेशा भविष्यन्ति निरुष्णीशांबरानराः । म्ह० डोकीचीं पागोटीं टाकून देऊन आजकालसारखे केसांचेच टोप ठेवूं लागतील ' असा स्पष्ट दिला आहे. हाही आमचे म्हणण्यास पुष्टि देतो.

२ या ठिकाणीं " चतुष्पथ " याचा अर्थ 'ब्राह्मण' न करितां वाईकरांनीं ' चव्हाटा ' असा नेहमींप्रमाणें केला आहे. परंत तो आम्हांस मान्य नाहीं. प्रसिद्ध भारतमंजरीकार ' क्षेमेंद्र ' यानेंहीं या ठिकाणीं " वेदविक्रयिणो द्विजाः " असाच अर्थ केला आहे.

३ वास्तविक हा शब्द वापरण्याचा अधिकार ब्राह्मणाला आहे. भगवान् मनु आपल्या संहितेंत म्हणतातः— " भोः शब्दं कीर्तयेदंते स्वस्य नाम्नोऽभिवादने ॥ " मनु० अ. २ श्लो० १२४.

४ ज्यांनीं ' ओरायन ' हा ग्रंथ वाचिला असेल, त्यांस त्याचा दुसराही अर्थ कळेलच.

५ मुळांत " अजित " असा शब्द आहे. त्याचा अर्थ " सुरमा घातलेले " असा होतो. " सूक्ष्म " हा अर्थ चतुर्धरांनीं केला आहे.

१ चालू सत्तेखाली तरी हे भविष्य लंगडें पडलें आहे.

पुष्कळ याचना करणारे होतील. पण एकमेकांस कांहीं देणार नाहींत; आणि कांहीं विचार न करितां अन्य वर्णाच्या लोकांपासून दान घेतील. राजा, चोर, अग्नि व दंड यांच्या योगानें पीडित होऊन प्रजा क्षय पावेल. शेती निष्फळ होईल. तरुण वृद्धांचें आचरण करतील; व लोक द्रव्यतृष्णेनें असुखी होतील. वर्षाकाळीं रूक्ष व अधोगामी वारे वाहतील; व आपले वाहणीबरोबर बारीक वाळूचे कणांचा वर्षाव करतील; आणि या युगांत, परलोकप्राप्तीविषयीं लोक संशयित राहतील. ब्राह्मणांस राग झटकन् येईल; व ते स्वतः दुराचारी व वेददूषक होऊनही आपणांस श्रेष्ठ समजतील. क्षत्रिय वैश्यांचा आचार करूं लागतील. ते धनधान्यावर उपजीविका करतील. सारांश, धर्ममर्यादेचा अतिक्रम करण्यास सर्व द्विजांची प्रवृत्ति होईल. करार व शपथा पाळल्या जाणार नाहींत; व विनयान्वित म्हणजे सुशिक्षित लोकही कर्ज बुडवितील. मनुष्याचा हर्ष निष्फल व क्रोध मात्र सफल होईल. त्या युगांत दुधाकरितां बकऱ्या पाळतील. शास्त्रांस न जाणणाऱ्या पुरुषांची या कलियुगांत स्वाभाविकच अशी प्रवृत्ति होईल कीं, ते स्वतःसच पंडित समजून ( शास्त्राधारविरहितच ) नीतीचीं तत्त्वें सांगत सुटतील. शास्त्रांत खरें काय सांगितलें आहे तें कोणीच सांगणार नाहीं; आणि वृद्धांची परिचर्या केल्यावांचूनच सर्वांस सर्व कांहीं समजेल. ( समजतें असें वाटेल. ) हा युगान्तसमय प्राप्त झाला असतां सर्वच कवि व सर्वच ग्रंथकार होतील. ब्राह्मण स्वतःच भलतेंच कर्म करूं लागून क्षत्रियांना स्वकर्माचे ठायीं प्रवृत्त करीनासे होतील, व चोरलोक राजांचे आवडते होतील. बा जनमेजया, कलि लागला म्हणजे कुंडावृष ( पति जिवंत असतांना जारापासून झालेल्या कन्येच्या ठायीं वीर्यसिंचन करणारे), नैकृतिक ( अधिकार नसतांना यज्ञादि करणारे ), सुरापान करणारे, मिथ्या वेदाभिमानी होणारे ब्राह्मण अश्वमेध यज्ञ करतील. धनलोभानें व्याकुल झालेले ब्राह्मण, कलीच्या प्रभावानें जे अयाज्य आहेत त्यांच्याकडून यजन करवितील; व स्वतः मांसादि अभक्ष्य पदार्थांचें भक्षण करतील. वेदाचें एक अक्षरही कोणी पढणार नाहीं, आणि " भो " असें बहुमानार्थी संबोधन मात्र वाटेल ते उपयोगांत आणतील; आणि स्त्रिया एकएकच चुडा भरतील व दाण्यांच्या आकाराचे पोतमणी गळ्यांत घालतील. नक्षत्रें निस्तेज होतील; दिशा अप्रसन्न होतील; त्या हीन युगांत संध्याकाळ खुलणार नाहीं, व दिशांचा दाह होऊं लागेल. पुत्र आईबापांस कामास लावतील; सुना सास्वांस काम सांगतील; आणि पुरुष भिन्न जातीचे स्त्रियांशीं समागम करतील. त्याचप्रमाणें शिष्य गुरूंना वाक्शरांनीं पीडितील. अति उन्मत्त होऊन मुखामध्यें मैथुनादि प्रयोग करतील. ज्यांतील चतुर्ग्रासप्रमाण प्रथम अग्नीस समर्पण केलें नाहीं, असें अन्न अग्निहोत्री भक्षण करतील. अतिथींस भिक्षा व चांडाल—वायसादिकांस बलि समर्पण न करितां पुरुष स्वतः जेवतील. निजलेल्या पतींस फसवून स्त्रिया अन्यत्र जातील, व पुरुषही भार्या निजल्या कीं परस्त्रीगमन करतील. या युगांतसमयीं व्याधिरहित किंवा निरोगी असा कोणीही आढळणार नाहीं; व जो तो दुस-

१ चाळिशींतच वार्धक्याचीं चिन्हें आजच दिसूं लागलीं आहेत.

१ हे भविष्य सांगणाराला लबाड कोण ह्मणेल ?

२ अन्नसंस्कार न करितां अन्न खाणें निषिद्ध आहे. यज्ञशिष्टाशिनः संतो मुच्यंते सर्वकिल्बिषैः । भुंजेत ते त्वघं पापा ये पचंत्यात्मकारणात् । भगवद्गीता अ० ३ श्लो० १३

त्यास नांवें ठेवण्यांत पटाईत होऊन स्वतःचे गैरवर्तनाचा प्रतिकार कधींच करणार नाहीं.

## अध्याय चौथा.

—:०:—

### कलियुगवर्णन चालू.

जनमेजय विचारतोः—याप्रमाणें लोकांत सर्वत्र बेबंदी माजली असतां लोकांचा आचार कसा राहील व आहारविहार तरी कशा-प्रकारचे होतील आणि अशा स्थितींत लोकांचें पालन तरी कोणाचे हातून होईल? लोक कोणतीं कर्में करतील, कसल्या इच्छा करतील, त्यांचे शरीराचें व आयुष्याचें प्रमाण काय असेल व कोणत्या पल्ल्याला गोष्टी पोंचल्या म्हणजे त्यांस पुनरपि कृतयुगाची प्राप्ति होईल?

व्यास सांगतातः—इतउत्तर धर्म हा गलित झाल्याकारणानें प्रजा गुणहीन होऊन शीलभ्रंश पावतील व शीलभ्रष्ट झाल्यामुळें अर्थातच प्रजांचे आयुष्याचा ऱ्हास होईल. आयुष्य क्षीण झालें कीं, बलाला कमीपणा येईल; बलाच्या हीनतेनें निस्तेजता वाढेल; निस्तेजतेमुळें व्याधींची पीडा वाढेल; आणि व्याधिपीडेमुळें देहादिकांविषयीं वैराग्य येईल. वैराग्यामुळें आत्म्याचें स्वरूप कळेल; आत्म-ज्ञानामुळें धर्मशीलता बाणेल, आणि याप्रमाणें मोक्षद ज्ञान मिळून पुनः कृतयुग प्राप्त होईल. कलियुगांत कित्येक अल्पस्वल्प धर्मशील राहतील; कित्येक मध्यस्थ ( तटस्थ ) राहतील; कांहीं जे चौकस किंवा विचारी प्रवृत्तीचे असतील ते केवळ धर्मसंबंधी भवति न भवति करण्यांतच आनंद मानतील; पण क्रिया करणार नाहींत. त्यांतील वैशेषिक व बौद्ध, प्रत्यक्ष व अनुमान, अशीं दोनच प्रमाणें मानतील. कित्येक पंडितंमन्य चार्वाक प्रत्यक्ष हेंच एक प्रमाण आहे, दुसरें कोणतेंही नाहीं, असें समजतील. दुसरे कित्येक लोक वेदोक्त सिद्धांतासही अप्रमाण करितील. ( अशी दुरवस्था प्राप्त होईल. ) स्त्रिया नीचवृत्ति होऊन, मुख हेंच ज्यांचें भग आहे, अशा होतील; त्याप्रमाणें कित्येक पंडितंमन्य, मंद, मूढ नर नास्तिक्यांतच धन्यता मानून धर्मलोप करणारे निपजतील. शास्त्रीय ज्ञानाचें त्यांचें वांकडें असल्यानें केवळ सद्यःप्रत्ययकारक गोष्टींवर मात्र विश्वास ठेवतील; आणि केवळ भांडखोर-पणांतच कौतुक मानणारे असले दांभिक होतील. पण अशा रीतीनें वैदिक धर्म ढांसळ-लेला असतांही अवशिष्ट राहिलेल्या ईशस्म-रणादि धर्माचा पुरस्कार करून कांहीं उत्तम-जन दान व सत्य यांनीं युक्त होत्साते दया, परोपकार इत्यादि शुभ कर्मांचेंच अनुष्ठान करतील. तथापि त्या घोर कलीयुगांत प्रायः सर्व लोक सर्वभक्षक, अजितेंद्रिय, गुणहीन व निर्लज्ज होतील. खरोखर हें कलुषितपणाचें लक्षण आहे. ज्या वेळीं नीच वर्णाचे लोक निर्वाहार्थ ब्राह्मणांची शाश्वतची जी भिक्षावृत्ति ती स्वीकारतील, त्या वेळीं तें कलिमलाचें चिन्ह समजावें. याप्रमाणें सर्व लोक मलिन होऊन शास्त्रीय बोध व आत्मविद्या यांचे नाशाविषयीं प्रवृत्त झाला असतां, जे कोणी केवळ अपरि-ग्रह वृत्तीनें राहतील अशांस तेवढ्या त्यागानेंच सिद्धि मिळेल. ( हा कलीचा प्रभाव. ) युग क्षीण झालें असतां महायुद्ध, मोठा कोलाहल, महावृष्टि व महाभय होईल. तेंच कलिपरिपा-कांचें लक्षण समजावें. त्या युगांत राक्षस विप्ररूपानें उत्पन्न होतील. राजे चहाड्या ऐकण्यांत तत्पर होऊन पृथ्वीचा उपभोग घेतील. ब्राह्मण स्वाध्याय-वषट्काररहित, मोठे अभिमानी, त्यामुळेंच कोणाचें हितवचन न ऐकणारे, सर्वभक्षक, व वृथा व्रतें करणारे असे राक्षसरूपानें निपजतील. ते मूर्ख, स्वार्थ-

परायण, लुब्ध, क्षुद्र परिवारानें युक्त, भोजन-आच्छादनादिकांतच तत्पर व आपल्या शाश्वत धर्मापासून च्युत झालेले, असे उद्भवतील. दुसऱ्यांचीं रत्नें व स्त्रिया यांचा अपहार करणारे, विषयलंपट, दुरात्मे, कपटी, व ज्यांना साहस प्रिय आहे, असे निर्माण होतील. या एकाच स्वभावाचे लोकांचा सर्वत्र पगडा बसला म्हणजे चारी आश्रमांचे बहुविध आचार यथाविधि करणारे असे विचारशील लोक नष्टप्राय होतील. त्यांतूनही जे थोडेसे परमेश्वराचे भक्त निपजतील ते कृतयुगांत उत्पन्न झालेल्या पुण्यवान् पुरुषांचें कीर्तन करूनच त्या सर्वांचें पूजन करतील. ( आचरणानें नव्हे. ) लोक धान्याची चोरी करतील; वस्त्राचा अपहार करतील; भक्ष्य व भोज्य यांचा अपहार करतील; धान्य सांठविण्याचीं—पाट्या, हारे इत्यादि—भांडीं पळवितील; चोर चोरांना लुटतील; लुटारू दुसऱ्या लुटारूंनाच लुटतील, आणि अशा रीतीनें चोरांनीं चोरांचा नाश केला म्हणजे लोकांस सुख होईल. सर्व मनुष्यवर्ग निर्धन झाल्यामुळें अस्वस्थ व क्रियाहीन होऊन व वर्णावर्णांमधील अंतर लोपून सर्व एकाच पंक्तीला येऊन बसले असतां, करभारानें त्रासून रानावनांत जाईल. "पुत्र पितरांस सर्व प्रकारचें काम करण्यास लावतील, व युगांतसमय येऊन ठेपला असतां सुना सास्वांना आज्ञा करतील. शिष्य गुरूंना वाग्बाणांनीं टोंचतील." यज्ञकर्मे बंद पडलीं म्हणजे राक्षस, श्वापदें, वृश्चिकादि किडे, उंदीर व सर्प मनुष्यांशीं धिटाई करतील. बा नरश्रेष्ठा! युगक्षयप्रसंगीं क्षेम, सुभिक्ष, आरोग्य व बंधूंचें समग्रत्व क्वचितच आढळेल. निरनिराळ्या देशांत पृथक्-पृथक् लोक स्वतःच पालक व स्वतःच चोर होऊन युद्धसामुग्री जमवून सैन्यांसह प्रत्येक राष्ट्रांतून हिंडतील. त्या वेळीं सर्वतः कालाचा क्षय झाल्यामुळें स्वदेशांतून सर्वशः भ्रष्ट झालेले सर्व मानव आपल्या आपल्या आप्तांसह निःसार ( निर्बल ) होतील. त्यावेळीं लहान बाळकांना खांद्यावर घेऊन भयानें जीव घेऊन पळणारे व क्षुद्र व्याधींनें पीडलेले नर कौशिकी नदीचेंही तीर उल्लंघन करतील. अंग, वंग, कलिंग, काश्मीर व मेकल हे देश आणि ऋषिकांत पर्वताच्या दऱ्या, यांचा आश्रय मानव करतील, किंवा आर्यावर्तांतील जन हिमालयाचा सर्व पार्श्वभाग, क्षारसागराचें सर्व तीर व अरण्यें, यांत म्लेंच्छगणांसह राहतील. येणेंप्रमाणें पृथ्वी शून्यही नाहीं व अशून्यही नाहीं, अशी होईल. शस्त्रवान् लोक तिचे रक्षक व अरक्षकही होतील. पशु, मासे, पक्षी, श्वापदें, सर्प, किडे, मध, भाज्या, फळें व मुळें यांवर मनुष्यें निर्वाह करतील. जसे मुनी त्याप्रमाणेंच तेही ( दरिद्र्यामुळें ) फाटक्या चिंध्या, झाडांचे टहाळे, साली, चामडीं यांना स्वतःच तयार करून नेसतील. पर्वतांच्या दऱ्याखोऱ्यांतून राहून ग्राम्य व आरण्य धान्यांचें स्वरूप जाणण्याची व त्यांस खाण्याची इच्छा करणारे ते लांकडी मेखांनीं भूमीला उकरूं लागतील. धान्य इतस्ततः नेण्याकरितां बकरे व मेंढे यांचे समूह पाळतील. गांधार, काश्मीर इत्यादि प्रत्यंत देशांत राहणारे लोक उंट व गाढवेंही मोठ्या यत्नानें पाळतील. नदीतीरींच वसाहती करून लोक जलाकरितां नद्यांचा प्रवाह[3] अडवितील. शिजलेलें अन्न आज एक शेर देऊन उद्यां

१ गताध्यायीं हेंच भविष्य येऊन गेलें आहे. विस्मृति हा पुरुषधर्म आहे. दुसरे काय म्हणावे?

१ ही एक हिमालयातून निघालेली नदी आहे.

२ लोखंड दुर्मिळ होणार, असें दिसतें. अर्थात् हा काळ बहुत दूर आहे, हें ठीक आहे.

३ पर्जन्याच्या टंचाईचें चिन्ह समजावें.

सव्वाशेर घेणें इत्यादि प्रकारें ते परस्पर पक्वान्नांचा व्यापार करतील. मूलधनासह वृद्धीचा ( व्याजाचा ) अपहार होत आहे, असें पाहून ते एकमेकांशीं, ऐकणाराच्या अंगावर काटा उभा राहील अशा रीतीनें, कलह करतील. सारांश, ज्यांना पुष्कळ अपत्यें आहेत अथवा एकही वंशांकुर नाहीं, असे ते सर्व कुललक्षणशून्य निपजतील. कालाच्या अधीन असलेले मानव त्या वेळीं असे होतील. त्या वेळीं प्रजा हीनाहून हीन अशा धर्माचें अनुष्ठान करतील. त्या घोर समयीं "तीस वर्षें" हें मनुष्यांचें सर्वांत अधिक आयुर्मान होईल. लोक दुर्बल, विषयपराधीन व रजोगुणानें भरलेले असे होतील. त्या वेळीं रोगांनीं त्यांचा इंद्रियक्षय होईल. आयुष्य अतिक्षीण झालें आहे, असें कळल्यामुळें मोठा विषाद उत्पन्न होईल. त्यामुळें विवेकी जन साधूंची शुश्रूषा व दर्शन यांमध्यें रत होतील. व्यवहाराचा बहुधा क्षय झाला आहे, असें पाहून सत्याचा अंगीकार करतील. इष्ट मनोरथांचा लाभ न झाल्याकारणानें लोक धर्मशील होतील. आपल्या पक्षाच्या क्षयानें पीडिलेले ते दुराचाराचा संकोच करतील. याप्रमाणें शुश्रूषा, दान, सत्य, व प्राणरक्षण या चार पादांनीं ( पुनः ) संपन्न झालेला धर्म लोकांचें कल्याण करील.

नंतर ज्यांचें कल्याण झालें आहे, व त्यामुळें धर्माचरणानें कल्याण होतें व अधर्माचरणानें अकल्याण होतें असें अनुमानानें ज्यांस कळलें आहे, असे धर्माधर्मफलामध्यें निमग्न झालेले लोक धर्मामध्यें सुखावह काय आहे ह्याचा विचार करून व तत्त्व जाणून असें बोलतील: जशी क्रमानें हानि झाली तशीच वृद्धिही झाली. यास्तव धर्माचा स्वीकार केला असतां कृतयुग प्राप्त होईल. कृतयुगांत सदाचरण असतें व कलिमलसमयीं त्याची हानि होते. एकच काल चंद्राप्रमाणें प्रसंगीं हीनवर्ण होतो. जसा चंद्र तमोरूप राहूकडून आच्छादित केला जातो, त्याप्रमाणें काल कलियुगांत कलिमलानें आवृत्त होतो आणि राहूरहित चंद्र जसा परिपूर्ण दिसतो त्याप्रमाणें काल ( व धर्म ) कृतयुगांत परिपूर्ण होतो. परब्रह्म हा सत्यार्थवाद आहे. त्यालाच वेदार्थ असें समजतात. वरून मलिन दिसणारा वडिलार्जित सोन्याचा गोळा, हा सोन्याचा आहे, असें न जाणणारा पुरुष मी दरिद्री आहें असें समजतो. पण तोच त्यावरील मल गेला कीं, मी आतां धनवान् झालों आहें असें समजतो. त्याचप्रमाणें शास्त्रार्थविचारानें ब्रह्म प्रत्यगभिन्न आहे असें ज्ञान होतें व त्यानंतर मी संसारी, सुखी, दुःखी इत्यादि आहें, हा भ्रम जातो. वर्णाश्रमयोग्य तपोधर्म हा इष्टवाद आहे. ( स्वर्गादि इष्टकथन आहे. ) कारण, तप हें अनादि व अव्यभिचारी फल देणारें आहे, असा शास्त्रांत निश्चय आहे. देहादि गुणांच्या योगानें कर्मनिष्पत्ति होते व कर्म आणि सत्य ह्यांच्या योगानें देहादि गुण उद्भवतात. ( म्हणजे कर्मानें मुक्ति नाहीं. ) पुरुषांच्या श्रद्धादि न्यूनाधिक भावाप्रमाणें देशकालानुरूप एकच कर्मापासून भिन्न फलप्राप्ति होते. अर्थात् कर्मफल प्रतियुगीं कालानुरूप मिळणारें आहे, असें ऋषींनीं सांगून ठेविलें आहे. या लोकीं धर्म-अर्थ-कामांच्या व देवतांच्या प्रतिक्रिया, त्याचप्रमाणें शुभ व पुण्यकारक फलप्राप्ति प्रतियुगीं न्यूनाधिक प्रमाणानें होतात. ज्या अर्थीं युगांचीं परिवर्तनें विधिस्वभावामुळें अनादि कालापासून प्रवृत्त झालीं आहेत, त्या अर्थीं हा जीवलोक क्षय व उदय यांच्या योगानें बदलल्यावांचून एक क्षणभरही रहात नाहीं.

१ 'क्षेत्र जगन्नाथ' येथें देवाला भोग चढाविलेला भात बाहेर आणून आजच विकीत आहेत.

## अध्याय पांचवा.

—:०:—

### जनमेजयाचा अश्वमेध व इंद्राचें कपट.

सूत म्हणतातः—या प्रकारें राजा जनमेजयाला आश्वासन देणाऱ्या त्या ऋषीचें तें भूत व भावि गोष्टींसंबंधी वाक्य सभेंतील सर्व लोकांनीं ऐकिलें. त्या महर्षीचा तो वाङ्मयरस चंद्राची प्रभा किंवा अमृताचा प्रवाह याप्रमाणें सभासदांच्या कर्णांस तृप्त करिता झाला. धर्म, अर्थ व काम या पुरुषार्थांनीं व करुणरसांनीं युक्त, वीरांस हर्ष देणारें आणि रमणीय असें तें सर्व आख्यान ( भारत ) सभासदांनीं ऐकिलें. तें ऐकून कित्येकांनीं अश्रु ढाळिले, व दुसरे कित्येक ध्यानस्थ बसले. कारण, त्या ऋषीनें तो इतिहास जणूं काय हातावर ठेविल्याप्रमाणें त्यांपुढें उभा केला. नंतर सभासदांची अनुज्ञा घेऊन व त्यांस प्रदक्षिणा करून आणि 'पुनः तुमचें दर्शन घेऊं' असें बोलून तो भगवान् महर्षि निघाला. तो जाऊं लागला असतां या लोकांतील सर्व वक्त्यांत श्रेष्ठ अशा त्या ऋषिसत्तमाचे मागोमाग त्या सभेंत जे विशेष तपोनिष्ठ होते ते जाऊं लागले. मग त्या ब्रह्मर्षींसह भगवान् व्यास मार्गास लागले असतां ऋत्विज व राजे परत आले.

या प्रकारें त्या घोर सर्पांचा सूड उगवून झाल्यावर तो राजा सर्प ज्याप्रमाणें विष ओकून टाकून मोकळा होतो, त्याप्रमाणें क्रोध सोडून देऊन परतला. अग्निहोत्रांतील अग्नीचे योगानें तक्षकसर्पाचें टकलें तापूं लागून तो जळून खाक होण्याचे बेतांत होता. परंतु आस्तिकमुनींनीं त्याचा बचाव केला, व नंतर ते आपल्या आश्रमास परतले. राजाही आपल्या परिजनांसह हस्तिनापुरास गेला. व स्वतः आनंदित होऊन आपल्या आनंदित झालेल्या प्रजेचें पालन करूं लागला. नंतर कांहीं कालानें त्या राजा जनमेजयानें यथाशास्त्र पुष्कळ दक्षिणा देऊन अश्वमेध यज्ञाची दीक्षा घेतली. त्या यज्ञांत त्याची महाराणी काशिराजकन्या वपुष्टमा मारलेल्या घोड्यापाशीं शास्त्रोक्त विधीनें जाऊन बसली. पण त्या वेळीं त्या सर्वांगसुंदरीला पाहून इंद्र सकाम झाला; व त्या मृत अश्वाच्या देहांत प्रवेश करून तिजशीं संगत झाला. तेव्हां त्या अश्वाचे ठिकाणीं उत्पन्न झालेला विकार जनमेजयाचे ध्यानांत येतांच तो अध्वर्यूला टाकून बोलला कीं, हा अश्व अजून मेला नाहीं. ( याला कारण तुझी हयगय आहे. ) याकरितां याऐवजीं तूंच मर. त्या वेळीं त्या ज्ञानसंपन्न अध्वर्यूनें तें इंद्राचें कपटाचरण राजर्षीस सांगितलें. तेव्हां त्यानें इंद्राला शाप दिला.

जनमेजय ह्मणतोः—मी प्रजेचें (न्यायानें) रक्षण करीत असून शिवाय जर कांहीं तप किंवा यज्ञफल संपादिलें असेल तर तें सर्व फल खर्चीं घालून मी पुढील वाक्य सांगतों तें ऐकाः— "आजपासून कोणीही क्षत्रिय या अश्वमेध यज्ञानें अजितेंद्रिय व चंचल अशा देवेंद्रास पूजणार नाहींत."—नंतर, हे शौनका, तो राजा जनमेजय रागावून ऋत्विजांस म्हणालाः— "या यज्ञाचा इंद्रानें अशा रीतीनें उपमर्द केला, याला कारण तुमचें दौर्बल्य आहे. यास्तव तुम्हीं माझ्या देशांत राहूं नका. आपल्या आप्तजनांसह येथून निघून जा."

याप्रमाणें राजानें बजाविल्यामुळें रागावलेले विप्र त्या राजास सोडून गेले. नंतर तो परम धर्मज्ञ जनमेजय पत्नीच्या गृहामध्यें असलेल्या स्त्रियांना क्रोधाचे सपाट्यांत आज्ञा करिता झाला कीं, "या असाध्वी वपुष्टमेला माझ्या घरांतून काढून द्या. कारण, हिनें माझ्या मस्तकावर धुळीनें भरलेले पाय ठेविले

आहेत. ( माझें यश मलिन केलें आहे. ) हिनें माझें सर्व महात्म्य नाहींसें केलें. यश व मान यांस दूषित केलें. चुरडून टाकिलेल्या पुष्पमाळेप्रमाणें ही मला दृष्टीस नकोशी झाली आहे. दूषित करून सोडलेल्या आपल्या प्रिय भार्येसहवर्तमान जो या लोकीं राहतो त्याला अन्न गोड लागत नाहीं, व तो एकांतांत सुखानें निजूं शकत नाहीं. ”

याप्रमाणें क्रुद्ध होऊन पारीक्षित राजा मोठ्योन भाषण करीत असतां त्याला गंधर्वराज विश्वावसु म्हणालाः—“ तीनशें यज्ञ करणारा तूं इंद्राला सहन होत नाहींस. त्यानेंच ही वपुष्टमा अप्सरा तुझी पत्नी केली. रंभा नांवाची अप्सराच ही काशिराजाची कन्या व तुझी साध्वी राणी झाली आहे. हे राजन्, ही श्रेष्ठ स्त्री आहे. ही केवळ रत्न आहे. हिचा तूं अनुभव घे. तुझ्या यज्ञामध्यें न्यूनतारूपी छिद्र आढळतांच इंद्रानें विघ्न केलें, तथापि हे कुरुकुलश्रेष्ठा, तूं यथाशास्त्र यज्ञ केला आहेस. हे राजन्, तुझ्या यज्ञफलांच्या योगानें आपला पराभव होईल कीं काय, म्हणून इंद्र भीत असतो. हे विभो, त्यामुळेंच त्यानें तुझ्या यज्ञांत असें विघ्न आणिलें. विघ्न करण्यास्तवच देवेंद्रानें या कपटाचा उपयोग केला. यज्ञीय अश्व मारला आहे, हेंच यज्ञांतील छिद्र साधून तूं जिला वपुष्टमा समजत आहेस त्या रंभेशीं त्यानें संयोग केला; आणि तें पाहून तुझे तीनशें यज्ञ करणाऱ्या ब्राह्मणांस तूं शाप दिलास ! त्यामुळें तूं व ब्राह्मण असे दोघेही इंद्रतुल्य बलापासून भ्रंश पावलां आहां. कारण, तीनशें यज्ञ करविणारे ते ऋत्विज तुझ्याहूनही अतिशय असह्य होते. तुझ्याहूनही त्या ब्राह्मणांचें इंद्राला फार भय वाटत होतें. पण त्यानें एकाच कपटप्रयोगानें त्या दोन्ही भयकारणांचें उल्लंघन केलें आहे. असें जर नसतें तर तो महातेजस्वी व विजयेच्छु इंद्र, दुसऱ्या कोणींही कधीं न केलेलें असें हें नातवाच्या ( निपणतु ) स्त्रीचें अतिक्रमण कसें करता ? गरुडामध्यें ज्या प्रकारची श्रेष्ठबुद्धि, श्रेष्ठ धर्म, श्रेष्ठ दम, व परम ऐश्वर्य सांगितलेलें आहे, त्या प्रकारचें तें सर्व तीनशें यज्ञ करणारा जो तूं अजिंक्य त्या तुझ्याठायीं आहे. यास्तव, बा राजा, इंद्र, गुरु, स्वतः तूं व ही वपुष्टमा यांतील कोणालाही दोष देऊं नकोस. कारण, काल सर्वथा दुर्लंघ्य आहे. यज्ञांत मारिलेल्या अश्वांत आपल्या दैवी शक्तीचे प्रभावानें प्रविष्ट होऊन देवेंद्रानें तुला रागास आणिलें. पण तुला जर सुखाची इच्छा असेल तर देवाचे कलानेंच वागणें योग्य आहे. जलप्रवाहाच्या उलट दिशेस जाणें कठीण, त्याप्रमाणें समर्थ पुरुषांच्या उलट आचरण करणें दुस्तर होय. यास्तव, आतां तूं क्रोध सोडून या निष्पाप स्त्रीरत्नाचा उपभोग घे. निष्पाप स्त्रियांचा त्याग केल्यास सर्व स्त्रिया तुझा त्याग करतील. राजन्, स्त्रिया सदां दोषरहित असतात. त्यांतून दिव्य स्त्रिया तर विशेषेंकरून दूषित होत नाहींत. सूर्याची प्रभा, अग्नीची ज्वाला, वेदी, त्याचप्रमाणें होमांतील आहुति, या जशा दूषित झाल्या तरी अदूषितच असतात त्याप्रमाणें स्त्रियाही कधीं दूषित होत नाहींत. शहाण्यांनीं त्यांचें सदां ग्रहण, लालन व पूजन करावें हेंच उचित होय. लक्ष्मीप्रमाणेंच शीलसंपन्न स्त्रिया नमस्कार करण्यास योग्य व पूज्य असतात. ”

## अध्याय सहावा.

—:०:—

### भारताचें फल.

सौति सांगतोः—याप्रमाणें विश्वावसूनें सांत्वन केलें असतां निष्कारण दूषित झालेला

राजा जनमेजय प्रसन्न होऊन मनुष्यधर्मास उचित अशा प्रकारें त्यानें वपुष्टमेची शांति केली; आणि मग सर्व मानसिक क्लेश एकीकडे सारून स्वतःचें यश वाढविण्याचे नादांत तो गुंतला व प्रसन्न चित्तानें वपुष्टमेला रममाण करून तो धर्मबुद्धि स्वदेशाचें राज्य करूं लागला. तो विप्रांचें पूजन सोडून कधीं विरत झाला नाहीं. यज्ञ व दान या शीलापासून निवृत्त झाला नाहीं. देशाच्या पूर्ण रक्षणापासून तो कधीं च्युत झाला नाहीं व त्या दिवसापासून त्यानें वपुष्टमेची निंदाही केली नाहीं. ज्यांचे तप अचिन्त्य आहे, अशा ( व्यास ) मुनींनीं पूर्वीं जें सांगितलें होतें, तें विधिविहित बदलतां येणें शक्क नाहीं, असा मागून पुष्कळ विचार करून तो आत्मज्ञ राजा क्रोधरहित झाला.

महात्म्या व्यासर्षींचें हें महाभारत नांवाचें काव्य जो पढतो तो नर सर्व मानवांत अतिशय पूज्य होतो. दुर्लभ असलेलेंही उत्कृष्ट दीर्घ आयुष्यही त्याला प्राप्त होतें, व केवळ सर्वज्ञत्वाचें फल मिळतें. इंद्राचें हें पापापासून पूर्ण मुक्त होणें जो नर पढतो, तो सर्व पापांतून मुक्त होतो. त्याचप्रमाणें तो नाना प्रकारचे विषयभोग भोगतो; आणि सर्व मनोरथ पूर्ण होऊन तो दीर्घकाल आनंद भोगतो. ज्याप्रमाणें पुष्पापासून उत्पन्न होणाऱ्या फलाला वृक्ष वाढवितात व त्या फलापासून दुसरे वृक्ष वाढतात ( होतात ) त्याप्रमाणें महर्षि-व्यासापासून उद्भवलेल्या या वाणी पठणपाठणाच्या योगानें स्वतः अतिशय वृद्धि पावून, त्या ऋषीला वाढवितात.[1] ह्याच्या पठणानें जो पुत्रहीन असतो त्याला पुत्र होतात. वर्चस्वापासून च्युत झालेला पुरुष पुनः आपल्या पूर्वस्थितीस प्राप्त होतो; त्याला व्याधि व बंधन यांचा दीर्घकाल अनुभव घ्यावा लागत नाहीं; आणि त्या गुणयुक्ताला पुण्यक्रिया प्राप्त होते. मुनीच्या या शुभ वाणी ऐकून कन्येला सज्जनांतील श्रेष्ठ असा पती प्राप्त होतो; ती कन्या गुणयुक्त पुत्रांस जन्म देते; ती स्वजनांचें हित व शत्रूंचें निर्दलन करूं शकते. क्षत्रवृत्ति पुरुष पृथ्वीला जिंकतो; अतुल धन संपादन करतो; व शत्रुविजय संपादितो. याच्या श्रवणानें वैश्याला विपुल धनही मिळतें, व शूद्र जातीच्या पुरुषास उत्तम गति मिळते. महात्म्यांच्या या जुन्या चरित्राचें अध्ययन केल्यानें पुरुषास नैष्ठिक बुद्धि प्राप्त होते. तो दुःखांचा त्याग करून व संगरहित होऊन विरक्त मनानें पृथ्वीवर संचार करितो.

हें मीं कथन केलेलें आख्यान ब्राह्मणमंडळांत पाठ ह्मणणारे, स्थिर चित्तानें व धैर्यानें याचें पुनःपुनः स्मरण करणारे व त्यामुळें सुख भोगणारे लोक या सृष्टींत आनंदानें संचार करोत. अद्भुत वीर्ययुक्त कर्में करणाऱ्या महात्म्यांचें हें ऋषिकृत चरित्र मीं तुला संक्षेपतः व विस्तारपूर्वक सांगितलें. आतां आणखी काय इच्छा आहे? मीं तुला आणखी काय सांगूं?[1]

---

[1] चतुर्धराचें ह्मणणें वृक्षापासून अन्य वृक्षांची वृद्धि होते; पण व्यासवाणीनें व्यासांचीच वृद्धि होते हें नवल आहे.

[1] आमचे लेखी पोथींत या अध्यायाचे अखेर ' इति श्री महाभारते शतसाहस्र्यां संहितायां खिलेषु हरिवंशे भविष्यं समाप्तं ' असा शेरा आहे; व त्यावर नीलकंठाचाही शेरा " इति० भारतभावदीपे हरिवंशांतर्गत भविष्यांत ग्रंथार्थ प्रकाशः ।" असाच आहे. इतकेंच नव्हे तर यापुढील सबंद पान कोरे सोडून—पुढील अध्यायाचा आरंभ एकादे स्वतंत्र प्रकरणाप्रमाणें केला आहे. व अध्याय ७ ते २६ अखेर ' पुष्कर-खंड ' असें नांव देऊन सव्विसाव्याच्या शेवटी ' समाप्तश्चायं ग्रंथ ' असा शेरा आहे.

## भविष्यपर्वांतील

# पुष्करप्रादुर्भाव किंवा पुष्करखण्ड.

—:०:—

### ( अ० ७—३२ ) चा खुलासा.

हरिवंशांतील या तिसऱ्या पर्वाला जरी 'भविष्यपर्व' अशी संज्ञा दिली आहे, तरी या सर्व पर्वभर भविष्यकथन केलें आहे, असा प्रकार मुळींच नाहीं. भविष्यकथनाचे यांत काय ते तीनच ( २,३,४ ) अध्याय आहेत. तथापि तेवढ्यावरून सर्व पर्वाला 'भविष्य' हेंच नांव ठेविलें आहे. दुसरी गोष्ट, या भविष्यपर्वाच्या सातव्या अध्यायापासून तों ३३ व्या अध्यायापर्यंत सव्वीस अध्यायांचा एक स्वतंत्रच भाग मानून त्याला 'पुष्करप्रादुर्भाव किंवा पुष्करखण्ड' असें नांव दिलें आहे. यांत वरवर वाचणाराला जरी जगदुत्पत्त्यादि विषय लिहिले आहेतसें वाटतें तरी विचक्षण व अधिकारी वाचकाला हें सर्व खण्ड अध्यात्मपर आहेसें कळतें, असें टीकाकार चतुर्धर म्हणतो. बाकी हा अध्यात्मपर अर्थ सामान्यास कळणें शक्य नाहीं. त्याला समर्थच विद्वान् पाहिजे. नीलकंठ तर या कामीं कांहींसे अहंकृतिपूर्वक उद्गार काढितो. तो म्हणतो:—

कस्त्र्यंबकमृते कालकूटाभं पुष्करोद्भवं ।
कंठे कर्तुं क्षमो लोके कामजित् पुरुषोत्तमः ॥

अर्थः—कालकूटाप्रमाणें कठिण असें हें पुष्करोद्भव खण्ड त्र्यंबक ( शंकर, नीलकंठ चतुर्धर ) यावांचून दुसरा कोण कामजयी ( मदनशत्रु, निष्काम ) पुरुषश्रेष्ठ कंठीं धारण करण्यास ( स्वीकारण्यास ) समर्थ आहे ?

याप्रकारें अहंघोषणापूर्वक आपल्या अधिकाराचें वर्णन करून नीलकंठ म्हणतो, या खंडांतील सातवे अध्यायाचे नववे श्लोकांत 'वक्तुमर्हसि धर्मिष्ठ यशो नारायणात्मकं' येथून उपक्रम करून बत्तिसाव्या अध्यायाच्या १० व्या श्लोकांत 'अधीत्य सर्वमध्यात्मं देवलोके महीयते । एष पौष्करको नाम प्रादुर्भावो महात्मनः । या श्लोकानें जेथें उपसंहार केला आहे, अशा या षड्विंशत्यध्यायीचें ब्रह्मपरत्व निश्चित दिसून येतें. आतां वरदृष्टीच्यांस या अध्यायांत जगदुत्पत्तिवर्णन आहेसें भासेल तरी तें महावाक्यानें ( तत्त्वमस्यादि ) प्रतिपाद्य जें ब्रह्माद्वैत त्याचें ज्ञान व्हावें म्हणूनच आहे. या खंडांत ठिकठिकाणीं 'एकार्णव' 'देवासुर' इत्यादि जे व्यावहारिक शब्द दिसतात, ते देखील, 'अजामेकां०,' 'द्वासुपर्णा०' इत्यादि श्रुतींतील 'शेळी व पक्षी' या शब्दांप्रमाणेंच केवळ रूपकी भाषेंतील समजून ब्रह्मपरच लावावे. श्रुतीला अशाच भाषेनें ब्रह्मतत्त्व निरूपण करण्याची संवयच आहे. इकडे पाहून प्रस्तुत खंडांतील 'एकार्णव' या शब्दाचा अर्थ 'विशुद्ध चित्' असा समजावा. 'विष्णु' शब्दाचा अर्थ 'अव्याकृत आकाश' असा समजावा. 'पुष्कर' शब्दाचा अर्थ 'द्विविध कार्य' समजावा व 'सुरासुर' या शब्दाचा अर्थ 'शम व काम' असा समजावा.

व्यासांनीं हें अध्यात्मतत्त्व निरूपण असें लक्ष्यार्थानें किंवा द्राविडीप्राणायामानें कां केलें, तर 'परोक्षप्रिया हि वै देवाः'—विद्वानांना हें पर्यायानें किंवा अप्रत्यक्ष पद्धतीनेंच बोलणें रुचतें' अशी म्हण आहे. शिवाय नीलकंठ म्हणतो, 'चक्रे दुर्जनचोरेभ्य स्तत्वरत्नं सुरक्षितुं'—दुर्जनरूपी चोरांपासून हें अध्यात्मरूपी रत्न सुरक्षित राखण्याकरितां व्यासांनीं कथाभागरूपी चिंध्यांत गुरफाटून ठेविलें.

येथें असा प्रश्न येतो कीं, एक तर वेदाचा अर्थ सामान्यांस न कळे इतका गूढ म्हणून तो आबालवृद्धांस कळविण्याचे उद्देशानें व्यासांनीं हीं पुराणें रचलीं, मग तेथेंही पुनः तीच मेख

कायम ठेवणें याला समंजस कसें म्हणावें ? दुसरें, नीलकंठ म्हणतो त्याप्रमाणें व्यासांनीं खरोखरच जर हें रत्न गुपित ठेवलें असेल तर तें नीलकंठानें तरी उघडें करून टाकणें म्हणजे व्यासांचे हेतूविरुद्ध आचरण करणें नव्हे काय? पण या प्रश्नांचें उत्तर द्यावयाचें कोणीं?

असो; भविष्यपर्वाच्या येथपर्यंतच्या अध्यायांत कालमाहात्म्यानें संसारी जीवांची अतिशय भयप्रद स्थिति होणार हें ऐकून जनमेजयाला अत्यंत उद्वेग प्राप्त झाला. यांतून जीवांचा तरणोपाय कसा लागावा अशा विवंचनेंत तो पडला असतां 'तरति शोकमात्मवित्' व 'नान्यः पन्थाविद्यतेऽयनाय' म्हणजे 'केवळ आत्मवेत्ताच दुःखातीत होतो; आत्मज्ञानानेंच मात्र दुःखमोक्ष होतो; याहून दुसरी गति नाहीं;' हीं श्रुतिवाक्यें त्याला स्मरून त्याला खास दिसून आलें कीं, 'आत्मज्ञानाशिवाय शोकतरणाला दुसरें कोणतेंही साधन नाहीं' त्या अर्थीं त्या आत्मसाधनाचीच आपण या व्यासशिष्याकडून सविस्तर माहिती करून ध्यावी, असा उद्देश मनांत आणून पुढील २६ अध्यायांतील प्रश्नोत्तररूपानें त्यानें पुरापुर आत्मज्ञान करून घेतलें आहे, असें नीलकंठाचें म्हणणें आहे.

हें षड्विंशत्यध्यायात्मक खण्ड पाहिलें असतां नीलकंठांनीं हा वर दिलेला उद्देश त्यांत फारशा स्पष्ट शब्दांनीं दिलेला आढळत नाहीं. शिवाय हा अध्यात्मपर अर्थ स्वतः नीलकंठानें आपसुखें लादला नसला तरी शब्दांतून ओढूनच काढिला आहे. ह्याचे पूर्वींचे कोणी टीकाकारांनीं तो केलेला नाहीं असा नीलकंठाचाच पुढील श्लोकांत स्पष्ट उल्लेख आहे. ग्रंथाचे अखेर तो म्हणतोः—

परैरदर्शितः पन्थाः पौर्वापर्येक्षयामया ।
यथा कथंचिदुन्नीतः सुधियः शोधयन्तु तम् ॥

अर्थः—हा अध्यात्मपर अर्थाचा मार्ग मला दुसऱ्या कोणी दाखविला नसून मागील पुढील संदर्भाकडे पाहून मीं आपलेच बुद्धीनें कसाबसा उगविला आहे; तर आतां जे सुधी असतील त्यांनीं तो या धोरणानें पुरापुर शोधावा.

ही स्वतः नीलकंठाचीच कबुली आहे. शिवाय हे सव्वीस अध्याय तपासून पाहतां जरी क्वचित् क्वचित् कांहीं शब्द किंवा वाक्यें अध्यात्मगर्भ आहेत, व नीलकंठासारख्या गाढ्या पंडितानें व्युत्पत्तिबलानें, बुद्धिबलानें व गीर्वाणभाषेच्या अनेकार्थत्वसंपत्तीनें सामान्य वाचकांच्या ध्यानांत न येणाऱ्या अशा कित्येक शब्दांवर व वाक्यांवर इष्टार्थ लादला आहे तरी या खण्डातील प्रत्येक शब्दनीशब्द रूपकी आहे, असें नीलकंठालाही दाखवितां आलेलें नाहीं. सारांश, येथें द्राक्षापाक तरी खचीत नाहीं. फार केलें तर नारीकेल पाक मिळेल; पण, तो ज्याच्या अंगांत शक्ति असेल त्याचा.

नीलकंठांनीं केलेला अर्थ जरी ध्यानांत घेतला तरी त्याचें वास्तव्य ज्ञान होण्याची योग्यता हजारोंतून एखाद्याची असेल कीं नाहीं. कारण, जो कोणी गुरूपदिष्ट मार्गानें कैवल्यसमाधीपर्यंत जावयास शिकला असून पातंजलादि योगग्रंथ व उपनिषदादिकांतील आध्यात्मिक भाषा यांशीं दृढ परिचित असेल ह्मणजे "शाब्दे परेच निष्णातः" असेल अशालाच त्या अर्थापासून आनंद होईल. इतरांना क्लेश मात्र होतील. कदाचित् ज्याला संस्कृताचें बरेंचसें ज्ञान असून संस्कृत मूळ व त्याची टीका हीं डोळ्यांपुढें येतील त्याला शब्द चमत्कृतीनें व अर्थवैभवानें तरी कांहींशी मौज वाटेल, परंतु, ज्याला संस्कृताचें ज्ञान नाहीं व केवळ महाराष्ट्र पर्याय शब्दांनींच हा गूढार्थ वाचणें प्राप्त आहे, अशाला तो सर्वथा नीरस वाटेल. पण येथें आमचा उपाय नाहीं. मन्मथनाथ

दत्तांनीं आपल्या इंग्रजी भाषांतरांत तर या अर्थाला बहुधा फांटाच दिला आहे. मन्मथनाथ म्हणतो कीं, हें खंड प्रक्षिप्त असावें. निदान हें ओघानें आलें आहे, असें आह्मांसही वाटत नाहीं. आम्हांलाही 'सुरस भाषांतराचे' दृष्टीनें आध्यात्मिक अर्थात न पडणें अधिक सुखावह झालें असतें. परंतु, वाईकरांनीं तो अर्थ थोडा बहुत दिला आहे. तेव्हां आम्हींच न द्यावा तर वाचकांस रुचणार नाहीं. म्हणून आम्हींही स्थलविशेषीं दिला आहे. त्यापासून वाचकांचें कितपत समाधान होईल व त्यांना योगमार्ग व अध्यात्म व्युत्पत्ति कितपत निर्मळ समजेल तें हरि जाणे.

प्रसिद्ध शारीर भाष्यकर्ते शंकराचार्य यांचें भारतावर भाष्य करण्याचें काम नसतांही त्यांना जे आध्यात्मिक दृष्ट्या विशेष महत्वाचे भाग वाटले, त्यांवर त्यांनीं भाष्य केलें आहे. उदाहरणार्थ, उद्योगपर्वांतील "सनत्सुजातीय" भीष्मपर्वांतील 'श्रीमद्भगवद्गीता' अनुशासनांतील श्रीविष्णुसहस्रनाम. पण त्यांनींही या पुष्करखंडावर भाष्य केल्याचें कोठें आढळत नाहीं. खरोखर असल्या खचरट भागावर तर आचार्यांची दृष्टि विशेष पोंचावयास पाहिजे होती. व नीलकंठास वाटतें आहे, तेवढ्या महत्वाचा हा भाग असता, तर बत्तीस वर्षांचे वयांत जगज्जय करणारा व लोकहितार्थ आणि अज्ञानतिमिरहरणार्थच ज्याचा अवतार, असला असामान्य पुरुष या खंडावर भाष्य करण्यास रहाताना. परंतु त्यांना हा भाग तितका आदरणीय वाटला नसावा. यावरून नीलकंठाचे म्हणण्याला कितपत महत्त्व द्यावें हें समजत नाहीं.

याहून कांहींसा कमी योग्यतेचा तथापि उपेक्षणीय नव्हे असा दुसरा एक पुरावा 'भारतमंजरीकार' क्षेमेंद्राचा आहे. क्षेमेंद्र हा दहाव्या शतकाचे सुमारास काश्मीर महाराजाचे पदरीं असून अभिनवगुप्ताचार्यांचा शिष्य होता. याला एके वेळीं **रामयश** नांवाच्या ब्राह्मणानें विनंति केली कीं, आपण संक्षेपानें भारतकथा लिहावी. त्यावर क्षेमेंद्रानें उत्तर केलें कीं, व्यासांनीं स्वप्नांत येऊन मला या पूर्वींच ह्याविषयीं आज्ञा केलेली आहे, त्याअर्थीं ही तुझी विनंति मी अवश्य मान्य करितों. असें म्हणून त्यानें 'भारतमंजरी' नांवाचा भारताचा संक्षेप लिहिला. यांत त्यानें भारतांतील महत्त्वाचे सर्व प्रकरणांचा समासतः संग्रह केला आहे. हरिवंश हा भारताचाच एक भाग आहे असा त्याचाही अभिप्राय असल्यानें त्यानें हरिवंशाचे तिन्ही पर्वांचाही आपले संक्षेपांत समावेश केला आहे, असें निर्णयसागरांतील 'काव्यमाला' नांवाच्या पुस्तकावलींत छापून प्रसिद्ध केलेल्या त्याच्या 'भारतमंजरी' ग्रंथाच्या अनुक्रमणिकेवरूनच दिसतें. याशिवाय ग्रंथाचे अखेर क्षेमेंद्रानें आपल्या कृतीचें स्वरूप स्वतःच दिलें आहे, तेथें तो म्हणतोः—

'मद्वचोदर्पणतले महाभारतदिग्द्विपः ।
समस्तावयवोऽप्येष मुष्टिमेय इवेक्ष्यते ।

म्हणजे माझ्या ह्या 'संक्षेप' रूप आरशांत महाभारतरूपी विशाल दिग्जाचें प्रतिबिंब जरी एकही अवयव न सोडतां मीं घेतलें आहे, तरी दर्पणाचे संकुचितपणामुळें तें सर्वांगयुक्त असतांही मुठींत मावण्याजोगें झालें आहे.

या त्याच्या म्हणण्यांतील 'समस्तावयवोऽपि' हे शब्द ध्यानांत घेण्याजोगे आहेत. 'पुष्करखंड' हा भाग नीलकंठाला वाटतो आहे तितपत महत्वाचा जर खरोखर असता तर असला गाढा पंडित इतक्या योग्यतेच्या प्रकरणाची उपेक्षा खास करिताना. विशेषतः प्रत्यक्ष व्यासमुनींनीं त्याला स्वप्नांत आज्ञा दिलेली असतांना व नीलकंठाचे म्हणण्याप्रमाणें हें

खंड म्हणजे चतुर व्यासमुनींनीं दुर्जन चोरांपासून राखण्याकरितां रत्नमंजूषेप्रमाणें कडेकोट बंदोबस्तानें केलें असतांना व्यासांच्याच चोदनेवरून लिहिणारा क्षेमेंद्र त्यांच्या या रत्नसंग्रहाचा अनादर करील असें म्हणणें अंमळ अवघड पडतें.

असो; या प्रकारचे जरी या प्रकरणाचे महत्वाविरुद्ध बरेचसे पुरावे आहेत तरी नीलकंठालादेखील अगदींच भ्रमिष्ट असें म्हणवत नाहीं. कारण, या प्रकरणांत ठिकठिकाणीं नीलकंठाचे म्हणण्यास पोषक अशीं वाक्यें निःसंशय आढळतात. पण इतकेंच कीं, हीं मध्येंमध्यें आढळणारीं वाक्यें म्हणजे दांतांचे सांपटींत अडकलेले शितांप्रमाणें आहेत. ह्मणजे हीं कितीही कुशलतेनें साफ कोरून खाल्लीं तरी त्यांनीं पोट मिळून भरणें नाहीं. अर्थात्, नीलकंठांनीं माराकुटीनें निपजविलेला समग्र भाग जरी पोटांत घेतला तरीही वाचकांची 'योग किंवा अध्यात्मविद्या' यांसंबंधें एकादे भागाची तरी पुरापुर तृप्ति होईल अशी गोष्टच नाहीं. फार· झालें तर त्याची भूक चाळविल्यासारखें होईल. इतकेंच. तथापि, नीलकंठानें इतपत जिवापाड श्रम करून हें प्रकरण इतक्या रंगरूपास आणिलें आहे त्या अर्थीं श्रीहर्ष म्हणतो कीं, 'प्रणयिषु वा दाक्षिण्यादथवा सद्वस्तुपुरुषबहुमानात्' अशांतला कांहीं तरी न्याय स्वीकारून नीलकंठाचेच बळावर आम्हींही या प्रकरणीं आमचे शक्तीप्रमाणें आध्यात्मार्थाची छटा दाखविली आहे. परंतु या खंडांत जी माहिती दिली आहे ती एकंदर रूपकी भाषेनें गुरफाटली गेली असल्यामुळें सामान्यांस दुर्बोध आहेच. पण जरी टीकेचे किंवा भाषांतराचे साह्यानें कोणास ती सुबोध झाली तरी ती मुळांतच तुटक तुटक असल्यामुळें तिजपासून विषयाची धडसमजूत पडत नाहीं. येथें एक चिंधी, तेथें एक चिंधी असा प्रकार असल्यामुळें नुसत्या चिंध्या एक गाठोडेंभर मिळाल्या तरीही अंगभर आच्छादनाचें किंवा शीतनिवारणाचें काम होत नाहीं. यामुळें या चिंध्या वस्तुतः फुकटच जातात. असा प्रकार न व्हावा ह्मणून आम्हीं यांतील चांगल्या चांगल्या व धड अशा चिंध्या निवडून व त्या ग्राहकांचे सुखाकरितां एके ठिकाणीं जधून त्यांची एक गोधडी तयार केली आहे. अर्थात्, ही गोधडी म्हणजे अखंड व धुवट पासोडा नव्हे, तथापि ही कसेंबसें तरी शीतनिवारण करूं शकेल असें वाटतें.

ही आमची गोधडी ह्मणजे पुढें दिलेलें '**योगखंड**'. होय. याला आम्हीं मुद्दाम 'खंड' असेंच नांव दिलें आहे. कारण, यांत योगाची सांगोपांग व संपूर्ण अशी माहिती दिलेली नाहीं. कारण तसें करणें ह्मणजे एक प्रकारचा अतिप्रसंग करणेंच आहे. तें आमच्या प्रतिज्ञेच्या व ग्रंथमर्यादेच्या बाहेरचें आहे. यास्तव आम्हीं पुढील सव्वीस अध्यायांत ज्या ज्या मुद्यांचा थोड्याबहुतानें उल्लेख आला आहे अशा मुद्यांची वाचकांस स्पष्ट कल्पना आणून देण्यास जरूर तेवढे भाग अंमळसे विस्तारानें दिले आहेत एवढेंच; व वाचकांनीं तरी यां खंडाचा याच दृष्टीनें परिचय करावा. याचे योगानें त्यांना पुढील भागांतील कांहीं रूपकांचा बोध होईल. उदाहरणार्थ—पुढील खंडांतील प्राणायामाचे माहितींत प्राण व अपान ' या दोन वायूंचे एकीकरणाला दूध पाण्यांचे मिसळण्याची उपमा दिली आहे. यालाच प्राणाग्नींत प्राणाचें **हवन** करणें असें म्हटलें आहे. याच प्राण व अपान यांचे झटापटीला ( कारण ते एकाएकींच मिसळत नाहींत; त्याला बरीच झटपट करावी लागते ) 'देवासुर युद्ध.' असें म्हटलें आहे. 'सत्व

व मोह ' किंवा, ' शम व काम ' यांचे झगड्यासही क्वचित् स्थळीं ' देवासुरयुद्ध ' अशीच संज्ञा दिली आहे. देहाला ठिकठिकाणीं पर्वताची उपमा दिली आहे. कुठे कुठे ' भ्रूघ्राण ' मध्यालाही पर्वत ह्मटलें आहे. योग्याला ठिकठिकाणीं ब्रह्मा ह्मटलें आहे. सत्वाला विष्णु ह्मटलें आहे. मोहाला मधुदैत्य ह्मटलें आहे. प्राणावर अग्नीचें रूपक केलें आहे. इ०इ०

' योगखंड ' वाचल्यानें रूपकांचा बोध होईल ह्मणून आम्हीं वर ह्मटलें आहे, ह्याचा अर्थ या पुष्करखंडांत ' योजलेलेच शब्द तेथें सांपडतील असा मात्र कोणीं समजूं नये. कारण, आमचें योगखंड, पवनविजय, हठयोगप्रदीपिका, स्वरोदय व मुख्यतः पातंजलयोगदर्शन या ग्रंथांचे आधारें लिहिलेले आहे अर्थातच या ग्रंथकर्त्यांना रूपकी भाषा लिहिण्याचें प्रयोजन नसल्यानें त्यांनीं केवळ योगशास्त्राचीच परिभाषा वापरली आहे. आणि तिचाच सारांश आमच्या या खंडांत आहे. तेव्हां या पुराणांतील रूपकी शब्द त्यांत सांपडणार नाहीत; परंतु, अमुक रूपक अमुकावर केलें असावें असा तर्क बांधण्यास साह्यभूत असा मजकूर त्यांस आढळेल. उदाहरणार्थ, इडा, पिंगळा व सुषुम्ना यांचें वर्णन वाचतांच येथें गंगा, यमुना, सरस्वती व त्यांचे योगास त्रिवेणी संगम व तो जेथें होतो त्या शरीराचे भागास प्रयाग किंवा तीर्थराज ह्मटलें असावें. हा तर्क सामान्य बुद्धीचे वाचकांस करितां येईल. अशा तऱ्हेनें या योगखंडाचा उपयोग समजावा.

आजकालचे लोकांची या ऋषिप्रणीत गूढ शास्त्रावर श्रद्धा बसावी ह्मणून या योगखंडाचाच एक भाग कल्पून आम्हीं आजकाल अमेरिकेसारख्या वेदबाह्य व परस्थ लोकांची या योगशक्तीचे संबंधांत अनुभवसिद्ध साक्ष दिली आहे. तीवरून आस्तिक नास्तिक सर्वांची खात्री होईल कीं भगवान् पतंजली व अन्य ऋषिवर्य यांनीं अतींद्रियदर्शन, त्रिकालज्ञान, अमानुष शक्ति इत्यादिकांचीं जीं सर्वत्र वर्णनें दिलीं आहेत तीं केवळ बाडा नसून सत्यस्वरूप आहेत; आणि आमचे ऋषिवर्गांनीं आह्मांला ' नर ' असतां ' नारायण ' होण्याचा जो मार्ग दाखवीला आहे तो काल्पनिक नसून खरा खरा आहे. आणि वाचकवर्गाची एवढी जर खात्री होईल तर आमचे श्रमाचें सार्थक होईल. या इंग्रजी उताऱ्याचें इंग्रजी न समजणाऱ्या वाचकांकरितां भाषांतर देण्याचें मनांत होतें, परंतु ग्रंथ अमर्याद वाढूं लागला. यास्तव आम्हीं विषयाची कल्पना येण्यापुरते संक्षेप दिले आहेत. ज्यांची जिज्ञासा यांनीं न भागेल त्यांनीं कोणातरी आंग्लभाषाभिज्ञाकडून मूळचे उतारे शब्दशः समजून घ्यावे. अशी त्यांस विनंती आहे.

## अध्याय सातवा.

—:०:—

### पुष्करप्रादुर्भाव.

जनमेजय म्हणालाः—सागराच्या उदकांत शयन करणाऱ्या पद्मनाभाचा महिमा व पूर्वीं कमलामध्यें ऋषिगणांसह देव कसे उत्पन्न झाले हा सर्व योग, हे योगवेत्त्यांतील श्रेष्ठा, मला सांग. त्याची ( नारायणाची ) कीर्ति ऐकत असतां माझ्या मनाची तृप्ति होत नाहीं. तो पुरुषोत्तम ( सागरजलांत ) किति कालपर्यंत निजणार ? स्वतः काळाचें कारण असतांही तो कालांत ( काळाचे अधीनत्वानें ) कां निजतो ? म्हणजे परिमित काळींच जगताची उत्पत्ति स्थितिलय त्याला कां करावे लागतात ? तो देवाधिपति किति काळानें जागा

होतो[1]? ( प्रलयकालाची मर्यादा किति ) त्या भगवंतानें उठून हें सारें जग कसें निर्माण केलें? हे महामुने, पूर्वीं प्रजापति कोण कोण होते? त्या सनातन प्रभूनें हें चित्रविचित्र जग कसें निर्माण केलें? तसेंच, सर्व जगत् एक समुद्रमय होऊन सर्व स्थिरचर वस्तु नाश पावल्या असतां, देव, असुर, नाग व राक्षस यांचे संघ नष्ट झाले असतां, जगांतील अग्नि व वायु नष्ट झाले असतां, आकाश व पृथ्वी नाश पावलीं असतां, व महाभूतांचा प्रलय होऊन हें सर्व केवळ शून्यरूप ( गुहारूप ) झालें असतां, महाभूतांचा अधिपति, महातेजस्वी, महामतिमान्[2] ( चिदात्मा ) ( विराट ) व श्रेष्ठ देवगुरु असा प्रभु कोणत्या प्रकारें ( म्हणजे कशाच्या आश्रयानें ) राहतो? हे धर्मिष्ठ ब्राह्मणा, मी तुला शरण आलों आहें यास्तव हें नारायणाचें[3] यश, ( शुद्ध वस्तूचा वैभव विलास ) मजला निःसंशयपणें सांगण्यास तूंच योग्य आहेस. त्या महात्म्याचे पूर्वीं होऊन गेलेले व पुढें होणारे ( किंवा ज्ञान्यांना नित्यसिद्ध व मूढांना नव्यानें होणारे ) प्रादुर्भाव, हे भगवन्, श्रद्धेनें ऐकावयास बसलेल्या आम्हांस सांगणें आपणास उचित आहे.

वैशंपायन म्हणालेः—हे निष्पापा, कुरुकुलश्रेष्ठा, तुला नारायणाचें यश ऐकण्याविषयीं जी स्पृहा उत्पन्न झालेली आहे, ती तुझ्या कुलाला उचितच आहे. ही स्पृहा ( यज्ञादि ) पवित्र कर्मांच्या अनुष्ठानाचें फळ आहे. आदिपुराणांमधून, देवतांपासून, श्रुतीला अनुसरून, महात्मे ब्राह्मण बोलत असतां आम्हीं जें ऐकिलें त्यावरून, तसेंच मोठ्या तपानें ज्याचें दर्शन झालें असे बृहस्पतितुल्य तेजस्वी पराशरपुत्र जे आमचे गुरु द्वैपायन ( व्यास ) त्यांच्या सांगण्यावरून, तें मी तुला यथाबुद्धि व यथाज्ञान सांगतों. तें तूं श्रवण कर. हे भारता, मी केवळ मंत्रद्रष्टा झाल्यानें तें मला जाणतां येणें शक्य नाहीं. ज्याचें तत्वशः ज्ञान ब्रह्मदेवाला देखील होत नाहीं, अशा विश्वात्म्या नारायणाचें परमश्रेष्ठ (यश) जाणण्यास कोण समर्थ आहे? सर्व देवांचें व महर्षींचें जें रहस्य तें मीं ऐकिलें आहे. हेंच सर्व देवांचें व तत्वतः तत्त्व सांगणाऱ्यांचें ( रहस्य ) आहे. तें अध्यात्मवेत्त्यांचें चिंत्य ( ध्येय ) आहे. कर्मठांचें प्रवर्तक आहे. देवांचे ( विद्वानांचें ) जें अधिदैव ( म्हणजे ज्ञानरूपी महाभाग्य ) त्याला देव असें म्हणतात. जें भूत ( अनादि ) व अधिभूत ( म्ह० अनंत ), जें महर्षींना परमश्रेष्ठ, जें सत्य, देवांनीं ( विद्वानांनीं ) पाहिलेलें, तें वेदवेत्ते जाणतात. जो कर्ता, करविणारा, बुद्धि, मन, तसेंच क्षेत्रज्ञ, प्रधान, पुरुष, शास्ता तो एकच परमात्मा होय. तो कालस्वरूपी असून कालालाही निजवितो ( म्हणजे त्याचाही लय करितो ). तो द्रष्टा, तसाच स्वतंत्रही आहे. तो पंचविध प्राण असून निश्चल ( वस्तु ) व

१ या श्लोकाचा अध्यात्मपर अर्थ नीलकंठानीं केला आहे तोः—

सागर म्हणजे समुद्राप्रमाणे अनंत व अपार जें रसमय, श्रुतिप्रसिद्ध निष्कल ब्रह्म त्याचे ठिकाणीं, स्वपत् म्हणजे आपल्या मायातीत रूपाचे ठिकाणीं म्ह० कैवल्य समाधींत लीन असणारा जो पद्मनाभ--पद्म शब्दानें लक्षित जो हा सर्व कार्यप्रपंच तो ज्याचे नाभीचे म्हणजे गर्भाचे ठिकाणी आहे, अर्थात् पद्मनाभ म्हणजे जो मायोपाधि ईश्वर त्याचा प्रभाव म्हणजे सृष्टिरचनासामर्थ्य कशा प्रकारचें होतें त्याचें वर्णन कर. त्याचप्रमाणे पुष्कर म्हणजे अव्याकृत आकाश त्याचे ठिकाणीं देव, ऋषि म्हणजे इंद्रियें प्राण व सूत्रात्मा हीं कशीं निर्माण झाली हेंही कथन कर. मला परमात्म्याशी योग कसा करावा म्हणजे तद्रूप कसें होऊन जावें याचा उपाय सांग. अशा गूढ अर्थाचा जनमेजयाचा हा प्रश्न आहे.

२ येथे आमचा लेखीपाठ "महामति" असा आहे. व नीलकंठांनीं तोच घेतला आहे.

३ वक्तुमर्हसिधर्मिष्ठ यशो नारायणात्मकं श्लो० ९ अ० ७

अक्षय आहे. हे निष्पापा, तन्निष्ठ लोकांकडून तो ( त्यांनींच दिलेल्या ) विविध भावांनीं संबोधिला जातो. तोच भगवान् सर्व कांहीं घडवितो, व बिघडवितो. जो आम्हांकडून कार्य करवितो त्याच्याचयोगें आम्ही विधिनिषेधांच्या घोंटाळ्यांत सांपडतों. आम्हीं त्याच परमेश्वराचें पूजन करितों व शांत झालों असतां त्याचीच इच्छा बाळगतों. जो वाचेचा प्रवर्तक, जो वाचेचा विषय, जो मी वक्तृत्वाभिमानी ( जीव ) आपणांस कांहीं सांगतों, जें आपण हें ऐकतां, जो मोक्ष व जें कांहीं इतर आपण बोलतां, ज्या कांहीं कथा ( लोकांत ) आहेत, गूढ अर्थांनीं युक्त श्रुति आहेत,—त्या सर्व, आणि विश्व, विश्वपति व सर्व देव हे सारेहि नारायणात्मक आहेत. जें कांहीं लौकिकसत्य व असत्य, कारण व कार्य, भूत व भविष्य, परस्परजनक ( बीजांकुरादि ), तसेंच त्रिभुवनांत असणारें जें कांहीं चर व अचर आहे, तें सर्व हा श्रेष्ठ असा पुरुषोत्तम प्रभुच होय.

## अध्याय आठवा.

—:०:—

### द्वितीय प्रश्नोत्तर.

वैशंपायन म्हणतात:—हे जनमेजया, कृतयुगाची[१] कालगणना चार हजार वर्षांची आहे असें म्हणतात. त्याची संध्या त्याच्या दुप्पट शंभर वर्षांची ( म्हणजे आठशें वर्षांची ) आहे. त्या युगांत धर्म चतुष्पाद व अधर्म एकपाद ( म्हणजे चौथा भाग ) असतो. लोक स्वधर्मनिरत राहून यज्ञयागादिक करितात. त्या युगांत ब्राह्मण धर्मपरायण, क्षत्रिय राजकार्यांत गढलेले, वैश्य कृषिकर्मरत व शूद्र सेवाधर्मांत रत असतात; यामुळें सज्जन ज्यांचें ( स्वतः ) आचरण करितात व आचरण करून लोकांना तसेंच करण्यास ज्याविषयीं उपदेश करितात, अशीं सत्य, तप व धर्म हीं सर्वदा वाढतात. हे भारता, कृतयुगाच्या ठायीं धर्मबुद्धीच्या लोकांची व नीच योनीमध्यें जन्मलेल्या देखील प्राण्यांची वृत्ति अशीच असते. त्रेतायुगाची काल गणना तीन हजार वर्षांची आहे असें म्हणतात; त्याची संध्या तितक्याच दुप्पट शंभर वर्षांची ( म्हणजे सहाशें वर्षांची ) असते असें सांगतात. तेव्हां धर्म त्रिपाद व अधर्म द्विपाद होतो. व सत्य व सत्व ( चांगुलपणा ) हे कृतयुगाप्रमाणेंच चालू राहतात. परंतु त्रेतायुगामध्यें चारी वर्णांचे वर्णांचे लोक धर्मफलाच्या इच्छेनें युक्त होऊन ( किंवा लोभामुळें ) विकार पावतात व याप्रकारें चातुर्वर्ण्याचा बिघाड झाल्यानें ते दुर्बळ होतात. हा देवनिर्मित त्रेतायुगाचा विधि तुला सांगितला. द्वापर युगाची देखील चेष्टा आतां तूं ऐक. हे कुरुसत्तमा, द्वापराची कालगणना दोन हजार वर्षांची आहे; त्याची संध्या तितक्याच दुप्पट शंभर ( म्हणजे चारशें )वर्षांची आहे असें सांगतात. हे कुरुपुंगवा, या युगांत ज्ञानी ब्राह्मण देखील द्रव्यपरायण, रजोगुणी, शठ, कृतघ्न व क्षुद्र असे निपजतात. तेव्हां धर्म द्विपाद होऊन अधर्म तीन पायांवर उभा राहतो. कृतयुगांतील धर्ममर्यादा हळुहळु विपर्यास पावतात. ब्राह्मण्यभाव नाश पावतात, आस्तिक्य नाहींसें होतें; तसेंच द्वापरयुग लागलें असतां व्रतोपवासादिकांचा ( लोक ) त्याग करितात. यापुढें क्रूर कलियुग सहस्रवर्षे व त्याची

---

१ या अध्यायांत कृतादि युगांची कालसंख्या सांगितली आहे. इतकीही दीर्घकाल गणना झाली तरी अखेर तिचा अंत आहेच. चार सहस्र युगांचा ज्याचा एक दिवस असला ब्रह्मदेव देखील ठरीव मुदतीपलीकडे राहूं शकत नाहीं. अर्थात् यावत् दृश्य हें क्षयशील आहे, हा बोध वाचकानें यावरून घेऊन आत्मज्ञान व तत्साधक वैराग्य यांकडे वळावें, असा या अध्यायाचा हेतु आहे, असें चतुर्धर म्हणतो.

संध्या व दोनशें वर्षें मिळून बाराशे वर्षांचें आहे असें म्हणतात. त्या युगांत अधर्म चार पायांनीं युक्त होऊन धर्म एक पाद होतो. माणसें कामपरायण व तमोगुणी अशीं निपजतात. तेव्हां कोणीं उपवास करीत नाहीं, किंवा कोणी चांगला, सत्यवक्ता, आस्तिक, किंवा ब्रह्मवक्ताही असत नाहीं. तेव्हां ब्राह्मण अहंकारानें पछाडलेले व स्नेहबंधनें शिथिल झालेले होऊन त्यांचे आचरण केवळ शूद्रांप्रमाणें होतें व शूद्र आचार संपन्न होतात. ते आश्रम बिघडवितात, वर्णांचा संकर करितात, व अगम्य स्त्रियांचे ठाई रत होतात. येणेंप्रमाणें कलियुगांत लोक वागतात. याप्रमाणें बारा हजार[1] वर्षांचें एक दिव्ययुग होतें असें म्हणतात; याचेच एकाहत्तरपट काल म्हणजे एक मन्वंतर होय. हे जनमेजया, युगाच्या अखेरीस कोणींही वेदत्रयीविषयीं शंका घेत नाहीं. दिव्य युग बारा हजार वर्षांचें आहे असें ज्ञानी जाणतात. अशा हजार युगांनीं ब्रह्माचा एक दिवस होतो असें म्हणतात. नंतर तो ब्रह्मदिन संपल्यानंतर तो ( परमात्मा ) संहार-बुद्धियुक्त रुद्र होऊन सर्व प्राण्यांच्या शरीराचा नाश करितो. हे राजन्, सर्व देव, ब्राह्मण, दैत्य, मनुष्यें, यक्ष, गंधर्व, राक्षस, देवर्षि, ब्रह्मर्षि, राजर्षि, किन्नर, अप्सरा, नाग, पर्वत, नदी पशु, तिर्यग्योनिमध्यें पडलेले प्राणी, हरिणें, पक्षी या सर्वांचा, तो महा भूतपति देव नाश करून, तो पंचमहाभूतांचा कर्ता पंचमहाभूतांचाही जगाच्या संहारासाठीं नाश करून मोठीच कत्तल उडवितो. सूर्य होऊन तो जीवांचे नेत्र परत घेतो, वायु होऊन सर्व प्राणिमात्रांचे प्राण हरण करितो, अग्नि होऊन सर्व लोक जाळतो व मेघ होऊन पुनः वृष्टि करितो.

१ कृत+संध्या—( ४८०० )+त्रेता+संध्या—(३६००) +द्वापर+संध्या=( २४०० )+कलि+संध्या=( १२०० ) =१२०००

## अध्याय नववा.

—:०:—

### समाधि व व्युत्थान.

वैशंपायन सांगतातः[1]—तो नारायण योगी ( शुद्ध चिन्मात्र ) सप्तमूर्ति[2] ( महत्, अहंकार व पंचतन्मात्रारूप ) सूर्य होऊन प्रदीप्त अशा किरणांनीं ( उद्दीप्त वृत्तींनीं ) सागरांतें (सागराप्रमाणें अपार अशा रूपादि विषयांस) शोषून टाकतो ( आपल्यांत लीन करितो. ) सर्वही सागर, नद्या, विहिरी वगैरे पिऊन ( सर्व कामांस जिंकून ) पर्वतांतील सर्व पाणी ( कामादिकांचें सामर्थ्य ) किरणांच्या योगें शोषून घेऊन ( स्थूलसूक्ष्मशरीररूप ) भूमीचे हजारो तुकडे तुकडे ( विलापन ) करून तिला रसातळास नेऊन ( कारण ब्रह्मांण मिळवून ) तेथील सर्व जळ (गुणसमूह) व रस ( आनंद ) शोषून घेतो. पाण्यांत दुसरा क्लेद ( आनंद ) उत्पन्न करून तो प्राण्यांना देतो. तो कमलनयन पुरुषोत्तम मग तोही ( आनंद ) सर्व शोषून घेतो. तो हरी बलवान् वायु होऊन

१ गताध्यायावरून ब्रह्मादियावत् दृश्यजात विनाशि आहे असें समजतांच श्रोत्याच्या मनांत त्याविषयीं वैराग्य उत्पन्न झाले, असें समजा. तथापि, त्याला या विनाशिदृश्याहून विलक्षण असें अविनाशि म्हणजे शाश्वत जे कांहीं असेल त्याचें लक्षण व साधन मिळालें पाहिजे; नाहींतर नुसतें दृश्याबद्दल तोंड फिरवून तो इतोभ्रष्टस्ततो भ्रष्टः असा होईल. तो प्रसंग न यावा म्हणून त्या अविनाशि पदाला प्रापक असें साधन म्हणजे ‘ योग ’ आहे असे या अध्यायांत सांगितलें आहे.

२ सूर्यकिरणांतील सप्तरंगांवरून त्याच्या सात मूर्ति कल्पिल्या असाव्या. त्यामुळेंच सूर्याचे सात घोड्यांचीही कल्पना बसविली असावी.

३ मागले चार श्लोकात उत्तम अधिकाऱ्याला केवळ मनाचे योगानें साधणाऱ्या योगाचें वर्णन करून यापुढे मध्यम अधिकाऱ्यासाठीं वायुनिरोधरूप योगाचें वर्णन करितो, असें चतुर्धर म्हणतो.

( मूलाधारादि सर्व चक्रें भेदण्यास समर्थ होऊन) व सर्व जगाला (पादादि–जानुपर्यंत सर्व शरीर ) हालवून सोडून वायूच्या योगानें देवांचे ( इंद्रियांचे ) प्राणोदय करितो ( वायुजयानें पंचप्राणेंद्रियांस भ्रूमध्यांत किंवा ब्रह्मरंध्रांत खेंचून नेतो. ) नंतर सर्व देवगण व देही यांचे सर्व इंद्रियगण व दुसरे शब्दादि विषयही त्याच्यापासून उत्पन्न होतात. गंध, घ्राणेंद्रिय व शरीर हे गुण पृथ्वीचा आश्रय करून राहिलेले आहेत. जिव्हा, रस व क्लेद हे गुण जलाच्या आश्रयानें राहतात. रूप, चक्षुरिंद्रिय व विपाक ( पक्वता ) हे गुण ज्योतीच्या ( उष्णतेच्या ) आश्रयानें राहतात. स्पर्श, प्राण व चेष्टा ( कर्म ) हे गुण वायूच्या आश्रयानें राहतात. पण हे सर्व गुण परमेष्ठी, उपासना करण्यास योग्य व इंद्रियांचा ईश अशा देवाचा ( सूत्रात्म्याचा ) उत्तम प्रकारें आश्रय करून राहतात.

नंतर भगवंतानें ( सूत्रात्म्यानें ) आपल्या किरणांनीं ( सूक्ष्मवृत्तींनीं ) त्यांचें परिवारण केल्यामुळें व वायूनें ते आकर्षिले गेल्यामुळें रूपादि विषय व इंद्रियगण यांस एकमेकांचे स्वरूपाचा आश्रय करावा लागून त्यांच्या परस्पर संघर्षणानें अग्नि शंभर पटीनें देदीप्यमान होऊन, मग उग्र असा तो संवर्तकाग्नि सकल जगतास जाळितो. (सर्व कर्मेंच भस्मसात् केलीं ) पर्वत, वृक्ष, गुल्म, लता, वेली, गवत, दिव्य विमानें, विविध नगरें, पवित्र आश्रम, दिव्य देउळें व इतर जीं जीं आसऱ्याचीं म्हणून स्थानें ( शरीरें ) आहेत तीं सारीं त्यानें जाळिलीं. नंतर भस्मीभूत झालेल्या सर्व लोकांस लोक गुरु हरीनें, जलयुक्त कर्मानें ( अविद्याशेषानें ) पुनः शांत केलें.[1] त्या सहस्रनेत्र ( विषयपरत्वें भिन्नदृष्टि असणारा ) महा तेजस्वी (योग्यानें) कृष्ण ( संहर्ता ) व महामेघ ( जगदंकुरस्रष्टा ) होऊन दिव्य जलरूपी हवीनें ( समाधींत चिच्चंद्रमंडलापासून प्राप्त झालेल्या अमृतानें ) पृथ्वीला तृप्त केलें. ( व्युत्थान होतांच शरीर चेतनेनें व्यापिलें ) नंतर दुधासारख्या, गोड, शुभ व पुण्य अशा श्रेष्ठ जलांनीं ( चित्तसत्वाकार चैतन्यामृतानें ) पृथ्वी ( सूक्ष्म व स्थूल हें देहद्वय ) अतिशय शांत झाली. पर्वत पाण्यांनीं व्यापून जाऊन व चोहोंकडे मेघच मेघ होऊन, ते प्राणिरहित व एकसमुद्रमय झाले. महाभूतेंही मग त्या अमर्याद तेजस्वी परमात्म्याच्या ठाईं शिरलीं. ( लय पावलीं. ) सूर्य व वायु नसलेल्या, जनरहित व सूक्ष्म आकाशांत मग एकटाच सनातन प्रभु, सर्वांचें शोषण व पान करून ( पृथक् विषयांचें भान ब्रह्मांत लीन करून) राहातो. तो अमर्याद बुद्धिमान् योगी योगाचा आश्रय करून ( दुःखरहित होऊन ) एकार्णवें जलाचे ठायीं पुराणरूप धारण करून राहिला. तो एकार्णव

१ चक्षुःश्रोत्र घ्राणादि इंद्रिये व त्यांचे रूपादि पृथक् विषय हे पंचधा होऊन विभक्तसे दिसतात, परंतु या पांच भिन्न द्वारांनी विषयांचा भोग घेणारा जो अंतर्यामी त्याचे ठिकाणीं हे लीन झाल्यावर यांचे पार्थक्य अर्थात्च नष्ट होतें. झाडाच्या फांद्या वेगळ्या असल्या तरी मूळचे बुडख्यांत त्या एकरूपच असतात.

१ या म्हणण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, योगी हा समाधिकालीं जरी कारणासह सर्व कार्यप्रपंचाचा लय करून टाकितो तरी व्युत्थान होतांच कारणभूत अविद्येच्या शेषाने तो प्रपंच उभा राहतो. कारण, ज्ञान झाले तरीही देहपात होईतो थोडा तरी मायेचा झटका उलट खावयास लावीत असतो.

२ योग्याला बाह्य जगत् देखील 'चिन्मात्रैकरसमयच दिसत असतें.

जलाचे ठायीं असतां (समाधींत) हजारों पृथक् भावानें असणारे पदार्थ एकरूप होऊन राहिले. त्या अव्यक्त प्रभूला कोणीं व्यक्तपणें जाणण्यास समर्थ नव्हता.

जनमेजय विचारतोः—हा आपण आतां सांगितलेला एकार्णवाचा विधि कोणता ? हा पुरुष कोण ? योग कोणता ? व योगवान् कोण ?

वैशंपायन सांगतातः—हा भगवान् इतके दिवसच ( किंवा इतक्या दिवसांनींच ) एकार्णवाचा विधि करील असें कोणीं निश्चयानें जाणूं शकत नाहीं. याचें माप घेणारा, याला पाहाणारा, याला जाणणारा, किंवा याच्या जवळ असणारा, कोणीं नाहीं. ( कारण त्या स्थितींत अहंकार व साक्षी हे नष्ट असतात ) त्या पुरुषोत्तमाशिवाय दुसरा कोणींही ( त्या वेळीं ) जाणला जात नाहीं. आकाश, पृथ्वी व वायु यांस प्रकाशित करणारा, प्रजापति, भुवनांचा अधिपति, देवांचा देव, पितामह, सर्व श्रुतींना आधारभूत, अशा त्या महामुनि प्रभूला महार्णवाच्या ठिकाणीं आपलें शयनस्थान करणें आवडलें. एकदां समाधींत मग्न झाला ह्मणजे तेथेंच लांचावून तो अनियमित काळपर्यंत राहतो.

१ या ठिकाणीं मूळांत अयुत हा शब्द आहे व तेथें अयुतानां म्हणजे 'अपृथक् भूतांनां' असा चतुर्धर अर्थ करितो. परंतु 'अ-युत' याचा तर अर्थ 'न जोडलेले' अर्थात 'पृथक् वेगळे वेगळे' असा असतां त्याच्या थेट उलट अर्थ कसा काढूं शकतो तें त्यालाच माहीत. बरे, 'अयुत' याचा खरा अर्थ जो 'भिन्न' तो घेतकरूनही आमचे मतें चतुर्धराला जो अर्थ इष्ट तो काढितां येतो. मूळ श्लोकार्ध असा आहे.

'अयुतानां सहस्राणि गतान्येकार्णवाम्भसि' याचा चतुर्धरास अभिप्रेत अर्थ असा आहे कीं, योगी जेव्हां समाधींत शुद्ध ब्रह्ममय एकरसांत मग्न असतो तेव्हां जागृतींत वृत्तिभेदानें हजारों हजार होणारे जे वियदादि भेद ते नष्ट होतात, हा अर्थ, 'अयुत' म्हणजे 'पृथक्' असा चालीचा अर्थ घेऊन साधूं शकतो. परंतु तसें न करितां चतुर्धर त्यावर **अयुतानां अपृथग् भूतांना** रज्ज्वादिष्व इव उरगादिनाम् आत्मन्यध्यस्ताना वियदादीनां सहस्राणि वृत्तिभेदादनन्तानि एकार्णवे शुद्धे ब्रह्मणि गतानि विलीनानीत्यर्थः। असें म्हणून, 'नायं मृदि घटस्येव निवृत्तिरूपोलयः । किंतु रज्ज्वामहेरिवेति भावः'—हें त्यानें म्हणणें विवर्तवादाला धरून आहे व त्या दृष्टीनें समंजस आहे. पण तें साधण्यासाठीं 'अयुत' या शब्दाचा विपरीत अर्थ करणें मात्र आह्मांस संमत नाहीं. आमचें ह्मणणें, जेव्हां एकरस ब्रह्मांत विलय होतो तेव्हां पदार्थांचें 'अ-युत-त्व' पृथकत्व आपेंआपच नष्ट होतें. सोन्याचे आटणींत भिन्न अलंकार घातले तरी त्यांचें भिन्नत्व उरणार कसें ?

## अध्याय दहावा.

—:०:—

### मार्कंडेयाचें मायादर्शन.

वैशंपायन सांगतातः—याप्रमाणें सर्व लोक एकार्णवमय झाले असतां तो महा तेजस्वी प्रभु, जो हरी नारायण तो सर्व पाणी आच्छादून ( जगत्संहार करून ) त्यावर निजतो. महासागरासारख्या मोठ्या अफाट रजामध्यें ( देहेंद्रियांमध्यें ) ज्यास अक्षर ब्रह्म म्हणतात असा तो रजोगुणरहित ( देहादि धर्म रहित ) महाबाहु[२] ( योगी ) निजतो. आत्मरूप प्रकाशानें व तपानें स्वतःच्या रूपास आच्छादित करून तो अव्यय प्रभु, भूत, वर्तमान व भविष्य या तीन कालांचा अधिष्ठाता होऊन ( स्वरूप विसरून ) शयन करिता झाला ( करितो. ) पुरुष, यज्ञ इत्यादि व तशाच दुसऱ्याही पुरुषाला ज्या कांहीं संज्ञा दिलेल्या आहेत, त्या सर्व हा पुरुषोत्तमच होय. ऋत्विज या नांवाचे जे यज्ञपरायण

१ गताध्यायीं अविनाशिपदप्रापक जो योग ह्मणून सांगितला त्याच योगानें वर्णन प्रस्तुत अध्यायांत यज्ञाच्या रूपकानें केलें आहे; व त्याच विषयाला धरून मार्कंडेयाचे समाधीचेंही वर्णन केलें आहे; व त्याला भगवन्मायेचें दर्शन होऊन, नंतर योगेश्वर परात्माचेंही दर्शन झालें, असें सांगितलें आहे.

२ जगदुद्धाराला समर्थ जे 'प्रणव आणि तत्त्वमसि' हेच त्या योग्याचे बाहू असें चतुर्धर ह्मणतो.

ब्राह्मण ते पूर्वी या आत्मदेहापासून यज्ञानुष्ठानासाठीं ( विषयोपभोगासाठीं नव्हे ) कसे उत्पन्न झाले तें ऐका. तो प्रभु, श्रेष्ठ ब्रह्मा व सामवेदी उद्गाता यांस आपल्या मुखापासून उत्पन्न करिता झाला. होता व अध्वर्यु यांस त्यानें आपल्या बाहूंपासून उत्पन्न केलें. नंतर त्यानें ( ब्रह्मचाच्या ब्राह्मणत्वामुळें ) प्रस्तोता, मित्रावरुण, व प्रतिष्ठाता यांस ( सर्व अवयवांपासून ) उत्पन्न केलें. हे भारता, उदरापासून प्रतिहर्ता व पोता; मांड्यांपासून अध्यापक व नेष्टा, व दोन्ही हातांपासून आग्नीध्र, सुब्रह्मण्य, ग्रावस्तोता व नेता यांस त्यानें उत्पन्न केलें. याप्रमाणें त्या भगवान् जगत्पतीनें सर्व यज्ञांच्या सोळा प्रवक्त्या ऋत्विजांस उत्पन्न केलें. म्हणून हा यज्ञसंमित पुरुष वेदमय आहे. अंगें, उपनिषदें व क्रिया यांसह सर्व वेदही तन्मय आहेत.

तो प्रभु एकार्णवांत निजलेला असतां पूर्वी जें आश्चर्य झालें व मार्कंडेयानें ज्याचा अनुभव घेतला त्याची इत्थंभूत हकीकत ऐकूं येते. तो महामुनि भगवंताच्या कुशींतच लय पावला. ( उपाधिरहित होऊन लीन झाला. ) त्या भगवंताच्या श्रेष्ठ तेजानें त्याचें आयुष्य अनेक सहस्र वर्षें होतें. त्यामुळें पृथ्वींतील तीर्थांस गोचर होणाऱ्या ( म्हणजे त्यांचें दर्शन घेणाऱ्या ) त्यानें, तीर्थयात्रेच्या प्रसंगानें पुण्य आश्रम, तीर्थें, मंदिरें, देश, विचित्र राष्ट्रें व नाना पुरें ही ( पाहिलीं ). तो जप व होम यांमध्यें रत व क्षमायुक्त होऊन घोर तपाचा आश्रय करून राहिला. बरेच दिवसांनंतर मार्कंडेय हळूच त्याच्या तोंडांतून बाहेर पडला. ( व्युत्थानाचा संकल्प नसतां समाधींतून सटकन् बाहेर आला ). परंतु त्या देवाच्या मायेमुळें, आपण बाहेर पडत आहों हें त्यास कळलें नाहीं. त्याच्या तोंडांतून निघून तो एकार्णवांत गेला. तेथें त्यानें चोहोंकडे अंधेरानें व्यापलेलें ( तमानें सत्वाला आच्छादिलेलें ) पाहिलें. तेथें त्याच्या मनांत तीव्र भय उत्पन्न होऊन स्वतःच्या जगण्याचीही शंका वाटूं लागली; आणि देवदर्शनानें आनंद पावून तो ( वरील देखाव्यानें ) आश्चर्यचकित झाला. नंतर अतिशय शंकित झालेला मार्कंडेय बुचकळ्यांत पडून विचार करूं लागला कीं, ही चिंता काय निमित्तानें बरें असावी ? हा काय भ्रम आहे कीं हा स्वप्नाचा अनुभव आहे ? खरोखर यांपैकीं कोणता तरी एक विकार माझ्या मनाला झाला असला पाहिजे. असली ही असंग व क्लेशरहित ( वस्तु ) खरी असण्यास योग्य नाहीं. जो चंद्र, सूर्य व वायु यांनीं रहित व ज्यांतील पर्वत आणि भूतल आच्छादिलेले आहेत असा हा लोक कोणता असावा, या चिंतेत तो गढून गेला. त्यानें पाण्यानें भरलेल्या मेघाप्रमाणें ( दिसत ) असलेल्या पुरुषासही त्या महासागरांत पर्वताप्रमाणें निजलेलें पाहिलें. आपल्या तेजांनीं जळत असल्याप्रमाणें, प्रकाशानें देदीप्यमान् होत असल्याप्रमाणें, गांभीर्यानें जागत असल्याप्रमाणें, व सापासारखे श्वास सोडीत असल्याप्रमाणें त्यानें त्यास पाहिलें. तो त्या देवास 'आपण कोण' असें आश्चर्यानें पुसण्यास आला. तोंच हळुहळु तो मुनि पुनः त्याच्या कुशींत प्रवेश करिता झाला. पण भगवंताच्या कुशींत पुनः शिरलेला तो चांगला निश्चयवान् होऊन ' हें स्वप्नदर्शन आहे ' असें न जाणतां पुनः तसाच फिरूं लागला. तो पूर्वीप्रमाणेंच पृथ्वीवर फिरत सुटला, आणि भूतळीं व अंतरिक्षांत त्यानें पवित्र पुण्यतीर्थें पाहिलीं. उत्तम दक्षिणा देऊन संपविलेल्या यज्ञांनीं परमेश्वराचें पूजन करणाऱ्या शेंकडों याज्ञिय ब्राह्मणांना त्यानें देवाच्या कुशींत असलेले पाहिले. सदाच-

रणाचा आश्रय करून राहिलेले ब्राह्मणादि सर्व वर्णांचे लोक व शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें उत्तम प्रकारें आचरण करणारे चारही आश्रम त्यानें पाहिले. याप्रकारें तो मार्कंडेयमुनि लक्ष वर्षेंपर्यंत सर्व पृथ्वीवर फिरत राहिला; तथापि त्यास त्यास त्या कुशीचा अंत आढळला नाहीं.

नंतर पुनः एकदां तो केव्हां तरी त्याच्या मुखांतून बाहेर पडला, तों त्याला वटवृक्षाच्या शाखेवर एक मूल निजलेलें आढळलें. ज्याचा अंतर्भाग हिमानें आच्छादिला आहे अशा एकार्णव जलांतील सर्वभूतरहित व अव्यक्त म्हणूनच भयंकर लोकांत त्या सूर्यासारख्या तेजस्वी बालकाजवळ जाण्यास, तो पुनः आश्चर्यानें चकित झालेला व कुतूहलवान मुनि समर्थ झाला नाहीं. म्हणून, देवमायेनें शंकित होऊन तो जलाजवळ एकांतांत बसून विचार करूं लागला कीं, 'हें मीं पूर्वीं पाहिलेलें नाहीं.' अगाध व स्तब्ध जलांत बुडी मारणारा मार्कंडेय मुनि श्रमानें त्रस्त व व्याकुळ झाला व त्यास तेथें शांति मिळेना. तेव्हां योगसामर्थ्यानें बालत्वास प्राप्त झालेला भगवान् हंस पुरुषोत्तम मेघासारख्या ( गंभीर ) स्वरानें त्यास बोलला. (श्रीभगवान् ह्मणाले:) हे मार्कंडेय मुने, हे वत्सा, तूं भिऊं नकोस. येथेंच मजजवळ ये. हे धीरा, तूं श्रमानें पीडिलेला बालक आहेस. मार्कंडेय ह्मणाले, माझें वय अनेक सहस्र वर्षें असतांना माझ्या तपाचा पराभव करीत व वयाची अशी अवज्ञा[1] करीत मला नांवानें कोण हांका मारीत आहे? अशा प्रकारचा माझ्या नांवाचा उल्लेख देवांमध्येंही माझ्या कानीं पडला नाहीं. तो विश्वेश्वर ब्रह्माही मला दीर्घायुषी असें म्हणतो. असें असतां, आपल्या जीविताची आशा सोडून हा कोण बेरें तपानें मस्तक घोर झालेल्या ( तपोवृद्ध झालेल्या ) मला 'मार्कंडेया' अशी एकेरी हांक मारून मृत्यूला गांठण्याची इच्छा करीत आहे?

वैशंपायन सांगतात:—या प्रकारें तो महामुनि मार्कंडेय रागानें बोलल्यानंतर, क्रोधपरायण अशा त्यास भगवान् पुनः म्हणाले:— अरे बाळा, मी तुझा जनक, हृषीकेश, पिता, गुरु, आयुर्दाता, व फार जुनाट आहें. असें असतां मजजवळ तूं कां येत नाहींस? पूर्वीं पुत्राची इच्छा करणाऱ्या तुझ्या पित्या अंगिरा मुनीनें तीव्र तपाचा आश्रय करून प्रथम माझी आराधना केली. नंतर मीं घोर मस्तकयुक्त, अग्नीसारखा तेजस्वी, मला अति प्रिय, अमर्याद आयुष्यमान् व महर्षि—अशा तुला पुत्र म्हणून त्यास समर्पण केलें. यास्तव जो मद्रूप झालेला नाहीं असा दुसरा कोणीही एकार्णवांत योगधर्मानें खेळत असलेल्या मला पाहण्यास समर्थ होत नाहीं.

प्रभूचे हे शब्द ऐकतांच प्रसन्नमुख व आश्चर्यानें नेत्र प्रफुल्लित झालेला असा तो महातपस्वी, दीर्घायुषी, व लोकपूजित मार्कंडेय मुनि, आपलें नांव व गोत्र ऐकून, मस्तकाच्या ठाईं हात जोडून, प्रभूला मस्तकानें नमस्कार करिता झाला.

मार्कंडेय म्हणतात:—हे निष्पापा, ही तुझी माया तत्त्वतः जाणण्याची मी इच्छा करितों. कारण, तूं एकार्णवांत बाळरूप धारण करून निजतोस. हे निष्पाप भगवन्, तुझें नांव काय? व तुला लोक काय समजतात? तूं महद्भूत आहेस असा मीं तर्क करितों. पण येथें कोणतेंही भूत नाहीं.

श्रीभगवान् सांगतात:—मी नारायण ब्रह्मा ( सृष्टिकर्ता ) आहें. मी सर्व शरीरवान्

[1] त्याला 'बालक' म्हणणें ही अवज्ञा.

प्राण्यांचा जन्मदाता आहें. मीं सर्व भूतें उत्पन्न करणारा व तसेंच त्यांचा नाश करून टाकणाराही आहें. मीच इंद्रपदावर इंद्र होऊन बसतों; ऋतूंचा वत्सर ( ह्मणजे ऋतूंनीं बनलेलें वर्ष ) मीच, युगांचा आवर्त मीच; मीच सर्व प्राणी व सर्व देव आहें. नागांमध्यें मीं शेष आहें व सर्व पक्ष्यांमध्यें मी गरुड आहें. मीच सहस्र शीर्षांनीं व सहस्र पादांनीं वेष्टित आहें. आदित्य, यज्ञपुरुष, यज्ञमय देव, मख, हव्य वाहून नेणारा अग्नि, महासागर, व न ढळणारा असा मीच आहें. या पृथ्वीवर तपानें पुनीत झालेल्या ब्रह्मणश्रेष्ठांमध्यें बहुत जन्मांपासून ज्यांनीं आपल्या चित्ताचा निरोध केला आहे अशा ब्राह्मणांसच यति म्हणतात. असा ज्ञानवान् विश्वात्म्यास पाहिलेला, व योग्यांमध्यें योगिश्रेष्ठ ( ब्राह्मण मीं आहें. ) मीं सर्व भूतांचा कालसंज्ञक अंतक आहें. मी कर्म, क्रिया, जीव,सर्वांस धर्म दाखविणारा, निष्क्रिय, सर्व भूतांमधील स्वात्मज्योति, प्रधान, पुरुष, आद्य, अक्षय व अव्यय देव आहें. सर्व आश्रमांत राहणाऱ्या लोकांचा धर्म व तप मी, हयग्रीव देव मी, महासागरांतील क्षीरसागर मी, वाचिक व मानसिक परम सत्य मी, व मुख्य प्रजापति मींच आहें. मींच सांख्य, योग व तें श्रेष्ठपद आहें. मीच पूज्य, शंकरस्वरूपी व विद्यांचा अधिपति आहें. मीच ज्योति, वायु, भूमि, आकाश, पाणी, समुद्र, नक्षत्रें, दाही दिशा, वर्ष, चंद्र, पाऊस सूर्य, क्षीरसागर, समुद्र व वडवाग्नि आहें. मींच प्रलयकाळीं संवर्तक अग्नि होऊन जलप्राशन करणारा सूर्य, अतिशय पुराण व श्रेष्ठपरायण ( आश्रयस्थान ) आहें. मीच भूत, वर्तमान व भावि पदार्थांस कारणीभूत आहें. तूं या जगांत जें कांहीं पाहातोस, ऐकतोस, किंवा अनुभवतोस तें तें सर्व माझें स्वरूप आहे. हे मार्कंडेया, हें विश्व पूर्वीं मींच उत्पन्न केलें, व आतांहि मीच निर्माण करितों, पहा. व प्रत्येक युगांत हें अखिल जग मीच निर्माण करीन. म्हणून, हे मार्कंडेया, या सर्वांचा तूं नीट विचार कर. व ऐकण्याची ( किंवा माझी सेवा करण्याची ) व धर्मप्राप्तीची इच्छा असेल तर माझ्या कुशींत शिरून सुखी हो. ब्रह्म, सर्व देव व ऋषि हे सर्व माझ्या शरीरांतच आहेत. मी व्यक्त असूनही अव्यक्त व पराजित न होणारा आहें असें समज. मीच 'अ' हें अक्षर, व त्र्यक्षरी मंत्र ( ॐकार ) सर्व प्रकारें आहें. त्रिपदा गायत्री मी आहें. मीच धर्म, अर्थ व काम या तीन पुरुषार्थांचें निदर्शन आहे. ( म्ह० हे तीन पुरुषार्थ मजकडेच उद्देश्य म्हणून बोट दाखवितात. )

वैशंपायन सांगतातः—या प्रकारें महामुनि व्यासांनीं पुराणें व वेदांतशास्त्रें[१] यांत सांगितलेलें आहे. असो.

नंतर लवकरच ( नारायणानें ) विश्वरूप धारण करून, तोंड पसरून मार्कंडेय महामुनीस उदरांत प्रविष्ट केलें. तेव्हां तो श्रेष्ठ मुनि भगवंताच्या कुशींत शिरून, अव्यय हंसाची सेवा करीत राहिला. व त्यामुळें तो सुखी होऊन रममाण झाला. तो हंसनामक देव अमर व विविध शरीरांचा आश्रय करून, त्या चंद्र व सूर्यरहित महार्णवांत हळुहळु संचार करून पृथिव्यादिकांचा जय करीत करीत पुढें कालाचा फेरा येतांच अविद्यालेशानें समाधिच्छेद होतांच हें विविध भौतिक जगत् निर्माण करितो.

---

१ येथें 'वेदांते' या पदानें व्यासाचा ब्रह्मसूत्रें - दिष्ट असावींत असें वाटतें. व्यासाचें दुसरें एकादें 'वेदांतशास्त्र' असल्याची कोठें प्रसिद्धि नाहीं.

## अध्याय अकरावा.

—:०:—

### सृष्ट्युत्पत्ति.

वैशंपायन सांगतातः—तो विभु आपव ( वसिष्ठ ) महर्षि होऊन व आपला कुंभांतून उत्पन्न झालेला देह आपल्या स्वतःच्या स्वरूपानें आच्छादित करून ( समष्ट्यभिमानानें व्यापून) तप चालू करिता झाला. नंतर तो अति बलाढ्य महात्मा विश्वरूप होऊन, लोकांच्या व पंचमहाभूतांच्या उत्पत्तीविषयीं विचार करूं लागला. हें जग आकाशरहित, सूक्ष्म व जलमय झालें असतां, तो ( वसिष्ठ महर्षि ) तपानें अहंकाराचें उत्थान करून विचार करूं लागला. नंतर जलांत राहून तो समुद्र थोडासा खवळवूं लागला. (मी ईश्वर आहें असें समजूं लागला) नंतर तो ईश्वर दुसऱ्या ऊर्मीनें सूक्ष्म आकाशसंज्ञक छिद्र झाला. तेथें शब्दगति होऊन, मारुतद्रवापासून उत्पन्न झालेला तो अक्षोभ्य वारा अवकाश मिळतांच वाढूं लागला. वाढत असलेल्या त्या प्रबळ वाऱ्यानें तो समुद्र खवळविला; त्यामुळें एकमेकांच्या वेगानें एकमेकांवर आदळणाऱ्या लाटांनीं ( तो समुद्र ) घुसळिला. त्या क्षुब्ध झालेल्या महार्णवांत याप्रकारें पाण्याची घुसळाघुसळ चालली असतां त्यांतून कृष्णवर्त्मा व ज्वालावान् प्रभु वैश्वानर [ अग्नि ] उत्पन्न झाला. नंतर त्या अग्नीनें पुष्कळ पाणी शोषून टाकिलें. समुद्राचा क्षय झाला असतां तें छिद्र आकाशरूपानें व्यक्त झालें. आत्मतेजापासून उत्पन्न झालेलें तें पुण्यजल अमृततुल्य मधुर होतें. याप्रमाणें आकाश छिद्रापासून उत्पन्न झालें, वायु आकाशापासून उत्पन्न झाला. जलांच्या संघर्षणानें त्यापासून अग्नि उत्पन्न झाला. नंतर महाभूतांच्या कारणाची भावना करणारा तो देव त्यांकडे पाहून प्रीतियुक्त झाला. याप्रकारें महाभूतांकडे पाहून लोकांची सृष्टि, त्यांचें प्रयोजन व तत्त्व हीं जाणणाऱ्या बहुरूपी भगवंतानें, चतुर्युगादि प्रमाणानें हजार युगांचा फेरा संपला असतां, ब्रह्मदेवाच्या उत्पत्तीविषयीं विचार केला. पृथ्वीच्या ठायीं तपानें पुनीत झालेल्या उत्तम ब्राह्मणांपैकीं अनेक जन्मांपासून जो आपल्या चित्ताचा निरोध करितो, तो ब्राह्मण चांगला यति होतो. तो ज्ञानी, विश्वरूप पाहिलेला व योगिश्रेष्ठ असतो. अशा योगवान् व संपूर्ण ऐश्वर्य आणि पराक्रम यांनीं युक्त असलेल्या आत्म्यास, योगवेत्ता परमेश्वर ब्रह्मपदावर विश्वाधिपत्याचे ठायीं नेमतो. नंतर त्या महाजलांत अच्युत हरि व तैजस ( ब्रह्मा ) निजत व खेळत नानाप्रकारें आनंद पावूं लागले. तेव्हां हरीनें आपल्या नाभींतून एक कमळ ( ब्रह्मांडरूपी ) उत्पन्न केलें. त्यास हजार दळें ( सहस्रावधि भोगभूमि ) असून तें निर्मळ, सूर्यासारखें व हिरण्मय ( मनोहर ) होतें. त्याची प्रभा अग्नीच्या उज्ज्वळ ज्वालांप्रमाणें होती, त्याला सुंदर वास येत होता, शरत्कालच्या विमल सूर्याप्रमाणें त्याची कांति होती. सारांश, उत्कृष्ट तेजाचें तें कमळ त्या महात्म्याच्या अंगावरील रोमाप्रमाणें खासें शोभिवंत दिसूं लागलें.

१ ब्रह्मवेत्ता ब्रह्मरूपच आहे हें विशेष स्पष्टपणे सांगण्याकरितां ब्रह्मर्षि आपवापासून अहंकारादि सर्व सृष्टीची उत्पत्ति दाखविली आहे, असें चतुर्धर म्हणतो.

# अध्याय बारावा.

—:०:—

## पिंडब्रह्मांडैक्य.

वैशंपायन म्हणतातः—नंतर ( आपव जगदात्मा ) त्या योगवेत्त्यांतील श्रेष्ठ, सर्व भूतांचा मनोमय ( सूत्रात्मस्वरूप ), सर्व भूतांचा उत्पादक व सर्वतोमुख, अशा ब्रह्मदेवाला त्या हिरण्मय, अनेक योजनें विस्ताराच्या, सर्व प्रकारच्या तेजोगुणांनीं भरलेल्या व पार्थिव लक्षणांनीं युक्त अशा कमलांत ( नियुक्त करितो. ) त्या पद्मास पुराणवेत्ते महर्षि नारायणाच्या अंगापासून उत्पन्न झालेलें व पृथ्वीचे ठिकाणीं ( देहाचे आंत ) वाढणारें असें म्हणतात. जी पद्मासना देवी ( म्हणजे या हृत्कमलाला अधारभूत जो देह ) तीच पृथ्वी होय असेंही म्हणतात. जे या पद्मगर्भांतील दृढ अंकुर ( देहांतील अस्थि ) त्यांस दिव्य पर्वत समजतात. हिमवान्, मेरु, निषध, नील, कैलास, मंदर व पर्वतश्रेष्ठ उदयगिरि, व विंध्यपर्वत—हे सर्व उपभोगांच्या साधनांनीं युक्त पर्वत, देवगणांचे, सिद्धांचे व पुण्यशील महात्म्यांचे आश्रम होत. यांच्यामधील देशास जंबुद्वीप ( कर्मभूमि ) असें म्हणतात. यज्ञिय देशाची इच्छा करणाऱ्या ब्राह्मणांनीं जंबुद्वीपाचें संख्यान या प्रकारें केलें आहे. ( पद्माच्या ) गर्भांतून जें देवांच्या अमृतरसाप्रमाणें मधुर असलेलें पाणी स्रवतें, तेंच दिव्य तीर्थरूपी शेंकडों कटाक्ष असलेल्या दिव्य नद्या म्हणून सांगितलेलें आहे. पद्माचीं हीं जीं चोहोंकडे केसरें आहेत, तीं पृथ्वींतील असंख्यात धातुमय पर्वत होत. हे राजा, त्या कमलाच्या ज्या अनेक ऊर्ध्वमुख पाकळ्या त्याच दुर्गम पर्वतांनीं भरलेले म्लेंच्छदेश होत. त्याच्या ज्या अधोमुख पाकळ्या त्याच महात्म्या दैत्यांच्या व सर्पांच्या निवासाकरितां भागशः कल्पिलेलें पाताळ होय. त्याच्या खालीं असलेला उदक नांवाचा जो कमलचा अधोभाग त्यांत महापातकें करणारे लोक बुडतात. पद्माच्या अगदीं खालच्या टोंकाशीं जें पृथ्वीला आधारभूत जल आहे तेंच मोठें एकार्णवजल होय. त्या जलनिधींसच चार दिशांचे चार सागर असें म्हणतात. नारायणऋषीची ही महाकमलाची उत्पत्ति आहे. यास्तव या प्रादुर्भावासही ‘ पुष्करप्रादुर्भाव ’ असें म्हणतात. याचकरितां तत्वज्ञ, यज्ञपरायण व वेदार्थ जाणणाऱ्या पुराण परमर्षींनीं यज्ञांत ‘ पद्मचिती[१] ’ केली आहे. याप्रमाणें त्या भगवंतानें त्या कमलामध्यें विश्वाचा, पर्वतांचा, नद्यांचा व देवतांचा परम अवधि निर्मिलेला[२] आहे. असो. अप्रतिम प्रभावयुक्त, प्रभाकर, महात्मा, भगवान्, प्रभु, स्वयंभु देव स्वतःच्या शयनकाळीं महासागरांत जगन्मय असंख्य कमलांची रास उत्पन्न करितां झाला.

१ गताध्यायीं अहंकारादि सृष्टि सांगितल्यावर. बाह्य व आंतरसृष्टि या उभय सृष्टींत वास्तविक भेद लेशमात्रही नाहीं, हें उघड करून दाखविण्याकरितां व्यासमुनि प्रकृत अध्यायीं नाभिगत कमलाचें वैभव ( व्याप्ति ) वर्णन करितात, असें चतुर्धर म्हणतो.

२ या रूपकानें पिंडब्रह्मांडाचें ऐक्य बोधित करण्याचा हेतु समजावा.

१ विटांचें पद्माकृति चयन, ते हृत्कमलाचें प्रतीक समजून त्या आकाराचें केलें असतें, हा भाव.

२ सृष्टिकर्त्याच्या हृत्कमलाचे ठायीं प्रथम सर्व सृष्टि संकल्पित होऊन मग स्थूलरूपानें बाहेर आविर्भूत होते म्हणून.

## अध्याय तेरावा.

—:०:—

### मधुकैटभवरप्रदान.

वैशंपायन सांगतातः—सहस्र युगांचा फेरा संपून पुढल्या चौकडीचा आरंभ झाला असतां तमोगुणांत उत्पन्न झालेला मधु नामक महासुर विघ्नरूप झाला. याचाच दुसरा सोबती रजोगुणांत कैटभ नांवाचा असुर उत्पन्न झाला. ते कामरूपी रजस्तमोगुणविशिष्ट राक्षस या प्रकारें उत्पन्न झाले. त्या महासुरांनीं एकार्णवांतील सर्व जल क्षुब्ध केलें. काळें ( तामस ) व तांबडें ( राजस ) वस्त्र धारण केलेले, पांढऱ्या, उज्ज्वल व उग्र दाढांचे, किरीट व मुकुट यांनीं श्रेष्ठ, केयूर व कडें यांनीं शोभिवंत, विकार पावलेल्या मोठाल्या लाल डोळ्यांचे, पुष्ट छातीचे, महाभुज, मोठाल्या शरीरांचे व डोक्याचे, ते दोघे राक्षस जणूं काय चालते बोलते पर्वतच होते. निळ्या मेघांप्रमाणें त्यांच्या शरीरांचा वर्ण होता; त्यांचीं मुखें सूर्यासारखीं तेजस्वी होतीं. विद्युद्युक्त मेघांप्रमाणें लाल हातांमुळें ते अतिशय भयंकर दिसत होते. पायांच्या चालण्यानें व वेगानें ते जणूं काय महासागर उडवीतच आहेत कीं काय असें वाटे; त्या योगें शत्रूंचा नाश करणाऱ्या व निजलेल्या हरीला जणूं ते हालवीतच आहेत ( असें दिसलें. ) ते दोघेजण त्या पुष्करामध्यें चोहोंकडे विहार करीत असतां त्यांनीं तेजस्वी शरीराचा, योगिश्रेष्ठ, उत्तम, जो नारायण त्याच्या आज्ञेनें सर्व प्रजा निर्माण करीत असलेल्या अशा ( ब्रह्मदेवाला ), सर्व दैवतांना, व मानसपुत्र ऋषींनाही पाहिलें. नंतर ते दोघे मदोन्मत्त, युद्ध करण्यास उत्सुक, क्रुद्ध व रागानें डोळे लाल झालेले असुर ब्रह्मदेवास म्हणालेः—कमलांत असलेला, शुभ्र ( सत्वगुणयुक्त ) शिरोवेष्टन धारण करणारा व चतुर्मुख असा तूं कोण ? आम्हांला मुळींच न मोजतां तूं निर्भयपणें राहिला आहेस. हे कमलोद्भवा, ये, आमच्याशीं बाहुयुद्ध कर. अनिवार अशा आमच्यापुढें युद्धांत उभें राहणें ( कोणासही ) शक्य नाहीं. तूं कोण ? तुला कोणीं उत्पन्न केलें ? कोणीं तुला या कामीं नेमिलें ? ( तुला ) उत्पन्न करणारा कोण ? ( तुझा ) सांभाळ करणारा कोण ? व त्यास काय नांवानें हांका मारितात ? ब्रह्मा ह्मणालाः—लोकांमध्यें ज्यास क ( ब्रह्मा ) म्हणतात, व जो हजारों उपायांनींही जाणला जात नाहीं त्या ( ईश्वरा ) पासून उत्पन्न झालेला, व योगवान् अशाला ( मला ) तुम्हीं जाणत नाहीं काय ? मधुकैटभ ह्मणाले बा महामते, आम्हां उभयतांपेक्षां या जगांत श्रेष्ठ असें कांहीं नाहीं. आम्हीं रज व तम या गुणांनीं सर्व विश्व आच्छादून सोडतों. यतींना दुःख देणारे आम्हीं रजस्तमोगुणरूप आहों. धर्मशीलांना आम्हीं छळतों; व सर्व देहधारी प्राण्यांस आम्हीं दुस्तर आहों. प्रत्येक युगीं आम्हींच प्रबल होऊन लोकांस मोहित करितों. आम्हींच दोघे अर्थ, काम, यज्ञ व ( स्त्री-पुत्र-धनादि ) सर्व परिग्रह आहों. जेथें सुख, विषयानंद, संपत्ति, कामजन्यतृप्ति व या सर्वांकरितां प्राण्यांस जें जें इष्ट आहे तें तें सर्व आम्हीं आहों, हें विचार करून जाण.

ब्रह्मा ह्मणालाः—योगवानांत जें श्रेष्ठ, व

१ प्रस्तुत अध्यायांत मधु व कैटभ नावाचे दैत्य विष्णूनें मारिले असें सांगितलें आहे. परंतु हें रूपक आहे. मधु व कैटभ ह्मणजे खरे दैत्य नसून तमोगुण व रजोगुण यांपासून उत्पन्न होणारे लय व विक्षेप नावाचे योगांतील अडथळे होत आणि विष्णूनें त्यांना मारणें ह्मणजे सत्वाचे उत्कर्षानें ते नाहींसे करून टाकणें, एवढाच या आख्यानांतला भावार्थ समजावा असें चतुर्धराचें म्हणणें.

जें मीं पूर्वी सांचविलें होतें, तें सर्व एकत्र करून गुणवान् झालेला मी सत्व गुणांत प्रतिष्ठित झालेला आहें. जो योगयुक्तांना परम श्रेष्ठ, जो न क्षरणारें सत्वरूप, जो रज व तमालाही उत्पन्न करणारा, जो सर्व जीवांना कारणीभूत, ज्याच्यापासून सर्व भूतें–सात्विक व इतर–निर्माण झालीं, तोच वशी तुम्हांस युद्धांत शमविण्यास योग्य आहे. ( हें माझें काम नव्हे. )

वैशंपायन सांगतात:—नंतर, निजलेल्या व अनेक योजनें विस्तृत असलेल्या त्या श्रीमान् पद्मनाभ हृषीकेशास ते दोघे नमन करून ह्मणाले:–तूं सर्व विश्वाचा उत्पादक व पुरुषोत्तम आहेस, हे आम्हांला माहीत आहे. तुझ्या उपासनेकरितां आमचा हा सारा प्रयत्न आहे. तूं ईश्वर सफलदर्शन व सत्य आहेस, असें ज्या अर्थी ज्ञानी तुला जाणतात, त्या अर्थी, हे देवा, आम्हीं दोघे तुला सर्वत: जाणण्याची इच्छा करितों. यास्तव, हे शत्रुदमना, तुजकडून वर मिळविण्याची आम्हीं दोघेजण इच्छा करीत आहों. देवा, तुझें दर्शन फुकट न जाणारें आहे. न जिंकलेल्यांसहि जिंकणाऱ्या तुला आमचा नमस्कार असो.

श्रीभगवान् ह्मणाले:—हे असुरसत्तमहो, तुह्मांस कोणते वर पाहिजेत हें लवकर सांगा. मीं तुम्हांला दीर्घायुष्य दिलें असतांही, आणखी आपण अधिक जगण्याची इच्छा करितां ( हें आश्चर्य होय. ) म्हणून, हे महाबलाढ्यांनो, ज्याकरितां तुमचा हा यत्न आहे तें तुम्हांस मिळो; पण तुम्हीं ( मला ) वध्य व्हाल, असें हरि त्या दोघांस म्हणाला. ते दोघेही महात्मे ऊर्जित व क्षतरहित होते. मधुकैटभ ह्मणाला:—हे विभो, ज्या ठिकाणीं आजपर्यंत कोणीही मेलेला नाहीं, तेथें आमचा वध व्हावा, व सुराधिपा, आम्हीं तुझे पुत्र व्हावें, अशी आमची इच्छा आहे. श्रीभगवान् ह्मणाले:—बरें, येत्या कल्पांत तुम्हीं माझे उत्तम पुत्र व्हाल, यांत शंका नाहीं. हें मीं तुम्हांला सत्य सांगतों.

वैशंपायन सांगतात:—याप्रमाणें त्या दोघां महासुरांस वर देऊन तो सनातन, विश्वनाशक, महातेजस्वी, देवशत्रूंचा संहर्ता देव, रजस्तमोगुणांनीं मव व भावन यांच्यासारिखे असलेल्या त्या दोघांस आपल्या मांड्याखालीं चिरडून टाकिता झाला.

## अध्याय चौदावा.

—:०:—

### ब्रह्मदेवकृत ( योगीकृत ) सृष्टि.

वैशंपायन सांगतात[१]:–नंतर ब्रह्मवेत्त्यांतील श्रेष्ठ व महाबाहु ब्रह्मा हात वर करून (ऊर्ध्वस्थित असलेल्या प्रणवाचें आलंबन करून) घोर तप करीत त्या कमलांत राहिला. जळत असल्याप्रमाणें तेजस्वी, स्वत:च्या प्रकाशानें अंध:कार नाहींसा करणारा व योगधर्मस्थ असा तो सहस्रकिरण सूर्याप्रमाणें भासला. नंतर आपले स्वत:चे दोन विभाग करून दुसरें रूप धारण करून, तो कल्याण करणारा, अव्यय, अचिंत्यात्मा व सनातन नारायण, महातेजस्वी व यशस्वी योगाचार्यही ( म्हणजे

१ येथें व्यंकटेश्वर पाठ 'मयार्चितं' असा आहे. बांईकरांचा 'पूर्वमयाचितम्' असा आहे व त्याचा अर्थ त्यांनीं 'जें पूर्वी अयाचित' असा केला आहे. पण याचा अर्थबोध आह्मास होत नाहीं' 'अयाचित' तें कसें? आमचा पाठ 'पूर्वमयाचितम्।' असा आहे. व तोच आह्मास समंजस वाटतो. कलकत्तापाठही असाच आहे, पण मन्मथनाथानें चितंचा अर्थ ज्ञातं ' असा केला आहे. आह्मांस 'संभृतं' असा करणें योग्य वाटलें.

१ प्रस्तुत अध्यायांत समाधिव्युत्थानकालीं अनुभवास येणारी भूर्भुवरादि व विराट्, हिरण्यगर्भ, ईश्वररूपी सृष्टीचें वर्णन आहे.

चित्तनिग्रही[1]) झाला व महाबुद्धिमान् ब्राह्मणश्रेष्ठ कपिल नांवाचा उपपत्तिप्रधान असा सांख्याचार्यही ( म्हणजे विचार ) झाला. हे दोघेही देवर्षींकडून स्तविले गेले. हे दोघेही योगयुक्त, चांगले ब्रह्मवेत्ते, महात्मे, उर्जितावस्था पावलेले व क्षेत्रांचा[2] (शरीराचा) विचार करणारे होते. पर आणि अपर ( म्ह० कारण व कार्य ) यांचा विशेष जाणणारे व श्रेष्ठ ऋषींकडून पूजिले गेलेले ते दोघे ( ऋषी ) अमिततेजस्वी ब्रह्मदेवापाशीं येऊन म्हणाले:— हे ब्रह्मदेवा, तूं ( प्राण्यांच्या ) बाहुल्यामुळें सत्य[3] प्रकृतीचा, विश्वाचा आत्मा, जगाच्या राहटीला कारणीभूत, सर्व लोकसमूहाचा नेता व सर्व लोकांचा श्रेष्ठ गुरु आहेस. त्या दोघांचें तें वचन ऐकून ब्रह्मदेवानें भूः इत्यादि तीन व्याहृतींचा जप करून, ब्रह्मप्रतिपादक श्रुतींत[4] सांगितल्याप्रमाणेंच या तीन लोकांस निर्मिलें. नंतर त्या प्रभूनें[5] भूः संज्ञक अव्यय मानसपुत्रासही उत्पन्न केलें, त्यानंतर ब्रह्मदेवाचा त्याच्यावर मोठा स्नेह जडला. तो मानसपुत्र ब्रह्मदेवाच्या पुढें येऊन त्यास म्हणालाः—मी कोणतें साहाय्य करूं तें आपण मला सांगावें. ब्रह्मा म्हणाला, 'हे महामते, हा कपिल नांवाचा ब्रह्मा व नारायण, हे दोघे तुला जें सांगतील तें तूं कर. वैशंपायन सांगतात, ब्रह्मदेवानें याप्रमाणें सांगतांच आपल्या पित्याहूनही श्रेष्ठ असे इतके हे दोघे कोण म्हणावे अशा संशयांत पडून मनाशीं विस्मय करीत तो पुनः त्यांच्या जवळ जाऊन हात जोडून विचारूं लागला कीं, मी आपली सेवा करूं इच्छितों; तर आपलें काय काम करूं? तेव्हां कपिल व नारायणरूपी परमेश्वर म्हणाले, जें अठरा[1] प्रकारचें त्रिकालाबाधित व परिणामहीन ब्रह्म आहे, त्या सत्य व अमृत म्हणजे चिदेकरसमय ब्रह्माचें सतत अनुसंधान कर. वैशंपायन म्हणतात, हें त्यांचें वचन ऐकून तो उत्तर दिशेस गेला. (चिदेक रसरूप अंतिम अवस्थेस पोंचला.) तेथें गेल्यानंतर तो ज्ञानदृष्टीनें ब्रह्मत्वास प्राप्त झाला. नंतर उदार प्रभु ब्रह्मदेवानें ( अविद्योपाधियुक्त ईश्वरानें ) पुनः संकल्प करून मनानेंच दुसरा भुंवः नामक पुत्र ( सूत्रात्मा ) उत्पन्न केला. नंतर तो देखील ब्रह्मदेवास 'मी काय करूं' असें विचारिता झाला. पितामहानें आज्ञा केल्यानंतर तो पुनः ब्रह्मच्याकडे ( नारायणाकडे ) आला. तेव्हां त्या ( नारायण व कपिल ) दोघांच्या उपदेशानें तो पुनः भगवत्संबंधीं स्थितीला पोंचला. त्यांच्याजवळ येऊन तो परम पद मिळविता झाला. तोही गेल्यानंतर प्रभूनें मोक्षाच्या उपपत्तीमध्यें कुशल अशा तिसऱ्या शुद्ध सत्वोपाधियुक्त मानसपुत्रास उत्पन्न केलें. त्यास भुर्भुवः म्हणतात. त्यानें त्यांच्याच धर्माचा अंगीकार करून तो त्यांच्याच गतीला गेला.

१ देवहूतीचा पुत्र सेश्वरसांख्यमतवादी.

२ 'इदं शरीरं कौंतेय क्षेत्रमित्यभिधीयते.। भगवद्गीता.

३ नीलकंठ म्हणतो कीं, यांत योगाचार्य म्हणतो बंधमोक्षाची व्यवस्था लागण्यासाठीं प्राण्याचे बाहुल्य व प्रकृतीचें सत्यत्व हीं मानणें मला अवश्य वाटतात. सांख्याचार्याचें म्हणणें कीं सर्व एकचेतनमय आहे. आणि कसेंही मानलें तरी 'परमात्माच सर्व लोकांचा नेता आहे व तो बुद्ध्यादि सर्वांचें ज्ञान करून केवळ एकटाच आदरणीय आहे,' या कामीं सांख्याचार्य व योगाचार्य यांचें ऐकमत्य आहे.

४ तेभ्योऽभितप्तेभ्यस्त्रयो वर्णा अजायन्त । अकार उकार मकार इति । श्रुतिः

५ प्रभु म्हणजे योगी व त्याचा हा भूःसंज्ञक पुत्र म्हणजे स्थूलदेहाचे आसंगानें प्राप्त होणारा विराड्भाव आणि नारायण, कपिलांचे उपदेशानें तो मुक्त होणें म्हणजे विचार व चित्तवृत्तिनिरोध यांचे योगानें तो नष्ट होणें. असाच प्रकार पुढील दोन्ही मानसपुत्रांचा समजावा.

१ मतभेदामुळें ज्याचें अष्टादश प्रकारानें प्रतिपादन केलें जातें.

२ विराट्, सूत्रात्मा यांप्रमाणेंच ईश्वरालाही लय आहे.

या प्रकारें हे तीनही पुत्र सांख्ययोगाचार्यरूपी महात्म्या शंभूचे उपदिष्ट हाते. त्याच्या त्या पुत्रांस घेऊन नारायण व यतीश्वर भगवान् कपिल हे आपल्या ( निर्विकल्प ) गतीसे गेले.

पण ते ज्या काळीं मुक्त होऊन गेले त्याच-वेळीं तीक्ष्ण व्रत पाळणारा ब्रह्मा पुनः अतिशय घोर तप करूं लागला ( निर्विकल्प समाधींत गढला. ) नंतर त्या एकट्याच तप करणाऱ्या प्रभु ब्रह्मचास समाधान वाटलें नाहीं; म्हणून त्यानें आपलेंच अर्धशरीर शुभ भार्यारूपानें कल्पिलें. तप, तेज, कांति व नियम यांच्यां योगानें आपल्यासारखी व लोकांची उत्पत्ति करण्यास समर्थ अशी भार्या त्यानें उत्पन्न केली. त्यानंतर तपोमय ब्रह्मा तेथें तिजशीं रममाण होऊं लागला; व तिच्या साह्यानें त्यानें सर्व प्रजापति, सागर व नद्या उत्पन्न केल्या. नंतर त्यानें वेदमाता जी त्रिपदा गायत्री ती निर्माण केली. गायत्रीपासून चार वेद निर्माण केले. आपल्याकरितां त्या पितामहानें लोककर्ते पुत्र निर्माण केले. त्यांच्यापासूनच सर्व प्रजापति व लोक निर्माण झाले. त्यानें प्रथम 'विश्वेश' नांवाच्या महातपस्वी पुत्राला उत्पन्न केलें, नंतर सर्व आश्रमांचे माहेरघर अशा पुण्य 'धर्म' नामक पुत्राला त्यानें उत्पन्न केलें. दक्ष, मरीची, अत्रि पुलस्त्य, पुलह, क्रतु, वसिष्ठ, गौतम, भृगु, आंगिरस हे पुत्र अथर्वभूत महर्षि म्हणून प्रसिद्ध आहेत. यांच्या तेरा कन्या होत्या. व त्यांचे वंश प्रतिष्ठित झाले. अदिति, दिति, दनु, काला, अनायु, सिंहिका, खसा, प्रबोधा, सुरसा, क्रोधा, विनता, कद्रू—या बारा व तशींच सत्तावीस नक्षत्रें या दक्षाच्या ऊर्जित कन्या होत. देव तुझें बरें करो! मरीचीचा पुत्र कश्यप प्रभु हा तपानें निर्मिला गेला. त्यास दक्षानें या बारा कन्या दिल्या. हे जनमेजया, त्या ऋषीनें रोहिणी आदि पुण्य नक्षत्र नांवाच्या कन्या सोमनामक वसूस दिल्या. लक्ष्मी, कीर्ति, साध्य अशी विश्वा, शुभ अशी कामानुगा, व देवी मरुद्वती यांस पूर्वीं ब्रह्मदेवानें उत्पन्न केलें. हे भारता, या श्रेष्ठ पांच कन्या, धर्म ज्यानें प्रत्यक्ष पाहिलेला आहे अशा ब्रह्मदेवानें देवांत श्रेष्ठ असा जो 'धर्म' त्यास दिल्या. जी अर्धशरीरमयी कामरूपिणी ब्रह्मदेवाची पत्नी तीच सुरभी गाय होऊन त्याची सेवा करीत त्याजवळ राहिली. तेव्हां लोकपूजित व लोकोत्पत्तीचें कारण जाणणारा ब्रह्मदेव गायींची प्रजा वाढावी यासाठीं तिच्याशीं मैथुनधर्मानें संगत झाला. तिच्या ठाईं मोठे, धर्मयुक्त, संध्याकाळच्या लाल अभ्रासारखे व अग्नीसारखे तेजस्वी अकरा पुत्र झाले. ते मोठ्यानें रडत व धांवत भगवान् पितामहाकडे गेले. रोदनामुळें व धांवण्यामुळें त्यांस रुद्र असें म्हणतात. निर्ऋति, सर्प, अज, एकपाद, मृगव्याध, पिनाकी, दहन, ईश्वर, भगवान् अहिर्बुध्न्य, अपराजित कपाली व महातेजस्वी सेनानी—हे अकरा रुद्र म्हणवितात. त्याच सुरभीच्या ठाईं गोवृषभ झाला; तसेच नांगरणीवांचून वाढणारे माष ( उडीद, ) सिकता ( रेती, ) प्रश्नी ( ? ) व अक्षता निघाल्या. बकरे, एकवंश, तसेंच उत्तम अमृत, तशाच उत्तम औषधि सुरभीच्या

१ वाईकरांनीं याचा अर्थ: "अशा प्रकारचे हे तीनही पुत्र महात्म्या शंभूचे होते म्हणून सांगितलें आहे" असा केला आहे. तो केवळ शब्दांचा अर्थ झाला. पण त्याला इतिहासाचा बळकटी नाहीं. यास्तव आम्ही नीलकंठाचेंच म्हणणें स्वीकारिलें आहे.

२ म्हणजे काष्ठाला जाळून ज्याप्रमाणें अग्निही आपले योनीचे ठायीं उपशम पावतो त्याचप्रमाणें सांख्ययोगज्ञान हें भूरादिक तिहींना नष्ट करून स्वतःही उपशम पावलें.

१ वंश म्हणजे पाठीचा कणा असा अर्थ होतो, तथापि एकवंश याचा अर्थ नीटसा लक्षांत येत नाहीं.

ठाई झाल्या. धर्मापासून लक्ष्मीजन्य काम झाला; साध्या साध्यांना उत्पन्न करिती झाली. भव, प्रभव, ईशान, सुरभि, अरण्य, मरुत, विश्वावसु, बलध्रुव, महिष, तनूज, विधान, अनघ, मत्सर व विभूति हे सर्व सुरभीचे पुत्र होत. सुपर्वत, वृष व नाग यांस लोकपूजित साध्या जन्म देती झाली. वासवानुगता देवी या पुत्रांस प्रसविती झाली. पहिला धरदेव, दुसरा अव्यय असा ध्रुव, तिसरा विश्वावसु, चौथा सोम (हा) ईश्वर, पांचवा पर्वत, व त्यानंतर योगेंद्र, सातवा वायु व आठवा निर्ऋति वसु— अशा प्रकारचीं अपत्यें धर्मापासून सुरभीच्या ठाई झालीं विश्वेदेव धर्मापासून विश्वेच्या ठायीं झाले अशी श्रुति आहे. महाबाहु सुधर्मा, महाबलाढ्य शंखपा, महाबाहु उक्थ, तसाच वपुष्मान् अनंत व महीरण, हे चाक्षुष मनूपासून झालेले पुत्र होत. विश्वावसु, सुपर्वा, महायशस्वी विष्टर व सूर्यासारखा अतितेजस्वी ऋषिपुत्र रुरु, या विश्वेश्वर अशा विश्वेदेवांना देवमातेनें निर्माण केलें. मरुत्वती शुभ अशा मरुत्वत देवांस प्रसवली. अग्नि, चक्षु, हवि, ज्योति, सावित्र, मित्र, अमर, शरवृष्टि, महाभुज संक्षय, विरज, शुक्र, विश्वावसु, विभावसु, अश्मंत, चित्ररश्मि, तसाच निष्कुपित राजा नहुष, आहुति, चारित्र व बहुपन्नग—(हे ते मरुत्वत्त देव होत.) बृहन्त व शत्रूंस ताप देणारा बृहद्रूप हे दोन शुभपुत्र धर्मापासून मरुत्वतीच्या ठायीं झाले. हे राजन्, कश्यपापासून अदितीच्या ठाई आदित्य झाले. इंद्र, विष्णु भग, त्वष्टा, वरुण, अंश, अर्यमा, रवि, पूषा, मित्र, वरद मनु व पर्जन्य हे बारा आदित्य देवांतील श्रेष्ठ होत. आदित्यास सरस्वतीच्या ठाई दोन शुभपुत्र झाले. एक रूपश्रेष्ठ व दुसरा बलश्रेष्ठ हे दोघेही स्वर्गातील सूपवानांत वरिष्ठ होते. दनूनें दानवांस जन्म दिला, व दिति दैत्यांस प्रसवली. कालेनें अनुकालकेयांस, असुरांस व राक्षसांस जन्म दिला. आधिव्याधि हे अनायुषेचे पुत्र होत. सिंहिका ही ग्रहांची माता होय. मुनि ही ही गंधर्वांचीं जननी होय. प्रबोधेपासून श्रेष्ठ अप्सरा झाल्या. सुरसेच्या ठाई सर्प जन्मले. हे भारता, क्रोधेच्या ठाई सर्व भूतें व पिशाचें, तसेच यक्षगण व गुह्यक उत्पन्न झाले. गाईशिवाय सर्व चतुष्पाद प्राणी सुरभीपासून झाले. अरुण व गरुड हे विनतेच्या ठाई निपजले. पर्वत, सर्प व नाग यांस देवी कद्रूनें जन्म दिला.

याप्रकारें, हे राजन्, त्या महात्म्याच्या पौष्कर प्रादुर्भावामध्यें सर्व लोक परस्पर वृद्धि पावले. हें पौष्करसंबंधीं पुराण मीं द्वैपायनापासून ऐकिलें व त्यांना पूर्वीं परमर्षीनीं जें कथन केलें होतें तेंच त्यांनीं सांगितलें. जो महात्मा हें सर्वोत्कृष्ट पहिलें पुराण न चुकतां पढतो, तो या लोकीं इष्टमनोरथ मिळवून शोकरहित होतो व परलोकींही स्वर्गाचीं फळें भोगतो.

## अध्याय पंधरावा.

—:०:—

### जनमेजयाचा प्रश्न.

जनमेजय ह्मणतोः—हे ब्रह्मन्, मी आमच्या वंशाचें श्रेष्ठ असें मोठें चरित्र ऐकिलें. तें दिव्य, अन्योन्यसंभूत (एकामधून एक निघालेलें) व अनेक गुणांनीं मान्य झालेलें आहे. तें वृत्तांपासून झालेल्या छंदांनीं, सविस्तर समासांनीं, व लहान आणि गोड लागणाऱ्या पदविग्रहांनीं ग्रथित केलेलें आहे. धर्मानें, अर्थानें व भोगी

१ गताध्यायीं जें सांख्य व योग यांचें रहस्य ध्वनित केलें तेंच विस्तृत रूपानें समजून घ्यावें ह्या हेतूनें प्रस्तुत अध्यायांत राजा प्रश्न करितो आहे.

पुरुषांच्या शरीरगत बहुरूपी कामानें—अशा त्रिवर्गानें तें संपन्न आहे. त्या चरित्रांत अनेक ब्राह्मणांचे प्रभाव, योद्धयांचे पराक्रम, वैराचें सूड उगवणें, प्रतिज्ञांची सिद्धि व शत्रूंपासूनही स्तुतीची प्राप्ति हीं दिसून येतात. पण अशांची संतती पुढें राहिली नाहीं; राजांशीं युद्ध केल्यामुळें त्यांचा कलह वंशाच्या विनाशालाच कारणीभूत झाला. जे राजे त्या महा भयंकर युद्धांत मारिले गेले त्यांचीं सर्व राष्ट्रें त्यांच्या मुलांस प्राप्त झालीं. भगवंताच्या आज्ञेप्रमाणें वागणारा धर्म कौरवांचा प्रख्यात राजा झाला. तीन्ही वर्णसंपत्तीचे धर्म बहुत प्रकारें सांगितले. हे ब्राह्मणश्रेष्ठा, शूरांचा जो विख्यात स्वर्गाला कारणीभूत ( क्षात्र ) धर्म तोही सांगितला. भूतांवर अनुग्रह करण्याकरितां, त्यांना उन्मत्त करण्याकरितां नव्हे, चारी वर्णांच्या लोकांचे पृथक् पृथक् धर्म अनेक वेळां सांगितले. गर्भवासांत पडणाऱ्या प्राण्यांस जागें केलें. देवसंचार क्षीण झाला असतां व पुण्यकर्म कमी झालें असतां, प्रश्न करणाऱ्या लोकांस उद्देशून तुम्हीं दोघांनीं मिळून बनविलेला ( ज्ञान– ) दानयोग बहुत प्रकारें तुम्हीं ( व्यास व वैशंपायनांनीं ) केला. त्या तुमच्या वाणीचें वचन मधुर आहे. हे महा ब्रह्मन्, भारताच्या मोठ्या अध्ययनाचें वर्णन, दिव्य दृष्टीनेंही एका दिवसांत करून सांगणें मला शक्य नाहीं. असो. आतां ज्ञानयज्ञांचा विस्तार, संक्षेप व चांगला संग्रह ऐकण्याची मला इच्छा आहे. त्याविषयीं मला मोठें कौतुक वाटत आहे.

१ किंवा ' ब्रह्मदेवाच्या दिवसाचा ' असाही अर्थ होईल.

# अध्याय सोळावा.

—:०:—

## योग्याचें सामर्थ्य.

वैशंपायन सांगतातः—हे राजन्, मी कथा सांगत असतां, पांचही इंद्रियें एकत्र करून निर्विकार मनानें लक्ष देऊन तूं ऐक. हे राजन्, तें ( परम तत्त्व ) ब्रह्मसंबंधानें बांधिलेलें, कर्मांनीं न बांधिलेलें, पूर्वींच ब्रह्मसंपन्न, ब्रह्मापेक्षां ( बिलकुल ) कमी नसलेलें, अव्यक्ताला कारणीभूत, नित्य व सदसदात्मक असें आहे. त्यापासून स्वयंभु निष्कल पुरुष उत्पन्न झाला. तो दिव्य असून आपल्या दिव्य शरीरानें सर्व भूतांचा अधिपति व विभु आहे. तो अचिंत्य व अव्यय असून युगांच्या उत्पत्तीस व लयास कारणीभूत आहे. तो कधीं न झालेला व न जन्मलेला असून सर्वत्र समानपणें आहे. अव्यक्तापासून जी श्रेष्ठ वस्तु झाली ( ती नारायणच होय. ) असें नारायणाला जाणणारे लोक समजतात. तें तत्त्व सर्वतः हात व पाय असलेलें, सर्वतः डोळे, मस्तकें व मुखें असलेलें, सर्वतः कान असलेलें असें असून तें सर्वांस व्यापून राहिलेलें आहे. सत् व असत् या दोहोंचेंही तें कारण आहे असें समजावें. व्यक्त वस्तूंमध्यें असून व्यापार करीत असलें तरी तें अव्यक्त असल्यामुळें दिसत नाहीं. विकारांच्या योगें कांहींसा व्यक्त होणारा तो पुरुष अव्यक्त व अरूपच आहे. तो अचिंत्य पुरुष लांकडांतील अग्नीप्रमाणें, सर्व प्राण्यांमध्यें गुप्त रीतीनें राहून कार्यें करितो. तो मागें होऊन गेलेल्या व पुढें होणाऱ्या गोष्टींचा उद्भव, त्यांचा स्वामी परमेष्ठी, प्रजापति व

१ सांप्रत अध्यायात सांख्ययोगात्मक ब्रह्मयज्ञाचें वर्णन करून तत्काल सिद्धि देणारें जें ब्रह्मविचारात्मक सांख्य ( ज्ञान ) त्याचा व्यासमुनि प्रस्ताव करितात, असें चतुर्धर म्हणतो.

सर्व लोकांचा प्रभु असून त्याचें तत्त्वतः 'अहं' हें नांव पडलें आहे. हा अहंकार अज्ञानापासून उत्पन्न झाला व त्यापासून नारायण उत्पन्न झाला. तो अव्यक्त असूनही लीलेनें ब्रह्मयोगानें ( अधिष्ठानसत्तासंबंधानें ) व्यक्त झालेला आहे. तो ब्रह्माचे ठिकाणींच आहे असें जाण; त्यामुळें त्या समर्थाला ब्रह्मा, हाच शब्द मिळाला आहे. हे भारता, तो स्थावर व जंगम अशा सर्व जगांचा प्रभु 'मी प्रजा उत्पन्न करितों' असें म्हणाला. तो सर्व भूतांचें कारण असून या सर्व प्रजा त्याचीच संतति किंवा विस्तार आहे. स्वभावानें सर्व कांहीं उत्पन्न होतें, व स्वभावानेंच सर्व कांहीं झालें. स्वभावानेंच अहंकार व हें सर्व जग उत्पन्न झालें. तो सर्वव्यापी, निरालंब, अग्राह्य, जयवान्, नित्य व ब्रह्ममय ज्योतिःस्वरूप असून 'ब्रह्म' शब्दानें उल्लेखिला जातो. स्वभावतः अव्यक्त असला तरी पांच सूक्ष्म भूतांच्या व संकल्पमात्र भावांच्या योगानें तो व्यक्ततेस आला व त्वरेनें ब्रह्मानें चिंतिलेलीं नाना व्यक्त स्वरूपें धारण करूं लागला.

या प्रकारें मूर्तित्व पावून, स्वभावें करून ब्रह्मानें प्रेरित असा तो ब्रह्मा पाणी उत्पन्न करिता झाला; व त्या योगें हें सर्व जग व्यापलेलें आहे. पूर्वीं वायु निर्माण करून तो सृष्टिकर्त्यांतील उत्तम सृष्टिकर्ता, सृष्टीच्या धारणेमुळें लोकांनीं योजिलेल्या 'धातृ' संज्ञेस मिळविता झाला. तें हें सर्व जग पूर्वीं वायूपासून निर्माण झालें. हें समुद्रामध्यें असलेलें जग पहिल्यापासूनच देवांनीं आपल्या स्वाधीन करून घेतलें. पृथ्वी ( शब्द ) उत्पन्न करण्याच्या इच्छेनें समुद्राचे जलाजलाला त्यानें पृथक् केलें. घनत्व [ पृथ्वीचें ] व द्रवत्व [ जलाचें ] या भिन्न धर्मांवरून पृथ्वी व जल यांचा भिन्नपणा सर्वांच्या अनुभवास येतो. कार्यरूप असल्यामुळें [ कारणरूप जलांत ] लीन होणारी जलोद्भव [ भूदेवता ] आसपासचा भाग व्यापून टाकीत असल्याप्रमाणें शुभ वाणी उच्चारिती झाली. मी वर उभी राहण्याची इच्छा करीत आहें; मीं गंभीर अशा जलाच्या विवरांत विरघळत आहें. मी घन [ होत ] असल्यामुळें माझा अंतर्भाग अतिशय क्षुब्ध होत आहे. यास्तव माझा उद्धार कर. [ मला वर काढ ] तदनंतर स्थानाची इच्छा करणारी व सर्व भूतांस वाढविणारी मूर्तिमती पृथ्वी यथा योग्यपणें उत्पन्न झाली. तिचें तें ओरडणें व चांगली वाणी ऐकून [ नारायणानें ] वराहरूप घेऊन महासागरांत उडी घातली. पाण्यांतून पृथ्वी वर काढण्याचें फार कठिण काम करून तो समाधींत लीन झाला व त्यामुळें तो कोणास दिसेनासा झाला. तें 'आकाश' संज्ञक ब्रह्ममय तेज त्यांत सर्व लोकांचा पितामह ब्रह्मा उत्पन्न झाला. अद्यापि त्या सर्वयोगी धात्याकडून हें मनानें धारण केलें जातें. प्रजांचें हित करण्याच्या इच्छेनें सूक्ष्म ज्ञानयोगानें तो हें धारण करितो. आपल्या किरणांनीं जणूं काय जाळीत असलेला सूर्य पृथ्वीचा मध्य फोडून उत्पत्ति पावला व नंतर वर गेला. त्याच्या मंडळामधून सोममंडळ निघालें. तो सनातनापासून निघालेला ब्रह्मा सौम्य अशा सोमत्वाप्रत प्राप्त झाला. सोममंडलाच्या टोंकापासून वायु निघाला; तो अक्षरमय [ वेदमय ] ज्योति होऊन तिला स्वतेजानें वाढवूं लागला. तो ब्रह्मसंभव असल्यामुळें स्वभावेंच उत्पन्न झालेला, सनातन व दिव्य असा पुरुष उत्पन्न करितो.

सारांश, द्रवरूप जल होतें तीच घनरूप पृथ्वी झाली व छिद्र जें होतें तें आकाश झालें. ज्योति होती तीच चक्षुरिंद्रिय झाली.

१ ही गोष्ट भूगर्भशास्त्राला धरून आहे.

[ भूतांच्या ] संघातानें ज्योतीपासून झालेला [ हा देह ] वायूच्या योगानें स्फुरण पावतो. पुरुषामुळेंच पंचभूतमय असा मोठा पुरुषपणा यास प्राप्त झालेला आहे. त्या त्या शरीरांत सनातन असा भूतात्मा समानपणें आहे. शरीरांतील [ बुद्धिरूप ] गुहेंत ज्ञान सांठविलेलें आहे. योगानेंच सनातन असा यज्ञपुरुष [ नारायण ] प्राप्त होतो. देहवंतांच्या देहांत जो अग्नि आहे तो सूर्याचेंच स्वरूप होय. तो नित्य धातूंनीं युक्त अशा शरीरामध्यें संमत होऊन राहिलेला आहे. स्वभावानें तो क्षय पावतो, स्वभावानें तो भय पावतो, स्वभावानें त्यास शांति मिळते व कदाचित् मिळतही नाहीं. इंद्रियांनीं अतिमूढ झालें आहे ज्याचें मन असा तो ब्रह्मपदाविषयीं मोहित होऊन आपल्या कर्मांनीं जन्ममरण पावतो. जेथपर्यंत त्यास ब्रह्माचा विषय यथातत्त्व कळत नाहीं तेथपर्यंत तो संसारांत पुनःपुनः जन्मास येतो. जेव्हां तो योगज्ञ होऊन इंद्रियांपासून वेगळा होतो, तेव्हां त्यास ब्रह्मत्व प्राप्त होऊन तो स्वरूपानंदांत प्रतिष्ठित होतो. या निषिद्ध अशा [ विषयानंदमय ] लोकाचा [ त्याग करून ] तो ब्रह्मवान् [ निर्विकल्पपदारूढ ] होतो. तो रागादिकांच्या योगें क्षीण होत नाहीं व तो कोठेंही आसक्त होत नाहीं. परम सिद्धि पावलेला तो सर्वज्ञ भूतांचे येणें, जाणें, मरण व जन्म हे सर्व जाणतो. कर्म संपण्याच्या पूर्वीं दृष्टिगोचर अशा विषयांच्या ठायीं आत्म्याच्या गति कशा होतात हें तो ब्रह्मपदीं प्रतिष्ठित झालेला [ सिद्ध ] जाणतो. वायूनें तरंग उत्पन्न होऊन भिन्न झालेल्या समुद्राप्रमाणें, वाढलेल्या लोभानें खवळलेल्या चित्ताच्या गांठी [ वृत्ति ] व पूर्वीच्या वासना मनानें निरुद्ध कराव्या. ज्ञानदृष्टीनें [ कामादिक ] शत्रूंपासून निरुद्ध केलें असतां मलिन हृदय परिपक्क होतें व मग वेदांत सांगितल्याप्रमाणें आत्मा देहाच्या बंधनापासून मुक्त होतो. मग तो आपल्या विद्येनें दुसऱ्या लोकाला उत्पन्नही करील अगर एकाद्याचा नाशही करील. अथवा तेजोमूर्तीप्रमाणें तो एखादा अखंड लोकही येथें निर्माण करील. मग तो ब्रह्मनिष्ठ अशा आपल्या मनानें, नियमांप्रमाणें असलेल्या कर्मांनीं, तिर्यग्योनींमध्यें पडलेल्या जीवांनाही मुक्त करील. योगकर्माचे ठायीं क्षर व अक्षर असें दोन्ही प्रकारचें फळ व्यापून आहे; पण जेथें कर्मांनीं निश्चयेंकरून ब्रह्मच प्राप्त होतें तेथें क्षर [ नाशिवंत ] फळ प्राप्त होत नाहीं.

१ म्ह० कर्मवशात्.

## अध्याय सतरावा.

—:०:—

### योगविधि व निष्कामकर्मफल.

वैशंपायन सांगतात:—वारुणाच्या सूर्यानें पृथ्वीमध्यें जें छिद्र केलें होतें त्यांत स्वभावतःच घडलेला मैनाक ( दुःखरहित ) पर्वत ठेवला गेला. पर्वें ( म्हणजे कामना पूर्ण करणारे चिंतामणि, कामधेनु, कल्पद्रुमादिक पदार्थ ) तेथें असतात म्हणून त्यास 'पर्वत' ही संज्ञा मिळते. तो अचल ( म्हणजे न हालणारा ) असतो म्हणून त्यास अचल म्हणतात; परंतु

१ या गोष्टीचे सत्यतेविषयीं संशय वाटेल त्यांनीं पातंजल योगदर्शन यातील विभूतिपाद वाचावा.

२ विनाशि व अविनाशि अशीं उभ्याविध फळें योगबलानें मिळूं शकतात; पण अविनाशि फल पाहिजे असेल तर नाशिवंताचे ( सिद्धीचे ) नादीं लागतां कामा नये—हा भाव.

३ सांप्रत अध्यायांत कर्मफलाचा परिच्छेद करण्याकरितां म्हणून योगभूचें वर्णन करून अक्षरप्राप्त्यर्थ यथाविधि योगाचें वर्णन केलें आहे, असें चतुर्धर म्हणतो.

स्वभावतः ( कल्पनामात्रत्वानें ) तो मेरूचें होय. त्या पर्वताच्या अति विस्तृत पृष्ठभागीं ज्योतीपासून उत्पन्न झालेला व्यक्त ( हस्तपादादियुक्त ) व महाऋद्धिमान् पुरुष राहातो. त्या परमात्म्यानेंच वस्तुधर्माप्रमाणेंच त्यास घडविलें आहे. तें जें ब्रह्ममय तेज आहे तें मस्तकाचे आंत ( सहस्रदल कमलांत ) ठेविलेलें आहे. त्याचेंच तें दीप्त, पुरुषाकृति व ज्योतिर्मय रूप होय. तेजानें जळत असल्याप्रमाणें तें तोंडांतून निघालें. तें चारमुखें यांनीं युक्त होतें. ( चतुर्मुख ब्रह्मारूपी होतें ) व चार उत्तम द्विजेंहि त्यासमवेत होते. त्याचें मुख हेंच ब्रह्म ह्मणजे वेद ह्यांचे निःश्वासरूपानें उद्भवस्थान होय. आणि त्या ब्रह्माला ह्मणजे वेदाला जे धारण करितात ते ब्राह्मण ह्मणावे व अशा वेदधारकांत ब्रह्मदेव हा मुख्य असल्यामुळें त्याला ब्राह्मणपुंगव ( श्रेष्ठ ) असें ह्मणतात. वेद व ब्राह्मण याची उत्पत्ति केली तेव्हां त्या कारणानें तें महद्भूत पुनरपि पूज्यत्वास प्राप्त झालें. पूर्वी त्यानें जलाशयांतून पृथ्वीदेवीचा उद्धार केला. ब्रह्माच्या स्थानास ( मेरुपृष्ठास ) येऊन तेंच तेज ब्रह्मत्वाप्रत ( चतुर्मुखत्वाप्रत ) आलें; तसेंच तें मूळ अव्यक्त असतांहि ( पृथ्वीचा उद्धार करिते वेळीं ) व्यक्ततेस आलें. तेव्हां पदसंधीमध्यें ( भ्रूसंधींत ) मेरूचें शृंग ब्रह्मलोक ( ब्रह्मसाक्षात्काराचें ह्म० क्रममुक्तीचें स्थान ) झालें. तें शृंग शेंकडों व सहस्रावधि योजनें उंच होतें. असाच याच्या चौपट त्याचा विस्तार होता. अथवा त्याची लांबी, रुंदी वगैरे कोणत्याही प्राण्यास दिव्यदृष्टीनें देखील अनेक हजार वर्षांनींही मोजतां येणें शक्य नाहीं. शिलांनी व्याप्त असलेल्या त्या पर्वताच्या चार बाजूंचा विस्तार, हे राजेंद्रा, शेंकडों योजनें विस्तीर्ण होता. ब्रह्मवेत्यांनीं त्याच्या सदैव ब्रह्मनिष्ठ, योगयुक्त व नित्यसिद्ध अशा विस्ताराचें परिमाण वर दिलेल्याच्याही कोटि कोटिपट ( अनंतपट ) आहे असें निश्चित केलें आहे. देवेंद्रासह मरुत्, रुद्र, तसेच वसु, विश्वेदेवासह आदित्य यांसह सर्व पृथ्वीपतीचें ( शरीराभिमानी जीवांचें ) तो भगवान् ( शुद्धचिदात्मा ) पितामहाच्या स्वरूपानें ( मायोपाधिक रूपानें ) रक्षण करिता झाला. हे राजन्, सूर्य व वरुण ( तेज व जल ) यां योगें संघात प्राप्त झालेल्या पृथ्वीचें ( तेजोबन्नलक्षणात्मक प्रकृतीचें ) तो विष्णूसह रक्षण करूं लागला. हे भारता, ब्रह्मापासून प्राप्त झालेल्या अशा त्या ब्राह्मशरीरानेंच हें केलें. तें विष्णुमय तेज सर्वत्र समानत्वास प्राप्त झालें. अनेक नियमांनीं युक्त, सत्यव्रतपरायण व वेदपारग अशा ब्राह्मणांनी यालाच ' ब्रह्म ' असें म्हटलेलें आहे.

१ ' मेरु ' शब्दाचा येथें नीलकंठानीं ' मित एव ' म्हणजे ज्याचे ठिकाणीं आत्यंतिक दुःख निवृत्तिही किंवा आत्यंतिक सुखप्राप्तीही नाहीं. दोन्हीही मित म्हणजे मोजक्याच आहेत अशी स्थिति असा अर्थ केला आहे.

२ येथें ' मुखादिन्द्रश्चाग्निश्च ' ' ब्राह्मणोस्य मुखमासीत् ' इत्यादि ऋचा देऊन—इंद्र, अग्नि, ब्राह्मण व प्राण हे विराट पुरुषाचे मुखापासून निघालेले चार द्विजश्रेष्ठ समजावे, असे चतुर्धर म्हणतो.

३ येथे ' महदभूत ' याचा अर्थ मन्मथनाथाने " पंचमहाभूते जन्मास आली " असा केला आहे. परंतु तो चूक आहे. परमात्म्याला महदभूत म्हणतात. ' इदं महदभूत मनंतमपारं ' ( श्रुति ) ' एको विष्णुर्महद्भूतं ' हीं वाक्ये ध्यानात आणावी. व ' अस्य महतो भूतस्य निःश्वसितं ऋग्वेदो, यजुर्वेदः सामवेदः ' इ० हे पहावे.

१ १ धर्म. २ ज्ञान. ३ वैराग्य व ४ ऐश्वर्य. हे योगसिद्धीला शिलेप्रमाणे बळकट टेका देणार असल्यामुळे येथे हे रूपक केले आहे.

२ कारण माया ही अनंत असल्यामुळे मायाधीन हें दृश्यही अनंत असणार.

३ भोग मोक्षप्रद ज्ञानाचा उपदेश करून.

याप्रकारें हे तिन्ही लोक ( विराट्, सूत्रात्मा व अंतर्यामी ) ब्रह्मदेवाच्या दिवसांत ( ब्रह्म-प्रापक योग यज्ञांत ) समाहित आहेत. (अनु-भवास येतात. ) ब्रह्माचा दिवस असतां, अव्यक्त असें ब्रह्म प्राणरूप उपाधींत प्रतिष्ठित होऊन ( अहं ) याप्रकारें जीवरूपानें व्यक्त होतें.[1] ईश्वरानें आपल्या वेदरूपी समर्थ वाणीनें नेमून दिलेलें कर्म शुद्ध चित्ताचे व कधींही असत्याचरण न करणारे अशा लोकांकडून भक्तीनें सतत चालविलें गेलें ह्मणजे वेदपारग ब्राह्मण त्यासच ‘ हित ’ असें म्हणतात. जो ब्रह्माचा एक चतुर्थांश भाग ( विश्वरूपानें ) दृष्टिगोचर होत आहे, त्या ( ब्रह्म- ) भूता-त्म्यास सत्यव्रतपरायण ब्राह्मणांनीं, आपल्या अनेक भक्तिभावांमुळें ( इंद्र, मित्र, वरुण इ० ) अनेक नांवें दिलेलीं आहेत व या नांवांचा ते यज्ञांत फार उपयोग करितात. स्थूल विश्व-रूप, व सूक्ष्म मनोरूप हीं उभयहीं एका बुद्धीचींच रूपें आहेत, हें जाणून तो भगवान् प्रथम स्त्रीपुरुषात्मक जोडपें उत्पन्न करिता झाला. परंतु, हें जोडपें देखील त्या एक-ट्याचेंच द्विधा नटलेलें रूप असल्यामुळें तो विश्वरूपी सनातन भगवान् ब्रह्मा, देवीच्या बरोबर ( आपल्या स्त्रीरूपाबरोबर ) विपुल भोग भोगून, कश्यपादि अनुयायांसह (कर्माचें) आचरण करितो. तो हा भगवान् ब्रह्मा दारि-द्र्यमार्गाची इच्छा करणाऱ्या व निर्वाण पदास जाणाऱ्या ब्रह्मवेत्त्यांत श्रेष्ठ आहे. ( स्वर्गांतून पडणारी ) जलधारा हेंच ज्याचें स्वरूप आहे अशा सोमापासून[4] ह्म० ब्रह्मविद्येनें युक्त अशा परमेश्वरापासून, सोम ह्म० चंद्र उत्पन्न झाला. त्या धारेनें महेश्वराला भूतांच्या आधिपत्याचे ठाईं अभिषेक केला. भूतेशाला अभिषेक करून व स्वभावतःच तें महेश्वराला भूताधिपत्य देण्याचें कर्म करून ती धारा वारंवार नाद करूं लागली; त्यामुळें तीस नदी असें म्हणूं लागले. पूज्य ब्रह्मलोकाचा हजार वेळां पराभव करून ( पर्वतादिक फोडून ) ती देवी गंगा आकाशांतून पृथ्वीवर आली व सात फांटयांनीं पसरली. हे राजेंद्रा, ती सहस्र वेळां व अनेक वेळां पुनः पुनः पसरते. व चंद्र हा अविद्यासंभव लोक व परलोक यांस पुष्ट करितो. त्या योगानें सर्व प्राणी ह्मणजे महाभूतांपासून झालेलीं फळेंच तीं वाढतात; व तेणेंकरून मनोजयी विद्वानांच्या सर्व क्रियांचे आरंभ सुरू होतात. ब्रह्मदेवाच्या चार मुखकमलांपासून निघालेली अक्षरमयी ( वेदमयी ) सिद्धि उपदेशरूप झाली. त्याचें ज्ञानमय पुण्य (ब्रह्मा, उद्गाता, होता व अध्वर्यु ) या चार पादांनीं युक्त (यज्ञरूप) असून सना-तन आहे. तथापि ब्रह्मदेव जो पितामह किंवा शुद्ध ब्रह्म तोच त्याच्या स्वामित्वाचे ठायीं आहे. धर्माचे ( चार आश्रमरूपी ) चार पाद आहेत; त्यांनीं ह्या जगाचें धारण होतें. व्यक्त अशा वेदाध्ययनरूपी व ध्यानरूपी ब्रह्म-चर्यानें त्याचा एक पाद होतो. पवित्र अशा गृहस्थाश्रमानें दुसरा, गुरुविषयींच्या श्रद्धेनें युक्त अशा वानप्रस्था श्रमानें तिसरा व तद्वाक्य श्रवणानें, व ( तत्त्वमस्यादि ) गूढ विषयांत शिरण्यानें व गूढ अशा आत्मतत्त्वाचे प्रतिपादक अशा सन्यासाश्रमानें चौथा पाद होतो. या प्रकारें धर्माचे चार पाद असून ते

१ शुद्धब्रह्मच जीवरूपानें संसारांत रहाटत असते.

२ पादोऽस्य विश्वाभूतानि. पुरुषसुक्त.

३ एकं सद्विप्रा बहुधा विदन्ति. श्रुति.

४ उमया=ब्रह्मविद्यया सहितः=सोमः

१ नदति गर्जति म्हणजे शब्द करिते, खळाळते म्हणून तीस नदी म्हणते.

२ सप्तगोदावरी या शब्दावरून ही गंगा म्हणजे गोदावरी असावी असे चतुर्धर म्हणतो. आम्हाला हे कांहींच उकलत नाहीं.

ऐहिक व पारलौकिक सुखप्राप्त्यर्थ ईश्वरानें प्रवृत्त केलेले आहेत. न्यायानें व योगादि गूढ धर्मांच्या आचरणानें मंडलामध्यें सोम वाढतो. ब्राह्मणांनीं ब्राह्माचे आचरण केल्यानेंच वेद शाश्वतपणें राहातात. गृहस्थांनींही योगाचा संग्रह केल्यास पितरांना आनंद होतो. ऋषी धर्माच्या योगेंच पर्वतांच्या शिखरांवर राहातात. भ्रूघ्राणमध्याचे ठायीं लक्ष लावून व पायांनीं वृषणांस दाबून ह्म० सिद्धासन घालून त्या ऋषींकडून चिंतन केलें जातें. मान आंखडून ( हनुवटी फांसळीमधील खळींत लावून ) पुढून छाति उठून येईल अशा प्रकारें मागून पाठ दाबून हंसत असल्याप्रमाणें ह्मणजे दांतांस दांत न भिडत इतपत तोंड उघडें ठेवून व नाभिदेशाच्या ठाई दोन्हीं हात ठेवून आणि मस्तकाचे ठाई ब्रह्माचा न्यास करून चोहोंकडून अंगांचा ( इंद्रियांचा ) प्रत्याहार करावा. योगेश्वराच्या योगानें ह्म० ( प्राणनिरोधानें ) पितामहानें पूर्वीं मनानेंच हें विश्व उत्पन्न केलें प्रत्याहार केल्यामुळें ज्याचीं इंद्रियें विषयांपासून व्यावृत्त झालीं असला योगी विष्णु ह्मणजे व्यापक होतो. बिंबापासून प्रतिबिंब उठल्याप्रमाणें किंवा आकाशांत उदय पावलेल्या चंद्राप्रमाणें, तेजोमूर्ति धारण करून तो देव ( प्रकाशमान ) होतो. तो योगी ब्रह्मभावाचे प्राप्तीमुळें दुसऱ्या सूर्याप्रमाणें शोभूं लागतो. तो हृदयाकाशांतील अतुल चैतन्य ज्योतींच्या प्रभांच्या योगें विराजमान होतो. परंतु, क्रियेच्या निमित्तानें नियम्य व नियामक याप्रमाणें दोन रूपें धारण करणारें शाश्वत ब्रह्म जरी प्रत्यक्ष ललाटामध्यें स्थिर आहे तरी तें मूर्खांस मिळत नाहीं. अध्यात्मविषयामध्यें रत असलेले लोक बुद्धिपूर्वक यत्न केल्यानें चंद्र ( इडा ) व सूर्य ( पिंगलानाडी ) यांचे संगमस्थानीं असणारें तेज जें पुढें नेत्रांतील ज्योतीरूपानें व्यक्त होतें. तें धारणेचा विषय करूं शकतात. सत्यव्रतपरायण व वेदवेत्ते ब्राह्मणच ही ज्योति पाहातात. दुसरे ही ( ज्योत ) पाहूं शकत नाहींतः त्यांना अध्यात्मविषयच उमगत नाहीं, मग आत्मसाक्षात्काराचें नांवच नको. या भूलोकीं भूतांचा निग्रहानुग्रह करण्यास समर्थ असलेलेही कोणी योगी, अणिमादि सिद्धि प्राप्त झाल्या असतां त्यांच्या ऐश्वर्यांतच त्यांचें चित्त माहोस प्राप्त होऊन ते अयोगात्मा ( योगहीन ) होतात, व अशाप्रकारें योगास प्राप्त होऊनही स्वानंदापासून च्युत झालेल्या त्या

---

१ याचा अर्थ, 'मन' हें योगबलानें व्यक्तिगत अभिमान सोडून समष्ट्यभिमान धारण करतें म्हणजे त्यास विश्वव्यापकता आल्यानें तें वृद्धि पावतें, असा चतुर्धर करितो.

२ असा मूळपदाचा सामान्यतः अर्थ होतो. पण मूळांतील 'वर्तति' या पदाचा अर्थ 'निवर्तते, बाध्यन्ते' असा करून चतुर्धर एकूण अर्थ असा करितो कीं, 'प्रथम मनुष्य जरी वेदांपासूनच अध्यात्मज्ञान प्राप्त करून घेतो, तथापि तें प्राप्त झाल्यावर त्याला वेदांचें महत्त्व न उरल्यानें त्याला वेदही निरुपयोगी किंवा तुच्छ होतात.' ठीक आहे. विद्यारण्यांचें असेंच म्हणणें आहे कीं, 'हातीं धान्यकण लागल्यावर जसें वरील फोल फेकून देतात, तशीच गति ज्ञानोत्तर कालीं तत्प्रापक ग्रंथांची होते किंवा व्हावी.'

३ पुढच्या वर्णनावरून येथें 'पर्वताचे शिखरावर' याचा अर्थ 'मेरुदंडाच्या वरील ब्रह्मरंध्रांत समाधिस्थ होऊन' असाच आहे हें कळून येईल. मन्मथनाथाचा हा अध्याय येथेंच समाप्त आहे. व पुढील दोन अध्याय ( १७—१८ ) मुळींच दिले नाहींत.

---

१ याच प्रकारें प्राकृत लोक प्राणायाम साधून भ्रूघ्राणमध्याचे ठिकाणीं धारणा करतील तर त्यांसही असलें ऐश्वर्य प्राप्त होईल.

२ हें जीवचैतन्य जोंपर्यंत देहांत कोंडलें आहे तोंपर्यंत त्याची व्याप्ति मर्यादित असते; परंतु, योगबलानें त्याला देहाचे बाहेर पसरण्याची कला साधली कीं, तें विश्वव्यापि होतें.

पुरुषास तीं ऐश्वर्यें सर्व प्राणभक्षक अशा आपल्या हिंसायोगानें पराभूत करितात ( सर्वांप्रमाणेंच त्यालाही आपल्या तावडींत आणून त्याचा नाश करितात. ) नंतर सर्व प्राण्यांची हिंसा करूं इच्छिणाऱ्या लोकांच्या कुत्सित कर्मांशीं योग घडून तीं आपल्या ठाईं जडतात. (म्हणून योगसिद्धींस न भुलतां ) मोक्षप्राप्तीच्या हेतूनें स्थिरमनानें चंद्रमंडलाच्या स्थानापासून (निघून) चंद्राचें जें महत्तेज हृदयांत आहे तेथें शिरून गायत्रीच्या नयनामध्यें ( सगुण ब्रह्माचें प्रकाशक जें ज्योति त्या ज्योतीमध्यें ) स्थिर व्हावें. अंतर्हित किंवा अव्यक्त पुरुषात्मक तेजाचा आविर्भाव ( अकार, उकार, मकार, अर्धमात्रा ) अशा चार प्रकारें होतो. तो चैतन्यरूप, इंद्रियादिकांना अगोचर, शाश्वत, निश्चित कूटस्थ व ( ह्मणून ) अव्यय असा आहे. तो रूपादि इंद्रिय गुणांनीं युक्त नसून सुखदुःखादि तेजोगुणांनीं युक्त आहे. त्याची कांति चंद्राच्या किरणांप्रमाणें स्वच्छ असून तो तेजस्वी ( सद्रूपानें स्फुरणारा ) व वर्णांत राहिलेला ( ह्म० देहांतर्गत ) आहे. तो देव दोन नेत्रांपासून यजुर्वेदासह ऋग्वेद उत्पन्न करितो. त्याच्या जिव्हाग्रापासून सामवेद व मस्तकापासून अथर्ववेद झाला. व्यक्त होतांच ते वेद आपापल्या उपाधीस प्राप्त होतात; ते तत्पदास विंदंति ह्म० प्राप्त होतात म्हणून त्यांस ' वेदत्व ' प्राप्त झालें. नंतर ते वेद अगोदर सनातन ब्रह्म प्रकाशित करून नंतर हे चारी वेद मिळून आपापल्या स्वभावभूत मनोरथांनीं दिव्यरूपाच्या पुरुषास निर्माण करितात. अथर्वणाचा जो योग तें यज्ञाचें मस्तक म्हणून म्हटलें आहे. मान व दोन्ही बाहूंमधील प्रदेश हा ऋग्वेदाचा भाग होय. हृदय व कुशी हा सामवेदाचा भाग होय. बस्तीचा वरचा भाग, कटिप्रदेश, जांघा, मांड्या, व पाय हा यजुर्वेदाचा भाग होय. या प्रकारें यज्ञकल्पित भाग आहेत. हा दिव्यरूपाचा पुरुष अमरपदापासून उत्पन्न झाला. तो वेदमय यज्ञ सर्वही प्राण्यांस उभयलोकीं सुखप्रद आहे. कारण तो सनातन योगयज्ञ हिंसारहित आहे. कर्मसाध्य व सनातन योगारंभ ब्रह्मचर्यांत स्थित आहे. ( ब्रह्मचर्याचा त्यास मुख्य आधार आहे ) सर्व भूतांच्या उत्पत्तिरूप ( योगाला ) जो प्राप्त होतो [ जाणतो ] तो वेदवेत्ता होय. सर्व कर्मांपासून मुक्त झालेल्या व वेदपारग अशा मुनींकडून या लोकीं तो सिद्ध म्हणविला जातो. ती त्याची सिद्धिच आहे यांत शंका नाहीं. वेद व उपनिषदें यांनीं प्राप्य अशा पदाच्या प्राप्तीविषयीं नियमांनीं श्रांत झालेले व वेदपारग ब्राह्मण यज्ञ हाच विष्णु प्रापक आहे असें म्हणतात.

जनमेजय विचारतोः—स्वेच्छेनें जें आपणच आपलें नियमन किंवा निग्रह करणारें तें मन प्रसंगीं समाधींत लीन झालें असतां ( मुरून नाहींसें झालें असतां) पुनरपि उदित कसें होतें, व त्याचें कारण काय हें मी ऐकूं इच्छितों. हे मुने, जसें तुला माहीत असेल तसें तें मला सांग.

१ ' पुरुषं कृष्ण पिंगलं ' वगैरे. हें हृदयस्थ पुरुषाच वर्णन आहे. किंवा लोहित, शुक्ल, कृष्ण या वर्णांनीं संकेतित जीं तेजोवन्न त्यांचा परिणाम जो हा देह तदंतर्गत असा.

२ विश्व तैजसरूपानें नेत्रांस गम्यमान् असल्यामुळें ' नेत्रांपासून ' उत्पत्ति वर्णिली.

३ ' प्राज्ञ ' हा शब्दमात्रानें ज्ञात होणारा असल्यानें ' जिव्हाग्रा ' पासून झालें आहे.

४ हा तुर्यरूप असल्यानें ' मस्तका ' पासून असें समजावें.

१ येथें योगाचे ' सबीज ' व ' निर्बीज ' असे दोन भेद सांगून पहिल्याचीं, १ वितर्क. २ विचार. ३ आनंद व ४ स्मित हीं चार रूपें देऊन तीं क्रमानें १ ऋग्वेद. २ यजुर्वेद. ३ सामवेद. ४ अथर्ववेद. व १ स्थूल. २ सूक्ष्म. ३ कारण. ४ महाकारण. यांचीं द्योतक आहेत असें चतुर्धर म्हणतो.

वैशंपायन सांगतातः—हे भारता, ह्याचें (चित्ताचें) पुनरुदयाचें कांहीं बाह्य म्ह० शारीर कारण नसतें; हे राजन्, याचें कारण मानसच म्ह० अंतर्गतच असतें. शरीरानें केलेलें जें कर्म मनाचे ठिकाणीं संस्काररूपानें स्थित असतें तें समाधींत लीन झालेल्या मनाला पुनः खेंचून मागें आणितें. ज्या ( चैतन्यानें ) मनुष्यें व व्रतें पाळणारे ब्राह्मण वेद्य ( जाणल्या पाहिजेत अशा ) वस्तू जाणतात, त्यानेंच न कळणाऱ्याही वस्तूही जाणणें शक्य आहे; कर्मानें नाहीं. विनीत, सदा ब्रह्मसेवक व सदा तत्त्व जाणलेल्या ब्राह्मणानें, हे राजन्, सिद्धि मिळविण्यासाठीं, सदा पवित्र व ब्रह्मकर्मानें नियत राहून हात जोडून गुरूजवळ शुश्रूषेसाठीं उभें राहावें. त्या तत्त्वज्ञानें सकाळ संध्याकाळ मोक्षोपयोगी कर्में करावींत. ब्रह्मभावानें गर्वहीन व समाधियुक्त होऊन त्या मुनीनें मनानें उत्तम अशा विष्णुपदाचें ध्यान करून तें प्रसन्न चित्तानें मिळवावें. पुनर्जन्म कोणत्या कारणांनीं येत नाहीं हें जाणणारा व चित्ताचें बंधन कोठेंही नसल्यामुळें ममताशून्य झालेला साधक निर्विकार चित्तानें परम श्रेष्ठ अशा ब्रह्मास पोंचतो. त्यालाच अक्षर असें म्हणत असून हेंच तें सनातन ब्रह्म होय. विष्णुपदाच्या ठाईं लीन, सर्व प्रकारच्या द्रव्यांनीं रहित व सकाम कर्माची निंदा करणारे असे जे ब्राह्मण त्यांना ( निष्काम ) कर्मयोग व विद्यायोग यांनीं त्याचा ( ब्रह्माचा ) साक्षात्कार होतो. हे राजा, प्रत्येक कर्मांत मनानें संकल्पद्वारें फळाचें ग्रहण न केल्यामुळें, पुनर्जन्मरहितांचे लोक निष्काम कर्मयोगांतच प्रतिष्ठित आहेत. निष्काम कर्मानेंच त्यांना मोक्ष प्राप्त होतो. फळाचें ग्रहण न केल्यानें तो मुक्त होतो. हे राजन्, पूर्वसंस्कारांनींच प्राण्यांना ब्राह्मणापासून निष्काम कर्माची गुरुकिल्ली मिळते. इंद्रियबंधनापासून मुक्त होऊन परम पदास जाऊन पोंचला असतां प्राणी पुनरपि मनुष्यदेहास येत नाहीं.

## अध्याय अठरावा.

—:•:—

### समाधी सिद्ध होण्याचे वेळचीं लक्षणें.

जनमेजय विचारतोः—ज्याच्या योगानें पुनः मनुष्यशरीर प्राप्त होत नाहीं तें ध्येय पद, योग व त्याचा उपसर्ग ( विघ्नें ) मला सांगा.

वैशंपायन सांगतातः—ब्रह्मादि योग्यांस अनेक प्रकारें प्राप्त होणाऱ्या योगोपसर्गादिकांविषयीं तूं जें विचारीत आहेस, तें सर्व श्रद्धायुक्त चित्तानें सविस्तरपणें ऐक.[1]

हे राजन्, पांच इंद्रियांत असणाऱ्या पांच सिद्धींचे ( दूरश्रवण, दूरदर्शन इ० ) गुण[2] सोडून योगयुक्त मनानें ब्रह्माचें दर्शन घेणाऱ्या व सनातन ब्रह्मयज्ञ करून ब्रह्माचें चिंतन करणाऱ्या पुरुषास, संपूर्ण ऐश्वर्य ( वैराग्याचें ) नसल्यामुळें, अनेक प्रकारचीं विघ्नें उद्भवतात. पांच ज्ञानेंद्रियसमूह, नऊ द्वारें, काम, क्रोध व लोभ यांचा जरी निश्चयात्मक बुद्धीनें चांगला निरोध केला तरी, ( भिंवया व घ्राण यांच्यामध्यें असलेल्या ) तेजाच्या ठाईं चित्ताचा योग केला असतां भयंकर धूर धुमसत असलेला दिसतो. निळ्या, तांबड्या, पिंवळ्या, पांढऱ्या इत्यादि रंगांच्या धातूंच्या योगें मंजिष्ठा-

१ यात राजानें तसतसे प्रश्न केल्यावरून योगमार्गांत येणारीं विघ्नें, आसनापासून धारणेपर्यंतचीं योगांगें व ब्रह्मसाक्षात्कार होण्याचे पूर्वी दिसणारीं 'तुषार, धूम्र, सूर्य, अग्नि, वायु, खद्योत, विद्युत्, स्फटिक, चंद्र इत्यादिकांचीं रूपें, यांचें वर्णन केलें आहे असे चतुर्धर म्हणतो.

२ या सिद्धि आजकालही अल्प श्रमानें विशेष योगाभ्यासावांचून सामान्य जनांसही साधणाऱ्या आहेत व यांचा अनुभव अमेरिकेंत देखील किलेक अभ्यासी लोक घेत आहेत. पण या सिद्धींस भुलूं नये अशी आमची शास्त्राज्ञा आहे.

सारखा, पारव्यासारखा, शुद्ध वैडूर्यासारखा, पद्माच्या दळासारखा, स्फटिका मण्यासारखा, नागराजाच्या वर्णासारखा, इंद्रगोपकिड्यांसारखा, चंद्रकिरण व जल यांच्यासारखा, व इंद्रधनुष्यासारखा या प्रकारें अनेक वर्णांनीं युक्त असलेले मोठे धुराचे लोट एकाच वेळीं सर्व बाजूंनीं येत असलेल्या मेघांप्रमाणें दिसतात. पंख[1] असलेल्या पर्वतांप्रमाणें ते जणूं काय आकाश भरून टाकतात, ते धूम्रवर्ण संघात म्हणजे पाणी असलेले मेघच होत. ते जलसमूहास ओकतात व पृथ्वीतळीं प्रवेश करितात. नंतर मस्तकप्रदेशीं मोठा मानस अग्नि पेटतो. श्रेष्ठ योगानें युक्त असा तो प्रभु शेंकडों ज्वालांनीं व्यापिलेला असतो. त्या अग्नीपासून सर्व अवयवांतून शेंकडों व हजारों किटाळें, युगांतींच्या जळजळीत अग्नीप्रमाणें बाहेर पडतात. जितक्या जलवृष्टीच्या धारा तितक्याच अग्नीच्या ज्वाला जलधारांशीं मिळतात. व विपुल पृथ्वीतळावर येऊन पोंचतात. त्यानें दोन वर्णांनीं युक्त होणारा वायु भयंकर वाहूं लागतो. तो दिव्य व सिद्ध गुणांपासून उत्पन्न झालेला व सूक्ष्म प्राण वाढविणारा असतो. तो वेगवान् व भयंकर ध्वनि करणारा बलवान् वायुच प्राणरूपानें गोचर[2] होतो. तो त्याच अग्निसमूहांशीं व धातूंशीं संयोग पावून शेंकडों व हजारों नानाप्रकारच्या आकृति धारण करितो. अग्नि, वायु, जल, भूमि व धातु हे ब्रह्मानें प्रेरित होऊन एकत्र झालेले आहेत; हे राजन्, ते बीजभूत आहेत; ब्रह्मवेगानें ते संघातरूपाला आलेले आहेत. दोन्ही नेत्रांच्या मध्यें असलेलें जें ब्रह्म ( चैतन्य ) तोच सूक्ष्म पुरुष व विराट् होय. त्या दोघांपासून तो पुरुषोत्तम अन्य सूक्ष्म वस्तु निर्माण करितो, तोच भगवान् व्यक्त व अव्यक्त सनातन विष्णु असून तो सर्व विद्यांचा आधार व प्रळयकाळीं प्रळयाचा अंत करणारा आहे. मस्तकाचे ठाईं धातूंच्या योगें बद्ध असलेल्या त्या परमात्म्याच्या ठाईं, ब्रह्मचाच्या प्रेरणेनें सर्व सुखदुःखाचे ज्ञाते पुरुष प्रवेश करितात. याप्रमाणें ब्रह्मसंमित झालेल्या ( योग्याच्या ) मूर्ति चेष्टा करूं लागल्या असतां त्या धरणी देवीस फोडून दाही दिशांस गेल्या. याप्रमाणें सर्व ब्रह्मनिर्मित पार्थिव ऋषि तेथेंच लय पावून भूमित्वाप्रत प्राप्त होतात. कर्मक्षय झाला असल्यास ते कर्मबंधनरूप धातूंपासून मुक्त होतात. इंद्रियांच्या बंधनापासून कर्माचा क्षय[1] न होतां ( प्रळयकाळीं ) जर ते मुक्त होतील, तर तसे मुक्त झाल्यामुळें ते पुनः त्याच प्रकृतीला व अज्ञानाला कर्मगोचर ( फळांमुळें ) प्राप्त होतात. अग्निहोत्रादिकांनीं तेच तपोमय झालेले असले तर क्षरापासून ( मुक्त होऊन ) धूमादि मार्गानें जातील; त्याच्या योगें न तुटलेल्या तंतूप्रमाणें जन्ममरण प्रवृत्त होतें. धूमानें मेघ होतात, मेघांपासून अतिनिर्मळ जळ होतें, जलापासून पृथ्वी झाली, भूमींत जीं फळें उत्पन्न होतात त्यांपासून रस उत्पन्न होतो, त्या रसापासून देहधाऱ्यांचे प्राण उत्पन्न होतात. रस हा प्राणमय असून जें सनातन ब्रह्म आहे ( तद्रूप ) आहे. तपामध्यें श्रम पावलेल्या व सत्यव्रतपरायण अशा ब्राह्मणांनीं पुष्कळ कारणांनीं ब्रह्मच श्रेष्ठ आहे असें ठरविलेलें आहे. तें ब्रह्म स्वतःच्या भावनेनें अव्यक्तापासून व्यक्तत्वास आलेलें आहे, व तें सर्व भूतांच्या ठिकाणीं ज्ञानानें युक्त होऊन

१ रज व तम या गुणांनीं योग्याला नाड्यांमध्येंच असा भास होतो.

२ किंवा ‘ प्राणाला गोचर ’ होतो. म्हणजे प्राणास भासूं लागतो.

१ ‘ कर्मक्षयाद्विमुच्यंते ’ असा पाठ असल्याखेरीज येथें अर्थ लागत नाहीं.

अंतरंगीं कार्य करीत आहे. हे राजेंद्रा, अनेक विषयांमध्यें गुंतलेल्या त्यास कर्मकर्ता असें म्हणतात. तें डोळ्यांना आढळून येत नाहीं. तपानें ज्यांचीं पापें जळून गेलीं आहेत अशा ज्ञानी ब्रह्मवाद्यांना तें ( दिव्य ) चक्षूंनीं आढळून येतें. भुंवयांच्या मधून व्यक्त होणारें तें तत्त्व मेघावरणांपासून सुटलेल्या सूर्याप्रमाणें भासूं लागतें. बा कुरुकुलोत्पन्ना, निर्द्वंद्व व निष्परिग्रह होऊन पक्ष्यांप्रमाणें योगधर्मानें फिरणाऱ्यांसच ह्याचें फळ मिळतें. कर्मयोग जाणणारा ब्रह्मदेव भूतांची उत्पत्ति, क्षय व नाश, व प्रळयकाळानंतर पुन: प्राण्यांच्या कर्माची उत्पत्ति हीं शेंकडों वेळां करितो, यांत शंका नाहीं. धर्माची वाढ होऊन लोकांचा नाश न व्हावा म्हणून असें तो करितो. हजार युगें मिळून झालेलें हें बारा हजारांचें युग ब्रह्मयुग होय; हें युगांपैकीं पहिलें युग होय. हजार युगांच्या अंतीं प्रळयाचाही अंत करणारा संहार होतो. तेव्हां लोकांचें सूक्ष्म, निर्विकार व अचेतन असें स्वरूप बनतें. याप्रकारें प्रळय पावलेलें सनातन व कारणीभूत गुणांनीं निर्मिलेलें सर्व जग सूक्ष्म ब्रह्मस्वरूप होतें.

~~~~~~

## अध्याय एकुणिसावा.

—:०:—

### योग्याचीं राजस–तामस विघ्नें व सिद्धि.

जनमेजय ह्मणतोः—हे महामुने ब्राह्मणा, सर्व प्रकारें सगुण ब्रह्मास पोंचलेल्या योग्याची पहिल्यां दोन ( त्रेता व द्वापर ) युगांतील प्राचीन संतति सविस्तरपणें मी ऐकूं इच्छितों.

वैशंपायन सांगतातः—हे राजन्, दिव्यज्ञानसाधण्यास योग्य व श्रवणास अनुकूल अशा मनानें व बुद्धीनें जें मला विचारिलेंस तें सर्व सविस्तर सांगतों, ऐक. योगात्मा व ब्रह्मरूपानें आविर्भूत होणारा प्रभावशाली ईश्वर ( योगी ) सत्वसमृद्धीस प्राप्त होऊनही भूतांचें अनेकत्व करितो. कारण स्तंभासारख्या अचल भावानें ब्राह्मस्वरूपाचे ठिकाणीं अधिष्ठित झालेलाही प्रभु ब्रह्मा ( योगी ) रजोगुणानें विक्षिप्त होतो आणि रजःप्रादुर्भाव झाला ह्मणजे अर्थातृच तेथें अनेकत्व येतें. नंतर रजोगुणापासून हजारों पदें उत्पन्न होतात. व ज्याचे योगानें तीं कार्यक्षमही होतात. अशा त्या विषयांप्रमाणेंच मोक्षाला प्रतिबंधक होणाऱ्या व केवळ मनोरथमय अशा रजोगुणाचे ठिकाणीं तो विक्षिप्त योगी अनुरक्त होतो. नंतर सर्वदा तो वेदांचे सर्वस्व–रूप ब्रह्मसंज्ञक यज्ञाची ( विष्णूची ) उपासना योगानें करितो; त्या योगें त्यास विपुल ज्ञान व ऐश्वर्य हीं अप्रार्थितच प्राप्त होतात ( परंतु यांस मुमुक्षूनें भूलूं नये. ) तर ब्रह्मीभूत अशा योगाभ्यासी योगानें हें प्राप्त झालेलें पहिलें ऐश्वर्य केवळ भूतांच्या

१ चालू अध्यायांत कृत, त्रेत, द्वापर इत्यादि युगांतले युगधर्म कोणते ते व्यास सांगतात—योगाचे ठिकाणीं यद्यपि सत्वोत्कर्ष झाला ( म्हणजे कृतयुग झालें ) तरीही त्याला तो सगुणांत आहे तों मधून मधून रजस्तमाचे फटकारे बसतात म्हणजे तो त्रेता व द्वापर यांत सांपडतो, असें रूपक येथें आहे असें चतुर्धर म्हणतो.

१ 'कृत' पूर्वीच सांगितले व कलि सांप्रत चालू होता, यामुळें 'आद्ययुगयोः' म्हणजे त्रेता व द्वापर किंवा रजस्तमांचे काल असा अर्थ घ्यावा असेंच चतुर्धर म्हणतो.

२ या ठिकाणीं मूळपद 'चकार' हें आहे व वांईकरांनीं त्याचा अर्थ 'करिता झाला' असा नेहमींप्रमाणे केला आहे. पण चतुर्धराने या पदावर मुद्दाम टीप दिली आहे कीं, 'भूतार्थो न विवक्षितः। करोतीत्यर्थः ।' ही टीप सयुक्तिक आहे असें पाहून आम्ही वर्तमानीं प्रयोग केला आहे.

३ उत्पत्ति व कार्यक्षमता किंवा कार्यप्रवृत्ति हीं रजोगुणाचीं कार्यं आहेत, हे प्रसिद्धच आहे. गीतेंत भगवान् म्हणताततः—लोभः प्रवृत्तिरारंभः कर्मणामशमः स्पृहा इत्यादि.
~~~~~~

हिताकरितां ( स्वार्थाकरितां नव्हे ) योजावें.

असो. तो योगी जेव्हां निर्विकार, रजस्तमांनीं अविक्षिप्त, अशा प्रत्याहारादि क्रिया करील तेव्हां त्याच्या योगानें त्या ब्रह्मस्वरूपीं जडलेल्या योग्याला आकाशरूप ह्मणजे अव्याकृत (ह्मणजे जें विक्षेपक नव्हे असें) ऐश्वर्यप्राप्त होतें. तेव्हां तें प्राप्त झालेलें अव्याकृत ऐश्वर्यही निर्मल व अव्यय असें ब्रह्मस्वरूपि होतें. कारण तें कूटस्थ ब्रह्मच सर्व प्राण्यांचे व ब्रह्मवेत्ते लोकांचें व नित्यैश्वर्ययुक्त ब्रह्मादि देवांचेंही जीवात्म्याचें संहारस्थान ( लयस्थान ) आहे, असें ज्ञाते वेदरूपी नेत्रांनीं पाहातात. योगयज्ञांत आकाशरूपी ऐश्वर्यानें युक्त झालेला तो ब्रह्मवादी सकामयोगी एकत्र झालेल्या व प्रबळ अशा अनेक विकारांनीं युक्त असें वायुरूप धरितो. परंतु हे विकार प्राप्त झाले असतां त्यांचा चोहोंकडून निरोध जर करवेल तर स्थूलशरीर-त्याग करून आकाशगामित्व व अदृश्यत्वरूपी शाश्वत ऐश्वर्य प्राप्त होऊन तो ब्राह्मण सिद्ध होतो. नंतर शरीरांतून निघून स्वतः निराधार झालेला तो निराधार मनानेंच निरालंबाचा आश्रय करून आकाशमार्गानें धांवतो. तो ऐश्वर्यभूत भूतात्मा अंतरिक्षांतून धांवत असतांही इंद्रासारख्या, अनेक नेत्रांनीं लोक पाहूं लागले तरी दिसत नाहीं. ( अदृश्यरहातो ) जे ब्राह्मण सर्व कर्मांपासून निराळे होऊन केवळ ॐ काराचा मनानें जप करून त्याची प्राप्ति करून घेतात त्याच साधूंना तो दिसतो. विद्वान् ब्राह्मणांना इष्ट असलेलें हें ॐ काररूपच परब्रह्म होय. तें चेतनेसह सर्व भूतांच्या अंतरीं संचार करितें, असें जाण.

हा ॐकार शब्दच महानाद आहे. हा पुराण असून ब्रह्मसंभव आहे. हा वायुरूप होऊन अक्षरत्वास ( वर्णत्वास ) पावला असें ब्राह्मण ह्मणतात. रूपरहित असून हा धातूंच्या संयोगानें ( तेजोबलयोगानें ) रूपसंपन्न ( व्यक्त वैखरीरूप ) होतो. हा भूतांच्या अंतरंगीं संचार करून विषयभोग घेतो व स्वतंत्रपणें सर्व इच्छा पूर्ण करून घेतो. याचेंच ( प्रणव ब्रह्माचें ) पूर्वीं ध्यान करून व मनानें ( संकल्पानें ) जणूं काय तें आसमंतात् व्यापून विद्वान्, पवित्र, दान्त व त्याच्या वंशात उत्पन्न झालेल्या ब्राह्मणांनीं तेव्हां श्रुतिसारभूत योगाचें चिंतन केलें, व विष्णूचें स्थानभूत अशा उत्तम ब्रह्म लोकाची इच्छा करून ते यशस्वी झाले. त्या पदाकरितांच ते चिंतारहित होऊन सर्व क्रिया करितात; पण ते प्रसवादानकाळीं ( पुनःसृष्टीच्या वेळीं ) संसाराची ( जन्माची ) इच्छा मात्र करीत नाहींत ( कारण त्यांची उपासना केवळ ज्ञान प्राप्त्यर्थ असते ). प्रतिभासमात्र असे विश्व, तैजस व प्राज्ञरूपी तीन प्रकारचे पुष्पोपहार समर्पण करून ह्मणजे स्थूल, सूक्ष्म व कारण या तीन देहांचा तुरीयांत लय करून ते द्विज सत्वमय पराक्रमी

---

१ परकायाप्रवेशादि सामर्थ्यें योगप्रसिद्ध आहेत. देह भूतळी ठेवून अंतरिक्षांत फिरणें हे योग्यांचे सहज खेळ आहेत. अश्वत्थाम्याचा संशय पडला तेव्हां द्रोणाचार्य देह सोडून पुत्राचे शोधार्थ अन्य लोकीं फिरत होते. शंकराचार्य राजाचे कलेवरांत शिरले. या प्रसिद्ध गोष्टी आहेत.

२ पातञ्जल योगसूत्रांतील विभूतिपादाच्या ४२ वे सूत्राचे भाष्यांत भगवान् व्यास म्हणतातः— आकाशाचे ठिकाणीं संयम केल्यानें योगी इतका हलका होतो कीं, तो पाण्यावरून चालत जातो, सूर्यकिरणांबरोबर फिरतो व याही पुढची पायरी म्हणजे आकाशांत यथेच्छ संचार करितो.

१ योग्याच्या ह्या योगसामर्थ्यासंबंधें व्यासमुनि आपल्या पातंजल भाष्यांत म्हणतात. योगी अनावरणात्मकेप्याकाशेभवत्यावृतकायः । सिद्धानामप्यदृश्योभवति ।

२ 'तेजोमयीवाक्' अशी श्रुति आहे.

३ प्रणवः सर्व वेदेषु । गीता अ० ७ श्लो० ८

अशा परमात्म्या विष्णूचें पूजन करितात. ते द्विज वेदालाच मुख्य प्रमाण समजून योग व योगैश्वर्य संपादूं लागले. कारण, हे राजा, ब्रह्मवेत्ताही वैष्णवतेजास वेदोक्त वचनांनींच प्राप्त होतो. ब्रह्मवेत्ते, ब्रह्मज्ञ, ब्रह्मवादी, पवित्र, सर्व कर्मांपासून मुक्त झालेले व सत्यव्रतपरायण ब्राह्मण स्थूल व सूक्ष्म या उभय शरीरांपासून मुक्त होतेवेळीं त्या महात्म्यास साक्षात् पहातात. तेंच वैष्णव, परमाद्भुत परब्रह्म होय. तें ऐश्वर्य राजस विकारांच्या अंतीं ( वाय्वादिकांचा लय झाला असतां ) रसात्मक[1] होऊन दृष्टोत्पत्तीस येतें.

( भयादि[2] ) घोर विकार त्या महात्म्यास फार त्रास देतात. जलानें अतीव आच्छादित होऊन क्षुब्ध होणारा व त्यामुळें चेतनाशून्य झालेल्या त्यास विकारांमुळें झालेल्या शीतोष्णाच्या ऊर्मी आच्छादित करितात. महासागरांत पडलेला तो दुःखानें पोळून निघतो; पण त्यांत बुडत नाहीं. मोठ्या नद्या जणूं काय तुटून त्याच्यावर येऊन कोसळतात; पण तो त्यांतही मरत नाहीं. तो पाण्यांत बुडला असतां आसनाच्छादनांपासून च्युत होऊन निश्चेष्ट व बलरहित होऊन गार पडतो. खड्ड्यांत पडला असतां चोहोंकडून येणाऱ्या पांढऱ्या पाण्याच्या झऱ्यांनीं ( प्रवाहांनीं ) त्याच्या डोकीवर अभिषेक केला जातो. वर ज्योतींकडे पाहूं लागल्यास त्यास जलपूर्ण व गंभीर अशा विजांच्या चमकण्याप्रमाणें असणाऱ्या शुभ्र व पिंवळ्या तेजाकडून[1] पीडा होते. परंतु, हे विकार झाले असतांही त्यांचा चोहोंकडून निरोध केल्यास निश्चल असें ऐश्वर्य प्राप्त होऊन ब्राह्मण सिद्ध होतो.

तें रसात्मक ऐश्वर्य जिभेच्या टोंकांपासून सारखें सहस्र धारांनीं गळून मेघरूप होतें. तो संसिद्ध प्रभु अनेक प्रकारचे संयोग व अनेक रस उत्पन्न करितो. योग-प्राप्तीमुळें सर्व प्राण्यांच्या ( शरीरांतील ) धातूंच्या पोषणासाठीं, आत्ममार्गांत विघ्न करणारें तें तेजोरूप ऐश्वर्य, विकारांसह वाढतें. ब्रह्मप्राप्तीकरितां स्वस्थ राहिलेला तो उग्ररूप, विरूप, घोररूप, गंभीर, पिंगट डोळ्यांच्या, व हातीं काठ्या असलेल्या माणसांकडून मारिला जातो. ते त्याचे डोळे बाहेर काढितात, भयंकरपणें जिव्हाग्राचे तुकडे करितात. पुनःपुनः जांभया देऊन एकदम मोठा नाद करितात. पण ( असल्याही चेष्टांस त्यां साधकानें दाद न दिल्यास ) ते पुनः बहुरूपी होतात व साधकाम तृप्त करण्याकरितां नाचतात, गातात. ते सर्व स्त्रियांचे आकृतींचे होऊन व त्याच्या गळ्यास मिठ्या घालून विघ्नांनीं[2] त्यास लुब्ध करितात. निर्भयपणें मधुर नांवांनीं ते त्याला हांक मारितात व सगळे एकदम मिळून त्याच्या पायां पडतात. योगाभ्यासांत विघ्नें आणण्याकरितां त्याच्या अनुग्रहाची ते इच्छा दाखवून नानाप्रकारें बोल-

१ परमात्माला रसात्मक म्हटले आहे. 'रसो वै सः' अशी श्रुति आहे.

२ येथपर्यंत योग्यास होणारे राजस विकार किंवा उपसर्ग यांचे वर्णन व त्यांचा निरास सांगितला. म्हणजे त्रेतायुगातील संततीचें वर्णन झालें; आतां योग्याला आड येणारे जे भयादि तामस विकार त्यांचें म्हणजे द्वापर संततीचें वर्णन करितो. भयादि विकार हे तामस परिणाम आहेतः—

"यया स्वप्नं भयं शोकं विषादं मदमेवच ।
नविमुञ्चति दुर्मेधा धृतिः सा पार्थ तामसी ।
भगवद्गीता अ० १८ श्लो० ३५

१ हीं तेज षण्मुखी मुद्रा केल्यास अनुभवास येतात. हे सर्व विकार हीच द्वापर संतति.

२ या विघ्नांचें वर्णन विभूतिपादांतील "स्थान्युपनिमंत्रणे संगस्मयाकरणं पुनरनिष्ट प्रसंगात्" या सूत्रावरील भाष्यांत पहावें.

३ या विघ्नांचे समजुतीकरितां योगावरील ग्रंथ वाचावे- विस्तारभयास्तव येथें त्यांतील उतारे देतां येत नाहींत.

तात, नाचतात व त्याला वश करितात. तथापि हे विकार प्राप्त होऊनही त्यांचा चोहोंकडून निरोध केला असतां साधकास अचल असें ऐश्वर्य प्राप्त होऊन तो ब्राह्मण सिद्ध होतो. नंतर तेच विकार अग्नीच्या ज्वाळांप्रमाणें अथवा सूर्याच्या किरणांप्रमाणें तेजोरूप ऐश्वर्य ( उत्पन्न करितात. ) ते तेजोविकारच तेजबिंदु होतात. त्यापासून नक्षत्रें देखील निघालीं व तीं सूर्यचंद्रांनीं ऊर्जित झालेल्या आकाशांत नित्य फिरतात. सूर्यचंद्रात्मक असें दिव्य व ज्योतिर्युक्त वन या लोकीं कालचक्र म्हणून शोभतें. अर्धमास, मास, ऋतु, संवत्सर, क्षण, लव, मुहूर्त, कला, काष्ठा, अहोरात्र, निमेष, उन्मेष, तारांच्या गति व ग्रहांच्या गति ( त्याच्या आधीन असतात. )

आतां रजस्तमोमय विकारांचे संग्रहानें उत्पन्न झालेलें पार्थिव ऐश्वर्य सांगतों. योगयुक्तांस या विकारांनीं ग्रासिल्यास ते अचल आसनापासून च्युत होतात. परंतु अलोभानें तें ऐश्वर्य छिन्न होतें. योगी त्या विघ्नांना भिऊन कंपायमान झाला असतां त्याची निंदा होते. सिद्धींकडून पुनःपुनः विघ्नित झाल्यानें तो उदासीन होतो. भूतांच्या अनेकरूप व भूतलवासी दुसऱ्याही अनेक विषयांनीं तो लवकरच व्याप्त होतो व एकसमयावच्छेदें करून घेरला जातो. नंतर चोहोंकडून पार्थिव ऐश्वर्यानें सेविला जाऊन तो अन्न, जल इत्यादि धांतूंकडून[1] बहुधा मारिला जातो. शक्ति, तोमर, निस्त्रिंश ( खड्ग ) गदा, तरवारी, इत्यादि अनेक तीक्ष्ण धारांच्या आयुधांनीं, व उत्तम तीक्ष्ण व मर्मभेदी बाणांच्या टोंकांनीं तो भेदिला जातो. तथापि हे विकार उत्पन्न झाले असतां साधक त्यांचा सर्वतोपरीं निरोध करील तर त्यास ध्रुव असें ऐश्वर्य प्राप्त होऊन तो ब्राह्मण सिद्ध होतो. नंतर, समाधि लागून व त्यांत वरील सर्व ( विकारांचा ) लय होऊन, त्यांपासून तो विकारनिर्मुक्त झाला असतां त्यास पार्थिव ऐश्वर्य प्रादुर्भूत होतें. दिव्य गंधांचा वास घेऊन तो दिव्य अर्थ ऐकूं लागतो. शरीरपात होई तोंपर्यंत तो जरी बाह्यदृष्टीला दिव्यरूपांच्या पुरुषांपासून वेगळा दिसतो तरी तो देहपातानंतर त्यांपासून भिन्न नसतो. ( एकरूप होतो ) प्रकृतींवर जय मिळविणारा तो प्रकृतीप्रमाणेंच परिणामी होऊन पुण्यशीलांचे अंतःकरणांत भिनून जातो—सर्वांतर्यामीं व्यापून राहतो.

1. अन्न, जल इत्यादि शरीराचे धारणास कारणीभूत पदार्थांना धातु असें म्हटलें आहे.

## अध्याय विसावा.

—:०:—

### ब्रह्मदेवाचे अंगांपासून प्राण्यांची उत्पत्ति.

वैशंपायन सांगतातः—नंतर त्या ब्रह्मदेवानें ( योग्यानें, पृथिव्यादि पृथक् भूतधारणा[1] म्ह० व्यष्टिधारणा सोडून) तिने उलट दुसरी म्हणजे समष्टिरूप चित्ताची धारणा करून निःशेषपणें ( विपर्यादिकांपासून ) मुक्त झालेल्या अंतरात्म्याच्या[2] योगें ब्रह्मप्रापक कर्माचा ( आसनादि धारणान्त ) आरंभ केला. मनानें सर्वांग-

1. गताध्यायीं पृथिव्यादि पृथक् पृथक् धारणा करूं गेल्यानें योग्याला अनेक प्रकारचीं भये व विघ्नें आड येतात, असा अनुभव आल्यामुळें, व 'भेद तेथें भय' असा सिद्धांत असल्यामुळें, योग्यानें अकुतोभय होण्यासाठीं केवळ एका सूत्रात्म्याचेच ठिकाणीं चित्ताची धारणा करावी-असें सांगण्याचा प्रस्तुत अध्यायाचा उद्देश आहे. कोणत्या धारणेनें काय होतें, हें पाहणें असेल त्यांनीं 'पातंजल योगसूत्र, विभूतिपाद—वाचावा.

2. योग्याला समाधिकालीं बाह्य विषयांशीं इंद्रियसंबंध न राखतांही ब्रह्मांडांतील निखिल पदार्थांचें ज्ञान होऊं शकतें. व ह्या ज्ञानाला कालदेशादि उपाधींचा प्रतिबंध नसतो.

धारणा करून हंसत असल्याप्रमाणें ब्रह्मा ( ब्रह्मज्ञ ) ब्रह्माशीं ऐक्य पावून मनानेंच प्रजा उत्पन्न करितो. तो प्रभु आपल्या नेत्रानें रूपसंपन्न अशा अप्सरा निर्माण करितो; नासिकाग्रापासून तो विचित्र वस्त्रें धारण करणाऱ्या तुंबरुप्रभृति शेंकडों व हजारों, गाणें-बजावणें व सामगायन यांत निपुण अशा गंधर्वांना निर्माण करितो. तो योगज्ञ स्वयंभू भगवान् प्रभु ब्रह्मा मोहक दृष्टीच्या, चांगल्या कुरळ्या केसांच्या, कमानदार भुवयांच्या, सुंदरवदनी, शतपत्रें कमलानें शोभणाऱ्या, सुरेख डोळ्यांच्या, निर्मल वर्णवटिकेच्या व सर्वांस सेव्य अशा साक्षात् ब्राह्मी लक्ष्मीस ( वेदवाणीस ) सूत्रात्म्याशीं एकीभूत होऊन ईश्वरानें सांगितलेल्या गोष्टीवर लक्ष ठेवून निर्माण करिता झाला. हे राजन्, त्या भूतात्म्यानें त्या ( वेदरूपी ) देवीला सर्व प्राणिमात्रांच्या आशयाकडे लक्ष देऊन ( त्यांचे हिताकरितां ) निर्मिलें ( आपल्या भोगासाठीं नव्हे ). त्या प्रभूनें नेत्रापासून रूपसंपन्न अप्सरा व नासिकाग्रापासून उत्तम वस्त्रें व वाद्यें यांनीं युक्त असे गंधर्व निर्माण केले. त्या प्रभूनें सर्व गंधर्वांकरितां ( ज्यांत गायनाची व्युत्पत्ति आहे असा ) गांधर्व वेद, व इतर ब्राह्मणांकरितां वेदोक्त गान ( ह्म० सामगायन ) निर्माण केलें. त्यानें आपल्या दोन्हीं पायांपासून गतियुक्त व स्थिर अशीं भूतें निर्मिलीं. नर, किन्नर, यक्ष, पिशाच, नाग, राक्षस, हत्ती, सिंह, वाघ, हजारों प्रकारचे पशु, व चतुष्पाद जनावरें व त्यांचे हिताकरितां नानाप्रकारच्या तृणजाती निर्मिल्या. पूर्वकर्माचे कारणानें ज्यांना हातांत घेऊन अन्न खावें लागतें अशा वानरादिकांनाही निर्मिलें. हस्तांपासून त्यानें कर्म ( व्यापार ) निर्माण केलें, व मनापासून मननास योग्य असे विषय उत्पन्न केले. भूतांच्या सुखाची इच्छा करून त्यानें वायूपासून शरीरांतील अनेक प्रकारचीं कार्यें करणारे प्राणापानादि पंचप्राण निर्माण केले. आतां कोणी अशी शंका घेईल, कीं या प्रकारची ही राजस सृष्टि करण्याचे नादीं जर तो लागला तर त्याला ब्रह्मानंद कसा मिळावा ? तर त्याचें समाधान असें आहे कीं, ही सृष्टि त्यानें सहज लीलेनें केली. ती करितांना त्याचा पंचेंद्रिय-निरोध दृढ असल्यानें त्याचें परमात्म्यावरील लक्ष ढळलें नव्हतें. त्यानें हृदयापासून गाई व बाहूंपासून पक्षि, व त्या त्या भिन्नभिन्न वेषांनीं युक्त असणारे इतर विविध प्राणी निर्माण केले. त्या योगेश्वर प्रभूनें भुवयांच्या मध्यभागांतून

१ योगबलानें प्रतिसृष्टि निर्माण करण्याचें अद्भुत सामर्थ्य येतें. भगवान् पातञ्जलींचे योगसूत्रांतील विभुतिपादाचे सूत्राचे भाष्यांत म्हटलें आहे कीं, फार काय पण योगी चंद्राचा सूर्य व सूर्याचा चंद्र देखील करूं शकतो, पण तो असें करीत मात्र नाहीं.कारण, सृष्टींत घोटाळा होईल. बाकी त्याचें कर्तृत्वाला कांहींच अवघड नाहीं. योगबलाचे अद्भुत खेळ पहाणे तर नवनाथचरित्र वाचावें.

२ 'लक्ष्मी' कमलांतून निघाल्याचें चित्र सर्वांना पाहिलेंच आहे.

३ रूपसंपन्न अप्सरांची नेत्रांपासून उत्पत्ति होणें हें हिशोबीच आहे. कारण, रूप हा नेत्रांचा विषय आहे. शिवाय विषयावांचून विषयी लंगडा, किंबहुना अशक्यच आहे. ह्मणून नेत्र म्हटले कीं रूप पाहिजेच. श्रोत्र म्हटलें की, शब्द, गायन, इत्यादि आलेंच. हा नेहमींचा सरळ हिशोब झाला.

१ येथें नासिकाग्रापासून गंधयुक्त पुष्पादि न सांगतां, गधर्व सांगितले आहेत. याचा परिहार चतुर्धरांनीं असा केला आहे कीं, त्यानें 'सर्वांगधारणा केली असल्यामुळें वाटेल तेथून वाटेल त्या इंद्रियाचें कार्य त्याला करितां येत होतें.

वेदाचा किंवा ब्रह्मकुलाचा विस्तार करणारा, दिव्य, दाही इंद्रियांचे व्यापार परस्परांकडून करविणारा, व जाज्वल्य, अशा तेजस्वी, मंत्रद्रष्ट्या अंगिरस नामक मुनीस निर्माण केलें. नंतर तो ब्रह्मवंशकर, दिव्य व परमधार्मिक अशा भृगूस ललाटाच्या मध्यप्रदेशांतून निर्माण करिता झाला. त्या महायोगी पितामहानें कलहप्रिय नारदास व सनत्कुमारास डोक्यापासून निर्माण केलें. पितामहानें युवराज्यपदावर सोमाचा अभिषेक करून त्यास ब्राह्मणांचा शाश्वत राजा व रजनीचा वल्लभ केलें. मोठ्या तपानें युक्त होत्साता तो ग्रहाचा, स्वामी ग्रहांसह आपल्यां प्रभानीं जग प्रकाशित करीत आकाशामध्यें फिरूं लागला. योगांच्या योगें मनानें सिद्ध झालेल्या त्या भगवान् प्रभूनें सर्व स्थावरजंगम प्राणी आपल्या अवयवांपासून निर्माण केले.

नंतर त्या निर्माण केलेल्या भूतांना वेगळीं स्थानें व अधिकार ठरवून दिले. हा केवळ आत्म्यालाच उपादान करून त्यापासून सृष्ट्यादिप्रपंच निर्माण करणारा जो ब्रह्मप्रापक योग हाच ज्ञानयज्ञ होय. हाच तत्वशः वेदान्तजन्यज्ञान व योगाचें साध्यही होय. विज्ञानवाद्यांचें ( बौद्धांचें ) विज्ञान हेंच. ( चार्वाकादि स्वभाववाद्यांचा) स्वभाव हेंच. क्षेत्र, ( प्रकृति ) क्षेत्रज्ञ (पुरुष), एकत्व, पृथक्त्व ( भिन्नपणा ), उद्भव, मरण, कालवेत्त्यांचा काल, ज्ञेय, व विज्ञान सर्व कांहीं हाच होय.

१ चालू मन्वंतराचे आरंभीं ब्रह्मदेवानें प्रजावृद्धि व्हावी म्हणून मुद्दाम जे मानसपुत्र निर्माण केले, त्यांत ‘अंगिरा’ हा होता, म्हणून यास मुळांत ‘ब्रह्मवंशकर’ असें विशेषण दिलें आहे. किंवा, ‘ब्रह्म याचा अर्थ वेद’ होतो व याचे कुळांत वेदविस्तार करणारे असे तेहतीस मंत्रद्रष्टे ऋषि जन्मले. म्हणूनही याला हें विशेषण दिलें असतां शोभेल.

२ आपल्याला नाकाचें काम नाकाकडून घ्यावें लागतें परंतु ज्याला ‘सार्वात्म्य प्राप्त झालें त्याचें वाटेल तें इंद्रिय अन्य इंद्रियांचें काम करितें.

३ अंगिरसाप्रमाणें भृगु हाही प्रजावृध्यार्थ उत्पन्न केलेला मानसपुत्र असून त्याच्याहि कुळांत एकोणीस मंत्रद्रष्टे ऋषि झाले. यास्तव यालाही ‘ब्रह्मवंशकर’ हेंच विशेषण दिलें आहे.

## अध्याय एकत्रिसावा.

—:०:—

### क्षत्रयुग किंवा कर्ममार्गकथन.

जनमेजय[1] म्हणतो:—हे ब्रह्मन्, युगांतील पहिलें जें ब्रह्मयुग तें मीं ऐकिलें; ( म्ह० ब्रह्मज्ञानाचें किंवा श्रेष्ठतम अशा ज्ञानमार्गाचें माहात्म्य मीं ऐकिलें. ) आतां, हे प्रभो, क्षत्रयुगही[2] मी ऐकण्याची इच्छा करीत आहें. कारण, तें अनेक यज्ञांनीं अलंकृत, नियमांनीं बांधलेलें, व युक्तिवान् पुरुषांनीं सांगितलेलें असें आहे.

वैशंपायन सांगतात:—हें क्षत्रयुग केवळ यज्ञादि प्रवृत्तिपर कर्में करणाऱ्या कर्मठांना मान्य असून त्यांत दान-धर्माकडे फार कल असतो व अपत्यप्राप्तिसमयीं केलेलीं जातेष्ट्यादि कर्में यांनीं याला मोठी शोभा आली असते. यांतील यज्ञादि कर्में करणारे लोक मागील ज्ञान्यांप्रमाणें जीवन्मुक्त न होतां मरणोत्तर आपल्या अंगुष्ठमात्र वासनामय देहानें किंवा लिंगदेहानें सूर्यकिरणांबरोबर वर आकर्षिले जाऊन सूर्यमंडल भेदून ब्रह्मलोकास जातात. ते यज्ञादि प्रवृत्तिपर कर्में करीत असोत

१ गेल्या १४ अध्यायांत ( ७–२० ) जीवन्मुक्ति प्राप्त करून घेण्याकरितां ब्रह्मतत्वाचें प्रतिपादन केलें. आतां “ याच देहीं याच डोळां, पाहिन मुक्तिचा सोहळा ” अशा कामीं जे असमर्थ असतील अशांना धर्माचरणानें क्रमशः मुक्ति प्राप्त करून घेण्याचे मार्ग सांगतात.

२ कर्मकांड हें ज्ञानकाण्डाचे दुय्यम प्रतीचें असल्यामुळें, ज्ञानकांडास ब्रह्मयुग म्हणतांच कर्मकांडाला ओघानेंच ‘ क्षत्रयुग ’ म्हटलें. तें कांहीं ठिकाणीं विस्तारानें तर कांहीं ठिकाणीं संक्षेपानें कथिलेलें आहे.

किंवा शमादिनिवृत्तिपर कर्में आचरीत असोत, त्यांचा सर्व भर वेदवाक्यावर असून ते केवळ वेदोक्तकर्म आपल्या हातून निराबाध ( अक्लिष्ट ) कसें होईल, याच विवंचनेंत असल्यानें त्यांचे हातून ईश्वरप्रीत्यर्थ केवळ वेदोक्तकर्में तेवढीं घडतात. त्यामुळें ते थेट मोक्षास जाऊन न भिडतां कर्माची अखेरगति जो ब्रह्मलोक त्याशीं एकरूप होऊन, हे राजन्, तेथें लक्ष्मीयुक्त, पवित्र, ब्रह्मचर्याचें पालन करणारे व परोक्ष ब्रह्मज्ञानानें जागे झालेले असे ब्राह्मण होऊन असतात. तेथें हजार युगें पूर्ण झालीं व पुढील कल्पाची उत्पत्ति होऊं लागली म्हणजे ते ब्रह्मलोकांतून लय पावून (नाहींसे होऊन) वित्तसंपन्न, ज्ञानसिद्ध व समाधियुक्त असे ब्राह्मण होऊन पुन: मृत्युलोकीं उत्पन्न होतात. त्यांपैकीं जो ब्राह्मण योगात्मा असून देहेंद्रियांवर आसक्ति न ठेवतां विष्णुस्वरूपाची भावना करितो, ( पण समष्टीची उपासना करीत नाहीं ) तो या पुढील ( कल्पामध्यें ) दक्षप्रजापति होऊन विपुल प्रजा निर्माण करितो. अक्षरापासून ( म्ह० सात्विकधर्मापासून ) सौम्य असे ब्राह्मण, व क्षरापासून ( म्ह० सत्वरजो मयापासून ) क्षत्रियबंधु झाले; वैश्य हे विकारापासून ( म्ह० सकामधर्मापासून ) व शूद्र धूम विकारानें ( म्ह० तमोमय गुणांपासून ) झाले. वर्णांविषयीं विचार करणाऱ्या विष्णूनें ब्राह्मणादि चतुर्वर्ण अनुक्रमें करून श्वेत, रक्त, पीत व नील या वर्णांचे उत्पन्न केले. तेव्हां या लोकीं प्रजा ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र वर्णत्वास प्राप्त झाल्या. बाह्यत: एकसारखी आकृति असूनही अंततः भिन्न धर्मांचे हे द्विपाद् प्राणी परम अद्भुत ( कौतुक उत्पन्न करणारे ) होत. सर्व कर्मांची गति जाणणारे ते कर्मफळांचा भोग भोगण्यासाठीं त्या त्या वर्णांत जन्म घेतात. त्यांतील पहिल्या तीन वर्णांच्या लोकांना वेदोक्त क्रिया सांगितल्या आहेत. यास्तव, हे राजन्, तुम्हां तीघांनाच विष्णुभक्तीमुळें वेदाधिकार प्राप्त झाला. ज्ञान व ऐश्वर्य यांच्या योगानें दक्षप्रजापति स्वत: प्रभु विष्णुच आहे. तो महायोगी कर्मांच्या पलीकडे गेलेला आहे. तो अज्ञानी नसतांही प्रजानिर्माणरूप कर्माच्या अडसट्ट्यांत पडतो. असो. तीन वर्णांचे उत्पत्तीनंतर केवळ वरील त्रिवर्णांचे सेवेकरितां शूद्र निर्माण केले. ते शूद्र वेदोक्तकर्मविवर्जित असल्यामुळें संस्कारांस पात्र नाहींत व त्यांस वेदाध्ययनही नाहीं. मंथन करीत असलेल्या अरणीपासून धुराचा लोट निघाला तरी तो जसा यज्ञादि कर्मांत उपयोगीं पडत नाहीं, त्याप्रमाणें संस्कारयुक्त धर्मानें व वेदोक्त कर्मानें विरहित असल्यामुळें शूद्र जरी या भूतलावर सर्व जन्मभर संचार करीत असले तरी ते ( यज्ञयागादि ) कर्मांत उपयोजिले जात नाहींत.

असो; नंतर वेदप्रोक्त कर्मानें ( युक्त ) असे इतर ब्रह्मयोनि दक्षपुत्र निर्माण झाले. ते बळकट, महा उत्साही, महा-शौर्याचे व अतिशय तेजस्वी असे होते. त्या महात्म्यांस यज्ञ न करणाऱ्या दक्षपित्यानें म्हटलें, ‘ पुत्रांनो, मीं तुम्हांला जन्म देणाऱ्या धात्रीच्या ( मायेच्या स्वरूपाचा ) निर्णय ऐकण्याची इच्छा करितों. कारण, मी स्वत: या कामीं समर्थ आहें. ( तसे तुम्ही व्हा म्हणजे ) मग मी तत्वज्ञ प्रजांना विपुल बल देईन. क्षेत्रें विपुल असल्यामुळें मला विपुल प्रजा आहेत. नंतर चाक्षुषप्रमाणानें मायेचें सार जाणण्याची इच्छा करणाऱ्या त्यांस त्या धात्री देवीनें आपलें स्वरूप दाखविलें नाहीं. परंतु त्या प्रजापातिपुत्रांचा पुढें कृतयुगांत जेव्हां विकल्परहित ( शुद्ध सत्वमय ) भाव झाला, तेव्हां त्यांना मायेचें स्वरूप कळलें. त्यांनीं पाहिलें कीं, सर्व भूतांची ती जनयित्री,

अंडज व उद्भिज यांस निर्मात्यानें प्रेरणा करितांच निर्माण करूं लागली. मायाच ज्ञानजननी होय. त्याचप्रमाणें कर्मफळें भोगणाऱ्या जंतूंना अपेक्षानुरूप लहान मोठे आकार तीच देते.

## अध्याय बाविसावा.

—:०:—

### योगफलकथन.

जनमेजय ह्मणालाः—हे ब्राह्मणोत्तमा, मीं त्रेतायुगांत केवल प्रवृत्यात्मक यज्ञादि कर्मांत जें वैंचकें असेल तें ऐकूं इच्छितों, कीं जें जाणून, सांख्ययोगादि सर्व विद्यांचें अंतिम साध्य जें अव्यय ( ब्रह्म ) तें मी पाहूं शकेन.

वैशंपायन सांगतातः—नंतर पर्वताच्या शिखरावर पुरुषोत्तम जो दक्षप्रजापती त्यानें योगसामर्थ्यानें आपल्या अर्ध देहानें स्वतःच स्त्रीभावाचें अवलंबन केलें व त्यायोगें तो खिन्न झाला. चांगल्या जानूची, पुष्ट जघनप्रदेशाची, चांगल्या भुंवयांची, पद्मासारख्या मुखाची, डोळ्यांचे प्रांतभाग लाल असलेली, कमनीय व सर्व प्राण्यांनाही मनोरम अशी ती स्त्री झाली. प्राचेतस दक्षप्रभूनें त्या कुमारीचे ठाईं आपल्या उरलेल्या पुरुषरूपी अर्ध देहाचे संयोगानें कमलमुखी कन्या उत्पन्न केल्या. नंतर दक्ष स्त्रीस्वरूप सोडून पुरुषरूपानें सर्व प्राण्यांस दिसूं लागला व तो पूर्वीपेक्षांही रमणीय दिसूं लागला. त्या दक्ष प्राचेतस प्रभूनें स्वतः त्या कन्या वेदोक्त ब्राह्मविधीनें (खालीं सांगितल्याप्रमाणें ) वरांस दिल्या. त्यानें दहा कन्या धर्मास, तेरा कश्यपास, व सत्तावीस चंद्रास शांत चित्तकरून ( राजी खुषीनें ) भार्या होण्याकरितां दिल्या. याप्रकारें त्या कन्या देऊन व ब्रह्मदेवानें वास केलेल्या पवित्र अशा ब्रह्मक्षेत्रास ( प्रयागास ) जाऊन तो मुनि स्वस्थचित्त झाला. हे राजन्, तप करीत तो मृगांबरोबर पृथ्वीवर फिरूं लागला. तो वृद्ध तृण, मुळें व फळें, यांवर निर्वाह करी. अशा प्रकारें वारंवार केलेल्या तपानेंही तो वृद्ध ( समृद्ध ) झाला. पशु त्यास पाहून आनंदित होत. कारण, तो त्यांची हिंसा करीत नसे. दीक्षा घेतलेले, पुण्यकर्म करणारे, तपानें ज्यांनीं आपलें पाप जाळून टाकिलें आहे असे ब्राह्मणही, त्यास मिळालेलें त्याचे अहिंसारूपी तपाचें सर्वत्र निर्वैरत्वरूप फळ पाहून आनंद पावत.

ज्यानें योगसामर्थ्यानें मनोजय केला असून ज्याला वाटेल तेव्हां सोडितां—घेतां येतें अशा प्रकारें जो सर्वज्ञ झालेला कालवेत्ता मुनि त्याला कर्मरूपी यज्ञ करणारांची स्वर्गनरकादिरूप फलप्राप्ति कशा प्रकारची असते ती स्पष्ट मोजकी कळून येते. केवळ प्रवृत्तिमार्गानें जाणारांत जे जे दानशूर, मानशूर, उद्वेगरहित, निरिच्छ असून सुपुत्रसंपन्न पुरुष असतात, ते आपल्या पत्नीसह ( वनांतील ) पशूंच्या संगतींत आपलें म्हातारपण घालवितात; व सर्वोत्पादक असें जें पहिलें पद ह्म० ब्रह्म त्याविषयीं वेदाध्ययनरूपी स्तोत्र करून ब्राह्मण शुद्धसत्व होतात. या मानवी देहांत

१ मागल्यांत प्रवृत्तिधर्मावरून क्रमानें निवृत्तीकडे जाणारांचें वर्णन सांगितलें, प्रस्तुत अध्यायांत केवळ प्रवृत्तिनिष्ठांची स्थिति वर्णिली आहे.

१ चतुर्धर ह्मणतो कीं, दक्षाच्या या आख्यायिकेवरून असें दाखविलें कीं, स्त्रीसंग्रह करणें, नंतर स्त्रीचे ठायीं प्रजा किंवा संतति उत्पन्न करणें, पुढें त्या संततीची व्यवस्था लावून, आपण तपश्चर्येकरितां वनांत जाणें, अशा प्रकारचें केवळ प्रवृत्तिमार्गानें जाणारांचें कर्तव्य आहे.

२ चतुर्धर ह्मणतो वरील दक्षाचे आख्यायिकेंत पत्नीचा त्याग करून वनांत जाणें सुचविलें, परंतु, या ठिकाणीं सपत्नीकही अरण्यवास विहित सांगितला आहे.

ब्रह्मानें ( प्रणवानें ) वास केलेला असतो म्हणून त्यास ब्रह्मक्षेत्र असें, कर्मापासून मुक्त, जितक्रोध, व जितेंद्रिय अशा यतींनीं, व निष्किंचन मार्गानें पृथ्वीवर फिरणाऱ्या ब्राह्मणांनीं म्हटलेलें आहे.

जी प्रजा पूर्वीं ( समाधिकालीं ) मनोमात्र कल्पित व ब्रह्माच्या ठाईं हार्दाकाशांत आरूढ होऊन राहिलेली होती तीच ही स्वभाव उलंघन करणें अशक्य असल्यामुळें व्यक्तत्वास येऊन लोकांत प्रकट झाली आहे. ही अव्यक्तापासून व्यक्तत्वाप्रत आलेली आहे; व प्रारब्धसंस्कारांच्या बलानें हिची अशीच व्यक्त व अव्यक्त अशा प्रकारें द्विधा स्थिति अवश्य होणार. तिजपुढें कोणाचाही उपाय चालत नाहीं. समाधिस्थितींत जरी कोणी ब्रह्मभावाप्रत गेला असला तरी समाधि मोडतांच तो पुनः संसारांत येणें हें अपरिहार्य आहे. कारण, हे भूपते, ही समाधिसमयीं अव्यक्त व व्युत्थानसमयीं व्यक्त अशी अवस्था कालधर्मानेंच प्राप्त होते. ही स्थावर, जंगम, स्थूल, सूक्ष्म—सर्वच प्राण्यांना सारखी लागू आहे. कालाची गति जाणणारे ते सर्व कालयोगानेंच उत्पन्न होतात अगर नष्ट होतात. या नियमाप्रमाणेंच या सर्व प्रजा दक्षकन्यांच्या ठाईं, अव्यय अशा कश्यपाचा कालधर्मानें संयोग होऊन झाल्या. त्या ह्या:—आदित्य, वसु, रुद्र, सर्व मरुद्गण, अनेक फणांचे नाग, साध्य, गंधर्व, किन्नर, यक्ष, इतर पक्षी, गरुड, यक्ष, सुंदर वस्त्रांचे किन्नर, गाई, पशुगण, माणसें, चराचर वस्तु, पृथ्वी, पृथ्वीधर पर्वत, हत्ती, सिंह, वाघ, पंखांचे घोडे, पक्षी, गेंडे, मोठ्या शिंगांचे बैल व हरिण, चार दांतांचे व कमलासारखे रंगानें शुभ्र नागेंद्र ( उत्तम हत्ती), यथेच्छ रूप धारण करणारे, सर्व लक्षणसंपन्न, पूर्वकल्पींच्याच रूपांनीं व तशाच गात्रांनीं व त्याच शीलानें आणि पराक्रमानें युक्त असे प्राणी तसेच मुनिही या सनातन धर्मक्षेत्रांत ( भारतवर्षांत ) उत्पन्न झाले. ज्यामध्यें सर्व देव उत्पन्न होऊन स्वर्ग लोकांत प्रतिष्ठित झाले त्याच मानसलोकांत क्षेत्रज्ञ ( आत्मनिष्ठ, ) धार्मिष्ठ व वेदवेत्ते ( ब्राह्मण ), तपानें सिद्ध झालेले इतर गृहस्थ, गुरूंची शुश्रूषा करून सिद्ध झालेले ब्रह्मचारी, व सिद्धीच्या हेतूनें योगमार्गास लागलेले (योगी) राहतात. काबाडकष्ट करून मोठ्या क्लेशांनीं वृत्ति चालविणारे ब्राह्मण, शेतांतील कणसें घेणें ( शिल ) व पडलेले कण वेंचून घेणें (उञ्छ) यांवर वृत्ति चालविणारे शिलोञ्छवृत्तीचे ब्राह्मण, सपत्नीक असून दृढव्रती असल्यास, हे सर्वही व्रतपालनाचे सामर्थ्यानें स्वर्गलोकांत संचार करणारे होतील. ( त्यांचें सपत्नीकत्व त्यांचे आड येत नाहीं. )

## अध्याय तेविसावा.

—:०:—

### प्राणायाम.

वैशंपायन सांगतातः—मेरुपृष्ठावर ( भ्रूघ्राणमध्यांत ) समाहित ( समाधिगत ) होऊन

---

१ येथवर सपत्नीक वानप्रस्थांनाही योगसिद्धि लभ्य आहे असें सांगून, आतां पुढें योगफल सांगतो, असें चतुर्धर म्हणतो.

१ चतुर्धर ह्मणतो कीं, बाविसावे अध्यायाचे अंतीं असें सांगितलें कीं, जेवढे मिळून दृढव्रती आहेत तेवढे दिविचर होतात ह्मणजे स्वर्गांत संचार करितात. शिवाय जे पाहिल्या प्रतीचे अधिकारी असतील अशांसाठीं ' मनोजय ' नांवाचें व्रत सतरावे अध्यायांत सांगितलें. आतां मध्यम प्रतीचे जे कोणी अधिकारी त्यांना चित्तजय करितां येऊन त्यांचे ठिकाणीं आत्मरूप जाणण्याची इच्छा उत्पन्न व्हावी ह्मणून ' प्राणरोध ' व ' हविर्यज्ञ ' या प्रकारचीं दोन व्रतें प्रकृत अध्यायांत सांगतात. त्यांतील पहिलें व्रत देखील यज्ञाचे रूपकानेंच वर्णिलें आहे.

राहिलेले, जटा व मृगचर्म धारण करणारे व क्रोधरहित व जितेंद्रिय ब्राह्मण शुद्ध ब्रह्माचे प्राप्तीच्या मुख्य उद्देशानें राहिले. ते पुष्कळ वृक्ष असलेल्या (नाना धर्माधर्मवान् जो अहंकार त्याला उपाधिभूत जो प्राण त्यानें संकुल किंवा व्याप्त ), धातूंच्या योगें जेथील दगड रंगलेले आहेत ( म्हणजे कफ, वात, पित्तादि धातूंनीं व्याप्त आहेत अस्थि ज्यांच्या ) अशा, तृण ( जरारोगादि ) व कांटे ( शोक, दुःखादि ) नसलेल्या इडा, पिंगला, सुषुम्नारूपी तिन्ही ब्रह्मप्रतिपादकांच्या ( जीवोपाधिभूत प्राणमार्गांच्या ) पांच स्वरांनीं ( प्राणांच्या पंचविध वृत्तिभेदांनीं विराजित अशा पर्वतांमधील ( नासावंश व कपोलास्थीमधील स्थानीं ) सम प्रदेशांत ( ब्रह्मप्राप्तीचे स्थानीं ) नित्य मंत्रयज्ञपरायण होऊन ( प्राणादिकांचीं जीं रेफादि बीजें त्यांचा जप करून ) व नित्य ( वायुजयरूप ) व्रतें व हित ( आनंदरूपी आत्म्याचे ठायीं ) यांत निमग्न होऊन राहिले. त्या सर्व ब्राह्मणश्रेष्ठांनीं एकाच अग्नीचें (प्राणाग्नीचें ) आधान करून, एकचित्तेंकरून त्याचेच मंत्रप्रतिपाद्य विषयांच्या योगें उपाधिभेदानें पांच भिन्न अग्नि ( प्राण ) बनविले. वेदपारग मुनींनीं तो प्राणरूपी अग्नि ( पूरक, रेचक, कुंभकरूपानें नाडीमार्गानें विभागून ) तीन प्रकारचा केला. त्या एकाचे तीन प्रकार केल्यामुळें ते तत्त्वाप्रत पोंचले. ( पूरकादिकांचे अभ्यासानें ते ब्रह्म पावले). हे मंत्रज्ञा, एकच अग्नि (प्राणवायु) हविर्द्रव्याच्या योगानें (हविष्यान्न खाण्यानें ) व स्वधाकारानें ( देहाचे ठिकाणीं कुंभक केल्यानें ) वृद्धि पावून मंत्रांच्या कार्यसिद्धीसाठीं ( पंचभूतांच्या धारणासाठीं ) संप्रवृत्त होतो ( नाड्यांतून अक्लेश आरोहावरोह करितो ).

१ या सर्वांचा अरूपक अर्थ म्हणजे–

भगवान्, नित्यसिद्ध अशा सद्रूप कारणापासून झालेला, सर्वांत दक्ष म्हणजे मुख्य ब्राह्मणांस निर्माण करणारा अतएव सर्व भूतांचा जो पितामह ब्रह्मा (मुख्य असा प्राणाग्नि) तो स्वतः सूत्रात्मरूपानें प्राप्त झाला. तो ( प्राणाग्नि ) दंडी[2] (दंडधारी) चर्मी[3] (अजिनयुक्त ) शरी[4] ( बाणयुक्त ) खड्गी[5] ( खड्गवान् ), शिखी[6] ( शिखायुक्त ), कमलमुख, संताप सोडून दिलेला, जितक्रोध व जितेंद्रिय असा होता. ( प्रसन्न व सहज विरक्त झाला ) तो ब्रह्मामेधेशीं संयुक्त होऊन ( शास्त्र व गुरूपदेश यांपासून प्राप्त झालेल्या बुद्धीनें युक्त होऊन ) पुष्कर तीर्थांत ( आत्मतीर्थीं ) यज्ञ करितो. ( तन्निष्ठ होतो. म्हणजे आत्मतीर्थांत स्थितप्रज्ञ होऊन राहतो. ) तेव्हां ( तैत्तरीयांतर्गत ) इंद्रप्रोक्त सामें[7] ब्रह्मवाद्यांकडून गाइलीं जातात. बहिर्यज्ञांत तूप, दूध, व्रीहि व जें कांहीं उत्तम वेदोक्त हविर्द्रव्य असतें तें तो योगी समाधिरूप आंतरयज्ञांत मनानेंच कल्पून सूत्रात्म्याचे ठायीं अर्पण करितो व या प्रकारें आपला समाधि उद्दीपित करितो. शमीगर्भांतून निघालेल्या ( देहांत उत्थित

१ प्रणवाचे जपाने परमात्म्याचे ठिकाणीं धारणा केल्यानें साधकाला सूत्रात्म्याचा साक्षात्कार होतो, असा यांतील भाव समजावा.

२ दण्डी ह्म० प्राणायामानें नासिकेवाटे पूरक करून योगी दंडासारखा किंवा काष्ठासारखा घट्ट होतो ह्म० त्या अवस्थेंत त्याला दण्डी ह्मटलें आहे.

३ चर्मी ह्म० कुंभकाचे वेळीं तो पोट फुगवून चामड्यानें मढविलेल्या नगाऱ्याप्रमाणे करितो ह्म० चर्मी.

४ शरी ह्म० रेचक समयीं रिता पडल्यानें बरूचे कांड्यासारखा सूक्ष्म होतो ह्मणून शरी.

५ खड्गी–तो योगी तीव्र निग्रहानें संसारवृक्षच्छेदनसमर्थ होतो ह्मणून खड्गी.

६ शिखी–ज्वालांनी युक्त असा प्राणाग्नि.

७ ' अहमन्नमहमन्नमहमन्नम् । अहमन्नादोऽहमन्नादोऽहमन्नादः । अह ९ श्लोककृदह ९ श्लोककृदह ९ श्लोककृत । इत्यादि ।

होणाऱ्या ) आग्नेयी अरणींच्या निर्मथनानें (म्हणजे अरणींत जसा अग्नि तसा परमात्मा जींत तिरोहित राहतो अशी जी अविद्या तिचा नाश करून प्रथम अग्नि निर्माण करून, नंतर त्या ब्रम्ह्यानें अन्य अग्नि त्यापासून प्रवृत्त केला. ( देहांतच ब्रह्म प्रकट झालें ) बाह्य यज्ञकर्मामध्यें अग्नि जसा त्यांत राहिलेलें द्रव्य ज्या मानानें अल्प किंवा बहुत असेल त्या विभागानें होत्याला स्वर्गांत दिव्य देहादि फलें तारतम्यानें देतो तसा प्रकार या आत्मयज्ञांत नसतो. कारण यांत उच्चावच फलें नसून कैवल्यरूप एकच फल असतें. असें आहे तरी या योगयज्ञांतही ब्रह्मवादी प्रयोगकुशल मुनींनीं हवींची कल्पना केलेली आढळते, ती कां? तर तें हविकल्पन तात्विक नसून काम्यच असतें व त्या योगानें अणिमादि सिद्धि प्राप्त होऊं शकतात. हें कल्पनामय हवि अर्पण केल्यानें एक अद्भुत चमत्कार अनुभवास येतो, तो असा कीं, या यज्ञांत ज्या प्रकारची आत्म्याचे ठायीं भावना धरावी त्या प्रकारचीं फलें उत्पन्न होतात[1] प्रयुक्त अशीं फलें म्हणजेः बृहस्पतीनें श्रेष्ठ अशा ब्रह्मसंपत्तीच्या योगें, ब्रह्माचा यज्ञ चालू केला असतां, सहा महिन्यांतच[2] चारी वेद संपादिले. तो शिक्षाक्षर युक्त, चोहोंकडून गोड व सानुस्वार असल्यामुळें रम्य अशा सरस्वतीसह संभाषण करिता झाला (शिष्यांस वेद पढविता झाला ). हे भारता! त्या वेदोपदिष्ट कर्मप्रवर्तक वाक्यांनीं केला जाणारा याज्ञिकांचा यज्ञ दुसऱ्या आध्यात्मिक यज्ञाप्रमाणें भासतो. याप्रमाणें वेदरूपानें ब्रह्ममुखापासून निघालेला व निःसंदेह अशा वेदमंत्रांनीं व प्रयोगांनीं योजिलेला यजमानाचा यज्ञ बोलतां बोलतांच जणूं काय वाढतो. समिधा, सोमकलश, ( स्रुक्स्रुवादि) यज्ञपात्रें, खळ्यांत न झोडलेले यव, व्रीहि, आज्य, भरलेलीं पाण्याचीं भांडीं, कर्मप्राप्त पशु, परब्रह्माच्या ठाईं समर्पण केलेलीं कर्में, कोमल वत्सांनीं वेष्टित असलेल्या दुभत्या गाई यांच्या योगें ( यज्ञकर्म वृद्धि पावतें. ) वेदमंत्रानें वृद्ध, वयानें वृद्ध, व तपानें वृद्ध, असा हा ब्रह्मज्ञानमय देव विधेशीं (उद्गीथादि उपासनेशीं) संयुक्त आहे. हे राजन्, तो यज्ञक्रियेचा पुतळा ब्रह्मा मनःकल्पित समिधादि उपचारांनीं व इतर घृतादि स्वसिद्ध पदार्थांचे योगानें देवतांसह यज्ञ करितो. या प्रकारचें तें तेजोरूप ( म्ह० चिन्मय पदार्थांनीं केलेलें ) त्या ब्रह्माचें यजन सर्व प्राणिमात्रांच्या वेदप्रोक्त विधीनें केलेल्या यज्ञास शिवत नाहीं. ( तें त्याच्या पलीकडचें, त्याहून उच्च, आहे. ) शमीगर्भापासून निघालेल्या अश्वत्थमय आग्नेयी अरणींचें निर्मथन करून तो प्रभु अग्निष्टोम यज्ञानें पूर्ण यजन करितो. यज्ञकर्मांत त्याचें तें यज्ञगृह सदस्यांच्या योगें फार शोभतें. सर्व मधुर वाणी बोलतात. सर्व क्रिया चमसादि यज्ञीय उपकरणें व अध्वर्यवादि साह्यकर्ते यांनीं युक्त असतात.

हे राजन्, तो महायज्ञ कर्मठ, तपस्वी, वेदववेदांगपारंगत, व सूर्य व चंद्र यांच्या सारख्या ब्राह्मणांनीं शोभायमान् झाला. तो यज्ञ मोठ्या वेदघोषानें दुसऱ्या ब्रह्मलोकाप्रमाणें वाटला. जणूं काय सर्व देवच पृथ्वीवर उतरून आले आहेत असें भासविणाऱ्या ब्राह्मणांनीं तो शोभत होता. वेदवेदांगवेत्ते, नम्र,

---

१ यदि स पितृलोककामो भवति संकल्पादेवास्य पितरः समुत्तिष्ठन्ति। त्याचे मनात आलें की आपणास पितृलोक दिसावा कीं तत्काल त्या योग्यापुढे गत पितर संकल्पाबरोबर उभे राहतात. इ० इ०

२ तितका तीव्र मुमुक्षु असेल तर आज काल देखील षण्मासांतच योगसिद्धि होऊं शकते, असें स्वामी विवेकानंद ह्मणतात. मैत्रायणी श्रुतीतही असेंच सांगितलें आहे.

ब्रह्मवादी, व तपानें श्रांत अशा ब्राह्मणांच्या येण्याजाण्यानें स्वर्गालाही मोठी शोभा येते; मग मर्त्यलोकास येईलच येईल. यज्ञांतील नीति जळजळीत अग्नीप्रमाणे असलेल्या तेजस्वी विप्रांनीं तो यज्ञ ब्रह्मलोकांतील ब्रह्मदेवाच्या मोठ्या यज्ञाप्रमाणें भासला. यज्ञ चालला असतां ब्रह्मवादी इंद्रप्रोक्त सामांचें गायन करितात व यजुर्वेदांतील वचनांचा प्रयोग करितात. तपानें श्रांत, ब्रह्मपरायण, सत्यव्रतांत शांतचित्तानें राहिलेले सर्व मुनि श्रुतमत व तत्सारी मनानें तेथें आले. हे राजन्, तेथें देव धर्मवेत्त्यांतील श्रेष्ठ, पुराण व ब्रह्मोद्भव असा बृहस्पतिच होता व ब्रह्माही आला यज्ञाचा शेवटीं यजमानानें विष्णूची पूजा करून, तपानें युक्त असलेल्या अदितीच्या पुढल्या गर्भांत उत्पन्न झाला ( क्रतुबलानें देवत्व पावला. ) अज, विष्णुसंज्ञक निर्द्वंद्व, परिग्रहशून्य व ज्याच्यापासून इंद्रादि हजारों पदें उत्पन्न होतात व होतील अशा पदास ब्रह्मा (योगी प्राप्त होतो). ते विष्णुपद सदैव सफल अप्रमेय व कर्मरहित असून निष्परिग्रह मुनि त्याचा आत्मा होतात ( तद्रूप होतात. )

हे राजन्, रागादि दोषांनीं प्राप्त झालेले रूपादि विषय हेच परिग्रह म्हणजे मनाला चारी बाजूंनीं बांधणारे आहेत. हे दोष ( पूर्वसंस्कारांच्या ) बळानें सर्वही एकदम मनावर आपलें दडपण ( आवरण ) बसवितात. यासाठीं शहाण्यानें फार दक्षतेनें यांचा निग्रह करावा. कोणी म्हणेल कीं, डोळे जोंपर्यंत आहेत तोंपर्यंत देहधाऱ्याचे रूप हें दृष्टीस पडावयाचेंच, त्याचा निग्रह कसा करावा. तर त्याचा परिहार असा आहे कीं, नुसतें वस्तुदर्शनानें परिग्रह किंवा बंधन होत नसून त्या वस्तूचे ठिकाणीं ममत्व धरण्यानें बंधन उत्पन्न होतें, व म्हणून 'ममत्व' हाच परिग्रह समजावा. इंद्रियसमूह व त्यांचे विषय यांच्यांत राहूनही मुनि निष्परिग्रह व ममत्वरहित असतात. ते वेदविहित धर्म सही अवि लक्षणपरिग्रह म्हणजे बंधन असेंच समजतात व म्हणूनच निर्द्वंद्व अशा एका विष्णु दाचाच ते आश्रय करितात. वेदविद्येच्या व्रतांत निष्णात झालेले व पवित्र अशा ब्रह्मवेत्त्या ब्राह्मणांनीं मुनित्व प्रतिपादक असा तत्त्वमसि वाक्याचा उपदेश करून अनुग्रह करावा. त्या वेळीं, हे राजा, त्या महावाक्याच्या अर्थ मननानें ज्ञान होऊन मग त्या योगें त्या साधकाचें मन रागादि दोषांनीं आवृत होत नाही.

संतजनांचे द्युलोकांत जें उत्तम स्थान आहे त्यासच कर्मठ वृद्ध ( स्वर्ग ) लोक म्हणतात. हे भारता, तेथें हव्याच्या योगें पुष्ट झालेले देव क्षय पावत नाहींत. आणि हे राजन्, यजमानही त्याच्या यज्ञकर्मानें प्राप्त झालेल्या व अधिकाऱ्यांनीं अनुज्ञात केलेल्या त्या उत्तम पदीं पत्नीसह निश्चिंतपणें सुखोपभोगांनीं आनंद पावतो. यज्ञ संपल्यानंतर प्रभूनें निर्मलांतःकरणानें सर्व भूतांवर दया करून त्या ब्राह्मणांस ( ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य ) पर्वतश्रेष्ठ ( दिव्य शरीर दिला. पण सर्व अवयवांनीं रूपी त्या पर्वताचे ( देहाचे ) 'मी मोठा तूं मोठा' या विशेष जात्यभिमानामुळें अनेक उद्योगांनींही आपसांत वांटून घेण्यासाठीं, ते भाग पाडण्यास समर्थ झाले नाहींत. त्या दिव्य शरीरांचे ठिकाणींही प्रत्येकाचा अभिमान जडल्यामुळें त्यांना मोक्षोपयोगी आत्मविवेक साध्य झाला नाहीं, नंतर ब्राह्मणसमूह श्रमयुक्त व म्लानवदन होऊन भूपृष्ठभागीं बसला. हें पाहून तो सुपार्श्व गिरिश्रेष्ठ अविद्योच्छेदक देह-

१ एकत्यानेंच या दोन कामगिऱ्या पत्करल्या.

१ प्रसंगोपात्त विद्याफल सांगून या पुढें प्रकृत असें कर्मफल सांगतो.

स्थ सद्गुरूस शिरसा नम्र होऊन त्या सर्व ब्राह्मणांना गोड वचनांनीं बोलल्या.

" देहेंद्रियांस आत्मा समजणाऱ्या व परस्परांशीं विरोध करणाऱ्या अशा तुम्हांस हा देहाभिमान पर्वत फोडणें शैंकडों दिव्य वर्षांनीं देखील दांडगाईनें शक्य नाहीं. येथें युक्तिच पाहिजे. तुम्हीं भूतमात्राशीं विरोध सोडून शांतचित्तानें जे वेळीं सर्वजण एकवट समाधिस्थित व्हाल त्याच वेळीं या देहाभिमानाचा भेद (उच्छेद) करूं शकाल व सुखी व्हाल. हे ब्राह्मणश्रेष्ठहो, राग व द्वेष यांनी स्वभावजयसामर्थ्य वाढतें; पण रागद्वेषविमुक्त पुरुषाचें शाश्वत ब्रह्म वाढतें. जेव्हा मी (सद्गुरु) ऐहिकामुष्मिक भोगांविषयीं विरक्त असल्यानें स्फटिकवत् निर्मल, देहारंभक जे तेजोबन्नादि धातु व त्यांचे परिणाम जे वाक्, प्राण व मन यांना प्रवर्तक, पश्चात् पतन पावणाऱ्या परंतु आज शिखरांप्रमाणें उभारलेल्या इंद्रियांनीं युक्त चित्तसर्पास आंत घुसण्यास योग्य अशा स्त्रीप्रभृति निकटस्थ बिळांनीं, श्वेतसर्पतुल्य शास्त्रादि व्यसनांनीं व कृष्णसर्पतुल्य कामादि व्यसनांनीं छिन्नभिन्न झालेल्या बुद्धिगत संस्कारांनी प्रेरित होऊन, व ही तुमची अवस्था पाहिल्यानें दया येऊन, मी (सद्गुरु) तुम्हांकडून हा देहाभिमानरूपी पर्वत फोडवीन तेव्हांच तो तुम्ही भेदूं शकाल (सद्गुरुकृपेवांचून देहाभिमाननष्ट होणार नाहीं, हा भाव.)

तें शैलेंद्राचें योग्य भाषण मान्य करून सर्व ब्राह्मणश्रेष्ठ तेव्हां स्वस्थ बसले (आपले बलानें देहात्मविवेक होणें शक्य नाहीं, असें त्यांस पक्कें समजलें.)

~~~~~~~

# अध्याय चोविसावा.

—:०:—

## वेदोक्त वर्णाश्रमधर्मपालन.

वैशंपायन सांगतातः—हे भारता, देहात्मभवरूपी शैलाचें भेदन करण्यास असमर्थ झाल्यानें तपस्वी व गृहस्थाश्रमी ब्राह्मणांचे तेव्हांपासून दिवसेंदिवस बलि व होम वाढूं लागले. हे भारता, तेव्हांपासून या लोकीं त्या ब्रह्मवत्त्यांकडून विष्णुदेवता व गुर्वादि पूज्यपुरुष यांचें पूजन होऊं लागलें. ब्रह्मवेत्त्यांकडून तेथें त्या सम, गवत व कांटे नसलेल्या, पुष्कळ सर्पण व तृण असलेल्या पुण्यवान् पर्वताच्या कांठीं (भ्रूघ्राणसंधीत) वाराणसी क्षेत्रीं ह्या क्रिया सुरु झाल्या. तेथेंच भगवंताची प्राणोत्क्रमण होणाऱ्या जीवांस तारकब्रह्माचा उपदेश करून मुक्तीस नेण्याची क्रिया चाललेली पाहून तपाची इच्छा करणारे, महाभाग, ब्रह्मचर्यव्रतांत राहिलेले, गृहस्थधर्म पाळणारे, जितक्रोध, व शांत चित्ताचे यतीही वास करूं इच्छितात. जे धर्मानें विशेष स्थळीं राहण्याची इच्छा करणारे वरील लोक ते तेथें राहणें पसंत करितात. वन्य–कर्मफलांमध्यें रत असलेले ब्राह्मणश्रेष्ठ वानप्रस्थही अग्निहोत्रव्रतस्नात, जितक्रोध, शांतचित्त, दैवयुक्त (म्ह० अयाचित वृत्तीनें राहणारे किंवा भिक्षेवर निर्वाह करणारे) ब्राह्मणश्रेष्ठ, चीर (लंगोटी) नेसून वल्कलें धारण करणारे, नियत मनाचे, व नियतेंद्रिय (लोक) भयंकर अशा ब्रह्मचर्यव्रताचें आचरण करीत तेथें राहूं इच्छितात. हे राजन्,

१ गताध्यायांत जे देहात्मबुद्धि जीव आहेत, अशांना देहाभिमानरूपी पर्वताचा भेद करणें शक्य नाहीं असें पाहिल्यामुळें चालू अध्यायांत असे जे कोणी देहाभिमानाचा उच्छेद करण्याविषयीं असमर्थ असतील त्यांनीं या भूलोकीं पवित्र क्षेत्राचे ठिकाणीं चित्तशुध्यार्थ बलि, होम, देवतापूजनादि कर्मे करीत राहवें असे सांगतात, असें चतुर्धराचे मत.
~~~~~~~

क्रमप्राप्त अशा या विधीनें चोहोंकडून ज्यांना पुण्य व सनातन वेदसंस्कार प्राप्त झालेला आहे, ते पूर्वींच्या ब्रह्मवादि मुनींनीं आचरिलेला धर्म ( पाळतात ). सर्व वेद जाणल्याखेरीज गृहस्थाश्रमाचा स्वीकार करूं नये, रौद्रव्रत आचरूं नये, गृहस्थाश्रम टाकून परिव्राजक होऊं नये व गृहस्थधर्म सोडूं[१] नये. वेदसंचय प्राप्त झाल्याशिवाय दुःस्थानांत ( संन्यासाश्रमांत ) प्रवेश करूं नये, हे भारता, ऋचांचा यजुर्मंत्रांचा व सामगानांचा संचय करावा. तपानें व गुरूच्या शुश्रूषेनें श्रांत झालेले ब्राह्मण पुत्रवंत नसले तरी ते ( वेदांत ) श्रवणानें इष्ट फळ ( ज्ञान ) पावतील.

हे राजन्, याप्रमाणें ज्यानें वेदांचें ग्रहणही केलें नाहीं व श्रवणही केलें नाहीं, अशाकडून धार्मिक राजानें शूद्राचीं कर्मे करवावीत. अथवा ब्राह्मण असून ज्यानें वेदाचा आदर केला नाहीं असा ब्राह्मणच असणें शक्य नाहीं. ब्रह्मचारी व गृहस्थ या दोघांनीं श्रुतींतील विषयांवर पूर्वींच ( अध्ययनाध्यापनकालींच ) मन ठेविलेलें असतें. यास्तव राजानें अशांची अवहेलना करूं नये. याप्रमाणें विद्यैश्वर्याची ( अपरोक्ष ज्ञानपत्तीची ) चाड असलेल्या भूतिसंपन्न[२] ब्राह्मणानें सर्वेंद्रियांचीं कर्मे वेदपूर्वकच करावींत.

१ हा नियम अविरक्तांना लागू आहे. जो मनापासून विरक्त झाला त्याला वाटेल त्या आश्रमांतून विरक्ति समकालच प्रव्रज्येचा स्वीकार करण्याची मोकळीक आहे.

२ या ठिकाणीं मुंबईकर याचा पाठ 'भूतसंपन्न' असा आहे.

# अध्याय पंचविसावा.

—:०:—

## भक्तिमाहात्म्य.

वैशंपायन सांगतात:—वैदिककर्मच श्रेयस्कर आहे असें जाणणारे ते नारदप्रभृति वेदवेत्ते 'नागाः' म्हणजे वैदिकविधींत प्रमाद न करणारे व चंद्रसूर्यांस पुरस्कार करून राहिलेले ( म्ह० दर्शपूर्णमासांस प्राधान्य देणारे ) ब्राह्मण, ऋषि व गंधर्व—ब्रह्मसंभव हविर्दक्षिणांनीं ब्रह्मप्रभावयुक्त असे ब्राह्मण ऋषि व देव यांची पूजा करूं लागले. ते ब्राह्मणांची पूजा करीत असल्यामुळें ओघानेंच यज्ञांत पितामह ब्रह्मदेवाचेंही सतत पूजन करूं लागले. पांची इंद्रियांस निश्चल करणाऱ्या, सर्व भूतांचें प्रिय करणाऱ्या, सर्व भूतांचें हित चिंतणाऱ्या व पंचेंद्रियें शांत केलेल्या ब्राह्मणांकडून मधुर भाषणयुक्त वाक्यांनीं स्तविला जाणारा भगवान् ब्रह्मा यज्ञाच्या अखेरीस 'तुम्हीं धन्य आहां, तुमची अशा प्रकारें यज्ञाचे ठिकाणीं प्रवृत्ति असणें हें मोठें भाग्य आहे,' असें म्हणाला. नंतर कश्यपास हाक मारून भगवान् प्रभु म्हणाला:—तूं देखील या पृथ्वीतलावर आपल्या पुत्रांसह वेदविहित व उत्तम दक्षिणांनीं भरलेल्या यज्ञांनीं पूजा करीत आहेस (हें उत्तम होय.) हे प्रभो, सात्विक, राजस व तामस ह्या आपापल्या गुणांनीं युक्त असे हे यक्ष व सुर 'आम्हीं पूर्वीं यज्ञ करितों, आम्हीं पूर्वीं यज्ञ करितों,' असें म्हणत एकमेकांशीं

१ गताध्यायांत असमर्थांना चित्तशुध्यर्थ बलिहोमादि श्रौतयज्ञ सांगितले, परंतु तेही कामादि विकारांच्या अडथळ्यामुळें अशांच्या हातून निर्मळपणें पार पडणें अवघड असें दिसून आल्यानें परम कारुणिक द्वैपायन मुनि प्रकृताध्यायांत भक्तीचें माहात्म्य वर्णन करून अज्ञानतिमिरध्वंसनार्थ ईशभक्तिच इतर सर्व साधनांहून श्रेयस्कर असें सांगतात. असा चतुर्धराचा अभिप्राय.

स्पर्धा करीत बलानें चेहेल होऊन राहिले आहेत. दैतेय ( कामादि ) व अदैतेय ( शमादि ) परस्परांस जिंकण्याच्या इच्छेनें एकमेकांचे विपुल दंड धरून युद्धाला प्रवृत्त झाले. तपानें आपलें पाप जाळून टाकलेल्या ऋषींनीं व इतर अनेक वेदांगपारंगत विप्रांनीं निवारण केलें तरी ते ( शमकामादि ) गोठ्यांतील बैलांप्रमाणें अनावर होऊन लढूं लागले. मोठें युद्ध करण्यास प्रवृत्त झालेले ते अंगारवीर ( देवदैत्य ) प्राणजयार्थ सूत्रात्म्यालाच दडपूं लागले. जेव्हां दगडावर हापटलेल्या ढेंकळाप्रमाणें सर्व भूतांसमक्ष ते आपेआपच मृत्यूच्या हातीं सांपडले. नंतर ते महाबलाढ्य ( देवदैत्य ) मोठा नाद करून रागानें एकमेकांचा बाहूंनीं वैराग्यादि साधनांनीं सपक्ष पक्ष्यांप्रमाणें पाडाव करूं लागले. ( परंतु तेथेंही रजस्तम आड आले. ) त्यांच्या पायांनीं तुडविली गेलेली सत्वापत्तिरूप योगभूमि चळचळ कांपूं लागली व विषयवासनांच्या ज्वालांनीं आक्रांत झाली. पुरुषांच्या भारानें पीडित झालेली नाव जशी समुद्रांत बुडते किंवा ओरडणाऱ्या हत्तीकडून पर्वत जसे फोडले जातात, वाऱ्याच्या सोसाट्यानें महानद्या जशा प्रक्षुब्ध होतात ( त्याप्रमाणें पृथ्वीची अवस्था झाली. )

नंतर, हे भारता, मधु ( मोह ) व विष्णु ( सत्व ) यांचें युगांचा अंत करणारें व सर्व प्राणिमात्रांस भय उत्पन्न करणारें असें युद्ध झालें. म्हणजे याप्रमाणें विक्षिप्त झालेल्या चित्ताचा पुनरपि निरोध करूं गेलें असतां तें चित्त मधुसंज्ञक लयास प्राप्त होतें, पण या विघ्नाचा पाडाव सत्वरूपी विष्णूकडून करावा लागतो. वन्हीनें प्रदीप्त बळ देखील पाण्यानें जसें शांत करावें त्याप्रमाणें समग्र बळ व पौरुष यांनीं युक्त असलेल्या मधूचे बलाचें ( म्ह० निद्रा, तंद्रा, जाड्य, कषाय, अंगमर्दादि विघ्नांचें ) विष्णूनें मर्दन केलें. त्या वेळीं त्या भगवंताचा अपकार करणारा तो दैत्यहि शांत बसला.

१ म्हणजे शब्दज्ञानजन्य विवेकानें बाह्येंद्रियवृत्तिसमूहास कापून काढून, मनाचा निरोध करूं लागले.

## अध्याय सत्त्विसावा.

—:०:—

### मोह व विवेक यांचा झगडा.

वैशंपायन सांगतातः—भयंकर पराक्रम करणाऱ्या त्या बलवान् मधु दैत्यानें महेंद्रास तीक्ष्ण पाशांनीं पर्वतामध्यें बांधून सोडिलें.[२] हे भारता, पुढें प्राप्त होणाऱ्या इंद्राच्या वैभवाची ( अद्भुतदर्शनरूपी आत्मैश्वर्यप्राप्तीची ) इच्छा धरून योग्याची सात्विक लक्षणें जाणणाऱ्या त्या मोहानें बुद्धीच्या क्षयामुळें, प्रल्हादाच्या वचनांनीं ( प्रहर्षयुक्त होऊन ) इंद्रास ( आत्म्यास[३] ) अनेक बळकट, विदारण करणाऱ्या, विचित्र व अभेद्य अशा लोखंडी अत्यंत दृढ पाशांनीं मध्यें बांधून, ' नंतर ) त्या युद्धकुशल अग्रणीनें विष्णु व रुद्र यांस युद्धास बोलाविलें. तो सर्व गणाच्या युद्धांत कालाच्या वश झाला होता ( असें वाटतें. )

१ तमानें जीवात्म्याला या देहरूपी कारागृहांत कोंडून अडकवून टाकिलें आहे. परंतु जो उत्तम शहाणा पुरुष असेल त्यानें आपल्या ठिकाणीं अभ्यासानें सत्व गुणाचें आधिक्य करून त्याचे बळानें आत्म्याची त्या बंदीवासांतून सुटका करून घ्यावी असें या अध्यायांत व्यासांचें सांगणें आहे, असा नीलकंठाचा अभिप्राय दिसतो.

२ येथें-मोह हाच मधुदैत्य, वासना हेच तीव्र पाश, आत्मा हा महेंद्र व देह हाच पर्वत असें रूपक उलगडावें.

३ मोह हा बुद्धिसंक्षयामुळें निर्विकल्पसमाधीचे सदृश भासणारी जी सुषुप्ति तिचे ठिकाणींच आत्म्याला दृढ पाशांनीं बांधून नेऊन घालितो. मूढ जीवांचा ओढा गाढ झोंपेकडे असतो, समाधीकडे नसतो.

तेव्हां मधूच्या ( मोहाच्या ) आधीन झालेले ते काश्यपेय दोहोंबाजूंस होऊन मोठाल्या गदा घेऊन युद्धाकरितां धांवले. वाद्यें व गीत यांत निष्णात असलेले गंधर्व व किन्नर चोहोंकडे नाचूं, गाऊं व हंसूं लागले. स्वभावतःच मधुर असून उत्तम प्रकारें जुळवलेल्या तारांनीं युद्ध करणाऱ्या मधूचें मन रजःप्रधान गंधर्व चंचल करूं लागले. मधुदैत्य मत्त होण्याकरितां (मोह अधिकच बळावत जावा म्हणून) कमलोद्भवानें मधाचा ( तमोगुणाचा ) योग केल्यामुळें सत्यवादी गंधर्वांनीं हे विकार ( मोहाचे प्रकार ) सुरू केले. त्या वेळीं मोठी गर्जना करणारा बलाढ्य मधु, व इतर दानव आणि असुर यांनीं ह्या गंधर्वांचे गायनांत आपलें मन प्रत्यक्ष आसक्त केलें.

याप्रमाणें मधूचें मन चहूंकडून विषयांत भुलवून दिव्यदृष्टीनें पहाणारा विष्णु, काष्ठांतील गुप्त अग्नीप्रमाणें, मंदर पर्वतांत गुप्त होऊन राहिला. यामुळें किंचित् मनानें व्यथा पावलेले ऋषि ( मंत्र ) उदात्त मनाच्या ब्रह्मदेवाला ( परमात्माला ) पुढें करून क्षणांत गुप्त झाले. मधाप्रमाणें लाल झालेले आहेत डोळे ज्याचे अशा मधूनें ( मोहानें ) क्रुद्ध होऊन आपल्या भुजानें विष्णूच्या ( विवेकाच्या) गळ्याजवळ प्रहार केला; पण तो भगवान् एक पाऊलभरही मागें सरला नाहीं विष्णूनें (विवेकानें) मात्र छातीवर प्रहार केला, तेव्हां मधु रक्त ओकीत गुडघे टेंकून जमीनीवर पडला. युद्धांत निष्णात अशा अचिंत्यपराक्रम विष्णूनें हाच समय आहे असें समजून या पडलेल्या मधूस बाहुयुद्धानें मारिलें नाहीं. गुडघ्यांनीं जमीनीवरून इंद्रधनुष्याप्रमाणें उठून मधु रागानें लाल होऊन जणूं काय डोळ्यांनीं जळत ( जाळीत ) आहे असें दिसलें. नंतर कठोर शब्दांनीं एकमेकांवर गर्जना करीत परस्परांचा वध करण्यास इच्छिणारे ते वीर बाहुयुद्धास प्रवृत्त झाले. ते दोघेही बाहूंनीं बळकट, दोघेही युद्धांत निष्णात, दोघेही तपानें शांत झालेले, व दोघेही सत्यपराक्रमाचे होते. ते दृढप्रहार करणारे वीर परस्परास ओढूं लागले; तेव्हां ते दगडांसारख्या पंखांनीं युद्ध करीत असलेल्या पर्वतांप्रमाणें दिसले ते मत्त होऊन परस्परांस जमीनीवर ओढीत असतां व नखांच्या टोंकांनीं एकमेकांनें आक्रमण करीत असतां, दांतांच्या अग्रांनीं परस्परांस फाडणाऱ्या हत्तींप्रमाणें दिसले. नंतर त्यांच्या व्रणांच्या मुखांपासून, उन्हाळ्याच्या शेवटीं (पावसाळ्यांत) पर्वतांमधून धातुयुक्त कांचन गळावें त्याप्रमाणें पुष्कळ रक्त गळलें. गळणाऱ्या रक्ताच्या प्रवाहांनीं शिंपडले जाऊन रंगून गेलेल्या त्या वीरांनीं आपलीं पादाग्रें उचलून ( हाणून ) पृथ्वीला विदीर्ण केलें. परस्परास अनेक प्रकारांनीं प्रहार करणारे ते वीर मांसाच्या आशेनें परस्परांशीं पंखांनी लढणाऱ्या पक्ष्यांप्रमाणें दिसले.

इतक्यांत पुष्करामध्यें सर्व भूतांनीं, श्रेष्ठवर्ण संपत्तीनें युक्त अशा सिद्धाच्या तोंडून निघालेल्या विष्णूच्या स्तुती ( विवेकाची तारीफ ) अंतरिक्षांत ऐकिल्या. त्या सत्यपराक्रमी ईश्वराच्या त्या अबाधितार्थ अशा स्तुती होत्या. हें शरीर तेजोबन्न (पृथ्वी, जल,

१ येथपासून पुढें मोह हा विवेकाचा पाडाव करण्यासाठी कसा अखंड झगडत असतो ते रूपकानें दाखविलें आहे.

१ एकदां रूपक चढविलें म्हणजे तें सर्वांगीं रंगवून दाखविणें ही सहज प्रवृत्ति आहे. बाकी विवेक व मोह याचें द्वंद्वयुद्ध हाच निष्कर्ष आहे.

२ हा मलिन देह हा अनात्मा होय. असें असतां त्याचेच ठायीं आत्माध्यास करणें हाच मोह. हीच अविद्या होय. अशा देहाचा चालक जो तेजोमय तो तद्विलक्षण आहे, ही जी दृष्टि तीच विवेक होय. हा विवेक दाखविण्याकरितां पुढील श्लोक आहेत.

तेज ) धातु व तद्विलक्षण चेतन्य यांनीं युक्त आहे. तें चैतन्यच ब्रह्म असून इंद्रियांनीं युक्त होऊन जीवत्वाला पावलें आहे. वास्तविक तें तेजोरूप व सनातन आहे. सर्व भूतें खरोखर प्रलय झाला असतां सूक्ष्मांत राहतात. पुन: तें सूक्ष्म पुष्कळ रूपांनीं अनेकप्रकारें उद्भवतें. कारण, स्थूल, सूक्ष्म व कारणशरीर या शरीर त्रयरूपी तीन्ही लोकांमधील भूतांचें स्वरूप जाणून त्यानांच स्वकीय चैतन्यानें व्यापून तो असंग आत्मा बहुरूप होऊन त्यांची इच्छा पुरवितो. हा सुरूप वशी ( आत्मा ) अनेक कारणांतरानीं मानसशरीर धारण करून त्या अनेकरूप लोकांमधून संचार करितो. हा योगात्मा शेषरूप धारण करून पृथ्वीचें धारण करितो. हाच द्युलोकाचें धारण करितो. हा ईश्वर ब्रह्मभूत ( ह्म०वेद व चतुर्विध भूतें ) या पांचाचेंही सूक्ष्मरूपानें आपण धारण करितो. तो वेदरूपानें ब्राह्मणांत असतो; युद्धस्वरूपानें क्षत्रियांत असतो; दान देण्याच्या स्वरूपानें वैश्यात असतो व सेवेच्या स्वरूपानें शूद्रांत असतो. गाईंना क्षीर देऊन, अश्वाना यज्ञांत प्रोक्षण करून, पितरांना उष्महविर्भागानें, देवतांना वेदहविर्भागानें, तो रक्षण करितो. चार व्यतिरिक्त अन्नांनीं ( दर्श, पूर्णमास, पिंड, पितृयज्ञ हीं चार ) व तीन दुसऱ्या धातूंनीं ( मन, वाणी व प्राण यांनीं )—या प्रकारें सात प्रकारचे नित्य (अकरणी प्रत्यवायरूपी ) अन्नानीं, तो पितरासह तीन लोकांचें रक्षण करितो. हें वरील सप्तक नित्य व चंद्रसूर्यात्मक असून तें प्रकाश ( अर्चिरादिमार्गरूप ) व अप्रकाश ( धूमादिमार्गरूप ) अशा दोन स्वरूपाचें व स्वतःच्य च तेजानें ( चिदाकाशानें ) निनरां गूढ आहे व त्यानेंच आत्म्याला संकटांत पाडिलें आहे. तें सूर्यात्मक ह्मणण्याचें कारण असें कीं, यांतील मन, वाणी व प्राण हे तीन पितर अर्चिरादि मार्गाला किंवा सूर्याला वाढवितात. त्याचप्रमाणें बाकीचे चार पितरांनीं चंद्र स्वमंडळाच्या ठाईं वाढतो. तीन पितृगण नित्य फलभोगानंतर पिंड खातात; ( स्थूल, सूक्ष्म व कारण या देहांचा संहार करितात ). दुसरे चार पितृगण शरीराकारानें सिद्ध असून पांचांचें ( पंचविषयांचें ) ग्रहण करितात.

हे प्रभो, तूंच ते पांच धर्म आहेस; तूंच आकाशादि भूतें आहेस; तूंच सनातन, दिव्य, शाश्वत व ब्रह्मसंभव आहेस. अग्नि व वायु सर्व प्रकारें तुजपासूनच तें तेज घेतात. त्यामुळें तूं आदित्य झालेला आहेस. कारण, तूं युगांतकाळीं आपल्या किरणांनीं जणूं काय जाळीतच सर्व जग खाऊन टाकतोस. तूं परमसिद्धि पावलेला आहेस. पौर्णिमा व अमावास्या या पक्षांच्या संधीस, सूर्य, चंद्र व वसु यांच्यासारख्या तेजस्वी ऋषींसहवर्तमान तूं गुप्तरूपानें मनुष्यलोकांत संचार करितोस. तेव्हां, ज्या स्वर्गप्राप्त्यादि हेतूंनीं कर्म केलें जातें ते हेतु बिघडूं नयेत व कर्माचा विपर्यय ( लोप ) होऊं नये म्हणून, यज्ञ करणाऱ्याची पुष्टि वाढविणारें कर्म तूं सफल करितोस; वनस्पति व औषधि यांत तूं एकदमच शिरतोस; कालस्वरूप धारण करण्याकरितां तूं याप्रमाणें पक्षा-पक्षास भूतळीं जन्म घेतोस. हे भूतेशा, हे विभो, पृथ्वीच्या पाठीवर मागच्या व पुढें येणाऱ्या भूतांकरितां जेवढें कांहीं या जगांत द्रव्य असेल तेवढें सर्व त्वन्मय आहे. तूंच या जगतीतलावरील नानाप्रकारचे शाश्वत धर्म आहेस; देव, यज्ञ, मंत्र, वाक्य, आत्मयज्ञ, मानुषयज्ञ वगैरे तूंच आहेस. सूर्य व चंद्र यांप्रमाणें स्वर्गमार्गही दोन प्रकारचा आहे. चंद्रमा ( हा ) पितृयान आहे व सूर्य हा देवयान आहे. तूंच भूमि होऊन

१ एको वशी सर्व भूतांतरात्मा एकं रूपं बहुधा यः करोति । श्रुति ।

मर्यादेनें सर्व विश्वांतील विषय-भोग करितोस. तूं सर्व ( इंद्रिय- )गणांस एकत्र करून या लोकीं (देहांत) जन्म पावतोस; तूं एकटाच येथें जन्मलेला आहेस. तूं पुराणपुरुष व विराट् स्वरूपी आहेस. तूं अक्षय, अप्रमेय, जितेंद्रिय व लीलाचारी आहेस. तूं रूपानें तेजांत प्रकट आहेस. वायु हा आकाशांत चोहोंकडे फिरतो. महदादि सात रूपांनीं ( तूं ) नित्य हें सर्व व्यापून राहतोस. तूंच एक धाता साधनकाळीं जीवरूप, निर्वाणकाळीं शुद्धरूप, व नित्यप्रलयकाळीं व ब्राह्मप्रलयकाळीं रुद्ररूप आहेस. तूंच वर्णाश्रमपालक व चिद्रूपाने इंद्रियप्रवर्तक हि तूंच आहेस. नित्य तूं पापरहित, सत्यकर्मी, व जितेंद्रिय अशा मुनिगणांकडून सेविला जातोस. तसेंच, विबुध ( देव ) सिद्ध ( सद्गुरु ) व श्रेष्ठ मुनि यांकडून तूं स्तविला जातोस.

या स्तुतीनें बोध प्राप्त होऊन महाहरि म्ह० मेहद्राख्य जीव आपलें सर्व देवमय व सर्व वेदमय हयशिरोयुक्त विपुल ( सर्वात्मक ) शरीर आठविता झाला. त्याच्या शिराचे ठायीं महादेव, हृदयाच्या ठायीं ब्रह्मा, सूर्याचे किरण हेच केंस, चंद्रसूर्य हे डोळे, जांघांत वसु व साध्य, सर्व संधींत देव, अग्नि हीच जिव्हा, व वेदवाणी हीच सरस्वती व देवीही तीच. मरुत् व वरुण हे जानुदेशी राहिलेले याप्रकारें देवांचें अद्भुत व मोठें स्वरूप धारण करून विष्णु रागानें नेत्रांचीं टोंकें लाल करून त्या असुरानें मर्दन करूं लागला. नंतर मधूच्या मेदानें सर्व पृथ्वी भरून गेली. तेव्हां ती त्या मेदानें, पांढरें वस्त्र नेसलेल्या पुष्टस्तनयुक्त तरुणीप्रमाणें दिसूं लागली. हे राजन्, तेव्हांपासून पृथ्वीला मेदिनी अशी संज्ञा प्राप्त झाली; व तेंच नाम हजारों असुरांमुळें ( बळकटी पावून ) पृथ्वीच्या ठाईं प्रतिष्ठित झालेलें आहे.

१ 'असुरसहस्रेण' याचा अर्थ नीलकंठानें 'मोहानें पूर्ण होणारें शरीर' असा केला आहे. तो एकंदर धोरणाला धरूनच आहे.

## अध्याय सत्ताविसावा.

—:०:—

### ब्राह्मीसंपत्ति.

वैशंपायन सांगतातः—याप्रमाणें मधुराक्षसाचा निःपात झालेला पाहून ( मोहाचा पाडाव झाल्यानें ) पुष्करांतील देवऋषिमनुष्यादि सर्व भूतें ( आतां आपला कारणब्रह्मांत प्रवेश होईल ) असें वाटून अतिशय हर्षित होऊन एकमारखीं गाऊं व नाचूं लागलीं. पर्वतश्रेष्ठ सुपार्श्वमेरु ( पक्षी गुरु ) बहु प्रकारें विचित्र सोन्याच्या शिखरांनीं आकाशास स्पर्श करीत असल्याप्रमाणें दिसला. सोनगेरु-प्रभृति धातूंनीं चोहोंकडे रंगलेले इतर पर्वत देखील उंच शिखरांच्या योगानें विद्युद्युक्त मेघांप्रमाणें शोभले. पंखांच्या वाऱ्यानें उडालेली धूळ अंजन व वाळूचे कण यांच्या चूर्णांनीं पर्वतांचीं शिखरें आच्छादित करूं लागली असतां महा मेघाप्रमाणें दिसली. मेघांनीं ज्यांचे शिखरांचा आश्रय केला आहे, ज्यांतील वृक्ष पक्ष्यांचे फडफडीनें अस्ताव्यस्त झाले आहेत, व ज्यांमधून अलोट सुवर्ण बाहेर येत होतें असे ते पर्वत आकाशांतच असल्याप्रमाणें दिसत होते. ते सर्व पर्वत पंखयुक्त, शिखरान्वित व सुवर्ण धातूनें रंजित असल्यानें वाऱ्यानें त्यांवरील धूळ उडूं लागली ह्मणजे तेणेंकरून ते पर्वत पक्ष्यांस

१ गताध्यायीं सांगितल्याप्रमाणें अभ्यानें स्वतःचे ठिकाणीं सत्वाचा प्रकर्ष संपादून त्याचे प्रभावानें मोहाचा निःपात केल्यावर हृदयाकाशाचे ठिकाणीं यावज्जगत्प्रतीति होऊं शकते हें चालू अध्यायांत दाखविलें आहे. असा चतुर्धराचा अभिप्राय आहे.

२ पूर्वी पर्वतांना पंख असत व ते इंद्रानें पुढें छेदिले अशा प्रकारची आख्यायिका आहे. येथेही पर्वताला 'सुपार्श्व' म्हटलें आहे.

भीति उत्पन्न करीत होते. ते सर्व सोन्याचे पर्वत स्फटिकाच्या मणींनीं, सूर्यकांतांनीं व निर्मळ अशा चंद्रकांतांनीं खचलेले होते. त्यांतील हिमवान् नामक महापर्वत पांढऱ्या शुभ्रधातूंनीं व सूर्यकिरणांनीं झळकणाऱ्या सोन्याच्या शिखराग्रांनीं व्यापिलेला होता. तो पक्षांतून निघालेल्या तेजस्वी मणींनीं व आपल्या प्रकाशानें दीप्त होणाऱ्या ताम्रपुष्पयुक्त शिखरांनीं शोभत होता. वज्रगर्भ (ज्याच्या गर्भी हिरे आहेत अशा) स्फटिकमणींनीं व्यापिलेला व उग्र ( भयंकर ) शिखरांचा निराधार मंदर पर्वत स्वर्गासारखा भासत होता. शिल, व धातू यांनीं शोभायमान, हजार शिखरांचा, शेंड्याकडे फार विस्तारलेले व अत्युच्च आणि बारीक सोटाचे वृक्षांमुळें स्तंभरहित बहिर्द्वारांनीं युक्त असल्यासारखा, उत्तम प्रकारें वाद्यें वाजविणाऱ्या गंधर्वांनीं, उत्तम गाणाऱ्या किन्नरांनीं, व देवकन्यांच्या आंगचे हावभावांनीं क्रीडापर्वताप्रमाणें तो शोभत होता. मधुर वाद्यें व गीतें, अभिनयानें युक्त असलेलीं नृत्यें व अंगविक्षेपांसह शृंगारभाव यांच्या योगें कैलासपर्वत मदनाप्रमाणें ( रसोद्दीपक ) झाला. सूर्यकिरणांनीं प्रकाशमान होणाऱ्या, व वाटलेल्या काजळाच्या ढिगाप्रमाणें असलेल्या शिखरांच्या योगानें नीळ्या मेघांनीं काळसर दिसणारा विंध्यपर्वत, छिन्नविच्छिन्न झालेल्या मेघाप्रमाणें दिसूं लागला. सर्व भूतांच्या प्राणधारणाकरितां महाबलवान् अशा मेरुपर्वताच्या पृष्ठभागावर उत्तम मेघसमूहांप्रमाणें निर्मल तोयाचा वर्षाव सर्व पर्वतांनीं केला.[2] अनेक प्रकारच्या चित्रविचित्र अशा शिलांमुळें, बहुरूप अशा धातूंमुळें व स्फटिकासारखें स्वच्छ पाणी ज्यांतून पाझरत आहे अशा गुहाद्वारांमुळें त्या शैलांचीं शृंगें शोभत होतीं. ग्रीष्मकाळाच्या अंतीं वायूनें घोंटाळलेल्या विद्युद्युक्त मेघांप्रमाणें, चित्रविचित्र फुलांनीं भूषित झालेले वृक्ष शोभत होते. त्या पर्वतावरील हत्ती सोन्याच्या विचित्र भूषणांनीं युक्त झाल्याप्रमाणें दिसत असत. तेथील वृक्षांच्या आश्रयानें राहणाऱ्या वेली अनेक पक्ष्यांनीं गजबजून ( व्यापून ) गेलेल्या होत्या. लोंबणाऱ्या पुष्पयुक्त त्या लता वायूनें हालविल्या असतां नाचत असल्याप्रमाणें दिसतात. चैत्रमासांतील एकाद्या दिवशीं वाऱ्यानें हालविल्या असतां त्या लता, (सागर) वेला जशी तटावर आदळतांना उसळलेल्या तुषारांनीं जलाचा वर्षाव करिते, त्याप्रमाणें फुलांच्या समूहाचा वर्षाव करितात. बळवान् व विपुल अशा शाखांनीं, पारंब्यांनीं व बुंध्यांनीं व तसेंच पुष्कळ पालवींनीं झाडें पृथ्वीस धारण करितात. मधुकर व मधूनें ( वसंतानें ) मत्त झालेले पक्षी गात गात जणूं काय कामाच्या ( वसंतऋतूचे ) आगमनाचा डांगोरा पिटतात असें दिसूं लागलें. मधुराक्षसास मारणाऱ्या विष्णूनें मधुवाहिनी नदी उत्पन्न केली. तिच्यांत उदक विपुल असून तींतून अनेक प्रवाह फुटत होते व तिचे काठांनीं अनेक सुतीर्थ म्हणजे सोईकर उताराच्या जागा होत्या. त्या नदींतील वाळू निखाऱ्याप्रमाणें लाल होती. तींतील जल मधासारखें गोड होतें. ती पुष्पसंचय वाहून नेणारी व निर्मल जलानें भरलेली नदी मना-

१ येथें मुंबई पाठ ' निर्मलाः ' असा आहे, पण " निर्मलैः " हा कलकत्ता पाठ आम्हीं घेतला आहे.

२ या दोन्ही श्लोकांचा लक्ष्यार्थ नीलकंठाचे म्हणण्याप्रमाणें असा आहे कीं :—मेघश्याम विष्णु प्राण्यांच्या जीवनार्थ ज्याप्रमाणें पृथ्वीवर जलवर्षाव करितो, त्याप्रमाणें मागें सांगितलेल्या विंध्यमंदरादि सर्व पर्वतांनीं मेरुपृष्ठ ह्मणजे भूघ्राणमध्यें आपापलें प्रभारूपी जल ओकून टाकिलें.

१ सत्वोत्कर्षामुळें योग्याला दिव्य विषयांनीं युक्त अशा ' मधुमत्यादि ' भूमिकांची प्राप्ति होते, असा येथें भाव समजावा.— चतुर्धर.

रम होती. ब्रह्मदेवाच्या (योग्याच्या) वचनानें प्रेरित व ब्रह्मतंत्रांचें नितरां सेवन करणारे ऋषी जिच्या मार्गे चालले आहेत अशी ती नदी पुष्करामध्यें प्रवेश करिती झाली.

या प्रकारें योगविघ्नांचा उपशम होतांच ब्रह्मविद्यासंज्ञक'अहंब्रह्मास्मि' या वाक्यानें दर्शविलेली वृत्ति उदय पावते. धात्री (मूलप्रकृति) ब्रह्मदेवाच्या वाक्यानें प्रेरित होत्सार्ता कपिलवर्णाची ( त्रिगुणात्मक मिश्ररूपाची ) गाय होऊन यज्ञ ( योग ) चालला असतां ( अधिक बळावला असतां ) ( त्यासाठीं ) मधुर असें दूध देते ( आनंदस्वरूप ब्रह्म प्रकट करित्ये ). मस्तकाप्रमाणें सर्वांत श्रेष्ठ अशी जडवृत्ति कूटस्थ वस्तूशीं संधान करण्याकरितां देहाचा आश्रय करिते व ती पृथ्वी जशी जलांत विरावी त्याप्रमाणें जेव्हां विरते तेव्हां योगी निर्विकल्प समाधीचे योगानें शाश्वत व परमाद्भुत अशा शुद्ध चिन्मात्राचा अनुभव घेतो. ( निर्विकल्पत्वावरून ब्रह्म हें केवळ शून्य आहे असें कोणी ह्मणेल म्हणून सांगतात कीं ) ब्रह्माविषयीं 'अस्तीत्येवोपलब्धव्यः' ह्मणजे परमात्मा आहेच ह्मणून तो प्राप्त करून घ्यावा अशी वेदवाणी आहे व तीवरूनच लोकांत मूळ ब्रह्माचें ज्ञान पसरलें असून तें अज्ञानाचा विरोध करणारें व भ्रूघ्राणमध्याचे ठिकाणीं प्रत्ययास येणारें, मरुमरीचिकेसमान विषयांचें अतिक्रमण करून, प्रतिपुरुषाचे ठिकाणीं राहणाऱ्या मायाशबल परमाकाशांत संचार करितें. अत्यंत सुंदर रूपाची व अदृष्टधर्मास जाणणारी अजा ( माया ) तपोयुक्त तेजानें[1] ( चित्तानें ) त्या दिव्यरूपी तत्वास अहंकारानें आच्छादित करिते. हा अभेद्य महान् पर्वत ( अहंकार ) अजगंधानें ( ह्म० सन्मात्र वस्तूच्या लेशानें ) झालेला व नंतर त्याजकडून सोडला गेलेला आहे. ( ह्म० हा अहंकारोत्थित संसार जागृति व स्वप्न या अवस्थांतच सत्यसा भासतो तथापि तो समाधि, सुषुप्ति इत्यादि अवस्थांत नष्ट होतो ( यामुळें मिथ्या समजावा. ) या अहंकार पर्वताचें गुरु हा द्वार आहे ( ह्म० याचें तत्त्व गुरूपदेशानेंच कळतें ). तीन गुणांवरच त्याचा प्राण आहे. [ त्रिगुणातीत झालें ह्मणजे हा अहंकार आपेआपच नष्ट होतो ]. हा अनादि असून सिद्धांनींही सेवित आहे. [ मग मूढांची कथा काय ] ? हा पर्वत चित्रविचित्र व सुंदर सोन्याच्या वेदिकांनीं सुशोभित आहे [ जाग्रदादि परस्परभिन्न व सुंदर अशा अवस्थांनीं विराजित आहे ]. हे विपुलदक्षिण राजा, जगच्छिल्पी जो ईश्वर त्यानें अहंकारोत्पत्तीला कारण जें मूल अज्ञान तें व्यापिलें असून तो स्वतः त्यापलीकडे आहे. धातूंनीं व्याप्त असलेल्या मेरूप्रमाणें हा अहंकार शरीराकारानें परिणत झालेल्या पंचमहाभूतांनीं व्याप्त असून दिसण्यांत मोठा अद्भुत व स्वतः अचेतन असतांही प्रसिद्ध चेतनेनें युक्त आहे.

मीच या धर्माचरण करणाऱ्या देहास संकल्पमात्रानें निर्माण करतों. नानाप्रकारचें रूप [ दृश्य ] पार्थिव घटना [ शरीर ] व त्याचप्रमाणें त्यांतील चेतनाही मीच करितों. पंचेंद्रियांच्या योगें मीच तीन लोकांस जाणतों [ असें सर्वात्मा परमेश्वर ह्मणतो ]. सहाव्या मनरूपी इंद्रियानें मी धर्मचारिणी [ असंग

१ अनेक मधुरप्रवाहयुक्त अशा नदीचे रूपकानें दर्शविलेली स्वप्नतुल्य जी मधुमती नामक योगभूमि ती 'नेहनानास्ति किंचन' (म्ह० एथें अनेकत्व कसें तें नाहीं ) अशा श्रुतीनें योगी बोधित होतांच त्याचे हृदयाकाशांत लीन झाली. म्ह० सर्व तरंग जिरले.

[1] पोथींत पाठ 'तेजसा' असा आहे व नीलकंठानें टीकेंत 'चेतसा' असा पाठ धरिला आहे. कलकत्ता पाठ 'वर्चसा' असा आहे.

चिदाकार वृत्ति ] उत्पन्न करितों. विद्या व अविद्या मीच देतों. जे विपुलैश्वर्ययुक्त पुरुष समृद्धीचा संयोग झाला असतां ती केवळ कल्पनामय व भ्रमात्मक आहे असें पक्कें ओळखून [ ह्मणजे विषयांविषयीं दोषबुद्धि ठेवून ] सर्वसंगमुक्त होत्साते [ वैराग्ययुक्त होऊन ] विषयपरिग्राहक जीं ज्ञानेंद्रियें व मनःप्राण त्यांचा [ अभ्यासानें ] निग्रह करितात तेच या आत्मविद्येचे अधिकारी होतात. पंचधातुमय देहांत जखडलेले व अनेक प्रकारच्या फलांची लालुच दाखविणाऱ्या अर्थवादक श्रुतींनीं प्रेरित होऊन काम्य कर्मांचे मार्गें लागलेले लोकांतून कोणीही इच्छेस येईल तें रूप घेणाऱ्या अशा मला मनानेंही प्राप्त होणार नाहीं, अगर जाणणार नाहीं. जे पुष्कळ प्रकारें रामकृष्णादि नानाप्रकारचे माझ्या ऐच्छिक स्वरूपांचे द्वारा माझी विष्णूची प्रणवादिकांचे उच्चारणानें उपासना करितात, तेच त्या तपानें त्यांचें पाप जळून गेल्यामुळें, व्यक्तद्वारा मला अव्यक्ताला पाहूं शकतील. जे धर्ममार्गांत असलेले जन पायरी पायरीनें माझे निर्गुणरूपापर्यंत मजल गांठतात ते देखील स्वर्गास जिंकतात व खेदरहित होऊन तेथें मला पाहतात. जो हा उंच पर्वत मेरुपृष्ठाच्या ठिकाणीं आहे [ भ्रूप्राणमध्यांत समष्टयहंकार आहे ] त्यावर चढून, व इंद्रियांचा आत्म्याचे ठिकाणीं लय केल्यानें निर्मल होऊन अविद्येशीं युद्ध करितात. ते निर्मल जन अप्सरांशीं संयुक्त होऊन मनोवेगानें नंदनवन व काम्यकवन यांत फिरूं शकतात; परंतु हे भोग योगसिद्धीला विघ्नभूत समजून ते त्यांचा अव्हेर करितात. आणि यास्तव ही विद्या मिळवून माझे भक्त पुष्कराच्या ठायींच आपलीं शरीरें नानाप्रकारच्या व्रतांनीं क्षीण करितात. अनेक प्रकारच्या सिद्धि पावलेले ते लोक मन मानेल त्या त्या विषयाला प्राप्त होऊं शकतात व या लोकांत व परलोकांत यथासुख गमन करूं शकतात! जेव्हां अशा प्रकारचा तपामुळें प्राप्त झालेला प्रभाव योगी दाखवितात, तेव्हां ज्ञानानें संपन्न झालेले ते त्रिभुवनामध्यें 'ब्रह्मविद्या–सिद्ध' अशी ख्याति पावतात. सहा ज्ञानाभिसंधींच्या साक्षात्कारामुळें ससंग्रह असलेले मूलाधारादि षट्स्थानांचा संयमबलानें साक्षात्कार झाल्यानें अढळ योगैश्वर्याला पावलेले ते [ योगी ] देहबंधापासून मोकळे होऊन कर्मशून्य होतात. [ नैष्कर्म्यसिद्धि पावतात. ] ज्याप्रमाणें एकदा अपराधी [ राजाला ] सहस्रपट [ दंड ] देऊन त्या दानबलानें राजाची कृपा संपादून मुक्त होतो, त्याप्रमाणें ब्राह्मणांचा सन्मान, शुद्धचित्तानें केलेलें दानरूपी कर्म व सर्वभूतीं उदारबुद्धि, या योगें धर्मज्ञ साधक आपल्या सर्व वंशजांसह परलोकीं आत्यंतिक दुःखपरिहाररूप फल [ मुक्ति ] मिळवितात. ब्राह्मणांनीं परिपूर्ण असलेल्या या यज्ञामध्यें ज्या यजमानादिकांचें यज्ञांगदेवतांचे ठायीं चित्तैकाग्र्य होतें त्यांसही वारंवार अवभृथ स्नानादिकांचा अभिषेक प्राप्त होऊन पूर्वोक्त फल मिळतें.

हे राजा, दानयज्ञादिकांनीं प्राप्त होणारी जशी संपत्ति तशीच तपोधनाचे सन्निध असणारी ही गोरी म्हणजे ब्रह्मविद्यारूपी संपत्ति आहे, असें तूं समजत असशील तर असें मानूं नको. हिची योग्यता तशांतली नव्हे, ती बाह्य संपत्ति केवळ स्वार्थपर व संकुचित किंवा परिमित असते, परंतु ही ब्राम्ही संपत्ति मानस असल्यामुळें अपरिमित असते व भूतमात्रावर अनुग्रह कर-

---

१ सत्यसंकल्पित्वादि.

२ या ठिकाणीं 'अवमान' शब्दाचा 'सन्मान' असा अर्थ नीलकंठांनीं धरिला आहे.

३ या श्लोकाचा अर्थ आम्हीं सर्व शंका सोडून नीलकंठ म्हणेल तें पत्करून केला आहे, या श्लोकांत 'मम' या पदाचा अर्थ नीलकंठानें 'नैव मंतव्यं' असा केला आहे. त्याला आधार नीलकंठ जाणे.

णारी असल्यामुळें परमोदार असते. अविद्या-युक्तापासून दूर असणारा, आणि या ब्रह्मविद्येचे योगानें प्रतीत होणारा हा अब धित रूप आत्मा धर्माचरणानेंही प्राप्त होतो. कारण, कोणा.ी धर्मनिष्ठ मनुष्यानें निष्काम धर्माचें आचरण केल्यास तें विफल होत नाहीं, अ । अनुभव आहे. याकरितां ब्रह्मविद्यासिध्यर्थ साधकानें निष्काम-धर्माचरण करावें.

## अध्याय अठ्ठाविसावा.

—:०:—

### सूर्य-चंद्रादि धारणांचें फल.

वैशंपायन सांगतातः—दिव्य उत्तर दिशेस जाण्याची [ मोक्षप्राप्तीची ] इच्छा करणारा, सत्यसाधन, परमधर्मात्मा कमलनेत्र विष्णु धातूंचा [ तेजोबन्नात्मक ] आगर बनलेल्या पर्वताच्या [ शरीराच्या ] पवित्र तटावर [ भ्रूनासामध्यें ] पुष्कराच्या ठाईं [ हार्दाकाशांत ] दहा हजार वर्षेपर्यंत, स्वतःला आत्म्याच्या ठाईं एका पायावर राहून [ केवळ तुर्यावस्थेंत राहून ] तप करीत राहिला. तो ब्रह्मोद्भव देव तपानें व उग्र कर्मानें [ शुद्धात्म्यांत मायोपाधीचा लय करून ] लोकांच्या उद्धारार्थ मोक्षप्राप्त्यर्थ यत्न करितो. प्रकाशमान असा तो तपोधन, योगात्मा व ब्राह्मणश्रेष्ठ सोम स्वतः आपलें शरीर भस्मानें आच्छादित करून नऊ हजार वर्षेपर्यंत, आपल्या तेजानें हीं नक्षत्रें उत्पन्न करून, सर्व जगावर उपकार करीत आकाशामध्यें उभा आहे. तो परमधर्मात्मा सोम योगयुक्त होऊन मनानें [ शब्दादि ] विषय टाकून, व मनाचा निग्रह करून ब्राह्मी सिद्धि पावला. पृथ्वी व आकाश व त्या उभयांमधील अवकाश यांच्यामध्यें चोहोंकडे तो बहुरूप श्रियाविराजित होऊन ( नानाप्रकारचे औषधींत रसरूपानें प्रविष्ट होऊन ) आपलें प्रकाशण्याचें काम करीत असलेला दृष्टीस पडला. गूढस्वरूपी, महेश्वर, व ब्रह्मसंभूत असा जो महायोगी महादेव तो वायुभक्षण करीत, शांत चित्तानें व नियमानें उजवा पाय वर घेऊन ( अहिंसादियुक्त जप करून ) एक लक्ष आठ हजार वर्षेपर्यंत वृषभ ( धर्म ) रूपानें राहिला. नंतर घन झालेला वायु त्या गोपतीच्या ( इंद्रियनिग्राहकाच्या ) शरीरांत संचार करूं लागला. तेव्हां तो गोपति फेनरूप झालेल्या वायूला तोंडानें बाहेर सोडूं लागला. तेव्हां उद्गारवायूबरोबर तोंडांतून बाहेर पडलेला तो फेंस विलक्षण रूपांतर पावला. वृक्षाच्या अंगांतून बाहेर पडणाऱ्या गोंदाप्रमाणें तो खालीं पडला. तो फारसा ओलाही नव्हता व पाषाणाप्रमाणें केवळ कोरडाही नव्हता. चामड्याच्या पखालीप्रमाणें पाणी आंत शिरलेला तो फेंस वायुशीं संयुक्त होऊन या अंतरिक्षांत फिरूं लागला. निरालंब अशा वायूनें तत्काळ पाण्यासह त्या फेंसास निरालंब अशा आकाशांत उडविल्यामुळें तो अभ्ररूप झाला. नंतर ते मेघ स्वतःला स्वतःच्या योगें धट्टित करून भूमीवर पाणी पाडतात. ते रंगानें नीळसर तांबडे असून ओलेही नसतात व कोरडेही नसतात.

असो, सर्वत्र जाणणारा व स्वाधीन असा वायु ब्राह्मीमूर्ति धारण करून संपूर्ण हजार

१ लोकांत योगाभ्यासाविषयीं अधिक श्रद्धा उत्पन्न व्हावी, म्हणून विष्णुप्रभृति देवही योगाभ्यासामुळेंच परमैश्वर्याप्रत प्राप्त झाले, हें या अध्यायांत दाखविलें आहे, असें चतुर्धराचें म्हणणें.

२ विश्व, तैजस, प्राज्ञ व तुरीय हे चार पाय मानिले असतां एकपाद म्ह० तुर्यावस्था समजावी.

१ धर्माला वृषभाची उपमा दिली व जपादिक जीं अहिंसायुक्त सकाम व निष्काम कर्में तीं त्याचे उजवे दोन पाय व हिंसायुक्त जीं यज्ञादिक सकाम व निष्काम कर्में ते डावे दोन पाय अशी कल्पना आहे.

वर्षेंपर्यंत विपुल तप करिता झाला. अग्निही बहु जटावान् होऊन चीरवल्कलें धारण करून आहार न घेतां, पुष्करांत मौन धारण करून तप करिता झाला. असें त्यानें चार हजार वर्षेंपर्यंत केलें. त्या अग्नितेजापासून महान् अग्नि उत्पन्न झाला. तो स्वर्गवासी अग्नि स्वर्गप्रापक अशा यज्ञादि कर्मांचे ठायीं गार्हपत्याग्निरूपानें प्रकाश पाडून शिवाय सूर्यादि रूपानें स्वर्गांत राहून प्राण्यांच्या नेत्रांचा अंधःकार नाहींसा करिता झाला. तो ब्रह्मसंभव अग्नि स्वर्गांत भूतप्रकाश या नांवानें प्रसिद्ध होऊन राहिला. ( हेंच तेजनामक तिसरें भूत ) तो स्वर्गांतील अंधःकार [ धूमादिमार्ग ], हे राजेंद्रा, या भूतलावर माणसांमध्यें [ वर्णाश्रमाभिमान्यांचे ठिकाणीं ] प्रतिष्ठित झाला; परंतु अग्नि इत्यादि सर्व तेजांचा संहार करणारा सूर्य सर्वोत्तम होय. तो सर्व मर्त्य भूतांच्या तेजाचें आहरण करितो; पण, हे राजन्, ज्याच्यामध्यें योगबल असतें त्याचें व विशेषतः ब्राह्मणाचें तेज तो हरण करीत नाहीं. तो पूर्वोक्त गुणांनीं युक्त सूर्य [चंद्रस्वरूपानें] रात्रींही तमाचा नाश करितो; व स्वस्वरूपानें दिवसाही त्यास प्रादुर्भूत होऊं देत नाहीं. महातेजस्वी, सर्वगामी, स्वतंत्र व धार्मिक पुष्पमित्र यक्ष शांतचित्त होऊन पुष्करांत तप करितो. महेंद्रपर्वताच्या शिखरावरून जितक्या धारा पृथ्वीवर पडतात तितकीं [ असंख्य ] वर्षें तो यक्ष शरीरवान् होऊन प्रकाशतो. गुडघे टेंकून भूमीवर पडून तो नमस्कारप्रिय सूर्याची आराधना करितो. आकाशांतील ज्योति पाहातो. एकसारखीं हजार वर्षें तो नेत्र न मिटतां सर्व जग पाहतो. त्याच्या नेत्रप्रांतांतून धारणेच्या सामर्थ्यानें अनेक नेत्र उत्पन्न होतात. तो दिनकर परिवेषा [ खळ्या ] प्रमाणें किरणवान् असून मध्यभागीं आरशाच्या पृष्ठभागाप्रमाणें आहे. यज्ञांत विद्वानांच्या योगें अग्नि शोभल्याप्रमाणें प्रभानेत्राच्या योगें ते शेंकडों हजारों किरण तेजःसंयोगानें शोभतात. तो प्रारब्धकर्माचा क्षय झाला असतां किंवा बहुरूपी जगाचा युगान्त झाला असतां विस्फुलिंगतुल्य भास्वर अशा नेत्रप्रांतांनीं सूर्याच्या मार्गें जातो. नंतर सर्व आदित्यमंडल व्यापिल्यामुळें ज्याचा ताप वाढलेला आहे असा तो पृथ्वीतलावर बसून हजारों वर्षें अतिदारुण तप करितो. इंद्रियांचा निग्रह करून व मेरुशिखरावर जाऊन तो अप्सरांशीं रमतो. तो भोगांच्या योगेंच कामाचा त्याग करितो. या प्रकारें तो तपाची इच्छा करणारा यक्षच कुबेर झाला. तपाचा अध्यक्ष विष्णुच तपाच्या अंतीं कुबेररूपानें व्यक्त झाला. कारण, हे राजन्, सनातन विष्णूवांचून असें तप करणारा दुसरा पुरुष कोणीही या त्रिजगतांत नाहीं.

अनेक मस्तकयुक्त वासुकि नागेंद्र मौन धारण करून व निश्चयानें मनाची ब्रह्माच्या ठायीं धारणा करून चांगलें तप करितो. सत्यधृति शेषनाग बलवान् व ब्रह्मसंभव आहे; पण तो धर्मात्मा तपोधन वृक्षावर चढून ओंठावरून फिरणाऱ्या जिभांनीं शरीरजन्य विष टाकीत संपूर्ण हजार वर्षेंपर्यंत कांहीं न खातां डोकें खालीं करून लोंबतो. तें विषच

१ गार्हपत्याद्यग्नींची आराधना करणारे वर्णाश्रमाभिमानी यांस पुनरावृत्ति आहे; परंतु सूर्यमंडलांतर्गत पुरुषाचे उपासकांस पुनरावृत्ति नाहीं. म्हणून सूर्यास सर्वोत्तम म्हटलें.

२ कारण 'सूर्यरश्मिश्चंद्रमाः' अशी श्रुति असल्यानें, चंद्राचें तेज हें सूर्यापासूनच आहे.

३ सूर्यस्थ पुरुषाचा उपासक रात्रीं मेला तरीही उपासनाबळानें त्याला अर्चिरादि गतिच प्राप्त होते. व गार्हपत्याद्यग्न्युपासक दिवसा मेला तरीही त्याला धूमादि गति प्राप्त होते; हा भाव.

१ या सूर्याराधनेनें सर्व भुवनांचें ज्ञान होतें. योगदर्शन अ० ३ सूत्र २६ पहा.

अति भयंकर असें काळकूट विष झालें. हे राजन्, त्या योगें ग्रासलेल्या लोकांस सुख मिळत नाहीं. हे राजन्, सर्व भुजंगांच्या ठायीं तेंच तीक्ष्ण विष आहे. स्थावर व जंगम विष सर्वत्र अनुगत आहे. हे भारता, परस्परांपासून वाढलेल्या व हिंसायुक्त अशा त्या विषाच्या योगें तो आपल्याच अंगाचा नाश करितो. प्राणिमात्रांच्या हिताच्या इच्छेनें महात्मा ब्रह्मदेव विषघ्न असे वेदाक्षरमय मंत्र उत्पन्न करितो. [ मंत्राचा अर्थ पुढील दोन श्लोकांत आहे. ]

" गरुड आपले विस्तृत पंख व नखाग्रें यांच्या योगें जलाचें व पृथ्वीचें संपूर्ण हजार वर्षे आपले चूडाग्रावर धारण करून रक्षण करो. विकास पावलेल्या पाकळ्यांच्या भारांनीं विस्तीर्ण व अनेक प्रकारें चित्रविचित्र अशा पर्णांनीं [ इंद्रियांनीं ] भूपृष्ठीं वसुधा [ शरीर ] शोभूं लागली आहे. "

हे भरतकुलोत्पन्न राजा, या मंत्राचा वारंवार जप केल्यास या व देवलोकीं सर्व भूतें जिवंत राहतात व त्या योगें भूमीवर संचार करणाऱ्या भूतांच्या योगें पृथ्वी [ शरीर ] नक्षत्रांनीं व्यापलेल्या अंतरिक्षाप्रमाणें दिसते. हिमाच्या योगें प्रळय झाला असतां तो जितेंद्रिय हिमालय एकटाच संचार करितो. तो धर्मात्मा [ जीव ] पुष्करजलामध्यें [ मायाशबल ब्रह्मांत ] ऊर्ध्वकेश माशाप्रमाणें दिसतो. तेव्हां उंच देहाची पृथ्वी सुतळाचें आक्रमण करून असते. हे सुव्रता, तो धर्मात्मा शांतचित्त होऊन वायु भक्षण करीत, दक्षिणबाहु उचलून [ दक्षिणा देऊन ] धरून अकराशें वर्षेपर्यंत उत्तम योगाचा आश्रय करून तप करितो. हे भारता, तो समाधियोगानें किंवा ब्रह्मप्रापक प्रणवाचे योगानें हें तप करितो. हे राजन्, ज्याकडून ही पृथ्वी धारण केली जाते [ ज्या प्रणवानें हें शरीर धारण केलें आहे ] तो अनाद्यनं ते नित्य, सर्वत्र विषयांची इच्छा करणारा, असा आकृतिरहित परमात्मा विष्णुच आहे. तो दिवसास बसतो [ ज्ञानास प्राप्त होतो ] व रात्रीं [ अविद्येंत ] स्थिर होतो. तो धर्मात्मा सत्यप्रतिज्ञ असून केवळ लीलेनेंच सृष्टयादि कार्यें करितो. त्या विष्णूचा जो हा वर उचललेला पृथ्वीसारखा भक्तोद्धारार्थ उद्युक्त असा धर्मरूपी हात आहे तो रात्रीं [ अविद्येचें ठिकाणीं ] तपन [ सूर्या ] सारखा प्रकाशक किंवा विवेकप्रद होतो. तोच प्रभामंडल होतो व विपुल असें हृदयाकाशही होतो. हे राजन्, तो धर्म मनरूपी चंद्राच्या विषयबंधनांचा नाश करितो व चक्षुरादि इंद्रियरूपी ग्रहांच्या व विशेषतः तारांच्या गतींचा रोध करितो. [इंद्रियदमन करवितो. ]

[ याप्रमाणें धर्माचें मुक्तिकारकत्व सांगून आतां प्रकृत योगाकडे वळतात. ] सोमापासून स्रवणाऱ्या [ अमृतकलांनीं ] व सोमाचे ठिकाणीं धारणा केल्यानें योगी छायेला [ अज्ञानाला ] शिथिल करून तो महात्मा धर्म, जेणेंकरून साधक हा योगी होईल अशा प्रकारें या जगांत [ त्याचा ]

---

१ ह्या मंत्राचा प्रयोग नीलकंठांनीं टीकेंत दिला आहे. जिज्ञासूंनीं मूळ संस्कृत टीकेंत पहावा.

२ या रूपकाचा नीलकंठाचे मतें अर्थ असा आहे कीं, संसाररूप नदींत पडलेला मत्स्य म्ह० जाग्रत्स्वप्न या दोन अवस्थांत धडपडणारा जीव हा योगप्रवृत्तीसाठीं प्रथम चित्तशुद्धि व्हावी ह्मणून विपुल दक्षिणादिक देऊन मग सुतल म्हणजे मूलाधाराचें आक्रमण करून थेट सहस्रदलचक्रापर्यंत पोंचून निर्विशेष चिन्मात्रत्वाला पोंचतो.

१ " लोकवत्तुलीलाकैवल्यात् " असा न्याय आहे.

२ खेचरी मुद्रेनें योग्यानें व्योमचक्रांत जीभ पोंचवली म्हणजे भ्रुकुटीचे डावे बाजूस चंद्रापासून अमृत स्रवत असतें. ते पिऊन त्याचें शरीर सोमाच्या अमृतकलांनीं पूर्ण होतें.

उजवा हात होतो. [ त्याला साहाय्य देतो ]. ती ही छाया [ अविद्या ] अनिर्वचनीय असल्यामुळें शशिरूप होऊन [ चित्तैकाग्र्यामुळें ] चंद्रमंडलांत शिरलेली आहे. ती लक्षणरहित असून अद्भुत पृथ्वीलक्षणानें स्वर्गांत अक्षय्य झालेली आहे. सर्व अंगांचा उपसंहार करून सतल पादप्रोक्षण करून पृथ्वी [ शरीर ] तपामध्यें रत होऊन निश्चितपणें तप करिते. सूर्यकिरणांकडून प्याल्या जाणाऱ्या जलांतून काढून पृथ्वी सूर्यासमीप नेली गेली.[1] युगांतसमयीं विष्णुतेजानें सागरांबरा पृथ्वी जशी विष्णुवश होते, तशी ती सूर्यरूप झाली; पण पुढें ती पृथ्वी सूर्यकिरणांनीं संबद्ध होऊन महानदी झाली. सौवर्ण धातूंनीं युक्त असलेली ती स्फटिकाप्रमाणें शुभ्र होती. किरणतेजानें उत्पन्न झालेली ती जणूं काय सूर्यानें दिल्यासारखीच होती पण मंडळांत अंतर्भूत झालेली ती देवी नुसत्या डोळ्यांनीं उपलब्ध होत नाहीं. नंतर किरणांनीं पुनः द्रवरूप केली गेलेली ती योगसामर्थ्यानें पुनः धांवूं लागली. विपुल जलाकारानें ती आकाशगंगा झाली. ती शीतळ छायावान् वृक्षांनीं, सुगंधी लतांनीं, दिव्य गंधयुक्त नानाप्रकारच्या कमलसंघांनीं शोभली. तिच्या कटिप्रदेशीं सुवर्णाचा पट्टा होता. तिच्या रशनेंत स्फटिकमण्यांची जडणी केली होती. ती शुभ्र असूनही कमलरेणूंनीं पिंवळी झाली होती. चक्रवाक पक्षी हींच तिचीं कर्णभूषणें होत. नील कमळांचा आंतील भागच तिच्या सुंदर केंसांचीं अग्रें होतीं, तिच्या प्रवाहांत फुललेलीं पुष्पेंच तिच्या केंसांत घातलेलीं फुलें होतीं, अशा फुलांनीं ती भरून गेली होती. या प्रमाणें वाहात असतां ती नदी अलंकार घातलेल्या तरुण स्त्रियेप्रमाणें शोभली. लोकांस धारण करण्यांत रत असलेली पृथ्वी चांगलें तप करून प्रथम चंद्ररूप झाली, नंतर पुष्कराशीं एकरूप होऊन गंगारूप पावली. ती सरस्वती ( अकार, उकार, मकाररूपी ) व्यक्त स्वरांनीं वेदाध्ययन करिते. ती मेरुपृष्ठावरून निघून मंदरपर्वतावर मंदपणें गमन करिते. ( म्ह० भ्रूघ्राणमध्यांतील बिंदुस्थानीं असलेलें नादरूप सोडून वैखरीरूपानें प्रकट होते. ) चार पादांनीं आवृत्त झालेले, ऋचांनीं भरलेले, यजुर्मंत्र व साम यांनीं व शिक्षेनें ग्रथित असे चार वेद, तपानें पाप जळून गेलेल्या, अग्नितुल्य व सर्वतः [ ज्ञान ] देणाऱ्या व चांगल्या रीतीनें ( शिष्यांचा ) उद्धार करणाऱ्या सद्गुरूबरोबर ती म्हणते. पण सर्व भूतें सरस्वतीचें तत्वभूत हें नादब्रह्म नियमानेंही ऐकूं शकत नाहींत; कारण तें अतींद्रीय आहे. कारण मंदराचलाच्या अग्रभागीं पसरणारें [ वैखरीरूपानें प्रकट होणारें ] हें नादब्रह्म त्याच्या सूक्ष्मरूपांत जगाला प्राप्य होण्यास कठिण आहे. तुर्यावस्थेचे ठिकाणीं वाणीचा निग्रह होऊन ती आपोआपच विराम पावते. कारण ती सत्यवादिनी असल्यामुळें म्हणजे तिला सत्यस्वरूप अनिर्वचनीय ब्रह्मप्रतिपादन कर्तव्य असल्यामुळें ती देवी मुद्दामच गप्प बसते. कारण ब्रह्मसंबंधें वाणीनें कांहींही बोलावें तें खोटें ठरतें. सर्व प्राणीही सुषुप्ति किंवा समाधिकालीं या तुर्येला पोंचले म्हणजे असेच मौन धारण करून स्वस्थ बसतात. आपल्या तोंडांनीं बळेंच बोलण्यास ते समर्थ होत नाहींत. अशी अवस्था झाली तेव्हां सर्व अज्ञानी भूतांवर अनुग्रह करण्याकरितां मनानें ऐकान्त्याचा विभाग करून ती सरस्वती तटस्थब्रह्माचें वर्णन [ शाखाचंद्रन्यायानें ]

१ सूर्याचे ठिकाणी धारणेचा अभ्यास केल्यानें ती पुढें गंगारूप झाली.

मोठ्या आवाजानें बोलूं लागली. सरस्वतीचे द्वारानें प्राणी शिक्षेचें ग्रहण करितात; व शब्दानें अगम्य अशा शबल ब्रह्मामध्यें स्थित होऊन [ शब्दाचा आश्रय करून ] शिक्षेप्रमाणें गातात. जटा, मौंजी, लंगोटी, इ० धारण करून आदित्य, वसु, रुद्र, अश्विनी-कुमारांसह मरुत्, नागांसह गंधर्व, जलांसह किन्नर,—इ० सर्व विद्वान् मिळून पुष्करांत तप करितात. सर्व सर्पांस व कीटपतंगादिकांनाही बरोबर घेऊन मोठ्या यत्नानें ते उग्र तप करून शरीर सुकवितात.

व्यापकत्वास प्राप्त झालेला विष्णु आपल्या व्यापक स्वरूपानें सृष्टीचें पालन करण्यास असमर्थ झाल्यामुळें आपलें शरीर चतुर्भुज करिता झाला. त्यायोगें तो यज्ञादिकांचा भोक्ता व सर्व भूतांचा नियंता झाला. त्यामुळेंच तो महायोगी सर्व सहचरांचें अधिष्ठान होऊन संरक्षण करूं शकतो. सर्व कार्यरूप जगांत विष्णुच नर-नारायणादिरूप होऊन लोक-शिक्षणार्थ तपादि लीला करितो. तो द्विधा झालेला विष्णुच धूमरहित अग्नीप्रमाणें स्व-तेजानें प्रकाशमान होतो. तो विष्णु मनःकल्पित गार्हपत्यादि अग्निस्वरूप होऊन पृथ्वीस तापवीत [ भट्टींत घातलेल्या सोन्याप्रमाणें जीवास शुद्ध करून ] त्याबरोबर [ त्याच्या अग्निहोत्रादि क्रियांचें फल प्राप्त करून देण्यासाठीं ] [ ब्रह्मां-डभर ] धांवतो. देहात्मवाद्यांचा जबरदस्त मोह जाळून फडशा करणारा तो अग्नि सर्वतः किर-णांनीं उद्दीपित असलेल्या [ सूर्या ] प्रमाणें सभोंवार व्यापून राहिलेल्या व प्रज्वलित असलेल्या अशा ज्वालांनीं शोभूं लागला. त्या इकडे तिकडे पसरलेल्या [ विष्णुरूप ] अग्नीचें [ ब्रह्मदेवादि ] विस्फुलिंग [ किटाळ ] उल्लं-घून जाण्यास ते विषयासक्त जीव समर्थ झाले नाहींत. मर्यादाभूत अशा सूर्याचें जसें उल्लंघन करितां येत नाहीं तद्वत्. तो अग्नि उद्दीप्त होऊन व द्रव्य, देवता इत्यादि अनेक प्रकारें आपले किरण विभागून धूमरहित पावकाप्रमाणें राहिला असतां यज्ञामध्यें अग्नीसारखे तेजस्वी-ऋत्विज यज्ञांमध्यें सोमरूपानें त्याचा अनेक प्रकारें यथेच्छ विक्रय करितात. यज्ञ समाप्त होईपर्यंत तो धूमरहित अग्नि प्रकाशित असतो व यज्ञसमाप्ति होतांच तोच अग्नि लोक-हितार्थ पृथ्वी, अंतरिक्ष व द्योपर्यंत फलरूपानें व्यापून राहतो. तोच विशाल पराक्रमी विष्णु योगबलानें शतशरीर होऊन मेघाचा भेदकर्ता ऐरावत हत्ती होतो. मग प्राण्यांच्या हितास्तव आपल्या तेजानें प्रत्येक देहांत शिरलेला, अत-एव देहांतःस्थित, दिव्य—ज्ञानयुक्त व सर्व पदार्थ खाऊन टाकणारा अशा ( जाठर ) अग्नीला तो ऐरावत नाग सुखदायक व शीतळ अशा ( अन्न ) पाण्यानें अभिषिक्त [ व शांत ] करितो [ वृष्टी करून पाणी व अन्न देतो. ] नंतर सिद्धसमूहांनीं वेष्टित होऊन तो महा विरक्त, महायोगी, मनानेंच आपला निग्रह करून समष्टिभावनेनें पुष्करांत तप करितो. हातपाय वगैरे आंवरून तो [ प्राण ] मस्त-कांतील सहस्रदलयुक्त कमळाचे ठिकाणीं धारण करून तुर्यावस्थेंतील परमशिवाख्य अचल अशा स्थानीं जाऊन स्वस्थपणें [ मौन धरून ] राहतो. हा धर्मांतील श्रेष्ठ धर्म [ समा-धिरूपी ] उपाधिकल्पित नसून स्वभावसिद्ध आहे. हा सर्व भूतांना येथें व परलोकांतही हितकारक आहे.

---

१ वाणीला ब्रह्माचें साक्षात् वर्णन करितां येईना ह्मणून तिनें लोकानुग्रहार्थ तें लक्षणेनें करून दाखविलें.
२ 'एतत्साम गायन्नास्ते' इ० इ०

१ यज्ञ, यज्ञांगें व यज्ञफल—सर्व तो विष्णुच नटतो असें समजावें.
२ शुंडाधार पर्जन्यवृष्टि करितो, पर्जन्य हें यज्ञाचें फल आहे, तेंही तोच होतो.

(कामक्रोधादि) दैत्य जरी पूर्वी मारले गेले होते तरी ते पुनः मायाप्राप्त अशा बहुविध शरीरांनीं युक्त होऊन आयुधें घेऊन [ समाधिकालीं ] लढण्यास आले. हे शत्रुनाशका, हे अग्नीसारखे तेजस्वी, धिप्पाड शरीराचे व महाबलाढ्य दैत्य [ कामादि ] जाज्वल्य अग्नीवर [ योग्यावर ] पर्वताग्रांनीं [ दिव्य स्त्रियांचे शरीरादिकांनीं ] प्रहार करितात. बलानें दर्पित व मायेनें मेघरूप झालेले ते दैत्य त्या संघातांत संघातयुक्त महाबल अग्नीवर वर्षाव करितात; पण अग्नि आपल्या ज्वालांनीं त्या शैलांना शतशः व सहस्रशः जाळून टाकतो. जणूं काय युगांत काळचा आदित्य प्रभू प्रजांना जाळण्याची इच्छा करितो. ते दैत्य समोर प्रकट झालेल्या व उदयकाळीं आदित्याप्रमाणें आकाश प्रकाशित करणाऱ्या अग्नीला आपल्या दानवी मायेनें शांत करूं शकले नाहींत.

याप्रमाणें हे सर्व उद्योग करूनही दैत्य जेव्हा हतपराक्रम झाले तेव्हां ते गंधमादन पर्वतावर येऊन त्याच्या शिखरावर बसले. तो अग्नि विष्णुलोक व विद्युत् यांशीं मिसळून [ हार्दाकाशरूपी] अंतरिक्षांत संचार करणाऱ्या ( कामादि ) दैत्यांस जाळीत आकाशांत संचार करूं लागला. मेघसंबंधी हत्ती [ ऐरावत ] मेघपटलाशीं संगत झाला व वृष्टिमान पर्जन्याप्रमाणें भूमीवर जलाचा वर्षाव करूं लागला. द्विजांच्या तोंडून निघालेल्या मंत्रांनीं प्रेरित होऊन व विप्रांच्या संततीस मान देऊन तो वृष्टिकर्ता ऐरावत हत्ती जलसमूह वर्षूं लागला.

१ योगाचे आरंभीं जरी कामादिकांचा जय केला असला तरी ते पुनरपि समाधिकालींही दांडगाई करितात. तेव्हां त्यांचा तेथेंही पाडाव करावा लागतो.

२ गडगडाट होऊन पाऊस पडूं लागला असतां म्हातारी हरभरे भरडते आहे व हत्ती सोंडेनें पाणी फेकतो आहे' असें लहान मुलें म्हणतात. त्यांतील दुसरी कल्पना तरी पुराणसंमत दिसते.

# अध्याय एकोणतिसावा.

—:०:—

## देवासुरांची तपःसिद्धि.

जनमेजय म्हणतोः—त्यानंतर देवांनीं (सात्विक योग्यांनीं) तप करून काय केलें? तपाला अप्राप्य असें या जगांत कांहींच नाहीं. व त्यामुळें त्याला कर्म करण्याचें किंवा प्रवृत्तीचें कारणच उरत नाहीं.

वैशंपायन सांगतातः—नंतर सर्व विष्णुमय गण दीक्षा घेऊन पुष्करांतून ( जगत्कारणांतून ) अग्नीचा ( तेजाचा ) उद्धार करून व त्याचें यथाविधि प्रणयन करून मंत्रांनीं प्रेरित असे ते ब्राह्मण मंत्रांनीं यथाविधि पवित्र झालेल्या हवीनें मंत्रविधीनेंच त्यांत हवन करिते झाले. तेथें तो अग्नि ब्रह्मतेजानें यथाविधि वाढतो. तो पुरुषशरीरवान् प्रभु तेजाच्या योगें मोठा झाला. शरीरानें जाळीतच असल्यासारखा तो ब्रह्मदंड या नांवानें प्रसिद्ध झाला. त्याचें रूप व शस्त्रें हीं दिव्य होतीं. तो ढाल, तरवार, व धनुष्य धारण करणारा होता. गदा, नांगर, चक्र, बाण, ढाल, परशु, शूळ, वज्र, खड्ग, शक्ति, व श्रेष्ठ धनुष्य—इतकीं त्यानें आपल्या हातीं घेतलीं होतीं. चक्रधर विष्णूच खड्गवान्, मुसळवान् व लांगलायुध झाला. हल व मुसळ यांच्या आश्रयानें तो महाबलाढ्य नर झाला. इंद्र शंभर पर्वांचें वज्र तपानें धारण करिता

१ योगी योगमार्गाला लागला असतां त्याला मार्गांत अनेक विघ्नें उत्पन्न होत असतात. त्या विघ्नांचाही विघात कर्माचरणानेंच करावा लागतो. मात्र तें कर्माचरण सात्विक पाहिजे, तामस उपयोगी नाहीं. असा अध्यायाचा भाव आहे, असें चतुर्धर म्हणतो.

२ ब्रह्मार्पणं ब्रह्महवि ब्रह्माग्नौब्रह्मणाहुतम् - गीतोक्त सुप्रसिद्ध विधीनें.

३ षोडशभुज नारायणमूर्ति व तिचीं षोडश आयुधें.

झाला. रुद्रानें भूलोकीं मनानें शूल व पिनाक यांचें धारण केलें. मृत्यूनें दंड धारण केला. वरुणानें पाश व कालानें शक्ति धारण केली. त्वष्ट्यानें परशु व कुबेरानें फरशी हातांत घेतली. त्यामुळें ते सर्व देव शेंकडों व हजारों निर्विकार शक्तींनीं युक्त झाले. त्वष्टा व त्याचीच एक विशिष्टमूर्ति विश्वकर्मा यांनीं आपापलीं आयुधें नानाप्रकारचीं केलीं. परमात्मा विष्णु, इंद्र, प्रतापी सूर्य व महात्मा रुद्र—यांस अग्नि रथ देता झाला. वेदांच्या योगानेंच त्वष्ट्यानें सेना केली. विश्वकर्म्यानें अनेक प्रकारचीं विमानें रचलीं. सत्यपराक्रमी विष्णूनें अव्यय पुष्कर स्थानापासून शरीरांश काढून सेना निर्माण केली. ज्या वाणीच्या योगानें तो पूज्य इंद्र पुढें युद्धांत शत्रूंचा नाश करिता झाला त्याच वाणीनें त्यानें सर्व नक्षत्रांचें आकाश उत्पन्न केलें. अंतर्धान पावलेला प्रभु ब्रह्मा त्या अत्युचित, निर्विकार, व शांत दंडास यथाविधी धारण करूं लागला. त्यानें आपल्या प्रभावानें यथाशास्त्र ऐंद्र, आग्नेय, वायव्य व रुद्रतेजानें रौद्र, असा चार प्रकारचा अस्त्रसमुदाय निर्माण केला.

महाबल दैत्यही देवांप्रमाणेंच तप, शिक्षा यांनीं युक्त असून देवांप्रमाणेंच आपलीं पहिलीं अस्त्रें व प्रहरणें, चतुरंग सैन्य व पराक्रम या योगें ते अतिशय धैर्यवान् झाले. आणि रणामध्यें दुर्धर्ष बनले. परंतु कामादि विकारांनीं प्रेरित होत्साते गुहरूपें सोडून भोग्यवस्तुयुक्त रथांवर बसून ( म्हणजे विषयभोगांत गढून जाऊन ) मंदर–गिरीच्या पायथ्याशीं भूमींत फिरूं लागले. ( त्यांस ऊर्ध्वगति मिळाली नाहीं. ते इहलोकीं विषयांतच घोंटाळत राहिले ) तें त्या असुरांचें सर्व तामस चतुरंग बळ आवरून प्रभु जो विष्णु महायोगी तोच स्वतः पृथ्वीवर संचार करूं लागला. ( असुरांचें तप क्षय पावलें ) पण चीर व अजिनें धारण करणाऱ्या ब्राह्मणांबरोबर व इतर सर्व देवगणांबरोबर ते (असुर) पुनः तप करूं लागलेच.

१ ही सर्व अस्त्र व उपकरणसृष्टि योगप्रभावकल्पित समजावी.

## अध्याय तिसावा.

—:०:—

### आध्यात्मिकदृष्ट्या समुद्रमंथन.

जनमेजय विचारतोः—हे ब्रह्मन्, याप्रमाणें हा निर्मर्याद व अविनाशी खिळ्यासारखा महानक्र ( संसाररूपी ) पुनः पुनः प्रवृत्त झाला असतां, प्रजाजनांची मोक्षप्राप्ती संबंधें काय अवस्था झाली ?

वैशंपायन सांगतातः—प्रजापतीनें प्रजाधर्मपरायण होऊन ऋषींच्या साहाय्यानें राज्यावर वेनाचा पुत्र पृथु यास पूर्वीं अभिषिक्त केलें. त्रेतायुग प्रवृत्त झालें असतां ते ऋषि आपापसांत म्हणूं लागले कीं, हा आमचा श्रेष्ठ राजा आमच्या प्रेमामुळें झालेला आहे; हा आमचा

१ समान श्रम करूनही जे सात्विक ते योगबलानें मोक्षास जातात, तामस प्रवृत्तीचे जात नाहींत, हें सांगण्याचा या तिसाव्या अध्यायाचा उद्देश आहे, असें चतुर्धराचें म्हणणें आहे.

२ मन हा क्षीरसागर, गति हा पर्वत, शमादि व कामादि वृत्ति हेच अनुक्रमें देव, व असुर, अभ्यास हें मंथन, व युक्ति हें अमृत व इतर रत्नें—असें येथें रूपक आहे.

३ वरील प्रश्नांत जनमेजयाचा हेतु असा कीं, तामस जीवांना जर पुनः पुनः जन्ममृत्यूचे गिरके पडणार असा हिशोब आहे तर हे गिरके चुकावे कसे. त्यावर पृथूचे आख्यानरूपानें वैशंपायन असें सुचवितात कीं, अशांना धर्मपरायण राजा धर्ममर्यादेत ठेवूं लागला म्हणजे या प्रजांची क्रमाक्रमानें चित्तशुद्धि होऊन अखेर ते मोक्षमार्गास लागतात.

२ मात्र त्या धर्ममार्गी प्रजाजनांपैकीं जे विष्णुभक्त असतील तेच मुक्तीला अधिकारी समजावे. इतरांनीं शेंकडों प्रकारचे अन्य योग केले तरी ते मोक्षपात्र होणार नाहींत.

वृत्तिदाता, विप्रांचा प्रवर्तक व ईश्वरार्पित कर्मामुळें सर्व प्राण्यांचा निर्माता आहे.

इतक्यांत देव गंधर्वमादन पर्वताच्या शिखरावर, अनेक प्रकारचीं व्रतें करून थकून बसले. देव व मानव चोहोंकडे वसंतसमय आला असतां सुवासाचा अनुभव घेऊन त्याच्या गंधानें मत्त झाले. तो सुगंध म्हणजे वायूनें पसरलेलें प्रत्येक पुष्पाचें वीर्यच असून, तो सर्व मनांचें आकर्षण करणारा, सुखकारक व पृथ्वीवरील उत्तम गंधरूप होता. त्या गंधानें दैत्यही कांहींसे विस्मित झाले. त्यांचीं चित्तें प्रसन्न होऊन त्यांस परम सुख झालें. आणि त्या वासानें मदोन्मत्त झालेले ते सर्व मिळून म्हणाले, प्रत्येक पुष्पाचें जर हें असलें वीर्य आहे, तर फळाचें महत्त्व केवढें असेल ? अशा अनेक प्रकारच्या प्राण्यांच्या कर्मबुद्धि, बुद्धिबलानें अनुमानानेंच जाणाव्या. यास्तव आम्हीं आतां बलाढ्य, कामरूपी व विशाल अशा मंदराच्या योगें जलांत औषधि घुसळतों. मोठ्या वेगानें समुद्राचें मंथन करून व त्यांत निर्माण झालेल्या अमृताचें प्राशन करून ( अविद्यानाशार्थ ) मिळून प्रयत्न करावयास लागलेले आम्हीं सर्व कामरूपी होऊं. आराधित महासामर्थ्यवान् विष्णुच आमच्या योगमार्गीतील अग्रणी होईल. नंतर आम्हीं शत्रूंसहवर्तमान पृथ्वी व स्वर्ग यांचा उपभोग घेऊं. त्यामुळें आम्हीं येथल्या येथेंच ( पित्रादि ) मूळ, ( भार्यादि ) पत्र, ( भ्रात्रादि ) शाखा व [ अपत्यादि ] फळें, यांसह सर्व [ ऐकात्मरूप ] अमृताचा [ मोक्षाचा ] स्वीकार करूं.

याप्रमाणें दैत्य मंदरास चाळविण्याविषयीं निश्चय करून पर्वताच्या पायथ्यापासून गंधमादनाच्या शिखरास उपटूं [ वासना त्याग करूं ] लागले. विस्तृत बाहूंनीं [ प्राणायामादिकांनीं ] त्याला निश्चयानें उपटण्याकरितां धांवणाऱ्या महासामर्थ्यवान् दैत्यांनीं पृथ्वीला कांपवून सोडिलें; पण ते दैत्य त्या पर्वतश्रेष्ठाला उपटूं शकले नाहींत. पर्वताच्या विपुल अंतरालभागीं ते धारिष्ठवंत दैत्य गुडघ्यांवर पडले. [ पहिल्या यत्नांत ते हुकले ] कांहीं वेळानें आपण होऊन सावध झाल्यानंतर तपानें दग्धकिल्बिष असे ते कामरूपी दैत्य आपल्या माथ्यांनीं ईश्वरास शरण गेले. तेव्हां त्या सर्वगामी, जितेंद्रिय, शरीरस्थ व सर्वलोकपति ब्रम्ह्यानें, त्यांची इच्छा जाणून त्यांस प्रणवरूप अशरीरिणी वाणीनें, लोकांचें हित व्हावें या इच्छेनें ब्रम्हात्मैक्यप्रतिपादक नाना वाक्यांनीं उपदेश केला. "हे महातेजस्वी दैत्यहो, आदित्य, वसु, मरुद्गणांसह रुद्र, देव, यक्ष, गंधर्व, उत्तम गाणारे किन्नर या साऱ्यांनीं मिळून अमृताकरितां प्रयत्न केल्यास, [ वातपित्तादि ] धातूंनीं रंगलेला हा पर्वत [ देह ] उपटून काढितां येणें शक्य आहे. ते सर्व सुरासुरगण त्या मोठ्या थंड रसाच्या पर्वतास उपटून [ देहासक्तिशून्य होऊन ] वेली हातावर चढलेल्या आहेत असें पहातील. [ वासना संततिरूपानें हस्तगत झालेल्या पाहतील ]. सर्वांसमक्ष उच्चारिलेलें हें उपदेशवचन ऐकून बाहुबलशाली दैत्य आपल्या मनांनीं व वाणींनीं ईश्वरानुष्ठान करूं लागले; परंतु [ अंगीं वैराग्य नसल्यानें ] पूर्वोक्त विघ्नें आड येऊन ते भ्रूघ्राणमध्यस्थ जो लवण समुद्र आहे त्यांतच हेलकावे खात राहिले. समुद्राच्या तेथें देव, दानव, सुरासुरगण पुष्करांत स्थिर होऊन लवण [ समुद्राच्या ] पाण्यानें भरले. मंदर पर्वत [ देहास ] रवि

---

१ योग्यांच्या अंगास सुवास सुटतो, व त्यांस नानाप्रकारचे सुगंधही येऊं लागतात, पण त्या क्षुद्रसिद्धि आहेत. *येथेंच बसल्यास अमृतप्राप्ति ( मोक्षप्राप्ति ) होत नाहीं.*

करून व वासुकीस [ सर्पाकार कुंडलिनीस जागी करून ] दोरी बनवून हजार वर्षे [ अनेक जन्मपर्यंत ] औषधींसह [ वासनांसह ] घुसळलेलें जल [ मन ] उत्तम उपायामुळें क्षीररूप [ शुद्धसत्वमय ] झालें व तेंच शेवटीं [ एकात्मवृत्तीचे योगानें ] अमृत [ शुद्धचिन्मयरूप ] झालें. तेव्हां लोभ व राग यांनीं आविष्ट होऊन असुरांनीं [ योगोपसर्गांनीं ] पूर्वीं त्याचें हरण केलें, त्याचप्रमाणें त्यांतून धन्वंतरी, मद्य, [3]देवी, श्री,[4] कौस्तुभमणी, निर्मळ चंद्र, रम्य असा उच्चैःश्रवा अश्व, व सर्वांच्या शेवटीं अमृत [ निर्विशेष कैवल्य ] अशीं रत्नें त्यांच्या सभोंवार निघालीं. नंतर अमृत घ्यावयास उद्युक्त झालेले देव राहूला उद्देशून आपसांत बोलले. दैत्य व दानव यांतील कोणीही अमृत पीत नाहींत; राहु मात्र तें पीत आहे. तें कळतांच तत्काळ विष्णूनें युद्धांत चक्रानें राहूचें ( कपटी विद्यार्थ्याचें ) मस्तक तोडलें. सनातन मुनि व पितृगण यांनीं नित्य सेविलेलें तें अमृत इंद्रापासून पृथ्वीनें क्रमानें हरण केलें.[8] ब्रह्मवाक्यानें प्रेरित झालेली देवी ( विष्णूच्या ) मांडीवर बसली.

---

१ या शब्दानें, लघुत्व, आरोग्य, अलोलुपत्व, वर्णप्रसाद, स्वरसौष्ठव इत्यादि योगसिद्धि समजाव्या.

२ मद्यशब्दानें.

३ योग्याचा चित्तोन्माद करणाऱ्या ' मधुमत्यादि ' अवस्था.

४ ऋग्वेदादि वेदविद्या.

५ योग्याचे देहाची कांति.

६ चंद्र म्ह. योग्याची गुणद्वारा आल्हादकता.

७ योग्याला प्राप्त होणारें दूरदर्शन, दूरश्रवण इ०

८ मोक्षरूप अमृत गुरुसंप्रदायानें पृथ्वीवरील मनुष्यांप्रत चालत आलें.

# अध्याय एकतिसावा.

—:•:—

## बलिराज्यहरण.

जनमेजय म्हणतोः—दैत्यसमूह मारला जाऊन विष्णु अतिपराक्रमी ठरल्यावर दैत्य व दानव पराक्रमाच्या योगें काय मिळविण्याची इच्छा करून होते?

वैशंपायन सांगतातः—पराक्रमानें महा बलाढ्य झालेले दानव राज्याची इच्छा करूं लागले व सत्यपराक्रमी देव एकमतानें तपाची इच्छा करूं लागले.

जनमेजय विचारतोः—ऐश्वर्य मिळालेला व याचकांच्या इच्छा पुरविणारा हिरण्यकशिपु ब्रह्मक्षेत्रांत ( भ्रूघ्राणमध्यें ) दीर्घकाळपर्यंत कसें यजन करीत राहिला?

---

१ या यांतील देवासुरकृत समुद्रमंथन व अमृतप्राप्ति या कथेंतील आध्यात्मिकभाव इतकाच कीं कैवल्यप्राप्ति करून देणारें ज्ञान हेंच कोणी अमृत मन हाच क्षीरसागर त्याचें विवेकदंडानें घुसळण करून देव म्ह० सात्विक प्रवृत्तीचे लोक व असुर म्ह० तामस व वैषयिक प्रवृत्तीचे लोक उभयहि शोधूं लागतात. परंतु, त्या विषयलोलुप असुरांना योगाचे अपूर्णावस्थेंत प्राप्त होणाऱ्या कांहीं अल्पस्वल्प सिद्धि हातीं येतांच ते उन्मत्त होऊन भांबावतात. परंतु देव पक्के असतात ते असल्या क्षुद्रसिद्धींना भुलत नाहींत. यामुळें त्यांचा योग पूर्ण होऊन त्यांना कैवल्यरूप अमृत प्राप्त होतें.

नीलकंठाचे अभिप्रायाप्रमाणें या अध्यायांत बलीचे ऐश्वर्यभ्रंशाचा वृत्तांत सांगून असें दाखविलें आहे कीं, " लक्ष्मीचे योगानें मनुष्य उन्मत्त होऊन अमार्गगामी होतो, तो तसा न व्हावा म्हणून परमेश्वर केवळ सदयपणानेंच अशांचें लक्ष्मीहरण करून त्याला शुद्धिवर आणीत असतो. " हें या अध्यायांतील आध्यात्मिक तात्पर्य होय. तसेंच या अध्यायांत हिरण्यकशिपूचे क्रतूचें वर्णन केलें आहे, त्यांतील भाव असा कीं, लबाड किंवा कपटी शिष्य देखील कर्माचरण करितां करितां चित्तशुद्धि होऊन साधुपणास पोंचतो.

२ या अध्यायांत हिरण्यकशिपु पदानें बलि समजावा असें चतुर्धर म्हणतात; व ते तरी हें निरुपायास्तवच म्हणतात.

वैशंपायन सांगतातः—राजानें पुष्कळ सुवर्ण-दक्षिणांनीं युक्त राजसूय यज्ञ करावेत. तसेंच महाफल पाहिजे असलेल्या दानवश्रेष्ठांनीं पृथ्वीमध्यें क्रतूंनीं यजन करावें. गंगा व यमुना ( भ्रू व घ्राण यांचा संधि ) यांच्या मध्यभागीं जें विपुल तप चाललेलें होतें त्याकरितां महा-असुर यजमान असतां तेथें वेदवेत्ते ब्राह्मण, महाव्रतपरायण यति, दुसरेही योगधर्मानें पूर्णतेस आलेले असे सिद्ध, धर्मानें सुशोभित झालेले धन्य असे वालखिल्य मुनी, नित्य धर्मपरायण असे दुसरेही पुष्कळ मुख्य ब्राह्मण आणि सहस्रावधि ब्राह्मणांकडून पूजिले जाणारे महात्मे ऋषि—विपुल वैभवानें आकृष्ट होऊन दाही दिशांकडून आले. समर्थ शुक्राचार्य पुत्रासह हिरण्यकशिपु दैत्याकडून यज्ञ करवीत होता. त्या वेळीं गणांचा प्रमुख हिरण्यकशिपु 'पाहिजे त्यानें यथेच्छ वर मागून घ्यावा, मीं देतों,' असे शब्द गणांमध्यें बोलला. त्याबरोबर विष्णूनें वामनरूपानें त्या भिक्षेचा स्वीकार करून हिरण्यकशिपूच्या हातून दोन अधिक एक पावलें भूमीचें दान मागून घेतलें. नंतर सत्यपराक्रमी विष्णु पावलें टाकूं लागला. दिव्य शरीर धारण करून तीन लोकांस व्यापणाऱ्या तीन पावलांनीं त्यानें दैत्याचे राज्य हरण केलें. तेव्हां ते राज्यरहित दैत्य सैन्यगण, भाले, तरवारी, तोमरें, यंत्र, पाषाण, पताकांसहित रथध्वज, ढाली, कवचें, म्यानें, इतर आयुधें, परशु यांसह पाताळविवरांत गेले. इकडे विष्णूसह उत्कर्ष पावलेले देवगण अतिशय आनंदित होऊन महेंद्राला लोकांच्या आधिपत्यावर अभिषेक करते झाले. तो त्या देवांना पितृस्थानीं स्वधामृतानें तृप्त करूं लागला. ब्रह्मदेवानें तें दिव्य अमृत महेंद्रास दिलें होतें. त्या कर्मानें तो अक्षय व अमृत झाला. नंतर शत्रूंच्या अंगावर कांटे आणणारा व पितामहाच्या हातून उत्पन्न झालेला शंख त्यानें सर्व भूतांचें प्रथम उत्पत्तिस्थान जें आकाश त्यांत वाजविला. तो शंखाचा नाद ऐकून तिन्ही लोक शांतचित्त झाले. त्यांना इष्ट अशा इंद्राला त्यांचें अधिपतित्व मिळाल्यानें ते परम सुख पावले. अग्नींतून उत्पन्न झालेल्या मंदराच्या अग्रभागीं बनलेल्या व अग्नीनें जणूं काय जळणाऱ्या सर्व प्रहरणांनीं देव युक्त झाले. म्हणजे आपलीं इंद्रियें चिन्मय करून तीं देहरूपी पर्वताचे शिखरावर ( मेरुस्थानीं ) एक केल्यानें ज्ञाते परम सुखाला पोंचले: म्हणजे सर्वच निवृत्तिपरायण झाले.

१ दैत्यं यो जयते प्रभुः असा एक पाठ आहे; दुसरा 'योजयते' असा आहे.

२ येथें 'तथेंद्र विष्णुसहिताः' असा वांईकर व वेंकटेश्वर यांचा पाठ आहे; व चतुर्धरांनीं त्याला टीका जोडून पुष्टि दिली आहे, आमचा लेखी पाठ 'तथेंद्र विष्णुसहिताः' असा आहे, व तोच आह्मी घेतला आहे.

## अध्याय बत्तिसावा.

—:०:—

### दक्षाध्वरध्वंस.

वैशंपायन सांगतातः—राजन्, अशा प्रकारची ही मोठी हकीकत घडली असतां व महा भरभराटीचें राज्य चाललें असतां सर्वच ब्रह्मज्ञ झाल्यानें त्यांतील भेद नष्ट होऊन देवता व मनुष्यें यांचा एकत्र सहवास झाला. ते एकटे असतां समाहित म्हणजे शांतचित्ताचे असत व माणसांच्या सहवासांत येतांच ते अनुकंपेनें रडत. हे भारता, ते यज्ञकर्मांतला आपला भाग प्रत्यक्षच घेत. नंतर ऋषींनीं वेष्टिलेल्या

१ या अध्यायांत 'आपला द्रोह करणाऱ्या दक्षाला शंकरांनीं शासन करून सन्मार्गास वळविले ( असेंच, देव लोककल्याणासाठीं पुष्कळदां करितो. ) असा आध्यात्मिक अभिप्राय आहे असें नीलकंठाचें म्हणणें.

भगवान् बृहस्पतीनें अश्वमेधयज्ञाकरितां प्राचेतस दक्षास दीक्षा दिली. त्या मातामहाच्या यज्ञांत नंदीसह रुद्रानें आपल्या भागाकरितां आत्मज्ञानरहित ( म्ह० पशुतुल्य ) दक्षाचा वध केला. स्वेच्छेनें रुद्राचें तें रूप द्विधा झालें. व हे राजेंद्रा, त्यापासून परम धर्मात्मा नंदीच योगसामर्थ्यानें पुरुषशरीरवान् झाला. त्याच रुद्र परमात्म्यानें वेदवाणीनें सनातन ब्रह्म प्रस्थापित केलें. सुरूप, विरूप, विरूपाक्ष, घटोदर, ऊर्ध्वनेत्र, महाकाय, विकट, ठेंगणे, शिखावान्, जटाधारी, त्रिनेत्र, शंकूसारखे कानांचे, लंगोटी नेसणारे, अजिनधारी, कूट व मुद्गर हातीं घेतलेले, घंटा धारण केलेले, मुंज गवताची मेखला धारण केलेले, हातांत कडीं व कानांत स्वर्णकुंडलें घातलेले, डिंडिम, भेरी, मृदंग, वेणु—हीं वाजविणारे, अशा नानाप्रकारच्या गणांनीं परिवेष्टिलेला तो शंकर दक्षाच्या यज्ञाकडे त्वरेनें आला. त्याच्या गणांतील कांहीं शंख व मृदंग वाजवीत असून कित्येक हातानीं टाळ्या वाजवीत होते. उग्रायुध तो महादेव पिनाक धनुष्याच्या योगें अंतकाप्रमाणेंच दिसत होता. दीप्त ज्वालायुक्त व जगास जाळण्यास तयार झालेल्या कालाग्नीप्रमाणें त्या यज्ञांत तो यज्ञवानांतील श्रेष्ठ दीप्त ज्वालांनीं विराजमान झाला. नंदी व शंकर यांनीं उत्तम यज्ञावर प्रहार केला. तेव्हां युगांतींचा कालाग्निच लौकरच सर्व जाळण्याकरितां तयार झालेला आहे कीं काय असें वाटलें. निशाचरगण यज्ञीय स्तंभ उचलून घेऊन धांवूं लागले. कित्येक चीर व चर्म धारण करणाऱ्या तेथील मुनिगणांना त्रास देऊं लागले. लाल नेत्रांचे ते आपल्या जिभांनीं हविर्भाग पिऊं लागले. दुसरे कित्येक आपल्या जिभेच्या टोंकावर पशूंस लोंबत धरून खाऊं लागले. कित्येकांनीं स्तंभ फेंकून दिले. कित्येकांनीं यज्ञीय पशूंना बडविलें. कित्येक अग्नि शमविण्यासाठीं त्यावर पाणी ओतूं लागले. जपापुष्पाप्रमाणें लाल नेत्रांच्या कित्येकांनीं सोमरसाचें हरण केलें. कमलदलासारख्या हातांनीं कित्येकांनीं दर्भांचा नाश केला. कांहीं रुद्रगणांनीं यूपाचीं अग्रेंच तोडून टाकिलीं, कलश फोडले. शोभार्थ लाविलेले कांचनवृक्षच कित्येकांनीं तोडून टाकिले. त्यांनीं बाणांनीं तेथल्या तेथें सर्वांना विद्ध केलें. सुवर्णमय बाण त्यांनीं सोडिले. पात्रें फोडलीं, अरणींचें मंथन केलें. प्राग्वंशाला पीडा दिली व सर्व वस्तूंचा नाश केला. कित्येकांनीं पुरोडाशाचें भक्षण केलें व नखाग्रांनीं नासधूस करून टाकिली.

याप्रमाणें रात्रंदिवस त्या महायज्ञाचा विध्वंस होऊं लागला असतां, तो यज्ञ ( लाटांनीं ) फुटणाऱ्या समुद्राप्रमाणें मोठ्यानें ओरडूं लागला. पूर्वीं स्वयंभूनें दिलेलें वेळूच्या काठीचें केलेलें धनुष्य बाणासह घेऊन उत्तम महारथ रुद्र समरांगणांत उभा राहिला. महादेवानें तें धनुष्य घेऊन भूमीवर गुडघे टेंकून व त्यावर शरसंधान करून महयज्ञास वेध केला. तेव्हां त्या बाणानें विद्ध झालेला यज्ञ आकाशांत उडाला. तो मृग होऊन ओरडत ब्रह्मदेवाकडे जाऊं लागला. कारण, रुद्रशरानें विद्ध झाल्यावर त्यास भूलोकीं सुखानें त्राता मिळेना. अंगांत बोंचलेल्या शरासह तो शरणार्थी मृगरूपी यज्ञ ब्रह्मदेवाजवळ आला असतां, गंभीर, उत्तम वीर्ययुक्त व सुभाषायुक्त स्वरानें त्या मृगास सांत्वनपूर्वक असें शुभवचन बोलला. "तूं अशाच स्वरूपाचा महामृग होऊन आकाशांत राह-[1]

[1] ज्याला अडाणी लोक 'खाटलें बाजलें' म्हणतात त्या आकाशांत उगवणाऱ्या मृगशीर्ष किंवा मृग नक्षत्रात मृगाचें शीर्ष, व्याध, व बाण ' ही सर्व योजना कोणी लावून दाखवितात.

शील. ज्याचें टोंक वांकविलेलें आहे अशा तीन पेरांच्या शरानें विशेष रीतीनें जिंकला गेलेला तूं नक्षत्रांच्या शिरोभागीं रुद्रासह उभा रहा. अक्षय व अव्यय चंद्राशीं युक्त होऊन तारांशीं संगत होऊन तूं आकाशांत संचार कर. तूं ज्योतींतील ज्योति झालेला आहेस; ध्रुवाचाही ध्रुव आहेस. शरीरास झालेल्या क्षतांतून निघालेलें हें जें वेगानें धावतांना तुझें रक्त आकाशांत उडालें आहे तें मंडलनांवाचें अनेक रंगांचें क्षेत्र होय. तें भूतांना शकुनसूचक व वर्षाकाळीं वृष्टि करणार आहे. त्याचें दर्शन झालें असतां प्राण्यांचें सुखदुःख सुरू होतें. इंद्रियश्रवणामुळें तें आकाशांत इंद्रधनुष्य झालें आहे. हे राजन्, मनुष्य दोन्हीं नेत्रांनीं त्याला अति आश्चर्यानें पहातात. तें अत्यद्भुत, बहु विचित्र व मनःकल्पित आहे. ब्रह्मयुक्त आकाशामध्यें संज्ञा पावलेलें हें रात्रौ (अविद्येत) दिसणार नाहीं. दिवसाच्याच आरंभीं ( देहादिकांचा—अभिमानरूपी रात्र नष्ट झाल्यावर ) हें महत्कार्याचें धनुष्य नेहमीं दिसेल. हें भूमीपासून ( शरीपासून ) निघेल व आकाशांत ( शून्यांत ) लय पावेल.

असो; महाधन्वी जो रुद्र त्याच्या भयानें शेंकडों प्रचेत्याचे पुत्र हातांत बाण घेऊन एकदम पळूं लागले. रुद्रगणांबरोबर नंदी मात्र पिनाक घेऊन उभा राहिला; तो युगांतकाळीं वर उचललेल्या जळजळीत ब्रह्मदंडासारखा दिसूं लागला तेव्हां महाबाहु विष्णु एका हातीं युद्धांत उत्पन्न झालेलें मोठें धनुष्य, दुसऱ्या हातीं चक्र, तिसऱ्या हातीं घंटायुक्त गदा, व चौथ्या हातीं खड्ग घेऊन निघाला. तो हात वर उचललेल्या रुद्राच्या पुढें येऊन उभा राहिला. शृंगाग्रांनीं केलेलें मोठें ( शार्ङ्ग ) धनुष्य, लोकांत अप्रतिम असलेला शंख व टोंकें वांकविलेले बाण घेऊन व सैन्यासह हात जोडून ज्यानें गोधा व अंगुलित्राण बांधिलें आहे असा विष्णु अग्रभागीं उभा असतां चंद्रयुक्त मेघाप्रमाणें दिसत होता. अग्नीसारखे तेजस्वी आदित्य, वसु इ० सर्व दिव्य शस्त्रांसह विष्णूच्या सभोंवार उभे राहिले. मरुत्, विश्वेदेव, गंधर्व, नाग, किंनर, व पन्नग यांसह यक्ष रुद्रास जाऊन मिळाले. दंड टाकून देऊन ऋषि उभय पक्षांकडे राहून ( किंवा त्यांचें हित चिंतन करून ) लोकांच्या हिताच्या इच्छेनें शांतीसाठीं जप करूं लागले. अग्रगामी रुद्रानें रणामध्यें बाणानें विष्णूचाच वेध केला. हृदय व सर्वांगसंधि यांचे ठाईं तीक्ष्णाग्र अशा सुंदर ( पिच्छयुक्त[१] ) बाणानें क्षतें केलीं ! पण सर्वात्मा ब्रह्मसंभव विष्णु डगमगला नाहीं. साही इंद्रियांनीं युक्त असतांही तो कधींही रागावला नाहीं. त्यानें आपलें धनुष्य लववून त्याशीं शरसंधान केलें; व उचललेल्या ब्रह्मदंडाप्रमाणें तात्काळ तो बाण शंकराच्या डाव्या फांसळीवर सोडला; परंतु त्या बाणाचा वेध झाला असतां शंकरही पण डगमगला नाहीं. वज्राच्या प्रहारानें मंदर पर्वताचा मोठा संधि शिथिल होत नाहीं. नंतर विष्णूनें वेगानें उडी मारून सनातन रुद्राला कंठाचे ठाईं घट्ट धरिलें. त्यामुळें तो भगवान्

---

१ नीलकंठ म्हणतो कीं, महाविष्णु ही धर्माधिष्ठात्री देवता होय; व शंकरही ज्ञानाधिष्ठात्री देवता होय. या उभय देवतांचा परस्पर विरोध आहे. व आदित्यादिक विष्णुपक्षीय असल्यामुळें ज्ञानाचे म्ह० शंकराचे द्वेष्टे समजावे.

१ आमचा व कलकत्ता पाठ ' सुपत्रिणा ' आहे. वाईकरांचा पाठ ' सुवंत्रिणा आहे. तो कमी सुरस वाटतो.

नीलकंठ झाला. इतक्यांत 'तूं अनादिनिधन देव आहेस; तूं मला क्षमा कर. तूं सर्व भूतांचा विद्योपदेशक आचार्य आहेस. तूं माझ्या कर्माचा कर्ता, सर्व कर्माचा कर्ता, विकर्ता, भूतांचा कारणीभूत, अज्ञानरहित, व भूतोत्तम आहेस. कर्मानुरूप प्राप्त झालेल्या नाना योनीं-मध्यें राहून तूंच अंतर्यामी स्वतः सर्व कर्में करतोस. कर्ता व करविता या दोघांहून व्यतिरिक्त असा कोणी अतिशय ( शुद्ध स्वरूप ) हें वरील नियमन करतो. हे सनातना, तुला नमस्कार असो."

अशा प्रकारच्या शुभ व अत्यद्भुत वाणी अंतरिक्षांतून सिद्धांच्या तोंडून निघालेल्या ऐकूं येऊं लागल्या. इतक्यांत रुद्रसंभव, बलवान् व क्रोधमूर्च्छित नंदीनें पिनाक उचलून युद्धांत विष्णूच्या मस्तकावर प्रहार केला. तेव्हां सुरोत्तम विष्णु नंदीकडे पाहून हंसला. त्या भगवान् सर्वभूतपति हरीनें त्याचें स्तंभन केलें. नंतर विष्णु ब्रह्मासारखा होऊन तेजानें जळत असल्याप्रमाणें पण क्षमावान् अशा खांबासारखा अचळ उभा राहिला. तो शत्रुदमन करणारा अव्यय हरि शांतात्मा, अचिंत्य, अप्रमेय व अजेय असल्याकारणानें युगांतकाळच्या अग्नीप्रमाणें होऊन राहिला. प्रसन्न झाल्यानंतर विष्णूनें रुद्रास यज्ञभाग दिला, मग त्यक्तकाम असा सुरोत्तम जो शंकर तो नित्य विष्णुधर्मपर झाला.

हे राजेंद्रा, विष्णूनें त्या यज्ञाला पुनः सांधिलें. विष्णु व रुद्र यांच्या त्या घोर युद्धांत सर्व गण आपापल्या पक्षांत जाऊन उभे राहिले. दक्षयज्ञाच्या विनाशकाळीं दोहों पक्षीयांचें आपापले पक्षांत राहूनच युद्ध झालें. त्या वेळीं यज्ञाचा विनाश लोकांत मशहूर झाला. हे राजेंद्रा, सर्व भूतांस हा सनातन यज्ञ हितकर आहे. त्या दक्ष प्रजापतीला यज्ञफळ मिळालें.

ही येथें सांगितलेली दिव्य कथा, शुद्ध व पवित्रचित्त होऊन जो ब्राह्मणांस सांगतो तोच खरा बुद्धिमान् होय. ह्या सर्व अध्यात्म ज्ञानाचा अभ्यास करून मनुष्य देवलोकांत मान ( महत्व ) पावतो. हा महात्म्या ( विष्णूचा ) पौष्कर नांवाचा प्रादुर्भाव होय. पौष्कर पुराणांत हा प्रादुर्भाव व्यासानें सांगितला असून, तो मीं व परम ऋषि यांनीं यथार्थपणें संस्कार देऊन तयार केलेला आहे. जो कोणीं या श्रेष्ठ पुराणपुरुषाचें पूर्वोक्तरीत्या सावधानचित्तानें श्रवण करील, तो सर्व इच्छा मिळवून शोकरहित होतो व स्वर्गांतील फळें भोगतो.

## अध्याय तेहतिसावा.

—:•:—

### वराहप्रादुर्भाववर्णन.

जनमेजय ह्मणतोः—हे ब्राह्मणा, कथा सांगणारांच्या तोंडून पुराणांतून अमित तेजस्वी विष्णूचा वराह म्हणून अवतार सांगितलेला आहे ( असें ऐकिलें आहे ), त्याचें चरित्र,

---

१ चतुर्धर ह्मणतो "विष्णु रुद्राचे बोकांडी बसून त्याला नीलकंठ करिता झाला—या आख्यायिकेचे आध्यात्मिक तात्पर्य असें आहे कीं, ज्ञान जरी उत्पन्न होतांना धर्मापासूनच उत्पन्न होतें, तरी तें एकदां पूर्णपणें उत्पन्न झाले की धर्माच्याच बोकांडीं बसूं पाहतें ( त्याचीं मुळे उपटूं लागतें ). परंतु असे जरी आहे तरी विद्वानाशिवाय धर्माचा दुसऱ्याला अधिकार नसल्यानें तो धर्म विद्वानाच्या ( ज्ञानाच्याच ) कंठीत रहतो ( त्याचेंच तोंडीं वागतो )—त्याचेच गळीं बसतो, व त्याला लाञ्छित करून सोडतो."

१ कारण, नीलकंठ म्हणतो, यज्ञ नष्ट झाल्यास ज्ञानाचे द्वारच लुप्त होईल. यज्ञकर्ता दक्ष जरी अज्ञानी होता तरी यज्ञामुळेच त्याला अखेर होतां होतां तत्वज्ञान प्राप्त झाले.

१ हेच 'पद्मपुराण' असावेसें वाटतें. परंतु आनंदाश्रमांत प्रसिद्ध झालेली पद्मपुराणाची प्रत चाळून पाहतां 'वरील अध्यात्मपर अर्थानें पूर्ण असा भगवंताच्या 'पुष्करावतार' वर्णिलेला आम्हांस आढळला नाहीं.

त्याचा विधि किंवा त्याचा विस्तार मला माहीत नाहीं. त्याचा कर्म व गुण यांसह भाव, किंवा हेतु किंवा मनांतील इच्छा हीं मला कांहीं ठाऊक नाहींत. वराह किमात्मक ( यज्ञमय किंवा योगमय ) आहे, त्याची मूर्ति ( भौतिक किंवा मायिक ) कशी आहे, त्याची देवता कोणती ( हरि कीं हर ) ? त्याचा आचार काय ? त्याचा प्रभाव काय ? किंवा त्यानें पूर्वी काय केलें ? हें तूं वराह-अवताराचें चरित्र मला सविस्तर श्रवण करीव; तसेंच यज्ञाकरितां आलेल्या ब्राह्मणांचें चरित्रही मला सविस्तर सांग.

वैशंपायन सांगतातः—कृष्ण द्वैपायनानें सांगितलेलें हें अनेक वार्तांनीं युक्त व वेदतुल्य जुनें ( चरित्र ) मीं तुला सांगतों. अद्भुत कर्मे करणाऱ्या कृष्णाचेंच हें महावराहचरित आहे. हे राजन्, अरिसूदन नारायणानें वराहाचें रूप घेऊन दाढेनें समुद्रांत असलेल्या पृथ्वीचा उद्धार कसा केला व वैदिक उत्कृष्ट श्रुतींनीं तो कसा अलंकृत झाला, हें, हे जनमेजया, तूं पवित्र व नियतवाणीचा होऊन ऐक. हें पुराण, श्रेष्ठ, पुण्यप्रद व वेदतुल्य आहे. हें नानाश्रुतींनीं युक्त असल्यामुळें नास्तिकास सांगूं नये. हें सर्व पुराण सांख्य व योग ज्ञानांनीं भरलेलें आहे. तें संपूर्ण विधीनें सांगितलेलें आहे. जो याचा अर्थ जाणतो तोच खरा पुरुष होय. विश्वेदेव, साध्य, रुद्र, आदित्य, अश्विनीकुमार, प्रजापति, सप्तर्षि, पूर्वीचे मनःसंकल्पापासून झालेले महर्षि, वसु, अप्सरा, गंधर्व, यक्ष, राक्षस, दैत्य, पिशाच, नाग, विविध प्राणी, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, म्लेच्छादिक, पृथ्वींतील सारे चतुष्पाद, तीर्यग्योनींतील ( सारे पशुपक्षी ), जंगम जंतु व जितके कांहीं जीवंत प्राणी (हे सारे त्या वराहाचें रूप होय.) प्राणीयुगसहस्राची अखेर होऊन ब्राह्म दिवस संपला असतां, व सर्व प्रकारचे उत्पातांनीं (सर्व प्राण्यांचा नाश ) झाला असतां, ( अग्नी, वायु, सूर्यरूपी ) तीन शिखांचा हिरण्यरेता ( हिरण्यगर्भ ) वृषाकपि ( हरिहरात्मक किंवा वर्षण शोषणरूप ) होऊन आपल्या शिखांनीं ( किरणांनीं ) सर्व देहवान् प्राणी व विविध लोक यांस शोषवून टाकतो. नंतर अग्रभागीं त्याच्या तेजोराशींनीं जळणारे सर्व प्राणी विवर्ण मुखाचे व दग्धशरीरी झाले. ज्वालायुक्त मुखांनीं ते मारले गेले. शिक्षादि अंगें व उपनिषदें यांसह वेद, इतिहासप्रभृति सर्व विद्यांचे आश्रय, व सत्यधर्मपरायण जन स्वतःच्या इच्छेनें विश्वतोमुख अशा ब्रम्ह्याला पुढें करून तेहतीस कोटि देवगण—तो दिवस आला असतां, त्या मोठ्या हंसस्वरूपी, अक्षर, महायोगी, नारायण, व प्रभु अशा हरीच्या ठाईं प्रवेश करितात.

ज्याप्रमाणें सूर्याचे उदयास्त सतत होतात त्याप्रमाणें हरीमध्यें प्रविष्ट झालेल्यांचें पुनः पुनः जननमरण होतें. सहस्र युगांचा अंत परिपूर्ण झाला असतां, कल्प निःशेष झाला असें म्हणतात. त्या वेळीं जीवांचें सर्व कार्य बंद पडतें. देव, असुर, सर्प इ० सर्व लोकांचा उपसंहार करून व त्यांना आपल्या उदरांत ठेवून जगद्गुरु भगवान् आपण एकटाच राहतो. कल्प संपला असतां पुनः पुनः जो अव्यक्त व शाश्वत देव भूतें उत्पन्न करितो, त्याचें हें सर्व जगत् आहे. सर्व लोक सूर्यकिरणरहित व चंद्रकिरणरहित झाले असतां, धूम्र, अग्नि व वायु यांनीं जग चा त्याग केला असतां, यज्ञ व वषट्क्रिया लोपल्या असतां, पक्षिगणांचा समूह नाहींसा होऊन रस्त्यांतून प्राणी फिरकेनासे झाले असतां, चोहोंकडे अमर्याद व भयंकर असा काळोख पसरून असतां, सर्व लोक दिसेनासे झाले असतां, सर्व कर्मे नाहींशीं झालीं असतां, सर्व संपात ( संबंध ) शांत झाले असतां, वैर व परिग्रह

नष्ट झाले असतां, सर्व लोक आपलें स्वाभाविक जें संस्थान नारायण तेथें जाऊन तद्रूप झाले असतां, परमेष्ठी हृषीकेशानें शयन करण्यास प्रारंभ केला. पीतांबरधारी, आरक्त नेत्रांचा, मेघश्याम, व महाबाहु कृष्ण, हजारों शिखांनीं विकास पावणारा जटाभार धारण करून रक्त-चंदन भूषित, पुण्यमय व श्रीवत्सलांछित अशा उरःस्थळानें, विद्युद्युक्त मेघाप्रमाणें शोभला. तेव्हां त्याची हजार कमलांची मालाही शोभूं लागली. त्याची पत्नी स्वतः लक्ष्मी त्याच्या देहास आच्छादित करून होती. नंतर तो सर्व लोकांचा पितामह, धर्मात्मा व अमितपराक्रमी ( देव ) कांहीं एका निद्रायोगानें निजला. नंतर हजार वर्षे पूर्ण झालीं असतां तो देवाधिपति पुरुषोत्तम विभु आपेंआप जागा झाला. नंतर तो लोककर्ता पुनः लोकोत्पत्तीचा विचार करूं लागला. पितर, देव, असुर व नर यांस ब्रह्मदेवाच्या कर्मानें निर्माण केल्यावर, युद्धांत शत्रु जिंकणार तो हरि देवतांना कोणतीं कर्मे नेमून द्यावीं याचा विचार करूं लागला. नंतर त्या वाक्पतीनें सर्व लोकांची उत्पत्ती केली. तोच ( भूतांचा ) कर्ता, ( भौतिकांचा ) विकर्ता, संहर्ता, प्रजापति, ( स्रष्टा ) धाता, ( कालादिरूप साधारण कारण ) विधाता ( कर्मरूप विशेष कारण ), संयम व यम आहे. सर्व देव नारायणपर आहेत. सर्व क्रिया नारायणपर, यज्ञ नारायणपर, श्रुति नारायणपर, मोक्ष नारायणपर, गति नारायणपर, धर्म नारायणपर, क्रतु नारायणपर, ज्ञान नारायणपर, व परंपद ( चैतन्यज्योति ) नारायणपर आहे. नारायणापेक्षां श्रेष्ठ देव झालाही नाहीं व होणारही नाहीं. तो भवनाधिपति, स्वयंभू ब्रह्मा म्हणून समजावा. तोच वायु म्हणून, सनातन यज्ञ म्हणून, सत् व असत् म्हणून, व प्रजाकारक यज्ञ म्हणून समजावा. देवांनीं ( इंद्रियांनीं ) जें कांहीं जाणण्यासारखें आहे तें हा जाणतो. जें हा भगवान् जाणतो तें देव ( इंद्रियें ) जाणत नाहींत. प्रजापति, सप्तर्षि, व सर्व देव यांस याचा अन्त लागत नाहीं म्हणून यास अनंत असें म्हणतात. जें याचें परम श्रेष्ठ रूप आहे तें देवता पाहात नाहींत. जें अवतारी संबंधानें उत्पन्न झालेलें याचें (सगुण) रूप त्याचीच देव पूजा करितात. जें रूप हा देव ( व्यक्त करून ) दाखवीत नाहीं तें शोधून काढण्यास कोण समर्थ आहे ? जो सर्व भूतग्रामाचा नायक, जो अग्नि व वायु यांचा गति व जो तेज, तप व व अमृत यांचें स्थान आहे, तो चारी आश्रम व वर्ण यांमध्यें चातुर्होत्रांचें[१] फळ भोगणारा आहे. हा चतुःसागरांपर्यंत असून चारी युगें फिरविणारा आहे. हें जग संहरून, आपल्या गर्भांत धारण करून, तो महायोगी हजार वर्षांनंतर अंड प्रसविता झाला. सुर, असुर, पक्षी, सर्प, अप्सरोगण, महौषधि, पर्वत, यक्ष व गुह्यकांसह श्रुतिधर ( ब्राम्हण ) व राक्षसांचें कुळ इत्यादि हें ( अशेष ) जगत् तो प्रभु प्रजापति स्वतःपासून उत्पन्न करितो.

## अध्याय चौतिसावा.

—:०:—

### वराहकृत धरोद्धार.

वैशंपायन सांगतातः—हें ब्रह्मांड पूर्वी हिरण्मय व प्रजापतीचें ( समष्टिजीवाचें ) मूर्तिमय होतें, अशी वैदिकी श्रुती आहे. नंतर हजार वर्षे भरल्यानंतर प्रभूनें हें ( अंडें ) प्रथम वरून फोडलें; ( ब्रह्मरंध्रांतून बाहेर आलें ) व लोकांच्या उत्पत्तीकरितां नंतर वेळोवेळीं पुनः पुनः फोडलें. तो लोकोत्पत्तिकारक प्रभु पुनः तें अंड आठ प्रकारें[२] फोडिता

१ ज्या यज्ञांत चार ऋत्विज असतात तो.

२ वाक्, पाणी, पाद, श्रोत्र, त्वक्, चक्षु, जिव्हा व घ्राण मिळून आठ.

झाला. सर्वभागवित् तो या जगाचे याप्रमाणें विभाग करिता झाला. जें वरचें छिद्र तें आकाश झालें; व तें सत्कर्म करणाऱ्यांची गति आहे. विश्वयोगी अशा त्यानें जें खालीं छिद्र केलें तें रसातल ( नरकद्वार ) होय. देवलोक उत्पन्न करण्याच्या हेतूनें जें पूर्वीं अंड ( शरीर ) तयार केलें, व सभोंवतीं जीं आठ छिद्रें त्यानें केलीं, त्या सर्व दिशा ( इंद्रियें ) होत. दिशा सर्व त्यानें मनानेंच दोन प्रकारच्या (दिशा व विदिशा स्थूल व सूक्ष्म विषयग्राहक इंद्रियांच्या रूपानें ) केल्या. नानारागांनीं विचित्र अशीं जीं अंडाचीं शकलें झालीं तींच नानारंगांचे मेघ झाले. जो अंड्यामध्यें असलेला द्रव गळलेला होता तेंच पृथ्वीवरील सर्व सुवर्ण होय. त्या रसाच्या क्लेदसमुद्राच्या ओघानें सर्व पृथ्वी, युगांतीं सागरांनीं आच्छादिली जावी त्याप्रमाणें, आच्छादिली गेली. देवलोक करण्याच्या हेतूनें त्यानें जें अंड पूर्वीं केलें, तेथें गळलेलें सर्व पाणी कांचनगिरि झालें. त्या पाण्यानें, सर्व दिशा व उपदिशा, अंतरिक्ष, स्वर्ग, व जें कांहीं मध्यंतरी आहे तें सर्व बुडून गेलें. जेथें जेथें पाणी गळलें तेथें तेथें पर्वत झाले; व त्यायोगें पृथ्वी सर्व पर्वतांच्या योगें विषम व गहन ( सखल ) झाली. पृथ्वी त्या बहुत योजनें विस्तीर्ण अशा पर्वतसमूहांच्या मोठ्या ओळींनीं पीडली गेली. महीतळावर दिव्य, नारायणात्मक, हिरण्मय, व तेजासारखें विमल स्वरूपाचें असें पुष्कळ पाणी दिसूं लागलें. ती पृथ्वी तें पाणी धारण करण्यास समर्थ झाली नाहीं; भगवंताच्या तेजानें पीडित झालेली ती खाली खालींच शिरूं लागली. पृथ्वी खालीं शिरत आहे असें पाहून लोकहिताच्या इच्छेनें मधुसूदनानें तिचा उद्धार करण्याचा मनांत निश्चय केला. श्रीभगवान् म्हणाला ' माझें बल व तेज प्राप्त होऊन ही गरीब देवी, चिखलांत गाय रुतते त्याप्रमाणें, रसातलांत शिरूं लागली आहे.

पृथ्वी म्हणाली:—त्रिविक्रम, अमर्याद पराक्रमी, महानृसिंह, चतुर्भुज, श्रीशार्ङ्गधनुष्य, चक्र, खड्ग व गदा धरणारा, अशा पुरुषोत्तमास नमस्कार असो. तुज परमात्म्याकडून ह्या आत्म्याचें व जगताचें धारण केलें जातें. तूंच भूतांचें धारण करितोस. व भुवनांचेंही धारण करितोस. तूं जें कांहीं आपल्या तेजानें व बलानें धारण करतोस तेंच तुझ्या प्रसादानें नंतर मी धारण करित्यें. त्वां धारण केलेलेंच मीं धारण करित्यें; न धारण केलेलें मींही धारण करित नाहीं. तूं न धारण केलेलें असें रूपच नाहीं. हे वीरा, तूंच युगायुगीं नारायण होतोस; व जगाच्या हितासाठीं माझा भार उतरतोस. हे सुरश्रेष्ठा, तुझ्याच तेजानें पीडित होऊन रसातलास जात असलेल्या, व तुलाच शरण आलेल्या माझें सांप्रत रक्षण कर. मीं दानव व दुरात्मे राक्षस यांजकडून पीडित झालेली आहें; म्हणून मी तुज सनातनासच नित्य शरण आलेली आहें. ककुद्मी ( थोराड बैलासारख्या सर्वश्रेष्ठ ) अशा तुला जेथपर्यंत मी मनानें शेंकडों वेळां शरण गेलें नाहीं, तेथपर्यंतच मला पुनः भय आहे असें मला वाटतें.

श्रीभगवान् म्हणाला:—हे कल्याणि पृथ्वि, तूं भिऊं नकोस. शांत होऊन समाधान पाव. हा पहा, हा मी तुला इच्छित अशा योग्य स्थानास आणतों.

वैशंपायन सांगतात:—नंतर त्या महात्म्यानें मनानेंच दिव्य स्वरूपाचें चिंतन केलें. (त्यानें असा विचार केला कीं, ) मीं कोणत्या स्वरूपानें जलांत बुडालेल्या पृथ्वीचा उद्धार करूं ? याप्रमाणें विचार करून प्रभु नारायणदेवानें जलक्रीडेची स्वतःस आवड असल्यामुळें वराह-

रूपाची आठवण केली. भूमीला धारण करणारा हरि तिला उद्धरण्यास उद्युक्त होऊन, सर्व भूतांना अधृष्य, वाङ्मय, ब्रह्मसंमित, दशयोजन विस्ताराचें, शंभर योजनें उंच, नीलमेघाच्या कांतीचें, मेघांतील विजेच्या गडगडाटाप्रमाणें शब्द करणारें, महागिरींसारख्या दृढ शरीरानें युक्त, श्वेतवर्ण, दीप्त व उग्र दाढांचें, विद्युत् व अग्नि यांच्यासारख्या कांतीचें, सूर्यासारख्या तेजाचें, पुष्ट, वाटोळें व विस्तीर्ण स्कंधांचें, मदोन्मत्त व्याघ्राचे गतीनें जाणारें, पुष्ट व उंच कटिप्रांत असलेलें, व धर्मलक्षणांनीं पूजित असें विपुल व अमित वाराहरूप घेऊन पृथ्वीच्या उद्धारार्थ रसातलांत प्रवेश करिता झाला. वेद हेच ज्याचे पाय आहेत, यूप हीच दाढ आहे, क्रतु हेच दांत आहेत, चिति हेंच मुख आहे, अग्नि हीच जीभ आहे, दर्भ हेच रोम आहेत, व प्रणव हेंच मस्तक आहे—असा तो महातेजस्वी, अहोरात्ररूपी नेत्र धारण करणारा व श्रुति व वेदांगें हींच कुंडलें कानांत घातलेला, वराहरूप हरि रसातळांत गेला. त्याचें आज्य ( तूप ) हेंच नाक, स्रुवा हेंच तोंड, व सामघोषच महान् स्वर होता. तो सत्यधर्ममय, श्रीमान् व क्रम ( गति ) व विक्रम ( पराक्रम ) यांनीं ( यांमुळें ) सत्कार पावलेला होता. गवामयनादि क्रियासत्रें ज्याची महाघोण ( नासिका ) आहे, पशु ज्याचे गुडघे आहेत, मख हीच आकृति आहे, व उद्गाता हींच ज्याचीं आंतडीं आहेत असा तो होता. तो महालिंग व बीजभूत औषधि हींच फळें असलेला असा होता. वायु हाच त्याचा अंतरात्मा, मंत्रशक्ति हाच त्याचा पराक्रम, सोमरस हेंच रक्त, वेदि हाच खांदा, हवि हाच गंध, हव्य, कव्य या वेगांनीं युक्त, प्राग्वंश[1] हेंच ज्याचें दीर्घ शरीर, नाना दीक्षांनीं पूजित, दक्षिणा हेंच ज्याचें हृदय, योगी, महासत्रमय, महान्, उपाकर्मनामक स्मार्त वेदोपकरण हेंच ज्याचें ओष्ठभूषण आहे, नाना छंद हेच ज्याचे गमनमार्ग आहेत, गुह्य उदनिषदें हींच ज्याचें आसन आहेत, व छायारूपी पत्नी ज्यास सहाय आहे, असा हा गुरु, मणिशृंगासारखा[2] उंच यज्ञवराह होऊन ( रसातळीं शिरला. ) तो प्रजापति जलानें आच्छादित झालेल्या त्या पृथ्वीपाशीं गेला. त्या वेळीं पाताळाच्या अंतर्भागाचा आश्रय करून ती पृथ्वी रसातळांत निमग्न झालेली होती. प्रभूनें लोककल्याणासाठीं तिला दाढेच्या टोंकांनीं उचलली. नंतर त्या पृथ्वीधरानें तिला योग्य स्थळीं आणून प्रथम सोडून मागाहून एकदम धरिलें. मग ती पृथ्वी त्यानें धारण केल्यामुळें सुख पावली. तिनें त्या कल्याणकर देवाला नमस्कार केला.

याप्रमाणें प्राण्यांच्या कल्याणाची इच्छा करणाऱ्या देवानें यज्ञवराह होऊन लोकांच्या हिताच्या इच्छेनें पृथ्वी वर काढिली. वर काढिल्यानंतर जगाच्या स्थापनेसाठीं तो कमलनयन पृथ्वीचे विभाग पाडण्याचा विचार करूं लागला. हे राजन्, याप्रमाणें त्या देवोत्तमानें रसातळांत गेलेल्या पृथ्वीविषयीं विचार करून, नंतर त्या विभु, श्रेष्ठ वराहरूप धारण करणाऱ्या, वृषाकपि, अनन्य पराक्रमी व महायशस्वी अच्युतानें लोककल्याणार्थ एका दाढेनें बळेंच पृथ्वीचा उद्धार ( वर काढणें ) केला.

---

१ या वराहाला 'यज्ञवराह' म्हणण्याचा प्रघात आहे, कारण याची अधिष्ठात्री देवता 'यज्ञ' आहे.

१ जिचे खांब पूर्वाभिमुख आहेत अशी एक यज्ञशाला.

२ मणिशृंग.

# अध्याय पसातिसावा.

—:०:—

## धरा वर्णन.

वैशंपायन सांगतातः—पृथ्वी त्या जलौघावर मोठ्या नावेप्रमाणें तरती राहिली. तिचा आकार फार विस्तीर्ण असल्यामुळें ती पाण्यांत बुडली नाहीं. त्यानंतर प्रभूनें पृथ्वीचे विभाग कसकसे करावे याचा विचार केला. सर्व पर्वतांची उंची, नद्यांचे मार्ग आंखणें, त्यांच्या लांबीचें प्रमाण, त्यांचे प्रवाहाची गति व दिशा तसेंच त्याचा पवित्र महिमा व फलाचें कमीजास्तपण याचें त्यानें अनुचिंतन केलें. पृथ्वी व त्याचप्रमाणें महासागर यांचे चार पांकळ्यांच्या कमलाप्रमाणें चार दिशांस चार[1] भाग केले. त्यांच्या पृथ्वीच्या मध्यभागीं सुवर्णमय मेरुपर्वत केला. पूर्व दिशेस जाऊन त्यानें शंभर योजनें लांबीचा व हजार योजनें उंचीचा उदयपर्वत निर्माण केला. त्याचीं शिखरें सोन्याचीं असून तीं मध्यान्ह काळच्या सूर्यासारखीं चकाकत होतीं. तो उदयपर्वत स्वतेजानें शोभणारा, विस्तीर्ण वेदिकांनीं युक्त असा होता. त्या कमलनेत्र प्रभूनें त्या पर्वतावर नानाप्रकारचे मोठमोठ्या खांद्यांचे व नित्य फुलें व फळें येणारे सुवर्णवृक्ष बनविले. नंतर त्या महादेवानें शंभर योजनें विस्तीर्ण व त्याच्या तिप्पट लांब असा सौमनसपर्वत केला. त्यावर नानाप्रकारच्या हजारों रत्नांचा संचय केलेला होता. संध्याकालीन मेघाप्रमाणें शोभणारी अनेक रंगाची वेदिकाही तेथें केली होती. ज्यावर नानारत्नांचीं शिळातलें आहेत व जो वृक्षांनीं घनदाट भरला आहे असा साठ योजनें उंच सहस्रशृंग पर्वत, करून त्या विश्वकर्म्या प्रजापतीनें त्यावर आपलें उत्तम स्थान व सर्वभूतांना वंद्य असें श्रेष्ठ आसन केलें. जलकणांच्या ढिगारांसारखा (बर्फमय) शिशिरपर्वत नंतर बनविला व तो दुर्गम्य स्थानांमुळें अवघड व आंतून गुहामंडित होता. त्यावर त्यानें नदी निर्माण केली. ती असंख्य पक्षिगणांनीं गजबजलेली, वाळवंटांनीं युक्त, व वसुधारा या नांवें प्रसिद्ध आहे. ती नदी आपल्या शेंकडों मुखांनीं सारी पवित्र पूर्व दिशा व्यापून टाकून तिला मोत्यें, शंख इत्यादिकांनीं अलंकृत अशा आपल्या अमृतासारख्या प्रवाहानें सुशोभित करित्ये. नित्य पुष्पफळयुक्त, चांगल्या रीतीनें पालवीनें आच्छादिले गेलेल्या व सुंदर अशा छायाकारक तीरावरील वृक्षांनीं ती नदी अधिकच शोभली.

याप्रमाणें पूर्व दिशेचा विभाग करून त्या देवानें दक्षिण दिशेला केवळ सुवर्णमय व रौप्यमय पर्वत केला. एकीकडून सूर्याचा व दुसरीकडून चंद्राचा असे दोन्ही बाजूंनीं दोन वर्ण धारण करणारा तो पर्वतश्रेष्ठ फारच खुलूं लागला. सूर्यचंद्रासारखा तेजानें एकाच वेळीं व्यापलेला शरीरधारी सूर्यच असा तो महागिरी इच्छिले प्रकारचीं सर्व फळें देणाऱ्या रम्य व मनोरम वृक्षांसह त्यानें निर्माण केला. नंतर हत्तीसारख्या आकाराचा, चोहोंकडे कांचनमय गुहा असलेला, पुष्कळ योजनें विस्तृत, असा कुंजर नामक पर्वतही त्यानें निर्माण केला. बैलाच्या आकाराचा, हेम व कांचनाचीं[1] वृक्षें असलेला व फुलांनीं जणूं काय हंसत असलेल्या ऋषभपर्वतास त्यानें निर्माण केलें. शंभर योजनें उंच, सोन्याचीं शिखरें असलेल्या, पुष्पित वृक्षांच्या, प्रतिक्षोभ पर्वताप्रमाणें असलेल्या महेंद्र पर्वताला त्यानें निर्माण केलें. नाना रत्नें भरलेला, सूर्यचंद्रासारख्या कांतीचा, व विचित्र व फुललेल्या वृक्षांनीं युक्त असा मलयपर्वत त्यानें निर्माण केला. शिलासमूहानें व्याप्त, असा मैनाक पर्वत त्यानें दक्षिण दिशेस केला. नाना

[1] भरत, केतुमाल भद्राश्व व कुरु हे चार खंड.

[1] कांचन हा एक पुष्पवृक्ष आहे.

वृक्ष व लता यांनीं गजबजलेला व हजार शिखरें असलेला विंध्यपर्वत उत्पन्न केला. अनेक भोंवरे असलेली, पुलिनप्रदेशरूपी श्रोणीनें शोभणारी, सुरम्य, पाण्यानें भरलेली, दक्षिणदिशेस असलेली, दिव्य, शंभर तीर्थें असलेली आपल्या पवित्र पाण्यानें सर्व प्रदेश बुडविणारीं दक्षिण दिशेस उगवून पश्चिमेस वाहणारी--अशी पयोधारा नांवाची नदीही त्यानें निर्माण केली. तिचें पाणी दुधासारखें आहे अशी श्रुति आहे. शंभर योजनें उंच, चित्रविचित्र मोठ्या उंच गेलेल्या व सोन्याच्या शिखरांनीं व सोन्याच्या शिळांनीं, व गुहांनीं अलंकृत, सूर्यासारख्या कांतिमान् व तेजस्वी शाळ व तालवृक्षांनीं व सोन्याच्या शोभिवंत चित्रविचित्र वेदिकांनीं युक्त असे साठ हजार पर्वत त्यानें तेथें निर्माण केले. ते सारे आकारानें व प्रभेनें मेरूसारखेच होते. हजार जळधारा असलेल्या, मेरूसारख्या कांतीच्या, पुण्यतीर्थगुणानें युक्त, साठ योजनें विस्ताराचा, तितक्याच उंचीचा, व आपल्या रूपासारखा वाराह नांवाचा दिव्य वैदूर्यमय पर्वत त्यानें निर्माण केला. तेथें रुप्याचे व सोन्याचे दिव्य शिलोच्चय होते. तसेंच, चक्रासारखा, महाबलवान्, हजार शिखरांचा, व विपुल असा चक्रवान् पर्वत त्यानें निर्माण केला. तसेंच, शंखासारख्या आकृतीचा, रुप्याचा, व पांढऱ्या पोंवळ्यांनीं भरलेला शंख नांवाचा पर्वत त्यानें निर्माण केला. सुवर्ण व रत्नें यांनीं युक्त व फुलांनीं जणूं काय हंसणारा--असा पारिजात महा वृक्ष त्यानें त्या मोठ्या पर्वताच्या शिखरावर स्थापला. पश्चिमेकडे त्या वराहानें शुभ व अमित जलाच्या घृतधारा नांवाच्या पवित्र नदीला उत्पन्न केलें, अशी श्रुति आहे. पश्चिमेकडे सोन्यासारखे उज्वल पर्वत निर्माण करून त्यानें उत्तरेकडे गुणांनीं यांहूनही श्रेष्ठ पर्वत निर्मिले. नंतर सौम्य, सुवर्णधातूनें आच्छादिलेला, व सूर्यासारखा सौम्यगिरी त्यानें अंतरिक्षाच्या प्रमाणानें ( म्ह० तितका उंच ) बनविला. तो प्रदेश सूर्यरहित असला तरी पर्वताच्या प्रकाशानें प्रकाशित होतो. त्या पर्वताच्या कांतीनें तो प्रदेश तळपणाऱ्या सूर्यप्रकाशानें युक्त असल्याप्रमाणेंच अधिक शोभत होता. व तो पर्वत सूक्ष्म लक्षणांनीं ओळखला जाणारा सूर्यच जणूं प्रकाशत आहे असें वाटत होतें. नंतर हजार शिखरांचा, नाना तीर्थांनीं युक्त व रत्नांनीं भरलेला अस्ताचल त्यानें निर्माण केला. मनोहर गुणांनीं युक्त असा पर्वतश्रेष्ठ मंदर, व आपल्या फुलांच्या वासानें प्राण्यांस उद्दाम करणारा गंधमादन पर्वत त्यानें निर्माण केला. त्याच्या शिखरावर ( गंधमादनाच्या ) सोन्याच्या रसानें उत्पन्न झालेली, अनंत व अद्भुत दिसणारी अशी सुवर्णमय नदी त्यानें निर्माण केली. तसेंच त्यानें त्रिशिखर नामक, पुष्कर नामक, व पांढरट मेघासारखा शुभ्र कैलास नामक पर्वतोत्तम निर्माण केला. दिव्य धातूंनीं मंडित असा हिमालय पर्वतही हरीनें वराहाचें रूप धारण करून निर्माण केला. सर्वगुणसंपन्न अशी मधुधारा नांवाची दिव्य व शेंकडों ऋषींनीं संपन्न नदीही त्या प्रभूनें उत्पन्न केली. या प्रकारें त्या भगवान् परमेष्ठीनें सपक्ष व कामरूपी असे पर्वत बनविले. त्या लोकपावनानें या प्रकारें पृथ्वीवर विभाग करून, देव व असुर यांची उत्पत्ती करावी असा कायम विचार ठरविला. सर्व दिशांचे ठायीं विविध नांवाचे पर्वत व पाण्यांनीं भरलेल्या पवित्र नद्या, त्या रक्ताक्ष लोकनाथानें निर्माण केल्या.

# अध्याय छत्तिसावा.

—:०:—

## ॐकारापासून सृष्ट्युत्पत्ति.

वैशंपायन सांगतातः—जग उत्पन्न करण्याच्या इच्छेनें पूर्वज देव विचार करूं लागला. विचार करीत असतां त्याच्या तोंडांतून एक पुरुष निघाला. नंतर तो पुरुष 'मीं काय करूं?' म्हणून (हात जोडून) देवाजवळ उभा राहिला. तेव्हां हास्यवदन करून जगत्पति देवदेवानें म्हटलें कीं, 'आपला विभाग कर.' असें म्हणून तो ईश्वर अंतर्धान पावला. हे भारता, विझलेल्या दिव्याची गति ज्याप्रमाणें कळत नाहीं, त्याप्रमाणें अंतर्धान पावलेल्या देवाची गति त्या पुरुषास कळली नाहीं. नंतर त्या प्रभूनें त्यानें बोललेल्या शब्दांचा विचार केला. वेदांमध्यें भगवान् हिरण्यगर्भ म्हणून जो श्रुत आहे तोच हा पूर्वी जगत्पति प्रजापति झाला. तेव्हांपासून त्यास (उद्देशून) हा सांग यज्ञ केला जातो. त्या महात्म्यानें मला 'आपला विभाग कर' असें सांगितलें आहे (खरें) पण आत्म्याचा विभाग कसा करावा याविषयीं मला मोठी शंका आहे.' या प्रमाणें तो विचार करीत असतां ॐ असा स्वर निघाला. त्यापासून त्यानें भूमि, अंतरिक्ष व स्वर्ग यांस उत्पन्न केलें. त्या ॐकाराचा अभ्यास करणाऱ्या त्या देवाच्या हृदयापासून मनाचा सारभूत असा वषट्कार निघाला. भूमि, अंतरिक्ष व स्वर्ग यांच्या अतिशय पलीकडे स्वरात्मिका, महा स्मृतिमय व पवित्र अशा महाव्याहृति निघाल्या. नंतर वेदांतील चोवीस अक्षरांची श्रेष्ठ देवी गायत्री झाली. त्या दिव्य पदार्थें स्मरण करीत प्रभूनें सावित्रीस निर्माण केलें. भगवान् प्रभूनें ब्रह्मयुक्त कर्मानें ऋग्यजुःसाम व अथर्वण या चारी संपूर्ण वेदांस उत्पन्न केलें. नंतर त्याच्याच मनापासून सन, सनक, सनातन व वरद भगवान् सनंदन झाला. तेथें विभु व सनातन असा सनत्कुमार झाला. हे मानसपुत्र, पाहिला पुत्र धरून सहा महर्षि होत. ब्रह्मा व कपिल यांची, व या सहा योग्यांची यत्नशील ब्राह्मण योगतंत्रांत स्तुति करितात. नंतर मरीची, अत्रि, पुलस्त्य, पुलह, क्रतु, भृगु, अंगिरा, मनु प्रजापति हे आठ महर्षि सर्व भूतें. देवता, असुर, व राक्षस यांचे पितर यांस शंभूनें उत्पन्न केलें. हे सर्व व यांची सर्व प्रजा सहस्र युगें झालीं असतां, व कल्पाचा निःशेष भोग झाला असतां शांत होतात. दुसऱ्या सहस्र युगांच्या पर्यायांत हेच प्रजाकर्ते देव उत्पन्न होतात असें सांगितलें आहे. कर्मविशेषामुळें देवतांचीं विशिष्ट नांवें व जन्म प्रत्येक युगीं तेच तेच असतात. उजव्या आंगठ्यापासून भगवान् दक्ष ऋषि उत्पन्न झाला. त्याची पुनः भार्या डाव्या आंगठ्यापासून उत्पन्न झाली. दक्षाला तिच्या ठाईं प्रख्यात अशा लोकमाता कन्या उत्पन्न झाल्या. हे राजन्, त्यांच्या प्रजांनीं त्रिभुवन व्यापिलेलें आहे; अदिति, दिति, काळा, अनायु, सिंहिका, मुनि, प्राधा, क्रोधा, सुरभि, विनता, सुरसा, दनु, व कद्रु या आपल्या कन्या भावी स्थिति अंतरंगीं जाणणाऱ्या (दक्षानें), यांपासून सुप्रजा निर्माण होवो असें चिंतन करून कश्यपाला दिल्या. अरुंधती, वसु, यामी, लंबा, भानु, मरुत्वती, संकल्पा, मुहूर्ता, साध्या व विश्वा या दहा कन्या दक्षानें ब्रह्मपुत्र मनूला दिल्या. त्या सर्व कन्या अव्यंग

---

१ ॐ हा अ+उ+म् या त्रिवर्णांनीं युक्त असल्यामुळें त्याच्या तीन अवयवांपासून अनुक्रमें भूमि, अंतरिक्ष व स्वर्ग हीं उत्पन्न झालीं.

२ अर्थात् 'चतुर्विंशत्यक्षरात्मिका गायत्री.

१ अध्यायप्रारंभीं जो तोंडांतून निघाला तो पहिला पुत्र असावा.

शरीराच्या व कमलनयना होत्या. त्यांचें मुख पूर्णचंद्राप्रमाणें होतें. त्या सुंदरा व दिव्य सुवासिनी होत्या. कीर्ति, लक्ष्मी, धृति, पुष्टि, बुद्धि, मेधा, क्षमा, मति, लज्जा, व वसु या कन्या त्यानें धर्माला दिल्या. अत्रीला पुत्र झाला तो जलरूप चंद्रच होय. तो अत्रिपुत्र ग्रहांचा अधिप, सहस्रकिरणयुक्त, व अंधःकारनाशक होता. त्याला रोहिण्यादि नक्षत्र योगिनी सत्तावीस उत्तम कन्या दक्षप्राचेतसानें दिल्या.

आतां यांचे पुत्रपौत्र कोणकोण झाले हें मी सांगतों ते ऐक. अर्यमा, वरुण, मित्र, पूषा, धाता, पुरंदर, त्वष्टा, भग, अंशु, सविता, व पर्जन्य या नांवांनीं प्रख्यात असलेले देव महात्म्या कश्यपाला अदितीच्या ठाईं झाले. दितीला कश्यपापासून हिरण्यकशिपु व हिरण्याक्ष असे दोन पुत्र झाले, असें आम्हीं ऐकिलेलें आहे. ते दोघेही अमितपराक्रमी व तपानें कश्यपासारखेच होते. हिरण्यकशिपूचे, प्रऱ्हाद, संऱ्हाद, अनुऱ्हाद, ह्रद, व महापराक्रमी अनुऱ्हद असे पांच महाबलाढ्य पुत्र होते. प्रऱ्हाद सर्वांत वडील व अनुऱ्हद सर्वांत धाकटा होता. प्रऱ्हादास पराक्रमी व महाबलाढ्य विरोचन, जंभ व सुजंभ असे तीन प्रसिद्ध पुत्र झाले. बलि हा विरोचनाचा पुत्र. बाण हा एकच बलीचा पुत्र. बाणाचा शत्रूंचीं शहरें जिंकणारा इंद्रदमन हा पुत्र होय. दनूच्या वंशांत अनेक विख्यात महाअसुर पुत्र झाले. महाउदार विप्रचित्ति हा त्या सर्वांत वडील व त्यांचा राजा होता. क्रोधेपासून गण झाला; त्याचे पुत्रपौत्र अनंत होते. ते सर्व भयंकर व क्रूरकर्मे करणारे असून क्रोधवश नांवानें प्रसिद्ध होते. सिंहिकेला राहु झाला. तो सूर्य व चंद्र या ग्रहांना पीडा करितो. तो चंद्रसूर्यांना ग्रासणारा व महातेजस्वी आहे. कलेला फार भयंकर असा कालकल्पगण झाला. त्याचे नेत्र सूर्यासारखे लाल व कांति नीळया मेघासारखी होती. कद्रूच्या पुष्कळ पुत्रांमध्यें सहस्र फणांचा शेष, वासुकि व तक्षक हे तिघे प्रसिद्धीस आले. ते धर्मात्मे, वेदवेत्ते, सदा प्राणिहितामध्यें रत, लोकोपकारी, वरद व कामरूपी होते. तार्क्ष्य, अरिष्टनेमी, महाबलाढ्य गरुड, अरुणि व आरुणि हे विनतेचे पुत्र म्हणून सांगितलेले आहेत. प्राधा नांवाच्या दक्षकन्येनें, या पवित्र, विविध, उत्तमलक्षणी, महाभागा व देवर्षिपूजित अशा आठ अप्सरांस जन्म दिला. त्या ह्याः—अनवद्या, अनूका, अनूना, अरुणप्रिया, अनुगा, सुभगा व भासी. शिवाय, अलंबुषा, मिश्रकेशी, पुंडरीका, तिलोत्तमा, सुरूपा, लक्षणा, क्षेमा, रंभा, मनोरमा, असिता, सुबाहु, सुवृत्ता, सुमुखी, सुप्रिया, सुगंधा, सुरसा, प्रमाथिनी, काम्या, शरद्वती, व मौनेया—या अप्सरा म्हणून सांगितल्या आहेत. विश्वावसु व भरण्य हे गंधर्व प्रसिद्ध आहेत. मेनका, सहजन्या, पर्णिनी, पुंजिकस्थळा, घृतस्थळा, घृताची, विश्वाची, उर्वशी, अनुम्लोचा व प्रख्यात प्रम्लोचा—या दहा व तशीच मनोवती अशा अकरा वेदोक्त अप्सरा आहेत. या प्रजापतीच्या संकल्पापासून उत्पन्न झालेल्या असून सर्व भुवनास प्रिय आहेत. अमृत, ब्राह्मण, गाई व रुद्र, हीं चार प्रकारचीं अपत्यें सुरभीचीं आहेत, असा पुराणांत मोठा निश्चय आहे. एथवर कश्यपाचा वंश सांगितला.

आतां हे निष्पापा, मीं मनूचा वंश संक्षेपानें सांगतों तो ऐक. विश्वेचे पुत्र विश्वेदेव, साध्येचे पुत्र साध्यदेव, मरुत्वतीचे मरुत्वान् देव, वसूचे वसुनामक देव, भानूचे भानू व मुहूर्तेपासून मुहूर्त झाले. लंबेला घोष झाला; व नागवीथी जामीपासून झाली. पृथ्वीमध्यें जें जें कांहीं विषम आहे तें तें सर्व मरुत्वतीचे ठाईं

झालें. हे कौरव्या, संकल्पेला संकल्प नांवाचा एकच पुत्र झाला. धर्माला लक्ष्मीच्या ठाई काम हा जगत्प्रभु पुत्र झाला. हर्ष व यश हे कामाचे होन पुत्र रतीचे ठाई झाले, असें म्हणतात. सोमाला रोहिणीच्या ठाई वर्च हा महातेजस्वी पुत्र झाला. तो उदय पावत असतांच त्याच्या योगें वर्चस्वी होतो; तसाच त्याला पुरूरवा झाला. त्याशीं ऊर्वशीचा संयोग झाला. याप्रमाणें त्या परस्परांपासून हजारों पुत्र व स्त्रिया झाल्या. जगाचें मूळ एवढेंच असून याच आधारावर सर्व लोक आहेत. योगवत्ता भगवान् प्रजापति प्राण्यांचें गुणशः परीक्षण करून त्यांस योग्य अधिकारावर नेमतो. याप्रमाणें दहा दिशा, पृथ्वी, ऋषि, समुद्र, वृक्ष, पर्वत, ओषधि, सर्प, नद्या, सुर, असुर, आकाशांत राहणारे व भुवनांस उत्पन्न करणारे प्रजापति व क्रियारूपयज्ञ त्यानें उत्पन्न केले.

## अध्याय सदतिसावा.

—:०:—

### आधिपत्यनिर्णय.

वैशंपायन सांगतातः—हे राजन्, सूर्याप्रमाणें तेजस्वी इंद्राला त्यानें तीन लोकांचा व सर्व आदित्यांचा राजा केलें. तो वज्र व कवच यांनीं युक्त विष्णु अदितीच्या ठाई उत्पन्न झाला; तो अध्वर्यु स्तुति करितात त्याप्रमाणें तेजस्वी व स्मृतीचा सहायकारक होता; उत्पन्न होतांच त्या भगवानास ब्राह्मणांनीं हातीं कुश घेऊन धरिलें; तेव्हांपासून त्यास कौशिक संज्ञा मिळाली. सहस्रनयन इंद्राला अधि राज्यावर अभिषेक करून ब्रह्मा क्रमानें सर्वांच्या राज्याचा निर्देश करूं लागला. यज्ञ, तप, ग्रह, नक्षत्रें, ब्राह्मण, औषधि इत्यादिकांच्या राज्यावर त्यानें सोमाचा अभिषेक केला. दक्षाला प्रजापतींचें आधिपत्य दिलें. वरुणाला जलाचा पति नेमला, व प्राणिमात्रांस आकळणारा सर्वनिहंता काल, पितरांचा प्रभु केला. सर्व गंधांचा, देहधारी भूतांचा, व शब्द, आकाश व बळ यांचा अधिपति वायु केला. सर्व भूतें, पिशाचें, मृत्यु, गाई, उत्पात, ग्रह, रोग, सर्व व्याधि, व सर्व व्रतें यांचा प्रभु महादेव नेमला. कुबेरास यक्ष, राक्षस, गुह्यक, सर्व धन, व सर्व रत्नें यांचें स्वामित्व दिलें. सर्व दंष्ट्रायुक्त प्राण्यांचा राजा शेष केला; नागांचा वासुकी केला. इतर सर्व सर्पटणाऱ्या प्राण्यांचा राजा तक्षक केला. सागर, नदी, मेघ, व वर्षाव यांचा अधिपति अदितीच्या पुत्रांतील जो कनिष्ट पुत्र पर्जन्य त्यास केलें. गंधर्वांचा अधिपति चित्ररथ, अप्सरांच्या सर्व प्रकारच्या गणांचा अधिपति कामदेव, व सर्व चतुष्पाद प्राणी व वाहकप्राणी यांचा अधिपति महादेवाचा ध्वजभूत जो नंदी त्यास केला. दैत्यांचा अधिपति महातेजस्वी हिरण्याक्ष यास करून हिरण्यकशिपूचा यौवराज्यावर अभिषेक केला. कालकेय गणांचा प्रभु महाकाळ, अनायुषेच्या पुत्रांचा राजा वृत्र, अनेक अशुभ उत्पातांचा प्रभु, सिंहिकेचा जो उग्रपुत्र राहु नांवाचा महाअसुर यास केलें. सर्व ऋतूंचा, युगांचा, पक्षांचा, मासांचा तिथींचा, पर्वांचा, कलांचा, काष्ठांचा, मुहूर्तांचा गतींचा, योगांचा व गणिताचा अधिपति संवत्सर हा करण्यांत आला. सर्व पक्ष्यांचा, डोळ्यांच्या[१] व सर्पांचा अधिपति सुपर्ण जो गरुड तो नेमला. गरुडाचा बंधु जो जास्वंदीच्या फुलांच्या ढिगाप्रमाणें तांबड्या रंगाचा अरुण त्यास योग व साध्य यांचा अधिपति केला. कश्यप प्रजापतीचा पुत्र विरथ नांवाचा होता, त्यास इंद्रानें पूर्व दिशेचा अधिपति केला. विभु आदित्याचा पुत्र

१ दूर व निर्मळ दृष्टीविषयीं वैद्यशास्त्रांत देखील गरुडाची उपमा देतात.

महायशस्वी धर्मराज जो यम त्याला दक्षिण दिशेच्या आधिपत्याचा मान दिला. सदा पाण्यांत राहणारा अंबुराज या नांवाचा जो कश्यपाचा औरस पुत्र तो पश्चिमेकडील राजा केला. पुलस्त्याचा तेजस्वी, महेंद्रासारखा, प्रभु व एकाक्ष असा जो पिंगल नांवाचा पुत्र, तो उत्तर दिशेचा स्वामी केला.

याप्रमाणें राज्यांचा विभाग करून, लोककर्त्या स्वयंभु ब्रह्मदेवानें त्यांस स्वर्गलोकीं वेगळाले दिव्य प्रांत दिले. कोणाला सूर्यासारखे, कोणास अग्नीसारखे, कोणास फारच उत्तम प्रकाशणारे, कोणास चंद्रासारखे निर्मळ, नानावर्णांचे, इच्छागामी, अनेक, शेंकडों योजनें विस्तीर्ण, व पापरूपी दुष्कृत्यें करणाऱ्यास दुष्प्राप्य असलेले पुण्यवंतांचे लोक त्यानें दिले. त्यांची प्रभा पुढें सौम्य तारांगणांसारखी चमकते. जे या लोकीं पुण्यकर्में करणारे निपजतात अशांचे हे लोक होत. सर्वोत्तम व श्रेष्ठ दक्षिणांनीं पूर्ण केलेल्या पुण्यकारक यज्ञांनीं जे यजन करितात, जे स्वस्त्रीच्या ठाईं रत, क्षमावान्, सरळ स्वभावाचे, सत्यवक्ते, दीनांवर अनुग्रह करणारे, ब्राह्मणभक्त, लोभरहित, रजोगुण सोडलेले, व तपानें निर्मळ झालेले असे संत त्या लोकीं जातात.

याप्रमाणें आपल्या सर्व पुत्रांस नियुक्त करून स्वतः लोकपितामह पुष्करनांवाच्या ब्रह्मसदनांत आरूढ झाला. महेंद्रानें राखिलेले देव स्वयंभूनें दिलेल्या पालनकर्मांत तत्पर राहून आपापल्या लोकीं रममाण झाले. स्वयंभूनें इंद्रादि देवांस निर्माण केलें, व योग्यतेप्रमाणें रक्षणादि कर्मांत त्यांस नियुक्त केलें. त्यामुळें यज्ञभागाचा उपभोग घेणाऱ्या देवांस यश व शुभ स्वर्ग यांची प्राप्ति होऊन, ते आनंदित झाले.

## अध्याय अडतिसावा.

—:०:—

### हिरण्याक्ष व देवता यांचें युद्ध.

वैशंपायन सांगतातः—कोणे एके काळीं ते पंखयुक्त पर्वत खरोखर त्या परमेश्वराच्याच मायेनें पृथ्वीला सोडून निघाले. त्या वेळीं हिरण्याक्षानें असुरांच्या स्थानांचें रक्षण केलें. ते पर्वत पश्चिमदिशेस येऊन हत्तींप्रमाणें एका मोठ्या डोहांत बुडून राहिले. तेथें त्यांनीं असुरांना 'तुमचे कनिष्ठ भ्राते सुर आधिपत्याचा उपभोग घेत आहेत; व तुम्हीं वडील असून अधिकारशून्य आहां,' असें सांगितलें. हें ऐकून सर्व असुर उत्तम उद्योग करूं लागले. त्यांनीं अतुल क्रूर बुद्धि धारण केली. पृथ्वीचें हरण करण्याच्या यत्नास ते लागले. त्या भयंकर पराक्रमी असुरांनीं चक्रें, अशनि, खड्ग, भृशुंडी, धनुष्यें, भाले, पाश, शक्ति, मुसळें, गदा इत्यादि सर्व आयुधें घेतलीं. कित्येक कवचें घालून सज्ज झाले. दुसरे कित्येक मदोन्मत्त हत्तींवर, कित्येक घोडे व रथ यांवर व कित्येक नुसत्याच घोड्यांवर बसले. कित्येक उंटांवर, गेंड्यांवर, रेड्यांवर, गाढवांवरही चढले. कित्येक आपल्या केवळ बाहुबलाच्या आश्रयानें[१], पायांनींच चालूं लागले. या प्रकारें तळहस्तादिकांस झांकून व पक्ष्यांच्या पिसाऱ्यानें शोभणारे बाण घेऊन, ते सर्व असुर युद्धाच्या इच्छेनें हिरण्याक्षाभोंवतीं मोठ्या आनंदानें जमून चोहोंकडून निघाले. तेव्हां दैत्यांची ही तयारी ऐकून इंद्रादि देव उत्तम प्रकारें उद्योगास लागले. मोठ्या चतुरंग सैन्यांसह सज्ज होऊन, गोधा व अंगुलित्राण बांधून भाते व बाण घेऊन व उग्र आयुधें धारण करून देव आपापल्या सैन्यांत उभे राहिले. ते ऐरावता-

१ त्यांच्या बचावाला वाहनादि अन्य साहाय्य नव्हतें.

वर बसून पुढें जाणाऱ्या इंद्राच्या मागून चालले. नंतर मंगलवाद्यांचा नाद व नगाऱ्यांचा मोठा आवाज यांसह हिरण्याक्ष देवराज इंद्रावर चाल करून आला. तीक्ष्ण परशु, तरवारी, गदा, तोमर, शक्ति, मुसळें, व पट्टे यांनीं त्यानें इंद्राला आच्छादित केलें. नंतर अस्त्रबलानें ज्वालायुक्त व अतिशय भयंकर स्वरूपाच्या बाणांच्या वृष्टि पडल्या. बाकीचे बलाढ्य दैत्य शुभ्रधारांच्या परशूंनीं, लोखंडी परिघांनीं, खड्गांनीं, फेंकावयाच्या मुद्गरांनीं, मोठाल्या दगडांनीं, नानाप्रकारच्या पाशांनीं, पर्वतासारख्या फेंकावयाच्या शिळांनीं, जड शतघ्नींनीं, सोडलेल्या युगयंत्रांनीं व विदारण करणाऱ्या अर्गलांनीं—इंद्रासह सर्व देवांस मारूं लागले. धूम्रवर्ण केंसांचे, हिरवट दाढीचे, हातीं नानाआयुधें असलेले, संध्याकालीन अभ्राचे कांतीचे, उत्तम किरीट धारण करणारे, निळें व पिंवळें वस्त्र नेसलेले, तीक्ष्ण ऊर्ध्वदंष्ट्रा ( वरची दाढ ) असलेले, आजानुबाहु, पिंवळ्या नेत्रांचे, वैदूर्याभरणांनीं उज्वल व उद्यतायुध अशा असुरांच्या पुढें असलेल्या हिरण्याक्षास पाहून इंद्रादि सर्व देव, युगांतकाळीं समोर उभा राहिलेल्या मृत्यूस पाहून जसें भ्यावें, त्याप्रमाणें व्यथित झाले. चालत्या महेंद्रपर्वताप्रमाणें आपणांवर येत असलेल्या हिरण्याक्षास पाहून ते धनुर्धर देव खिन्न झाले. ते इंद्राला पुढें करून रणांत राहिले. हिरण्यकवचानें चकाकणारी ती दैत्यसेना शरत्कालांतील बहुत नक्षत्रयुक्त निर्मळ आकाशाप्रमाणें शोभली.

ते परस्परांस पाडीत एकमेकांवर हल्ला करूं लागले. द्वंद्वयुद्ध करूं इच्छिणाऱ्या त्यांनीं एकमेकांचे बाहु मोडले. गदांच्या आघातांनीं आंगें फुटलेले व बाणांनीं छातींत दुखावलेले कित्येक ( वीर ) खालीं एकीकडे पडले व कित्येकांनीं पृथक्पणें वार केले. कांहींनीं रथ मोडिले व कित्येक रथाखालीं चिरडले. व कित्येक गर्दींत सांपडल्यामुळें रथांतून हालूं शकले नाहींत. तेथें देवांच्या व दैत्यांच्या मोठ्या सैन्यानें परस्परांवर बाणांचा वर्षाव केल्यामुळें तो दिवस युद्धामुळें दुर्दिनासारखा वाटूं लागला. तो महातेजस्वी हिरण्याक्ष नांवाचा बलाढ्य दैत्य रागावल्यामुळें पर्वकाळीं समुद्रास जशी भरती येते त्याप्रमाणें वाढला. त्या क्रुद्ध झालेल्या दैत्याच्या तोंडून सहसा ज्वाळा निघूं लागल्या. उडणाऱ्या पर्वतांनीं ज्याप्रमाणें व्यापून जावें, त्याप्रमाणें नानाप्रकारच्या शस्त्रजालांनीं, धनुष्यांनीं, व परिघांनीं सर्व आकाश व्यापून गेलें. पुष्कळ शस्त्रांनीं व तरवारींनीं युद्धांत मस्तकें व छात्या छिन्नभिन्न झालेले व हिरण्याक्षाकडून व्यथा पावलेले देव हालूं शकले नाहींत. हिरण्याक्षाकडून युद्धांत अत्यंत पीडा पावलेले, सर्व देव यत्नवंत असतांही मूढ होऊन जाऊन यत्न ( बरोबर ) करूं शकले नाहींत. त्या धीमान् हिरण्याक्षानें अस्त्रानें सहस्रनयन इंद्राला युद्धांत थांबविलें. ऐरावतावर बसून गेलेला इंद्र भयामुळें युद्धांत हालूं शकला नाहीं. सर्वही देवांचा पराजय करून, व इंद्राला युद्धांत आडवून तो दानव सर्व जग आपल्या ताब्यांत आलें असें मानूं लागला. तेव्हां देवांनीं त्या दैत्येंद्राला सजल मेघाच्या नादाप्रमाणें उग्र नाद असलेला, शरीरानें मदोन्मत्त हत्तीप्रमाणें विलास करणारा, उदार, तेजस्वी व धनुष्याचा टणत्कार करीत असलेला असा पाहिला.

## अध्याय एकुणचाळिसावा.

—:०:—

### वराहकृत हिरण्याक्षवध.

वैशंपायन सांगतातः--याप्रमाणें इंद्र हतप्रयत्न

झाला असतां व देवांचा पराभव झाला असतां चक्र व गदाधारी देवानें हिरण्याक्षाचा वध करण्याचें मनांत आणिलें. वराहपर्वत म्हणून ज्याचा वर निर्देश केला, तोच हा असुरांचा अंत करणारा भगवान् होऊन आला. नंतर त्यानें चंद्रासारखा शुभ्र व उत्तम शंख धरिला. सहस्र अरांचें चक्रगिरीसारखें चक्र त्यानें हातीं धरिलें. सर्व देव ज्याचें पठण अव्यय, महायोगी, महेश्वर, महादेव इत्यादि गुह्य नांवानीं करितात, जो सदा सर्वेही आत्म्यांमध्यें श्रेष्ठ आहे, संत ज्याची सदा सेवा करितात, ज्या लोककर्त्याचें त्रिभुवनांत पुराणें पूजन करितात, जो देवश्रेष्ठांमधील वैकुंठ, जो सर्वांतील अनंत, जो योग्यांतील विष्णु व यज्ञकर्मांतील यज्ञ आहे, ज्याच्या प्रसादानें यज्ञांत देव स्वस्थानीं राहून महर्षींनीं दिलेलें व हुत, हुयमान व प्रहुत अशा तीन प्रकारें हवन केलेलें आज्य खातात, जो देव दैत्यांची गति, देवांची तर श्रेष्ठ गति, जो सर्व पवित्रांचें पवित्र, स्वयंभु, अव्यय प्रभु, प्रत्येक युगांत वीर्यदर्पित दानवांचीं कुलें ज्याच्या चक्रामध्यें सांपडून नाश पावतात, असा तो भगवान् पुढें आला. नंतर त्या बलवन्तानें आपल्या तोंडानें, दैत्यांस पळावयास लावणारा जुना उत्तम शंख वाजविला; व दैत्यांचा जीव खालीं वर केला. असुरांना भीतिप्रद झालेला तो भयंकर शंखनाद ऐकून क्षुब्ध झालेले सर्व दानव दशदिशांस पळाले. त्यानंतर क्रोधताम्राक्ष महाअसुर हिरण्याक्ष 'हा कोण आला आहे ?' असें मोठ्यानें म्हणाला; व नारायणाकडे पाहूं लागला. देवांचें दुःख नाहींसें करणाऱ्या, शंखचक्रधारी व वराहरूपानें पुढें आलेल्या पुरुषोत्तमास त्यानें पाहिलें. असुरांचें मर्दन करणारा तो देव शंखचक्रांच्या योगें सूर्य व चंद्र यांच्या मध्यभागीं असलेल्या काळ्या मेघाप्रमाणें शोभला. नंतर हिरण्याक्षप्रभृति सर्व मत्त दैत्यगण आयुधें व तरवारी घेऊन त्या देवावर धांवले. सर्व आयुधें हातीं घेतलेल्या व बलाढ्य अशा दैत्यांकडून पीडिला जाणारा हरि निष्कंप पर्वताप्रमाणें निश्चळ राहिला. तें पाहून महातेजस्वी व वीर्यवान् हिरण्याक्ष दैत्यानें आपली प्रज्वलित शक्ति वराहाच्या छातीवर सोडिली. त्या शक्तीच्या प्रभावानें ब्रह्मा ( देखील ) चकित झाला; पण ती महाशक्ति जवळ आलेली पाहून महाबल वराहानें नुसत्या हुंकारानेंच तिचें निर्भर्त्सन करून तिला जमीनीवर पाडिलें. याप्रमाणें ती कुंठित झाली असतां ब्रह्मा 'वाहवा, वाहवा' असें म्हणाला. नंतर सर्वभूतपति जो वराह त्या भगवंतानें सूर्यासारखें चकचकीत चक्र नेम धरून व गरगर फिरवून त्याच्यावर सोडिलें, त्याबरोबर रणांगणांत उभा असलेल्या त्या दैत्याचें शिर, वज्राच्या प्रहारानें उत्तम हिरण्मय मेरुशिखर जसें कोसळून पडावें त्याप्रमाणें भूमीवर पडलें.

याप्रमाणें हिरण्याक्ष दैत्य मरण पावला असतां तेथें बाकी राहिलेले दैत्य भीतीनें अतिशय त्रस्त होऊन तत्काल दशदिशांस पळाले, व ज्याची आज्ञा कोठेंही अमान्य होत नाहीं, जो संग्रामांत अप्रतिम, ज्याचें चक्र अत्युग्र आहे, असा रणांत चक्र घेऊन उभा असलेला वराह युगांतसमयींच्या दंडपाणि काळाप्रमाणें दिसला.

## अध्याय चाळिसावा.

—:०:—

### देवतांचें यथोचित स्थापन.

वैशंपायन सांगतातः—या प्रकारें सर्व असुरांना रणांगणांतून पळवून लावून पुरुषोत्तमानें तेथें बांधून ठेवलेल्या इंद्रादि देवतांस सोडविलें. नंतर देहभानावर आलेले सर्व देवगण पुरंदराला पुढें करून नारायणाजवळ आले.

देव म्हणाले:—हे महापराक्रमी भगवंता, आज आम्हीं तुझ्या बाहुबलानें व प्रसादानें जिवंत राहिलों असून यमाच्या दाढेंतून वांचलों. हे भगवन्, आम्हीं अदितिपुत्रांनीं आतां काय करावें? हे सनातना, आम्हीं तुझी पादशुश्रूषा करण्याची इच्छा करितों.

वैशंपायन सांगतात:—तें त्यांचें वचन ऐकून आनंदयुक्त कमलनयन, ज्यांचे शत्रु मारले गेले आहेत अशा देवांना म्हणाला.

श्रीभगवान् म्हणतात:—"पूर्वीं मींच तुह्मांला नेमून दिलेलें आपापलें कर्तव्य करा, म्हणजे आपापल्या लोकांचें पालन करा. कारण पडल्यास क्वचित स्थळीं प्रतिनिधीची योजना चालेल. आणि यज्ञांतील हविर्भागांसह आपल्या पूर्वैश्वर्यास तुम्हीं प्राप्त व्हा." नगाऱ्याप्रमाणें ध्वनि असलेला भगवान् इंद्राला असें म्हणाला, मीं सांगितल्याप्रमाणें तूं सज्जन व असज्जन या उभयतांशींही वाग. तीक्ष्णव्रतें करणारे मुनि तपाच्या योगानें, सर्व कामना पूर्ण करणारा जो तुझा स्वर्गलोक त्यास सदा प्राप्त होवोत. होमहवन करणारे जे कित्येक ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य आहेत त्यांसच आकाशगमनादि सिद्धींनीं रम्य असलेले व इच्छा पुरविणारे लोक मिळोत. यज्ञाच्या योगें पूजन करून याज्ञिक हें फळ मिळवोत. सद्धर्मशील पुरुषांचें अस्तित्व व पापकर्में करणारांचा अभाव होवो. चारी आश्रमांतील सदाचारी लोक स्वर्ग जिंकणारे होवोत. जे नर सत्यशूर, रणशूर, दानशूर, व दुसऱ्यांच्या गुणांतील दोष न पाहणारे असतात ते सदा स्वर्गाचा उपभोग घेवोत. जे पुरुष धर्माज्ञांवर श्रद्धा ठेवीत नाहींत, जे कामी, द्रव्यपरायण, लुब्धे, ब्राह्मणांस अपूज्य मानणारे व नास्तिक असतात ते नरकास जावोत. हे स्वर्गांतील अधिपतींनो, माझें एवढें वचन तुम्हीं करा; म्हणजे मीं तुमचें रक्षण करणारा (समर्थ) असतां तुम्हांला शत्रूंची बाधा होणार नाहीं. येवढें बोलून शंखचक्रगदाधारी देव अंतर्धान पावला; व सर्व देवांना मोठें आश्चर्य वाटलें.

हें अत्यद्भुत वाराहचरित पाहून देवांनीं त्या वराहास नमस्कार करून तेथून स्वर्गास गमन केलें. नंतर देवतांनीं आपापले अधिकार ताब्यांत घेतले. सर्व लोकांच्या आधिपत्याचे ठाईं इंद्र प्रतिष्ठित झाला. दानवगणांच्या हातून सुटलेली पृथ्वी पूर्वावस्था पावली. धरणीच्या स्थैर्यासाठीं पर्वतांना आपापल्या ठाईं स्थापून भगवान् पुरंदरानें ते अपराधी[1] असल्यामुळें त्यांचे पंख शंभर पेरांच्या वज्रानें तोडून टाकिले. श्रीमान् इंद्रानें सर्वांचेच पंख तोडून टाकिले. एकटा मैनाक तेवढा सपक्ष राहिला; कारण देवांनीं त्याच्याशीं तसा करार केला.

हा महात्म्या नारायणाचा प्रादुर्भाव ब्राह्मणांनीं पुराणांत 'वराह अवतार' म्हणून सांगितलेला आहे. कृष्णद्वैपायनाचें हें मत नानाश्रुतींनीं सिद्ध असल्यामुळें तें अपवित्र, कृतघ्न, व दुष्ट, क्षुद्र, नीच, गुरुद्वेष्टा, अशिष्य, शिष्य असूनही कृतघ्न अशांस सांगूं नये. आयुष्य, यश, भूमी व जय मिळावा अशी इच्छा असलेल्यांनीं हा इतिहास ऐकावा; कारण हा देवांचा जय आहे. हा फार पुरातन वेदसंबद्ध, कल्याणकारक, स्वस्त्ययन, महापावन व सर्व प्राण्यांस तत्काळ विजय देणारा असा आहे. हे कौरव्या, हा महात्म्या वराहाचा प्रादुर्भाव! तुला मीं पहिल्यापासून यथातथ्य सांगितलेला आहे. जे लोक पवित्र अशा यज्ञांनीं देवता व पितर यांचें पूजन करितात ते आत्म्याच्या योगें परमआत्मा जो विष्णु त्याचीच नित्य पूजा करि-

१ पर्वतांनींच पूर्वी दैत्यांना देवांशीं लढण्यास प्रेरित केलें होतें; हा त्यांचा अपराध.

तात. यास्तव, हे राजन्, लोकांची गति, ब्राह्मणांची गति, स्वयंभूची गति व आत्महिताची गति अशा महावराहरूपी नारायणास नमस्कार कर.

## अध्याय एकेचाळिसावा.

—:०:—

### नृसिंहावतारवर्णन.

वैशंपायन सांगतातः—राजन्, मीं हा वराहअवतार सांगितला. आतां नारसिंहावतार ऐक. त्या अवतारांत हरीनें सिंह होऊन हिरण्यकशिपूस मारिलें. हे राजन्, पूर्वी कृतयुगांत दैत्यांचा आदिपुरुष जो प्रभु हिरण्यकशिपु त्यानें फार मोठें तप केलें. वृक्षादि स्थावर पदार्थांप्रमाणें मौनव्रत धरून राहिलेला तो साडेअकरा हजार वर्षें जलांत उभा होता. तेव्हां त्याच्या शम, दम, ब्रह्मचर्य, तप व नियम यांच्या योगें ब्रह्मा संतुष्ट झाला. नंतर तो स्वयंभू भगवान् सूर्यासारख्या तेजस्वी, हंसयुक्त व प्रकाशणाऱ्या विमानानें आदित्य, वसु, साध्य, मरुत्, देवता, विश्वेदेव, सर्वांस साहाय्य करणारे रुद्र, यक्ष, राक्षस, किन्नर, दिशांच्या व विदिशांच्या देवता, नद्या, सागर, नक्षत्रें, मुहूर्त, आकाशचर, महाग्रह, देव, ब्रह्मर्षि, सिद्ध, सप्तर्षि, पुण्यवान् राजर्षि, गंधर्व, अप्सरागण या सर्वांसह स्वतः तेथें आला. देवगणांनीं वेष्टिलेला व ब्रह्मवेत्त्यांतील श्रेष्ठ, श्रीमान् चराचर वस्तूंचा गुरु ब्रह्मा त्या दैत्यास म्हणाला. हे सुव्रता भक्ता, तुझ्या या तपानें मीं संतुष्ट झालों आहे. तुझें कल्याण असो. वर माग. तुझी इच्छा पुरी होवो,' नंतर प्रसन्नांतःकरण दानवश्रेष्ठ श्रीमान् हिरण्यकशिपु हात जोडून बोलला कीं, देव, असुर, गंधर्व, यक्ष, राक्षस, नाग, मनुष्य, व पिशाच—हे मला कोणत्याही रीतीनें न मारतील, आणि, हे सर्वलोकपितामहा, रागावलेले तपोयुक्त ऋषीही मला शाप न देतील, असा वर मीं तुला मागतों. मला शस्त्रानें, अस्त्रानें, पर्वत व वृक्ष यांच्या आघातानें, किंवा शुष्क, आर्द्र व अशाच दुसऱ्या वस्तूंनीं मरण येऊं नये. मला स्वर्गांत, पाताळ, आकाश व भूपृष्ठ यांवर कोठेंही मरण येऊं नये. रात्र, दिवस व त्यांचा संधिकाळ यांत, व दुसऱ्या कशानेंही मीं मारला जाऊं नये. जो एकाच हस्तप्रहारानें भृत्य, सैन्य व वाहनें यांसह माझा नाश करण्यास समर्थ असेल तो माझा मृत्यु होईल. मीच सूर्य, चंद्र, वायु, अग्नि, जल, अंतरिक्ष, नक्षत्रें, व दहा दिशा व्हावें. मीं क्रोध, काम, वरुण, इंद्र, यम, कुबेर, यक्ष व किन्नर यांचा अधिपति व्हावें. हे सर्वलोकपितामह देवेशा, सर्व अस्त्रें मोठ्या युद्धांत मूर्तिमंत मजपाशीं उभीं राहोत! पितामह ब्रह्मा म्हणाला; हे राक्षसा, सर्व दिव्य व अद्भुत वर मीं तुला दिलेले आहेत. थोड्याच भावनेनें तुझ्या सर्व इच्छा परिपूर्ण होतील, यांत शंका नाहीं.

वैशंपायन सांगतातः—असें बोलून तो भगवान्, ब्रह्मर्षिगणांनीं सेवित अशा आकाशांतील वैराजसंज्ञक ब्रह्मसदनास गेला. नंतर हें वरप्रदान ऐकून देव, नाग, गंधर्व, मुनि इत्यादि सर्व ब्रह्मदेवापाशीं येऊन उभे राहिले. देव म्हणाले—हे भगवन्, या तुमच्या वरानें तो असुर आम्हांस मारील; यास्तव कृपा करून त्याच्या वधाचाही उपाय योजून ठेवा.

वैशंपायन सांगतातः—तेव्हां तो भगवान्, सर्व लोकांचा आदिकर्ता, स्वयंभू, हव्यकव्यांचा उत्पादक, अव्यक्त, प्रकृतिरूप, नित्य व तेजोमय प्रजापति, तें त्यांचें सर्व लोकांस हितकर असें वाक्य ऐकून शीत वाक्यजलांनीं त्यांचें सांत्वन करिता झाला. तो म्हणालाः—हे देवहो, त्यास तपःफल अवश्य मिळालें पाहिजे. तप

संपलें म्हणजे भगवान् विष्णु त्याचा वध करील. ' त्या कमलोद्भव देवाचें हें वचन ऐकून सर्व देव आनंदयुक्त झाले व आपापल्या दिव्य स्थानीं गेले.

वैशंपायनय म्हणतातः—वर मिळतांच तो हिरण्यकशिपु सर्व प्रजेस पीडा करूं लागला. त्यानें वरदानानें गर्वित होऊन सर्वांस ' त्राहि त्राहि ' करून सोडिलें. त्या बलाढ्य दैत्यानें आश्रमांतील सर्व मुनींना व तीक्ष्ण व्रत करणाऱ्या, सत्यधर्मरत, व इंद्रियदमन करणाऱ्या ब्राह्मणांना भयभीत केलें. तो महाअसुर दानव त्रिभुवनांतील देवांचा पराभव करून व सर्व त्रैलोक्य जिंकून स्वर्गांत राहूं लागला. जेव्हां वरदानानें मदोन्मत्त झालेल्या व कालधर्मानें प्रेरित अशा त्या दानवानें दैत्यांना यज्ञभागांचे वांटेकरी व देवांना त्यांतून बहिष्कृत केलें. तेव्हां आदित्य, वसु, रुद्र, साध्य, विश्वेदेव, देवगण, यक्ष, ब्राह्मण व सप्तर्षि हे शरण्य अशा महाबलाढ्य विष्णूला शरण जाऊन त्यापाशीं उभे राहिले. प्रकाशमय देव, यज्ञ, ब्रह्मदेव, सनातन, भूत, भव्य, भविष्य, व प्रजा आणि सर्व लोक—यांकडून नमस्कृत अशा त्या देवाची ते स्तुति करूं लागले. देव म्हणाले, हे नारायणा, हे महाभागा, हे देवा, आह्मी तुला शरण आलों आहों. तूंच आम्हांस अत्यंत तृप्त करणारा, तूंच आमचा परम गुरु, व हे सुरोत्तमा, तूंच आम्हां ब्रह्मादिकांचें परम दैवत आहेस. कमलाच्या निर्मल दलाप्रमाणें ज्याचे नयन आहेत व शत्रुपक्षास जो भयंकर आहे अशा प्रभो, तूं दितिवंशाचा क्षय व अदितिवंशाचा वृद्धि करणारा हो. प्रभो आमचें रक्षण कर. दैत्येंद्र हिरण्यकशिपूस मार. विष्णु म्हणाले, अहो देवांनो, तुह्मी निर्भय व्हा. मीं तुम्हांस अभय देतों. त्याचप्रमाणें देवहो, तुम्हीं स्वर्गास जा, उशीर लावूं नका. हा मीं आतां वरदानानें मदोन्मत्त झालेल्या व अमरेंद्रास अवध्य झालेल्या दैत्येंद्रास त्याच्या परिवारासह ठार मारितों.

वैशंपायन सांगतात,—असें बोलून देवांना वाटेस लावून त्या प्रभूनें हिरण्यकशिपूच्या वधाचा संकल्प केला. तो लागलाच हिमालयाच्या बाजूस येऊन " मीं आतां कोणतें रूप घेऊन या महा असुराला मारूं? त्या देवशत्रूच्या वधाला योग्य व सत्वर सिद्धिदायक असेंच स्वरूप मला घेतलें पाहिजे " असा विचार करून, दैत्य, दानव व राक्षस यांस अजिंक्य असें अयोनिसंभव व परमश्रेष्ठ नृसिंहस्वरूप त्यानें धारण केलें. त्या महाबाहूनें ॐकारास आपल्या साह्यास घेतलें. नंतर ॐकार सहाय्य असलेला तो अव्यय भगवान विष्णु, प्रभु व ईश्वर हिरण्यकशिपूच्या स्थानीं गेला. तो तेजानें दुसऱ्या सूर्यासारखा व कांतीनें चंद्रासारखा होता. त्या विभूनें आपलें अर्धें शरीर माणसाचें व अर्धें सिंहाचें केलें. याप्रमाणें नृसिंहशरीरानें हातास हातानें स्पर्श करून, तो भगवान् विस्तीर्ण, दिव्य, रम्य, मनोरम, सर्व कामांनीं पूर्ण, शुभ्र, शंभर योजनें लांब, दीडशें योजनें रुंद, पांच योजनें उंच, आकाशांतून यथेच्छ गमन करणारी, जरा, शोक व श्रम यांनीं विरहित, स्थिर, शिव व शुभ अशा हिरण्यकशिपूच्या सभेंत गेला.

ती शुभ आसनें मांडलेली, रमणीय व तेजानें जणूं काय प्रदीप्त असल्यासारखी होती. ती जलयुक्त, विश्वकर्म्यानें निर्मित, दिव्य रत्नमय, व फल वपुष्पें देणाऱ्या वृक्षांनीं युक्त अशी होती. तिच्या छतास निळ्या, पिंवळ्या, काळ्या, पांढऱ्या व लाल रंगांच्या झालरी लावलेल्या असून मध्यें शेंकडों गुच्छासारखे गोंडे लाविले होते. शुभ्र अभ्राप्रमाणें दिसणारी ती सभा जणूं काय तरंगतच होती. ती सर्वोत्कृष्ट आसनांनीं युक्त, रम्य व तेजानें प्रदीप्त होती. ती प्रभावती,

तेजस्वी व दिव्यगंधानें मनोहर असलेली सभा केवळ सुखरूप नव्हे, दुःखरूप नव्हे, शीत नव्हे, उष्णही नव्हे—अशी होती. त्या सभेला जाणारांस क्षुधा, तृष्णा, व ग्लानि ही कधींच प्राप्त होत नव्हती. नानाआकृतींचे विचित्र, अतिभासुर, व रत्नमय अशा दिव्यस्तंभांनीं रचलेली ती होती. ती शाश्वत व अक्षत स्वयंप्रभ सभा चंद्र, सूर्य व अग्नि यांहूनही सरशी होती. स्वर्गपृष्ठावर असलेली ती सभा जणूं काय सूर्याची निर्भत्सनाच करीत होती. दिव्य व मानुष असे उपभोग तेथें असून ते सर्व सुरस व पुष्कळ होते. तिच्या मधील भक्ष्य व भोज्य पदार्थ अक्षय होते. तेथें सुंदर सुवासाच्या फुलांच्या माळा होत्या. पुष्प व फळें यांनीं नेहमीं युक्त असे वृक्ष होते. त्या सभेंत उष्णकाळीं शीत जळ व शीतकाळीं विपुल उष्णजळ मिळत असे. ज्यांचीं अग्रें सपुष्प आहेत, ज्यांना नवी पालवी फुटली आहे, ज्यांच्या शाखा फार मोठ्या आहेत, व जे लताविस्तरांनीं झांकून गेलेले आहेत असे नानाप्रकारचे मनोरम वृक्ष, नद्या व तेथील सरोवरें यांच्या कांठीं, त्या प्रभूनें ते वेळीं पाहिले. त्या सिंहानें सुवासिक फुलें, रसाळ फळें, व नानाप्रकारचे वृक्ष तेथें पाहिले. शीत जळें, नानाठाईंचीं सरोवरें, व सर्व तीर्थें त्या प्रभूनें तेथें शेंकडों पाहिलीं. नील कमळें, शुभ्र कमळें, सुगंधी शतपत्र कमळें, लाल कमळें, व काळीं कमळें, इत्यादिकांनीं तीं तीर्थें युक्त होतीं. आपापल्या प्रियांसह देवप्रिय धार्तराष्ट्र पक्षांनीं, राजहंसांनीं; कादंबांनीं; चक्रवाकांसह सारसांनीं व कुरर पक्ष्यांनीं तीं तीर्थें अलंकृत झालीं होतीं. शुद्ध स्फटिकाप्रमाणें त्यांचें जल स्वच्छ होतें. त्यांत पांढरीं अष्टदल कमळें होतीं. कलहंसांचीं गीतें व सारिकांचे ध्वनि तेथें ऐकूं येत. सुवासिक, शुभ, पुष्पमंजरी धारण करणाऱ्या व नानाप्रकारच्या पुष्पांनीं भरलेल्या लता त्या सभोंवतील वृक्षांच्या टोंकांवरून लोंबत असलेल्या त्या सिंहानें पाहिल्या. केतक, अशोक, सरल, पुन्नाग, तिलक, अर्जुन, आम्र, नीप, नागपुष्प, कदंब, बकुल, धव, प्रियंगु, पाटली, शाल्मली, हरिद्रक, साळ, ताल, प्रियाल, मनोहर चंपक, व असेच दुसरेही प्रफुल्लित वृक्ष त्या सभेंत शोभत होते. दावाग्नीप्रमाणें दीप्त प्रभांच्या वैद्रुम वृक्षांचे समूह व ज्यांचे स्कंध फार मोठे आहेत, शाखा चांगल्या आहेत, जे अनेक ताड उंच आहेत, काजळासारख्या अशोकांप्रमाणें ज्यांची प्रभा आहे असे वंजुलक वृक्ष तेथें पुष्कळ आहेत. वरण, वत्सनाभ, पनस, चंदन, निळे पुष्पयुक्त व पिंवळे अम्लवृक्ष, अश्वत्थ, तिंदुक, जुनाट आंवळीचे वृक्ष, लोध्र, मल्लिक, भद्रदारु, आम्रातक, ( आंबाडा ), जांभूळ, लकुच, शैलवालुक, सर्ज, अर्जुन, कंडुरव, पतंगा, कुहज, तांबडा कुरबक, नीप, अगुरु, भव्य कदंब, दाळिंब, महाळुंग, कालीयक, दुकूल, हिंगु, तैलपर्णिक, खजुराचीं झाडें, हिरडे, मोह, सातवण, बिल्व, पारावत, फणस, तमाल, इत्यादि वृक्ष नानाप्रकारच्या लतांनीं व गुल्मांनीं आवृत होते. पर्णे, पुष्पें व फळें यांनीं युक्त असलेल्या विविधाकृतींच्या लता तेथें होत्या. हे व असेच दुसरे अरण्यवृक्ष अनेक पुष्पफलांनीं युक्त होऊन चोहोंकडे शोभत होते. चकोर, शतपत्र, मत्तकोकिळा, व सारिका, इत्यादि पक्षी पुष्पित व ज्यांच्या शेंड्यांवर फळें आहेत अशा महा वृक्षांवर येऊन चोहोंकडून बसत होते. मत्स्यादि इतर प्राण्यांवर निर्वाह करणारे लाल, पिंवळे व अरुणरंगाचे वृक्षाग्रांवर बसलेले पक्षी मोठ्या आनंदानें परस्परांस पहात होते.

## अध्याय बेचाळिसावा.

—:०:—

### हिरण्यकशिपूचें सभास्थान.

वैशंपायन सांगतातः—त्या सभेंत दिव्य, प्रमाणानें चारशें हात, सूर्यासारखें रम्य, व दिव्य अस्तरणानें युक्त अशा आसनावर बसलेला व दीप्त सुवर्णकुंडलांनीं युक्त असलेला प्रभु दैत्येंद्र हिरण्यकशिपु बहुत वेळ अतिशय शोभत होता. त्या दैत्येंद्राच्या सभेंत चोहोंकडे मंद, धुळीनें रहित, व सुगंध युक्त असा वायु संमुख वहात होता. तेथें अप्सरांच्या गणांनीं वेष्टिलेले गंधर्व व देव दिव्य तालांवर दिव्यगीतें गात होते. विश्वाची, सहजन्या, प्रम्लोचा, अभिविश्रुता, दिव्या, सौरभेया, समीची पुंजिकस्थळा, मिश्रकेशी, रंभा, चित्रसेना, शुचिस्मिता, चारुनेत्रा, घृताची, मेनका, उर्वशी या व दुसऱ्याही नृत्यगीतामध्यें प्रवीण असलेल्या हजारो अप्सरा त्या वेळीं त्या हिरण्यकशिपूची सेवा करीत होत्या. दीप्त कुंडलांचा व विचित्र वस्त्राभरण्यांचा हिरण्यकशिपु हजारों स्त्रियांनीं परिवेष्टित होऊन बसला होता. मागें वर मिळालेले सर्व दैत्य तेथें बसलेल्या महाबाहु हिरण्यकशिपु प्रभूची उपासना करीत होते. विरोचनपुत्र बलि, नरक, पृथिविंजय, प्रल्हाद, विप्रचित्ति, महा असुर गविष्ठ, अहंता, क्रोधहंता, सुमना, सुमति, स्वर, घटोदर, महापार्श्व, क्रथन, पिठर, विश्वरूप, रूप, विरूप, महाद्युती, दशग्रीव, वाली, मेघवासा, महानाद, घटाभ, विकटाभ, संऱ्हाद, इंद्रतापन इत्यादि सर्व दीप्तकुंडलांनीं युक्त असलेले दैत्य व दानव यांचे समूह त्याच्या सेवेंत हजर होते. ते सर्व माळाधारी, मोठे वक्ते, व उत्तम व्रताचरणी होते. त्या सर्वांस वर मिळाले होते. सर्वेही शूर व मृत्युभयरहित होते. हे व असेच दुसरेही पुष्कळ दैत्य महात्म्या प्रभु हिरण्यकशिपूची सेवा करीत होते. ते सर्व दिव्य सामग्रीनें युक्त होते. जणूं काय ज्वालांनीं प्रकाशमान होणाऱ्या नानाप्रकारच्या सर्वोत्तम विमानांनीं मालाधारी व भूषणयुक्त असे ते दैत्य सहज मौजेनें जात येत होते. विचित्र आभरणांनीं युक्त, विचित्र वस्त्रें नेसलेले, विचित्र अस्त्रांचें, व कवचांचे, विचित्र ध्वज व वाहनांचे, इंद्रधनुष्याप्रमाणें विचित्र व श्रेष्ठ अशा बाहुभूषणांनीं भूषित अंगाचे—ते दैत्य त्याची नित्य सेवा करितात. त्या दिव्य सभेमध्यें पर्वतप्राय सुवर्णमुकुट धारण करणारे व सूर्यासारखी कांति असलेले असे अनेक असुर होते. जिला चोहोंकडे अतिसुंदर हस्तिदंती खिडक्या आहेत, जिच्यामध्यें सोन्याच्या रत्नजडित वेदिका आहेत, व जिच्या आंत रत्नजडित हजारों मार्ग केलेले आहेत अशा त्या सभेंत तो सिंह प्रकट झाला. सोन्याच्या शुद्धहारांनीं भूषित शरीराचा सूर्यकिरणांसारख्या कांतीचा, अत्यंत दीप्त अंगकांतीचा, व हजारों असुरगणांनीं सेवित—अशा त्या दैत्याला त्या सिंहानें पाहिलें.

## अध्याय त्रेचाळिसावा.

—:०:—

### नृसिंहाला पाहून दैत्य चकित होतात.

वैशंपायन सांगतातः—राखेंत गढलेल्या अग्नीप्रमाणें नृसिंहशरीरानें गुप्तपणें आलेल्या काळचक्रासारख्या त्या महाबाहूस पाहून सर्वजण आश्चर्यचकित झाले. हे भारता, त्या नारसिंहाच्या सटा वांकड्या पडल्या होत्या. त्या ठाईं त्याचें उत्तम रूप हजार चंद्रांप्रमाणें भासलें! ते सर्व दानव व हिरण्यकशिपु 'अहो, हें रूप किती विचित्र, शंख, इंदु व कुंद यांसारखें आहे,' असें म्हणाले. नृसिंहाच्या नेत्रांच्या योगानें दग्ध झालेल्या कालधर्मानें प्रेरित अशा त्या महात्म्यांच्या तोंडून

असे शब्द निघूं लागले असतां, हिरण्यकशिपूच्या प्रल्हाद नांवाच्या बलाढ्य पुत्रानें दिव्यदृष्टीनें सिंहरूपानें आलेल्या त्या देवास ओळखिलें. अपूर्व शरीर धारण केलेल्या व सोन्याच्या पर्वतासारखा असलेल्या त्यास पाहून सर्व दानव व हिरण्यकशिपु यांस (फार) आश्चर्य वाटलें. प्रल्हाद म्हणतो,–हे महाराज, हे महाबाहो, हे दैत्यांच्या आदिसंभवा, हें नृसिंहशरीर आजपर्यंत आम्हीं कधीं पाहिलें नाहीं व ऐकिलेंही नाहीं. याचा उद्भव अव्यक्त असून हें दिव्य स्वरूप कांहीं विलक्षण आहे. हें भयंकर व दैत्यांचा अंत करणारें आहे असें जणूं काय आमच्या मनांस सांगत आहे. याच्या शरीरामध्यें देव, सागर, नद्या, हिमालय, पारियात्र, व दुसरेही कुलपर्वत आहेत. नक्षत्रांसह चंद्रमा, आदित्य, अश्विनीकुमार, कुबेर, वरुण, यम, शचीपति इंद्र, मरुत्, देव, गंधर्व, मुनी, तपोधन, नाग, यक्ष, पिशाच, भयंकर पराक्रमी राक्षस, ब्रह्मदेव व पशुपति हे याच्या ललाटीं असलेले दिसत आहेत. स्थावर जंगम प्राणी, ( आह्मां ) सर्व दैत्यगणांनीं वेष्टिलेला तूं, शेंकडों विमानांनीं युक्त अशी ही सभा, सर्व त्रिभुवन, शाश्वत लोकधर्म, हे सर्व चंद्रामध्यें विमल जग दिसावें, त्याप्रमाणें त्यांच्यांत स्पष्ट दिसत आहेत. प्रजापति महात्मा मनु, ग्रह, योग, पृथ्वी, आकाश, उत्पातकाळ, धृति, स्मृति, रज, सत्व, तम, मद, महानुभाव सनत्कुमार, विश्वदेव, सर्व अप्सरा, क्रोध, काम, हर्ष, दर्प, मोह, सर्व पितर, इत्यादिक सर्व याच्या शरीरांत आहेत.

महामति दैत्येंद्राचा पुत्र (प्रल्हाद) याप्रकारें आपला पिता जो हिरण्यकशिपु त्यास सांगून विस्मित न होतां किंचित् अधोमुख करून प्रथमच त्या उग्राचें ध्यान करूं लागला.

---

# अध्याय चवेचाळिसावा.

—:०:—

## नृसिंहावर दैत्यांचा शस्त्रप्रहार.

वैशंपायन सांगतात:—प्रल्हादाचें हें भाषण ऐकून गणाधिपति हिरण्यकशिपु आपल्या गणांसह सर्व दैत्यांस म्हणाला, " अपूर्व शरीर धारण केलेल्या या सिंहाला धरा; अथवा तुम्हांला कांही शंका येत असल्यास या वन्य पशूला मारून सोडा. " तें ऐकून सर्व दानव आनंदित होऊन त्या भयंकर पराक्रमी सिंहास चोहोंकडून हुसकीत स्वबळानें भिववूं लागले. पण पुनः सिंहनाद करून व तोंड पसरून त्या अंतकासारख्या व महाबलाढ्य सिंहानें ती रम्य सभा मोडून टाकिली. सभा या प्रकारें मोडली असतां, रागानें व्याकुळ झालेल्या नेत्रांच्या हिरण्यकशिपु दैत्यानें स्वतः त्या सिंहावर सर्व अस्त्रें सोडिलीं. शेवटीं सर्व अस्त्रांतील श्रेष्ठ व अति भयंकर असें दंडास्त्र, अत्युग्र कालचक्र, तसेंच विष्णुचक्र, मोठें धर्मचक्र, अनितचक्र, ऐंद्रचक्र, घोर ऋषिचक्र, त्रैलोक्यांत पूज्य असलेल्या ध्वनींचें पैतामहचक्र, विचित्र वज्रें, शुष्क व ओले आणखी दोन वज्र, भयंकर व उग्र शूल, कंकाळ, मुसळ, ब्रह्मशिरोऽस्त्र, ब्राह्मअस्त्र, ऐषीकास्त्र, ऐंद्र, आग्नेय, शैशिर, वायव्य, मथन, कापाळ, किंकर हीं अस्त्रें, तशीच अप्रतिहत शक्ति, क्रौंचास्त्र, हयशिरास्त्र, सौम्य, अमित पैशाच, अद्भुत असें सत्यअस्त्र, मोहन, शोषण, संतापन, विलापन, जृंभण, प्रापण, अति भयंकर असें त्वाष्ट्र, अक्षोभ्य कालमुद्गर, महाबलाढ्य क्षोभणास्त्र, संवर्तन, मोहन, मायाधर, प्रियगांधर्व, रत्नश्रेष्ठ नंदक, प्रस्वापन, प्रमथन, वारुण नांवाचें उत्तम अस्त्र, अकुंठितगतीचें पाशुपत हीं सर्व अस्त्रें हिरण्यकशिपूनें, दीप्त अग्नींत आहुती टाकावी त्या-

प्रमाणें, त्या सिंहावर फेंकलीं! ग्रीष्म ऋतूंत सूर्य आपल्या किरणांनीं हिमालयाला जसा आवृत करितो, त्याप्रमाणें असुरेंद्रानें प्रज्वलित अग्नीच्या योगें सिंहाला आच्छादून टाकिलें.

इतक्यांत समुद्र जसा मैनाक पर्वतास भिजवितो त्याप्रमाणें क्रोधवायूनें खवळविलेला तो दैत्यांचा सैन्यसमुद्र क्षणांत त्या सिंहाला विविध अस्त्रांनीं आच्छादून टाकिता झाला. भाले, पाश, शूल, गदा, मुसल, वज्रें, अशनीसारख्या शिळा, मोठाले वृक्ष, मुद्गर, कूटपाश, शूळ, उखळ, पर्वत, दीप्त शतघ्नी, व अति भयंकर दंडास्त्र यांच्या योगानें चोहोंकडून त्या सिंहाला थोडी सुद्धां पीडा झाली नाहीं. हातीं पाश घेतलेले, महेंद्राचें वज्र व अशनि यांच्यासारख्या वेगाचे, व चोहोंकडून हातीं शस्त्रें घेतलेले असे ते दानव तीन मस्तकांच्या नागेंद्राप्रमाणें तेथें उभे राहिले. सुवर्णांच्या मालांनीं आकुल व भूषित शरीरांचे, नाना प्रकारच्या बाहुभूषणांनीं अलंकृत बाहूंचे व अंगांचे व मोत्यांच्या माळांनीं अलंकृत शरीरांचे ते राक्षस मोठ्या पंखांच्या हंसांप्रमाणें शोभत असत. ज्यांचें बळ वायूसारखें आहे, अशा त्या दैत्यांचीं बाहुभूषणें, माळा व कडीं यांच्या योगें उत्कट झालेलीं तीं मस्तकें प्रभातकाळाच्या सूर्य किरणांप्रमाणें तेजस्वी दिसत होतीं. संतत जलवृष्टि करणाऱ्या मेघांमुळें ज्यावरील वृक्ष व गुहा अंधःकारमय झाल्या आहेत अशा मेघाच्छादित गिरीप्रमाणें दानवांनीं फेंकलेल्या दीप्त अग्नीसारख्या महाअस्त्रसमूहांनीं तो सिंह आच्छादिला गेला. त्या वेळीं सर्व एकत्र जमलेल्या दैत्यसमूहांकडून मारला जात असतांही तो प्रतापशाली भगवान् संग्रामांत कंपित झाला नाहीं. तो स्वभावतः हिमाचलासारखा अचल राहिला. त्या नृसिंहरूपी देवानें आपल्या अग्नीसारख्या दीप्त तेजानें त्यांस संतप्त केलें. त्यामुळें ते दानव सागरजलांत उत्पन्न झालेल्या व वाऱ्यानें खवळलेल्या लाटांप्रमाणें भयानें कापूं लागले. क्रोधानें दीप्त झालेल्या देहांच्या त्या अति वेगवान् महासुरांनीं एका स्थळीं राहून शंभर धनुष्यांनीं युगांतकाळासारखे शरसमूह नृसिंहावर सोडिले.

---

## अध्याय पंचेचाळिसावा.

—:•:—

### नृसिंहकृत दैत्यमायेचा परिहार.

वैशंपायन सांगतातः—खर, खरमुख, मकरांच्या दाढांप्रमाणें मुखें असलेले, व कित्येक डुकरांच्या तोंडाप्रमाणें तोंडें असलेले, वानरांसारखीं मुखें असलेले, बालसूर्यासारखीं, धूमकेतूंसारखीं, अर्धचंद्र व पूर्णचंद्र यांसारखीं, प्रदीप्त अग्नीसारखीं व हंस आणि कुक्कुट यांसारखीं तोंडें असलेले, तोंडें पसरल्यामुळें भयंकर दिसणारे, व्याघ्रांप्रमाणें जिभा चाटीत असलेले, कावळे व गिधाडें यांसारख्या तोंडांचे, विजेसारख्या जिभांचे, तीन मस्तकांचे, उल्कांसारख्या तोंडाचे, असे महाग्रहांसारखे, बलानें उन्मत्त झालेले राक्षस कैलासासारख्या धिप्पाड शरीराच्या त्या सिंहावर बाणांची वृष्टि करूं लागले. पण संग्रामांत ते अवध्य नृसिंहाला कांहीं पीडा करूं शकले नाहींत. सर्पाप्रमाणें श्वास सोडणाऱ्या व रागावलेल्या दानवांनीं पुनः त्या सिंहावर आणखी भयंकर शर सोडिले; पण सिंहावर सोडलेले ते भयंकर दानवांचे शर पर्वतांवरील काजव्यांप्रमाणें आकाशांत गडप झाले. नंतर क्रोधान्वित राक्षसांनीं जणूं काय सर्वतः जाळणारी दिव्य चक्रें लौकरच सिंहावर सोडिलीं. त्या पडणाऱ्या चक्रांच्या योगें आकाश, युगांतीं अतिशय प्रकाशित होणाऱ्या चंद्र, सूर्य व ग्रह यांयोगें जसें व्हावें

( दिसावें ) तसें झालें; पण चंद्र, सूर्य व ग्रह जसे मेघोदररूप दरींत शिरतात त्याप्रमाणें तीं सर्वचक्रें त्याच्या तोंडांत शिरलीं व त्या प्रकारें दिसलीं. अग्नीच्या ज्वालांनीं प्रदीप्त झालेलीं तीं सर्व चक्रें त्या महात्म्या सिंहानें गिळून टाकिलीं! तेव्हां हिरण्यकशिपु दैत्यानें पुनः अग्नीसारख्या कांतीची प्रज्वलित व घोर शक्ति त्या सिंहावर सोडिली. भगवान् मृगेंद्रानें ती उत्तम शक्ति येत आहे असें पाहून भयंकर हुंकारानेंच ती तोडून टाकिली ! तेव्हां मृगेंद्रानें तोडून पाडिलेली ती शक्ति, आकाशांतून भूतळीं पडलेल्या प्रदीप्त मोठ्या उल्केप्रमाणें दिसूं लागली. त्या सिंहावर सोडलेली बाणपंक्ति, जिचें दर्शन उज्ज्वल आहे अशा नीलकमळांच्या माळेप्रमाणें दुरून शोभूं लागली. नंतर यथेच्छ गर्जना करून व पराक्रम दाखवून नृसिंहानें, वायूनें गवताचे शेंडे उडविल्याप्रमाणें, तें सैन्य उधळून टाकिलें. नंतर आकाशगत दैत्येंद्र त्यावर पाषाणवृष्टि करूं लागला. डोंगराएवढ्या शिळांच्या तुकड्यांनीं व महातेजस्वी गिरिशिखरांनीं त्यानें वृष्टि केली; पण सिंहाच्या शरीरावर पडलेली ती मोठी पाषाणवृष्टि काजव्यांच्या समूहांप्रमाणें दशदिशांस पसरली. हे शत्रुमर्दका, तेव्हां दैत्य मेघधारा जशा पर्वताला आच्छादितात त्याप्रमाणें त्या सिंहाला आच्छादित करूं लागले. भयंकर वेगाचे ते दैत्यांचे समूह समुद्र जसे पर्वताला हालवूं शकत नाहींत त्याप्रमाणें, आकाशांत असलेल्या व बलानें श्रेष्ठ अशा त्या मृगेंद्रास हालवूं शकले नाहींत. त्या देवानें राक्षसांची पाषाणवृष्टि कुंठित करून सोडिली असतां चोहोंकडून स्थूलधारांनीं जलवृष्टि होऊं लागली. अति तीक्ष्ण वेगानें हजारों जलधारा आकाशांतून पडल्या. त्यांनीं आकाश, दिशा व उपदिशा सर्वतः व्यापून टाकिल्या. धारांचें पडणें, वाऱ्याचा सोसाटा, व उत्तरोत्तर वाढणारा वर्षाव यांयोगें कांहीं कळेनासें झालें. त्या धारा आकाशांत व पृथ्वीवर सर्वत्र पसरल्या. पण भूमीवर सतत पडणाऱ्या त्या धारांनीं त्या सिंहाला स्पर्शही केला नाहीं. युद्धांत मृगेंद्ररूपानें उभा असलेल्या त्या देवाच्या मायेनें तो मेघ सभोंवार जलाचा वर्षाव करीत राहिला; पण त्यानें मृगेंद्रावर वृष्टि केली नाहीं. याप्रमाणें तुमुल पाषाणवृष्टि व्यर्थ झाली. जलवृष्टीचीही तीच दशा झाली. नंतर दानवांनीं रक्ताची वृष्टि सुरू केली. तीही निष्फळ झाल्यावर त्यांनीं माया केली. सर्व बाजूंस अग्नि व वायु निर्माण केला. चोहोंकडे तीक्ष्ण वेग असलेला व ज्वालामाली भयंकर तेजस्वी अग्नि आकाशांतून पडूं लागला. तो अति तेजस्वी अग्नीही सिंहास जाळूं शकला नाहीं. अमिततेजस्वी सहस्रनयन इंद्रानें मोठ्या जलवृष्टीनें तो अग्नि विझविला. युद्धांत ती माया कुंठित झाली असतां दानवांनीं भयंकर व तीव्र असा अंधःकार उत्पन्न केला. त्याच्यायोगें सर्व लोक आच्छादिले गेले असतां व दैत्यांनीं पुनः शस्त्रें उचललीं असतां, स्वतेजानें वेष्टिलेला तो सिंह सूर्यासारखा भासला. तीन टोंकें असलेली त्या सिंहाच्या ललाटावरील भ्रुकुटी दानवांना रणांत त्रिकूटावर असलेल्या तीन मार्गांनीं जाणाऱ्या गंगेप्रमाणें दिसली.

## अध्याय शेचाळिसावा.

—:•:—

### हिरण्यकशिपूचा पराक्रम.

वैशंपायन सांगतातः—नंतर सर्व माया कुंठित झाल्या असतां, सर्व दैत्य खिन्न होऊन हिरण्यकशिपूस शरण गेले. नंतर क्रोधानें प्रज्वलित झालेल्या दैत्य हिरण्यकशिपूनें स्वतेजानें जणूं काय जळत असल्याप्रमाणें

पृथ्वीला हालवून सोडिलें. त्यामुळें सर्व समुद्र व जलाशय अतिशय क्षुब्ध झाले. अरण्यें, वनें, व वृक्ष यांसह सर्व पर्वत कांपूं लागले. तो दैत्येंद्र खवळला असतां सर्व जग अंधकारमय झालें; त्यामुळें कांहीं कळेनासें झालें. आवह, प्रवह, विवह, परावह, संवह, महाबलाढ्य उद्वह व श्रीमान् परिवह हे गगनांत फिरणारे भयसूचक सात वायु खवळले. सर्व लोकांच्या क्षयकाळीं जे ग्रह दिसूं लागतात ते आकाशांत आनंदानें यथेच्छ वावरूं लागले. ग्रहांचे तारानक्षत्रांशीं संयोग व गमनागमनें अनियमितपणें होऊं लागलीं. हे राजा, ग्रह व नक्षत्रें यांसह आकाश पेटलें. आकाशांत भगवान् सूर्य निस्तेज दिसूं लागला. आकाशांत एक धिप्पाड काळें कबंध [ धड ] दिसूं लागलें. सूर्यानें भयंकर व काळा असा धुराचा लोट सोडला. तो गगनस्थ भगवान् अतिशय तापूं लागला. धूमासारखे घोर सात सूर्य आकाशांत दिसूं लागले. ग्रह आकाशांतील चंद्रकोरेच्या अग्रांवर बसले. त्याच्या डाव्या बाजूस शुक्र व उजव्या बाजूस बृहस्पति होता. शनीचें सर्व अंग लाल झालें. लाल सूर्यासारखी त्याची कांति झाली. घोर, आकाशांत फिरणारे व युगपर्याय करणारे ग्रह एकाच काळीं सुवर्णनिर्मित दुर्गम शृंगावर चढले. नक्षत्रांसह सप्तग्रहांनीं चंद्रमा वेढिला जाऊन [ रोहिणीचें अभिनंदन न करितां ] चराचर सृष्टीचा विनाश सुचविता झाला. चंद्र राहूनें ग्रस्त होऊन त्यावर भयंकर व प्रज्वलित उल्का आदळूं लागल्या. देवेंद्र रक्ताचा पाऊस पाडूं लागला. विद्युद्रूप उल्का दणाणत आकाशांतून पडल्या. सर्व वृक्ष अकालीं फुलें व फळें देऊं लागले. सर्व लता एकाएकीं फळयुक्त झाल्या. ही गोष्ट दैत्यांचा नाश सुचवीत होती. फळांवर फळें व पुष्पांवर पुष्पें आलीं. सर्व देवांच्या प्रतिमा डोळे उघडूं व मिटूं लागल्या; हसूं व रडूं लागल्या; गंभीर आक्रोश करूं लागल्या. धुमसूं व जळूं लागल्या; या चिन्हांच्या योगें त्या युगक्षय सुचवीत होत्या. ग्राम्यपशु व पक्षी वन्य पश्वादिकांशीं संगत झाले व तेथें सिंह आला असतां भयंकर आक्रोश करूं लागले. नद्यांचें पाणी गढूळ होऊन त्यांचे प्रवाह उलट वाहूं लागले. लोकांचा क्षय करणारा सूर्य अपराण्हीं आला असतांही लाल धुळीनें व्याप्त झाल्यामुळें दिशा प्रकाशित झाल्या नाहींत. पूज्य चैत्य वृक्षांचेंही कोणीं पूजन करीनासें झालें. ते वायुवेगानें छिन्नभिन्न होऊन जमिनीवर कोसळून पडले. सूर्य अपराण्हीं गेला तरी प्राण्यांची सावली तेव्हां फिरली नाहीं. लोकांच्या क्षयाचा काळ आला असतां अशीं दुष्ट चिन्हें झालीं.

तेव्हां हिरण्यकशिपूच्या घरावर, भांडागारावर व हत्यारखान्यावर मधमाश्यांचीं पोळीं लागलीं. त्याचप्रमाणें आयुधागारावर धूमपंक्ति दिसली. तेव्हां हे महोत्पात पाहून हिरण्यकशिपु पुरोहित जो शुक्र त्यास म्हणाला 'भगवन्, हे महोत्पात काय सुचवीत आहेत? हें मीं खरोर जाणण्याची इच्छा करीत आहें; त्यांविषयीं मला कौतुक वाटत आहे.' शुक्र म्हणाला, हे राजन्, महा असुरा, लक्षपूर्वक हें माझें वचन ऐक. हे महाभयंकर महोत्पात येथें कां दिसत आहेत तें सांगतों. हे महा असुरा, ज्या राजाच्या राष्ट्रांत उत्पात दिसतात त्याचा देश तरी हरण केला जातो अगर तो राजा तरी बंध पावतो. याकरितां हें सर्व नाहींसें होईल अशी कांहीं तरी योजना कर. फार मोठें भय लवकरच प्राप्त होणार आहे यांत शंका नाहीं.

हिरण्यकशिपूस याप्रकारें सांगून व त्या दैत्येंद्रास 'स्वस्ति' असें म्हणून शुक्र आपल्या घरीं गेला. तो गेल्यानंतर दैत्येंद्र

पुष्कळ वेळ विचार करीत बसला. ब्रह्मदेवाच्या वाक्याची आठवण करून तो अति दीन झाला. असुरांचा नाश व सुरांचा जय सुचविणारे हे अति भयंकर उत्पात दिसत अहेत. दैत्येंद्राचा विनाश सुचवीत हे व असेच दुसरेंही भयंकर उत्पात कालानें निर्मिलेले आहेत. नंतर हिरण्यकशिपु हातीं गदा घेऊन वेगानें पृथ्वी कांपवीत पळत सुटला. हिरण्यकशिपु दैत्यानें, क्रोधानें दांतओंठ खाऊन पूर्वी झालेल्या वराहाप्रमाणें पृथ्वी हालविली असतां, पर्वतांतून भयानें व्याकूळ होऊन मोठाले सर्प विषज्वालांनीं व्याप्त झालेल्या तोंडांतून अग्नि सोडीत खालीं पडले. चार मस्तकांचे, पांच मस्तकांचे व सात मस्तकांचे नाग, वासुकि, तक्षक, कर्कोटक, धनंजय, एलापत्र, कालीय, वीर्यवान् महापद्म,सहस्त्र फणांचा नागराज हेमतालध्वज, शेष, अनंत, महीपाल, दुष्प्रकंप, प्रकंपित, इ० सर्व बाहेर पडले. जलांत असलेले पृथ्वीचे आधार देखील पेटले. तेव्हां खवळलेल्या दैत्यानें सर्व कांहीं चोहोंकडे हालवून सोडिलें. पाताळीं राहणाऱ्या व नागांच्या मण्यांचें तेज वागवणाऱ्या शुभ जलदेवता अकस्मात् क्षुब्ध झाल्या; त्या शुभ व सहसा न खवणाऱ्या होत्या. भागीरथी नदी, शरयू, कौशिकी, यमुना, कावेरी, कृष्णा, वेणा, सुवेणा, महाभागा, गोदावरीनदी, चर्मण्वती ( चंबळा ), नदनदीपति सिंधु, रत्नासारखें स्वच्छ जल असलेला मेकल पर्वतापासून निघालेला शोण नद, सुश्रोणा, नर्मदा, वेत्रवती नदी [ बेटवा,] गोमती, गोकुलाकीर्णा, पूर्णा, सरस्वती, मही, काळमही, तमसा, पुण्यवाहिनी, सीता, इक्षुमती, महानदी देविका, सर्व रत्नांनीं अलंकृत असें रत्नवान् जंबूद्वीप, सोन्याच्या खाणींनीं अलंकृत असें सुवर्णकूटक, पर्वत व अरण्य यांनीं सुशोभित असा लोहित महानद, नगर, कौशिकारण्य, रुप्याच्या खाणी असलला द्रविड देश, मागध देशांतलि मोठमोठे गांव, अंग, वंग, सुह्म, पल्ह, विदेह, मालव, काशि, कोसल, इत्यादि सर्व कांपविले. कैलासशिखरासारखें विश्वकर्म्यानें केलेलें जें गरुडाचें सोन्याचें घर तेंही डळमळलें. तांबड्या पाण्यचा व भयंकर वेगाचा लौहित्यसागर ( तांबडा समुद्र ), व शुभ्र पांढऱ्या मेघांसारखा क्षीरोदसागर कांपूं लागला. शंभर योजनें उंच, वर सोन्याच्या वेदिका असलेला, व नाग व पक्षीयांनीं सेवित असा श्रीमान् उदयपर्वत, सूर्याप्रमाणें चमकणाऱ्या, सोन्याच्या, फुललेल्या, साळ, ताल, तमाल व कर्णिका वृक्षांच्या योगें शोभणारा व धातूंनीं अलंकृत असा अयोमुखनांवाचा मोठा पर्वत, तमाल वनाचा वास ज्यावर पसरला आहे असा शुभ मलयपर्वत सुराष्ट्र, बाल्हीक, शूर, भीम, भोज, पांड्य, वंग, कलिंग, ताम्रलिप्तक, आंध्र, पुंड्र, वामचूड, केरळ, इत्यादिकांना देव व अप्सरागणांसह त्या दैत्यानें क्षुब्ध करून सोडलें.

पूर्वी मानवांस अगम्य सिद्धचारणांनीं सेवित, अति मनोहर, विचित्र नाग व पक्षी यांनीं युक्त, फललेल्या लता व वृक्ष असलेलें, सोन्याच्या शिखरांनीं सुशोभित, व अप्सरागणांनीं सेवित असें अगस्त्यभवन; व लक्ष्मीवान्, सुंदर दिसणारा, सागराला सारून वर उठलेला, चंद्र व सूर्य यांचा सखा असा पुष्पितकगिरी आपल्या अतिशय मोठ्या शिखरांनीं आकाशास स्पर्श करीत असल्याप्रमाणें शोभत होता. त्याचीं शिखरें सूर्यचंद्रांच्या किरणांप्रमाणें चकमत होतीं; व तो सामुद्रजलानें व्यापिलेला होता. शंभर योजनें विस्तीर्ण अस-

१ ' द्रुमंचरजताकर ' असा दुसरा पाठ आहे, पण ' रुपें निघणारा वृक्ष ' आमच्या ऐकिवांत नसल्यामुळें आम्हांस पत्करला नाहीं.

लेला श्रीमान् विद्युद्वान पर्वतही कांपूं लागला. त्या उत्तम पर्वतांवर विजांचे समूह पडत होते. ऋषभाप्रमाणें आकार असलेला श्रीमान् ऋषभपर्वत, अगस्त्याचें वर मोठें घर असलेला कुंजर पर्वत, जींतील रस्ते रुंद आहेत अशी सर्पांची आलयापुरी व तशीच भोगवती नगरी हीही त्या दैत्येंद्रानें कांपविली. महामेघ, पारियात्र, श्रेष्ठ चक्रदान, वाराह हे पर्वत, ज्यामध्यें नरक नांवाचा दुष्ट दैत्य राहतो तें सुवर्णमय शुभ प्राग्ज्योतिषपुर, मेघांचा गंभीर ध्वनि असलेला श्रेष्ठ मेरुपर्वत, तेथील साठ हजार पर्वत, तरुण सूर्यासारखा महेंद्र पर्वत, देवांचे निवासस्थान असा शुभ व पवित्र हिरण्मय पर्वतराज, सुवर्ण शृंगांचा महाशैल मेघसखा पर्वत, व अकंप्य कैलास हेही त्या दैत्येंद्रानें हालविले. त्याच्या गुहांचें सेवन यक्ष, राक्षस व गंधर्व नित्य करीत असत. तो श्रीमान्, मनोहर, व नित्य प्रफुल्लित वृक्षांचा होता. सुवर्णकमलांनीं आच्छादिलेलें वैखानस सरोवरही त्यानें कांपविलें. राजहंसांनीं सेवित असें मानससरोवर, त्रिशृंगपर्वत, श्रेष्ठ नदी कुमारी, तुषारांच्या समूहासारखा मंदरपर्वत, उशीरबीजपर्वत, पर्वतराजरुद्रोपस्थ, प्रजापतींचें निवासस्थान पुष्करपर्वत, देवावृत्पर्वत, तसेच वालुक, क्रौंच, सप्तर्षि, धूमवर्ण हे व दुसरे असेच पर्वत, देश, प्राण, नद्या व समुद्र त्या दैत्येंद्रानें कांपविले. महीपुत्र कपिल व व्याघ्राक्ष यांस त्यानें कांपविलें. आकाशांत फिरणारे निशापुत्र, पाताळाच्या तळीं राहणारे, मेघासारख्या आवाजाचे व अंकुशधारी भयंकर रुद्राचे गण व ऊर्ध्वग आणि भीमवेग या सर्वांस त्यानें हालवून सोडिलें.

# अध्याय सत्तेचाळिसावा.

—:०:—

## हिरण्यकशिपुवध व ब्रह्मकृत नृसिंहस्तुति.

वैशंपायन सांगतातः—त्या स्थानीं आदित्य, साध्य, विश्वेदेव, मरुत्, रुद्र, महात्मे देव, बलवान् वसु इत्यादि जनसंहारानें दुःख पावून भयग्रस्त मनानें सूर्यासारख्या तेजस्वी सिंहाजवळ येऊन म्हणाले. ' हे देवा, लोकांचा नाश करणाऱ्या, दुष्ट व वाईट आचरणाच्या दैत्यास सर्व असुरांसह मार. हे दैत्यनाशना, तूंच यांचा योग्य अंत करणारा आहेस. यास्तव लोकांच्या हिताकरितां याचा नाश कर. सर्वांस शांत कर. तूं सर्व लोकांचा गुरु, तूं इंद्र, व तूंच पितामह आहेस. तुजवांचून अन्य आधार पूर्वीं कधीं नव्हता, आतां नाहीं, व पुढेंही असणार नाहीं.

देवांचें तें वचन ऐकून देवांच्या आदिकारण देवानें अति गंभीर ध्वनीनें मोठा नाद केला. महात्म्या सिंहानें आपल्या गंभीर सिंहनादानें असुरेंद्रांचीं हृदयें व मनें विदीर्ण करून टाकिलीं. क्रोधवश गण, कालकेयगण, वेग, वैमलेय, बलवान् सिंहिकेय, संह्रदीय, महानादी, तसाच दुसरा महावेग, महीपुत्र कपिल, व भूमीला कांपविणारा व्याघ्राक्ष, अंतरिक्षांत फिरणारा निशापुत्र, पातालवासीय, मेघांप्रमाणें आवाजांचे व अंकुशाच आयुधें असलेले रुद्राचे गण, ऊर्ध्वग व भीमवेग हे सारे भयभीत झाले. नंतर भीमकर्मा, सूर्यनयन, वज्रयुक्त, शूलवान् व विकराल हिरण्यकशिपु—मेघासारखी घन आकृति, वेग, गंभीर नाद व कांति असलेला देवशत्रु जो मत्त दैत्य—तो नृसिंहावर चाल करून गेला. तेव्हां नृसिंहानें त्याच्यावर उडी मारून ॐकाराच्या साह्यानें आपल्या तीक्ष्ण नखांनीं त्यास विदीर्ण

करून युद्धांत मारिलें. तेव्हां त्या दैत्याच्या नाशामुळें पृथ्वी, लोक, चंद्र, आकाश, ग्रह, सूर्य, सर्व दिशा, नद्या, पर्वत, व महासागर त्याच्या तावडीतून मुक्त झाले. नंतर अतिशय आनंदित झालेले देव व तपोधन ऋषि विविध स्तोत्रांनीं त्या सनातन आदिदेवाची स्तुति करूं लागले. देव ह्मणाले—"हे देवा, तूं हें जें नृसिंहस्वरूप धारण केलेलें आहेस, त्याचेंच पूजन पर-अपर ब्रह्म जाणणारे लोक करितील. हे विभो, किंवा लोकांमध्यें आजपासून सर्व प्राण्यांमध्यें सिंहत्व पूज्य होईल. मुनि 'नृसिंह' म्हणून तुला नित्य गातील. हे विभो, तुझ्या प्रसादानें आम्हीं आपापल्या पूर्वपदास प्राप्त झालों आहों.

याप्रमाणें देवसमूहानें बोलल्यानंतर तो महा उदार मनाचा नारसिंह प्रसन्न झाला. ब्रह्मदेवानेंही अति प्रसन्न होऊन विष्णूची स्तुति केली. ब्रह्मा ह्मणला—तूं अक्षर, अव्यक्त, अचिंत्य, गुह्य, उत्तम, कूटस्थ, अकृत, कर्ता, सनातन व रोगरहित आहेस. तत्वार्थामध्यें सर्वतः स्थिरपणें असलेली जी सांख्ययोगात्मक बुद्धि तिला तूंच विद्यारूप, शाश्वत व ध्रुव पुरुष जाणतोस. तूं व्यक्त व अव्यक्तही आहेस. तुजपासून हें सर्व जग झालें. हे देवा, आम्हीं सर्व त्वन्मय आहों. तूंच आत्मा व प्रभु आहेस. उपनिषदांत वर्णिल्याप्रमाणें तुझी मूर्ति विश्वे, तैजस, प्राज्ञ व तुरीय या चार प्रकारें विभागलेली आहे. तूंच सर्व लोकांचा विभु व गुरु आहेस-युगांच्या एक हजार चौकड्यांच्या अखेरीस तूं लोकांतकाचाही अंतक होतोस. सर्व भूतें तुझ्या आधारावर राहिलीं आहेत. तुजमध्यें अनंत बल व पौरुष आहे. कपिल प्रभृति यतींची तूं अखेर आहेस. तूं आदि, मध्य व अंत यांनीं रहित आहेस. सर्वांचा आत्मा पुरुषोत्तम आहेस. तूं उत्पत्तिकर्ता, तूंच संहर्ता व लोकांची भावना [ रक्षण ] करणारा आहेस. तूंच ब्रह्मा व रुद्र आहेस; महेंद्र, वरुण, यम, लोककर्ता, विकर्ता, व अव्यय प्रभु आहेस; परासिद्धि, परमदेव, परमंत्र, परम मन, परधर्म, व परम यश असें तुज श्रेष्ठ व पुराणपुरुषालाच म्हणतात. परमसत्य, सर्वोत्तम हवि, परमपवित्र, परममार्ग, परमयज्ञ, व परमहोत्र असें तुज पुराणश्रेष्ठ पुरुषासच म्हणतात. तुज श्रेष्ठ पुराणपुरुषास परशरीर, परधाम, परयोग, परावाणी, परमरहस्य, व परम गति म्हणतात. तुला सर्वोत्तम अनादि पुरुषालाच पर, परात्पर, परात्पराहूनही पर, परमदेव, व परात्पर प्रभु असें म्हणतात. पराचाही पर, परमप्रधान, पराहूनही परतत्व, व परात्पर धाता असें तुज श्रेष्ठ पुराण पुरुषासच म्हणतात. पराचेंही पर, परम रहस्य, सर्व उत्कृष्ट वस्तूंहून उत्तम, व सर्वोत्कृष्ट तप असें तुज श्रेष्ठ पुरुषालाच म्हणतात, पराचेंही पर, परम परायण, परम गुह्य, परधाम, परयोग व परम प्रभुत्व असें तुज श्रेष्ठ पुरुषालाच म्हणतात.

वैशंपायन सांगतातः—तो सर्वलोक पितामह भगवान् प्रभु या प्रकारें बोलून व नारायणाची स्तुति करून ब्रह्मलोकास गेला. नंतर वाद्यें वाजत असतां व अप्सरांचें नृत्य चालू असतां, तो प्रभु ईश्वर क्षीर सागराच्या उत्तरतीरावर गेला. नृसिंहाचें शरीर सोडून व त्याची लोकीं स्थापना करून, आपलें जुनें स्वरूप घेऊन तो गरुडध्वज गेला. आठ चाकांच्या, महाभूतांनीं बनविलेल्या शोभिवंत वाहनानें तो प्रभु, अव्यक्तप्रकृति देव आपल्या स्थानीं गेला.

१ ही नृसिंहावताराची कथा एरव्हींच्या प्रचलित कथेहून भिन्न आहे यांत प्रल्हादाची छळणूक बिलकूल येत नाहीं; व नृसिंह खांबांतून प्रकट होऊन घराच्या उंबरठ्यावरही हिरण्यकशिपूस मारीत नाहीं.

२ स्थूल, सूक्ष्म, कारण व महाकारण हे चार देह व जागृत, स्वप्न, सुषुप्ति, व तुरीया, या चार अवस्था यांचे हे चार अभिमानी आहेत.

याप्रमाणें त्यामहात्म्या देवानें तेव्हां पूर्वकालीं नृसिंह शरीरानें त्या हिरण्यकशिपूस मारिलें.

## अध्याय अठ्ठेचाळिसावा.

—:०:—

### दैत्यांची बलीस प्रार्थना.

वैशंपायन सांगतातः—हा नृसिंहावतार तुला सांगितला. आतां यापुढें वामन अवतार ऐक. त्या अवतारांत रूपवेत्त्यांतील श्रेष्ठानें वामन रूप धारण केलें; व बलाढ्य बलीच्या यज्ञांत पूर्वी त्या बलाढ्य विष्णूनें तीन पाऊलांनीं त्रैलोक्य व्यापून त्याचें त्याजपासून हरण केलें. त्या प्रभु विष्णु देवानें समुद्रच वस्त्र असलेल्या व नाना पर्वतांनीं भूषित झालेल्या पृथ्वीचें हरण करून ती देवेंद्र जो शक्र त्यास अर्पण केली. जनमेजय म्हणतो, हे ब्राह्मणश्रेष्ठा, याविषयीं मला मोठा संशय व मोठें कौतूहलही वाटत आहे. नारायणदेव वामनत्व कसें पावला? जो नारायणप्रभु पुराणांमध्यें पुराणात्मा होऊन, पद्मनाभ, महाबाहु, लोकांची प्रकृति, ध्रुव, आदि, मध्य व अंतरहित, त्रैलोक्याचें कारण, सनातन, देवाधिदेव, देवांचा अध्यक्ष, कृष्ण, सर्व लोकांकडून नमस्कृत, हव्य व कव्यवाहक, श्रीमान्, हव्य व कव्य यांचा भोक्ता, अव्यय असा तो प्रभु देवमाता अदितीच्या गर्भांत कसा मावला? जो इंद्रालाही उत्पन्न करणारा तो इंद्राचा कनिष्ठ भ्राता कसा झाला! व जन्म पावलेला तो देवदेवेश पुनः विष्णुत्व कसें पावला? हे विप्रा, हें मला सांग व त्या महात्म्याचा प्रादुर्भाव मला ऐकूं दे.

वैशंपायन सांगतातः—राजन्, ऋषिश्रेष्ठांनीं सत्कार केलेली, जुन्या कवींनीं सांगितलेली, ब्रह्मदेवानें वर्णिलेली व ब्राह्मणानें प्रसिद्धीस आणिलेली ही दिव्य कथा ऐक. हे जनमेजया, मरीचीचा पुत्र व देवांचा ईश अशा कश्यपप्रजापतीला दिति व अदिति या दोन भार्या होत्या. अदितीच्या ठायीं महात्म्या कश्यपापासून देव उत्पन्न झाले. ते धाता, अर्यमा, मित्र, वरुण, अंश, भग, इंद्र, सूर्य, पूषा, पर्जन्य, त्वष्टा व बारावा विष्णु हे होत. दितीच्या ठायीं बलवान् हिरण्यकशिपु प्रभु झाला. त्याचा धाकटा भाऊ प्रतापवान् दैत्येंद्र हिरण्याक्ष. हिरण्यकशिपूचे घोर पराक्रमी प्रल्हाद, अनुऱ्हाद, जंभ, संऱ्हाद इत्यादि पांच पुत्र; प्रल्हादाचा पुत्र विरोचन, व त्याचा पुत्र बलि, असें म्हटलें आहे. त्या दैत्याचे पुत्रपौत्रादि सर्व महाबलाढ्य, अक्षय व अव्यय होते. हे राजन्, त्या तेजस्वी व मानी देवशत्रु दैत्यांचे हजारों गण प्रत्येक देशांत पुष्कळच आहेत. नृसिंहानें हिरण्यकशिपूस मारिलें असें पाहून त्या दैत्यांनीं देवांच्या वधाकरितां बलीला ( आपला ) इंद्र केलें. तो नित्य धर्मपरायण, सत्यवचनी, जितेंद्रिय, शौर्याध्ययनसंपन्न, सर्वज्ञानविशारद, पर व अपर ज्ञानाचें ग्रहण करणारा, तत्वदर्शी, अव्यय व हिरण्यकशिपूसारखाच तेजस्वी व देवांचा वैरी आहे असें पाहून सर्व दैत्यांनीं दिव्य अभिषेक करून त्या योगें विरोचनपुत्र बलीला दैत्यांच्या अधिपत्यावर नेमलें. त्यांनीं त्याची सर्व प्रकारें पूजा केली. दैत्यांनीं व त्या वेळीं संतुष्ट झालेल्या ब्रह्मदेवानें बलवंतांतील श्रेष्ठ बलीला सर्व तीर्थजलांनीं भरलेल्या मोठाल्या सोन्याच्या कलशांनीं हिरण्यकशिपूच्या स्थानीं अभिषेक केला. नंतर अभिषिक्त, अतुलपराक्रमी व सिंहासनारूढ बलीचा सर्व दानवांनीं जयजयकार केला.

या प्रकारें सर्व दानवांनीं बलवानांतील श्रेष्ठ अशा बलीला इंद्र करून व त्याच्या पुढें मस्तकें भूमींवर टेंकून त्यास अशी

विज्ञापना केली. दैत्य म्हणाले, हे दैत्येंद्रा, हें सर्व स्थावरजंगम जगत् व त्रैलोक्य, हिरण्यकशिपूच्या स्वाधीन होतें हें तूं जाणतच आहेस; पण, देवेंद्रास मारणाऱ्या तुझ्या प्रपितामहास ठार करून, त्या वेळींच देवांनीं त्रैलोक्याचें हरण केलें व इंद्राला राज्याभिषिक्त केला. याकरितां, तें आपलें वडिलोपार्जित राज्य त्वां परत मिळवावें हें योग्य आहे. हे नाथा, आम्हांसह हें अव्यय त्रैलोक्य आपल्या ताब्यांत घे. हे प्रभो, तुझें कल्याण होवो. पितामहाचें राज्य परत मिळीव. हजारों असुरगणांनीं व्यापलेला तूं स्वर्गांत जाऊन महानुभाव देवांस जिंक. हे राजन्, तूं अमितबलवान् व पराक्रमी आहेस. आपल्या गुणांनीं तूं आपल्या पितामहाहूनही वरचढ आहेस.

## अध्याय एकुणपन्नासावा.

—:०:—

### दैत्यसैन्याची तयारी.

वैशंपायन सांगतातः—त्यांचें भाषण ऐकून महाबुद्धिमान् व महाबलाढ्य बलि त्या वेळीं आनंद पावला, त्यानें दैत्यांच्या कोटी वीरांस ‘ आजच आपण सर्वजण त्रैलोक्य जिंकूं या ’ अशी आज्ञा केली. त्याची ती आज्ञा ऐकून युद्धदुर्मद दानव अतिशय तयारी करूं लागले. महापद्म, निकुंभ, वीर्यवान, पूर्णकुंभ, कांचनाक्ष, कपिस्कंध, मैनाक, क्षितिकंपन, शितकेश, ऊर्ध्वमुख, वज्रनाभ, शिखी, जटावान्, सहस्रबाहु, निकट, व्याघ्राक्ष, प्रियदर्शन, एकाक्ष, एकपाद, मुंड, विद्युदक्ष, चतुर्भुज, गजोदर, गजशिरा, गजस्कंध, गजेक्षण, अष्टदंष्ट्र, चतुर्वक्त्र, मेघनादी, जलंधर, कराल, उज्वाल, जिव्हास्य, शतांग, शतलोचन, सहपाद, सुमुख, कृष्ण, महासुर, रणोत्कट, दानति, पशैलकंपी, कुलाकुलि, समुद्र, रभस, चंड, धूम्र, महासुर, गोत्रज, गोक्षुर, रौद्र, गोदन्त, स्वस्तिक, ध्रुव, मांसप, मांसभक्ष, वेगवान्, केतुमान, शिबि, पंकदिग्धशरीर, बृहत्कीर्ति, महाहनु, समप्रभ, विकुंभांड, विरूपाक्ष, महोदर, श्वेतशीर्ष, चंद्रहनु, चंद्रहा, चंद्रतापन, विक्षर, दीर्घबाहु, मद्यप, मारुताशन, तालजंघ, महाभाग, शरभ, शलभ, क्रथ, समुद्रमथन, अनादि, वितत, महाबल प्रलंब, नरक, व्याली, धेनुक, काललोचन, वरिष्ठ, गरिष्ठ, भूतलोमा, विधु, दुष्प्रसाद, किरीटी, महासुर सूचिवक्त्र, सुबाहु, कंजबाहु, करण, कलशोदर, सोमप, देवयाजी, प्रवर, वीरमर्दन, सुपथ, खंडमुक्ति, शिखिनेत्र, शिखिध्वज, इत्यादि मरीचीची कीर्ति वाढविणारे दैत्य मला आठवले तितके सांगितले आहेत. हे व आणखी दुसरेही नानाभूषणांनीं अलंकृत शत्रूंचा नाश करणारे वीर अनेक हजार रथांच्या समूहांनीं युद्धास निघाले.

दिव्यवस्त्रधारी, दिव्यमाला घालून दिव्य उटी अंगांस लाविलेले, दिव्य कवचांनीं युक्त, दिव्य व उंच ध्वजांनीं नजरेंत भरणारे दैत्य दिव्य आयुधें धारण करून, मेघांसारख्या गर्जना करीत मोठाल्या रथांच्या घोषांनीं पृथ्वीस कांपवीत ( शत्रूंवर निघाले. ) भुजंगांच्या फणांसारख्या महाभुजांनीं महाबलाढ्य, दिव्यबल व अस्त्र धारण करणारे, अतिदुर्जय, देवांचे शत्रु, दितीस प्रिय व लालनेत्रांचे ते दैत्यश्रेष्ठ [ युद्धार्थ निघाले ]. सूर्य, अग्नि व इंद्र यांप्रमाणें बळ असलेले, इंद्राच्या वज्राप्रमाणें व अशनीप्रमाणें वेग असलेले, वाढलेल्या दाढांचे, वानरांच्या केसांप्रमाणें धूम्रवर्ण केसांचे, शरत्कालीन मेघांप्रमाणें वाढत असलेले, असे ते सर्व युद्धार्थ निघाले. हजार बाहू असलेला बलीचा पुत्र बाण रथ व अतिरथ वीरांच्या कोटींनें सज्ज झाला. ते सर्व दैत्य मायाधारी, दिव्य अस्त्रांनीं लढणारे, सर्व मद व बळ यांनीं

उन्मत्त, व पूर्वी वर मिळविलेले होते. सर्व मेरुपर्वतासारखे, पिंवळीं रेशमी वस्त्रें धारण केलेले, किरिट, पागोटी व मुकुट घातलेले, दिव्यभूषणांनीं अलंकृत, सर्व सुवर्णकवचें घातलेले, सोन्याचे ध्वज व केतु असलेले व रथावर बसलेले राक्षस शरत्काळीं आकाशांत ग्रह शोभतात त्याप्रमाणें शोभले. अग्नीसारख्या उज्ज्वल कांतीनें युक्त अशा सुवर्णालंकारांनीं भूषित झालेले ते दैत्य सुवर्णपर्वताच्या शिखरांवरील फुललेल्या पळसाच्या झाडांप्रमाणें दिसले. त्यांच्या मध्यभागीं तीन नल्वें लांबीच्या रथावर हातीं गदा घेऊन उभा असलेला बाण वर्षाकालीं उद्भवलेल्या मेघाप्रमाणें दिसत होता. तो त्याचा रथ विचित्र ध्वज व अश्व यांनीं युक्त, चित्ररचनांनीं शोभिवंत, गदा व परिघ यांनीं युक्त, व सुवर्णसमूहानें अतिशय अलंकृत होता. सूर्यामागें जसे वालखिल्य जातात त्याप्रमाणें बाणाच्या मागून दैत्य जात होते. तीक्ष्ण दाढांनीं युक्त असलेल्या सर्पांप्रमाणें ते नानाप्रकारच्या भयंकर आयुधांनीं युक्त होते. तोंडें पसरलेले पांच महावीर्यवान्, युद्धाविषयीं मोठे मदोन्मत्त व भयंकर दैत्य बाणाच्या रथाचें रक्षण अति दक्षतेनें करीत होते. सुबाहु, मेघनाद, वीर्यवान् भीमगर्भ, कनकमूर्धा, व वेगवान् केतुमान अशीं त्यांचीं नांवें होतीं.

तो दैत्येंद्र देवसैन्याच्या वधाकरितां, सोनें व रुपें यांच्या विचित्र रचनांनीं बाजू सुंदर केलेल्या व मेघनादाप्रमाणें धांवांचा आवाज असलेल्या गरुडासारख्या रथावर बसला. अनायुषेचा पुत्र बळ नांवाचा महाअसुर हजारों भयंकर तेजस्वी रथांनीं परिवेष्टित झाला. त्या रथास हजारों अस्वलें जोडलीं होतीं. त्या कावळ्याचा ध्वज वर असलेल्या, पोलादी, अतिदुर्जय व घोर रथावर तो बलाढ्य दैत्य चढला. नीलवस्त्र धारण करणारा तो श्रीमान् दैत्य वैदूर्यमण्यांच्या पर्वताप्रमाणें दिसला. मोठ्या रथाच्या वेगानें तो दानव तेवेळीं गेला. सागरासारख्या सैन्यामध्यें तो राक्षस सकाळच्या समुद्रांतील सूर्याप्रमाणें शोभिवंत दिसला. ज्याप्रमाणें एकादा पर्वत चमकणाऱ्या श्रेष्ठ शिखरांनीं शोभतो, त्याप्रमाणें हा दैत्य तापलेल्या सोन्यासारखी कांति असलेल्या, अलंकृत व मुख्य किरीटाच्या योगें शोभला. त्याची आकृति चंद्रासारखी किंवा विजेच्या रेघेसारखी होती. नमुचि राक्षसाचे साठ हजार रथ होते. त्या सर्वांस गाढव जोडले असून त्या रथांचा नाद मेघांसारखा होता. ते सर्व नाना आयुधांनीं युक्त, चित्रयोधी, महाबलाढ्य, मोठ्या मेघासारखे, व वेगवान् होते. त्याचा अतिवेगवान् रथ हजारों वाघ जुंपलेला होता. नमुचीचा तो सुंदर रथ सर्व रत्नांनीं विभूषित होता. त्याचा व्याघ्रचिन्हयुक्त सोन्याचा ध्वज मध्यान्हकाळीं आलेल्या सूर्याप्रमाणें त्या असुरेंद्राच्या रथामध्यें शोभला. तो भयंकर वेगाचा महाबलाढ्य राक्षस धनुष्य घेऊन हिमालयाप्रमाणें उभा राहिला. नीळ वस्त्र धारण करून सोन्याच्या पट्ट्यानें युक्त झालेला तो राक्षस कक्षायुक्त दिग्गजाप्रमाणें दिसला. ज्याचा क्षुद्र घंटांच्या समूहाचा मोठा आवाज होतो,: जो सोन्यानें अलंकृत, जो पताका व ध्वज यांनीं युक्त, जो सायंकाळच्या मेघांप्रमाणें दिसत आहे, जो चार चाकांचा, ज्याचा आंतील भाग आठ नल्व लांब आहे, जो सोन्याच्या जाळ्यांनीं व्यापलेला व जो उज्वलित आहे, व जो त्या मुळेंच जणूं काय उद्भवलेल्या कालचक्राप्रमाणें दिसत आहे; नानाआयुधें असलेला, घोर, व्याघ्रचर्मानें मढविलेला, चित्रांतील वानरसमूहानें व्याप्त, चित्ररचनांनीं अलंकृत, भाते व बाण यांनीं भरलेला, शक्ति व तोमर यांनीं संपन्न, गदा व मुद्गर यांनीं भरलेला, उत्तम धनुष्यांनीं भूषित, ज्यास

हजार ऋक्ष ( अस्वलें ) जोडलेले आहेत, आयाळ खालीं लोंबत असलेल्या रुप्याच्या मोठ्या सिंहकेतूनें जो सुशोभित आहे, अशा त्या मायेनें स्वतः इकडे तिकडे फिरणाऱ्या रथानें मयदैत्य फारच शोभला. तो श्रीमान् राक्षस उदय पर्वतावरील सूर्याप्रमाणें त्या उत्तम रथावर आरूढ झाला. निर्मल रुपेरी ठिपक्यांनीं ज्याच्या बाजू अलंकृत केलेल्या आहेत व जो रत्नें व सोनें यायोगें उज्ज्वल, व जो सुंदर रचनांनीं विचित्रित झाला आहे, अशा रथावर बसलेल्या मयाच्या मागून हजारों ऊर्जित महारथी दैत्य निघाले.

## अध्याय पन्नासावा.

—:०:—

### दैत्यसेनाविस्तार.

वैशंपायन सांगतातः—पुलोमा नांवाचा महादैत्य अंधःकारासारख्या गहन, भयंकर, उत्तम व दुःख न देणाऱ्या लोखंडी रथावर चढला. तो रथ पर्वतांच्या समूहासारखा, आंतून लोखंडी जाळ्यांचा, व आपल्या नेमिघोषानें खवळणाऱ्या समुद्राप्रमाणें होता. गदा, परिघ, खड्ग, तोमर, परशु, शक्ति व मुद्गर यांनीं भरलेला तो रथ पाण्यांनीं भरलेल्या मेघाप्रमाणें दिसत असे. वाऱ्याप्रमाणें वेग असलेले हजारों उंट जुंपलेल्या त्या रथावर चढून तो युद्धदुर्मद पुलोमा युद्धासाठीं निघाला. त्या महारथ पुलोम्याच्या मागून, तेजानें जणूं काय उज्ज्वलित असलेले आणखी साठ हजार सूर्यासारख्या कांतीचे रथ चालले. तापलेल्या सुवर्णाप्रमाणें तेज असलेल्या मोठ्या शार्ङ्ग ध्वजानें रथामध्यें बसलेला तो दैत्य पर्वतावर असलेल्या सूर्याप्रमाणें झळकत होता. अतिशय सुंदर सोनेरी पट्ट्यानें मढविलेली कालासारखी भयंकर लोखंडी महा गदा घेऊन शत्रूंमध्यें उभा असलेला तो दैत्य पृथ्वीवर प्राप्त झालेल्या केतूप्रमाणें दिसला. बलाढ्य हयग्रीव राक्षस घोडमानांच्या राक्षसांनीं व लक्ष रथांनीं वेष्टित होऊन ( उभा राहिला. ) तो रथींमध्यें श्रेष्ठ होता. पर्वतासारख्या आकाराच्या, शत्रूंच्या सैन्याचा नाश करणाऱ्या, व भयंकर अशा रथावर चढून तो युद्धाकरितां निघाला. पांढऱ्या शुभ्र पर्वताप्रमाणें कांति असलेला व पांढऱ्या कुंडलांनीं शोभणारा तो रथांत बसलेला राक्षस पांढऱ्या शिखराच्या पर्वताप्रमाणें शोभला. वैदूर्यमणींनी चित्रविचित्र केलेल्या व प्रवालांकुरांनीं शोभणाऱ्या, सात डोक्यांच्या मोठ्या नागकेतूनें तो शोभत होता. ज्यांचें बळ, पराक्रम व आकार मोठे आहेत असे ऊर्जित, असंख्य श्रेष्ठ राक्षस रथी शेंकडों असुरगण ज्याच्या मागून जात आहेत अशा त्याच्यामागून, युद्धार्थ निघालेल्या इंद्राच्या मागून देव जसे जातात त्याप्रमाणें निघाले.

महाप्राज्ञ, सर्व शास्त्रांत निपुण, सर्व मायाधर, श्रीमान्, शेंकडों यज्ञ करणारा, तेजस्वी व अग्नीच्याज्वाळेप्रमाणें प्रभा असलेला प्रल्हाद, वर्षाऋतूंतील मेघांप्रमाणें गर्जना करणाऱ्या रथांच्या सैन्यानें सज्ज झाला. देवांनीं ज्याप्रमाणें पितामह वेष्टिला जातो त्याप्रमाणें शूर, अमित वीर्यवान् व सुवर्णकुंडलधारी हजारों दैत्यांनीं तो परिवेष्टित झाला. स्वतःच्या पराक्रमानें अग्रणी झालेला, दृप्त व मदोन्मत्त हत्तीप्रमाणें पराक्रमाचा तो दैत्य जणूं काय सर्व देवसैन्याची साक्षात् खळबळच असा उभा होता. तो स्वतःच्या पराक्रमानें महासागरासारखा, प्रदीप्त अग्नीप्रमाणें उज्ज्वलित, तेजानें सूर्यासारखा, व क्षमेनें पृथ्वीसारखा होता. तालध्वज असलेल्या, दीप्त, अतिशय शोभणाऱ्या रथानें जाणाऱ्या त्यास दानव शेंकडों समूहांनीं अनुसरत होते. ते सारे सोन्याच्या कवचांचे,

रत्नांनीं शोभणारे, दिव्य अंगराग [ उट्या ] व आभरणें यांनीं युक्त, व युद्धांतून न परतणारे असेच होते. ते सोन्यानें चित्रविचित्र अंगें दिसत असलेले, वैदूर्यानें बनविलेले अंगद धारण करणारे, व दिव्य रथांत बसलेले दैत्य आकाशांतील महाग्रहांप्रमाणें दिसत होते. आचारवान्, जितेंद्रिय, धर्मरत, सत्यपरायण, असूयारहित असा तो रूपवान् प्रल्हाद सजल मेघांत वायूप्रमाणें उभा होता. तो त्या वेळीं सर्वांस हरण करणाऱ्या कृतांतासारखा दिसत असे. महामायावी शंबर रथसमूहाधिपतींचाही अधिपति होता. सर्व युद्धांत निष्णात असलेला तो दैत्य दिव्य रथावर चढला. त्याचे डोळे लाल, बाहु मोठे, कुंडलें तापविलेल्या सोन्यासारखीं उत्तम, शरीर मेघासारखें, माळा व अनुलेपनें दिव्य अशीं होतीं. विजेच्या ज्योतीसारख्या अथवा सूर्याप्रमाणें कांतिमान् मणिरत्नांनीं विचित्रित व श्रेष्ठ वैदूर्यांनीं शोभिवंत अशा मुकुटानें व सोन्याच्या मोठ्या शोभिवंत कवचानें तो दैत्य संध्याकाळच्या अभ्रानें झांकलेल्या श्रीमान् अस्ताचलाप्रमाणें दिसत होता. नानाप्रकारें युद्ध करणारे, बलिष्ठ, व काळाप्रमाणें असलेले तीस लक्ष दैत्य शंबरामागून आले. पांढऱ्या रंगाचे शोभिवंत हजार घोडे जुंपलेला, दीप्त, युद्धांत शोभणारा, क्रौंचध्वजयुक्त, वैदूर्य व सोन्याच्या जाळ्या लाविलेला, नानापक्ष्यांच्या रचनेनें चित्रविचित्र, विजेसारख्या कांतीचा, भयंकर आवाजाचा, चांगल्या वेगाचा अशा रथावर चढून तो दैत्य शोभायमान दिसूं लागला.

~~~~~~

# अध्याय एकावन्नावा.

—:०:—

## दैत्यपक्षीय सैनिक वर्णन.

वैशंपायन सांगतातः—हिरण्यकशिपूचा परम दुर्जय पुत्र जो अनुऱ्हाद नांवाचा वीर्यवान् दैत्य तो युद्धाच्या लालसेनें, चार चाकांच्या, तीन नल्व[1] मानाच्या, सिंहमुख व सरळ जाणारे महाबलाढ्य घोडे जुंपलेल्या, धांवांचा आवाज मेघांप्रमाणें गंभीर असलेल्या— अशा रथामधून, पर्वत, वनें व उपवनें यांसह सर्व पृथ्वी कांपवीत निघाला. घोर ध्वनि करणारे दैत्यांचे शुभ ओघ अनुऱ्हादाच्या मागून चालले. सुवर्णमालायुक्त कोटि रथ त्यामागून चालले होते. तसेंच, परीघ, गोफणी, भल्ल, पाश, परशु व विविध आयुधें हातांत धारण केलेले, शूळ व मुद्गर हातीं असलेले, सोन्याचीं जाळीं व मणी यांनीं विभूषित, रथ व विचित्र कवचें यानीं सज्ज, असे महा असुर त्याच्यामागून चालले. तेव्हां विशाळ व उंच पर्वतासारख्या आकाराच्या, सोन्यानें अंग चित्रित केलेल्या, सत्व व बळ यांस शोभणाऱ्या, व अप्रतिम स्वरूपाच्या रथामध्यें बसलेला, तो दैत्याधिपति शोभूं लागला. बळवान्, अग्नीप्रमाणें कांतिमान्, सर्व अस्त्रांत कुशल, व पवित्र असा विरोचन मोठ्या रथसमूहानें युक्त होऊन निघाला. व्यूहांचा उपयोग जाणणारा आणि शास्त्रीयज्ञान व अनुभव यांचें तत्त्व जाणणारा तो असुरश्रेष्ठ बलीचा पिता देवांतील इंद्राप्रमाणें मान्य होता. तो दैत्येंद्र सर्व आयुधांनीं युक्त, क्षुद्र घंटांच्या समूहानें भूषित, सत्वर गमन करणाऱ्या मुख्य हजार घोडे जुंपलेल्या रथावर बसून साक्षत् दुसऱ्या मेरूप्रमाणें शोभला. चारी बाजूंस क्षुद्र घंटांचा समूह लाविलेल्या, गजेंद्रध्वजानें सुशोभित,

१ नल्व हें चारशें हाताचें माप आहे.
~~~~~~

संध्याकाळच्या अभ्रांच्या वर्णासारखा वर्ण असलेल्या पताकांनीं अलंकृत, प्रवाळ व सोनें यांच्यायोगें ज्यावर वेलबुट्टी काढीलेली आहे अशा व लोंबणाऱ्या मोत्यांनीं सुशोभित, अशा रथावर बसून तो किरीटमाली महा-असुरेंद्र युद्धार्थ निघाला. विरोचनाचा धाकटा भाऊ व शत्रुनाशक असा कुजंभ नामक दानव मणि व सोनें यानें भूषित अशा अनेक सहस्त्र रथांनीं व मदानें गर्वित झालेल्या असुरांनीं परिवेष्टित झाला होता. त्या असुरांच्या हातांत भाले, पाश व गदा होत्या व ते सर्व युद्धाची वाट पहात होते. पर्वतासारख्या आकाराचा व काजळाच्या मध्यभागाप्रमाणें काळाकुट्ट असा तो दैत्य मोठ्या तेजस्वी व सर्व प्रकारच्या रत्नांनीं विचित्र केलेल्या कवचानें आवृत झाला होता. किरणवान् चंद्राप्रमाणें मोठ्या दीप्त आकाराच्या रथानें तो युक्त होता. सोन्याच्या महातालवृक्षाच्या केतूनें तो रथामध्यें बसलेला दैत्य मेरुपर्वतावरील सूर्यासारखा शोभत होता. तो रणपटु, अतिशय वीर्यवान्, सत्ववान् व बुद्धिवान् कुजंभ, वृत्रहंता देवेंद्र जसा देवांनीं परीवेष्टिला जातो त्याप्रमाणें, असुरगणांनीं वेष्टित होऊन, देवांशीं लढाई करण्याच्या हेतूनें लवकरच पुढें सरसावला. पर्वतच आयुध असलेला, जात्याच भयंकर व भयंकर चेहऱ्याचा असिलोमा दानव भयंकर शरीर धारण करून युद्धास निघाला. तो रौद्र, गाडीच्या चाकांसारख्या मोठ्या डोळ्यांचा, महाकाय, महाबल, काळें वस्त्र परिधान केलेला, मोठ्या दाढांचा, किरीटवान् व तांबड्या मुखाचा दैत्य—वृक्ष व पर्वत यांनीं लढाई करणाऱ्या, नाना रूप धारण करणाऱ्या, देवांशीं शत्रुत्व करणाऱ्या व गर्वानें फुगलेल्या हजारों दैत्यांनीं वेष्टिला होता.

ते दैत्य हातीं शूळ घेऊन मेघसमूहाप्रमाणें आकाशास आच्छादित करीत आकाशांतून इकडे तिकडे फिरूं लागले. सोन्याचीं पदकें धारण करणारे ते पावसाळ्यांतील उंच अशा काळमेघांप्रमाणें दिसत होते. अनायुषेचा पुत्र वृत्र नांवाचा महासुर होता. तो देवांचा शत्रु, महाकाय, तांबड्या तोंडाचा, लोंबणाऱ्या उदराचा, दीप्तजिव्हेचा, हिरवट श्मश्रूचा, ऊर्ध्वरोमा, मोठ्या हनुवटीचा, निळ्या अंगवर्णाचा, तांबड्या तोंडाचा, किरीटवान्, तांबड्या वस्त्राचा, आजानुबाहु, अक्राळ विक्राळ, पांढऱ्या दाढेचा, भीतिकारक, महामायावी, भयंकर, सोन्याच्या बाहुभूषणांनीं भूषित, मोठ्या व मण्यांनीं चित्रविचित्र केलेल्या कवचानें आच्छादिलेला, सोन्याची माळ धारण केलेला, रौद्र, चक्राकार केतु असलेला व क्षांतिरहित होता. शेंकडों क्षुद्र घंटांनीं नाद करणाऱ्या, सोन्यानें अलंकृत केलेल्या, हजार घोडे जोडलेल्या आणि तांबड्या ध्वज व पताका यांनीं युक्त असलेल्या दिव्य रथावर बसून दैत्यांचा आनंद वाढविणारा तो वृत्रासुर मोठ्या रथसैन्यानें युक्त होऊन युद्धास निघाला. तापविलेल्या सोन्याप्रमाणें पिंगट वर्णाचे व फुललेल्या कमलाप्रमाणें सुंदर ज्याचे नेत्र आहेत असा, तो पांढरे दांत असलेला असुरांच्या सैन्याचा सेनापति (दैत्य) रथासनावर बसला असतां शोभला. सूर्यमंडलाप्रमाणें उदय पावलेला एकचक्र राक्षस, कालचक्राप्रमाणें भयंकर व चक्रायुध हरीसारखा उद्योगी होता. तो सर्व पोलादी व चकाकणाऱ्या दिव्य रथावर बसून लोखंड व शिला हींच आयुधें असलेल्या दृप्त दैत्यगणांनीं वेष्टित होऊन निघाला.

त्याच्याबरोबर नानाप्रकारचें युद्ध करणारे ऐंशी हजार रथी होते; ते सर्व काळांतकासारखे, रक्तनेत्र व महाबलाढ्य होते. ते लोखंडी व सोन्याच्या उत्तम कवचांनीं

संनद्ध होते. ते अंतरिक्षांतील निळ्या मेघांप्रमाणें विराजत होते. ते सारे कालांतकासारखे दिसणारे, धीर, युद्धांत अजिंक्य, समुद्राच्या तळाप्रमाणें गंभीर, निळ्या तोंडाचे व दुरासद असुर चालले असतां, मर्यादा उल्लंघून चाललेल्या समुद्राप्रमाणें दिसले. ते भयंकर मायेचे, मोठ्या धिप्पाड शरीरांचे, किरीटयुक्त, सोन्यानें शरीर भूषविलेले, व आयुधांनीं हात झळकत असलेले राक्षस, आकाशांत पंख असलेले पर्वत ज्याप्रमाणें जातात त्याप्रमाणें जाऊं लागले. बलीच्या पुत्रानें वीर्यवान् व महाअसुर जो वृत्र भ्राता त्याला 'देवसैन्याचा वध करावयास तूं तयार हो' अशी आज्ञा केली. हेममाळी असें त्या वृत्राच्या बंधूचें नांव होतें. तो मोठ्या दाढांचा, मालाधारी, सुंदर कुंडलें घातलेला, लाल वस्त्रें व पुष्पें धारण केलेला, रागीट युद्धांत अजिंक्य, मोठ्या वाटोळ्या गरगरीत डोळ्यांचा, किरीटवान्, धनुर्धर, सिंहासारखा पराक्रमी, हत्तीसारखा मदोन्मत्त, तालप्रमाण दीर्घ महाधनुष्य व सुंदर बाण धारण केलेला, असा होता. त्यानें त्या महावेगाच्या धनुष्याचा टणत्कार केल्याबरोबर विजेच्या कडकडाटाप्रमाणें आवाज झाला. ज्याला गाढव जुंपले आहेत, व ज्याचा सर्पयुक्त ध्वज आहे अशा रथावर बसलेला तो संध्याकाळच्या सूर्याप्रमाणें शोभला. सोन्याच्या पट्ट्यांनीं भूषित केलेल्या, कुट व मुद्गर यांनीं भरलेल्या व जलपूर्ण मेघांप्रमाणें दिसणाऱ्या अनेक हजारों रथांनिशीं तो दैत्येंद्र, त्या युद्धाच्या सुरवातीस निघाला. सारांश, वायूप्रमाणें वेगवान्, विशालवक्षाचा प्रफुल्लित कमलाच्या सुंदर गाभ्याप्रमाणें गौरवर्णाचा, व ज्याचा प्रभाव देवांच्या लक्षांत आला आहे असा तो दैत्य लवकरच उत्कृष्ट रथांत बसून गेला.

सिंहिकेचा मुलगा राहु नामक महासुरहि अक्राळविक्राळ, पर्वताकृतीचा, शंभर डोक्यांचा, शंभर पोटांचा, पिंवळ्या माळा व वस्त्रें धारण करणारा, सोन्यानें विभूषित, तुळतुळीत वैदूर्याप्रमाणें कांतिमान्, पद्मपत्राप्रमाणें कांति असलेल्या डोळ्यांचा असा होता. सर्वस्वी कांचनानें युक्त, मण्यांच्या जाळ्यांनीं शोभिवंत केलेल्या शेंकडों पताकांनीं व्यापलेल्या व चांगले घोडे जुंपलेल्या अशा दिव्य रथावर तो महावीर्यवान् दैत्य चढला, व सारी पृथ्वी जणूं काय कांपवीत मोठ्यानें ओरडला. त्याचा रथचा दिव्य सोनेरी केतु मयानें बनविलेला होता. त्याचें मोराच्या पिसांसारखें पोलादी मोठें कवच होतें. भयंकर वेग व आवाज असलेल्या दिव्य रथांनीं व शुभ व अनेक आयुधांनीं युक्त अशा असुरांनीं सेविला गेलेला तो महाबलाढ्य दैत्यगणांचा पति, गजेंद्रासारखा गमन करणारा, महा असुरांमध्यें अति त्वरेनें चालणारा असा विभु, दीप्तिमान् सूर्य जसा अस्ताचलाप्रत जातो त्याप्रमाणें शत्रूंवर चाल करून गेला. दनूचा वंश वाढविणारा कश्यपाचा पुत्र विप्रचित्ति हा तेजानें ब्रह्मदेवाप्रमाणें होता. त्यानें हजारों यज्ञ केलेले होते; तो वेदवेत्ता, तपस्वी, ब्रह्मदेवांनीं वर दिलेला, ब्रह्मदेवास वर दिलेला, महाद्युति दैत्य ब्रम्ह्याप्रमाणें ईशित्व, वशित्व, प्राकाम्य (इ०), इत्यादि ऐश्वर्यगुणांनीं संपन्न व स्वतः ऊर्जित असा होता. हा मलाबढच दैत्य, पुत्र व पौत्र यांच्यासह युद्धास तयार झाला. ते सारे मायावी, शूर, कृतास्त्र व युद्धांत अजिंक्य होते. ते सारे कमलाच्या रंगाचे व हेमकूटासारख्या उंचीचे होते. ते सारे रुप्यासारखे व कैलासाच्या शिखरांप्रमाणें शोभणारे होते. त्यांचे सारे मायामय रथ मयानें निर्मिले होते. ते रथ फिरत असतां शरत्कालांतील मेघांप्रमाणें शोभले. ते सारे हंसध्वजाचे, पांढरे व श्वेतदंडानीं उंच शोभणारे होते. ते दैत्य श्वेतां-

बरधारी व श्वेत माळा घातलेले होते. त्यांच्या छत्र्या पांढऱ्या असून ते पांढऱ्या कुंडलांनीं भूषित होते. त्यांच्या छातीवर मोत्यांचे हार पडले होते व त्यामुळें ते स्वर्गातील देवेंद्राप्रमाणें दिसत होते. ते मोठ्या ग्रहांसारख्या कांतीचे, शत्रूंच्या अंगावर कांटा आणणारे, रक्त व विचित्र वस्त्रें धारण करणारे, व विचित्र अलंकारांनीं भूषित असे होते. तो वीर्यवान् दैत्य त्रैलोक्यविजय नामक रथावर चढून आला. तो रथ कैलासशिखराच्या आकाराचा, अष्ट नल्वांइतका लांब, हजार पांढरे तेजस्वी घोडे जुंपलेला, शेंकडों पताका लावलेला व नाना-आयुधांनीं परिपूर्ण असा होता. त्या दैत्येंद्राचें पांढरें छत्र विशाल व चंद्राच्या व कुंदपुष्पाच्या सारखें पांढरें होतें. त्या दैत्येंद्रावर तें धरिलें असतां श्वेताद्रीवरील चंद्रासारखें भासत असे.

दानवमुख्य केशी, कुटिल नेत्र व चेहरा तांबडा असलेला, निळ्या मेघांच्या समूहासारख्या कांतीचा, देहधारी कालच असा, महाग्रहाच्या सारख्या कांतीचा, शत्रूंच्या अंगावर कांटा आणणारा, चित्र माल्यांबरधर, रक्त ( तांबड्या ) आभरणांनीं भूषित, शंभर डोळ्यांचा, शंभर हातांचा, हिरवट श्मश्रूचा, महाबलाढ्य, शंकूसारख्या कानांचा, महानाद, व शरीरानें भयंकर दिसणारा असा होता. कोटि घंटांनीं वाजत असलेल्या, महामेघासारख्या आकाराच्या, दिव्य रेडे जुंपलेल्या, निळ्या केसराच्या कांतीच्या, मोठ्या उष्ट्रध्वजानें व नाना वर्णांनीं विचित्र अशा पताकांनीं शोभिवंत, अशा उत्तम रथावर बसून तो आला. तो असुरेंद्र देवांशीं युद्ध करण्यास निघाला असतां त्याबरोबर ९२ हजार उग्र तेजाचे रथ निघाले. तो निघाला असतां ते दैत्य काळ्या काजळाच्या ढिगांसारखे, मुखांत अर्धचंद्रासारख्या दाढा असलेले व बगळ्यांनीं युक्त अशा मेघासारखे दिसत होते. ते त्या असुरोत्तमाचें वैदूर्य व सोनें यांनीं चित्रविचित्र केलेलें, विजेसारख्या कांतीचें, व सूर्यासारखें तेजस्वी किरीट, दावानलानें पेटलेल्या पर्वताच्या शिखराप्रमाणें दिसत होतें. श्रीमान् देवनिहंता वृषपर्वा असुर, मेरुपर्वताच्या शिखरावर जसा सूर्य चढतो त्याप्रमणें दिव्य रथावर चढला. तो महारथ प्रवाळ व सोनें यांनीं विचित्र केलेल्या कूबराचा, भारसहन करण्यास समर्थ, मोठ्या किमतीचा व चांगला अलंकृत असा होता. तो रजत व सोनें यांच्या कुंडलांनीं युक्त, सूर्य, नक्षत्रें व वीज यांच्यासारख्या कांतीचा, केयूरयुक्त अंगदें हातांत बांधलेला व हजार तारांच्या कवचानें युक्त होता. तसेंच, युद्धांतील चित्रविचित्र आभरणांनीं युक्त असा तो मध्यान्ह काळच्या सूर्यासारखा दिसत होता. तो तल व अंगुलित्र बांधलेला, बळानें उत्कट, पळसाच्या फुलांप्रमाणें लाल नेत्रांचा, वाटोळ्या मोठ्या डोळ्यांचा, महाबलाढ्य दैत्य, सुंदर वं विचित्र सोन्याचें धनुष्य घेऊन उभा राहिला. तेव्हां महा असुरांचा इंद्र जो बलि तो महासुरांनीं वेष्टित होऊन रथावर चढला. तो रथ वैडूर्य व सुवर्ण यांनीं युक्त, विशाल, विजेच्या कांतीचा, सोळा नल्वांइतका लांब व हत्तीसारखीं तोंडे, व विकृत शरीरें असलेल्या, सोन्यानें वक्षःस्थल शोभिवंत केलेल्या, व पावसाळ्यांतील मेघांप्रमाणें ओरडणाऱ्या हजार दैत्यांनीं युक्त होता. देवरथासारख्या कांतीचा महारथ हजार मायांच्या मयासुरानें निर्मिला होता. त्याच्यावर कृत्रिम हरिणांच्या क्रीडेची रचना करून त्यास चित्रविचित्र केलेलें होतें. त्या दिव्य रथाच्या मागून दुसरे अनेक दिव्यरथ येत होते. त्यावर क्षुद्र घंटा लाविलेल्या होत्या. तो अति निर्मल व सुविस्तृत रथ सुवर्णमय शेंकडों पद्मांनीं अलंकृत होता. त्या बलीनें सोन्याच्या

विचित्र फुलांनीं गुंफलेली विजयकारक माळ जयाकरितां घातली होती. प्रभेनें विचित्र अशी ती माळ गळ्यांत घातली असतां तो बलि त्या वेळीं त्या सर्व समृद्धियुक्त विशाल भुजांनीं, महाकिरण ज्योतींनीं आकाशांतील सूर्याप्रमाणें शोभला. सर्व असुरांना हाराप्रमाणें असलेली ती माळ त्या वेळीं दुर्गेनेंच त्याच्या गळ्यांत घातली. त्यामुळें सर्व प्रकारच्या संपत्तीनें युक्त असा तो विरोचनपुत्र बलि शरत्कालीन चंद्राप्रमाणें शोभला अथवा अग्नीच्या योगानें दीप्त झालेल्या मेरूच्या तटांनीं सूर्याशीं संयुक्त झालेलें अभ्रजाल जसें दिसतें तसा दिसला. भाले, पाश, सोन्याच्या मुठींच्या तरवारी, दिव्य गदा, वज्रमुखी शक्ति, दिव्यखड, दीप्तबाण व नानाप्रकारचे शरांनीं भरलेले भाते, त्या दैत्यश्रेष्ठाच्या रथावर ठेविलेले होते. ते प्रज्वलित उल्कांप्रमाणें चमकत होते. चामरें व मस्तकांवरील आडव्या माळा धारण करणारे, चांगल्या दाढांचे, सुवर्ण, मोत्यें व मणि यांनीं चित्रविचित्र झालेले, व विनीत असे महासुर रथाच्या वेदिकेवर उभे राहून राजावर चवऱ्या ढाळीत होते. अयःशिरा, अश्वशिरा, दुराप, शिबि, मतंग, विशिरा, अयोनिकुंभ, क्रथन व दानव हे दहा राक्षस त्या दैत्यराजाचे रक्षक होते. शतघ्नी, चक्रें, वज्र व शक्ति हीं हातीं धारण करणारे व वायूसारख्या वेगाचे पायांनीं चालणारे हजारों असुर त्याच्या पुढें जात होते. चांगल्या नादांच्या घंटा, सोन्यानें मढविलेले आडंबर, गर्गर, डिंडिम व मोठ्या आवाजाचे नगारे त्या दैत्याधिपतीच्या प्रयाणसमयीं वाजूं लागले. त्या वीराचा फार उंच, सुवर्णवेदीनें संपन्न, हिरण्मय, दिव्य व मोठ्या पताकांनीं युक्त व सोन्यानें मढविलेला, असा महाध्वज सूर्यासारखा शोभला. सोन्याच्या दांड्याचें छत्र त्यावर धरिलें होतें. सोन्याची मळा त्याच्या वक्षःस्थलावर चांगली शोभली. अनेक असुर त्याच्या सभोंवार चालले होते व दैत्यांतील श्रेष्ठ पुरुषांनीं हात जोडून त्याचा जयजयकार केला. शत्रुवधाकडे चित्त लाविलेल्या पुरोहितांनीं व दुसऱ्याही विद्या व शील यांनीं वृद्ध अशा महात्म्या राक्षसांनीं जप, मंत्र व औषधि यांच्या योगें त्याचें स्वस्त्ययन केलें. त्या बलीनें त्या प्रसंगीं पवित्रपणें ब्राह्मणांस वस्त्रें, शुभ गाई, फळें, पुष्पें, तशींच सोन्याचीं नाणीं इत्यादि दिलीं, तेव्हां तो कुबेरासारखा अतिशय शोभला. सहस्र सूर्य, अनेक किंकिणी, सर्वोत्कृष्ट सोन्याचीं चित्रें, सहस्र चंद्र व दहा सहस्र नक्षत्रें यांनीं युक्त असलेला बलीचा रथ अग्निप्रमाणें भासत होता. दानवांनीं धरलेल्या त्या रथावर बसून महाबलाढ्य, धनुर्धर व बाणयुक्त बलि देवांच्या सेनेस जणूं काय उलटवून सोडीत असतां भयंकर स्वरूपाचा दिसला. तो वेगवान् व वीररथांच्या ओघानें व्यापलेला दैत्यसमुद्र ज्या वेळीं देवांच्या संमुख निघाला, त्या वेळीं युगाच्या अंतीं जलौघांनीं तरंग व लाटा यांनीं कल्लोल झालेल्या महासागराप्रमाणें दिसला. सर्व दैत्यांचीं शरीरें त्रैलोक्यास भीतिप्रद अशीं होतीं. हे राजन्, बलीच्या रथापुढें उंच धनुष्यांच्या दैत्यांचीं महासैन्यें पर्वतयुक्त वनांप्रमाणेंच चाललीं होतीं.

## अध्याय बावन्नावा.

—:०:—

### देवसेनेचा विस्तार.

वैशंपायन सांगतात—हे जनमेजया, तूं दैत्यसैन्याचा विस्तार ऐकलास, आतां पुनः देवसैन्याचा विस्तार आरंभापासून ऐक. भगवान् देवाधिपतीनें देवांस, दिव्य मरुद्गणांस व विश्वेदेवांस आज्ञा केली. आठ वसु, सर्व यक्ष, राक्षस, मोठे नाग, सर्व विद्याधरगण, महाब-

ढाढ्य गंधर्व, महासागर, शैल, महाबलाढ्य रुद्र, यम, कुबेर, जलाधिपति वरुण, महात्मे सिद्ध, मानी पितर, राजर्षि, योगानें सिद्ध झालेले नाना सिद्ध, या सर्वांस देवांस आज्ञा करणारा वीर्यवान् इंद्र आज्ञा करूं लागला कीं, 'तुम्ही सारे दैत्यांचा नाश करावयास सज्ज व्हा.' इंद्राची ही आज्ञा ऐकून सर्व इंद्रतुल्य पराक्रमी, महात्मे स्वर्गवासी युद्धार्थ सज्ज झाले. ते सारे महागजाप्रमाणें मत्त, नानाप्रकारचीं कवचें धारण करणारे, विचित्र कवच व ध्वज असलेले, व हातीं नानाप्रकारचीं आयुधें धारण केलेले होते. त्यांतील कित्येक व्याघ्रावर आरूढ, कित्येक गजांवर आरूढ, कित्येक नागांवर आरूढ, व कित्येक वृषारूढ होते. नेत्र व श्मश्रु हिरवे असलेला इंद्र गजांनीं व्याप्त अशा ध्वजाच्या व हिरव्या रंगाचे घोडे जुंपलेल्या रथावर बसून समरंगणाकडे चालला. सूर्यासारख्या वर्णाच्या, धूळ मुळींच नसलेल्या व चांगल्या रीतीनें धुतलेल्या त्या रथाला स्वतः त्वष्ट्यानें ईश्वराकरितां बनविलेलें होतें. तो रथ सोन्याच्या नकशीनें विचित्र दिसणाऱ्या जाळ्यांनीं व सुवर्णाच्या माळांनीं अलंकृत केलेला होता. दांडी आदिकरून सर्व सामान सुंदर असलेलें, विजेच्या प्रभांनीं सर्वतः ताम्रवर्ण बनविलेलें, व कैलासशृंगाची उपमा शोभणारें हें इंद्राचें वाहन शत्रुसमूहासही निर्दाळण करणारें व अतिशय सुंदर असें होतें. तें सहस्रावधि दीप्यमान तारांनीं खचित, देवयोग्य पुष्पांनीं ज्याचें शरीर पूजिलेलें आहे असें, उंच, सुशोभित ध्वजाचें व अक्षय टिकणाऱ्या आंसांचें वाहन त्या पुरुषोत्तमाच्या योगें अति देदीप्यमान झालें होतें. त्या चमकणाऱ्या अति वेगवान् रथावर बसून शचीपति, लोकपती, सुरेश, वज्रधारी, भुवनरक्षक असा महात्मा महेंद्र निघाला. सहस्र तारा असलेलें व अग्नि वसूर्य यांच्या सारख्यां कांतीचें कवच घालून सूर्यासारखा देदीप्यमान् किरीट व सोन्याची वैजयंती माळ त्यानें घातली. त्वष्ट्यानें केलेलें, सूर्यतुल्य किरणांनीं उज्वलित, अतितीक्ष्ण, घोर व निर्मळ धारेनें युक्त, महासुरांच्या रक्तानें भिजलेलें, उग्र, व शंभर पेरांचें वज्र त्यानें हातीं धरलेलें होतें. महाग्रहांसारखे दोन अशनि, अमोघ व दीप्त अशा उग्र शक्ति, व फार मोठें प्रतापी इंद्रचक्र घेऊन शक्र युद्धास निघाला तो सहस्रनयन भूताधिपति,सनातनांचाही सनातन, देवाधिपति महाव्याघ्रचर्मानें विचित्र झालेलें खड्ग घेऊन चालला. पूर्वी अमृताकरितां क्षीरसागर मंथून काढिलेलीं, देवासुरांस सारखींच पराभूत करणारीं, सोम, सूर्य, नक्षत्रें व विद्युत् यांप्रमाणें कांति असलेलीं, व अदितीनें दिलेलीं अशीं उत्तम भूषणरूप रत्नकुंडलें, युद्धास निघालेल्या इंद्रानें आपल्या कानांत घातलीं होतीं. त्यांनीं भूषित झालेला सहस्रनयन इंद्र सर्व दिशा व उपदिशा यांस प्रकाशित करिता झाला. सहस्र नेत्रांनीं चित्रविचित्र दिसणारा हरि जो प्रभु देवेंद्र तो युद्धाभिमुख झाला असतां ज्याप्रमाणें शरत्काळीं नभस्तल शुभ्रमेघसमूहानें व सहस्रावधि नक्षत्रांच्या योगानें विचित्र झाल्याप्रमाणें दिसतें, त्याप्रमाणें दिसूं लागला. अत्रि, वसिष्ठ, जमदग्नी, और्व, बृहस्पति, नारद व पर्वत तो उत्कृष्ट वीर्यवान् व सत्वसंपन्न देवेंद्र जाऊं लागला असतां त्याची विपुल वचनांनीं व जयाशीर्वादांनीं स्तुति करूं लागले. आदित्यासारखी दीप्ति असलेल्या त्या युद्धार्थ निघालेल्या इंद्राच्या मागून देवगण, विश्वेदेव, मरुद्गण, साध्य व सर्व आदित्य चालले. मातलीनें लगाम धरलेले पुरंदर इंद्राचे घोडे देवेश्वरास वाहून नेत आकाशांतून जणूं काय पायांनींच चालत असल्यासारखे निघाले.

अक्षय्य पुण्यलोक मिळविलेले सर्व ब्रह्मर्षि, महर्षि, व राजर्षि, शत्रूंचा नाश करणाऱ्या, तेजस्वी व सहसा रागानें लाल होणाऱ्या इंद्राचे मागून चालले. शूल, परशू, दीप्त धनुष्यें, व विचित्र वज्रें घेऊन व सूर्यासारखीं प्रकाशमान सोन्याचीं कवचें घालून कुबेर, हजार घोडे जोडलेल्या, अमूल्य, दृढ व दीप्त रथावर बसला; आणि गदा हस्तांत घेऊन रणांगणीं निघाला. अग्नि व धूम यांच्याप्रमाणें शरीरें असलेले, व विशाळ व नानाप्रकारच्या आयुधांनीं ज्यांचे हात झळकत आहेत असे ते निशाचर राक्षस श्रेष्ठ रुद्राचा मित्र व विश्रवणाचा पुत्र अशा त्या राजाच्या पुढें चालले. खललेल्या अंजनाप्रमाणें काळा रंग असलेले व लाल नेत्रांचे ते राक्षस त्या देवांस वेढूं लागले. ज्यांच्या हातीं पाश, गदा व खड्ग आहेत असे उत्तम यक्ष यक्षपति जो कुबेर त्याचें रक्षण करूं लागले. पुण्यवान्, प्रभु, प्राणांचा स्वामी, जितेंद्रिय, व धर्मात्म्यांतील श्रेष्ठ असा जो यमराज तो विद्युन्मालेप्रमाणें भास्वर सूर्यासारख्या व शंभर घोडे जोडलेल्या रथांत बसला. त्या लोकपालामागून पापनिर्मुक्त व तपानें तेजस्वी असे पितर, व भुवनांत मुख्य, अतिभयंकर आणि नाना आयुधांनीं ज्यांचे हात गुंतले आहेत असे भूत चालले. तो देव, ज्याचें निग्रहात्मक प्रयोजन निश्चित आहे व जें लोकांस अंकुशासारखें आहे असें दंड नावांचें महास्त्र हातीं घेऊन व गळ्यांत सुवर्णकमलांची सुंदर माळ घालून सज्ज होऊन राहिला. लाल व धूम्रवर्ण नेत्रांचा तो यमराट् अस्थींतील मेद, मांस व रक्त यांनीं भिजलेला, सर्व असुरांच्या मृत्युरूप, विक्राळ, तेजोमय व भयंकर आकृतीचे मुद्गर फिरवीत उभा राहिला. हिरव्या श्मश्रूंच्या व उदार सत्वाचा तो व्याधिपति यमराज अनेक हजार व्याधींनीं युक्त होऊन युद्धास निघाला. त्या वेळीं त्यानें महा असुरांच्या मारणाविषयीं निश्चयच केला. नंतर असुरांची घमेंडी जिरविणारा महात्मा वरुण, तीन मस्तकांनीं शोभणारे असे फार मोठे सर्प जोडलेल्या, सुवर्णखचित, व कुंद व चंद्रांप्रमाणें शुभ्र असलेल्या रथांत बसून युद्ध करावयास निघाला. त्याचें शरीर वैडूर्य, मोतीं, व रत्नें यांनीं भूषविलेलें होतें. तो स्वतः तेजोमय होता. त्याच्या हातीं पाश होते. रुप्याच्या अंगदांनीं त्याचे बाहु बांधिले होते. असा तो देव असुरवधार्थ निघाला. कैलासशिखरासारखा, अप्रमेय, समुद्रपति, अमृतरक्षक महात्मा वरुण आपले पुत्र जे महासर्प त्यांकडून उत्तम प्रकारें राखिला जाऊन सूर्यासारख्या तेजस्वी रथानें जाऊं लागला.

याप्रमाणें, युद्धास निघालेल्या, उदारसत्व, नभस्तलांतील चंद्राप्रमाणें अति सुंदर दिसणाऱ्या महाप्रभावशाली देवास, आनंदानें आंगावर रोमांच उठलेल्या व हात जोडलेल्या भूतांनीं पाहिलें. धाता, अर्यमा, अंश, भग, विवस्वान्, पर्जन्य, मित्र, चंद्र, उत्कृष्ट विश्वकर्मा, त्वष्टा, पूषा, व प्रत्यक्ष स्वर्गांतील इंद्र हे रणाकडे निघाले. उरःस्थळास आच्छादित करणाऱ्या, ध्वज व क्षुद्र घंटा यांनीं युक्त असलेल्या, वैडूर्य व सोन्याच्या नाण्यांच्या माळा घातलेले घोडे जुंपलेल्या व इंद्राच्या रथाप्रमाणें दिसणाऱ्या रथांवर ते देव चढले. कित्येक सूर्यासारखीं, कित्येक अग्निज्वालेसारखीं, कित्येक चंद्रकिरणांसारखीं, कित्येक विद्युत्समूहाच्या प्रकाशासारखीं, कित्येक नीलमेघाकृति व कित्येक पोलादाच्या रंगाची, महाप्रभायुक्त, दिव्य व त्वष्ट्यानें केलेलीं चकचकीत कवचें घालून आणि गळ्यांत सुवर्णपुष्पांच्या माळा घालून ते सर्व जल व वायु यांसारखे वेगवान् देव जाऊं लागले. महानुभाव व उत्तम रूपसं-

पन्न धर्मिश्रेष्ठ दोघे अश्विनीकुमार सुवर्णानें विचित्र झालेल्या रथावर आरूढ होऊन रणांत गेले. त्या दोघांचीही अंगकांति सोन्यासारखी होती. भानूचे पुत्र सर्व वसु व महा बलाढ्य इतर देव दैत्यांच्या वधाकरितां धिप्पाड हत्ती व रथ यांवर बसून व अतिशय शुभ अस्त्रें हातीं घेऊन निघाले. तसेच सर्व अरुण, धूम्रवर्ण रुद्र शुभ्र व धिप्पाड बैलांवर बसून निघाले. ते महाबलाढ्य, सर्वगुणसंपन्न, दीप्तस्वरूप, उज्ज्वळ अंगकांतीचे, नाना आयुधांनीं गुंतलेल्या हातांनीं सर्व जग जणूं काय जाळणारे, सोन्याच्या दागिन्यांनीं अलंकृत, व विद्युद्युक्त मेघांप्रमाणें दिसणारे रुद्र सैन्यासह युद्धार्थ निघाले. तपानें तेजस्वी, उत्तम वीर्यवान्, सूर्य किरणांसारख्या वर्णाचे, ते विश्वेदेव सैन्यांसह निघाले. ते युद्धांत अजिंक्य व बलोत्कट होते. त्यांनीं आपल्या गळ्यांत हजार कमळांच्या माळा घातल्या होत्या. उत्तम घोडे जोडलेल्या, सोनेरी रंगाच्या, व वैदूर्य, मोतीं व रत्नें यांच्या वेलबुट्टींनीं चित्रविचित्र झालेल्या अशा रथांनीं ते निघाले. ते रथ नानाप्रकारच्या आकृतीनीं युक्त होते. हालणाऱ्या, तेजोमय, सुवर्णानें चित्रविचित्र, व अतिनिर्मळ अशा शुभ्र छत्रांच्या योगें ते अग्नीसारखे दिसत होते. छातीभर उंच व ध्वज व क्षुद्र घंटा यांनीं युक्त अशा रथांनीं, वायूसारख्या वेगवान् घोड्यांनीं, व कैलासशिखरांसारख्या मोठ्या व महाबलाढ्य दिग्गजांनीं, युक्त होत्साते हातांत उग्र आयुधें धारण करणारे ते साध्य चार युगांच्या अंतीं संचार करणाऱ्या प्रदीप्त महा उल्कांप्रमाणें निघाले. मोठ्या प्रभावाचें सैन्य ताब्यांत असलेले, व अतिशय तेजस्वी चेहऱ्यांचे ते साध्यदेव जाऊं लागले असतां त्यांचीं शरीरें सोन्याच्या दागिन्यांनीं शोभिवंत होतीं. गंगेच्या ओघाप्रमाणें अगाध, अनंत सैन्यौघांनीं दिशोपदिशा प्रकाशित करणारे ते महाबलाढ्य, विजयिश्रेष्ठ देव ओंठ व भुजा पुष्ट असलेले, अति गर्विष्ट, व अग्नि-सूर्यांप्रमाणें प्रभाववान् होते. ते ब्रह्मवेत्त्यांनीं सहवास केलेले, इंद्रादि सकळ देवांकडून पूजिले जाणारे, व असुराधिपांच्या वधाकरितां गंधर्व संघांनीं अनुसरले जाणारे होते. वैदूर्य, वज्र, स्फटिक यांचीं चित्रें काढिलेल्या सुवर्णध्वजांनीं ज्यांचे रथ अलंकृत केलेले आहेत, ज्यांचीं भूषणें उत्तम आहेत, दैत्येंद्राच्या नाशाकरितां जे अतिशय भूषित झालेले आहेत अशांचें तें रूप फार शोभलें. रणाविषयीं उत्कट अशा स्वप्रभांनीं, अंधकार घालविणाऱ्या कवचांच्या प्रकाशांनीं व ध्वजांच्या योगें उत्तम, महा उज्वल, व अति चकचकीत अशा आपल्या शरीरांच्या प्रभांनीं, साध्यांसह ते सर्व श्रेष्ठ देव शोभूं लागले. त्यांनीं शंख वाजविले व सिंहनाद केले; व महारथांवर बसलेले ते अति बलाढ्य देव शत्रुसैन्यावर चाल करून निघाले. उग्र देहांचे ते देव हातीं महास्त्रें घेऊन महा असुरांना मारण्यासाठीं निघाले. ते सर्व राक्षसांप्रमाणेंच मोठे, अति वीर्यवान्, बलोत्कट, व युद्धाविषयीं कृतनिश्चयाचे होते. महामेघांसारख्या वर्णाचे, चक्रेंच आयुधें असलेले, मेघनादाचे, इंद्रध्वजतुल्य असे ते महाबलाढ्य देव दैत्यांच्या संहार करणाऱ्या गदा हातांत घेऊन निघाले. त्या रणोत्कट देवांनीं रक्तासारख्या लाल चंदनाची उटी अंगास लाविली. सुवर्णपुष्पांच्या माळा व वस्त्रें यांनीं त्यांनीं आपलीं शरीरें भूषविलीं. ते युद्धांत निष्णात होते. त्यांचे दंड, अस्त्रें व पराक्रम हीं उत्तम होतीं. ते बळानें उत्कट होते. क्रोधानें ते आपले नेत्र गरगर फिरवीत होते. सुवर्णकमलांच्या माळा घातलेले, यथेच्छ नानाप्रकारचीं रूपें घेणारे, व खड्गप्रभेनें आपले खांदे काळे करणारे देव इंद्राला वेष्टून उभे राहिले.

वैदूर्य व सुवर्ण यांनीं सुंदर बनलेलीं, महाप्रभाशाली, व दैत्यास्त्रांचें निवारण करणारीं कवचें अंगांत चढवून शत्रूंचा आघात सहन करणारे देव युद्धार्थ जाऊं लागले. उभारलेल्या, सुवर्ण वेदींनीं संपन्न, व सूर्यकिरणांप्रमाणें चकाकणाऱ्या उत्कृष्ट ध्वजांनीं उग्र भासणारी देवसेना युद्धामध्यें सिंहनाद करीत निघाली. युद्धाकरितां आलेल्या त्या असुराधिपतीला मारण्यासाठीं जाणाऱ्या देवांचें तें येथें वर्णिलेलें सैन्य फारच मोठें व प्रभावशाली होतें.

## अध्याय त्रेपन्नावा.

—:०:—

### देवदैत्यसंग्राम.

वैशंपायन सांगतातः—त्यानंतर असुर व देव यांचें युद्ध सुरू झालें; देवासुरांच्या योगानें आकुल झालेलें हें युद्ध युगांतसमयीं वेलेचें उल्लंघन करून एकमेकांस जाऊन भिडणाऱ्या दोन समुद्रांप्रमाणें वाटलें. नाना आयुधांनीं शरीरें झळकत असलेले, लांब धनुष्यांचे, रणोत्सुक, महाबल, हत्तीच्या सोंडेप्रमाणें बाहु असलेले, दुर्जय, मेघांच्या गडगडाटाप्रमाणें नाद असलेले, अकस्मात् धनुष्यें कानापर्यंत ओढणारे, सूर्याप्रमाणें चमकणारीं चक्रें, भयंकर वज्रें, खड्ग, वज्रमुखशक्ति, सोन्याच्या पट्ट्यानें मढविलेल्या मोठ्या गदा, लोखंडी कार्मुक ( धनुष्यें ) व मुद्गर, तेजस्वी शूल आणि वृक्ष धारण केलेले, शेंकडों शूर रणांत उभे राहून भयंकर नाद करूं लागले.

इतक्यांत परस्परांस मारणाऱ्या देवदानवांचीं द्वंद्वयुद्धें सुरू झालीं. महाबल, देवश्रेष्ठ आणि सावित्र असें ज्यास म्हणतात तो मरुतांतील पांचवा देव बाणासुराशीं लढूं लागला. अनायुषेचा बल नामक पुत्र महा असुर व उग्र असून तो ध्रुव नामक वसूशीं लढूं लागला. असुरश्रेष्ठ नमुचि धर नांवाच्या देवाशीं लढूं लागला. ते दोघेही असुर व देव यांचे, श्रेष्ठ व प्रख्यात विश्वकर्में होते. महादैत्य पुलोमा वायूशीं लढत होता. पर्वताकृति तो राक्षस सैन्यासह सज्ज होऊन लढूं लागला. हयग्रीव दैत्य पूषादेवाशीं लढला. तो देव शूर, अमर्याद बलवान् व सूर्यासारखा तेजस्वी होता. महा मायावी, महादैत्य, व महा असुर जो शंबर तो तेव्हां युद्धदुर्मद होऊन भगदेवाशीं लढूं लागला. शरभ व शलभ हे दोघे दैत्यांतील चंद्रसूर्य होत. ते शिशिरास्रवान् ( थंडकिरणरूपी ) अति बुद्धिमान् सोमाशीं लढूं लागले. बलवान् विरोचन, बलाढ्य बलीचा पिता, विष्वक्सेन नांवाच्या साध्यदेवाशीं लढला. हिरण्यकशिपूचा पुत्र महातेजस्वी कुजंभ प्रास ( भाला ) या आयुधानें लढणाऱ्या अंशाशीं लढला. हे विभो, असिलोमा बलाढ्य मारुताशीं युद्ध करूं लागला. तेजस्वी चेहऱ्याचा, अति विक्राळ, पर्वतानें लढणारा—असा अनायुषेचा पुत्र वृत्र महासुर युद्धांत देववैद्य जे अश्विनीकुमार त्यांच्याशीं लढूं लागला. हातीं चक्र धारण करणारा दुर्धर्ष एकचक्र दैत्य दितिजारि नांवाच्या साध्यदेवाशीं लढला. मद्यानें आरक्त नेत्र झालेला वृत्रभ्राता, बलाढ्य महा असुर बल, मृगव्याध रुद्राशीं लढूं लागला. विक्राळ आकृतीचा, शंभर मस्तकांचा, महोदर राहु सज्ज होऊन अजैकपादाशीं रणांत लढूं लागला. वर्षाकाळच्या मेघांप्रमाणें कांति असलेला दैत्यश्रेष्ठ केशी समरांगणांत भयंकर कुबेराशीं लढूं लागला. वीर्यवान् विश्वाधिपति वृषपर्वा रणांगणीं बलाढ्य निकुंभ विश्वेदेवाशीं लढूं लागला. रणांत जणूं दुसऱ्या यमासारखाच असलेला महा वीर्यवान् प्रल्हाद आपल्या वीर पुत्रांसह काळाशीं लढला. महारणांत शत्रुसैन्यास शोभविणारा अनुऱ्हाद गदाधर कुबेराशीं लढूं

लागला. दैत्यांचा आनंद वाढविणारा विप्रचित्ति दैत्य महात्म्या वरुणाशीं लढूं लागला. बलवान् बलि रणांत महात्म्या बलाढ्य सुरेश देवराज इंद्राशीं लढूं लागला. बाकीचे देवदैत्य महा नाद करीत भाले, तरवारी, शक्ति, शर यांच्या योगें युद्धांत एकमेकांस प्रहार करूं लागले.

जगाच्या प्रळयकाळीं जे महा उत्पात होतात असें म्हणतात ते त्या वेळीं झाले.(म्हणजे) सात वायु क्षुब्ध झाले. पर्वत छिन्न भिन्न झाले. सप्त महासागर शोषवून सोडणारे सूर्य उगवले. पुष्कळ वायूनें मंथिली गेलेली पृथ्वी जणूं काय फुटली. मध्यभागीं इंद्रधनुष्यांचीं चिन्हें असलेले महामेघ दिसूं लागले. सर्व प्राणी मोठा आक्रोश करूं लागले. सर्व दिशा अंधःकारानें भरल्या. कालनिर्णीत देवांचा घोर अन्याय दिसूं लागला. युगांतकाळींच्या प्रमाणें सारे भयंकर उत्पात उठले. धुळीनें आच्छादित झाल्यामुळें अंतरिक्ष दिशा, भूमि व सूर्य यांतील एकही पदार्थ दिसेनासा झाला. तुमुल वायु वाहूं लागले. धूमयुक्त सर्व दिशा काळोखानें भरून गेल्या. हे व असेच दुसरेही देवनिर्मित महोत्पात भूमीवर व आकाशांत दृग्गोचर होऊं लागले, भयंकर देवदैत्यांचें तें, पहाण्यासही भयंकर युद्ध सर्व देव, गुरु व ब्रह्मा यांनीं पाहिलें. चार सांगवेद, विद्या, सिद्ध व परमर्षि यांनीं आवृत झालेला, कमलोद्भव श्रीमान् सनातन ब्रह्मा नाना मणींच्या हजारों खांबांनीं विचित्र दिसणाऱ्या विमानावर आरूढ होऊन तें युद्ध पाहूं लागला. त्याचें तें विमान अतिशय चकचकीत, हजारों भूतें जोडलेलें, व श्रेष्ठ आकृतीनें अतिशय देदीप्यमान् असें होतें. अतिशय तापलेल्या ( लाल ) सोन्याची वेलबुट्टि त्यावर काढिली होती. त्यानें तें चित्रविचित्र दिसे. शेंकडों आनंददुंदुभी त्या विमानावर झडत होत्या. नक्षत्रांच्या प्रखर किरणांनीं तें प्रकाशमान झालें होतें; व त्याचें अंग वैडूर्य, सोम व सूर्य यांनीं अलंकृत झालेलें होतें. त्याचे पुत्र—पुलह, पुलस्त्य, मरीचि, भृगु व अंगिरा हे त्या वरद देवाची ऋक् व साम यांच्या योगानें स्तुति करीत विमानांत सेवा करीत होते. अग्नि, सांग वेद, यज्ञदेवता, व दुसरेही प्राणी त्या महानुभाव, भुवनेश, लोकगुरु स्वयंभूची सेवा करीत होते. हे महर्षिसंघ, पावकाग्नीपासून झालेले वैश्वानर, देवांचे पुरोहित, हे सारे देवासुरांच्या युद्धाविषयीं (म्हणजे तें पाहण्याविषयीं ) उत्सुक होऊन निघाले. सूर्यासारख्या अंगकांतीचे, व दागिन्यांनीं सर्वांग भूषित झालेले सनक, सनंदन, सनातन, सनत्कुमार, कपिल व जैगीषव्य असे सहा योगेश्वर, तसेच नर व नारायणदेव हे आकाशांत गुप्त राहून युद्धाचें अवलोकन करूं लागले. शरत्काळीं नुकत्याच उगवलेल्या चंद्राप्रमाणें दिसत असलेला तो ब्रह्मा आपल्या संपूर्ण चंद्रतुल्य, अतितेजस्वी, व चार वेद धारण करणाऱ्या चार तोंडांनीं सर्व दिशा अंधःकाररहित ( प्रकाशमान ) करिता झाला.

## अध्याय चौपन्नावा.

—:०:—

### जंगी सामना.

वैशंपायन म्हणाले:—राजन्, आपल्या गर्जनेनें त्रैलोक्य हालवून सोडणाऱ्या त्या दोन्ही सैन्यांचें पुनः हें मोठें युद्ध सुरू झालें. गोमुख, मोठ्या झांजा, दुंदुभि, मृदंग, झल्लरी, डिंडिम इत्यादि वाद्यांचे मोठे नाद तेथें ऐकूं येऊं लागले. तुमुल ( भयंकर ) व अंगावर शहारे आणणारा रणयज्ञ तेथें प्रवृत्त झाला. रणांत शूरांना संमत असा स्वर्गीय महानाद सुरू झाला. त्या रणयज्ञाचा नेता दैत्य-श्रेष्ठ

प्रल्हाद होता. त्या यज्ञाचा प्रवर्तक विरोचन हा अध्वर्यु होता. त्या ठिकाणीं होता नमुचि व प्रस्तोता वृत्र असे होते; व त्या यज्ञकर्मात इतर दैत्य हेच मंत्र होते. पित्याच्या मागून जाणारा पण पराक्रमांनीं त्याहूनही अधिक असलेला बाण त्या रणयज्ञांत यष्टा झाला. ऐंद्र, पाशुपत, ब्राह्म, अतिदुर्जय, स्थूणाकर्ण इत्यादि अनुऱ्हादानें उत्तम प्रकारें योजलेले ( नीट म्हटलेले ) मंत्र तेथें प्रवृत्त झाले. शत्रूंना भय उत्पन्न करणारा श्रीमान् मय हा तेथें उद्गाता झाला. तो दैत्यश्रेष्ठ मोठा नाद करीत देवांचें सैन्य विदीर्ण करूं लागला. तेथें बलिप्रभु, जो तेजस्वी व महासुर असून राजा होता, तो स्वतः जाप्य व होम यांनीं ब्रह्मत्व करूं लागला. वैररूपी सर्पणानें पेटलेला तो रणाग्नि भयंकरपणें जळूं लागला. त्यांत असुरांनीं इतर देवांसह विष्णु देवाची आहुती योजिली. तुमुल अशा शंखांच्या आवाजांनीं व नगाऱ्यांच्या महाध्वनींनीं नादयुक्त झालेलें व विमल असें ब्रह्मण्य ( म्हणजे मंत्रजाल ) उत्तम रीतीनें प्रयोजिलें गेलें. बल, बलक व महासुर पुलोमा प्रशस्त व सम कर्में करून तें सत्र उत्तम प्रकारें चालवूं लागले. काळे दांडे असलेल्या, विमल व विपुल ( मोठ्या ) अशा रथांच्या रांगा त्या महाफलदायी रणयज्ञांत यूपांच्या ठायीं कल्पिल्या गेल्या. कार्णि, नालीक, नाराच, वत्सदंत, उपबृंहिक [ इ० शर ] व तोमर हेच त्यांतील सोमकलश; विचित्र धनुष्यें व अस्थि हींच त्या यज्ञांतील कपालें [ पुरोडाशासाठीं परळें ]; व मस्तकेंच पुरोडाश झालीं. त्या यज्ञांत भयंकर रक्त हेंच घृत हवन केलें जात होतें. तेथें विपुल अशा गदा ह्याच परिधि व शरपंक्ति इध्म होत्या. हयग्रीव, असिलोमा; राहु, केशी दानव, विरोचन, जंभ, महाबल कुजंभ व पराक्रमी विप्रचित्ति हे त्या यज्ञांतील सदस्य होते. त्या महायज्ञामध्यें बाण ह्याच स्रुवा व रथांच्या आंसाप्रमाणें असलेल्या शुभ धनुष्कोटी व धनुष्यांच्या ज्या [ म्हणजे दोऱ्या ] ह्याच स्रुचा होत्या. त्यांतील प्रतिप्रस्थात्याचें कर्म वृषपर्व्यानें केलें. तेथें बलि दीक्षित झाला व त्याची पत्नी ती मोठी सेना होय. त्या अतिरात्र यज्ञकर्मांत महाबाहु दैत्य शंबरानें शामित्र [ म्हणजे पशुमारण ] कर्म केलें. हे विभो, यज्ञकर्मात अग्नीसारखा विख्यात असलेला महासुर कालनेमि त्या यज्ञाची दक्षिणा होता. त्या यज्ञांत देवांच्या सैन्यांतील गतप्राण शरीरांनीं दैत्यांनीं निर्मिलेलें सवन वाढूं लागलें. त्या युद्धांत उग्र असे दैत्य आनंदानें ओरडत देवांचें रक्त पिऊं लागले. हेंच त्या रणयज्ञांतील सोमपान होय. जेव्हां महादैत्य बलि युद्धांत देवांस जिंकील तेव्हां त्या यज्ञाचें अवभृथस्नान निःसंशयेंकरून होईल.

ते महा असुरश्रेष्ठ यथाविधि यज्ञ करणारे, पुष्कळ दक्षिणा देणारे, वेदवेत्ते आचारसंपन्न, शूर, [ युद्धार्थ ] शरीरत्याग करणारे, त्रैलोक्य जिंकण्यास तयार झालेले, रणयज्ञाकरितां दीक्षित, कृष्णाजिनधारी, ब्रह्मचर्यव्रती, मुंजमेखला धारण करणारे, एका कार्याविषयीं निश्चित बुद्धि बाळगणारे व त्रैलोक्य जिंकूं इच्छिणारे असे होते. नाना आयुधांमध्यें निष्णात व त्वरेनें पळणाऱ्या देव, दानव व दैत्यांचा मोठा कोलाहल झाला. [ वीरांची ] गर्जना, [ पराभूतांचा ] आक्रोश, गजांचें बृंहित, घोड्यांचें खिंकाळणें, रथांच्या नेमींचा गडगडाट व शंख आणि दुंदुभि यांचा आवाज यांनीं तो कोलाहल फारच तुमुल झाला. खेंकाळणाऱ्या घोड्यांच्या व गर्जणाऱ्या दानवांच्या नाना प्रकारच्या नादांनीं, व गर्जना, आक्रोश, हातापायांचे ध्वनि यांनीं तेथें मोठा कलकलाट झाला. दानव व त्यांचे शत्रु जे

देव यांचीं युद्धांत भयंकर कर्में करणारीं शस्त्रयुक्त मोठीं सैन्यें फार शोभलीं. सोन्यानें शोभणारे हत्ती व रथ विद्युद्युक्त मेघांप्रमाणें चकाकत व शोभत होते. ऋष्टि, शक्ति, गदा, तीक्ष्ण शूल व परशु यांनीं युक्त असलेले वीर त्या दोन्ही सैन्यांमध्यें भिन्नपणें शोभले. नाना आकारांचे शेंकडों व हजारों रथ, त्यांचीं शिखरें सोन्यानें मढविलेलीं असल्यामुळें जळणाऱ्या अग्नीप्रमाणें दिसले. देव व दानव यांचे शिपाई ज्वलित सूर्याप्रमाणें कांति असलेल्या सोन्याच्या कवचांनीं युक्त झालेले असल्यामुळें आकाशांतील ताऱ्यांप्रमाणें दिसूं लागले. चित्रविचित्र आयुधांनीं युक्त, तलबद्ध, कलापयुक्त व ऋषभाक्ष असे ते देवगण सैन्याच्या पुढें उभे असतां फार शोभले. त्या युद्धांत नाना रंगांच्या पताका व ध्वजमाळा शोभल्या. युद्ध करणाऱ्या त्या रणपंडितांचें मोठें भयंकर युद्ध झालें. ध्वज, अलंकार, वस्त्रें व कवचें हीं आपल्या किरणांनीं रश्मिवान् जो सूर्य त्यानें आपल्या किरणांच्या वर्णाचींच करून दाखविलीं. असंख्य पायदळाच्या चालण्यापासून उडालेल्या पांढऱ्या रेशमी वस्त्रासारख्या धुळीनें दिशा आच्छादित केल्या. ते सर्व दिव्य आयुधें धारण करणारे व आयुधेंपरिच्छद झळकत असलेले होते. प्रत्येक सैन्यामधील ते पर्वताच्या शिखराप्रमाणें उंच असलेले देव व दानव तेव्हां परस्परांस अडवूं लागले. ते एकमेकांस प्रहार करीत रणांगणावर उभे राहून चित्रविचित्र तऱ्हांनीं लढूं लागले. सुंदर, तीक्ष्ण पंखांचे व अजिंक्य असे बाण, मुद्गर, शूल, मुसळें, तोंडास लोखंड बसविलेलीं उखळें, अशनीसारखीं वज्रें, तरवारी, वृक्ष, इत्यादिकांनीं त्यांचें अद्भुत पराक्रमांनीं युक्त असें युद्ध सुरू झालें असतां, सावित्राच्या वधाच्या इच्छेनें बाणासुरानें धनुष्य घेतलें. दिव्य शरजालानें त्या उत्तम देवास आच्छादित करणारा बाण, मंत्रांनीं होम केलेल्या ज्वालायुक्त अग्नीप्रमाणें तेजानें अतिशय जळूं लागला. सूर्य आपल्या किरणांनीं ज्याप्रमाणें समुद्र शोषून टाकितो त्याप्रमाणें त्या दैत्यपुंगव बाणानें बाणसमूहानें देवांची सागरासारखी मोठी सेना शोषून टाकिली. पण महा वेगवान् मारुत [ देव ] सावित्रानें, इंद्र ज्याप्रमाणें पर्वतावर वज्र सोडतो त्याप्रमाणें, बलिपुत्रावर उत्तम शक्ति सोडिली. परंतु अद्भुत कर्में करणाऱ्या त्या बाणानें मोठ्या उल्केप्रमाणें जळत येणाऱ्या त्या महा शक्तीचे तीक्ष्ण टोंकाच्या बाणांनीं दोन तुकडे केले. या प्रकारें शक्तीचा नाश झाला असतां, देवसत्तम सावित्रानें, विश्वकर्म्यानें केलेली दिव्य, उत्तम प्रकारें तीक्ष्ण, दानवांचा नाश करणारी, उत्तम व जाड [ पृष्ठाची ] धार असलेली, विमल, विपुल, चंद्रासारखी चकाकणारी व परजलेली अशी विषारी सर्पाप्रमाणें तरवार हातांत घेतली. ती प्रज्वलित व महातेजस्वी तरवार घेऊन तो सावित्र बाणाजवळ येऊन उभा राहिला. जवळ येऊन उभा राहिलेल्या त्या सावित्रास पाहून त्या महाकाय बलिपुत्राचे डोळे अतिशय क्रोधानें लाल झाले; व त्यानें सूर्यकिरणासारखे, वज्रासारखे व तीक्ष्ण बाण त्याजवर सोडले व मोठ्यानें ओरडूं लागला. त्यानें लवकरच विषारी सर्पासारखे शिलीमुख बाणांचे समूह धनुष्याच्या दोरीशीं जोडले. त्यांचे बुंधे सोन्याचे व अग्रें प्रदीप्त होतीं; त्यांचा वेग उग्र असून ते चांगले अलंकृत होते. धनुष्याची दोरी कानापर्यंत ओढून त्यानें ते उग्र बाण चोहोंकडे फेंकले. दृढ अशा धनुष्यापासून सोडले गेलेल्या त्या अग्नीसारख्या प्रभेच्या बाणांनीं, मेघांनीं कैलासास आच्छादिल्याप्रमाणें त्या सावित्रास आच्छादिलें.

बलिपुत्र बाणानें शस्त्रौघानें या प्रकारें आच्छादिलें असतां तो सुरवर पराङ्मुख होऊन रथ व ध्वज यांसह निघून गेला. सावित्राला पराजित करून बाण अतिशय हर्षित झाला व घोर धनुष्य घेऊन तो इंद्राच्या रथावर चाल करून गेला. असुर श्रेष्ठ जो बल त्यानें आपली मोठी व भयंकर गदा घेऊन ध्रुववसूच्या डोकीवर मारिली. त्या गदेच्या भयंकर वेगानें युद्धांत ध्रुवाचा खांदा व सोन्याचें विचित्र कवच हीं फुटलीं. त्या बरोबर मेघांनीं सूर्याला जसें आच्छादावें त्याप्रमाणें बाकीच्या सर्व वसूंनीं दिव्य व भयंकर दिसणाऱ्या अस्त्रांनीं रणांत त्या दैत्यास झांकून सोडिलें. तेव्हां बाणांनीं पीडा पावलेला दानवश्रेष्ठ बल गदा घेऊन रथांतून खालीं उतरला. त्या महासुरानें ती गदा फिरवून शत्रूंवर फेंकली; तेव्हां त्या महागदेनें सर्व देवांस दशदिशांस पळावयास लाविलें. इंद्र इंद्राशनीला फेंकतो त्याप्रमाणें फेंकलेल्या त्या गदेचा आवाज वाढला. विजेच्या गडगडाटासारख्या तिच्या त्या शब्दानें कांपूं लागलेले रथी भराभर रथांतून उड्या टाकून पळून गेले. सूर्यासारख्या कांतीचें व मेघासारख्या ध्वनीचें तें देवांचें रथसैन्य उधळलें असतां त्यावर त्यानें शरधारांनीं वर्षाव केला. क्षुरक, विशिख, भल्ल, वत्सदंत, शिलीमुख इत्यादि बाणांनीं त्या महा तेजस्वी मोठ्या असुरानें वारंवार त्या सेनेस वेध केला. गदा धारण केलेला बलक हा प्रत्यक्ष तोंड [आ करून] पसरलेल्या कृतांतासारखा दिसत होता; तो विद्युद्गणासारखा दिसत असे. देवांच्या धनुष्यांपासून सुटलेले शरौघ जणों काय पीतच तो दैत्येंद्र दुसऱ्या महासागराप्रमाणें त्यांवर धांवला. त्या दानवानें आपल्या पराक्रमानें सर्व दिशा प्रकाशित केल्या. सागराच्या वेगाला जसे पर्वत अडवितात त्याप्रमाणें त्या दैत्यानें देवांना अडविलें. आपल्या पराक्रमानें वायु जसा वृक्षांचें मर्दन करितो त्याप्रमाणें त्यानें वेगानें देवांचें मर्दन केलें. मोठीं धनुष्यें सज्ज करून दोघां वसूंशीं त्यानें सामना केला. तेव्हां शत्रूंचे दमन करणारे ते दोघे वसु आप व अनिल. हे मेघांप्रमाणें प्रदीप्त शरांचा वर्षाव करूं लागले; पण त्यानें त्या फेंकलेल्या शरांचे अंतरिक्षांतच तुकडे केले. हें कर्म ध्रुवास सहन न होऊन तो त्या दैत्यावर धांवून गेला. ते दोघेही पृथक्पणें शरांच्या वर्षावांनीं एकमेकांस मारूं लागले. ते देवदैत्य उत्तम कुळांतले, शूर व यशस्वी होते. दोन सिंह जसे नखांनीं किंवा दोन हत्ती जसे आपापल्या दांतांनीं एकमेकांस फाडतात त्याप्रमाणें त्यांनीं आपल्या शक्तींनीं व बाणांनीं एकमेकांस छिन्नभिन्न केलें. परस्परांचीं गात्रें बाणांनीं निर्भिन्न करीत व ओरबाडीत ते दोघे एकमेकांचें स्तंभन करीत व एकमेकांस पीडा देत रणांत उभे राहिले. ते नानाप्रकारच्या पवित्र्यावर मंडळें घेत चालले. ते अभिमानी [वीर] रागावून मुद्गरांनीं एकमेकांस मारूं लागले. तरवारी, दिव्य ढाली व विपुल धनुष्यें यांच्यायोगें लढून नंतर ते दीर्घबाहु, विशाळ छातीचे, पर्वताकृतीचे, व नियुद्धांत कुशल असे दोघे वीर बाहुयुद्ध करूं लागले. लोखंडी परिघासारख्या बाहूंनीं ते एकमेकांशीं भिडले. भुजांच्या आघातांनीं त्यांची परस्पर धरसोड सुरू झाली. वज्र व पर्वत यांच्या [संयोगाच्या] आवाजासारखा अति भयंकर आवाज [त्यांच्या भुजांच्या आघातांचा] झाला. दोन हत्ती जसे दांतांच्या अग्रांनीं किंवा दोन बैल जसे शिंगांनीं एकमेकांस जेरीस आणितात त्याप्रमाणें रागावलेले हे दोघे मुहूर्तभर एकमेकांस पीडा करीत राहिले. शेवटीं बलकानें ध्रुवदेवाचा पराभव केला तेव्हां तो वसु भयानें रथ सोडून व विन्मुख होऊन पळून गेला.

## अध्याय पंचावन्नावा.

—:०:—

### देवासुरयुद्ध.

वैशंपायन सांगतातः—पुनरपि महात्मा धर व क्रोधवश नमुची यांचें अत्यंत दारुण युद्ध झालें. ते शत्रूचीं हाडें नरम करणारे महाधनुर्धर व दीर्घबाहु दोघेही वीर दृष्टिपातानेंच दग्ध करण्यासारख्या जाज्वल्य नेत्रांनीं एकमेकांकडे पाहूं लागले. मग सोनेरी पाठीचें व दुर्धर्ष असें आपलें मोठें धनुष्य ताणून तो वसुश्रेष्ठ [ धर ] मोठ्या तेखानें जीवाची पर्वा न करितां लढूं लागला. त्या धरानें निसण्यावर लावून लखलखीत केलेल्या तेजस्वी बाणांचें त्या नमुचि दैत्याचे रथाभोंवतीं इतकें दाट जाळें बांधून टाकलें कीं, त्यामुळें सूर्यप्रभाही झांकून गेली. परंतु नमुचि त्या धराच्या पाजळलेल्या बाणजालाला न भितां केवळ हंसला. आणि आपणही, ज्यांचा वेग अत्यंत भयंकर आहे असे प्रदीप्त व हातीं न धरवणारे असे बाण सोडूं लागला. त्या नमुचि दैत्याचें तेज, बाहु, वेग व रथ हीं सर्वच मोठीं असून बल तर अतिशयच होतें. अशा त्या वीरानें नव्वद तीक्ष्ण बाण धरावर सोडिले. मत्त हत्तीला ज्याप्रमाणें अंकुशानें निवारण करावें, त्याप्रमाणें नमुचीचे तीक्ष्ण बाण जेव्हां त्या धराला तोंड काढूं देतना तेव्हां तो वसुश्रेष्ठ अधिकच खवळून नमुचीवर धांवला. धर जेव्हां भिरीरीनें आपणावर चाल करून येत आहे असें आढळलें, तेव्हां मत्त हत्तीवर जसा दुसरा मत्त हत्ती थडकेला जावा तसा नमुचीही त्याजवर थडक देण्यास चालला; व त्यानें जोरानें शंख फुंकला. त्याबरोबर शेंकडों भेरी सुरू जाहल्या. तेव्हां त्या घोषाचे योगानें सैन्यांत सर्वत्र आनंदानें अशी कांहीं खळबळ सुरू झाली कीं, मनुष्यांचा समुद्रच हेलकावतो आहेसें दिसूं लागलें. त्या दैत्यानें खडबडीनें अस्वलीचे वर्णाचे घोडे व हंसवर्णाचे घोडे हे एकमेकांत मिसळून टाकिले व वसूला शरांनीं आच्छादून टाकिलें. त्या कालीं ते वसु व दानव या उभयतांचे रथ परस्परांशीं खेटून थडकलेले पाहून देवांचें मोठें सैन्यही कांपूं लागलें. ते दोघे वीर तेख चढल्यानें डोळे लालगुंज होऊन एकमेकांकडे वारंवार पाहून गर्जना करूं लागले असतां एकमेकांवर गुरगुरणारे दोन सिंह किंवा परस्परांवर धांवणारे स्फुटगंड हत्तींप्रमाणें दिसूं लागले.

त्या दोघांचें भयंकर युद्ध माजलें असतां त्यामुळें ती युद्धभूमि महामेघांची ज्यांत टक्कर चालली आहे अशा आकाशाप्रमाणें भासूं लागली. रथ व उत्तम अश्व यांची तेथें एकच गर्दी झाली; व मत्त हत्तींचें संकुळ माजलें. तेव्हां तेथें दरबार भरल्यासारखाच थाट दिसूं लागला. उभय पक्षांचे वीर आपआपल्या योद्ध्यांचा जय व्हावा म्हणून इच्छा करूं लागले. ते महास्त्रशाली योद्धे परस्परांशीं थडकून भिडत असल्यानें ती गंमत सिद्ध, गंधर्व, मुनि, देव, दानव वगैरे सर्व मंडळी पहात राहिली. त्या महाबल वीरांनीं समरांगणीं एकमेकांस तीक्ष्ण बाणांनीं आच्छादून टाकण्याचे नादांत सर्व गगनमंडळ बाणजालानें भरून टाकिलें. अन्योन्यांवर तीक्ष्ण बाणांची सारखी वृष्टि चालविणारे ते महारथी त्या वेळीं वृष्टियुक्त मेघांप्रमाणें शोभूं लागले. सोन्याचें काम केलेले असे तीक्ष्ण बाण ते दोघे वीर एकमेकांस मारीत असतां सर्व आकाश विजांचे चकचकाटानें भरून सूर्यप्रकाशासारखें भासूं लागलें. त्या धर आणि नमुचीचे बाण जेव्हां नभोमंडळांत इकडून तिकडे चमकूं लागले त्या वेळीं शरत्कालीं उन्मत्त झालेल्या बगळ्यांच्या मालिकाच चालल्या आहेत कीं काय असें

वाटे. ढगारांनीं जसें नभस्तळ क्षणांत व्याप्त होतें, त्याप्रमाणें गतप्राण होऊन भडाभड खालीं पडणाऱ्या देवपक्षाच्या कलेवरांनीं तीं युद्धभूमि भरून गेली. इतक्यांत नमुचि यानें सूर्याप्रमाणें लखलखित केवळ जळजळणारें तीव्र धारेचें असें एक चक्र त्या रणप्रसंगीं धरवसूवर सोडिलें. त्या चक्रानें त्या धरवसूचा सूर्यकिरणतुल्य प्रभावयुक्त असा उत्तम रथ, त्यावरील ध्वजा, आयुधें व घोडे यांसह जाळून खाक केला. तेव्हां त्या धरवसूनें त्या चक्राचे तेजानें जळणारा रथ सोडून देऊन त्या असुरेंद्राचे भयानें आपले सुरक्षित घराची वाट धरिली.

याप्रमाणें त्या धरदेवाचा पराजय केल्या-मुळें त्या नमुचि राक्षसाला आपले शक्ती-विषयीं गर्व चढला आणि आपलें सैन्य घेऊन तो पुनरपि देवसैन्यावर चाल करून गेला.

नंतर देवदानवात गाजलेले व अनेक प्रका-रचे मायावीपणांत पटाईत असे जे मय आणि त्वष्टा नामक दोघे श्रेष्ठ विश्वकर्मे यांची फारच भयंकर मारामारी सुरू झाली. मग ते दोघे बराच वेळ एकमेकांवर ताण करीत असतां त्वष्ट्यानें त्या रणांगणीं त्या घमेंडखोर दैत्याला तीक्ष्ण अशा तीनशें बाणांनीं मोठ्या पराक्र-मानें वेढा देऊन वेध केला. मयानेंही त्वष्ट्याची उसनवारी त्याच मापानें तत्काल फेडली. पुनः त्वष्ट्यानें सोन्याचे कामानें सुशोभित केलेले, भक्कम प्रहार करणारे व सुंदर अग्रांचे असे बाण मयावर सोडिले. तेव्हां तो दैत्यश्रेष्ठ मय मोठ्यानें गर्जना करूं लागला. इतक्यांत त्वष्टाही अधिकच चवताळून त्यानें सोन्या-रत्नांची मुठ बसविलेली अशी एक उज्ज्वल शक्ति हातीं घेऊन दैत्यसैन्याचे प्राण वेंचून घेण्याचे उद्देशानेंच कीं काय, ती शक्ति मया-सुरावर रणांत सोडली. ती सर्व लोहमय व वज्राप्रमाणें तीव्र आणि अग्निसूर्याप्रमाणें जाज्वल्य अशी शक्ति त्वष्ट्याचे हातून सुटली असें दृष्टीस पडतांच मयानें तीक्ष्णाग्र असे सात बाण सोडून तिचा तत्काळ छेद केला. व आतां त्वष्ट्याचेही प्राण चिरडून टाकावे या इच्छेनें त्या महासुरानें रागांत मयूरपिच्छयुक्त बाण सोडले. त्वष्ट्यानें अत्यंत वेगवान्, सोन्यानें मधून मधून कोंदलेले, जळफळीत व पेरांत गढलेले, असे बाण सोडून मयाचे त्या बाणांचा छेद केला. डुरकण्या देणारे बलीवर्द किंवा व्याघ्र यांप्रमाणें ते उभय योद्धे त्यासै-न्याचे गर्दींत एकमेकांचा वध व्हावा या इच्छेनें एकमेक उलट लढत होते. व क्रुद्ध विषारी सर्पाप्रमाणें एकमेकांकडे रागानें पहात होते. मत्त गज ज्याप्रमाणें परस्पर भिडून आपले दंतकोटींनीं आघात करीत सुटतात, त्याप्रमाणें ते दोघेही दूरवर धनुष्य ओढून पुरापुर शक्तीनें सोडलेल्या बाणांनीं एकमेकां-वर प्रहार करीत होते. इतक्यांत स्वर्णयुक्त बाहुभूषणें घातलेला तो मय अत्यंत मोठी प्रदीप्त व सर्वांचा प्राण हरण करणारी अशी गदा त्या रणांत त्वष्ट्यावर फेंकता झाला. व इंद्रानें स्ववज्रानें ज्याप्रमाणें पर्वत फोडावा, त्याप्रमाणें त्या क्रुद्ध अतिरथी दैत्यानें त्या गदे-च्या अघातानें त्वष्ट्याचे रथाचे ते अत्युत्तम घोडे ठार केले. त्यानंतर आणखीच खवळून त्या महासुरानें तीक्ष्ण व पाजळलेले असे दोन बाण टाकून त्वष्ट्याच्या रथाचा ध्वज पाडून त्याचे सारथ्यालाही यमसदनास पोंचविलें. व त्याचे मोठे बलाढ्य व वेगवान् असे उत्तम अश्वही गदेनें मारून टाकिले. त्वष्ट्यानें आपला सारथी व घोडेहि मरून पाडले, हें पाहून घोडे मेलेला तो रथ व भुईवर पडलेला तो सारथी तेथेंच सांडून आपण आपलें मोठें धनुष्य ताणीत एखाद्या पर्वताप्रमाणें नुसत्या भूमीवरच

ठाम तो उभा राहिला. इकडे सारथी व घोडे मेल्यामुळें आपला शत्रु रथहीन होऊन उभा आहे असें पाहतांच मयाला इतकी जयश्री चढली कीं, तिचे भरांत तो अग्नीप्रमाणें उज्वल भासूं लागला. आणि हातीं धनुष्य घेऊन याप्रमाणें उग्र दिसणाऱ्या त्या मयानें, सेना जाळून टाकिली. व शिवाय त्यानें भिन्न भिन्न आकाराचे अत्युग्र व प्रखर तेजोयुक्त असे शिळेवर लावलेले चौदा बाण सोडिले. त्वष्टयाचे सेनेवर पडून त्या स्वर्णमंडित चौदा बाणांनीं कालानें प्रेरिलेल्या क्रुद्ध सर्पाप्रमाणें त्या देवसैन्याचें रक्त प्राशन केलें व रक्तानें भिजून तेच बाण जेव्हां भूमींत रुतून राहिले, त्या वेळीं आपले बिळांत अर्धवट घुसलेल्या क्रुद्ध सर्पाप्रमाणेंच ते शोभूं लागले. त्या वेळीं त्वष्टयानेंही उलट त्या मयासुरास स्वर्णभूषित अशा अत्युग्र नाराच बाणांनीं विदारण्याचा यत्न केला. तेव्हां ते बाण त्या दैत्याच्या सव्य भुजा भेदून जे बाहेर पडले ते त्या वेगासरसे सर्पाप्रमाणें भूमींत शिरले. पृथ्वींत शिरत असतां ते बाण अस्तमानीं सूर्यमंडळांत प्रविष्ट होणाऱ्या सूर्यकिरणांप्रमाणें शोभूं लागले. यावर मयासुरानें जळफळीत, प्राणनाशक, विकराल व गरुडाप्रमाणें वेगवान् असे तीन बाण त्वष्टयावर टाकिले. त्या वेळीं या मयानें सोडिलेल्या बाणांनीं पीडित होत्साता तो त्वष्टा अंगीं सामर्थ्य असतांही लज्जित होऊन रण सोडून दूर गेला. तेव्हां आपण त्वष्टयाला हतसूत व विरथ करून विषहीन सर्पाप्रमाणें करून सोडिलें, असें वाटून त्या दानवाला आनंद झाला. व आपलें सोन्याच्या मुद्या बसविलेलें व भक्कम असें तें सुंदर धनुष्य ताणून, चेतलेल्या अग्नीप्रमाणें त्या रणांगणांत तो दैत्येंद्र उभा राहिला.

इकडे दानवश्रेष्ठ पुलोमा याला आपले बळाची घमेंड असल्यानें तो गर्वानें शुभ्र अश्वयुक्त रथांत बसून 'सर्व भूतांचा जो प्राण' असें ब्राह्मण ज्याला म्हणतात, अशा त्या वायूबरोबर झगडूं लागला. वायुही महाबलाढ्य, केवळ काळाप्रमाणें समर्थ, असें असतांही पुलोमा त्याशीं भिडण्यास सरसावला. पुलोम्याचे धनुष्याचे दोरीचा तो टणत्कार कानीं येतांच मत्तगजाला ज्याप्रमाणें प्रतिस्पर्धि गजाचा शब्द सहन होत नाहीं त्याप्रमाणें वायूला तो टणत्कार सहन झाला नाहीं. इतक्यांत त्या दैत्यमंडळीच्या धनुष्यांपासून इतके बाण सुटले कीं, सूर्यकिरणांनीं जसें आकाशासह हें जगत् व्यापून टाकावें, त्याप्रमाणें त्या शरांनीं दशदिशांचीं अंतरें भरून टाकिलीं व दैत्यमंडळीनें प्रत्यक्ष वायूचे देहाभोंवतीं असा गराडा दिला कीं, त्यानें किरणयुक्त सूर्याप्रमाणें तो शोभूं लागला. मोरपिसांचे आणि चकचकित मुठींचे ते दैत्यधनुष्यांपासून सुटलेले बाण, पंक्तीनें उडणारे हंसांप्रमाणें शोभूं लागले. तेव्हां शत्रूवर धांवून पडणाऱ्या त्या दैत्याचे ते धनुष्यापासून सुटणारे दीप्त बाण त्याचें धनुष्य, ध्वज व पताका या सर्वांतूनच सुटत आहेतसें भासे. याप्रमाणें त्या दैत्यानें अत्यंत तीक्ष्ण व सोन्याचें काम केलेले चित्रविचित्र आकाशगामी बाण अग्नीवर शलभ सुटावे त्याप्रमाणें त्या वायूवर सोडले. आपल्यावर खवळलेल्या यमाप्रमाणें हा चालून येत आहे असें पाहून तो वायु जीव तोडून त्यावर धांवत जाऊन त्याला नऊ बाणांनीं वेधिता झाला. तथापि, त्या दैत्याचा वेग अनावर आहे असें पाहतांच तो सनातन वायुदेव सर्वोत्कृष्ट वेग धारण करून बाणांचे थवेचे थवे त्यावर सोडूं लागला.

याप्रमाणें शरजाल उभें करून शिवाय त्या समर्थ मरुतात्मजानें नतपर्व अशा वीस बाणांनीं दैत्याचा वध केला. त्या वेळीं महातेजस्वी असे मरुद्गणांपैकीं मुख्य गण "फार नामी फार

नामी" म्हणून सिंहनादपूर्वक मोठ्या आवेशानें ओरडले. तो अंगावर रोमांच आणणारा तुमुल शब्द जेव्हां उठला तेव्हां रागानें केवळ मूर्च्छित होऊन ते पुलोमपक्षीय दैत्य वायूवर धांवत आले व त्याला गराडा देऊन, पर्जन्यकालीं मेघ ज्याप्रमाणें जलधारांनीं पर्वताला झांकून टाकितो, त्याप्रमाणें झांकून टाकूं लागले. प्रजेचा संहार करण्याविषयीं उद्युक्त झालेले सप्त ग्रह ज्याप्रमाणें सोमाला पीडा देतात त्याप्रमाणें सात महारथी दैत्य क्रुद्ध होऊन त्या वायूला पीडा करूं लागले. त्या वेळीं त्या पराक्रमी वायूनें आपल्या अनेक रत्नांनी भूषविलेला व कधींही न थरारणारा गजशुंडाकृति दक्षिणभुज उचलून त्या युद्धांत त्या दैत्यांच्या डोक्यांत हाणला. याप्रमाणें ते सातही महारथी वायुवेगानें आघात पावले. तेव्हां पुलोम्यानें आपल्या जीवाचें त्राण करून त्या बलगर्वित व अनावर अशा सनातन वायूला पाहून नऊ बाणांनीं वेध केला. इकडे पुलोम्याकडून आलेल्या त्या जळजळीत बाणांना न जुमानतां त्या सनातन वायूनें त्या महात्मा दानवांचे तेजाचा उच्छेद केला. त्या वेळीं रक्तानें मुकुट भिजल्यामुळें सोनगेरूनें माखलेले पर्वताप्रमाणें दिसणारे व अंगांतील कवच, अस्थि व भुज छिन्न झालेले ते दानव हत्तीच्या कळपाखालीं चिरडून रक्तबंबाळ झाले असतां, फुललेल्या वृक्षांप्रमाणें दिसूं लागले. मग त्या छिन्नभिन्न झालेल्या धिप्पाड दानवांच्या शरीरापासून एक भयंकर विकराल अशी रक्ताची नदी सुरू झाली. ती त्या रणांगणांतून रक्ताचे ओघानें वहात असतां तिला पाहून भ्याड लोकांना थरकांप सुटे. याप्रमाणें देव, दानव, गज, अश्व इत्यादिकांच्या रक्तांनीं भरून गेल्यामुळें ठिकाठिकाणीं ती रणभूमि फार भयानक दिसूं लागली. गतप्राण झालेल्या यक्ष, राक्षस, खेचरांनीं, व त्यांचे अनुचर व वरील ध्वजा, पताका, व सामानासह मोडून पडलेले रथ यांनीं, घंटाभूषित असे गंडस्थळ फुटलेल्या गजांनीं, देवदानवांनीं सांडलेल्या सविष सर्पतुल्य सोन्याचे मुठींचे व तीक्ष्ण असे जळजळीत बाणांनीं, प्रास, तोमर, बाण, शक्ति, खड्ग, परशु, व स्वर्णभूषित गदा, मुशल, पट्टीशांनीं, सुवर्णमय कर्ण व बाहुभूषणांनीं, कुंडलांसह मुकुटांनीं, तनुत्राण, हस्तत्राण, शोभिवंत सोनेरी हार आणि शस्त्र व रथ यांनीं विरहित होऊन जाऊन घायाळ होऊन पडलेल्या शेंकडों हजारों दैत्यमंडळींनें, ती रणभूमि केवळ खचून गेली होती. याप्रमाणें त्या देवदैत्यांचे गर्दींत परस्परांचे ध्वज व रथ पतन पावून व घोडे, रथ, व हत्ती हे नाश पावून त्या उभयतांचे कृतीप्रमाणें एकंदर परिणाम झाला.

नंतर त्या श्रीमान् महारथी वायूला त्या पौलोम दैत्यानें हातांत गदा व मुशल घेऊन हजारों दैत्यांसह गराडा दिला. नंतर ते लक्षावधि दानव वायूवर अघात करूं लागले. त्या सर्वांनीं जेव्हां सर्व बाजूंनीं बाणांचा वर्षाव चालविला, तेव्हां तो वायु बांधला गेल्यासारखा दिसला. इतक्यांत त्या महारथ समर्थ वायूनें आठशें योद्धे मारून आपला रस्ता मोकळा करून घेऊन मोठ्यानें गर्जना केली. त्यानें केलेला हा प्रशस्त मार्ग अजूनही आकाशांत दिसून येतो. या मार्गाला 'वायुरथ' असें नांव आहे. आणि सिद्धांना तो आकाशांत दिसतो.

वैशंपायन सांगतातः—इतक्यांत महारथी हयग्रीव नामक दैत्यानें पूषन् देवाला उद्देशून महानाद केला. व सोन्याचे जाळींनें शोभणारें आपलें मोठें धनुष्य ताणून रागानें भयंकर दिसणाऱ्या आपल्या नेत्रांनीं पूषाकडे तो

पाहूं लागला. तो हातानें तूणीरांतून बाण काढितो केव्हां, धनुष्याला जोडतो केव्हां, धनुष्य ओढतो केव्हां, व ते बाण सोडतो केव्हां, यांमधील अंतरच कोणाचे ध्यानीं येईना. अशी त्याची चलाखी होती. तो दानव जेव्हां डाव्या उजव्या दोन्हीं बाजूंनीं बाणांचा मारा करूं लागला त्या वेळीं त्याचें तें दिव्य धनुष्य कड्याप्रमाणें वाटोळें वांकल्यानें आलात चक्राप्रमाणें भासत असे. त्या वेळीं, सहाणेवर लावलेले व सोन्याच्या दांड्याचे त्याचे धनुष्यापासून सुटलेले ते तीक्ष्ण बाण, यांनीं सूर्यप्रभा व दशदिशाही झांकून टाकिल्या. त्या वेळीं नतपर्व व स्वर्णपुंख अशा बाणांचे थवेच्या थवे आकाशांत फिरतांना दिसले. गिरिशिखराप्रमाणें शोभणाऱ्या त्या धनुष्यापासून सुटलेले ते उत्तम बाण बारीनें एकामागें एक जेव्हां अंतरिक्षात फिरूं लागले, तेव्हां ससाण्यांच्या टोळ्याच आकाशांत घिरट्या घालीत आहेत कीं काय असें भासूं लागलें. तो दैत्य त्या वेळीं रुंद फळाचे, महावेगवान्, गिधाडांचीं पिसें लावलेले, तीक्ष्ण व स्वर्णमंडित, बाण सोडूं लागला, तेव्हां धनुष्याचे जोरामुळें वेगानें उसळणारे ते सोनेरी बाण पूषाच्या शरीराला भिडून त्यांनीं तें व्यापून टाकिलें. सोन्याचे कामामुळें चमकणारे ते बाण अंतरिक्षांतून जात असतां पावसाळ्याचे आरभीं आकाशांत सर्वभर हिंडणाऱ्या काजव्यांसारखे दिसूं लागले. पर्जन्यकालीं मेघ ज्याप्रमाणें जलधारांनीं पर्वताला भिजवून टाकितात, त्याप्रमाणें ते पाजळलेले, तीक्ष्णाग्र बाण पूषाचे शरीरावर वर्षूं लागले. व मेघानें जलधारांनीं पर्वत झांकून टाकावा त्याचप्रमाणें त्या बाणांनीं पूषाचा देह झांकून टाकिला. त्या वेळीं पूषासह युद्ध करणाऱ्या त्या असुराचा तो देवांनाही थक्क करून सोडणारा पराक्रम, तें बल, वीर्य, व्यवसाय व सत्त्व हीं सर्व लोकांचे दृष्टीस आलीं. समुद्राप्रमाणें अंगावर उसळून येणाऱ्या त्या बाणवृष्टीची पूषानें मुळींच पर्वा न करितां त्या असुरावर धांव केली. पूषाचे धनुष्याची कांबीट सोनेरी होती. त्याचा टणत्कार फार मोठा होता व तें मोडून बिंदुकलीप्रमाणें वाकविलें असल्यानें इंद्राचे अशनीप्रमाणें दिसत होतें. नंतर अशा त्या धनुष्यापासून आकाश भरून टाकणारे स्वर्णपुंख बाण सुरू झाले. पक्ष्यांची जशी आकाशांत माळिका लागावी त्याचप्रमाणें पूषाचे धनुष्यापासून सुटणाऱ्या त्या बाणांपासून मोठी घोर अशी बाणमालाच आकाशांत सुरू झाली. तेव्हां असुरांनीं सोडलेल्या बाणांचीं आकाशांत उभीं राहिलेलीं जाळीं पूषाच्या नतपर्व अशा बाणांच्या मारानें फुटून फुटून वेगळीं झालीं. मग उभयपक्षांकडील कंकपिच्छाचे ते कनकपुंख बाण कांहीं पडणारे व कांहीं शत्रूंचे बाणांस हाणून पाडणारे अशांनीं मिळून तें रणभूमीवरील आकाश व्यापून गेलें. पूषानें दिव्य स्वर्णमंडित, सूर्यतुल्य तेजजस्वी, नामांकित व पाजळलेले अशा बाणांनीं हयग्रीवाला केवळ भरून काढिलें. तेव्हां त्या बलवान् हयग्रीवाला तें सहन न होतां तो रागास चढला व त्यानें पूषाचे ध्वज, पताका, धनुष्य, घोड्याच्या पागा व पट्टे हीं सर्व त्या रणांगणीं छेदून टाकिलीं. इतक्यावर पुनः शेलक्या चार बाणांनीं त्याचे घोडे मारून त्या महातेजस्वी हयग्रीवानें त्याचे सारथ्यालाही रथाचे उपस्थावरून खालीं पाडिलें. याप्रमाणें हयग्रीवानें त्या पूषाला रणांत विरथ केलें. त्या वेळीं पूषा हयग्रीवाचे हातानें जित होऊन मृत्युमुखांतून सुटल्याप्रमाणें त्या हयग्रीवाचे रथाजवळून एकदांचा शक्ररथापाशीं पोंचला.

यानंतर तेथेंच पुनः शंबर ( दानव ) व भग ( देव ) या दोघांचें मोठें घोर युद्ध झालें.

शंबर हा सर्व युद्धप्रयोगांत कुशल होता. त्याचें धनुष्याचें कांबीट सात मुंढेहात लांब असून त्याची दोरी बारा टिची होती. त्याचा टणत्कार इंद्रायुधाप्रमाणें होता. त्याची दोरी भक्कम असून तें भार सोसणारें बळकट होतें. त्यापासून तो गाडीच्या आंसासारखे ठोंसर असे असंख्य बाण रागानें डोळे लाल करून देवसैन्यावर सोडूं लागला. त्याचे भयानें देवसैन्यांत जी खळबळ उडाली, तिला मोठ्या लाटांनीं व्यापलेल्या समुद्राचे स्थितीचीच उपमा. तो भयंकर आणि विरूपाक्ष असा वीर शंबर आपणांवर येऊन पडतोसें पाहून भगाचे ओंठ फुरफुरूं लागले व त्यावर त्वरेनें चालून जाऊन त्यानें त्याला फाडिलें. नंतर त्या महेष्वास भगानें आपलें दिव्य धनुष्य ताणून दैत्यगणांना बाणवृष्टीचे जालानें आच्छादून टाकिलें. शंबरही झपाट्यानें शरवर्षाव करीतच होता. तें पाहून भग हा दैत्याचे निकट चाल करून गेला. हत्ती हत्तीशीं जाऊन भिडावा किंवा बैल बैलाशीं, तोच प्रकार येथें समजावा. नंतर ते वेगवान् वीर दोघेही मोठीं बळकट धनुष्यें घेऊन एकमेकांना रणांत बाणांनीं आच्छादन करून ताशीत सुटले. त्या कालीं त्या महावीर भगशंबरांचें निरुपम भयंकर असें युद्ध चाललें. त्यांत दोघेही वीर आपलें धनुष्य पुरापूर दूर खेंचून त्यापासून नतपर्व असे बाण सोडून एकमेकांचीं पोलादी चिलखतें किंवा ढाली फोडून भेद करूं लागले. तेव्हां त्या रथस्थित अशा परम दुर्मद उभयही वीरांना रक्ताची आंघोळ होऊन त्यांचें सर्व अंग छिन्नभिन्न झालें असतां व तीक्ष्ण बाणांमुळें एकमेकांची कातडी सोलली जात असतां त्यांकडे बघवेना, असे ते भयंकर दिसूं लागले. इतक्यांत त्या प्रलयकालच्या यमाप्रमाणें भयंकर अशा शंबरासुरानें क्रोधानें डोळे लाल करून मोठ्या चलाखीनें ( गरुड ज्याप्रमाणें मोठ्या सर्पाला आकाशांत नेऊन फाडितो ) त्याप्रमाणें भगाला वेध केला. शंबरानें सोडलेल्या बाणांपैकीं एक एक झपाझप भगाचे अंगावर येऊं लागला असतां भगानें आपले बाणांनीं त्या अग्नीप्रमाणें जळफळित व पर्वतावर सोडण्यास योग्य अशा तीव्र बाणांला अधांतरींच तोडून टाकिलें. नंतर त्या दैत्यश्रेष्ठानें स्वर्णभूषित व महावेगवान् अशा चौसष्ट बाणांनीं भगाचा वेध केला. मग बराच वेळ त्या दोघांचें समतोलच युद्ध चाललें होतें. शंबराचे मायांनीं तर आकाशही दिसेनासें झालें. दोघेही रणांत ठाम उभे राहून बाहूंनीं धनुष्य ताणीत असतां त्यांचे धनुष्यांचा शब्द अशनिपाताप्रमाणें कडाक्याचा ऐकूं येत होता. शंबरानें त्या महारणांत भगाचे घोडे व सारथी मारून त्यावर पर्जन्याप्रमाणें बाणधारा चालविली-ती इतकी कीं, त्या अस्त्रप्रहारकुशल अशा शंबराचे मायांपुढें भगाचे अंगावर दोन बोटें जागा देखील छिन्नभिन्न झाल्यावांचून राहिली नाहीं. देवानें उलट जें दिव्यास्त्र सोडिलें तें मायावी युद्धरीतीनें परस्पर आपले अस्त्रानेंच अधांतरीं थांबवून धरून तो मायावी शंबर स्वतः दिसेनासा झाला.

याप्रमाणें कांहीं चलाखीनें व आपल्या कपटांनीं शंबर भगदेवाला ठकवूं लागला. भगानें शंबराचे घोड्यांसहित रथावर बाणवर्षाव चालविला. हजारों माया जाणणारा तो तेजस्वी शंबरासुर देवसेनेचा फन्ना उडवीत असतां स्वतः बाणजालांनीं आच्छादून गेला आहे, असा आकाशांत शेंकडों ठिकाणीं दिसे. कधीं मेल्यसारखा होऊन भूतळीं पडलेला, कधीं पर्वतासारखें धिप्पाड रूप घेऊन शेंकडों ठिकाणीं लढतांना दिसे. पुनरपि पहावें तों, तो बलाढ्य दैत्य

दिग्गजांचे पाठीवर बसलेला दिसे. इतक्यांत पुनः क्षणांत पर्वतप्राय होई किंवा महामेघा प्रमाणें आडवा उभा पसरे. पुनः वेडीं-वांकडीं भ्यासुर अशीं रूपें सर्वत्र प्रकट करून तो भयानक राक्षस सर्व देवसेनेला भिववून टाकी. सिंहाला पाहून हरण पळावें त्याप्रमाणें देवसेनेंतील वीर त्याला पाहून पळूं लागले. इतक्यांत तो घोर शंबर दुसराच एक अति चपल असा उत्कृष्ट देह धारण करून ऊर्ध्व गतीनें चालला व जातां जातां आपले शब्दानें सर्व दिशा दणाणून टाकूं लागला. आकाशांत वर गेल्यावर तेथून कल्पांत काळच्या संवर्तकनामक मेघाप्रमाणें अपार जल-वर्षाव करून पृथ्वीतल भरून टाकूं लागला. पुनरपि तो भयंकर पराक्रमी असुर कल्पांतींच्या संवर्तक अग्नीप्रमाणें हजारों ज्वालांनीं व हजारों मार्गांनीं देवांना जाळूं लागला. क्षणांत शंभर मुंडकीं व शंभर पोटें धारण करून एखाद्या शंभर शिखरांच्या पर्वताप्रमाणें आकाश दाटून टाकूं लागला. भगाशिवाय देवपक्षाकडून इतर जे कोणी विश्वेदेव किंवा साध्य किंवा दैत्यही दिव्य अस्त्रें सोडीत, तीं तो असुर मध्येंच गिळून टाकी. क्षणांत रथावर बसून रीतीप्रमाणें रणभूमीवर युद्ध करीत असतां तो दैत्यश्रेष्ठ आकाशांतील गंधर्वनगराप्रमाणें तेथचे तेथें दिसेनासा होई. हा प्रकार पाहून त्या चित्रयोधी व सहस्र माया जाणणाऱ्या शंबराकडे ते भीमपराक्रमी देव देखील चपापूनच बघूं लागले. आणि भग तर असल्या त्या दैत्येंद्राशीं लढतांना भयानें त्रासून जाऊन आपला रथ सोडून निघाला व महेंद्राला शरण गेला.

याप्रमाणें भगाला पराजित केल्यावर तो प्रतापी शंबर महातेजस्वी अग्नि जेथें होता तेथें गेला. तेव्हां अग्नि रागास चढून 'ठीक, आहे, हा तुझा काळ होऊन राहिलों आहें.' अशा प्रकारें उग्रवाणीनें त्या असुराला दरडावून तेथेंच अदृश्य झाला.

वैशंपायन सांगतातः—इकडे महा बलाढ्य चंद्रमा यानें द्विजराजाचें रूप घेऊन आपले हिमास्त्रानें रणांत दानवचमु मारिली. हातीं दंड घेतलेल्या अंतकाप्रमाणें भयंकर व कैलासशिखराप्रमाणें धिप्पाड रूप घेऊन आपले तेजस्वी गणांनीं परिवृत होत्साता तो चंद्रमा दानव दृष्टीस येतांच ठार करीत सुटला. युगान्तसमयींचे यमाप्रमाणें बलवान् असा तो तेजस्वी व समर्थ चंद्रमा रथांचे व घोड्यांचे समूहांचा चुराडा करीत दैत्यमंडलांतून फिरूं लागला. ( चंद्रमा जात्या शीत खरा तथापि ) त्यानें क्रोधास चढून चेतलेल्या दावाग्नीप्रमाणें ते दैत्यांचे रथ मोठ्या झपाट्यानें जाळून काढिले. रथांवरील रथी, गजांवरील गजारोही, अश्वांवरील स्वार, व भूमीवरील पायदळ या सर्वांना दरोबस्त तो चुरडीत सुटला. त्या महातेजस्वी चंद्रमानें त्या दानवांचें तें अफाट सैन्य वायूनें वृक्ष हालवून सोडावे त्याप्रमाणें आपले शीत तेजानेंच व्याकूल करून सोडिलें. त्या वेळीं क्रोधावेशानें पशूंची कत्तल करीत चालणाऱ्या शंकरांचे पिनाक धनुष्याप्रमाणें चंद्रमाचें तें शीतास्त्र शत्रूंचे रक्तानें माखून गेलें. युगान्तींचे यमाप्रमाणें तो बलाढ्य व तेजस्वी चंद्रमा त्या पुनः पुनः पळणाऱ्या सेनांना कोंडून धरूं लागला. तेव्हा त्या चंद्राचा मृत्युतुल्य संचार पाहून योद्ध्यांना विस्मय वाटला. त्या तिमिरनाशक चंद्राचें तें हिमास्त्र जेथें जेथें तो फेंकी, तेथील तेथील दैत्यसैन्याची त्या रणांत दाणादाण उडे. याप्रमाणें स्वतःचे बळकटीवर त्यानें दैत्यसैन्याचे धुडके उडविले. जाबाड पसरलेल्या काळाप्रमाणें सैन्यांना गट्ट करीत करीत जेव्हां तो भीमकर्मा चंद्रमा हातीं अस्त्र

घेऊन त्या महारणांतून चालला त्या वेळीं त्या चंद्राला येतांना पाहून, त्या दैत्यांपैकीं महाबलाढ्य चंद्र व सूर्य नांवाच्या उभय दैत्यांनीं आपलीं तालप्रमाण दीर्घ धनुष्यें ताणून शरवृष्टीनें चंद्राला पर्जन्ययुक्त मेघाप्रमाणें आच्छादून टाकण्याचा आरंभ केला.

इतक्यांत देव व दैत्य या उभय मंडळीचे धनुष्यांचा असा टणत्कार उठला कीं, त्यानें सर्व दिशा नादावून गेल्या. त्यांतच मोठमोठ्या हत्तींची गर्जना, घोड्यांचीं खेकाळणीं, भेरी व शंख यांचे निनाद, यांची भर पडल्यानें सर्वभर एकच तुंबळ माजलें. गोठ्यांतील मस्त पोळ जसे एकमेकांवर डुरकण्या फोडतात त्याप्रमाणें ते जयाविषयीं हपापलेले यशस्वी योद्धे युद्धोत्कंठेमुळें मोठ्या आवेशानें एकमेकांना हांका देऊं लागले. आकाशांतून दगडांचा वर्षाव व्हावा त्याप्रमाणें त्या उभय सैन्यांचे तीक्ष्ण बाणांचे योगानें परस्परांचे मुंडक्यांचा रणभूमीवर पाऊस पडूं लागला. त्या वेळीं त्या रणभूमीवर जीं मुंडकीं पडलीं होतीं, त्यांचे गळ्यांत सुवर्णमाला असून कानांत कुंडलें व मस्तकीं मुकुट होते. शिवाय, बाणांनीं छिन्न झालेलीं कलेवरें, हातीं धनुष्य पकडलेले भुजदंड, हातांतलि आभरणांसकट तुटून पडलेले सुंदर सुंदर हात, चिलखतांनीं आच्छादिलेलीं धडें, चंदनानें चर्चिलेल्या मांड्या, लाल सोन्याचे कुंडलांनीं भूषविलेलीं चंद्रप्रकाश मुखें, व गज, वाजी, मनुष्यें या सर्वांचीं इतस्ततः पडलेलीं कलेवरें, यांनीं ती सर्व रणभूमी क्षणांत भरून गेली. धनुष्यांचे दाटीनें मेघपटलाचा भास होऊं लागला. त्यांत मधून मधून चमकणाऱ्या शस्त्रांमुळें विजेचा देखावा दिसूं लागला व वाहनांचा आवाज तर मेघगर्जनेप्रमाणेंच होऊं लागला. याप्रमाणें त्या देवदैत्यांचे युद्धांत जी कांहीं हाणामारी सुरू झाली, ती अत्यंत तुंबळ व उद्वेगजनक असून तींत रक्ताचे तर पाण्यासारखे पाट चालले होते.

## अध्याय छपन्नावा.

—:०:—

### कुजम्भाचा उत्कर्ष

वैशंपायन सांगतातः—रोमांच आणणाऱ्या त्या तुंबळ महारणांत देव व दैत्य हे आवेशानें बाणांचा पाऊस पडूं लागले. व बाणांचे प्रहारानें हत्ती चींचीं करूं लागले. वरील स्वार मारिल्यामुळें घोडे बेलगाम होऊन सैरावैरा दाही दिशा धाऊं लागले. दुसरे कांहीं बाणांच्या तडाक्याबरोबर एकदम उडी घेऊन धाडकन् भुईवर पडत. गज, अश्व व रथी यांनीं समेत अशा त्या देवदानवांचें युद्ध चाललें असतां उभयपक्षांकडील वीर एकमेकांवर धांवत जाऊन आवेशानें आपआपलीं धनुष्यें ताणीत असतांना त्या धनुष्यांचा शब्द इतका तुमुल दाटला कीं, त्यापुढें दुसरें कांहींच ऐकूं येईना कीं समजेना. हे परंतपा, मग त्या अतुलतेजस्वी वीरांनीं बाण, शक्ति गदा, व खड्ग यांचे योगानें परस्परांचे विशाल सैन्यावर अघात चालविले. त्या देवदैत्यसमागमांत वीरांचे तुटलेले बाहू, मुंडकीं व धनुष्यें यांचे ढिगारे पडलेले दिसत होते. आणि देवदैत्यांनीं परस्परांकडील मारलेले अश्व, कुंजर व बुरखे घातलेले रथ यांचा तर अंतच लागेना. त्या वेळीं योद्ध्यांनीं गदा, तरवारी, प्रास व नतपर्व बाण यांहीं अनेक हत्ती व अश्व मारून टाकले. त्या योगानें त्या उभयसैन्यांचे मध्यभागीं रक्ताचा जीमधून सारखा पाट वहात आहे, अशी एक मोठी भयंकर नदीच उत्पन्न झाली; तीमध्यें तरंगणारे केशरूपी शेवाळाचे योगानें ती शाद्वलयुक्त दिसत होती. त्या वेळीं दानवमं-

डळी देवांवर हल्ला करीत असतां देवमंडळी-कडील योद्धयांचे मुखांतून मोठाच हाहाःकार सुरू झाला.

वैशंपायन म्हणतातः—त्या देवांचें असुरां-सह तें जें युद्ध झालें, तें मोठेंच भयंकर, विक्राळ, व थरकांप करणारें होतें. त्या घोर युद्धांत विरोचन दैत्यानें रक्ताप्रमाणें लाल डोळ्यांचा श्रेष्ठ धनुर्धर जो विष्वक्सेन नामक साध्यजातीचा देव त्यावर हल्ला चालविला. विष्वक्सेनही मोठा अफाटच होता. व इतर देवांचें त्याला पाठबळ होतें. आपणावर विरो-चन चालून येतोसें दृष्टीस पडतांच त्यानें विरो-चनाचे छातींत वेध केला. याप्रमाणें त्या साध्याचे ( विष्वक्सेनाचे ) बाणांचे आघात होतांच अंकुश टोंचल्यानें मत्त हत्ती खवळतो, किंवा यज्ञकालीं अग्नि चेततो, त्याप्रमाणें तो विरोचन क्रोधानें चेतला. आणि त्या दानवश्रेष्ठानें आपले धनुष्यापासून जळफळित असे सात बाण सोडून विष्वक्सेनाचा भेद केला. त्या दानवाच्या प्रबल आघातानें घायाळ होतांच त्या समर्थ देवालाही मूर्च्छा येऊन आश्रयार्थ त्यानें ध्वजाचा दांडा धरिला. मग कांहीं काळ दम टाकून तो साध्य ठिकाणीं आल्यानंतर त्यानें युद्ध चालविण्याचें मनांत आणिलें. आणि आपलें सनाटें धनुष्य ताणून दैत्यांचे मध्यभागीं ठाणें मांडिलें. विरोचनही बलाढ्यच होता. त्यानें चौफेर मारा चालू करून तीक्ष्ण बाणांनीं देवसैन्यांत चळवळ उड-वून दिली. त्या वेळीं तो दैत्येंद्र लढत अस-तांना मेघगर्जनेप्रमाणें त्याचा दणदणाट होऊं लागला. विद्युद्युक्त मेघ ज्याप्रमाणें मोठ्या जोरानें गारांचा मारा करीत असतांना प्रचंड गडगडाट करीत सुटतो त्याप्रमाणें देवसेनेवर हल्ला करीत असतांना तो विरोचन मोठ्या मोठ्या आरोळ्या फोडून गर्जूं लागला. त्या दानवानें हातीं अस्त्र घेतल्यावर आपल्या बाण-वृष्टीनें देवसैन्यें दशदिशा पळविलीं. मग त्या भयानें भीत झालेले देवांकडील रथी रथ सोडून पळूं लागले. स्वार घोड्याच्या पाठी सोडून व भूमीवरील पायदळ लोक आपलें स्थान सोडून पळूं लागले. वज्रनिर्घोषासारखा त्या विरोचनाचे धनुष्याचा शब्द कानीं येतांच सर्व सैन्यें भयभीत होऊन इकडे तिकडे दडलीं. मग त्या विरोचनाच्या दराऱ्याला अबधाकून देवांकडील रथी रथ सोडून पायदळ लोकां-सह देवेंद्राकडे आले. त्या बलाढ्य विरोचनानें त्या साध्य विष्वक्सेनाचे रक्षणार्थ पायांभोंवतीं असलेले रक्षकांपैकीं चौदा हजार शिपाई मारिले. त्याचप्रमाणें त्या अजिंक्य वीरानें देवांचे अश्व, हत्ती, रथ व पदाती यांचे समु-दायांत असाच मारा चालविलेला दृष्टीस पडूं लागला. त्या महाबाहु वीरानें श्येनपक्ष्याप्रमाणें सर्वभर पक्ष पसरून त्या सेनेला छिन्नभिन्न करून तिची शिरें तोडिलीं. त्या वेळीं मारून राहिलेले स्वार, पदाति, व रथ विष्वक्सेनासह विरोचनाकडेच धांवत चालले. हातीं ढाल, तर-वार, गदा, शक्ति, परिघ, प्रास, तोमर इत्यादि अनेक आयुधें घेऊन सर्वहीजण त्या एकट्या-वरच धांवून पडले व सिंहनाद करूं लागले. तेव्हां त्या दानवानें तरवार उगारून मोठ्या वेगानें रथ्यांचीं शिरें व धनुष्यें कापून काढिलीं. तो शत्रु-हंता बलाढ्य विरोचन त्या रथनागाश्वयुक्त सैन्यांतून एकवीस भिन्न गतींनीं फिरला. व भ्रांत, उद्भ्रांत, आविद्ध आप्लुत, विप्लुत, युग, संपात, व समुद्दीर्ण हे गतीचे प्रकार कसे असतात ते त्यानें करून दाखविले. त्या महात्म्या दानवाचे श्रेष्ठ तरवारीनें कांहीं वीर घायाळ होऊन ओरडूं लागले. व त्यांच्या ढालीचे तुकडे होऊन ते गतप्राण होऊन पडले. त्या महात्म्या दानवानें पाठीचीं सालें उडवून

वरील महात मारिल्यामुळें देवांकडील हत्ती सैरावैरा पळूं लागून आपलेच सैनिकांना तुडवूं लागले. त्या दृढधन्व्यानें कापून काढिल्यामुळें कित्येक तोमर, धनुष्यें, व महातांचीं शिरें आकाशांत व पृथ्वीवर पडूं लागलीं. कांहीं बलाढ्य हत्तींना उलट दिशेला पळवून लावून कांहीं बळकट घोड्यांवर उडून पडून व कांहीं रथ्यांचा समाचार घेऊन तो महाबल दानव रथ व त्यांवरील सारथी यांचे तुकडे करिता झाला. घटकेंत उड्डाण करून दाही दिशा फिरणाऱ्या व घटकेंत नानाप्रकारच्या गति चालणाऱ्या त्या यशस्वी दानवाच्या त्या चेष्टा पाहून देवही विस्मित झाले. कांहीं वीरांना त्यानें आपले पादाघातानेंच चूर केलें. दुसऱ्यांना आदळून मारिलें; कांहींना तरवारीनें तोडिलें. कांहींच्या मांड्या थंडावून ते तेथें धरणीवरच पडले. व कांहीं त्या दैत्याकडे पाहून भयानेंच प्राण सोडिते झाले.

याप्रकारें दारुण युद्ध चाललें असतांना रथसमूह, गज, अश्व व पदाती यांचा मोठा संहार उडाला असतां कुजम्भ नांवाचा दानवश्रेष्ठ अंश नांवाच्या आदित्याशीं लढूं लागला. त्यांच्या युद्धास उपमा बैलाबैलांचे टकरीची. तो मत्त हत्तीप्रमाणें गुर्मीदार व पर्वताप्रमाणें धिप्पाड दानव शीघ्रगामी, तीक्ष्ण व लखलखीत अशा अनेक बाणांनीं शत्रूवर प्रहार करूं लागला असतां देवांचे हजारों सैनिक रथांत बसूनही त्याचे बाणाचे टप्प्यांत कोठेंच टिकाव काढूं शकतना. भूतमात्रें आक्रंदूं लागलीं. दिशा अंधकारमय झाल्या व देवमंडळीला मोठाच दारुण पराजय प्राप्त झाला. उलटपक्षीं अंशानेंही कुजम्भाकडील अति चपल असे दशसहस्र कुंजर मारिले. आपले हस्तिदलावर अंशु हा तुटून पडलासें पहातांच तो शत्रूहंता दानव कुजम्भ हातीं गदा घेऊन रथाच्या उपस्थावरून खालीं आला आणि ती लोहमय व वजनदार अशी मोठी गदा हातीं धरून आ पसरलेल्या काळाप्रमाणें गजसैन्यावर धावूं लागला; व तो बलाढ्य गदापाणी दानवश्रेष्ठ ( कुजम्भ ) गदेनें हत्तींचा चुराडा करीत सैन्यांतून चालला. त्या बली वीरानें पाहून पाहून कांहीं हत्तींचे दांत पाडिले, कांहींचें गंडस्थळ फोडिलें. याप्रमाणें त्या कुजम्भानें पीडा दिल्यामुळें गज दशदिशा पळूं लागले. कुजम्भ दानवाचे जे घोरपराक्रमी साह्यकर्ते दानव होते, त्यांनीं नानाप्रकारचे तीक्ष्ण बाणांनीं गजयोद्ध्यांवर हल्ला केला. कुंजम्भ दानव सुरे, क्षुरप्र जातीचे बाण, भाले, अर्धचंद्र[1]लिक जातीचे तीक्ष्ण बाण, यांनीं शिरच्छेद करीत सुटला. त्या तुटून पडणाऱ्या शिरांनीं आकाश भरून गेलें; व दगडांचा वर्षाव होतोसें भासलें. हे महाराजा, गजाचे पृष्ठावर बसलेले गजायोधी यांचीं मुंडकीं तुटलीं जाऊन केवळ अंकुशयुक्त बाहूच उभे असल्यानें शेंडे तोडलेल्या तालवृक्षाप्रमाणें ते दिसूं लागले. इतक्यांत अंशाचा सर्वांत थोरला हत्ती आपणावर येतोसें पाहून कुजम्भ दानवानें रागांत एकाच बाणानें त्यावर प्रहार केला. त्याबरोबर त्या हत्तीनें तोंड फिरविलें.

याप्रमाणें त्या दानवश्रेष्ठ कुजम्भानें हस्तिदलाची खळबळ उडवून मग ठळक ठळक अशा वीरांवर गदाघात चालू केला. गदेच्या एकएका तडाक्यास तो कुजम्भ पर्वताप्रमाणें हत्तींचीं धुडें हाणून पाडीत असतांना देव तोंडांत बोटें घालून पहात राहिले. इंद्रानें वज्रानें तोडून पाडलेल्या पर्वताप्रमाणें ते हत्ती कुजम्भाचे वाटेंत आड पडून राहिले. सर्व देवांना तर तो मूर्तिमान् यमसाच वाटला.

१ या बाणाचे अग्राला घोड्याचे नालासारखें तोंड बसविलें असते.

सिंहाला पाहतांच क्षुद्र मृगांची जशी तिरपीट उडावी, तशी त्या दानवाला पाहून हत्तींची तिरपीट उडाली. तो वीर हत्तींच्या रक्तानें शिंतडलेली ती गदा हातीं घेऊन आ पसरून गर्जना करीत करीत चालला असतां फार भयंकर व विक्राळ दिसूं लागला. पूर्वी प्रजासंहारकालीं ज्याप्रमाणें भगवान् शंकर दिसत, त्याप्रमाणें तो महावीर रणांत गदेचा खेळ करीत असतांना भासला. गुराखी ज्याप्रमाणें काठीनें गुरें वळतो, त्याप्रमाणें तो भीमपराक्रमी असुर गदेच्या दांड्यानें मोठमोठ्या हत्तींना वळवीत असतांना अकालींच क्रुद्ध झालेल्या कालाप्रमाणेंच देवांना दिसला. कांहीं हत्तींवरील आरोही मारिले जाऊन कुजम्भाचे बाणांनीं व गदांचे आघातांनीं छिन्नभिन्न व अत्यंत सक्षत होऊन, त्याच्या गदेचा वेग सहन न झाल्यामुळें आपले सैन्याकडे धांव ठोकूं लागले. महावात ज्याप्रमाणें मेघपटलाला उडवून लावितो, त्याप्रमाणें गदेच्या तडाक्यानें हत्तींना पळवून संवर्तक कालाप्रमाणें तो कुजम्भ रणभूमीवर उभा राहिला.

## अध्याय सत्तावन्नावा.

—:०:—

### वृत्रासुराची सरशी.

वैशंपायन सांगतातः—नंतर देवेंद्राचे आज्ञेवरून सर्वेही देवसैन्यें भयंकर गर्जना करीत दैत्यसेनेवर चाल करूं लागलीं. ती देवांची अजिक्य सेना म्हणजे एक अपरंपार बलौघच होता. रथ, हत्ती व अश्व यांची तींत गर्दी असून शंख व भेरी यांचे ध्वनी उठत होते. ती कूच करीत असतां सर्वत्र धूळ उडाल्यानें तिचा पारच दिसेना. तीरमर्यादेचे आंत खळबळणाऱ्या पर्वकालीन समुद्राप्रमाणें अक्षोभ्य अशा दैत्यसैन्यावर ती उसळून येत होती, त्यावेळीं प्रेक्षकांना केवळ अविश्वसनीय व अद्भुत असें तें अफाट सेनारूपी एक आश्चर्यच वाटूं लागलें. तथापि तो बलाढ्य कुजम्भ मोठ्या शिताफीनें तसल्या रथकुंजराश्वयुक्त देवांच्या युद्धोद्यत सेनासमुद्राला वेढा देऊन मेरुपर्वताप्रमाणें उभा राहिला. आणि गदेच्या योगानें त्या सैन्याचें निवारण करूं लागला. त्या वेळीं त्याच्या प्रतिकारामुळें ती सेना विव्हळ होऊन लटकी पडली. याप्रमाणें कुजंभाचे गदेचा भयंकर प्रहार सुरू असतां असिलोमा नांवाचा एक दानवश्रेष्ठ त्या सर्व देवसैन्याला धूमकेतूप्रमाणें भासणारा युद्धार्थ उठला. त्यानें सूर्य ज्याप्रमाणें अंधकाराला पळवून लावितो, त्याप्रमाणें त्या रणांत देवसैन्याची अवस्था करून सोडिली. आणि सूर्याप्रमाणें तेजस्वी रथांत बसलेल्या त्या प्रतापी दानवानें मेघवृष्टीप्रमाणें देवसैन्यावर शरवृष्टि चालविली. असा तो भीषण, क्रूर, दुरासाद्य व घोर पराक्रमी समर्थ दानव सेनेच्या अग्रभागीं उभा राहून देवमंडळीबरोबर लढत असतां बाणशीर्षीनें चमकत होता व देवसेनेला ग्रासतोसा भासत होता. त्याची मुद्राही उग्र असून, त्याचे बाणही उग्रच होते.

असा तो दैत्य महागजावर आरूढ होऊन देववीरांचीं मुंडकीं तोडीत चालला. तो बलाढ्य व प्रतापी दानवश्रेष्ठ याप्रमाणें देवसेनेला ग्रासीत असतांना बाण याच ज्याच्या दाढा आहेत, तरवार हीच ज्याची जिव्हा आहे, चक्र हाच ज्याचा हात आहे, धनुष्य हेंच ज्याचें पसरलेलें जाभाड, परशु हेच नखरे व मृदंगतुल्य ध्वनी हीच ज्याची गर्जना आहे, असल्या व्याघ्राप्रमाणें शोभूं लागला. किंवा धनुष्याचे दोरीचा टणत्कार हीच ज्याची गर्जना आहे, मोठा बाणवर्षाव हाच ज्याचा जलबिंदुपात, लवणारें धनुष्य हीच ज्यांतील

विद्युल्लता, त्याचे भोंवतालचा रक्षकगण हाच जलसमूह, अशा प्रकारचा तो महामेघच; अथवा तो एक बाणरूपी अस्त्रांचा भयंकर सागरच म्हणावा. कीं, ज्यामध्यें त्याचे बाहु हेच नक्र होत व धनुष्याचें चमचम लवणें याच त्यांतील लाटांच्या माळा, बाणांची गर्दी हाच त्यांतील खोल डोह, गदा व असि हेच त्यांतील मगर व यांचे योगानें जो भयप्रद दिसणारा, धनुष्याची दोरी हीच त्याची तीर-मर्यादा, युद्धशिक्षेची अंगीं असलेली मस्ती तीमुळें उद्दाम दिसणारा, भोंवतालचे पदाती हेच त्यांतील मत्स्य व वीरघोषणा हेंच त्याचें गर्जित. अशा त्या वीररूपी महासमुद्रानें घोडे, हत्ती, पदाति व अनेक रथ व शत्रूकडील महारथी वीर यांस युद्धांत बुडवून टाकिलें. त्या दारुण दानवश्रेष्ठानें देवसमूहाला ठार बुडवून सोडिलें. युद्धांत सर्वथा अढळ असणारा असा तो श्रेष्ठ योद्धा युद्धाचा चिलखत वगैरे लखलखित पोषाख अंगावर चढवून युद्धभूमीवर जळत्या विस्तवाप्रमाणें झळकत असतां देवगण त्याजकडे पहात राहिले. त्या वेळचें त्याचें तेज मध्यान्हीचे सूर्याप्रमाणें असल्यामुळें त्या दानवाकडे सामान्य प्राण्यांना तर पहावेचना. ग्रीष्मकालाचे अखेर ज्याप्रमाणें वणवा वाढलेलें गवत जाळून टाकितो, त्याप्रमाणें तो असुर स्वतेजानें देवदानवांचीं सैन्यें जाळून काढूं लागला व विक्राळ आरोळ्या देऊं लागला. त्याबरोबर सर्वत्र एकच घोंटाळा माजला, व सर्वजण मूढ होऊन बसले. हत्ती, घोडे, रथधुरी यांवर बसलेले बलाढ्य शूर वीर होते, त्यांनीं थोर मन करून रणाचा त्याग मात्र केला नाहीं.

मग देवदानवांचें अंगावर रोमांच आणणारें व सर्वांस व्याकुळ करून सोडणारें असलें घोर युद्ध झालें कीं, त्यांत रक्तस्रावानें चिखल पडला. भयाचें ससेमिरें मागें लागल्यानें कोणाला ही दिशा कोणती हेहीं उमगेना. वीर हातीं शस्त्र घेतलेले मूढ होऊन जागचे जागीं थबकले. आपले पक्षाचा कोण, आणि परपक्षाचा कोण हें त्यांस कांहींच ओळखेना. कोणी वीर ओंठ चावीत चावीत दुसऱ्या वीराची शेंडी बळकट धरून मुंडकें तोडूं लागला. ते सशस्त्र वीर मधून मधून आपल्या वज्रप्राय दृढ अशा बाहूंनीं व मुष्टींनीं परस्परांना प्रहार करूं लागले. असें तें स्वर्गाचें दार खोलणारें व वीरांचे प्राण हरण करणारें महाभीषण रण तुंबळ माजून सर्वत्र भीति उठली असतां प्रतिघाताचे इच्छेनें घोड्यावर घोडा, हत्तीवर हत्ती, व वीरावर वीर वेड्यासारखे धांवूं लागले. मोठमोठे पराक्रमी महारथी देव व असुर वीर त्या महायुद्धांत परस्परांना मारून प्राणाच्या आहुती देऊं लागले. केश मोकळे सुटलेले, कवचहीन, व रथहीन झालेले असुरवीर: हातांतील धनुष्यें तुटून पडलीं असतां नुसत्या हातापायांनींच देवाशीं लढूं लागले. त्या गर्दींत हरीनें एक तीक्ष्ण बाण सोडिला. त्या बाणानें त्या असिलोम्याचें धनुष्याचें अग्र तोडून भुईवर पाडिलें. नंतर हरीनें पुनरपि नतपर्व असे शंभर बाण• मोठ्या झपाट्यानें त्या दैत्यावर सोडिले. ते त्याच्या देहावर सोडिलेले बाण वाटेंत वाऱ्याचें साह्य मिळाल्यानें फारच जोरानें त्या दैत्याचे देहांत निम्मानिम घुसले. देहांत ते बाण घुसल्यानें अंगांतून रक्ताचे ओघळ वाहूं लागले. त्या वेळीं तो दैत्य लाल गेरू बाहेर टाकणाऱ्या पर्वताप्रमाणें दिसूं लागला. त्यावर आणखीही एकवार नतपर्व शंभर बाण ( हरीनें ) सोडिले. तेव्हां असिलोमा फारच चवताळला, आणि त्यानें दुसरें मोठें मनुष्य घेऊन सोनेरी दांड्याचे तीक्ष्ण बाण सोडिले. त्या सर्प, अग्नि, किंवा विष यांप्रमाणें तीव्र असणाऱ्या बाणांनीं

मेघांनीं पर्वत झांकावा त्याप्रमाणें त्याचें शरीर झांकून टाकिलें. मग पुनरपि यमतुल्य घातक व सूर्याप्रमाणें प्रकाशमान असा एक चांगल्या दांड्याचा अप्रतिम बाण त्यानें धनुष्यास योजून सोडिला. त्या घोरबाणप्रहारानें देव हरिही एकाएकीं मूर्च्छित होऊन भूमीवर पडला. देव हरि जेव्हां भूतळीं पडला तेव्हां सर्वत्र हाहाःकार उडाला. व देवमंडळीसहित सर्व जगत् आकाशांतून सूर्य पतन पावला असतां शोकमग्न व्हावें, त्याप्रमाणें शोकमग्न झालें. अशा समयीं त्या दानवानें त्या हरीच्या परिवारापैकीं एकतीस सहस्र योद्धे मारून जयश्रीनें मिरवत, पेटलेल्या पर्वताप्रमाणें चमकत, हातीं घोर धनुष्य घेऊन तो इंद्राचे रथाकडे गेला.

याचप्रमाणें त्या महायुद्धांत दोघेही योद्धे अश्विनीकुमार आपले सैन्यासह देवशत्रु जो बलवान् वृत्र त्यासह लढूं लागले. तो दैत्यही जिवावर उदार होऊन व हातीं धनुष्य, बाण व खड्ग घेऊन अश्विनीकुमारांना गांठून पर्वताप्रमाणें अढळ उभा राहिला. व शत्रूचे अंगावर कांटा आणणारा शंख वाजवून आणि धनुष्याचे दोरीचा व तळव्याचा टणत्कार करून तो भूतमात्रांस कांपवूं लागला. त्या वेळीं त्या वृत्रासुराची आरोळी व त्याचे शंखाचा शब्द यक्ष, राक्षस व देवसमूह यांचे कानीं पडतांच त्यांचे अंगावर रोमांच थरारले. मग यक्ष व राक्षस यांचे हातांतून गदा, तोमर, निस्त्रिंश, शूल, परश्वादि शस्त्रें झळकूं लागलीं. तेव्हां त्या धिप्पाड अशा यक्षराक्षसांनीं सोडलेले ते शूल, शक्ति व परशु यांचा त्या वृत्रासुरानें भयंकर वेगानें सणाणणारे असे बाण सोडून उच्छेद केला. आणि जे कोणी देवांचें बरें पहाणारे होते, मग ते अंतरिक्षांत असोत वा भूमीवर असोत, ते ओरडत असतां वृत्रानें त्यांचा वध केला. यक्ष व राक्षस यांपैकीं बहुतेकांचीं शिरें व शरीरें वृत्रानें सोडिलेल्या बाणांनीं छिन्न झालेलीं दिसत होतीं. इतक्यांत गदा व परिघ यांनीं छिन्न झालेल्या देवांच्या शरीरापासून रक्ताची वृष्टि धरणीवर पडली. किरणजालानें ज्याप्रमाणें सूर्य आच्छादिला जावा त्याप्रमाणें शत्रूला बाणांचे पटलानें झांकून टाकितांना सर्वांनीं त्या भीमपराक्रमी वृत्रासुरास पाहिलें. सर्वेही देवतांना तो चंडकिरण सूर्याप्रमाणें ताप देऊं लागला. व क्रोधाचे भरांत त्यानें मर्मभेदक बाणांनीं शत्रूला दांडगाईनें वेध केला उलटपक्षीं शत्रूचे अनेक बाणांनीं पीडित झाल्यामुळें तो असुरेंद्र जरी नानाप्रकारें शब्द करीत होता तरी तो रणांत मूर्च्छित झालेला कांहीं देवांस दिसला नाहीं. महारथी देवमंडळीनें त्या वृत्रावर ढाल, तरवार, गदा, परिघ, प्रास, तोमर, परशू, शूल वगैरेंचा वर्षाव चालविला होता. देवांनीं याप्रमाणें त्रास दिल्यानें संतापून जाऊन त्या अमोघपराक्रमी बलवान् वृत्रानें तीक्ष्ण अशा बाणांनीं त्या सर्व देवांस झांकून टाकिलें. वृत्रासुराच्या या कृतीनें देव भयभीत होऊन, त्यांनीं आपआपलीं महायुधें इकडे तिकडे टाकून दिलीं व भयानें घोर असा आर्तस्वर काढून ते रडूं लागले. आणि गदा शक्ति, शूल, ऋष्टि, परिघ, अशनि वगैरे सर्व टाकून देऊन त्या दृढधन्वी वीराचे त्रासानें उत्तर दिशेला पळाले.

या प्रकारें हातीं शूल, शक्ति व गदा घेतलेला, रुंद छातीचा, तो महाभुज वृत्रासुर चराचराला त्रास देत रणांगणीं उभा राहिला. इतक्यांत त्या अप्रतिम वृत्रासुरावर कोणी एक बलवान् व महाबाहु वीर हातीं असि व शूल धारण करून धांवत आला. तेवढ्यांत मदमत्त गजाप्रमाणें वृत्रासुर उलट आपणावर तुटून येत आहेसें पाहतांच त्या वीरानें वत्सदंत नामक तीन

बाणांनीं वृत्राचे बगलेंत वेध केला. तेव्हां तो अमित पराक्रमी व महाधनुर्धर वीर त्या बाणांनीं फारच घायाळ झाला. आणि गदायुद्धांत निपुण असल्यामुळें त्यानें त्यावेळीं हातीं गदा घेतली. मग ती भक्कम लोखंडी गदा हातीं घेऊन, त्या बलाढ्य वृत्रानें एकाएकीं अश्विनीकुमाराला तडाका दिला. तेव्हां अश्विनीकुमारानें एक मोठा प्रशस्त, तेजस्वी, बळकट आणि अंगावर रोमांच आणणारा, असा शूल वृत्रावर टाकिला. वृत्र हा गदायुद्धांत इतका कुशल होता कीं, त्यानें गदेनेंच त्या शूलाचा चुराडा करून गरुडानें सर्पास धमकी द्यावी त्याप्रमाणें अश्वीला तंबी दिली. आणि नंतर आकाशांत उड्डाण करून त्या बलाढ्य राक्षसानें ती गिरिशृंगतुल्य विशाळ गदा गरगरावून अश्विनावर फेंकली. गदेचा जेव्हां तडाका बसला, तेव्हां त्या अश्वीनें आपला उत्कृष्ट शूल फेंकून देऊन इंद्र जिकडे युद्ध करीत होता तिकडची वाट धरली.

याप्रकारें भीमपराक्रमी अशा अश्विनाला युद्धांत पराजित करून तो वृत्रासुर विजयश्रीनें शोभायमान होत्साता त्या रणभूमीवर उभा राहिला.

## अध्याय अठ्ठावन्नावा.

—:०:—

### केशिरुद्रयुद्ध.

वैशंपायन सांगतातः—त्याच देवासुर महायुद्धांत रणाजि नांवाचा एक साध्यदेव एकचक्र नामक एका बुद्धिमान् दैत्याशीं लढूं लागला. त्या महाबल रणाजीनें मोठ्यानें गर्जना करून व एकचक्राचे रथाचा मार्ग झांकून टाकून त्याचे सैन्यावर बाणांचा वर्षाव चालविला. शिवाय त्याचे साह्यकारी जे अन्य बलाढ्य महासुर होते, ते पट्टा खेळण्यांत मोठे कुशल होते व त्यांनीं त्या युद्धांत शूल आणि भुशुंडी या अस्त्रांचा मारा चालविला. याप्रमाणें त्या दैत्यांनीं सोडिलेला तो गदा व शक्ति यांसहित शूलांचा वर्षाव चराचराला अनिवार होऊन देवसैन्यांत घुसूं लागला. या प्रकारें देव व दैत्य या दोन्ही पक्षांकडील पर्वतशिखराप्रमाणें धिप्पाड व मोठे वीर्यवान् आणि बलाढ्य योद्धे एकमेकांवर हल्ला करूं लागले. त्या वेळीं त्या एकचक्र महासुराचे रथाला हिरण्यकशिपूचे रथाप्रमाणें शंभर घोडे जुंपले होते. त्या घोड्यांच्या पायांच्या तुडविण्यानें व चाकांच्या धांवेच्या शब्दानें, तसेंच त्याच्या बाणपातानें, शेंकडों देव मारिले गेले. इतक्यांत तो वीर क्रुद्ध होऊन त्यानें हलके चित्रविचित्र व नतपर्व असे बाण मारून शेंकडों हजारों हत्यारबंद वीर तोडून काढिले. उलटपक्षीं देवांनींही त्या युद्धांत आपले अंगावर तीक्ष्ण शरांचा आघात होत असतां असतां दैत्य पक्षाकडील किती तरीं रथ, हत्ती, घोडे फडशा केले.

या प्रकारें आपलेकडील रथादिकांचा क्षय चाललेला पाहून ते दैत्य हातचे बाण टाकून घेऊन परतले व दुसरीं उंची उंची आयुधें घेऊन सज्ज झाले. मग त्या युद्धांत प्रत्येक दिशा आणि विदिशांचा प्रतिरोध करून त्या दितिपुत्रांनीं देवांवर तीक्ष्ण शस्त्रांचा आघात चालविला. तशांत महाबाहु रणाजि यानें अत्यंत जाज्वल्य, घोर, व उग्र तेजाचें असें मंथन नांवाचें एक अस्त्र सोडिलें. त्या अस्त्रापासून निर्माण झालेलीं अत्यंत तीक्ष्ण अशीं किती तरीं शस्त्रें व शूल त्या अतिवीर्यशाली दैत्यानें कापून काढिले. या प्रमाणें त्या एकचक्र महासुरानें शत्रूकडील सर्व शूलांचें आपल्या एकाच शूलानें छेदन करून दहा शिशित बाणांनीं त्या साध्याचा वेध केला. या प्रकारें रणाजीच्या अस्त्रांचा वेग हाणून पाडून नंतर

त्या दैत्यानें मोठीं वेगवान् व उज्ज्वल अशीं दुसरीं अनेक अस्त्रें सोडून त्या रणाजींचे हजारों सैनिकांचा वेध केला. तेव्हां वर्षाकालीं पर्वतशिखरें ज्या प्रमाणें आपले अंगापासून जलधारा सोडितात, त्या प्रमाणें त्या सैनिकांचीं तीं छिन्नभिन्न गात्रें रक्तस्राव सोडूं लागलीं. इंद्रवज्राप्रमाणें ज्यांचा स्पर्श कठोर असून जीं सरळ रेषेनें नेमकीं अंगावर येऊन आदळत, असल्या अस्त्रांचा जेव्हां दैत्यांनीं मारा चालविला तेव्हां प्रमुख देवमंडळी भिऊन गेली. एकचक्रानें रथांत उभा राहूनच हत्तींचे कळपांतील म्होरक्ये हत्तींवर नजर फेंकली. त्या हत्तींवर उंची अलंकार चढविले होते, त्यांचा खळखळाट चालला होता. समुद्राचे गर्जनेप्रमाणें ते स्वतः गर्जत होते. मदोन्मत्त होऊन गुर्मीस चढलेले, व्यवस्थित उभे केलेले, वर महात बसलेले, अस्सल अवलादींचे, मोठे वीर्यवान् आणि परपक्षाचे हत्तींवर प्रहार करणारे, युद्धाचे कामीं गजशिक्षेच्या नियमाप्रमाणें शिकवून तयार केलेले, युद्धांत केवळ ऐरावताचे तोडींचे असे ते देव सैन्यांतील हत्ती होते. त्यांवर त्या एकचक्रानें एकाद्या गजाप्रमाणेंच हल्ला केला. ते हल्ला केलेले हत्ती लहानसहान नव्हते. ते केवळ उठून आलेले महापर्वतच दिसत असून त्यांचा कंठ, शुंडा व गंडस्थळ या तिन्हीं ठिकाणीं मदधारा वहात होत्या. त्यांची गर्जना मेघगर्जनेतुल्य होती. त्यांची संख्या हजारोंनीं होती. त्यांचे अंगावर सोन्याचे अलंकार व सोन्याच्या झुली घातल्या असल्यानें ते फार दिव्य, केवळ तरुण सूर्याप्रमाणें तेजस्वी, दिसत होते. परंतु असल्याही प्रचंड हत्तींना त्या गदाधरांत श्रेष्ठ जशा एकचक्र दैत्यानें आपले गदेच्या तडाक्यानें, वायु ज्याप्रमाणें मेघांस पिटाळून लावितो त्याप्रमाणें पिटाळून लाविलें.

याप्रमाणें त्या गजमर्दक बलाढ्य महासुरानें गदेनें त्या सर्वेही गजांस निर्दाळून मग आपली दृष्टि अश्वसैन्याकडे फेंकली. त्यांतील कांहीं अश्व पोपटी रंगाचे होते, कांहीं करडे रंगाचे होते, कांहीं मोरासारखे होते, कांहीं पारव्याच्या रंगाचे, कांहीं हंसाच्या वर्णाचे, कांहीं क्रौंचवर्ण होते, कांहीं मल्लिकाक्ष जातीचे म्हणजे ज्यांचे डोळ्यांत पांढरे कवडे आहेत असे होते. कांहीं विरूपाक्ष होते. त्या अश्वांची गति मनाप्रमाणें चपळ होती. असलें तें अश्वांचें सैन्य त्या अप्रतिवीर्य व भीमपराक्रमी बलाढ्य राक्षसानें आपले गदाघातानें ठार केलें. त्या अचिंत्यपराक्रमी श्रीमान् रणाजीनें त्या रणांतील सर्व दैत्यांकडे पाहून देवसेनेकडे धांव घेतली. तो गदायुद्धांत कुशल असून रथसमुदायाचा अग्रणी होता. तो महाबाहुरथांत बसून आपले आनंदित सैन्यासह इंद्राकडे चालला. इकडे तो दैत्यश्रेष्ठ तीस हजार रथांचा चुराडा करून निर्धूम अग्नीप्रमाणें झळकत रणांत उभा राहिला.

याप्रमाणें पराक्रम केल्यावर बळाचा गर्व चढलेला तो महासुर, महात्मा मृगव्याध जो रुद्र, त्याशीं लढण्यास प्रवृत्त झाला. त्या वेळीं त्या रुद्राचे पारिषदगण दैत्यसैन्याला पाहून आहुती दिलेल्या अग्नीप्रमाणें चमकत उठले. त्यांजबरोबर मत्त गज, दिव्य रथ, अतिचपल अश्व, अनेक अस्त्रें, तीक्ष्ण बाण, व अग्नीसारखे शर हे होते. इतक्यांत अत्यंत तेजोयुक्त अशा किरणमालांनीं युक्त असणाऱ्या उदयारूढ सूर्याप्रमाणें देदीप्यमान् असा तो महासुर त्यांचे दृष्टीस पडला.

---

१ येथें छापील पोथींतला पाठः "अभ्ययाद्देववाहिनीं" असा आहे, त्याचा हा अर्थ आहे. लेखांपोथींत "सयुद्धाद्विररामह" असा पाठ आहे. त्याचा अर्थ तो युद्ध करण्याचा थांबला. असा आहे.

तो रणांगणीं उभा असून त्याचा वेग, त्याचें सत्व, त्याचें बल, त्याची गति, त्याचा उत्साह, त्याचा देह व त्याचा रथ हीं सर्वच विशाल होतीं. व तो महायोद्धा सर्वच दिशा व्यापून उभा असलेला दिसत होता. त्या वेळीं ते गण घोर आयुधें घेऊन चहूंबाजूंनीं त्याजवर पडले. व त्याच्या त्या पर्वतशिखरतुल्य मस्तकावर मृगव्याधानें मोठे जलाल धारेचे, अग्राला पीतवर्ण, किंवा विषदिग्ध व सर्वांगीं लोहमय असे बाण टाकिले. त्या मस्तकावर टाकिलेल्या सात बाणांनीं भुताटल्यासारखा होऊन किंवा विद्ध होऊन त्यानें एकाएकीं आकाशांत उडी घेतली व गर्जनेनें दशदिशा दणाणून सोडिल्या. त्या वेळीं महाबलि देववीर जो मृगव्याध यालाही आनंद होऊन तो आपला रथ व धनुष्य घेऊन आकाशांतच त्याचा पाठलाग करूं लागला व आकाशांतच बाणवृष्टीनें त्यानें त्या असुराला आच्छादून टाकिलें. उष्णकालाचा अंत होऊन पर्जन्यमय आला असतां वृष्टिमान् मेघानें ज्याप्रमाणें पर्वताला आच्छादन टाकावें त्याचप्रमाणें हें त्यानें केलें. त्या वेळीं त्या मृगव्याधानें त्या दैत्याला गांजून सोडिलें असतां त्यानें आकाशांतच मेघाप्रमाणें घोर गर्जना केली. व दूरावरून मृगव्याधाचे रथावर मोठ्या वेगानें एखाद्या पक्षयुक्त पर्वताप्रमाणें जाऊन आदळून मृगव्याधाचा रथ, त्याचे दांडे व धुरीचे तुकडे करून मोडून टाकिला.

त्या वेळीं तो महाबल मृगव्याध तो मोडका रथ सोडून भूमीवरच उभा राहिला. मग रुद्राला विरथ पहातांच त्याचे भले पारिषदगण उग्र व लाल डोळे करून व हातीं मोगरे घेऊन आकाशांत उसळले. त्यांनीं एकाएकीं निर्मल आकाशांत उशी घेऊन त्याला वेढा देऊन, कुऱ्हाडींनीं वृक्ष पाडावा, त्याप्रमाणें आपल्या भयंकर मुद्गरांनीं त्याला पिटून काढिला. त्या गरुडाप्रमाणें पराक्रमी महारथानें तसल्या चपल गणांचाही वेग हाणून पाडून पुनरपि भूतलावर उडी घेतली. आणि त्या बलाढ्यानें एक विस्तीर्ण शाखांचा शालवृक्ष उपटून त्याखालीं सर्व पार्षदगण झोडून काढिले. त्या झगड्यांत त्या पार्षदांच्या आघातानें तो दानवश्रेष्ठ रक्तबंबाळ होऊन उदित बालसूर्याप्रमाणें शोभूं लागला. पुनरपि तो दैत्य वरील श्वापदें, हत्ती, व वृक्ष यांसह एक पर्वताचें शिखर उपटून त्या पारिषदांना त्या रणांत हाणूं लागला. याप्रकारें त्या महापारिषदांचा मोड केल्यावर उरलेलें सैन्य त्या बलाढ्य दानवानें तेव्हांच मारून टाकिलें. युगांतीं ज्याप्रमाणें अंतक प्रजेला मारीत सुटतो, त्याप्रमाणें त्यानें सपाटा चालवून घोड्यांनीं घोडे, हत्तींनीं हत्ती, योद्ध्यांनीं योद्धे व रथांनीं रथ नाशिले. याप्रमाणें देवमंडळीकडील मेलेले घोडे, हत्ती, डोळे फुटलेले महारथी, यांचे योगानें रणभूमि सर्वभर व्यापून गेली. या प्रकारचा पराक्रमी तो दैत्येंद्र व बलवान् मृगव्याध हे दोघेही मदमत्त गजांप्रमाणें युद्धांत सरसावले होते.

वैशंपायन सांगतातः—याच रणभूमीवर राहु नामक दानवाशीं त्रैलोक्यांत जो अजएकपाद या नांवानें प्रसिद्ध आहे, व जो क्रोधाची केवळ मूर्ति, तो द्वितीय[1] रुद्र युद्ध करीत होता. या दोघांचें युद्ध फारच तुंबळ, केवळ अंगावर रोमांच आणणारें, आणि जयेच्छु वीरांना परस्पर भय देणारें असें झालें. त्या युद्धांत रक्ताची नदी वाहूं लागली. तींत मृत वीरांचे केश हेच शेवाळीच्या जागीं असून तींतून देव व दानव यांचे प्रेतसमुदाय

१ एकंदर रुद्र हे अकरा आहेत हें प्रसिद्धच आहे. येथें मृगव्याध हा एक रुद्र वर सांगितला असल्यानें अजएकपाद् याला द्वितीय म्हटलें आहे.

वाहात चालले असल्यानें तींतून वाट नाहींशी झाली होती. अशा वेळीं भयंकर आकृतीचा व सामर्थ्यवान् जो रुद्र यानें संतापून शत्रुसैन्य-निवारक त्या शतमुखी राहूला प्रहार केला. व रागाच्या तडाक्यांत त्या श्रीमान् रुद्रानें आपले बाणांच्या योगें त्या दैत्याचीं सोनेरी नक्षीदार बाहुभूषणें, व अश्व आणि सारथी यांसह त्याचा रथ, यांचा चुराडा केला. इतक्यांत त्या रुद्राच्या एका बलाढ्य पारिषदानें आनंदांत आपल्या बाणबलानें त्या राहूच्या छातींत भेद केला. याप्रमाणें रुद्र व त्याचे पारिषदगण यांच्या हातून राहू घायाळ झाला असतां त्याचा क्रोध अनावर होऊन त्यानें एकाएकीं समोरून येणाऱ्या रुद्राच्या रथाचा चपराकीनें चुराडा केला. व अति तेजस्वी रुद्रानें तीक्ष्ण बाणांनीं घायाळ केलें असतांही त्या महासुरानें त्या रुद्राचे सर्व पारिषदगण ठोकून टाकले. तेव्हां त्या रुद्रानें आपणावर वाणवर्षाव सोडणाऱ्या त्या विक्राळ दानवाचा नतपर्व अशा बाणांनीं भेद केला.

याप्रकारें अंगावर रोमांच उभे करणारा असा घणघोर संग्राम चालू असतां ज्यांतून रक्ताचे ओघ मोठ्या सपाट्यानें चालले आहेत अशा रक्ताच्या नद्या वाहूं लागल्या. सूर्य ज्याप्रमाणें आपले किरणांनीं मेरुपर्वताचा भेद करितो त्याप्रमाणें रुद्रानें त्या काजळाच्या राशीप्रमाणें कुट्ट अशा दानवाचा वेध केला. याप्रमाणें शूल, शक्ति, परशु यांच्या योगानें मारिले जाऊन ते पर्वताकार व कामरूपी मुख्य मुख्य दानव समरभूमीवर पडले. याप्रकारें तो अंगावर रोमांच आणणारा संग्राम चालू असतां ते दैत्य फुललेल्या पळसाप्रमाणें लाल दिसत होते. त्यांतच मोठमोठ्याल्या भेरी, मृदंग, पडघम, शंख, वेणु, इत्यादिकांचे शब्द एकत्र मिसळल्यानें एक अपूर्वच ध्वनि ऐकूं येत होता. तशांत घायाळ झालेले दैत्य ओरडत असतां त्यांचा शब्द व देवांकडीलही भयंकर आरोळ्या ऐकूं येत होत्या. घोड्यांच्या खुरांनीं उधळलेली व रथांच्या धावांनीं उठलेली धूळ पसरून तिनें योद्ध्यांच्या दृष्टि व मार्ग बंद केला. व ती युद्धभूमि शस्त्रें व पुष्पमाला किंवा शस्त्ररूपी पुष्पमालांनीं अलंकृत दिसत होती रक्तमांसाचा चिखल माजून जाऊन त्यांतच मोडलेलीं खड्गें, गदा, शक्ति, तोमर, पट्टिश यांचे तुकडे, त्याचप्रमाणें निरुपयोगी म्हणून टाकलेले व कांहीं मोडून पडलेले असे रथ, युद्धांत मारलेले वीर, देवदानवांनीं हाणून पाडलेले उन्मत्त हत्ती, तशींच मोडून धरणीवर पडलेलीं शस्त्रें व रथांचीं मोडलेलीं चाकें, आंस आणि जोकडें, या सर्वांच्या योगानें ती संग्रामभूमि अतिच भयंकर दिसूं लागली. तेथें मांसभक्षक प्राण्यांच्या झुंडीच्या झुंडी लोटल्या. एकमेकांशीं वैर बांधलेल्या व जयासाठीं हपापलेल्या दैत्यवीरांचीं शिरें तुटलेलीं धडें सर्वत्र नाचूं लागलीं. व कांहीं केल्या मागें न फिरणाऱ्या शूर व झुंजार अशा योद्ध्यांचा अत्यंत भयंकर प्रहार सुरू झाला. विशेषतः, एकपाद अज व महात्मा राहु यांचा, त्या वेळीं संतापून एकमेकांवर पडत असतांना वीरांनीं दिलेल्या आरोळ्यांच्या योगानें प्रलयकालीं समुद्र उसळतांना जसा त्याचा शब्द ऐकूं येतो, त्याप्रमाणें आक्रोश ऐकूं येऊं लागला.

अशांत केशी नामक दानवाचा, हातीं गदा, परिघ व शूल धारण करणाऱ्या एका धूम्रलोचन मुनिश्रेष्ठ रुद्रानें, शक्तीनें भेद केला. व त्या रुद्राच्या कृपेंतील बरेचसे गण, ज्यांचीं नांवें व पराक्रमही भयंकर होते, असे हातीं नानाप्रकारचीं प्रहरणें घेऊन चाल करूं लागले. इकडे उंची सोन्याचीं कुंडलें घातलेला व तेजस्वी असा तो केशी दानव रथांत बसून

आपल्या परिचारक दानवांसह युद्धांत अजिंक्य अशा प्रतिभटांशीं झुंजत होता. तो युद्धनिपुण व उग्रवीर्य केशी युद्धोत्कंठेनें रणांत पुढें सरसावत असतां त्याचे मुखांतून तेजाची ज्वाळा बाहेर पडूं लागली. त्याचे खांदे मृगेंद्राप्रमाणें असून त्याचा पराक्रम व्याघ्राप्रमाणें होता. त्याची कांति महामेघाप्रमाणें होती व त्याचा आवाज मृदंगाप्रमाणें गंभीर व मांसल होता. आपल्या दानवांनीं परिवेष्टित होऊन तो शत्रूवर तुटून पडत असतां त्यानें असा कांहीं महानाद केला कीं, त्या योगानें अंतरिक्ष हलखलून गेलें. व त्या शब्दाच्या योगानें चकित झालेली देवांची महासेना वृक्ष व शैल यांचींच आयुधें हातीं घेऊन युद्धासच प्रवृत्त झाली.

याप्रमाणें एकमेकांला लढाई देऊं इच्छिणाऱ्या त्या देवदानव वीरांची अशी कांहीं झिमड माजली कीं, ती पाहून सर्व लोक भयकंपित झाले; याप्रमाणें देव व दानव यांचे समुदाय जिवावर उदार होऊन रणांगणीं लढत असतां त्यांचें युद्ध इतकें घोर झालें कीं, त्यानें लोकांच्या अंगावर रोमांच थरारले. परस्परांचा प्राण घेऊं पहाणारे ते सर्वच देव-दानव वीर अतिबलाढ्य, शूर, पर्वतप्राय धिप्पाड, सर्व अस्त्रांत निपुण व सर्वही युद्धार्थ उद्युक्त होते. ते सर्व जेव्हां गर्जना करूं लागले त्या वेळीं त्यांचा घोर शब्द कल्पांत काळच्या मेघाप्रमाणें भासून त्याच्या योगानें स्थावरजंगमाचा थरकांप झाला. व लाल लाल अशा धुळीचा भयंकर लोळ उठला व त्यानें देव व दैत्य मंडळीच्या दाही दिशा रोंखून टाकिल्या. सर्व वीर त्या केशरी रेशमी वस्त्रासारख्या रंगाच्या धुळीनें झांकले गेल्यामुळें बहुरूपी दिसूं लागले व त्यांना दृष्टीपुढें कांहींच दिसेना. ध्वज, आयुध, रथ किंवा रथावरील सारथी यांपैकीं कोणाला कांहींच दिसेना. व एकमेकांवर चालून जाणाऱ्या त्या वीरांचा शब्द अतिच तुंबळ माजला. त्या उग्रवीर्य दानवाच्या मुखांतून ज्वाला बाहेर पडूं लागली. सिंहाप्रमाणें ज्याचें उराड रुंद आहे व व्याघ्राप्रमाणें ज्याचा शब्द आहे असा तो दानव आपले अनुचरांसह शत्रूवर चाल करून जात असतां त्यानें केलेला शब्द असा कांहीं तुंबळ झाला कीं, त्याच्या श्रवणानेंच वीरांची मुखश्री उतरली. व तेथें असा कांहीं एकच गोंधळ माजला कीं, त्या गर्दींत दानव दानवांना व देव देवांनाच मारूं लागले.

याप्रमाणें ते स्वतःच्या दानवांला व शत्रूकडील वीरांनाही मारीत असतां त्यांनीं ती रणभूमि रक्तानें भिजवून टाकली. त्या वेळीं उठलेला धुरळा रक्ताच्या शिंपण्यानें खालीं बसला आणि तें भूतल शेंकडों प्रेतांनीं भरून गेलें. त्या युद्धांत देव व दानव शूल, शक्ति, गदा, खड्ग, परिघ, प्रास व तोमर यांनीं परस्परांस हाणीत होते. दानव आपल्या परिघाकार दीर्घ हातांत अर्गळा घेऊन रुद्रगणांना झोडपून काढीत होते व रुद्रगण उलटपक्षीं प्रचंड वृक्ष, शिळा व चकचकित अस्त्रें यांच्या योगानें दानवांच्या शस्त्रास्त्रांना दडपून टाकून त्यांचे धुडके उडवीत होते. इतक्यांत लढाईची ज्याला हौसच आहे असा तो भयंकर केशी दानव आपले सैन्याला उमेद देऊन मोठ्या क्रोधानें वज्रनामक अस्त्र उगारून उभा राहिला. मग त्यानें त्या वज्रास्त्रानें व दिव्य शस्त्रानें मिळून ते दुर्जयही पारिषदगण युद्धांत झोडून काढले, त्या वेळीं ते गण हातांतील वृक्ष फेंकून देऊन त्या वज्रास्त्राच्या पीडेनें भ्रमिष्ट झाले असतां वज्रानें तोडलेल्या पर्वताप्रमाणें खालीं पडले.

याप्रमाणें त्या केशी दानवाचें रुद्राबरोबर

अत्यंत अद्भुत व अंगावर कांटा आणणारें असें तुंबळ रण झालें.

## अध्याय एकुणसाठावा.

—:०:—

### वृषपर्वा—निकुंभ व यम-प्र्हादयुद्ध.

वैशंपायन म्हणतातः—यापुढें दैत्येंद्र वृषपर्वा यानें रक्तसूर्याप्रमाणें ज्याची कांति आहे अशा निष्कुंभ नांवाच्या विश्वेदेवाला लढाई दिली. शत्रूंचीं धनुष्यें पहातांच त्या वृषपर्व्याचा चेहेरा संतापानें फिरून जाऊन आपलें सनाटें धनुष्य ताणीत ताणीतच तो आपल्या सारथ्याला बोलला, हे सारथे, त्याच ठिकाणीं माझा रथ सत्वर ने पाहूं. कारण, हे देव जमून आमचे सैन्याचा युद्धांत घात करतील. यांना युद्धाची मोठी घमेंड दिसते, तेव्हां अशांनाच पाणी पाजण्याची मला इच्छा झाली आहे. पहा, त्यांनीं आपल्या या मोठ्या दानवसैन्यांत भोंक पाडिलें आहे.

इतकें म्हणतांच सारथ्यानें ज्याचे घोडे दौडिले आहेत अशा रथांत बसून त्या रथिश्रेष्ठ वृषपर्व्यानें त्वेषानें शरजाल सोडून शत्रूवर प्रहार केला. त्याचे माऱ्यापुढें देवसैनिक नुसते उभे ठरतना. मग लढण्याची तर वार्ताच नको. कारण, वृषपर्व्याच्या बाणांनीं विद्ध होऊन सर्वच देववीरांनीं पळ काढिला. याप्रकारें ते देव मृत्यूचे तावडींत सांपडून यमाचे ताब्यांत गलेसें पाहून तो महासुर वृषपर्वा आपले जातभाईकडे वळला. इतक्यांत त्या रथस्थळीं निष्कुंभ उभा आहेसें पाहून सर्वही देव एकत्र होऊन झटकर त्याचे भोंवतीं उभे राहिले. कारण, निष्कुंभ हा विश्वेदेव नीट सावध असून सिद्ध आहे, असें पहातांच व त्याचें अस्त्रबलही प्रखर आहे असें आढळतांच देवमंडळीलाही धीर वाटून बल आलें. मग वृषपर्व्यानें आपले समोर युद्धांत उभा असलेल्या त्या धिप्पाड निष्कुंभाला, महेंद्र जलधारांनीं जसा पर्वताला आच्छादितो त्याप्रमाणें, बाणवृष्टीनें आच्छादून टाकिलें. आपल्या अंगावर पडणाऱ्या त्या असंख्य शरांची मुळींच पर्वा न करितां तो महाबल निष्कुंभ आपल्या सैन्यासह चमकत तोंडींच उभा राहिला व तो महातेजस्वी देव वृषपर्व्याचा उपहास करून मोठ्या वेगानें धरणी कांपवीतच शत्रूवर धांवला. तो धांवत असतां त्वेषानें त्याचे अंगावर जें कांहीं तेज चढलें त्यामुळें त्याचें रूप अग्निप्रमाणें दुर्विभाव्य झालें. त्या तेजस्वी निष्कुंभानें त्वेषाचे भरांत रथही सोडून देऊन एक मोठा अति उंच तालवृक्ष उपटून तो वृषपर्व्यावर टाकिला. त्या दानवानें तो महावृक्ष एका हातानेंच पकडिला व मोठ्यानें गर्जना करून आणि तो वृक्ष गिरकाऊन त्या वीर्यशाली वीरानें त्या वृक्षानेंच शत्रूकडील वरील बसणारासह गज व रथांसहित सारथी हे झोडपून काढिले.

याप्रकारें खवळलेल्या यमाप्रमाणें समरांत प्राणघात करणाऱ्या त्या वृषपर्व्याची गांठ पडतांच देव पळूं लागले. देवांना भय उत्पन्न करणारा असा तो वृषपर्वा आपलेवर रागानें तुटून येतोसें पहातांच धनुर्धारी निष्कुंभ यानेंही क्रोधास चढून आरोळी दिली व मर्मभेदक व तीक्ष्ण अशा तीस बाणांनीं त्या वीर्यशाली निष्कुंभानें त्या महादानवाचा भेद केला. युद्धामध्यें उभा असतां याप्रमाणें घायाळ होतांच त्याचे अंगापासून अलोट रक्त वाहूं लागलें. वृषपर्व्याचे भयानें प्रतिपक्षाकडील वीर उद्विग्न व हतगर्व होऊन पराभूतच झाले व केश मोकळे टाकून सुस्कारे टाकीतच सर्वत्र पळूं लागले; व त्या गप्पाघोळांत आपसांत एकमेकांवरच हल्ला करूं लागले. त्या युद्धनिपुण वृषपर्व्यानें निष्कुंभाचे सैनिकांना असें कांहीं

घाबरून सोडिलें कीं, ते हातचीं शस्त्रें टाकून भयानें वारंवार मुरडून पाठीकडे तोंडें करून त्याजकडे पहातच राहिले.

इकडे त्याच रणभूमीवर हिरण्यकशिपूचा पुत्र महावीर्य प्रऱ्हाद हा क्रोधानें डोळे लाल करून कालाशीं लढूं लागला. दानववीर प्रऱ्हाद याला युद्धांत जय यावा म्हणून दैत्यगुरु जो भृगुकुलोत्पन्न शुक्राचार्य यानें मोठ्या त्वरेनें विजयप्रद अशीं बरींच अनुष्ठानें केलीं. युद्धापूर्वी प्रऱ्हादाकडून अग्नीचें आहुतिद्वारां संतर्पण करून व ब्राह्मणांस वंदन करून त्याला जयप्रद व्हाव्या म्हणून मुद्दाम मंत्रिलेल्या अनेक विचित्र पुष्पमाला खुद्द शुक्राचार्यांनीं स्वतः त्याचे गळ्यांत बांधिल्या. अतिवीर्यशाली महान् योद्धा प्रऱ्हाद याचा कालाशीं संग्राम उपस्थित झालासें पाहून शुक्राचार्यांनीं शांति केली. व एकंदर दानववीरांना जय यावा म्हणून महात्म्या भार्गवाचे दहा हजार शिष्य त्या उत्कृष्ट शांतीच्या अंगभूत मंत्रजप करीत बसले; व रणांत प्रवेश करण्याच्या कालाला उचित असें विजयासह कर्म करून ब्रह्माचे स्तुतीनें प्रेरित अशा दिव्य अथर्वण ऋचा त्यांनीं गाइल्या. नंतर विद्या व तप यानीं युक्त असून सर्वास्त्रवेत्ते व रणांत माघार न घेणारे असे अनेक दानववीर अंगीं कवच घालून व हातीं धनुष्यें घेऊन युद्धार्थ त्वरेनें निघाले. निघण्यापूर्वी बलिराजाचा संमान करून ते शत्रूचे रथाला दाद न देणारा व नानाप्रकारचे आयुधांनीं युक्त असल्यानें वज्रयुक्त पर्वताप्रमाणें भासणारा असा प्रऱ्हादाचा जो परम दिव्य रथ होता त्याभोंवतें येऊन उभे राहिले.

एवढा घोळका तेथें जातांच त्याची आरडाओरड व गर्जना यांचे योगानें तें मेरुशिखर, मेघांचे आगमनानें ज्याप्रमाणें अंतरिक्ष भरून जातें, त्याप्रमाणें अगदीं भरून गेलें. युद्ध करण्याची ज्यांना हौस होती असे वीर अलंकार घालून भूषित झाले असतां आपले इष्टमित्रांना आलिंगनें देऊन रणभूमीवर जमले. त्या आलिंगनांत गळ्यांत पद्मदलांच्या माला मोकळ्या होऊन पडल्या. प्रऱ्हाद हा मोठा समर्थ व शोभिवंत असून त्याचे हातीं मोठीं आयुधें होतीं. चिलखतही फार चागलें होतें. शिवाय त्यानें शिरस्त्राण व शरीरत्राणही चढविलें असून, हातीं धनुष्य घेतलें होतें; व तो मोठा अजिंक्य होता. ज्यांचेमध्यें क्षुद्रघंटांचे नाद चाललेले होते व ज्यांचा दर्प सिंह किंवा व्याघ्र यांप्रमाणें होता, अशीं त्याचे आज्ञेंत असलेलीं शेंकडों सैन्यें रणांत अग्रभागीं चाललीं होतीं. हे महाभाग, त्याचे सैन्याचे बाजूस चांगले अजिंक्य असे सत्तर रथ होते व तेवढेच गज होते. आणि त्याच्या सैन्याचे केंद्रस्थानीं कालनेमी महासुर हा होता. तो आपलें घोर धनुष्य ताणून मोठ्यानें ओरडूं व हंसूं लागला. त्या तेजस्वी वीराचे अग्रभागीं इंद्रतुल्य तेजस्वी व बलवान् असे शेंकडों हजारों वीर चालले होते. यामुळें तो दानवांचा सैन्यव्यूह दोघांना सारखा वाटत जातां जातां फारच अफाट होऊन सर्व देवतांनाही अभेद्य झाला. त्या पलीकडे धनुर्धर व भिन्न भिन्न प्रकारचीं अनेक आयुधें धारण करणारे दानव वीर हे तर बिनमोलच होते. ते दानव हातीं गदा, परिघ, शूल, पट्टिश, मुद्गर घेऊन पर्वतांप्रमाणें शोभत होते. व महावीर्यशाली व समरांगणांत माघार न घेणारे

१ येथें कलकत्ता व लेखी या दोन्ही प्रतींत 'सचक्र' असा पाठ आहे.

१ या ठिकाणीं 'बांधवान् संपरित्यज्य' असा मुंबई छापील पाठ आहे. त्याचा अर्थ 'इष्टमित्रांस सोडून' असा होतो. तोही केवळ त्याज्य नाहीं तरी 'संपरिष्वज्य' हा पाठ कलकत्ता पोथीचा अधिक ग्राह्य वाटला.

दानव युद्धोत्साहानें आरडत ओरडत गर्जना करीत युद्ध करूं लागले.त्या वेळीं हजारों रणवाद्यांचा एकच मोठा ध्वनि उठला. त्यांतच अति वेगवान् हत्ती व घोडे हेही आवेशाआवेशानें गर्जत होते. तसाच मेघध्वनीतुल्य नगाऱ्यांचा शब्द, शंखाचा शब्द व भेरींचा गंभीर गजरही, त्यांतच ऐकूं येत होता. तेव्हां ते शंखध्वनि, व नगारे आणि वाद्यें यांचे ध्वनी, या योगानें भरून गेलेलें तें अंतरिक्ष स्वतःच ओरडत आहेसें वाटलें.

याप्रमाणें समुद्रप्राय अफाट सैन्य बरोबर मदतीला घेऊन कल्पकालचे अंतकाप्रमाणें भयंकर असा तो प्ऱ्हाद युद्ध करूं लागला. त्या अप्रतिम तेजस्वी वीराच्या त्या भयंकर गर्जनेनें त्रैलोक्यांतील सर्वच प्राणीमात्र भयानें विकृत होऊन किंचाळूं लागले. अंतरिक्षांतून उल्कापात होऊं लागले व रूक्ष वारा वाहूं लागला. आणि घोर अग्नि तोंडांतून बाहेर टाकीत भालुका रडूं लागल्या. श्रीमान् प्ऱ्हाद हा मोठाच वीर्यमान् असून त्याला युद्धाचीही मस्ती आलेलीच होती. त्यामुळें तो हंसत हंसतच त्या समयाला अनुरूप असें भाषण बोलला. तो म्हणाला, आज मी माझें उत्तम बाहुबल दाखवितों. तुम्ही आज ही देवमंडळी युद्धांत माझे बाणांनीं घायाळ झालेली आतांच पहाल आणि ज्या माझ्या दानवमंडळीचे आप्तबंधु आजपर्यंत या देवांनीं युद्धांत मारिले आहेत ते आज या देवांच्या मांसबलीनें आपल्या त्या स्वर्गवासी बांधवांना तृप्त करतील. हा रणांगणांत जो धुराळा उठला आहे तो मी आतांच शत्रूच्या रक्ताचे ओघ वाहवून शांत करून सोडतों. आज माझे बाण सेनेच्या धुरळ्यानें लाल होऊन टोळधाडीप्रमाणें आकाशांत उडून आपल्या गर्दीनें अंधार पाडून सूर्याला निरुपयोगी करून टाकतील. याकरितां हे मत्सैनिकहो, तुम्ही खुशाल आनंदांत असा. या देवांचें भय वाटत असेल तर तें सोडून द्या. आज मी या माझ्या धनुष्यानें या युद्धांत प्रत्यक्ष यमाचाच समाचार घेतों. आणि बलवंतांत श्रेष्ठ जो माझा राजा बली याला संतुष्ट करितों. माझ्या बाणांनीं आज देवांना युद्धांत जिंकून माझे हे भाते व त्यांतील हे सर्पतुल्य बाण अजरामर करून सोडतों. प्राणाची पर्वा करणारांपैकीं आज रणांत मजपुढें उभे राहण्यास समर्थ कोण आहेत? युद्धांत शत्रूला मारिलें असतां राजेमंडळांत ( जेत्याविषयीं ) संतोष व प्रेम हीं उत्पन्न होतात. बरें, प्रसंगीं तोच युद्धांत मारला गेला तर त्याला स्वर्गांत वसती मिळते. एवंच, युद्धासारखी उत्तम गति दुसरी नाहीं. यास्तव, हे दानवश्रेष्ठहो, सर्व भीति बाजूला टाकून आणि या सर्व शत्रूंना ठार करून नंदनवनांत जाऊन मौज मारा.

याप्रकारें आपल्या प्रचंड सेनेला उत्तेजनपर बोलून प्ऱ्हादानें त्या रणांत प्रतिपक्षी कालयाचें सैन्य चिरडून टाकिलें. प्ऱ्हाद हा अखिलास्त्रवेत्ता असून शूर व केव्हांही युद्धार्थ सज्ज व सर्वदा अजिंक्य होता. त्याला आपले बाहुबलाबद्दल मोठा गर्व होता. त्या अतिवीर्यशाली प्ऱ्हादाचे खुद्द स्वतःचे म्हणजे औरस असे साठ सहस्र पुत्र होते. ते सर्वही रथी असून अनेक आयुधें धारण करणारे होते. त्यांनीं पुष्कळ पुष्कळ दक्षिणा देऊन शंभर यज्ञांनीं ईश्वरतर्पण केलें होतें. शिवाय ते मोठे क्षमाशील, धार्मिक, दाते, सत्यव्रत करणारे, दानशील, प्रिय भाषण करणारे व शास्त्रीय विषयांत पांडित्य करण्यास समर्थ, स्वस्त्रीरत, दान्त, पवित्र, सत्यवक्ते, नित्य यज्ञ करणारे व नित्य वेदाध्ययन करणारे, बाण व अस्त्रें यांत निपुण व सर्वही बहुधा स्थिरपराक्रमी—केवळ उन्मत्त हत्तीसमान विक्रमी, शत्रुसैन्याला चिरडणारे,

महान् महान् वृक्षांना लाथेबरोबर पंख्यांप्रमाणें फिरावयास लावणारे, सर्वदा युद्धाविषयीं हुटहुटलेले व क्रोधानें आरक्तनेत्र असून दांत-ओंठ चावीत असलेले असे मोठे भयंकर पराक्रमी होते. त्यांनीं मोठ्यानें ध्वनि केला व गर्जना आणि वीरघोषणा व भुजा व मांड्या यांचें थोपटणें यांनीं एकमेकांला हर्षित केलें. वेणु व शंख यांचे ध्वनी व पुष्कळसे सिंहनाद करून व अनेकदा उड्या घेत घेत रणांत चालले. त्या बलाढ्य दानवांनीं हातीं तालप्रमाण धनुष्यें घेतलीं असून तीं ते खेंचीत होते व त्यांना शत्रूला क्षमा करणें कसें तें माहीत नव्हतें आणि देव किंवा दानव यांपकीं कोणीच ज्याचा आजपर्यंत पराभव केला नव्हता अशा कालाला ते लढाई देत होते. लाल सोन्याचे सर्वांचे अंगावर अलंकार असून सर्वांचीं शुभ्रच वस्त्रें होतीं. सर्वच ते मोठे मानी असून स्वर्गाची इच्छा करणारे होते. सर्वच जयेच्छु वीर असून सर्वही शत्रूला चीत करण्याविषयीं कंबर बांधून उभे होते. ध्वज व पताकांच्या जींत माळा फडकून राहिल्या आहेत अशी ती दैत्यसेना झळकत होती. गज, अश्व आणि रथ यांनीं ती खेंचून गेली असून स्वर्गमार्गाकडे तिचे डोळे होते.

इतक्यांत मोठा भयंकर व भीषण पराक्रमी असा काल युद्धार्थ पुढें आला. त्याचें शरीर मोठें स्थूल असून त्याचे भोंवतीं व्याधींचा[1] परिवार होता. तो गर्जतच पुढें आला. त्यानें गर्वानें वीरघोषणा करून आनंदानें आपणांस आरोळ्या देणाऱ्या अशा बलाढ्य दैत्यांची प्रचंड सेना पुढें आलेली पाहिली. तेव्हां त्या दानवांची ती सेना झपाट्यानें आपणावर येत आहे असें दिसतांच त्या व्याधिपरिवृत्त अन्तकानें एकदम त्या सर्व सैन्याची धांव उलट फिरविली. आणि त्या सेनेंत शिरून त्या वीरानें कचाकची चालविली. शिवाय स्वसैन्याचें पाठबळ असलेल्या व रक्तनेत्र अशा त्या कालानें दंड, मुद्गर, पट्टीश इत्यादि अस्त्रांचे योगानें प्रऱ्हादाचें तें उग्र सैन्य व स्वतः प्रऱ्हाद यांसही त्या रणांत झोडून काढिलें. त्याचे जे व्याधिगण होते, तेही दानवसेनेच्या हातांतील शर, शक्ति, ऋष्टि, खड्गें, शूल, मुसल, गदा, परिघ, विचित्र परशु, विचित्र धनुष्यें, व भक्कम शतघ्नी रणांत हाणून पाडीत होते. त्या युद्धांत पुष्कळशा व्याधींनीं असुरश्रेष्ठाला ठोकिलें. उलट पुष्कळ असुरांनीं अनेक व्याधींचाही समाचार घेतला. असुरांनीं कांहीं व्याधी शूलानें मारिल्या, कांहीं परशूंनीं मारिल्या, कांहीं परिघांनीं व कांहीं परमायुधांनीं हाणिल्या. कांहीं खड्गांनीं दोन दोन खांडें केलीं असतां तडफडत भुईवर पडल्या. याप्रकारें दानवांनीं अनेक शस्त्रांनीं व्याधींचें विदारण केलें.

व्याधींनीं त्यांना तसेंच केलें. अनेक उत्तम आयुधें, तीक्ष्ण व लखलखीत अशीं खड्गें, प्रास तोमर, मुद्गर, यांनीं दानव तोडून काढिले. कांहीं परशूंनीं खांडिले. व कांहीं मुद्गर व पट्टिश या खालीं चेंचून काढिले. कांहीं अनेक प्रकारचे शस्त्रांनीं भोंसकले, कांहीं मुठींनींच बुकलले. त्या वेळीं त्यांचे डोळे व दांत हे स्तब्ध होऊन ते रक्त ओकूं लागले. ओरडणारांचा आर्तस्वर व गर्जणारांचा सिंहनाद मिळून अंगावर रोमांच आणणारा असा एकच महाशब्द तेथें उठला. युद्धांत दानव उभे असतां असतांच व्याधींनीं आपल्या मुष्टींनीं कित्येकांचीं मुंडकीं व हस्ततलांनीं कांहींकांचीं शिरें जर्जर करून भुईवर पाडिलीं. वस्त्रें हाच जीवरील

[1] काल म्हणजे मृत्यु याचे व्याधी म्हणजे रोग हेच साह्यकर्ते—ही कल्पना समर्पकच आहे. वेदांतही हीच कल्पना आहे. तेथें म्हटलें आहे—मृत्युर्गंधर्वस्तस्याधयोप्सरसः ह्य० मृत्यु हाच कोणी गंधर्व व आधिव्याधि याच त्याच्या अप्सरा,

फेंस आहे, फडकणारे ध्वज हेच जींतील भोंवरे, तुटून पडलेले बाहू हेच जींतील सर्प, शूल व शक्ति हेच मोठाले मासे, धनुष्यें हेच जीमधील मगर, जंगी रथसमूह हेच जींतील खडक, पताका हेच जींतील वृक्ष, रणध्वनी हाच जिचा भयंकर खळखळाट व रक्त हेंच जींमधील पाणी, अशी तेथें नदी निर्माण झाली. तो प्ऱ्हाद दैत्य व अंतक काल यांचे हातांतील धनुष्यें हींच इंद्रधनुष्यें समजावीं व ज्यांचीं चमकणारीं बाहुभूषणें ह्याच विजा समजाव्या, असे ते मेघरूपी वीर शररूपी धारांचा पर्जन्यच वर्षू लागले. सजल मेघवर्णाचे ते दोघेही वीर गजावर किंवा रथांत बसले असून जलयुक्त मेघाप्रमाणें क्रोधानें दणाणत होते. त्यांचे अंगावरील साज लाल स्वर्णाचा असून ते दिव्य हारांनीं अलंकृत होते व क्रोधानें लाल झाल्यामुळें सूर्य किंवा अग्नि यांप्रमाणें चमकत होते. पर्वताप्रमाणें धिप्पाड दिसणारे ते दोघेही वीर वज्राप्रमाणें कठोर स्पर्श अशा बाणांनीं परस्परांस आघात करूं लागले. असल्या त्या वीरांच्या परस्पर भयंकर रट्टयांत सांपडलेले उभयपक्षी वीर स्वतःचे प्राणाविषयींही साशंक झाले. त्यांतील मुख्य मुख्य वीर तर युद्धांत बाणांनीं सर्वांगीं छिन्न होऊन व गतप्राण होऊन खालीं पडले. त्यांच्या वक्षस्थलावरून रक्ताचा छिडकाव झाला होता. कांहीं वीर मरून पडत होते. कांहीं दुसऱ्यांस मारून पाडीत होते. अशांनीं ती रणभूमि भरून गेली. त्या युद्धांत ते उभयही वीर ते भयंकर बाण आपले भात्यांतून बाहेर केव्हां काढीत व धनुष्याला जोडून केव्हां सोडीत ही गोष्ट किती बारकाईनें पहावी तरीही त्यांतील अंतर दिसून येईना. ते दोघेही दीर्घबाहु मोठे बलाढ्य व युद्धनिपुण असून अत्यंत चलाख असल्यामुळें त्यांना आपले धनुष्याची बिंदुकली करण्याचा एकवारच प्रसंग आला. जोराचे वाऱ्यामुळें जसें मेघपटल उडून जावें त्याप्रमाणें यमाची सेना प्ऱ्हादाचे बाणांचे लोटापुढें वाहून गेली. तेव्हां प्ऱ्हादानें आपला शत्रु यम याचा गर्व जिरून तो खालीं तोंड घालून रणांतून माघारा फिरला त्या अर्थीं तो आपल्या बसांत कायमचा आला आहे, असें मानून मग त्याच्या उरलेल्या सैन्याचा चुराडा आरंभिला.

याप्रमाणें प्ऱ्हाद व काळ यांचें हें जें युद्ध झालें त्या प्रकारचें युद्ध पूर्वीं कधीं झालें नाहीं व पुढेंही कधीं होणार नाहीं. या युद्धांत अद्भुतवीर्य व तेज यांनीं युक्त असलेला प्ऱ्हाद हा रणांत केवळ जखमी होऊनच अधिकच कीर्तीस चढला. आणि काल मात्र रणांतून पळ काढून दूरच सरला.

## अध्याय साठावा.

—:०:—

### अनुऱ्हाद व कुबेर यांचें युद्ध.

वैशंपायन सांगतातः—यानंतर प्ऱ्हादाचा धाकटा भाऊ अनुऱ्हाद नांवाचा मोठा बलवान् होता त्यानें धनपति जो कुबेर त्याला त्याचे यक्षसेनेसह लढाई देऊन यक्षसेनेला खळबळून सोडिली. प्रतापी असुरश्रेष्ठ अनुऱ्हाद हा बरोबर मोठा सैन्यसमूह घेऊन कुबेरावर आला आणि क्रोधानें लढून त्यानें कुबेरास पीडा दिली. शत्रूची गय न करणारे असे किती तरी देवगण हातीं आयुधें घेऊन त्या रणांगणांत उभे होते. त्यांच्याशीं त्या महासुरानें हातीं धनुष्य घेऊन मोठेंच घोर युद्ध केलें. त्या वेळीं तें प्रचंड सैन्य क्षुब्ध होऊन गेल्यामुळें उधाणाची भरती आलेल्या समुद्राप्रमाणें सर्वत्र भोंवऱ्याप्रमाणें खळबळ सुरू झाली. जलप्रलयाचे वेळीं ज्याप्रमाणें पर्वतांनीं भूमि भरून जावी त्याप्रमाणें देव आणि असुर यांचे

घिप्पाड शरीरांनीं ती भरून गेल्याप्रमाणें दिसली. आणि रक्तानें लाल झालेलें तें मेरुपर्वताचें शिखर तर वैशाख मासांतील सर्वभर फुलून लाल झालेल्या पलाश वृक्षाप्रमाणें शोभूं लागलें. रणांत मारले गेलेले वीर, हत्ती, अश्व यांचे योगानें तेथें एक मोठी नदीच निघाली. तींतून रक्ताचे ओघ चालले असल्यानें ती मोठी घोर दिसत होती. तिचे योगानें यमाचे राजधानीला भर पडत होती. हस्त्यादिकांची विष्ठा व चरबी यांचा तींत चिखल माजला होता. व मृतांचीं आंतडीं हींच तींतील शेवाळ होतें. तुटून पडलेलीं शरीरें व डोकीं हेच मत्स्य; अंगें व अवयव हेच तींतील गवत; गृध्र व हंस यांची तेथें गर्दी असून मयूर व सारस पक्षी यांचे शब्दांनीं ती भरून गेली होती. वसा हाच तीवरील फेन होता व लोकांचीं ओरडणीं हाच तींत गोंगाट. याप्रकारची ती युद्धभूमीवर निर्माण झालेली रक्ताची नदी कापुरुषांना केवळ दुर्धर्ष होती. वर्षाकाळीं हंससमूहानें शोभायमान दिसणाऱ्या अस्सल नदीप्रमाणेंच ती दुस्तर होती. तथापि, तिला ते देव व दानवच तरूं शकले. कमलाचे रजःकणांनीं आच्छादिलेली नलिनी तुडवून जाणें जसें थोर गजाला सहज वाटतें तसेंच त्यांना ती नदी तरून जाणें सहज वाटतें.

नंतर कुबेराचे लक्षांत आलें कीं, अनुऱ्हाद हा रथांत बसून मोठ्या वेगानें बाणांचे लोट सोडून आपल्या यक्षसेनेवर प्रहार करीत आहे. मग रागास चढून त्या धनपालानेंही त्या असुराचें सैन्य मारिलें. वायूनें जसें आकाशांतील अभ्रपटल सहज उडवून द्यावें तशीच त्याला ती गोष्ट सुलभ होती. तेव्हां कुबेर फारच तुंबळ रण करीत आहेसें पाहून अनुऱ्हाद हा सूर्यवर्णी रथांत बसून कुबेरावर धांवला. मग त्या धन्विश्रेष्ठानें त्या रणस्थलीं आपलें धनुष्य खेंचून तीक्ष्ण असे बाण कुबेरावर सोडिले. ते अचुक घुसलेले बाण कुबेराचे देहांतून आरपार जाऊन, कुबेराचे पाठीशींच चिकटून, उभे असणाऱ्या यक्षराक्षसांनाहि, वेधिते झाले, मग अनुऱ्हादाच्या जाज्वल्य बाणांनीं घायाळ झाला असतां, कुबेर मोठ्या क्रोधानें त्या रणांगणीं अनुऱ्हादावर चालून गेला आणि त्यानें रागाचे आवेशांत आपले यक्षगणांचे साह्यानें दानवांवर बाणांचा पाऊस पाडिला. एकाएकीं आश्विनकार्तिकांतील पावसाला तोंड देण्याचें सामर्थ्य नसल्यानें गोवृष म्हणजे गाईकरितां ठेवलेला बैल मान खालीं घालून तो पाऊस जसा टाळक्यावर घेतो, त्याप्रमाणेंच त्या महासुरानें कुबेराच्या त्या दारुण बाणवर्षावाला तोंड देण्याचें सामर्थ्य नसल्यानें, डोळे मिटून घेऊन खालीं मान घालून तो वर्षाव स्वस्थ सहन केला. याप्रमाणें कुबेरानें बाणवृष्टीनें सतावून सोडिलें असतां त्या दैत्याचे दृष्टीस इंद्रध्वजासारखा एक महान् वृक्ष जवळच आढळला. त्याच्या फांद्या व डाहाळ्या दूर दूर वाढल्या असून त्याला कोंवळी पालवी आली होती. व तो फलपुष्पान्वित होता. अशा त्या वृक्षाला उपटून त्या दैत्यानें कुबेराचे रथाचे ते अस्सल घोडे झोडपून काढिले. त्याचें तें अचाट कर्म पहातांच दानवमंडळीला फार हर्ष होऊन त्यांनीं त्या भरांत मोठ्यानें सिंहनाद सुरू केला.

नंतर त्या देवदैत्यांचें तुंबळ युद्ध झालें. तेव्हां उभयही पक्ष रागानें ताम्रनेत्र होऊन परस्परांचे वधाविषयीं उद्युक्त असल्यानें नानाप्रकारचे शस्त्रांनीं परस्परांवर प्रहार करूं लागले. देव हे दानवांपेक्षां अधिक चिवट असल्यानें दानवांची त्या युद्धांत त्यांनीं चांगलीच कुंदी काढिली. दानव जरी कमजोर होते तरी ते अतिच चवताळल्यामुळें त्या सपाट्यांत त्यांनींही देवांची चांगलीच लोळण काढिली. त्यांनीं

क्रोधानें अग्नीप्रमाणें जलाल, कंकपत्रानें युक्त ( पिसें लावलेले ) व अचुक सरळ जाणारे असे पाजळलेले बाण सोडून देवमंडळीला वेध केला. याप्रकारें बलाढ्य दैत्यांनीं जेव्हां देवांची दाणादाण मांडिली त्या वेळीं अधिकच क्रुद्ध होऊन ते अगदींच निर्भयपणें चेष्टा करूं लागले. त्यांनीं भयंकर गदा, पट्टिश, शूल, मुद्गर, तीक्ष्णाग्राचे परीघ व बाण यांनीं दानवांस जर्जर करून सोडिलें. दानवांचीं शरीरें याप्रमाणें जेव्हां देवांचे बाणांनीं छिन्नभिन्न झालीं व त्यांचीं वृक्षस्थलें खड्गांनीं भोंसकलीं गेलीं तेव्हां त्यांनीं शिला व वृक्षच उचलले. ते दितिपुत्रही मोठे वेगवान् होते. ते त्या आवेशांत थय थय माचूं लागले व त्यांनीं अंगचे जोरावर देवांकडील शेंकडों हजारों मंडळींचें चांगलेंच चंदन काढिलें. मग त्या उभय पक्षांचें पक्केंच रण तुंबळ माजलें. मोठचाल्या धोंडी, विस्तीर्ण वृक्ष, परिघ, पट्टिश, भिंदिपाल, फरशु यांची झोड उठली. तींत उभय वीरांपैकीं कांहींचीं मुंडकीं तुटलीं. कांहीं छिन्नभिन्न झाले. कांहीं रक्तबंबाळ होऊन भूमीवर पडले व कोणी परस्परांचे माऱ्यानें त्रासून पळून जाऊन नाहींसे झाले. कांहींचीं काळजें फुटलीं व कांहींचे पाय तुटून ते जमिनीवर आडवे पडले. कांहीं त्रिशूलानें विदारण झाल्यानें तेथेंच गतप्राण होऊन पडले. देवदानव यांची ज्यांत एकत्र दाटी झाली आहे, शस्त्रांचें तुंबळ माजलें आहे, व वृक्ष आणि शिला यांची गर्दी झाली आहे, असें तें मोठेंच भयंकर युद्ध झालें. एका अर्थीं तें युद्धरूपी संगीतच म्हणावें. धनुष्यांच्या दोऱ्या ह्याच वीणेच्या तारा व त्यांचे ध्वनी हेंच मधुरगान, वीरांचें खोकणें हाच त्यांतील ताल व घायाळांचें ओरडणें हाच त्यांतील मृदंगध्वनी, असलें तें युद्धरूपी संगीत होतें.

कुबेरानें हातांत धनुष्य घेऊन व क्रोधानें शरवृष्टि करून दानवांना पळवून दाही दिशा लाविलें. कुबेराचे त्रासानें स्वसैन्य पळून चाललेलें पहातांच अनुऱ्हादानें एक भली विशाळशिळा उचलली. अनुऱ्हाद हा पराक्रमानें बाणासारखाच होता. त्यानें ती शिळा घेऊन कुबेराचे श्रेष्ठ रथावर टाकिली. शिळा पडतेसें पहातांच कुबेर हातीं गदा घेऊन भूतळावर उतरला. ती शिळा ज्री आदळली ती त्या रथाचीं चक्रें, धुरा, घोडे, ध्वज, त्यांतील धनुष्यें व तो रथ एवढ्याचा चुराडा करून मग भुईवर पडली. त्या प्ऱ्हादाचे अनुजानें याप्रमाणें कुबेराच्या रथाचा चूर केल्यावर स्कंध व शाखा यांसह वृक्ष उपटून त्या खालीं देवांचें कांडात काढिलें. याप्रकारें देवांचें मोठें सैन्य पळावयास लाविल्यावर तो अनुऱ्हाद पर्वताचें एक शिखर हातीं घेऊन कुबेरावर धांवला. तो येतोसें पहातांच वीर्यवान् कुबेर यानें गदा उचलून त्या दानवश्रेष्ठाला गर्जतच हांक मारिली. अनुऱ्हादही रागांतच होता. कुबेर त्याहूनहि अधिक क्रुद्ध झाला. आणि त्यानें ती बहुतकंटकयुक्त गदा त्या दानवावर टाकिली. त्या दैत्याचे डोळे क्रोधानें लाल गुंज झाले होते. त्यानें त्या गदेची मुळींच पर्वा न करितां हातांतील गिरिशृंग उलट कुबेरावर टाकिलें. त्या वेळीं त्या गिरिशृंगाखालीं सर्व अंग चेंचून गेल्यानें विव्हळ होऊन तो पिंगे डोळ्यांचा बलाढ्य कुबेर धरणीवर पडला. भूमीवर पडला तरी विदारलेल्या पर्वताप्रमाणें तो खुलत होता. धनपति विव्हल झालासें दिसतांच ते सर्वही पराक्रमी यक्षराक्षस त्याला गराडा देऊन त्याचे रक्षणार्थ उभे राहिले. क्षणैक मूर्च्छित पडल्यावर तो विश्रव्याचा महाबल व पिंगाक्षपुत्र कुबेर एकएकीं उठला व त्रैलोक्यास हालवून सोडण्यासारखी त्यानें आरोळी दिली. त्या

आरोळीनें जणूं मेघगर्जनाच उठली व पर्वतांचीं शिखरें उडून जातातसें भासलें. एकदां जर्मीनदोस्त केला असतांही ज्या अर्थी हा पुनरपि उठला त्या अर्थी हा महाबल कुबेर अवध्य आहे असें वाटून ते दानव पळत सुटले.

असुरमंडळी पळतातसें पाहून अनुऱ्हाद त्यांस बोलला, ' हे कालनेमी, सुनेमी प्रभृति वीरहो, आपण कोण, आपला पराक्रम काय, आपण कोणत्या उच्च कुलांत जन्मलों, याचा कांहींच विचार न करितां तुम्ही सामान्य जनांप्रमाणें भयभीत होऊन पळून कुठें चाललांत ? हे वीर्यवंत हो, परत फिरा; इतके जिवाला काय जपतां ? अरे, हा यक्ष आपलेबरोबर युद्धाला खास टिकणार नाहीं. तुम्हांला त्याचा बागुलबोवा वाटता आहे, झालें. मी या बागुलबोवाला आतां माझे पराक्रमानें कसा उडवून देतों, पहा तर खरा. पळतां कुठें ? मागें फिरा.'

याप्रमाणें अनुऱ्हादानें उत्तेजन देतांच असुर मत्तगजाप्रमाणें परत फिरले व रागाचे तडाक्यांत देवसैन्यावर तुटून पडले. मेघाप्रमाणें गंभीर ध्वनि करणारे कांहीं त्यांतील वीर, जवळचीं अस्त्रें संपलीं तेव्हां, मस्तीच्या भरांत भुजांनींच प्रहार करूं लागले. पल्लेदार काठ्या किंवा मोठाल्या शिळा किंवा केवळ हाताचे तडाके यांनींच उत्कंठेनें ते प्रहार करूं लागले. गुद्दे, चपराकी, नखें टोंचणें किंवा जंगी झाडांनीं झोडपणें हाच प्रकार त्यांनीं मांडिला. अनुऱ्हादानें तर फारच रागावून जाऊन उठलेल्या वणव्याप्रमाणें ती देवसेना फस्त केली. त्या वेळीं किती तरी वीर रक्तानें माखून भुईवर निजले. कित्येक कापले जाऊन पुष्पांच्या वृक्षाप्रमाणें रक्तानें लाल होऊन पडले. मग त्या पराक्रमी कुबेरानें तीक्ष्ण व सर्पाप्रमाणें जाज्वल्य असे बाण अनुऱ्हादावर सोडले. त्या वेळीं कुबेराचे बाणांनीं विद्ध झाल्यानें अनुऱ्हाद क्रुद्ध झाला असतां त्याचे मुखांतून अग्नियुक्त ज्वाळा निघूं लागल्या. इतक्यांत दंडधर यमाप्रमाणें क्रूर अशा अनुऱ्हादानें सहस्त्रबाणांनीं कुबेराचा वेध केला. त्या वेळीं कुबेर, बाणांनीं घायाळ झाल्यानें रक्तबंबाळ होऊन, अंगावरून जलप्रवाह वहात असलेल्या पर्वताप्रमाणें सर्वभर रक्तधारा सोडूं लागला. कांहीं वेळानें तो शुद्धीवर आला आणि रागानें डोळे लाल करून त्यानें एक भली मोठी गदा घेतली. त्याचा क्रोध त्याला अनावर होऊन त्या भीमपराक्रमी कुबेरानें अनुऱ्हादावर रोंखून ती गदा फेंकली. तें पाहून तो असुरही क्रुद्ध झाला व ती गदा आपणावर येत असतां त्यानें मोठ्यानें गर्जना करून वाटेंतच ती आपले गदेनें छेदिली. तो एक मोठा चमत्कार झाला. पुनरपिही कुबेर दुसरी गदा घेऊन अनुऱ्हादावर चालून गेला. तो येतोसें पाहतांच महाबल अनुऱ्हादानें एक कैलासतुल्य पर्वतशृंगच उपटून अन्तकाप्रमाणें आ वासून कुबेरावर धांव केली. मग सर्वही देवांना अजिंक्य व क्रोधानें जणूं त्रैलोक्याला गिळून टाकणारा प्रत्यक्ष केवळ यमच अशा त्या अनुऱ्हादाचा तो आविर्भाव व त्याचें तें अचाट कर्म पाहून धनपति भयानें रणभूमि सोडून सुरपति इंद्र जेथें होता तेथें गेला.

## अध्याय एकसष्टावा.

—:०:—

### वरुण व विप्रचित्ति यांचा सामना.

वैशंपायन सांगतातः—यापुढें दानवांचा अधिपति जो विप्रचित्ति दानव तो रागावून सर्पप्राय जाज्वल्य असे बाणसमूह जलपति अव्यय वरुणावर सोडूं लागला. त्या बाणांच्या जाज्वल्य किरणांनीं दैत्यानें जेव्हां त्याला भाजून कादिलें, तेव्हां रणांत आतां करावें काय हेंच त्या वरुणाला कळेनासें झालें. सर्व-

लोकेश्वरासमोर ज्याप्रमाणें प्रजापति परमेष्ठी याचा टिकाव लागत नाहीं, त्याप्रमाणें त्याजलपतीला विप्रचित्तीचे पुढें उभें रहावेना. इकडे दानवमंडळी, ज्याला सर्व बाजूंनीं तोंडें ठेविलीं असून जो सर्वथा निर्भय असतो, अशा प्रकारचा एक व्यूह, ज्याला वज्रव्यूह असें म्हणतात—तो रचून देवसेनेशीं युद्ध करूं लागले. त्या विप्रचित्ति दानवाचें मुखमंडल अग्निज्वालेप्रमाणें किंवा सूर्यमंडलाप्रमाणें चमकत होतें. वरुणही मोठा तेजस्वी होता. तो जयाकांक्षी असल्यानें त्यानें विप्रचित्तीकडे रोंखून पाहिलें. त्या वेळीं स्वतेजानें तो त्याला जणूं जाळूं लागला. अंगावर पुष्पमाला घातलेल्या व सर्पमय बाहुभूषणें ल्यालेल्या त्या दैत्यानें कैलासशिखरतुल्य प्रचंड परिघ हातीं घेतला. त्या परिघाला सोन्याच्या पट्टया बसविल्या असून सोन्याच्या माळा घातल्या होत्या व तो स्वतः पोलादी असून केवळ यमदंडाप्रमाणें भयंकर होता. त्यामुळें आपण निर्भय आहों, असें दैत्यांना वाटे. महासुर विप्रचित्ति यानें रागावून आणि तोंड पसरून तो इंद्रध्वजोपम परिघ गिरगिर फिरविला. त्या वेळीं गळ्यांतील सोनेरी कंठी, बाहूमधील स्वर्णांग दें, कानांतील विचित्र कुंडलें व कंठांतलि स्वर्णमाळा यांहींकरून शोभत होता. याप्रकारचे अंगावरील अलंकार व हातीं धरलेला तो परशु यांचे योगानें तो दानव इंद्रधनुष्यानें अलंकृत अशा विद्युत् व गर्जनायुक्त मेघाप्रमाणें खुलत होता. समंतात् तेज ओकणाऱ्या त्या परिघरूपी अस्त्राचे योगानें, धूम्रयुक्त अग्नीप्रमाणें, भोंवतालचें वातावरण त्यानें जाळून काढिलें. त्या विप्रचित्तीच्या परिघाच्या गिरकीनें ग्रहनक्षत्र व चंद्रसूर्य यांनीं विभूषित तें नभस्तल, त्यांतील विद्याधरगण, गंधर्वनगरें, इंद्राची राजधानी, व सिद्ध लोक यांसह भ्रमतेसें वाटलें. त्या परिघाचें आभरण धारण केलेला तो समर्थ दानवरूपी अग्नि, युगांतींच्या अग्नीप्रमाणें दुरासद व देवरूपी इंधनाला जाळून काढणारा असा भासला. त्याचे दराऱ्यामुळें इतर देव किंवा वरुण कोणींच हालचाल करूं शकतना. त्या मंडळींत निर्भय असा काय तो कुशिककुलोत्पन्न प्रभु देवेंद्र हा होता. अशा स्थितींत त्या दानवानें तो सूर्यतुल्य व दिसण्यांत भयंकर असा आपला घोर परिघ वरुणाचे सेनेच्या मध्यभागीं आदळला. तो परिघ महात्म्या वरुणाचे सैन्यामध्यें पडला त्या वेळीं त्यानें आपले खालीं दहा हजार प्राणी चिरडून टाकिले. त्या प्राण्यांचे शरीरांवर आदळल्यानें त्या परिघाचेहि कांहीं भागाचे हजारों तुकडे उडाले. त्या तुकड्यांमुळें आकाशांत शत उल्कापात होतातसा भास झाला. विप्रचित्तीनें पुनरपिही तोच परिघ गिरकावून प्रत्यक्ष वरुणाचे अंगावर टाकिला. तो घोर परिघ वरुणाचे अंगावर आदळतांच स्वतःच फुटला व त्याचे जे कण उडाले ते आकाशांत काजव्यांप्रमाणें लखलखूं लागले आणि त्या परिघाचे तडाक्यानें व्याकुळ झाल्यानें वरुणाला जागचें हालवेनासें होऊन भूमितलावर ठाम रोंवलेल्या पर्वताप्रमाणें तो बसून राहिला.

याप्रकारें त्या परिघामुळें स्वतःचे सैनिकांची दाणादाण होऊन त्यांचीं शरीरें छिन्नभिन्न झालीं, त्या वेळीं कोपिष्ट प्रभु वरुण क्षणभर क्षुब्ध झाला. आणि मग रागाचे तडाक्यांत त्या शत्रुमर्दन वरुणानें आपले पक्षाकडे राहून सर्व-संहार आरंभिला. त्याचें शरीर जलमय असून त्याचे अंगावर शंख व मौक्तिक यांचें तेज फांकलें होतें. त्याचे भोंवतीं नागसर्पांचा व चतुःसमुद्रांचा गराडा होता. त्याचे नेसूं उंची शुभ्र वस्त्र असून त्याचे बाहुभूषणांत अनेक रत्नें कोंदलीं होतीं. त्यानें हातीं पाश घेतला असून त्याचे भोंवतीं मासे व कांसवें यांची गर्दी होती.

अशा प्रकारचा तो वरुण संतापून गेला. आणि आपले सैनिकांना पाहून म्हणाला, वीरहो, अवसान धरून आपण या दानवांना खचीत ठार करूं, असा विश्वास मनांत ठेवून उल्हासानें तुम्हीं युद्धास लागा. या विप्रचित्तीची खोड मीच स्वतः मोडतों. तेव्हां तुम्हीं त्या कामीं निर्धास्त राहून इतरांचा समाचार घ्या.'

याप्रमाणें आश्वासन मिळतांच महासागराचा आश्रय करून रहाणारे वरुणाचे परिचारक सर्व पन्नग जयेच्छु होऊन गर्जना करीत सर्व दैत्यांवर रणांत प्रहार करिते झाले. दानवही पेटलेच होते. तथापि त्या वरुणाचे अनुचरांनीं आनंदाचे आवेशांत नालीक, नाराच, मुद्गल, इत्यादिकांनीं दानवांवर आघात केला. त्या वेळीं महाबल पराक्रमी विप्रचित्ति रागास चढून त्यानें सर्वांचीं शरीरें त्या रणांत तेव्हांच उडवून दिलीं. शिवाय त्यानें भारलेलें गारुडास्त्र सोडून त्यापासून सर्पभक्षक गरुड उत्पन्न करून सर्वांचा नाश त्या रणांत केला. त्या दुर्जय वीरानें सूर्यसदृश स्वर्णभूषित बाणांनीं त्या पन्नगांचा नाश करण्यास सोडिलें नाहीं. बाणांनीं शरीरें फाटलेल्या त्या सर्पांना जेव्हां क्लेश होऊं लागले त्या वेळीं, गजांची महागजांशीं टक्कर झाल्यानें ते जसे पडावे, त्याप्रमाणें ते पन्नग सर्वांगें ठेंचल्यानें विव्हळ होऊन भूमीवर लोळत पडले. प्रज्वलित बाणरूपी किरणांनीं तापणारा केवळ आदित्यच अशा त्या विप्रचित्तीवर प्रभु वरुण कोपानें धांवत गेला. त्या वेळीं वरुणाचे माऱ्यानें हजारों दानवांच्या शरीरांच्या चिंध्या झाल्यानें ते व्यथित होऊन सैरावैरा दाही दिशा धावूं लागले. याप्रमाणें स्वतःचे प्राणावर उदार होऊन वरुणानें देवेंद्रासाठीं युद्ध आरंभिलें असतां हातीं पाश घेऊन मोठ्यानें गर्जना केली. तें पाहून त्याचे जे बलाढ्य अनुयायी होते ते कोणी पर्वतशृंगें हातीं घेऊन, कोणी मुष्टि वळून, समरांत त्या विप्रचित्ती महासुराशीं भिडले. त्या वेळीं रगदार व तेजस्वी विप्रचित्ति दानवानें शस्त्रें व शिला यांचा त्यांजवर प्रहार करून त्यास निवारिलें. नंतर त्यानें अग्नीप्रमाणें प्रदीप्त व मोठे वेगानें जाणारे असे बाण सोडून वरुणाचे मोठे वेगवान् अश्व मारिले. घृताहुतीनें जसें अग्नीचें तेज चढतें, तसें या अवचट कर्माचे योगानें विप्रचित्तीचें तेज चढलें. त्या बलाढ्य दानवानें जलाल व वेगवान् असे बाण नीट नेमून मारून त्या वरुणाचे अफाट सेनेचें मंथन केलें; व तिला अस्त्रहीन, बाणजर्जर, व शरजालानें मोहून टाकून शिवाय शूल, शक्ति व ऋष्टि यांनीं छिन्नभिन्न व रक्तबंबाळ करून सोडिली. असा प्रकार झाला तेव्हां जलाधिप वरुण विप्रचित्तीला भिऊन जाऊन आपले सैन्यासह समरांतून पळून आश्रयार्थ महेंद्राकडे गेला.

## अध्याय बासष्टावा.

—:०:—

### बृहस्पतिकृत अग्निस्तव.

वैशंपायन सांगतातः—देवश्रेष्ठ अग्नीनें देवांचा झालेला पराजय पाहून व ब्रह्मर्षींनीं केलेल्या स्तुतीनें प्रसन्न होऊन दैत्यांचा वध करण्याचा विचार मनांत आणिला. हा विचार मनांत येतांच तो अग्नि म्हणजे स्वयंप्रभा नांवाची जी शांडिली तिचा पुत्र, यज्ञांतील हव्य देवांना पोंचविणारा, सुवर्ण हेंच ज्याचें वीर्य आहे, ज्याचे नेत्र पिंगट आहेत, देव ज्याचें आवाहन करितात, जो दिलेले आहुतींचें भक्षण करितो, ज्याचा वर्ण व ग्रीवादि लाल आहेत, जो विघ्नहर्ता, इष्टदाता, हव्यरूप, कवि

१ या स्थळीं 'हयान्' हा पाठ दोन प्रतींत आहे. व 'शरान्' असा पाठ एकाच पोथींत आहे.

२ अग्नीचें गोत्र शांडिल्य आहे, हें सर्वांना श्रुतच आहे.

म्हणजे सर्वज्ञ, पावनकर्ता, सर्वभक्ष, द्युतिमान्, सर्व देवांचें मुख, शक्तिमान्, शोभनयज्ञस्वरूप किंवा वेदस्वरूप, उत्तम तपस्तेज देणारा, सहस्रज्वालांनीं युक्त, विचित्र किरणांचा, तेजस्वतांतही तेजस्वी, लोकसाक्षी, ब्राह्मणांनीं आह्वान केलेला, सर्वदा ज्वालान्वित, वषट्कारानें युक्त, हव्यभक्षक, अश्वत्थारणीपासून उत्पन्न: होणारा, सर्वकर्मकर्ता, सर्व भूतांना शुद्ध करणारा, देवतांचा तपोनिधि, सर्व पापशमनकर्ता, जिभळ्या चाटणारा, तपोरूप, उजव्या बाजूनें मुरडणाऱ्या ज्वालांनीं युक्त, पवित्र धूम्रयुक्त, यज्ञस्वरूप, हव्यभोक्ता, भूतभव्यप्रभु, यज्ञांत हविर्भाग घेणारा हरि, सोमपानकर्ता, महातेजस्वी, भूतपति, महातपस्वी, अधृष्य, पावनकर्ता, ऐश्वर्यस्वरूप, भूतात्मा, स्वधेचा स्वामी, स्वाहाचा स्वामी, सामांनीं गाइलेला, सोमरस भक्षण करणारा, सोमरस काढण्याकरितां आणलेले जे पाषाण त्यांचें धारण करणारा, देवाधिदेव, महाक्रोधिष्ट, रुद्ररूपी, ब्रह्मोद्भव, धूम्र हाच ज्याचें निशाण, ज्याची धूम्र हीच शिखा असून जो नीलवस्त्र नेसला आहे, असा भूतपति: असुरश्रेष्ठ अग्नि, रक्तवर्ण अश्वांनीं व वायुरूपी चक्रांनीं युक्त अशा रथांत बसून व दिव्य असें आग्नेय अस्त्र उगारून त्या रणभूमीवर हजारों लाखों दानवांना प्रलयकालीं चेतलेल्या भगवान् प्रलयाग्नीप्रमाणें जाळून काढूं लागला.

जो पंचविध होऊन प्राणरूपानें भूतमात्राचे उदरांत वास करीत असतो; जो सर्वांचें नियमनकर्ता व हुताश-मित्र असून सर्वांचा प्रभु व ईश्वरही आहे. आणि जेव्हां अखिल वस्तूंचा नाश होतो असा जो युगान्तकाल, त्या कालीं तो सर्वसंहारकर्ता होतो. ज्याची (वायूची) योनी म्हणजे उत्पत्तिस्थान जें आकाश, तें तद्गुण जो शब्द किंवा ध्वनि त्याचे योगानें सप्तस्वररूपानें परिणत होऊन वाणीवाटे प्रकट होतें व म्हणूनच जो आकाशरूपच म्हणावा; जो तेजस्वी, दूरवर जाणारा व कोठेंही उत्पन्न होणारा, जो कर्ता, विकर्ता, गतिमंतांची गति, प्रभु, वागुच्चरणाला हेतुभूत जीं इंद्रियें त्यांच्या चालकत्वामुळें जो लोकांमध्यें ब्रह्मदेवाशीं समान अशा सनातन वेदांचा कर्ता, ज्याला अतिश्रेष्ठ असें अमूर्त महाभूत असें म्हणतात, असा जो वायु त्यानें ह्या वेळीं शमीचे गर्भांत राहणारा असा जो अग्नि त्यास साह्य केलें. त्यामुळें आकाशाला चढणाऱ्या अशा ज्वालांनीं तो अग्नि युगान्तींचे अग्नीप्रमाणें दाही दिशांनीं चेतून जाऊन दानवांचा नाश करूं लागला; व मेद आणि मज्जा यांचा ज्यांत मोठा कर्दम माजला आहे, केशरूप शैवाल जींत शोभून राहिलें आहे, योद्ध्यांचीं मस्तकें हेच जींतून दगड वहात जात आहेत, मरून पडलेले प्रचंड हत्ती हेच जिचे तटाक आहेत, रक्त हेंच जिचें उदक आहे, अशा प्रकारची रक्तनदी जेव्हां संग्रामभूमीवर त्या सर्वव्यापी अग्नीचे दृष्टीस पडली, त्या वेळेस दैत्यांचें भय वाढावें म्हणून अग्नीनें ती नदी अधिकच जोरानें वहाण्यास लाविली. नंतर त्या सर्वव्यापी पराक्रमी अग्नीनें त्या रणांगणीं मोठ्यानें गर्जना करून प्रल्हादप्रभृति सर्वेही दानवांना पराजित केलें. त्या वेळीं तेथें अग्नीनें ग्रासलेल्या त्या असुरांपैकीं कोणाचे मुकुट पेटले आहेत, तर कोणाचे केश चेतले आहेत, कोणाचीं वस्त्रें जळतात आहेत, तर कोणाचे भुज व मुखेंच पेट घेत आहेत, कोणाच्या मांड्या तर कोणाचें छत्र, ध्वज व रथही ज्वलित झाले आहेत, असा देखावा दिसूं लागला. अग्नीनें पराभूत केल्यामुळें भयभीत होऊन असुरगण रणांगणांतच आपलीं उत्तम उत्तम अस्त्रें व ध्वजसहित उंची रथहि टाकून पळूं लागले. जेव्हां

तें सर्वच असुर सैन्य पेटून राहिलें, तेव्हां त्यांत निराळा अग्नि असा त्या असुरांस कोठेंच दिसेना. परंतु, सर्व दिशा, सर्वही खड्गें व मेघमंडलें हींच त्यांना अग्निमय दिसूं लागलीं. त्या कालीं सर्वही दानव भिऊन जाऊन असें मानूं लागले कीं, जलशायी परमात्मानें आज खचीत प्रळयकालच निर्माण केला असावा.

अशा वेळीं दानवपक्षाकडील महामायावी जे मय व शंबर यांनीं जलवृष्टि करणाऱ्या अशा पार्जन्य व वारुणी नांवाच्या दोन मोठ्या माया निर्माण केल्या. त्या मायांच्या योगानें जेव्हां सर्वत्र पर्वतप्राय जलधारांचा सर्वभर वर्षाव होऊं लागला, तेव्हां कुठे त्या अग्नीचें स्वरूप थोडेंसें सौम्य होऊं लागलें. याप्रकारें दैत्यांचा संहारकर्ता तो अग्नि जेव्हां त्या रणभूमीवर उपशम पावूं लागला, तेव्हां ज्याचें तेज व कीर्ति फार मोठी आहे असा बृहस्पति त्या अग्नीला बोलला.

गुरु म्हणालाः—हे हिरण्यरेतः, हे सुमुख, हे ज्वलनसंज्ञ, हे सर्वभुक्, हे सप्तजिव्ह, सप्तानन, हे दाहकर्त्या, हे लेलिहान, हे महाबल, हे विभो, वायु तुझा आत्मा आहे; व सर्व तृणलता तुझें शरीर आहेत; जल हें तुझें उत्पत्तिस्थान आहे व तूं जलाचें उत्पत्तिस्थान आहेस. हे महाभागा, तुझ्या ज्वाला वर, खालीं, बाजूस याप्रकारें सर्वत्र जातात, संचार करितात व सर्वत्र आपला प्रभाव दाखवितात. हे अग्ने, हें सर्व विश्व तूंच आहेस व सर्व जगत् तुझे ठिकाणींच स्थित आहे. तूंच या भूतांचें व भुवनांचें धारण करितोस, हे अग्ने, तूंच एकटा हव्यवाहक आहेस व हविही तूंच आहेस आणि मोठमोठ्या यज्ञांत भले लोक तुझेंच पूजन करितात. प्राण्यांचें अन्न तूंच खातोस (पचवितोस); मग तें गिळलेलें, प्यायलेलें किंवा चावून खाल्लेलें, कसेंही असो. यश तुझ्या स्वाधीन आहे व सर्व लोकही तुझे आधारावरच राहिले आहेत. हे हव्यवाहना, या तिन्ही लोकांना, योग्यकालीं तूंच प्रदीप्त होऊन पक्वतेस आणतोस. हे जातवेदा, तूंच एकटा सूर्यरूपी होऊन तपतोस, व, हे देवा, रश्मिमंडलांतही तुजवांचून अन्य कोण प्रविष्ट आहे? तूंच जलवृष्टिकर्ता व जलपानकर्ता व सिंधुपतिहि तूंच व महायज्ञांत अग्रभाग ग्रहणकर्ता तूंच आहेस; हे भगवन्, या प्रचंड विश्वाचें उत्पत्तिस्थान तूंच आहेस; आणि या प्रजांचा आधारही तूंच आहेस. हे जातवेदा, तूंच आपले किरणांनीं जल निर्माण करितोस, त्याचप्रमाणें ओषधि व त्यांतील रसही तूंच करितोस. हे अनला, युगान्तकालीं तूंच या विश्वाला गट्ट करितोस व सृष्टिकालीं तूंच याला उत्पन्न करितोस. हे अग्ने, वेदामध्यें तूंच सर्व भूतांची योनी असें म्हटलें आहे. तूंच देवांचे कल्याणासाठीं रणांत असुर मारिलेस. हे महातेजस्विन्, शेंकडों यज्ञांनीं प्राप्त होणारें जें जल तें तर तुझी योनीच आहे; मग ती तुला प्राप्त झाली म्हणून, हे पावका, तुला खिन्न होण्याचें काय कारण आहे? हे सुरश्रेष्ठा, हे पिंगाक्ष, हे ताम्रग्रीव, हे कृष्णवर्त्मन्, हे हुताशन, रणांत दैत्यांपासून देवांचें तूं रक्षण कर.

## अध्याय त्रेसष्टावा.

—:०:—

### बलीचें अग्नीशीं युद्ध.

वैशंपायन सांगतातः—याप्रमाणें बृहस्पतीनें म्हटलेली गोष्ट खरी आहे असें जेव्हां ऐकून अग्नीला पटलें तेव्हां यज्ञांत हविर्भाग मिळाला असतां तो जसा उत्तेजित व्हावा, त्याप्रमाणें

१ अप्सु ज्योतिः प्रतिष्ठितम् । ज्योतिष्यापःप्रतिष्ठिताः । उपनिषद् ।

१ यज्ञाद्भवति पर्जन्यः । भगवद्गीता.

( सर्व विषाद सोडून ) पुनरपि त्या रणांगणांत तो प्रज्वलित झाला. त्या वेळीं रणांत त्यानें प्रदीप्त होऊन त्या दैत्यांच्या मायांचा विध्वंस केला. तेव्हां त्यांचे मायांचा व बळाचा विध्वंस झाला असतां ते असुर बलि दानवांपाशीं आले. अद्भुत कर्म करणारे अग्नीनें याप्रकारें दैत्यांचा पराजय केलेला पाहून दैत्यपति जो बलि त्याला पुढीलप्रमाणें वाक्य प्रऱ्हाद बोलला.

प्रऱ्हाद म्हणालाः—हे दानवश्रेष्ठा बले, तूंच अग्नि आहेस, तूंच वायु, तूंच सूर्य, तूंच जल, तूंच शशी, तूंच नक्षत्र, तूंच दिशा, तूंच आकाश, तूंच भूमि, व भूतभविष्य व वर्तमानही तूंच आहेस. कारण, वरदात्या ब्रह्मदेवानें हें सर्व सामर्थ्य तुला दिलें आहे. त्याप्रमाणें इंद्रत्व, अमरत्व, युद्धांत अपराजय, ईशित्व, अमित असें शुभबल, त्याचप्रमाणें सर्वभूतेश्वरत्व, हींही, हे दैत्यराजा, सर्वदा तुझींच आहेत. महासंग्रामांत शूरत्वही तुझेंच व महायोगीश्वरही तुझेंच. त्याचप्रमाणें अणिमा, लघिमा व इतर जे कोणते सात्विक गुण असतील तेही तुझेच आहेत; याकरितां हे दैत्येंद्रा, अनुयायांसह सर्वही दैत्यांचा पराजय कर. कारण ब्रह्मदेवानें तुला जें जें म्हटलें आहे तें तें तसेंच अनुभवास येईल: अन्यथा होणार नाहीं.

याप्रमाणें त्या महात्मा प्रऱ्हादाचें वचन ऐकून बलि फार आनंदित होऊन इंद्राचे रथावर चालून गेला. तो उत्तम शोभायुक्त असुरेंद्र बलि जेव्हां इंद्रासन्निध जाऊं लागला, तेव्हां पुण्यवान् ब्राह्मण व सुलक्षण पशुही त्वरेनें त्याला उजवी घालून जाऊं लागले. त्याचप्रमाणें त्या रणांगणांत विद्यमान असलेले मस्तकीं मोठा जटाभार धारण करणारे तपस्वी, विधियुक्त मंत्रांनीं त्या अलंकारयुक्त बलिराजाचें तो जातांना स्वस्तिवाचन करूं लागले. तो बलिदानव नानाप्रकारचे दिव्य रत्नाभरणांनीं भूषित व आगीसारख्या लाल सुवर्णाच्या विचित्र भूषणांनीं अलंकृत झाला असल्यानें अत्यंत तेजानें युक्त होऊन अग्निज्वालेप्रमाणें त्या रणांत चमकत होता. त्या वेळीं उत्तम सत्व व बल यांनीं युक्त असणाऱ्या त्या बलीला दिसून आलें कीं, वर्षारंभीं आकाशांत वायूचे वेगापुढें ज्याप्रमाणें शोभायमानही मेघपटल फाटून जातें, त्याप्रमाणें आपली म्हणजे असुरांची सेना शत्रुबलानें पीडित होऊन फाटली आहे. तसेंच त्याला आढळून आलें कीं, पर्वकालीं ( अमावास्या व पौर्णिमा या दिवशीं ) ज्याप्रमाणें समुद्राच्या लाटा अतिशय उंच उसळतात व भयंकर दिसतात, त्याप्रमाणें देवांचीं सैन्यें अग्नीनें रक्षित असल्यामुळें ( तेखास चढून ) फार उसळलीं होतीं व भयंकर दिसत होतीं.

हा देखावा दृष्टीस येतांच त्या वीर्यवान् बलीनें शूल, बरची, ऋष्टि, गदा, तलवार, बाण इत्यादि अस्त्रांचा आपल्या बलाढ्य शत्रूंच्या सेनेवर वर्षाव चालू केला, व वर्षाकालीन मेघांप्रमाणें किंवा सिंहाप्रमाणें किंवा मत्तगजाप्रमाणें गर्जूं लागला. त्या कालीं तो पराक्रमी बलिदानव त्या रणांगणांत ज्याचे हातांतील दिव्यास्त्रें हाच धुराचा लोळ आहे, ज्याच्या पुष्ट भुजांचा वेग हाच ज्याचा साह्यकर्ता वायु आहे, व ज्याचें पौरुष व पराक्रम हींच इंधनें आहेत, अशा प्रकारचा केवळ अग्निच—नव्हे—कल्पांतसमयीं सर्व प्रजांचें अवदान घेणारा अत्यंत भयंकर जो कालाग्नि त्याप्रमाणेंच दिसूं लागला.

## अध्याय चौसष्टावा.

—:•:—

### बलीचें पुरंदराशीं युद्ध.

वैशंपायन सांगतातः—त्यावेळीं बलीनें

इंद्र वजा करून बाकी सर्वेही देव आपल्या शेंकडों बाणांनीं छिन्नभिन्न करून सोडून सैन्यासह पराजित केले. याप्रमाणें त्या दैत्येंद्राचे माऱ्यापुढें त्या मोठ्या देवसेना तोंड फिरवून रथांतून पळत चालल्या; व ते सर्व देव 'आज या बलीनें आह्मांला जिंकलें' असें महाबलाढ्य इंद्राला सांगू लागले.

देव म्हणालेः—हे सुरेश्वरा, तूं आमचा इंद्र व धाता (संभाळणारा) असून सर्व लोकांचा शाश्वत प्रभु आहेस. तुझी कर्तबगारी व तुझें तेजही केवळ अप्रतिम आहे. हे देवेंद्रा, या महासुरांनीं ध्वजा, चक्र, अक्ष (आंस) व रथ यांसह चिरडून टाकिल्यानें हीं आमचीं सैन्यें आम्हांसहित रथांतून पळ काढीत आहेत. असुरांनीं गदा, मुसळ व पट्टिश इत्यादि आयुधांनीं आम्हांकडून शेंकडों रथी, गजारोही, अश्वारोही, व पादचारी योद्धे छिन्नभिन्न करून सोडिले आहेत. आज या दानवश्रेष्ठ बलीनें रणांगणीं फारच घोर कर्म केलें आहे. तर, हे देवेंद्रा, आपली श्रेष्ठ देवसेना याप्रकारें दैत्याचे हातून मार खात असतां तूं अशी डोळेझांक कशी करितोस? हे देवेंद्रा, तूं शरणांगतांचें रक्षण करणारा असा तुझा लौकिक आहे व आम्ही तुजकडे आज शरणार्थ आलों आहों, तर आमचें आतां रक्षण कर.

याप्रकारचें तें देवांचें गाऱ्हाणें कानीं पडतांच तो देवश्रेष्ठ प्रलयाग्नीप्रमाणें भडकून जाऊन सर्व दानवांना जाळूं लागला. त्या देवेशाचे मस्तकीं सूर्यकिरणांप्रमाणें प्रकाशमान् किरीट चमकत होता. त्याची अंगकांति वैडूर्य रत्नाप्रमाणें असून त्याचीं बाहुभूषणें अनेक रत्नांनीं खचलीं होतीं, त्यानें मयूरपिच्छें धारण केलीं असून त्याचे डोळे लालगुंज होते. त्याला शंभर हात व सहस्र नेत्र होते. त्याचे मस्तकावरील केश व त्याची दाढीही हरिद्वर्ण होती त्याचे ध्वज विचित्र प्रकारचे होते व बल तर मोठेंच होतें. वज्र हें त्याचें आयुध असून तो मोठा संयमी होता आणि त्यास शंभर शिरें होतीं. त्यानें कवच वगैरे सर्व साज घालून हातांत धनुष्यही सज्ज्य धरिलें होतें. त्याची कांति सहस्र सूर्यांप्रमाणें असून त्याचे मागें सहस्रावधि देव, गंधर्व, यक्ष यांचा घोळका चालला होता. सामें गाणारे व जप करणारे ऋषि त्याची स्तुति करीत होते. अशा वेळीं त्या पाकशासन महेंद्रानें, शंभर पर्वांनीं (पेरांनीं किंवा गांठींनीं) युक्त, मोठें भयंकर, फट् फट् आवाज करणारें, सर्वतोमुखि, रुचिर व दीप्तिमान् आणि भीषण अट्टहास करणारें, असें वज्र हातीं घेऊन त्याचे योगानें सर्वेही दैत्य चेंचून काढिले. त्या अदितीच्या लाडक्या पुत्रापुढें कोणाही भूताची त्याचे अंगावर चालून जाण्याची छाती होईना. अशा प्रसंगीं बलि दानव व देवेंद्र उभयतांचें युद्ध जुंपलें. मग त्या देवदैत्यांचा फारच अद्भुत दीर्घ कालपर्यंत संग्राम झाला. त्या संग्रामांत उभय पक्षांकडील बलाचा व पराक्रमाचा केवळ निकर झाला व तो संग्राम इतका तुंबळ झाला कीं, तो पाहून अंगावर कांटाच थरारला. त्या वेळीं प्रऱ्हादानें बलीचीं पूर्वींचीं शेंकडों पराक्रमाचीं जयकृत्यें यांचें वर्णन ज्यांत आहे अशीं स्तोत्रें गाऊन त्या दैत्यपतीला चेव आणिला. तो पेटलेल्या अग्नीप्रमाणें झळकूं लागला. याप्रमाणें देवेंद्र व असुरेंद्र या उभयतांचें युद्ध चाललेलें पाहून इतर देव व असुर यांचेंही पुनरपि मोठें घोर युद्ध झालें.

इकडे महेंद्र त्या महाबलीला अस्त्रविद्ध करूं लागला. परंतु त्या महाबाहु बलीनें त्या इंद्राचे अस्त्रांचे शतधा तुकडे करून रणांत टाकिले. तें पाहून देवेंद्र अधिकच क्रुद्ध होऊन

त्यानें बलीवर शत्रुनाशक असें घोर आग्नेयास्त्र सोडिलें. तें प्रलयाग्नीसमान तेजस्वी आग्नेयास्त्र आपणाकडे आकाशांतून येतांना पाहतांच बलीनें वरुणास्त्र सोडून तें महेंद्राचें अस्त्र खालीं पाडविलें. तेव्हां खवळून जाऊन, रणांत विजय मिळविण्याची ज्याला घमेंड होती, अशा त्या देवेंद्रानें दैत्येंद्र बलीला रणांत ठार करण्याचे हेतूनें आपलें तें पर्वतप्राय वज्र उचलिलें. त्या वेळीं त्या युद्धांत हरिवाहन इंद्रानें आकाशवाणी ऐकिली कीं, ' हे सुरहर्षवर्धना, तूं युद्धापासून निवृत्त हो. ' हे महाबाहो, हे सुरश्रेष्ठा, हे पुरंदरा, तुला रणांत बलीवर जय मिळणार नाहीं. कारण हा बलि दानव एक तर तपःसामर्थ्यानें वरिष्ठ असून, त्यांतही वरदानामुळें फारच अधिक झाला आहे. ब्रह्मदेव याजवर संतुष्ट असल्यामुळें व हा सत्यधर्मानें चालणारा असल्यामुळें,हे वासवा, तुला किंवा सर्व देवांनादेखील हा बलि रणांत हार जाणार नाहीं. याला जिंकणारा कोण समर्थ आहे त्याबद्दल सावधान मनानें श्रवण कर.

" या बलीला जो जिंकणार आहे तो ब्रह्माचें निधान असून सर्व देवांची परम गति आहे. तो धर्माचें परम रहस्य, पराचीही परागति आहे. तो श्रेष्ठाहून श्रेष्ठतर, सर्वशक्तिमान् व उच्च नीच या संबंधींही गति आहे. त्याला सहस्र मस्तकें, सहस्र नेत्र, सहस्र हस्त असून तो पुरुष[1] म्हणजे सर्व ' शरिरांत व्यापून असणारा, ' पीत वस्त्र परिधान करणारा, हातीं शंख, चक्र गदादि धारण करणारा व देवशत्रूंचा उच्छेदकर्ता आहे. तो सर्वांस जिंकणारा, स्वतः अजिंक्य व केवळ विनयरूपच असा आहे. तो श्रीमान् प्रभु ह्या बलीला जिंकणार आहे."

या प्रकारची ती दिव्य व मधुर अशी अशरीरिणी म्हणजे आकाशांतील वाणी ऐकूं येतांच इंद्र आपल्या सर्वेही श्रेष्ठ देवांसह रणांतून परावृत्त झाला.

तो हरिवाहन देवेंद्र या प्रकारें रणांतून मागें जातांच त्या रणमंडळावर असुर मंडळीनें स्वोत्कर्षसूचक असा सिंहनाद केला. त्यानंतर कांहीं असुरवीरांचा किलकिल शब्द, दंड थोपाटण्याचा किंवा छड्डु ठोकण्याचा दणदणाट व गर्जना, कांहींचे शंखांचा भोंभाट व वीरांचे शब्द, फुशारकीचा शब्द, व रणवाद्यांचे शब्द, हे सर्व मिळून एकच गजबजाट माजून राहिला. शिवाय देवांचा पराजय झाला म्हणून दैत्यवीरांच्या जयाच्या आरोळ्या तर सारख्या चालू होत्या. आणि दैत्यराज बलि याची व त्याचे सैनिकांची त्याचे मित्र मंडळींनीं पराक्रमाबद्दल फारच स्तुति चालविली. त्या वेळीं बलाढ्यांत श्रेष्ठ असा बलि दैत्य हिरण्यकशिपूप्रमाणें शोभूं लागला.

## अध्याय पांसष्टावा.

—:०:—

### बलीस राज्यप्राप्ति.

वैशंपायन सांगतातः—याप्रमाणें बलाढ्य बलिदैत्य, तसेच मयासुर व शंबर, यांचा विजय होऊन देवगण गप्प बसले; आणि सर्व त्रैलोक्यावर दैत्यांची सत्ता चालू झाली. सर्व दिशा निर्मळ होऊन धर्मकर्मांची पूर्ववत् प्रवृत्ति होऊन ( युद्धकालीं प्राप्त झालेली ) अधर्मप्रवृत्ति नाहींशी झाली. सूर्य ( पूर्ववत् ) आपल्या मार्गानें जाऊं लागला. प्र‍ल्हाद, शंबर मय व अनुऱ्हाद हे चारी दिशांचें रक्षण करूं लागले व आकाशावरही दैत्यांची देखरेख

---

1 पुरि शेते स० या शरीरांत निजतो किंवा वास करितो तो.

चालू झाली. स्वर्गप्राप्त्यर्थ दैत्यगण यज्ञमंडन करूं लागले. सर्व जनता आपल्या आपल्या नेहमींचे रहाटीला लागली. सन्मार्गाची प्रवृत्ति सुरू होऊन सर्व पाप-कल्पनांचा अभाव झाला व पुण्य. कल्पनांचा प्रचार होऊं लागला. तपश्चर्येनें सिद्ध दशेला पोंचलेल्या लोकांची अभिवृद्धि होऊन पापकर्मी लोकांचा नायनाट होत चालला. धर्म हा चारी पायांवर उभा राहूं लागला व अधर्माला सरासरी चौथा पाय शिल्लक राहिला. राजेगण प्रजापालनांत दक्ष असल्यानें तेजास चढले. आणि ब्रह्मचर्यादि चारही आश्रमांचा आश्रय करणारे लोक आपापले विहित कर्तव्यांत निरत झाले. अशा समयीं सर्व दैत्यांनीं मिळून बलीला देवराज्यावर अभिषिक्त केला. आणि या उत्कर्षामुळें सर्व असुर मंडळी हर्षभरानें आरोळ्या देत व मोठ्या रंगांत आहे, अशांत असुरांना मोह घालणारी व [1]वरदात्री देवी लक्ष्मी पद्मासनावर बसून व पद्मयुक्त हात वर करून बलीकडे येऊन बोलली.

लक्ष्मी म्हणालीः—हे बलाढ्यांत श्रेष्ठा, महातेजस्वी बलि महाराजा, तूं देवतांचा पराजय केलेला पाहून मी तुजवर प्रसन्न आहें. तुझें कल्याण असो. तूं आपले पराक्रमानें युद्धांत प्रत्यक्ष देवेंद्रालाही पराभूत केलास, त्यावरून तुझें परमश्रेष्ठ सत्व माझे मनांत भरून मी तुला भेटण्यासाठीं स्वतः आलें. हे दानवश्रेष्ठा, हिरण्यकशिपूसारख्याच्या कुलांत निर्माण झालेल्या तुजसारख्या असुरेंद्रानें असलें शौर्याचें कृत्य करणें म्हणजे कांहीं मोठें आश्चर्य नव्हे. ( हें तुजसारख्याला सहज आहे. ) हे राजा, दैत्येंद्रा, तूं या निखिल त्रैलोक्याचा उपभोग घेणाऱ्या आपल्या प्रपिता-महावर[1] ( हिरण्यकशिपु ) देखील तान केलीस. कारण, तुझे कारकीर्दींत विशेषेंकरून सर्वही प्रजाजन आपापले धर्मानें वागत आहेत व यामुळेंच हे अतलविक्रमा, तूं हा अक्षय्य त्रैलोक्याचा उपभोग घेशील.

याप्रमाणें बोलून ती सौम्य व सर्वभूतमनोहारिणी वरदात्री देवी लक्ष्मी त्या दैत्यश्रेष्ठ बलीचे शरीरांत प्रविष्ट झाली. ती प्रविष्ट होतांच तिजप्रमाणेंच इतरही श्रेष्ठ देवता—ही कीर्ति, द्युति, प्रभा, धृति, क्षमा, भूति, नीति, विद्या, दया, मति, स्मृति, मेधा, तुष्टि तशीच पुष्टि, श्रुति, प्रीति, इला, कांति, शांति, पुष्टि, क्रिया, या सर्वजणी व नृत्यगीतकुशल अशा सर्वही दिव्य अप्सरा, महारथ दैत्येंद्र जो बलि, त्याचे सेवेंत सादर झाल्या.

या प्रकारें सचराचर त्रैलोक्य तूर्त दैत्यांचे ताब्यांत गेलें व ब्रह्मवादी जो बलिदैत्य त्याला अमित ऐश्वर्य प्राप्त झालें.

## अध्याय सासष्टावा.

—:०:—

### देवमंडळीचें ब्रह्मलोकीं गमन.

जनमेजय विचारतोः—हे द्विजश्रेष्ठा मुने, दैत्यांनीं पराजित केल्यावर मग देवांनीं काय केलें व आपलें गेलेलें स्वर्गाचें राज्य पुनरपि कसें मिळाविलें ?

---

१ या ठिकाणीं लेखी पोथीचा पाठ " चंचला सुरसेविनी " असा आहे. अर्थ उघडच आहे. छापील पाठ 'वरदाऽसुरमोहिनी' असा आहे, तो घेतला आहे.

१ येथें दोन पुस्तकांत " सपितामह." असा पाठ आहे, पण तो खरा नव्हे. बाईकरांचा पाठः 'विशेषतस्त्वया राजन् दैत्येंद्रः प्रपितामहः' याचा अर्थ त्यांना कसा अडला नाहीं, न कळे. आमचा पाठ 'विशेषितस्त्वया-प्रपितामहः' असा आहे.

वैशंपायन सांगतातः—मागें सांगितलेली ती दिव्य आकाशवाणी कानीं पडतांच सुरश्रेष्ठ श्रीमान् इंद्र सर्व देवांसह अदितीचें वसतिस्थान अशी जी पूर्वदिशा तिकडे निघाला आणि अदितीचे स्थानास पोंचतांच त्यानें पूर्वी जशी युद्धकालीं ऐकली होती तशीचे तशीच आकाशवाणी अदितीला सांगितली. ती ऐकून:—

अदिति म्हणालीः—हे पुत्रा, तूं सांगतोस असेंच जर आहे तर विरोचनपुत्र बलीला तुम्हीं सर्व मरुद्गण मिळूनही जिंकूं शकणार नाहीं. त्या असुराला केवळ एक सहस्रशीर्ष परमात्माच मारील. हे सहस्राक्षा, शतक्रतो, दुसऱ्या कोणाचेही हातून ही गोष्ट होणें नाहीं. तर या समयीं तुम्ही त्या महात्म्या बलिदानवाचा पराजय कसा करावा या कामीं तुमचा सत्यवादी पिता जो महर्षि कश्यप त्याला विचारा.

अदितीनें अशी सल्ला देतांच ते सर्वही देव तिजसकटच कश्यपऋषीकडे आले. तेथें दिव्यतपाचा केवळ निधिच असा कश्यप त्यांचे दृष्टीस पडला. तो कश्यप म्हणजे अर्थातच सर्वांत प्रथम, देवांचा पिता, दिव्यरूपी, त्रिकालज्ञानानें गारठलेला, तेजानें सूर्यासारखा व अग्निज्वालेप्रमाणें कांतिमान्, तपोयुक्त, दंडत्याग केलेला, अंगावर कृष्णाजिनाचें उत्तरीय धारण करणारा व वल्कलांनीं शरीर आच्छादन केलेला, मंत्रोच्चारपूर्वक दिलेल्या आज्याहुतींमुळें प्रदीप्त झालेल्या अग्नीप्रमाणें ब्रह्मतेजानें चमकणारा, स्वाध्यायमग्न व शांत असूनही मूर्तिमान् अग्नीप्रमाणें भास्वान् असा होता. तो सुरासुरपिता व समर्थ, श्रेष्ठ ब्रह्मवादी, तेजस्वी, तपणारा, केवळ आदित्य असा मरीचि ऋषीचा पुत्र कश्यप, सर्व भूतांचा स्रष्टा असून प्रजेचा नाथ व ज्यामध्यें ब्रह्मदेवाचें सामर्थ्य किंवा आत्मत्व विशेष रीतीनें उमटलें आहे असा तिसरा प्रजापति म्हणजे नातवाचे रूपानें तिसऱ्यांदा जन्मास आलेला ब्रह्मदेवच होय. नंतर अदितीसह ते सुरश्रेष्ठ वीर त्या कश्यपाला वंदन करून ब्रह्मदेवाचे मरीच्यादि मानसपुत्र ज्याप्रमाणें ब्रह्मदेवाला मर्यादेनें प्रश्न करितात, त्याप्रमाणें हात जोडून कश्यपाला बोलते झाले. त्या बोलण्यांत त्यांनीं रणांगणीं "सर्वही देवांना दानवश्रेष्ठ बलि हा अजिंक्य आहे" अशा अर्थाची जी आकाशवाणी इंद्राचे कानीं पडली होती ती निवेदन केली. स्वपुत्रांचें तें गाऱ्हाणें कानीं येतांच त्या प्रजापतीनें ब्रह्मलोकीं जाण्याचा विचार केला. मग.

कश्यप (त्यांस) म्हणालाः—चला, आपण वेदघोषानें दणाणून गेलेल्या अशा ब्रह्मलोकीं जाऊं. आणि हे निष्पापहो, तेथें गेल्यावर तुम्हीं जी कांहीं आकाशवाणी ऐकली आहे तशीचे तशीच ब्रह्मदेवास ती सांगा.

वैशंपायन सांगतातः—याप्रमाणें बोलणें झाल्यावर कश्यपऋषि देवर्षिगणांनीं सेवित अशा ब्रह्मसदनाकडे निघाले असतां अदितीसह सर्वही देवगण त्याचे मागोमाग गेले. ते मुहूर्तांत ब्रह्मलोकीं पोंचले. कारण, ते अत्यंत मनोहर, बहुमोल, दिव्य व इच्छेस येईल तितक्या वेगानें जाणाऱ्या विमानांत बसले होते. तपाची केवळ राशीच अशा अव्यय ब्रह्मदेवाला भेटण्याची त्यांना इच्छा असल्यामुळें ब्रह्मदेवाचे अत्यंत विस्तीर्ण अशा मुख्य सभास्थानीं गेले. त्या सभेंत भुंग्यांचा गुंजारव

१ प्रथम–प्रजापति–ब्रह्मदेव, त्याचा पुत्र मरीचि व त्याचा कश्यप. अर्थात्, हा ब्रह्मदेवाचा नातु व त्यापासून तिसरा. आपल्यांत–आजा मेला आणि नातु झाला अशी म्हण आहे आणि म्हणूनच आजाचें नांव नातवाला ठेवितात. अर्थातच आजाचें आत्मत्व पुत्रापेक्षांही नातवांत अधिक असतें, अशा समजुतीनें "आत्मभाव–विशेषेण तृतीयोयः प्रजापतिः" असें मूळांत म्हटलें आहे.

ब्राह्मणांचे सामगायनाबरोबर संमिश्र झालेला चालू होता. ती सभा कल्याणकारक व शत्रुनाशक अशी पाहून ते आनंदानें पुलकित झाले. तेथें ऋग्वेदी ज्यांत अग्रेसर आहेत अशा वेदवेदांगांत निष्णात व वर्णोच्चार वगैरे कसे करावे हे ज्यांना शिक्षाग्रंथावरून पूर्ण माहीत होतें अशा महाभाग ब्राह्मणांनीं संहितेंतील शब्दांचा स्पष्ट खुलासा व्हावा म्हणून पदें तोडून ऋचांची चर्चा चालविली होती. ती त्या अमरश्रेष्ठांनीं ऐकली. कांहीं भागांत यज्ञकर्म चालू असतां तेथें यज्ञ व वेदांगें यांत प्रवीण व पदेंक्रम यांत कुशल परमर्षींचा वेदघोष चालल्यानें ती सभा नादमय झाली होती. तो सर्वश्रेष्ठ ब्रह्मलोक देवलोकाप्रमाणेंच—यज्ञस्तुति व शिक्षाप्रकरण यांत निपुण, शब्दाचे उलगडे किंवा निरुक्ति ज्यांस माहीत, जे सर्व विद्येंत विशारद, मीमांसेंतील वचनें ज्यांना पूर्ण अवगत, सर्व प्रकारचे वादांत[1] पटु, मंजुळ, व प्रसन्न आणि मांसल अशा स्वरांचे ब्राह्मणांनीं गजबजून गेला होता.

अशा त्यास्थलीं प्राप्त झालेले ते देव तो वेदघोष कानीं पडल्यानें आपलीं शरीरें निःसंशय पवित्र झालीं असें मानूं लागले. तो वेदध्वनी कानीं येत असतां ते सर्वहीजण निःशब्द होऊन व त्यांचे चित्ताचा लय पूर्णपणें ब्रह्माकडे होऊन विस्मयानें त्यांचे नेत्र विकसित होत्साते ते परस्परांकडे टकमक बघूं लागले. व कश्यपाला पुढें करून ते सर्वही सुरश्रेष्ठ मनानेंच सर्व लोकांचा गुरु व स्वतःचा प्रपितामह जो ब्रह्मदेव त्याला प्रणाम करूं लागले. पुनरपि त्यांनीं त्या वेदध्वनीकडे कान दिले. त्या वेळीं ते गंभीर, उदार, मधुर, सुस्वर व हंसरवाप्रमाणें गद्गद् असा वेदपठणाचा तेथें निम्रत असलेला ध्वनि, स्वरांचें ऐक्य, पृथकत्व, संयोग आणि समुदाय यांत कुशल अशा लोकायतिकादि शास्त्राभिमानी देवतांसह ऐकते झाले. त्याचप्रमाणें तेथें जागजागीं जपहोमादिकांत गुंतलेले असे मोठे नियमस्थ व कडकपणें व्रत पाळणारे अनेक श्रेष्ठ श्रेष्ठ ब्राह्मण त्या कश्यपपुत्रांचे दृष्टीस आले. तसल्या त्या सभेंत श्रीमान् सुरासुर गुरु लोकपितामह ब्रह्मदेव देवमायेचे योगानें सृष्टिकर्म करीत बसला होता. व तेथें प्रजापति दक्ष, प्रचेता, पुलह, द्विजश्रेष्ठ मरीची, भृगु, अत्रि, वसिष्ठ, नारद, गौतम, मनु, त्याचप्रमाणें स्वर्ग, अंतरिक्ष, वायु, तेज, जल, पृथ्वी, शब्द, स्पर्श, रस, रूप, गंध, प्रकृति, सर्वांस कारणीभूत असें महत्तत्व, सरहस्य व स—पदक्रम असे सांगोपाङ्ग चारही वेद, क्रिया, क्रतु, संकल्प, प्राण, हे आणि दुसरे कित्येक त्या स्वयंभु प्रभूची सेवा करीत होते. त्याचप्रमाणें हे राजा, अर्थ, काम, द्वेष, दर्प, शुक्र, बृहस्पति, प्रलयकाल, बुध, शनि, राहु वगैरे सर्व ग्रह, सर्व मरुद्गण, विश्वकर्मा, नक्षत्रें, सूर्य, चंद्र, हे नित्य त्या ब्रह्मदेवाची उपासना करीत होते. सावित्री, दुर्गा, सात प्रकारची वाणी, सर्वही वेदशास्त्रें, गाथा, नियम, वेदभाष्यें, शास्त्रें हीं सर्व मूर्तिमंत होऊन त्याचे सेवेंत होतीं. क्षण, लव, मुहूर्त, दिवस, रात्र, पक्ष, मास, साही ऋतु, संवत्सर, कृत, त्रेत, द्वापार, कलि हीं चार युगें, मास, चार प्रकारची रात्र व सर्वदा गतिमान् असणारें असें अव्यय कालचक्र हीं सर्व व दुसरीं किती तरी त्या स्वयंभूसन्निध होतीं.

या प्रकारच्या त्या सर्व इच्छा पूर्ण करणाऱ्या, सर्वत्र लखाखणाऱ्या व ब्रह्मर्षींनीं युक्त अशा दिव्य ब्रह्मसभेंत धर्मविशारद अशा आपल्या पुत्रांसह कश्यप शिरले. तेथें ब्रह्मतेजानें चमकणाऱ्या अचिंत्य व ग्लानिरहित अशा ब्रह्मदेवाला श्रेष्ठ आसनावर बसलेला

[1] येथें वाद शब्दाचा अर्थ—मत किंवा सिद्धांत असा घ्यावा. जसें-अद्वैतवाद, स्याद्वाद इ०.

पाहून ते सर्वही देव ब्रह्मदेवाच्या पायांवर लोटांगणीं गेले. आपल्या मस्तकांनीं ब्रह्मदेवाचे चरणांला स्पर्श केल्यामुळें ते सर्व पापांपासून मुक्त होऊन शांत व निष्कलमष झाले. मग ते सर्वही देव कश्यपासह आपलेकडे आले आहेत असें पाहून तो देवांचा प्रभु व सत्ताधीश महातेजस्वी ब्रह्मदेव त्यांना म्हणाला.

## अध्याय सदुसष्टावा.

—:०:—

### ब्रह्मदेवाचा उपदेश.

ब्रह्मदेव म्हणाला:—हे महाबलहो, तुम्ही सर्व जण कोणत्या उद्देशानें येथें आलां आहां तें मी पूर्णपणें आधींच जाणून आहें. हे सुरश्रेष्ठहो, तुमचा जो इष्ट अर्थ आहे तो खास सिद्ध होईल व तेणेंकरून बली दानवाला जिंकणारा कोणी तरी उत्पन्न होईल असें समजा. तो विश्वकर्ता पुरुष केवळ दैत्यसमूहालाच जिंकणारा आहे असें समजूं नका. तर तो त्रैलोक्यालाही जिंकणारा असून सर्व देवांत श्रेष्ठ आहे. तो सनातन लोकांचा पालक, विश्वाचें उत्पत्तिस्थान आहे. सांप्रतचे अवतारापूर्वीचे देहांत तो कोण होता म्हणाल तर हिरण्यगर्भ जो मी तो त्याचीच ( पुत्रत्वानें ) प्रतिमा आहें. त्या महात्म्या सर्वशक्तिमान् देवानेंच असुरश्रेष्ठ बलीचा आत्मा अखिल विश्वालाही अजिंक्य केला आहे. असा तो आपला सर्वांचा पूर्वज असून उगमही आहे. तो विश्वात्मा अचिंत्य आहे व तो योगयुक्त झाला असतां तत्काल शत्रूचा नाश करून टाकील. प्रत्यक्ष देवांला देखील हा महात्मा कोण असावासें समजत नाहीं. मात्र तो पुरुषोत्तम देव स्वतः आपणाला व अखिल विश्वाला जाणतो. आणि मी तरी त्याचेच कृपाबलानें तुम्हांला तुमची अखेरची गति कोणती ती सांगतों.

हे देवहो, क्षीरसमुद्राचे उत्तर तीराला उत्तरेचेच दिशेला अमृत नांवाचें एक अत्यंत श्रेष्ठ स्थान आहे असें ज्ञाते सांगतात. तेथें तो परमात्मा योगस्थ होऊन परम दुश्चर असें तप करीत आहे. तुम्ही सर्वही व्रतधारी देव तपाचे उद्देशानें तिकडे जाऊन आणि तें अमृतस्थान गांठून त्या ठिकाणी दुश्चर असें तप करा. म्हणजे तेथें अत्यंत स्पष्ट व वर्षाकालचे जलपूर्ण मेघध्वनीप्रमाणें स्निग्ध व गंभीर शब्दानें युक्त, तींतील अक्षरें व पदें एकमेकांशीं सुसंबद्ध असल्यानें भरदार भासणारी, रमणीय, अभयद, कल्याणकारक, अत्यंत सुसंस्कृत, वरदानानें युक्त, ब्रह्मज्ञानानें पूर्ण, सर्वपापनाशकर्ती अशा त्या परम पवित्र सर्व देवाधिदेवाची उच्चारलेली, सत्य, दिव्य व कधींही वृथा न होणारी वाणी, तुमचें व्रत पूर्ण होऊन त्याचें विसर्जन होण्यापूर्वीं, हे महात्मे विश्वेदेवहो, तुम्हाला ऐकूं येईल. ती वाणी अशी कीं, " हे देवहो, तुम्हीं मजकडेच आलां आहां; त्याप्रमाणें मी तुमचें स्वागत करून तुम्हांस असें विचारतों कीं, मी वर देण्यास उभा आहें. तर तुम्हां कोणाला कांहीं पाहिजे काय ? असा तुम्हा सर्वांस त्या परमात्म्यानें प्रश्न केला असतां कश्यप व अदिति यांनीं त्या योगात्म्याचें प्रणामपूर्वक पादवंदन करून वर मागून घ्यावा कीं, " हे देवा, तूंच आमचे पोटीं पुत्ररूपानें यावें. यांत अंतर होऊं नये." असे मागणें तुम्हीं अत्यंत भक्तीनें मागितलें असतां तो ' तथास्तु ' असेंच म्हणेल. त्या वेळीं देवांनींही त्याला म्हणावें कीं, आपण आमचे सहोदर बंधु व्हावें, यावरही तो सर्वलोककर्ता श्रीपति ' तथास्तु ' असेंच बोलेल. हे सुरश्रेष्ठ हो, याप्रकारें त्यापासून वर संपादन

करून कृतकृत्य होत्साते तुम्हीं सर्वही आपआपल्या आश्रमास निघूनजा."

ब्रह्मदेवाचे या उपदेशाचा सर्वही देव व कश्यप आणि अदिति, स्वीकार करून व त्यांचें पादवंदन करून उत्तर दिशेला चालले. व एका क्षणांत पृथ्वीवरील सर्व सागर, पर्वत व दिव्य नद्या ओलांडून ते ब्रह्मवेत्या ब्रह्मदेवाचे हेतूप्रमाणें क्षीरसिंधूचे उत्तर तीराला पोंचले. तें स्थळ अत्यंत भयाण असून तेथें कोणाही प्राण्याचा संचार नव्हता. तेथें सूर्यप्रकाश नसून अमर्याद अशा अंधकारांत ती सर्व दिशा गुरफाटून गेली होती. त्या दिशेस मार्गे सांगितलेलें तें अमृतस्थान गांठून ते सर्वही देव कश्यप मुनीसह तपाची दीक्षा घेऊन योगात्मा सहस्राक्ष धीमान् देव सुरश्रेष्ठ जो नारायण त्याचे प्रसादप्राप्त्यर्थ सहस्र दिव्य वर्षेपर्यंत व्रत करीत बसले. स्थिर-वीरासनावर बसून ब्रह्मचर्य, मौन व इंद्रियदमन यांसह सर्वही देवांनीं कडक तप आचरिलें. त्या भगवान् कश्यपानी परमात्मा प्रसन्न व्हावा म्हणून ( पुढील अध्यायीं दिलेला ) वेदोक्त स्तव केला. या स्तवाला श्रेष्ठस्तव असें म्हटलें आहे.

## अध्याय अडुसष्टावा.

—:०:—

### कश्यपकृत महापुरुषस्तव.

कश्यप म्हणाले;—१ हे देवदेवेशा, तुला नमस्कार असो; २ हे एकशृंग ३ हे वराह ४ धर्मदीप ५ धर्मसिंधो, ६ वृषाकपे ७ सुरश्रेष्ठ, ८ सुरसंभव, ९ स्वयंभु, १० भद्र ११ कपिल, १२ विष्वक्सेन, १३ शाश्वत, १४ धर्म, १५ धर्मराज १६ वैकुंठ १७ श्रौतकर्मानें संमुख होणाऱ्या १८ अनाद्यनंत, १९ धनंजय २० शुचिश्रवा, २१ कार्तिकेय, २२ वृष्णिज, २३ अज, २४ अजय २५ जलशायिन् २६ सनातन, २७ विधात्या, २८ त्रिधाम, २९ धर्मज्ञान-वैराग्यरूप, ३० ककुद्मिन् ( श्रेष्ठ ) ३१ विजयशब्दयुक्त, ३२ महानाभ, ३३ लोकनाभ, ३४ पद्मनाभ, ३५ विरिंचे, ३६ वरिष्ठ, ३७ बहुरूप, ३८ विरूप, ३९ विश्वरूपाक्ष, ४० अक्षय, ४१ अक्षर, ४२ सत्याक्षर, ४३ (हंस,) सोहंरूप, ४४ हव्यभुक् ४५ परशो, ४६ शुक्र, ४७ मुंजकेश, ४८ हंस ४९ महाहंस, ५० महदक्षर ५१ हृषीकेश, ५२ सूक्ष्म, ५३ परमसूक्ष्म, ५४ तुराषाट् ५५ विश्वमूर्ति, ५६ सुराग्रज ५७ नील, ५८ निस्तम, ५९ विरजस्क, ६० सत्व-रजस्तमस्थान, ६१ सर्वलोकमय, ६२ सर्वलोकप्रतिष्ठित, ६३ गुहेशय, ६४ सुतप, ६५ उग्रतप, ६६ अग्र, ६७ अग्रज, ६८ धर्मनाभ, ६९ गभस्तिनाभ, ७० धर्मनेमि, ७१ सत्यधाम, ७२ सत्याक्षर, ७३ गभस्तिनेमि ( ज्याभोंवतीं किरणांचा परिघ आहे असा ) ७४ निष्पाप, ७५ चंद्ररथ, ७६ सागरांबर तूंच आहेस, ७७ हे अनेकपात् ७८ सहस्रशीर्ष, ७९ सहस्रसंमित, ८० महाशीर्ष, ८१ सहस्रदृक्, ८२ सहस्रपात्, ८३ अधोमुख ८४ महामुख, ८५ महापुरुष, ८६ पुरुषोत्तम, ८७ सहस्रबाहु, ८८ सहस्रमूर्त, ८९ सहस्रास्य ९० सहस्राक्ष, ९१ सहस्रभुज ९२ सहस्रभुव ( तुला वेदांनीं अनंत नामें दिलीं आहेत ). ९३ हे विश्वेदेव ९४ विश्वसंभव, ९५ हे सुभग ( तूं सर्वही देवांचा आदिगति आहेस ) ९६ तूंच हें सर्व विश्व. ९७ व त्याचा पोषक ९८ तुलाच विश्वही म्हणतात. ९९ हे पुष्पहास, १०० परमवरद तूंच, १०१ वौषट् तूंच, १०२ ॐकार तूंच, १०३ वषट्कार तूंच, १०४ तुलाच श्रेष्ठ म्हणतात, १०५ हे यज्ञभागहर, १०६ हे शतधार,

१०७ हे सहस्रधार, १०८ भूर्द, ( भूलोकाला देणारा तूंच ) १०९ भुवर्द तूंच. ११० स्वर्द तूंच १११ भूर्भुवःस्वर्द तूंच, ११२ भूत तूंच ११३ भुवन तूंच, ११४ स्वधा तूंच, ११५ हे ब्रह्मेशय, ११६ हे ब्रह्ममय ११७ हे ब्रह्मादि, ११८ द्यौतूंच, ११९ पृथ्वीही तूंच १२० पूषा तूंच, १२१ वायु तूंच १२२ धर्म तूंच, १२३ इंद्र तूंच, १२४ हवनकर्ता तूंच, १२५ पोता ( यज्ञांतील ब्रह्माचा साह्यकर्ता तूंच. १२६ नेता तूंच, १२७ हंता तूंच, १२८ मंता तूंच, १२९ होम्य तूंच १३० होता तूंच, १३१ परात्पर तूंच, १३२ होम्यहोताही तूंच, १३३ जलरूप तूंच, १३४ विश्ववाक् ( सर्वांची वाणी ) तूंच, १३५ यज्ञीय अग्निप्रीत्यर्थ दुरून आणलेली स्रुच् ( तुपाची आहुति देण्याची लांकडी पळी ) तूंच. १३६ स्रुक्भांड तूंच १३७ गण तूंच, १३८ तूं इष्ट आहेस, १३९ इज्य ( यजन करण्यास योग्य ) १४० ईड्य म्हणजे स्तुतिपात्र आहेस १४१ तूंच त्वष्टा, १४२ तूंच सामिद्ध १४३ तूंच गतिमंताची गति, १४४ तूंच मोक्ष, १४५ तूंच योग, १४६ तूंच गुह्य, १४७ तूंच सिद्ध, १४८ धन्य तूंच, १४९ धाता, १५० परम, १५१ यज्ञ, १५२ यूप, १५३ दक्षिणा १५४ दीक्षा, १५५ विष्णु, तूंच १५६ हे स्थविष्ट ( अतिवृद्ध ) १५६ स्थविर ( वृद्ध ) १५७ हे विश्व, १५८ हे तुराषाट् १५९ हे हिरण्यगर्भ १६० हे हिरण्यनाभ १६१ हे हिरण्य १६२ हे नारायण, १६३ हे नारायणांतर, १६४ हे नृणामयन, ( नरांचें आश्रयस्थान ) १६५ हे आदित्यवर्ण, १६६ हे सूर्यप्रभ, १६७ हे महापुरुष १६८ हे सुरोत्तम, १६९ हे आदिदेव, १७० हे कमलनाभ, १७१ हे पद्मेशय ( कमलवासिन् ) १७२ हे कमलाक्ष, १७३ हे पद्मगर्भ, १७४ हे हिरण्यकेश, १७५ हे शुक्र (शुभ्र) १७६ हे विश्व, १७७ हे देव, १७८ हे सर्वतोमुख, १७९ हे विश्वाक्ष, हे विश्वसंभव, १८० हे विश्वकुंभक ( सर्वभक्षक ) तूंच. १८१ भूरिविक्रम ( फार चालणारा आहेस ) १८२ तूंच चक्रक्रम ( वर्तुलगतीनें फिरणारा ) १८३ तूंच त्रिभुवन, १८४ तूंच सुविक्रम, १८५ तूंच स्वर्विक्रम ( स्वर्गांत संचार करणारा ) १८६ हे बभ्रु १८७ हे सुविभु, १८८ हे प्रभाकर, १८९ हे शंभो, १९० हे स्वयंभो, १९१ हे भूतादि १९२ हे भूतात्मन्, १९३ हे महाभूत १९४ हे सर्वभक्ष १९५ तूंच या विश्वाचा पालक आहेस, १९६ विश्वंभर तूंच १९७ पवित्र असें होमद्रव्यही तूंच १९८ हे विशारद १९९ हे विकर्मन् २०० हे अमृतेंधन, २०१ हे सुरासुरगुरो, २०२ हे महान् आदिदेव, २०३ हे नृदेव, २०४ हे ऊर्ध्वकर्मन्, ( म्हणजे ज्याचे कर्मांनीं ऊर्ध्वगति प्राप्त होते असा ) २०५ हे पुतात्मन् २०६ हे अमृतेश २०७ हे दिवस्पृक् २०८ हे विश्वपते, २०९ जूहू तूंच. २१० हे अनंतकर्म, २११ हे द्रुहिण वंश, २१२ हे स्ववंश, २१३ तूंच विश्व, २१४ तूंच हें विश्व धारण करितोस, आम्ही तुजकडे वराची इच्छा धरून आलों आहों तर आमचा संभाळ तूंच कर.

## अध्याय एकूणसत्तरावा.

—:०:—

### वामनावतार.

वैशंपायन सांगतातः—याप्रमाणें ब्रह्मज्ञानी द्विजश्रेष्ठ कश्यपमुनि यांनीं मेघध्वनीप्रमाणें स्निग्ध व गंभीर स्वरानें केलेला परमश्रेष्ठ प्रश्न श्रवण करून भगवान् परमात्म्याचे चित्तांत महात्मे देवमण यांविषयीं अत्यंत प्रेम

उत्पन्न झालें. मग तो त्या देवांना रसभरीत व आनंदकर अक्षरें व पदें यांनीं युक्त अशा वाणीनें पुढील वचन बोलला. मात्र हें वचन आकाशांतून देवांना ऐकूं आलें. तें बोलणाराचें प्रत्यक्ष दर्शन झालें नाहीं.

विष्णु म्हणाला, 'हे सुरश्रेष्ठहो, तुमचें कल्याण होवो. तुमचे सर्वांचे निश्चया[१] (निष्ठे) मुळें मी तुम्हांवर प्रसन्न होऊन वर देण्यासाठीं उभा आहें. याकरितां तुम्हांला पाहिजे असेल तसा वर मजपासून मागून घ्या.

कश्यप म्हणालाः—हे सुरश्रेष्ठा, तूं ज्या क्षणीं प्रसन्न झालास त्या क्षणींच आम्ही सर्व कृतकृत्य झालों. तूंच आमची परमगति आहेस. असो; तूं जर वर देणारच, तर आपले ज्ञातीचा आनंद वाढविणारा असा तूं इंद्राचा धाकटा भाऊ म्हणून देव वामन भगवान् या रूपानें अदितीचे उदरीं येऊन माझा पुत्र हो.

वैशंपायन सांगतातः—त्या वेळीं वराची इच्छा करणारी जी देवमाता अदिति तिनेंही त्या वरदात्या भगवंताजवळ त्यानें आपलें पुत्रत्व स्वीकारावें याच उत्तम वराची मागणी केली.

अदिति म्हणालीः—हे भगवंता, पुत्राची इच्छा करणारी मी आपणापाशीं याचना करितें कीं, या सर्वही महात्मे देवांचे परम कल्याणार्थ, आपण पुत्ररूपानें माझे पोटीं यावें.

देव म्हणालेः—तूंच आमचा भ्राता, भर्ता ( पोषणकर्ता ), दाता व आश्रयही हो. तूं अदितीचें पुत्रत्व स्वीकारिलें असतां इंद्रासह सर्वही देवांना देव ही संज्ञा योग्यपणें पाळितां येईल. ( कारण बलीनें जर आज आम्हीं पादाक्रांत आहों तर आमच्या देव संज्ञेंत काय अर्थ राहिला आहे. ) याकरितां तूं कश्यपाचा पुत्र हो.

१ या ठिकाणीं कलकत्याचा पाठ "सर्वेषामेव निश्चयात्" असा आहे. तो घेतला आहे. सर्वे मत्तो विनिश्चयं हा पाठ नीट नाहीं.



वैशंपायन सांगतातः—त्या वेळीं परमात्मा विष्णु त्या देवांना व कश्यपाला म्हणाला. " असेंच असो; तुमचें देव भलें करो; तुमचे मनाप्रमाणें तुमची इच्छा-सिद्धि होवो. तुम्हां सर्वांपैकीं कोणाचेही जे कोणी शत्रु असतील ते क्षणभर देखील मजसमोर उभे राहणार नाहींत. मी सर्वही असुरगण व इतरही जे कोणी देवद्वेष्टे असतील त्या सर्वांस मारून सर्व देवतांना यज्ञांत अग्रभागाचे वांटेकरी करितों. त्याचप्रमाणें सर्व देवांना हव्याचा भाग व पितरांना कव्याचा भाग खाण्यास मी देववितों. हे देवश्रेष्ठहो, ही कामगिरी मी माझ्या परमेष्ठी रूपाच्या श्रेष्ठतम सामर्थ्यानें घडवून आणणार आहें. याकरितां, हे सुरोत्तम हो, तुम्ही आल्या मार्गानें स्वस्थानीं जा. मी देवमाता जी अदिति व महाशय कश्यप यांचेही हेतूप्रमाणें वागणार आहें ( त्यांचे पोटीं येणार ). याकरितां तुम्ही सर्व खुशाल स्वस्थळीं परता.

वैशंपायन सांगतातः—याप्रमाणें परम समर्थ श्रीविष्णूनें आश्वासन दिलें असतां सर्वही देव अत्यानंदित होऊन त्याचें सर्व भावानें पूजन करूं लागले. महात्मे विश्वेदेव, कश्यप, अदिति, साध्य, मरुद्गण, महाबलाढ्य इंद्र हे सर्वही त्या देव विष्णूला नमस्कार करून पूर्वदिशेकडे दिव्य व विस्तीर्ण अशा कश्यपाश्रमाला गेले. ब्रह्मर्षिगणांनीं सेवित अशा त्या कश्यपाश्रमास गेल्यावर अदितीचे ठिकाणीं गर्भसंभव व्हावा ही इच्छा मनांत धरून ते सर्वही देव वेदपाठ करून राहिले. इतक्यांत देवमाता अदितीचे ठायींही अत्यंत तेजस्वी गर्भ राहिला. तो महात्मा परमात्म्याचा गर्भ अदितीनें दिव्य सहस्र वर्षेपर्यंत पोटांत वागविला. सहस्र वर्षें पूर्ण होतांच सुरांना आश्रयदाता व असुरांचा नाशकर्ता असा दिव्य गर्भ ती प्रसवली. हा दिव्य महात्मा अदितिगर्भांत

असतांनाच त्यानें सर्वही त्रैलोक्याचें तेज हरण करून देवांचें रक्षण केलें होतें.

याप्रमाणें देवांचा हर्ष वाढविणारा, दैत्यगणांना भीति उत्पन्न करणारा व त्रैलोक्याला सुख देणारा असा देवाधिदेव जन्मास आला असतां—

## अध्याय सत्तरावा.

—:०:—

### वामनाचा बलीचे यज्ञस्थानीं प्रवेश.

वैशंपायन सांगतातः—तो देव वामन जन्मतांच सात प्रजापति व सात महर्षि यांनीं त्यास नमस्कार केला. त्या ठिकाणीं भारद्वाज, कश्यप. गौतम, जमदग्नि, वसिष्ठ, व सूर्य नष्ट झाला असतां त्याची कामगिरी करण्याविषयीं ज्याला आज्ञा झाली होती तो भाग्यवान्. अत्रिऋषि, आला होता. मरिची, अंगिरा, पुलस्त्य, पुलह, क्रतु व दक्ष प्रजापति यांनींही त्या वामनास नमस्कार केला. और्व, वसिष्ठपुत्रे, स्तम्ब, कश्यप, कपीवान्, अकपीवान्, दत्त, अत्रि, च्यवन, वासिष्ठ संज्ञेनें प्रसिद्ध असलेले सात वसिष्ठपुत्र, हिरण्यगर्भाचे पुत्र, तेजस्वी और्वपुत्र, गार्ग्य, पृथु. अन्य, जन्य, वामन, देवबाहु, यदुध्र, सोमपुत्र, पर्जन्य, हिरण्यरोमा, वेदशिरा, सत्यनेत्र, विश्व, अतिविश्व, च्यवन, सुधामा, विरजा, अतिनामा, व सहिष्णु या सर्व जणांनीं वामनास नमस्कार केला. दिव्य शरीरांनीं युक्त व सर्व प्रकारचे अलंकारांनीं भूषित अशा अप्सरांचे समूह त्या देवेश्वर विष्णूचे निकट नृत्य करूं लागले. नंतर आकाशांत गंधर्वांचीं अनेक तुर्यादि वाद्यें वाजूं लागलीं असतां तुंबर हा गंधर्व इतर अनेक गंधर्वांसह गाऊं लागला. महाश्रुति, चित्रशिरा, ऊर्णायु, अनघ, गोमायु, सूर्यवर्चा, सोमावर्चा—हा सातवा, युगप, तृणप, कार्ष्णि, नंदि, त्रिशिरा व तेरावा—शालिशिरा; पर्जन्य हा चौदावा व कलि पंधरावा. याप्रमाणें, हे राजा, हे पंधरा गंधर्व झाले आणि सोळावा नारदमुनि, तसेंच हाहा, हुहू, व महाद्युति हंस—हे सर्वही देवगंधर्व, केशवाचें गुणवर्णन करूं लागले.

त्याचप्रमाणें आनंदित वृत्तीच्या सर्वालंकार भूषित, बांधेसूद, सुंदर जघनाच्या व सर्वांगीं देखण्या आणि विशाल नेत्रांच्या महाभाग्यवती अप्सराही नृत्य करूं लागल्या. त्यांचा कटिप्रदेश ऐटदार असून मनोहर होता व त्यांचीं मुखें

१ न्यायानें पाहतां हा श्लोक पुढील अध्यायांत पाहिजे व हा अध्याय मागील श्लोकाशींच संपला पाहिजे, परंतु कोणत्याच पोथींत तसा पाठ नाहीं यामुळें निरुपाय आहे.

२ पुढें वासिष्ठ संज्ञक सात वसिष्ठपुत्र सांगितले असतां येथें वसिष्ठपुत्र या नांवानें एकटाच वेगळा कां सांगितला हें कळत नाहीं.

३ नारदभगिनी अरुंधती हिजपासून वसिष्ठास सात पुत्र झाले होते, त्यांचीं नांवें:—१ हवींद्र, २ सुकृत, ३ मूर्ति, ४ आप, ५ ज्योति, ६ अय, आणि ७ स्मय.

४ येथें ' हिरण्यगर्भस्य सुता और्वजाताः सुतेजसः असें मूळ असून टीकाकारानीं त्याचा अर्थ " हिरण्यगर्भाचे और्वापासून झालेले अति तेजस्वी पुत्र, असा केला आहे. यांत व्याकरणाची कांहीं अडचण नसेल; पण ' हिरण्यगर्भाचे पुत्र और्वापासून कसे झाले. और्व नांवाची कोणी स्त्री असून ती हिरण्यगर्भपत्नी असेल तर हें शक्य होईल; किंवा हिरण्यगर्भाचे वियोगानें त्याचे क्षेत्राचे ठिकाणीं जरी हे और्व ऋषिपासून झाले असल पाहिजेत; पण अशी कथा कोठे वाचनात किंवा ऐकिवांत नाहीं.

१ अग्रयो जन्यो । असाहि पाठ आढळतो.

२ देव-गंधर्व म्हणजे सृष्टीच्या आरंभापासून देवांचे गायक-रूपानें उत्पन्न होतात ते; व मनुष्य-गंधर्व म्हणजे जे प्रथमतः मनुष्य असून विशेष कर्में व उपासना यांचे बलानें याच कल्पांत मरणोत्तर गंधर्व-पदवीस चढतात ते.

सुंदर होतीं व त्या एकूण प्रियंवस्तूंत श्रेष्ठ होत्या. अनूका, जामी, मिश्रकेशी, अलंबुषा, मिरीची शुचिका, विद्युत्पूर्णा, तिलोत्तमा, अद्रिका, लक्षणा, रंभा, मनोरमा, असिता, सुबाहु, सुप्रिया, सुभगा, उर्वशी, चित्रलेखा, सुग्रीवा, सुलोचना, पुंडरीका, सुगंधा, सुरथा, प्रमाथिनी, नंदा, शारद्वती—त्याचप्रमाणें दुसऱ्या अनेक ताफेवाल्या, शिवाय मेनका, सहजन्या पर्णिका, पुञ्जिकस्थळा या व दुसऱ्या हजारों हजार अप्सरा नाच करीत होत्या.

धाता, अर्यमा, मित्र, वरुण, अंश, भग, इंद्र, विवस्वान् पूषा, त्वष्टा, सविता, व विष्णु असे हे सर्वही मोठे जाज्वल्य व सूर्योपम तेजस्वी असे कश्यपपुत्र, द्वादश आदित्य, त्या महात्म्या देवेश वामनाला नमस्कार करिते झाले. मृगव्याध, सर्प, महाबलै, निर्ऋति, अजैकपाद, अहिर्बुध्न्य, शत्रूला अजिंक्य असा पिनाकी, दहन, ईश्वर, कपाली, स्थाणु आणि भग हे एकादश रुद्रही, हे भूपते, त्या स्थानीं होते. अश्विनौ देव, अष्टवसु, बलाढ्य सर्व मरुद्गण तसेच विश्वेदेव व साध्यही हात जोडून त्यापुढें उभे होते. शेष सर्पाचे वासुकीप्रभृति धाकटे बंधु, कश्यप, अपहर्ता, महाबल तक्षक वगैरे महाक्रोधी, महा बलाढ्य व तेजस्वी असे हे महात्मे नाग, मर्यादेनें हात जोडून उभे होते. तार्क्ष्य, अरिष्टनेमि, महाबल गरुड, अरुण व आरुणि, हे सर्वही विनतापुत्र तेथें आले होते. तेव्हां लोककर्ता गुरु श्रीमान् भगवान् पितामह ब्रह्मा स्वतः तेथें येऊन सर्वही महात्म्यांसह बोलला.

ब्रह्मदेव म्हणाला:——ज्या अर्थी यापासून हा प्रभावशाली व सनातन लोक उत्पन्न होतो त्या अर्थी हा लोकेश्वर श्रीमान् विष्णुच स्वतः असो. ( आहे. ) याप्रमाणें बोलून तो भगवान् प्रभु देवऋर्षीसह त्या सुरेश्वरास (वामनास) नमस्कार करून देवलोकीं गेला.

इकडे कश्यपाचे उदरीं जो सुरेश्वर प्रभु जन्मला त्याची कांति नवीन आभाळ आलेल्या दिवशींचे ( वर्षारंभींचे ) मेघाप्रमाणें (श्यामल) होती. नेत्र आरक्त व आकार खुजा होता. व वक्षावरील केशांच्या भोवऱ्याच्या मिषानें तो श्री-वत्सलांछनानेंच शोभायुक्त दिसत होता. त्या वेळीं सर्वही अप्सरा हर्षोत्फुल्ल नेत्रांनीं त्याकडे पाहूं लागल्या. आकाशांत जर एकदम सहस्र सूर्यांचा प्रकाश उदित होईल तर तें एकच तेज त्या महात्म्याचे तेजाची ( कदाचित् ) बरोबरी करूं शकेल. ( असें समजा. ) तो प्रभु तेजानें देवर्षीप्रमाणें असून भूलोक, भुवर्लोक व अखिल भूतें यांचा कर्ता, पवित्र केशांचे विस्तीर्ण छातीचा व सर्व तेजोनिधान असा होता. पुण्यशीलांची तो गति होता. पण पाप्यांचा त्याकडे रिघाव होत नसे. आणि जे योगांत प्रवीण असलेले महात्मे ते हाच योगस्वरूप आहे असें त्यास जाणीत. त्याचें ऐश्वर्य अष्टगुणयुक्त असून त्याला देवश्रेष्ठ असें म्हणत. व जन्ममरणरूप संसाराला भिऊन मोक्षाची इच्छा करणारे नियमशील विप्र ज्या सना-

१ येथे ' प्रियमुख्या वराननाः " याचा अर्थ वाईकरांनीं ' त्यांना मुख्य पदार्थ प्रिय वाटत होते ' असा केला आहे. पण ' मुख्य पदार्थ ' म्हणजे काय समजावें व कोणीं वाचकाने समजावे ? ' मुख्य ' याचा अर्थ 'मुखासंबंधी' असा होतो. त्याला धरून पाहिलें तर त्याचा अर्थ १ चुंबन, अधरपान, इ०;२ नासाभूषण, कर्णभूषण इ० किंवा ३ मुखानें खाण्याचे भक्ष्य, भोज्यादि पदार्थ, असा होईल. यांतील कोणता अर्थ घ्यावा ? किंवा ' मुख्य पदार्थ ' म्हणजे या अनंत सृष्टींतील नैकाविध पदार्थजातांतून प्रत्येकीं जो निवडक पदार्थ तो, असाहि होईल. पण त्यांना निवडक पदार्थ आवडत होते, या सांगण्यापेक्षां, प्रिय ( प्रीणाति-प्री तर्पणेक ) म्हणजे 'त्या सुखदायक वस्तूंतील प्रधान किंवा श्रेष्ठ होत्या ' हा अर्थ घेणें अधिक बरें असें आम्हास वाटून आम्हीं असा अर्थ केला आहे.

२ दोन पुस्तकांचा पाठ विद्युपर्णा असाही आहे.

३ दोन पुस्तकांचा पाठ ' महाबल ' असा आहे.

तनाला पोंचले असतां मुक्त होतात, सर्व आश्रमवासी ज्याला तपःस्वरूप असें म्हणतात आणि आहारादिकांचा कडक नियम पाळून व्रती लोक ज्याचें सेवन करितात; नागांमध्यें सहस्रशीर्ष व रक्ताक्ष अनंत या स्वरूपानें ज्याची शेषादि सर्व श्रेष्ठ नागमंडळी सेवा करितात; स्वर्गलाभाची इच्छा करणारे विप्रश्रेष्ठ ज्याची यज्ञस्वरूपानें उपासना करितात; जो श्रीमान्, सर्वश्रेष्ठ, ज्ञाता, अनेकस्थलीं असून एकरूपच असतो; वेद ज्या सर्वज्ञाची देवांस यज्ञभाग देणारा अशा नात्यानें स्तुति करितात; जो साक्षात् धर्माची ज्योत असून चंद्र व सूर्य हे ज्याचे नेत्र व आकाश हें ज्याचें शरीर आहे; अशा प्रकारचा तो सर्वव्यापी, महातेजस्वी परमात्मा स्वतः सर्वज्ञ असूनही योगबलानें बालत्व स्वीकारिलें असल्यामुळें, तेथें जमलेल्या सर्व देवांना परा वाणीनें बोलला कीं, 'हे सुरश्रेष्ठहो, मी तुह्मांसाठीं काय करूं ? कोणता वर देउं ? तुम्ही सर्वांनीं मिळून जी कांहीं इच्छा धरली असेल, ती आनंदानें मला कळवा.'

त्या महात्म्या वामनाचें हें वचन ऐकून इंद्रपुरःसर सर्व देव हात जोडून मोठ्या आनंदित चित्तानें त्या कश्यपपुत्र विष्णूला ( वामनाला ) म्हणाले. "दैत्यश्रेष्ठ सर्वज्ञ महात्मा बलि ह्यानें ब्रह्मदेवाचे वरदानाचे बलावर आपल्या अंगच्या मोठ्या पराक्रमानें, दमानें व तपानें आम्हांपासून सर्व जगत् हिरुन घेतलें आहे; आणि, हे देवसत्तमा, तो बलि आम्हां सर्वांसही अवध्य झाला आहे. हे सुव्रता, एक तूंच त्याला मारण्यास समर्थ आहेस, दुसरा कोणीही नाहीं; आणि म्हणूनच शरणागताचें रक्षण करणारा, देवांचें भय दूर करणारा, वर देणारा, व द्युतिमान् अशा तुजकडे आम्ही आश्रयाचे आशेनें आलों आहों. तर, हे सुरेश्वरा, महाबाहो, तूं महेंद्राचें ऋण फेडण्याकरितां हें सनातन त्रैलोक्य त्या बलीचे हातून हिसकून महेंद्राचे स्वाधीन कर म्हणजे तेणेंकरून ऋषींचें व सर्व लोकांचें कल्याण होईल. कश्यप व अदिति याना गोड वाटेल; पितरांना यथोचित कव्य व देवांना हव्य यथापूर्व मिळूं लागेल. तो दानवही अश्वमेध यज्ञ करून राहिला आहे. याकरितां त्याचे हातून हें त्रैलोक्य कोणत्या युक्तीनें परत घेतां येईल तिचा विचार कर.

वैशंपायन म्हणाले:—याप्रकारें देवांनीं सांगितलें असतां वामनरूपधारी विष्णू सर्वही देवांना आनंदवीत म्हणाला, 'हे दवहो, अंगिरापुत्र महा तेजस्वी वेदपारग बृहस्पति यानें मला त्या बलीचे यज्ञस्थलीं न्यावें. हे देवश्रेष्ठहो, या रीतीनें मीं त्या बलीचे यज्ञस्थानीं एकदां पोंचलों म्हणजे मग त्यापासून त्रैलोक्य हरण करण्यास कोणत्या युक्तीनें चाललें पाहिजे, त्या युक्तीनें मी चालेन.'

वैशंपायन सांगतात:—या नंतर त्या महातेजस्वी चतुर बृहस्पतीनें प्रभु वामनाला त्या दानवेशाचे यज्ञमंडपांत नेलें. मौंजी, यज्ञोवीत, छत्र, दंड व ध्वजा धारण केलेली व धूसर ताम्र नेत्राची ती भगवंताची ठेंगणी बालमूर्ति ब्रह्मर्षिगणांनीं भरून गेलेल्या अशा त्या यज्ञस्थलीं जाऊन आपण होऊनच त्या यज्ञाचें वर्णन करूं लागली. ब्रह्मदेवपुरःसर देवांनीं प्रवृत्त केलेला तो देवाधिदेव भगवान् जरी बाल होता तरीही एकाद्या वृद्धाप्रमाणें वर्णन बोलूं लागला. त्या दानवाधिप विरोचनपुत्र बलीचें तें यज्ञस्थान जरी बरोबर सैनिकांचीं दळें घेऊन अनेक

१ येथें कलकत्ता प्रतीत 'आत्मानमेव' असा पाठ आहे. त्याचा अर्थ, यज्ञरूपानें आपलेंच वर्णन करूं लागला असा आहे. नाहींतरी, 'यज्ञो वै विष्णुः' अशी श्रुतिच आहे.

दैत्यांनीं राखिलें होतें व त्याचें द्वार तर दानवांनीं गच्च भरून टाकिलें होतें तरीही तो अचिंत्यात्मा तशाही गर्दींतून व बंदोबस्तांतून त्या यज्ञशाळेंत एकाएकीं प्रविष्ट झाला. आणि तो बलाढ्य वामन मंत्रसंपन्न ऋषींनीं सर्वभर वेढलेल्या त्या दैत्यदानवपति राजा बलिपाशीं जाऊन ठेपला. आणि, हे नरश्रेष्ठा, त्या सनातन यज्ञरूपानें विविध प्रयोगांसह यज्ञाचें यथाशास्त्र सविस्तर वर्णन करून तेथें असलेल्या यज्ञकर्मनिपुण अशा शुक्रप्रभृति ऋत्विजांना देखील थांबवून निरुत्तर केलें. हे भारता, त्या विचित्रवाक्शक्तियुक्त विभूनें पुनरपिहि त्या बलि दैत्याचे सन्निध व ऋत्विजांचेपाशीं व ऋषीमंडळीसमक्ष सर्वकारण जो यज्ञरूप आत्मा त्याचें मोठें गूढ व वेदसिद्ध असे हेतु देऊन वर्णन केलें. त्या वेळीं त्या महातेजस्वी वामनानें बाल होऊन तेथील मोठमोठ्या वृद्ध ऋषींस व उपाध्यायांस निरुत्तर करून सोडलेलें पाहून तो विरोचनपुत्र बलि आश्चर्यचकित झाला व विस्मित होत्साता मस्तक नम्र करून व हात जोडून वामनास म्हणाला. 'तूं कोठून आलास ? कोण आहेस ? कोणाचा आहेस ? तुझें येथें कार्य काय ? या प्रकारचा ब्राह्मण म्हणजे बाल असून बुद्धिमंतांत श्रेष्ठ, ज्ञान व विज्ञान यांत निष्णात, शिष्ट भाषण करणारा, रूपसंपन्न, मनोहर व रुचिरमूर्ति, असा माझे ऐकिवांत नाहीं किंवा मीं पाहिलाही नाहीं. फार काय सांगूं ? गंधर्व, सिद्ध, पितर, राक्षस, असुर, यक्ष, नाग, ऋषि, किंवा प्रत्यक्ष देव, यांपैकीं कोणाचेही पुत्र इतक्या योग्यतेचे नसतात. तेव्हां तूं कोण असशील तो अस. तुला माझा नमस्कार असो व तुजकरितां मी काय करूं तें मला बोल.'

वैशंपायन सांगतातः—या प्रकारें अचिंत्यात्मा वामनाला बलीनें प्रश्न केला असतां तो हिकमती व शहाणा बटु हंसून बलीला असें म्हणाला.

## अध्याय एकाहत्तरावा.

—:०:—

### बलीचें त्रिपादभूमिदान व वामनाचें विराट् स्वरूप.

विष्णु म्हणालाः—हे असुरेशा, तूं धन्य आहेस. तुझा हा शोभनसंस्कारांनीं युक्त व अनेक प्रकारचे भक्ष्य पदार्थांनीं संपन्न यज्ञ पाहून पूर्वकालीं पितामह परमेष्ठी यज्ञ करीत होता, त्याची आठवण होते. हे महाबला, दानवेंद्रा, जो सर्व पापांचा विनाश होण्याकरितां स्वर्गाचा मार्ग दाखविणारा असा हा सर्व यज्ञांत श्रेष्ठ वाजीयज्ञ तो आरंभून तूं खरोखर देवेंद्र शक्र, किंवा यम किंवा वरुण या सर्वांचेही यज्ञांवर ताण केली आहेस. या मेधाला अश्वमेध असें वेदांत म्हटलें असून सर्व क्रतूंत हा वरिष्ठ आहे व सर्व काम पुरविणारा आहे, असें ब्रह्मवेत्त्यांचें याविषयीं मत आहे. हा अश्वमेध अत्यंत पवित्र असून स्वर्णशृंगांनीं युक्त, मोठा पराक्रमी, लोहमय खुरांचा, वायुवेगांचा, विशालवक्त्र, स्वर्गावर दृष्टि करणारा, सोन्याच्या

१ या ठिकाणीं लेखी पोथीचा पाठ "वेदिखुरः" असा आहे.

२ या ठिकाणीं लेखी पोथीचा पाठ "महास्यः" म्हणजे मोठ्या तोंडाचा असा आहे. तोच अधिक बरा दिसतो. व एकादशाक्षरी वृत्ताला जुळतो. कलकत्ता पाठ 'महात्मा' असा आहे. मुंबई पाठ "महारयः" असा आहे. परंतु तो बहुधा 'महास्य' या पाठावरूनच लेखकप्रमादानें झाला असावा. वाईकरांचा पाठ 'महारयः' असाच आहे. पण त्यांचें भाषांतर नीटसें झालें नाहीं, व या पाठांत छंदोभंग होतो.

३ या ठिकाणीं मुंबई पाठ 'स्वर्गे क्षणः' असा आहे; कलकत्ता व लेखी पोथींत 'सत्येक्षणः' असा आहे. पण यज्ञाचे संबंधांत 'स्वर्गेक्षण' हाच पाठ अधिक समंजस आहे. वाईकरांनीं हाच पाठ घेतला आहे. पण अर्थ थोडासा वेगळा केला आहे.

गाम्यासारखा गौरवर्ण व सर्व विश्वाचें उत्पत्ति-स्थान असा आहे. अश्व संपादन करून आणि त्याचे योगानें अश्वमेध यज्ञ करून मनुष्य हे कृतपापांपासून उत्तीर्ण होतात. या अश्वमेधीय अश्वाला श्रेष्ठ ब्राह्मण अग्नि ( पापदाहक ) असेंच म्हणतात. ज्याप्रमाणें चारही आश्रमांत गृहस्थाश्रम श्रेष्ठ; मनुष्यांत द्विजाति श्रेष्ठ; व हे बले, तूं जसा सर्व असुरांत श्रेष्ठ, तसाच सर्व क्रतूंत हा अश्वमेध श्रेष्ठ.

वैशंपायन सांगतातः—वामनाचे मुखांतील हीं वाक्यें ऐकून तो दैत्यपति परम हर्षयुक्त होऊन म्हणाला, 'हे ब्राह्मणश्रेष्ठा, तूं कोणाचा आहेस? आणि तूं कशाची इच्छा करीत आहेस! तें मला सांग. तूं इच्छित असशील तें मी तुला देतों. देव तुझें कल्याण करो. वाटेल तो वर मजपाशीं माग आणि. आपली मनोरथ—तृप्ति करून घे.

वामम म्हणालाः—हे दानवा, मी राज्य, वाहनें, रत्नें, किंवा स्त्रिया, यांतून कशाचीही इच्छा करीत नाहीं. परंतु जर तूं खरोखर प्रसन्न असशील आणि तुझी धर्माचे ठायीं मति असेल तर माझे गुरूला अग्निस्थान तयार करण्याकरितां तीन पावलें भूमि दे. हाच काय तो माझा सर्वोत्कृष्ट वर. दैत्यपति बलि, वामनाचें हें वचन ऐकून, म्हणालाः—हे वक्तृत्व-निपुणा, ब्राह्मणश्रेष्ठा, अरे, तीन पावलें भूमीनें तुझें काय होणार? कांहीं शंभर पाऊलें, शंभर हजार पाऊलें, अशांची तरी इच्छा कर( इतकी तरी माग.)

इतक्यांत शुक्र बलीला म्हणालाः—हे महाबाहो असुरेशा, याला कांहींच देऊं नको. अरे, तुला हा ठाऊक नाहीं. अरे, हा मायेनें प्रच्छन्न असलेला सर्वश्रेष्ठ विष्णु आहे. अरे, हा सर्वव्यापी बहुरूपी असल्यानें इंद्राचें प्रिय करण्याचे हेतूनें हें छोटें ( वामन ) रूप घेऊन तुला ठकविण्याकरितां येथें आला आहे.

याप्रमाणें शुक्राचार्यांनीं सांगितलें असतां त्या बलीनें बराच वेळ मनाशीं पुरापुर विचार करून मोठ्या आनंदानें युक्त होऊन म्हटलें " वा; मग याहून सत्पात्र याचक कोण मिळणार " ? असा विचार करून लगबगीनें हातीं सोन्याची झारी घेऊन तो त्या ब्राह्मणाला, बोलला,

बलि म्हणालाः—हे विप्रेंद्रा, दानग्रहणार्थ आपण पूर्वेकडे तोंड करून बसावें.

वामन म्ह०—हे कमलेक्षणा ( बले, ) 'हा पहा बसलों.'

बलि म्ह०—तर मग 'घे.'

वामन म्ह०—" दे "

बलि म्ह०—काय देऊं ?

वामन म्ह०—भूमि.

बलि म्ह०—किति मानाची ?

वामन म्हणालाः—हे बले, तीन पावलें मानाची.

बलि म्ह०—ठीक आहे, दिली.

वामन म्ह०—तर मग उदक पाडव; म्हणजे माझे गुरुजींचें काम फसणार नाहीं.

( इतक्यांत शुक्राचार्य आड येऊन )म्हणालाः—हे बले, याला हें दान देऊं नको.

बलि म्हणालाः—कां म्हणून ?

शुक्र म्ह०—हे दैत्या, याला मी पक्का ओळखला आहे.

बली म्हणालाः—कोण आहे हा, सांगा पाहूं?

शुक्र म्ह०—हा विष्णु आहे; असें असून तुझी याचे ठिकाणीं एवढी प्रीति जडली, याला काय म्हणावें ?

बलि म्ह०—महाराज, आपण फसतां आहां.

शुक्र म्ह०—मी नाहीं; बले, तूंच फसत आहेस.

बलि म्ह०—काय? एकूण तर मग हा स्वामी विष्णुच माझ्या यज्ञांत स्वतःच प्राप्त झाला आहे? वा:, फार ठीक. तर मग हा सर्वव्यापी देवाधिदेव ज्या ज्या वस्तूची इच्छा करील, ती ती मी याला देईन. कारण, या विष्णूपेक्षां दान देण्यास अधिक सत्पात्र असा दुसरा कोण तरी असणार?

असें बोलून त्यानें तत्काल झारींतून उदक पाडविलें.

वामन म्हणालाः—"हे दैत्येंद्रा, [ तूं जरी मला वाटेल तें द्यावयास तयार आहेस तरी ] मला तीनच पावलें पुरत. कारण, हे अनघा, मी जें पूर्वी बोललों आहें तें तसेंच स्थिर आहे, त्यांत फेरफार व्हावयाचा नाहीं"

वैशंपायन सांगतातः—या प्रकारचें त्या महातेजस्वी वामनानें निश्चित वाक्य कानीं येतांच त्या बलिनामक दैत्यश्रेष्ठ विरोचनपुत्रानें अंगावर कृष्णाजिन उत्तरीय वस्त्राऐवजीं घेऊन आणि 'बरें आहे, तसेंच कां होईना?' असें वाक्य उच्चारून, उदकानें भरलेल्या आपल्या झारीला हात घातला. आणि वामनाचे मनांत त्या दैत्येंद्राचें पुरेंच कंदन करावयाचें असल्यामुळें त्यानेंही दैत्यांचा क्षय करणारा आपला तो हात चटकन् पुढें पसरून व प्राङ्मुख होऊन बसला. आतां तो दैत्येश बली शुद्ध भावानें वामनाचे हातावर जल घालणार, इतक्यांत त्या महात्म्या वामनाचें तें अचिंत्य व असुरांची संपत्ति हरण करण्याचे हेतूनें पूर्वी कधींही घेतलेलें नाहीं अशा प्रकारें त्या वेळचें स्वरूप पाहून, त्याचे मनांतील इंगीत ओळखणारा प्रऱ्हाददैत्य बलीचें निवारण करून त्याचे पुढें येऊन बसला, आणि म्हणाला, ( प्रऱ्हाद ) "हे बले, या वामनरूपधारी बटूचे हातावर उदक घालूं नको. बाबारे, पूर्वी तुझे पणजाला ज्यानें मारिलें, तोच हा महा बुद्धिमान् विष्णु आहे. हा तुला ठकविण्यासाठीं या रूपानें आला आहे.

बलि म्हणालाः—मग तर फारच आनंदाची गोष्ट आहे. सर्व जगताचा स्वामी व भक्तांवर कृपा करणारा देव जर या प्रकारें प्राप्त झाला असेल तर मी त्याला हें दान देणारच देणार. कारण प्रत्यक्ष ब्रह्मदेवापेक्षांही अधिक सत्पात्र असा प्रतिग्राहक आम्हांस मिळत आहे; शिवाय हे असुरश्रेष्ठा (प्रऱ्हादा), ज्यानें मजसारखी यज्ञदीक्षा घेतली त्यानें दान हें अवश्य द्यावेंच असें आहे.

या प्रकारें सर्व असुरमंडळींत भाषण करून त्या विरोचनपुत्रानें त्या कालीं त्या विष्णूला तीन पावलें भूमि दान केली. तेव्हां प्रऱ्हाद म्हणालाः—'हे दातृश्रेष्ठा बले, बाबा, या विप्राला तूं हें दान नकोरे देऊं. अरे, हा ब्राह्मणाचा बालक आहे असें मला मला वाटत नाहीं. कारण, ब्राह्मण असा दिसत नाहीं. हे दैत्येंद्रा, मी तुला खरेंच सांगतों कीं, या रूपावरून मला तर वाटतें कीं, हा नारसिंहच पुनरपि आला आहे.

या प्रकारें त्या अमिततेजस्वी प्रऱ्हादानें[1] उपदेश केला असतां जणूं त्याची निंदा करण्याकरितांच बलि त्याला म्हणाला, " हे असुरा, याचकानें 'दे' म्हणून याचना केली असतां, दाता जर याचकाला विमुख दवडील तर अशा दात्याचे देहांत दोघांचेही वांट्याचें अभाग्य घुसतें. शिवाय जो कोणी 'दान देतों' असें प्रथम ब्राह्मणांस आश्वासन देऊन मग दान देत नाहीं, तो पापी आपले मित्र व कुटुंब यांसह नरकास जातो. यास्तव मी अलक्ष्मीचे भयानें याला पृथ्वी देत आहें. बरें, असलें दान घेण्याला या ब्राह्मणापेक्षां अधिक पात्र असा दुसरा

१ भागवतोत्तम प्रऱ्हादाचें हें देवाविरुद्ध बोलणें बहुधा बलीची कसोटी पाहण्याकरितां असावें.

ब्राह्मण तरी नाहींच. याकरितां ही पृथ्वी मी याला देतोंच. हे प्रऱ्हादा, हा द्विजश्रेष्ठ वामनरूप घेऊन मजपुढें हात पसरावयास आला, हें पाहून माझे चित्ताला पराकाष्ठेचा संतोष होत आहे. याकरितां हा मी त्याला हें दान देतोंच देतों. आपण आड आलां, तरी कांहीं मी थांबत नाहीं. असें प्रऱ्हादास सांगून टाकून त्या ब्राह्मणरूपधारी बटूला बलि पुनरपि म्हणाला, 'हे अल्पबुद्धे, या तुझ्या चिमुकल्या तीन पावलांनीं तुझें पूर्ण कल्याण कसें होणार? यास्तव मी तुला समुद्रानें वेढलेली सर्वच पृथ्वी दान देतों.

वामन म्हणाला:—हे दानवश्रेष्ठा, बाबारे, मला तुझी ती सर्व पृथ्वी नको. माझा तीन पावलांतच संतोष आहे. हीच मागणी मला अतिशय प्रिय आहे.

वैशंपायन सांगतात:—यावर बलिदानवानें 'तथास्तु' असें म्हणून त्या अमिततेजस्वी विष्णु देवाला तीन पाउलें भूमि दिली[1]. वामन बटूनें हातावर उदक पडतांक्षणींच आपलें बटुरूप बदललें आणि सर्व देवमय असें आपलें विराट् स्वरूप प्रगट केलें. त्या रूपाचे भूमि हेच पाद, आकाश हेंच मस्तक, चंद्र सूर्य हेच नेत्र, पिशाच ह्या पादांगुली, गुह्यक हस्तांगुली, विश्वेदेव हे जानुस्थानीं, सुरश्रेष्ठ साध्य हे जंघेचे ठिकाणीं, यक्ष हे नखांचे ठिकाणीं, अप्सरा ह्या नखांचे कोरींचे ठिकाणीं, विद्युल्लता ही दृष्टि, सूर्यकिरण हे विपुल केश, तारका हेच रोमकूप, महर्षि हेच रोम, उपदिशा हे बाहु, मुख्य दिशा हे कर्ण, अश्विनीकुमार ही उभयकर्णांतील श्रवणशक्ति, महाबल वायु हीच नासा, चंद्रमा हाच प्रसाद, धर्म हेंच मन, सत्य हीच वाणी, देवी सरस्वती ही जिव्हा, महादेवी अदिति ही ग्रीवा, दितिमान् सूर्य हा तालू, स्वर्गद्वार हाच नाभी, मित्र आणि त्वष्टा ह्या भ्रुकुटी, वैश्वानर हेंच मुख, प्रजापति हे वृषण, भगवान् ब्रह्मदेव हें हृदय, व कश्यपमुनि हेंच पौरुष. अष्टौवसु त्याचे पृष्ठस्थानीं, मरुद्देव हे पादसंधीचे ठिकाणीं सर्व छंदें हेच दंत, व आकाशांतील ज्योति हीच निर्मल अंगकांति; महादेव रुद्र ह्याच मांड्या, महार्णव हेंच धैर्य, महाबल भुजग आणि गंधर्व हे त्याचे उदरस्थानीं, लक्ष्मी, मेधा, धृति, कांति व सर्व विद्या हीच त्या रूपाची कटि, परमात्म्याचें परमस्थान तेंच याचें ललाट, त्या महात्म्या सर्व देवाधिदेवाचें देवराट् इंद्र हेंच तेज, व सर्व तेजस्वी पदार्थ हेंच तप; असें म्हटलें आहे. चार वेद मिळून उभय स्तन व उभय कक्षा, मख हेच त्याचे ओष्ट, द्विजांच्या क्रिया व इष्टि हेच त्याचे पशुबंध.

असो. या प्रकारचें त्या विष्णूचें देवमयरूप दृष्टीस पडतांच सर्वही महासुर पतंग जसे अग्नीवर झेंपावतात तसे त्यावर चवताळून धांवत गेले.

## अध्याय बहात्तरावा.

—:०:—

### श्रीकृष्णाचा कैलासास जाण्याचा विचार.

वैशंपायन सांगतात:—हे राजा, त्या देवरूपावर जे महासुर धांवून गेले, त्या सर्वांचीं नांवें, रूपें, आभरणें व मुख्य मुख्य आयुधें सांगतों.

१ या ठिकाणीं मूळशब्द 'स्पर्शयामास' असा आहे. याचा नेहमीचा अर्थ 'स्पर्श करविणें,' असा आहे. तरी क्वचितस्थलीं 'दानेदेणें' असा होतो. "गाः कोटिशः स्पर्शयता घटोध्नीः" हा रघुवंश सर्ग २ श्लो० ४९ यांतील प्रयोग पहा.

१ मुंबई पोथींत 'विश्वतो मुनिः' असा पाठ आहे. पण तो आह्मांस संम्मत नाहीं.

२ विष्टुम्, अनुष्टुप इत्यादि असावे.

३ या स्थलीं दोन पाठ 'आभरणांनि व दोन पाठ 'अभिजनांनि असे आहेत. पण पुढें अध्याय पाहतां अभिजनांचें वर्णन नसतां आभरणाचेंच आहे. 'अभिजन याचा अर्थ–कुल असा होईल.

प्रथम त्यांचीं नांवें ऐक. विप्रचित्ति, शिबिशंकु, अयःशंकु, अयःशिरा, अश्वशिरा,बली,हयग्रीव, वेगवान्, केतुमान्, उग्र, सोग्र, व्यग्र, पुष्कर, पुष्कल, साश्व, अश्वपति, प्रऱ्हाद, कुंभ संऱ्हाद, गगनप्रिय,अनुऱ्हाद, हरि, हर, वराह, संहर, अरुज, वृषपर्वा, विरूपाक्ष, मुनींद्र, चंद्र, लोचन, निप्रभ, सुप्रभ,निरूदर, एकवक्र,द्विवक्र, महावक्र, कालसन्निम, शरभ, शलभ, कुणप, कुल्प, क्रथ,बृहत्कीर्ति,महागर्भ, शंकुकर्ण, महाध्वनी, दीर्घजिव्ह, अर्कवदन, मृदुबाहु, मृदुप्रियः, वायु, गविष्ठ, नमुचि, शंबर, विश्वर, महान्, चंद्रहंता, क्रोधहंता, क्रोधवर्धन, कालक, कालकाक्ष, वृत्र, क्रोध, विमोक्षण, गविष्ठ, हविष्ठ, प्रलंब, नरक, पृथु, चंद्रतापन, वातापि, केतुमान, बलदर्पित, असिलोमा, पुलोमा, बाष्कल, प्रमद, मद, शृगालवदन, कराल, केशि, एकाक्ष, एकबाहु, तुहुंड, सृगल, सृप, हे आणि यांसारखे आणखी अनेक दैत्यगण तो महाविष्णु पदक्षेप करीत असतां त्याजपाशीं धांवून गेले. त्यांपैकीं कोणी हातांत प्रास उभारले असून आ वासलेले होते, व कठोर शब्द करीत होते; कोणी हातांत शतघ्नी घेऊन होते. कोणी चक्र, कोणी वज्र, कोणी खड्ग, कोणी पट्टीश, कोणी परश्वध, कोणी प्रास, कोणी मुद्गर, कोणीं हातीं परिघ घेतले होते. कोणाचे हात महान् अशनि उचलण्यांत गुंतले होते. कांहीं महाबलाढ्यांनीं मुसळ हातीं घेतलें होतें. कोणीं मोठमोठे वृक्ष हातीं उचलिले होते. कोणीं धनुष्यें घेतलीं होतीं. कांहींनीं हातांत गदा, भुशुंडी घेतल्या होत्या. कांहींनीं वज्रें, कांहींनीं मोठाल्या पटाशा, कोणी अर्गळ, कोणी तरवारी चमकावीत होते. याप्रकारें ते युद्धदुर्मद, घोर व बलाढ्य दानव नानाप्रकारचे वेष करून व अनेक तऱ्हेचीं आयुधें हातीं घेऊन आले. त्यांतील कांहींना कांसवाचीं, कांहींना कोंबड्याचीं, दुसऱ्या कांहींना हत्तींचीं तोंडें होतीं. कांहींना गाढवाचीं, कांहींना उंटाचीं, कांहींना डुकराचीं, तोंडें होतीं. कोणी भयंकर सुसरीचे तोंडाचे व कोणी शिशुमार नामक माशाचे तोंडाचे होते. कोणी मांजरतोंड्ये, कोणी पोपटतोंड्ये, तर कोणी दानव लांब तोंडचे होते. कोणी गरुडमुखी, कोणी गेंड्याचे तोंडाचे, कोणी मोरतोंडाचे होते, कोणी घोडतोंडचे, कोणी भयंकर सरडतोंडचे, कोणी मृगमुखी, कोणी उंटतोंडचे, तर कोणीं दानव साळईचे तोंडाचे व कोणी लांबट तोंडाचे,कोणाचीं तोंडें मुंगुसासारखीं होतीं; कोणाचीं पारव्यासारखीं, कोणी चक्रवाक मुखाचे, तर कोणी घोरपडीचे तोंडाचे होते. कोणी हरिणमुखी, कोणी गाय, शेळी, म्हैस, यांचे तोंडाचे, कोणी गुहिऱ्याचे तोंडाचे, कोणी वाघतोंडचे; कोणी अस्वलतोंडचे; कोणी चित्त्याचे तोंडाचे व कोणी सिंहमुख होते. कोणी गजेंद्रचर्म नेसले होते; कोणी कृष्णाजिन घेतलें होतें. कोणी चिंध्या तर कोणी लांकडांच्या[२] फळ्या नेसले होते.(आड लाविल्या होत्या).कोणी मस्तकाला पागोटीं, कोणीं मुकुट घातले होते. त्याचप्रमाणें कोणी किरीट, कोणीं कुंडलें धारण केलीं होतीं. त्यांच्या शेंड्या लांब लांब असून त्यांच्या माना शंखाकृति होत्या व त्यांचें अंगावर तेज झळकत होतें. त्यांनीं नानाप्रकारचे वेष धरिले होते. नानाप्रकारचीं पुष्पें व उट्या धारण केल्या होत्या. व जो तो आपापलें

१ कलकत्ता प्रतींत
॥ शाखा मृगाननाः शूराच्छागाऽविमहिषाननाः ॥
॥ सारमेय मुखा रौद्राः क्रौंचवक्त्राः श्वदानवाः ॥
असाही एक श्लोक सांपडतो.

२ मूळांत 'फलक वाससः' असें आहे; परंतु **फलक** याचा अर्थ 'लांकडाची फळी' असा होणार; दुसरा अर्थ दिसत नाहीं. नगरजिल्ह्यांतील राहुरीगांवीं रुप्याचे पत्र्याच्या कोक्याचा लंगोटीचे ऐवजीं उपयोग करणारे 'नारायण बोवा' ह्मणून साधू कोणी पाहिले असतील.

प्रदीप्त आवडतें आयुध घेऊन घेऊन, तो श्री विष्णु भूमीवर पाउलें टाकीत असतांना ते सर्वेही दानव त्याजवळ भिडले. परंतु त्या प्रभूनें या सर्वेही असुरांस आपले पायाचे व हाताचे तळानें ( म्हणजे लाथांनीं व चपराकांनींच ) चीत करून टाकून आणि जगड्व्याळ रूप पसरून हां हां म्हणतां सर्व पृथ्वी पाउलाखालीं व्यापून घेतली. आणि तो जेव्हां तीनही लोक पादाक्रांत करण्यास प्रवृत्त झाला, त्या वेळीं त्याची कांति प्रत्यक्ष सूर्यासारखी चमकूं लागली. तो त्या विशालरूपानें जेव्हां पृथ्वी आक्रमण करीत होता, तेव्हां आकाशांतील चंद्र व सूर्य हे त्याचे उभय स्तनांचे उंचीला आले; तोच पुढें जेव्हां अंतरिक्ष आक्रमण करूं लागला, तेव्हां तेच चंद्रसूर्य त्याचे मांडीशीं आले. आणि आकाशाचेही वर जेव्हां अनंतांत जाऊं लागला, तेव्हां तर ते चंद्र सूर्य त्या अमित तेजस्वी विष्णूचे गुडघ्यांशींच राहिले, असें ब्राह्मण म्हणतात.

असो. याप्रकारें सर्व त्रैलोक्य आक्रांत करून आणि त्या प्रमत्त असुरांना जिंकून त्या सर्वलोक-वंदित अशा श्रीहरीनें ही पृथ्वी इंद्राचे स्वाधीन केली. त्या प्रभावशाली भगवान् विष्णूनें या पृथ्वीचे खालीं सुतल म्हणून जो पाताल प्रदेश आहे, तो बलीला दिला. सुतलाचें आधिपत्य मिळतांच त्या बलि दैत्याची मति उत्तम झाली व तो असुरश्रेष्ठ आनंदानें त्या रसातळाखालीं निवास करूं लागला. तेथें असतांना त्या महातेजस्वी बुद्धिमान् बलीनें अत्युत्तम ध्यानयोग करून अखिल लोकवंद्य अशा श्रीविष्णूला म्हटलें, " हे देवा, मीं यापुढें कसें वागावें, तें मला पूर्णपणें सांग." ही प्रार्थना ऐकतांच देवश्रेष्ठ विष्णु त्या दैत्येंद्राला बोलला.

विष्णु म्हणालाः—"हे भाग्यवंता असुरा, मी तुजला प्रसन्न झालों आहें. आणि तुला वर देत आहें; याकरितां तुला इष्ट असेल तो मजपासून वर मागून घे; तुझें कल्याण असो. मी तुला एक मात्र गोष्ट बजावून ठेवितों कीं, तूं केव्हांही इंद्राचे आज्ञेचा उपहास करीत जाऊं नको. म्हणजे तुझें कल्याण होईल." याप्रमाणें त्या दैत्याधिपतीला बजावून तो सर्वनियंता तेजस्वी व वरेण्य इंद्रानुज प्रभु पुनरपि बलीला म्हणाला, "हे दैत्या, ज्याअर्थी तूं आपल्या हातानें पाणी घातलेंस आणि मीं तें स्वहस्तानें स्वीकारिलें, त्याअर्थीं तुला आतां देवांपासून केव्हांही कसें तें भय नाहीं; हें निश्चित समज. हे महासुरा, माझी तुजवर कृपा आहे आणि तिचे बलावर तूं या सुतलनामक पातालांत आपले सर्व अनुचरांसह सुखानें नांद. मात्र मीं दिलेली आज्ञा ध्यानांत ठेवून तूं केव्हांही त्या अतुलपराक्रमी देवराज इंद्राची आज्ञा भंग करीत जाऊं नको. हे महासुरा, त्याचप्रमाणें, तूं सर्वेही देवतांना पूज्य मानीत जा; म्हणजे हे महाभागा तुला नानाप्रकारचे भोग, सदक्षिण यज्ञ व यथेच्छ दिव्य मनोरथ-प्राप्ति हीं लाभतील. त्याचप्रमाणें माझ्या कृपेनें तुजकडे दैत्यांचें स्वामित्व राहून इहलोकीं व परलोकीं क्षयरहित अशी अनेक प्रकारची वैभवसामग्री तूं उपभोगशील. परंतु, तूं ज्या वेळीं मीं घालून दिलेली ही मर्यादा ढळवशील, तेव्हां ते महेंद्रादि महाबलाढ्य देव तुला नागपाशांनीं बांधून मारितील. यासाठीं तूं त्या देवांना सर्वदा नमून अस. इंद्र हा माझा वडील बंधु आहे, हें ध्यानांत वागवून त्याची आज्ञा शिरसा मान्य करीत जा.

१ आकाशाचें ज्योतिषग्रंथांत वर्णिलेलें आनंत्य पाहिलें असतां आपल्या पृथ्वीपासून सरासरी साडे नऊ कोट मैल दूर असणारा बिचारा सूर्य विराट्रूपाच्या गुडघ्याशीं लागावा हें नवल नव्हे.

बलि म्हणालाः—हे शंखचक्रगदाधरा, महाभागा, देवाधिदेवा, श्रेष्ठा, सुरासुरगुरो, सर्व लोकाधिपते, सुरोत्तमा, मी त्या सुतल नामक पातालांत राहूं लागलों असतां मला त्या ठिकाणीं जेणेंकरून माझी अक्षय्य तृप्ति होईल अशा प्रकारचा यज्ञीयभाग देऊन माझे खाण्यापिण्याची तोड कशी करितां तेवढी, हे अरिमर्दना, मला सांगा.

श्रीभगवान् म्हणालेः—हे दैत्या, वेदवेत्त्या ब्राह्मणांवांचून केलेलें श्राद्ध, ब्रह्मचर्य व्रत न पाळितां केलेलें वेदाध्ययन, दक्षिणेवांचून केलेला यज्ञ, ऋत्विजांवांचून केलेले ध्वज, श्रद्धा विरहित दिलेलें दान, संस्कारहीन हवि—हे सहा भाग तुला दिले आहेत. त्याचप्रमाणें माझे द्वेष्टे, तसे माझे भक्तांचे द्वेष्टे, यांनीं केलें असलेलें सर्व पुण्य, खरेदीविक्री करणारे अग्निहोत्र्याचें जें पुण्य, श्रद्धेवांचून दान किंवा यजन करणाराचें जें कांहीं पुण्य, तें सर्व, हे दैत्येंद्रा, तुला मिळत जाईल.

वैशंपायन सांगतातः—महात्म्या विष्णूचें हें वचन ऐकून असुरश्रेष्ठ बलि "बरें आहे, असेंच असो." असें म्हणून मोठी गर्जना करून त्या विष्णूचे आज्ञानुरोधानें पातालांत शिरला.

मग भगवंतानें त्याच्या राज्याची वांटणी केली, ती अशीः—मूळची इंद्राची असलेली जी पूर्व दिशा ती त्यानें अतुल तेजस्वी इंद्रासच दिली. दक्षिण दिशा महात्मा पितृपति जो यम त्याला दिली. पश्चिम दिशा महात्म्या वरुणाचे स्वाधीन केली. आणि उत्तर दिशा यक्षपति कुबेर याला दिली. अधर दिशा नागराजाला दिली व ऊर्ध्व दिशा सोमाला दिली. या प्रकारें बलीचे राज्याची वांटणी करून व इंद्राची पुन्हां राज्यावर स्थापना करून देवर्षींचे सत्कार घेत, तो सर्व भूताधिपति देव वामन स्वर्गास गेला. तो दुर्धर्ष व अमित तेजस्वी वामन जेव्हां स्वर्गांत प्रविष्ट झाला, तेव्हां इंद्रपुरःसर सर्व देवांनीं मोठा आनंदोत्सव केला.

वैशंपायन सांगतातः—विरोचनपुत्र बलिदैत्य याला कम्बल-अश्वतर प्रभृति सप्तशीर्षयुक्त नागबंधानें बांधून पातालांत घालून श्रीविष्णु स्वर्गांत गेल्यावर, नागबंधांनीं पीडित झालेल्या त्या बलीकडे नारदमुनि सहजगती आले. तेथें तो दानव विपत्तींत पडला आहे, असें पाहून त्यांना दयेचा लोंढा आला. आणि ते त्या दानवेश्वराला म्हणाले कीं, "हे बले, तूं या बंधापासून मुक्त होण्यासाठीं एक उपाय मी तुला देतों. तो उपाय म्हणजे जन्ममरणरहित, अक्षय व अव्यय देवाधिदेव जो धीमान् वासुदेव त्याचें स्तोत्र होय. हे दैत्येंद्रा, हें स्तोत्र तूं शुद्धांतःकरणानें व आपली सर्व भावना त्या देवाचे ठिकाणीं ठेवून आणि तन्मय होऊन पठण करीत जा; म्हणजे तूं लवकर बंधमुक्त होशील."

नारदाचें हें वचन ऐकतांच विरोचनपुत्र शुचिर्भूत होऊन व निर्मल मनानें हात जोडून नारदापुढें उभा राहून, नारदापासून एकाग्रचित्तानें पुढील स्तोत्र पढला. आणि नारदापासून त्या दिव्य स्तोत्राचा पाठ घेतल्यावर समुद्रांतून ज्यानें पृथ्वी वर काढिली, त्याचे नांवाचा त्यानें जप केला.

बलि म्हणालाः—महात्मा, अक्षय जो अनंतपति त्याला प्रणवपूर्वक नमस्कार असो. जलेश जो पद्मनाभ देव विष्णु त्याला नमन असो. हे भगवन्, तूं कालाचाही काल असून आपलें शरीर सप्तसूर्यात्मक करून या तिन्ही लोकांस व्यापून टाकिलें आहेस, हें सत्य आहे. तर या सत्याचे सामर्थ्यानें तूं मला बंधमुक्त कर. आकाशांतून चंद्रसूर्य नष्ट होऊन यज्ञतपादि क्रिया लुप्त झाल्या असतां पुनरपि सृष्टि

निर्माण करतोस, त्या सत्याचे सामर्थ्यानें मला बंधमुक्त कर, ब्रह्मा, रुद्र, इंद्र, वायु, अग्नि, नद्या, सर्व पर्वत हे सर्वही तुझे रूपाचे ठिकाणीं स्थित आहेत. असें गरुडानें पाहिलें; या सत्यानें माझी बंधमुक्ति व्हावी. आदिकल्पांत मार्कंडेय मुनीनें तुझ्या उदरांत प्रवेश करून तूं सर्व चराचरांत भरून आहेस असें पाहिलें; या सत्यानें मला मुक्ति मिळूं दे. तूं हें सर्व त्रैलोक्य टाकून देऊन ( नाहींसें करून ) केवळ एकटाच योगी विद्येचें साह्य घेऊन योगधारण करून राहतोस, या सत्यानें मीं बंधमुक्त व्हावें. नागजलांत शयन करून आणि योगनिद्रेचा आश्रय करून पुनः सृष्टीचें चिंतन करीत राहतोस, या सत्यानें मला बंधमुक्त होऊं दे. हे हरे, तूं आपले दाढेवर यज्ञांचा उद्धार करून पितरांसाठीं तीन पिंड निर्माण केलेस; या सत्यानें, हे हरे, मला बंधमुक्त कर. हिरण्याक्षाचे भयानें विव्हल होऊन सर्वही देव जेव्हां पळूं लागले त्या वेळीं, हे देवा, तूं त्यांचें सर्वतः रक्षण केलेंस, या सत्यानें मला सोडव. हिरण्याक्षाशीं संग्राम करितांना दीर्घवक्त्र असें रूप धारण करून तूं आपल्या चक्रानें त्या असुराचें मस्तक हरण केलेंस, या सत्यानें मला बंधमुक्त कर. पूर्वकल्पीं हिरण्यकशिपु दैत्याचें मस्तक, अस्थि व मज्जा हीं चुरडून टाकून केवळ हुंकारासरसा त्याला गतप्राण केलास, या सत्यानें मला सोडव. पूर्वीं ब्रह्मदेव पहात असतां असतां दानवांनीं वेद धरून नेले; परंतु, हे देवा, तूं त्यांचें परिरक्षण केलेंस, या सत्यानें मला मुक्ति दे. त्यावेळीं हयग्रीवाचें रूप घेऊन आणि मधुकैटभ यांस मारून ते वेद त्वां ब्रह्मदेवाला अर्पण केलेस, या सत्यानें मला बंधमुक्त कर. देव, दानव, गंधर्व, यक्ष, सिद्ध, किंवा महोरग यांसही तुझा अंत दिसत नाहीं, या सत्यानें मला मुक्त कर. अपांतरतमा या नांवानें तूं देवपुत्र होऊन वेदाचा अर्थ स्पष्ट केलास. या सत्यानें मला सोड. वेद, अग्निहोत्र, पितृयज्ञ, व हवि हीं सर्व तुझींच रहस्यें आहेत. या सत्यानें माझी मोकळीक कर. गुरूच्या शापानें जन्मतः अंध उपजलेला दीर्घतमा नांवाचा ऋषि तुझे कृपेनें डोळस झाला. या सत्यानें मला सोड. नक्रानें ग्रासल्यामुळें मृत्यूच्या दाढेंत सांपडून केवळ दीन झालेल्या गजेंद्राला तूं सोडविलेंस, या सत्यानें मला मुक्त कर. तूं अक्षय, अव्यय, ब्रह्मण्य, भक्तवत्सल, व जे कोणी उन्मत्त झाले असतील अशांचा नियमन कर्ता आहेस. या सत्यानें मला मुक्त होऊं दे. तुझीं शंख, चक्र, गदा, पद्म, शार्ङ्गधनुष्य व गरुड या सर्वांची मी शिरःप्रणामपूर्वक कृपा याचितों व या सर्वांनीं मला बंधमुक्त करावें.

याप्रमाणें बलीनें स्तव करितांच शंख, चक्र, गदा, भाता, धनुष्य व गरुड या सर्वांही ‘ बलीला बंधमुक्त करावें ’ म्हणून तत्प्रीत्यर्थ हरीची स्वतः कृपा संपादन केली. त्यामुळें भगवंतानें प्रसन्न होऊन नागहंत्या पक्षिराज गरुडाला आज्ञा दिली कीं, “ हे गरुडा, या बलीला बंधमुक्त कर.” ती ऐकतांच तो अतुल पराक्रमी गरुड आपले पंख हालवून पृथ्वीतलीं जेथें बलि बंधांत पडला होता, तेथें गेला. गरुडाचे आगमनाचें ज्ञान होतांच बलीला जखडून बसलेले कंबलादि सर्प त्या असुरश्रेष्ठ बलीला सोडून गरुडाचे भयानें व्याकुळ होत्साते आपल्या भोगवती नामक नगराला चालते झाले. मग तो सर्पभक्षक गरुड, कृष्णकृपेनें बंधमुक्त होऊन खालीं तोंड घालून चिंतातुर बसलेल्या त्या राज्यभ्रष्ट बलीला म्हणाला.

गरुड म्हणालाः—‘हे महाबाहो दानवेंद्रा, प्रभु विष्णूनें तुला आज्ञा केली आहे कीं, तूं बंधांतून मुक्त झाल्यावर आपल्या पुत्रबांधवां-

सह पातालांतच रहा. हे दानवा, तूं हें स्थळ सोडून दोन कोस देखील पलीकडे जाऊं नये. हा नियम जर तूं मोडशील तर तुझे मस्तकाचीं शेंकडों शकलें होतील, त्या पक्षिश्रेष्ठाचें हें वचन ऐकून दानवेंद्र म्हणाला, मी ' त्या महात्म्या अनंताचा नियम सांभाळून राहीन. परंतु, त्या भगवंतानें माझे जीवनाचा उपाय कांहीं योजावा कीं जेणेंकरून, हे खगेश्वरा, मी या स्थळीं असूनच सुखांत धष्टपुष्ट राहीन" बलीचें हें वचन ऐकतांच गरुड म्हणाला, " हे बले, तुझ्या जीविकेची सोय परमात्म्यानें तूं विचारण्यापूर्वींच करून ठेविली आहे. ती अशी. जे अंगीं ऋत्विक्पणा नसून उक्त विधीला सोडून प्रायश्चित्तही न जाणतां (करितां) यज्ञ करतील त्या यज्ञाचा भाग तुला मिळेल. कारण अशांनीं दिलेला यज्ञभाग देवता पत्करीत नाहींत. यामुळें, हे यज्ञभाग तुला आयतेच मिळून तूं त्यांचे योगानें धृष्टपुष्ट होऊन सुखानें नांदशील." हे महाबाहो दानवेंद्रा, त्रैलोक्यकर्ता कश्यपपुत्र भगवान् विष्णु यानें या प्रकारचा निरोप माझे मुखानें तुला पाठविला आहे

वैशंपायन सांगतातः—अनंताचें हें सर्व पापापासून मुक्त करणारें स्तोत्र जो कोणी मनुष्य भक्तिपूर्वक पठण करील त्याचें पातक दूर होईल. पठणकर्ता गोहत्येपासून मुक्त होईल, तो ब्रह्मघ्न असल्यास ब्रह्महत्येपासून मुक्त होईल. पुत्रहीन असल्यास त्यास पुत्रलाभ होईल. पाठक कुमारी असल्यास तिला उत्तम पति मिळेल. गर्भिणी असलयास तत्काल मुक्तगर्भ होऊन पुत्र प्रसवेल. लोकांत मोक्षाची इच्छा करणारे जे कोणी योगी किंवा कपिलसांख्य असतील ते या स्तोत्राचे प्रभावानें निष्पाप होऊन श्वेतद्वीपाला जातील. हा अनंताचा स्तव सर्व कामप्रद आहे असें सांगतात. हा स्तव जो कोणी मनुष्य प्रातःकाळीं उठून शुचिर्भूतपणें शुद्धमनानें पठण करील त्याच्या सर्व इच्छा परिपूर्ण होतील यांत संदेह नाहीं. हा परमात्म्याचा वामन संज्ञक अवतार होय. त्या अवताराचें यश वेदवेत्ते ब्राह्मणच गातात. तथापि, जो कोणी राजा प्रतिपर्वाचे ठिकाणीं भक्तिपूर्वक व नियमानें परमात्म्याच्या या दिव्य अवतारचरित्राचें पठण करील तो महाबल विष्णूप्रमाणें आपल्या शत्रूंस जिंकील व त्यास कीर्ति व विपुल द्रव्य मिळेल. तसाच तो प्रत्यक्ष विष्णूप्रमाणें भूतमात्राला प्रिय होऊन त्याचा पुत्रपौत्रादि वंश वाढेल व त्याला आरोग्य व गुणसंपत्ति प्राप्त होईल; आणि त्याचें जो कोणी पठण करील त्यावर सर्व कामनिधि देवाधिदेव जनार्दन प्रसन्न होईल, असें कृष्णद्वैपायन व्यास यांचें म्हणणें आहे.

## अध्याय त्र्याहत्तरावा.

—:o:—

### कैलासयात्रावर्णन.

[ विष्णुपर्वांतील अध्याय ११० यांतील-धन्योपाख्यानापासून तों त्या पर्वांतील बाणयुद्धांत रुद्राला जिंकीपर्यंत श्रीकृष्णाचेच उत्कर्षाचें वर्णन झालें व त्याचे वामनादि अवतारांतही श्रीविष्णूचेच सगुणनिर्गुण रूपाचें गुणोत्कर्षकथन होऊन, श्रीकृष्णाचें गुणकथन करणारें असें जें भागवत तें श्रवणाचे फलश्रुतीसह तेथें समाप्त केलें. परंतु बाणासुरयुद्धवर्णनांत हरिहरांचा अभेद वर्णन केला गेला. तथापि तो अभेद केवळ " ममात्मा भद्रसेनः " या न्यायाप्रमाणें औपचारिक असेल, पारमार्थिक असणें

१ तिन्ही पुस्तकांत उपान्त्य श्लोकाचे पूर्वी ' वैशंपायन उवाच ' असें आहे. निरुपाय आहे. तथापि अर्थसंदर्भावरून त्या ठिकाणीं घेणें प्रशस्त वाटत आहे. या साहसाबद्दल व्यासमुनींनी व सर्व वाचकांनीं क्षमा करावी.

शक्य नाहीं. कारण तसें झाल्यास शास्यशासक भाव राहणार नाहीं, असें कांहीं महामतींना गूढ पडण्याचा संभव आहे. अशा पुरुषांचा भ्रम दूर करण्यासाठीं व्यासांनीं सांप्रतच्या ( कैलासयात्रावर्णन ) अध्यायापासून तों या पर्वाच्या अखेर त्रिपुरवधापर्यंतचा ग्रंथ लिहिला आहे व या ग्रंथानें असें सिद्ध करून दाखविलें आहे कीं, केवळ देहभेदानें ऐकात्म्याची हानि होत नाहीं. या ग्रंथांत हरि व हर या उभयतांसही सर्वोत्तम असेंच म्हटलें आहे. आणि सर्वोत्तम म्हणजे सर्वांत उत्तम असे दोन पुरुष म्हणतां येणेंच शक्य नाहीं. अर्थात् यावरूनच हरिहरांचा अभेद “ ममात्मा भद्रसेनः ” याप्रमाणें औपचारिक नसून पारमार्थिकच आहे. ते दोघे सर्वथा एकरूपच आहेत. असें सिद्ध झालें. या कामीं व्यासांनीं पूर्वी अनुशासन पर्वांत श्रीकृष्ण हा शंकराचें आराधन करण्याकरितां कैलासाला गेला, असें संक्षेपानें सांगितलें होतें. तोच दोरा उगवून प्रस्तुत भाग चालू केला आहे. ]

जनमेजय विचारतोः—हे वैशंपायना, आपण मागें अनुशासन पर्वांत देवदेव जनार्दन[1] भगवान् विष्णु, शंकराचें वसतिस्थान जें कैलासशिखर तेथें गेला, असें सांगितलें; तर जनार्दन विष्णु हा स्वतःच स्थितिलयसमर्थ व पूर्णानंदस्वरूप असतां शंकराकडे कां गेला, व अशाचे बाहेर शंकर म्हणून निराळा कसा संभवतो?—बरें, तो निराळाच होता म्हणावा, तर बाणासुराख्यानांत आपण विष्णुशंकरांचा अभेद वर्णन केला आहे. आणि जर तो अभेद खरा असेल, तर शंकराची आराधना करण्याकरितां विष्णु (कृष्ण) कैलासास गेला, या म्हणण्यांत एक पूज्य व दुसरा पूजक असा स्पष्ट भेद सिद्ध होतो; मग त्यांचें अभेदरूपत्व सत्य कसें ? ही शंका मला बाधते आहे. तर भगवान् देवदेव विष्णु हा शंकराचे स्थानास कैलास पर्वतीं कां गेला? व तेथें जाऊनही, हे सद्विप्रा, मी असें ऐकिलें आहे कीं, कृष्णानें उत्तम प्रकारची तपश्चर्याही केली व तेणेंकरून नीललोहित महादेव शंकराचें त्याला नारदादि तपोवृद्ध मुनींसमक्ष दर्शन झालें. हें कसें ? व नंतर देवाधिदेव श्रीहरि यानें त्या शंकराचें अर्चन केलें. आणि या प्रकारें अत्यंत पुरातन व जगताचे नाथ असे दोघे देव हर व हरि हे एकत्र मिळालेले पाहून इंद्रप्रभृति देवगणांनीं त्यांची एकत्र अर्चा केली. कारण हे दोघेही देव मूळचे जगताचे आदिकारण एकरूपच असून भिन्न कार्यास्तव भिन्न देहधारी होऊन जगताची उत्पत्ति व संहार करितात. तथापि ते एकात्मकच असून परस्परांत समाविष्ट होऊन जगताचें पालन करितात. तर हें कसें ? आणि त्या पर्वतश्रेष्ठ कैलासावर ते उभयही पुरुषश्रेष्ठ ( हरि व हर ) एकीभूत झालेले पाहून नारदादि ऋषींनीं त्याचा अर्थ काय केला व त्यांशीं कसें वर्तन केलें, ह्या सर्वही गोष्टी, हे द्विजश्रेष्ठा, आपण साकल्येंकरून मला सांगाव्या. त्याचप्रमाणें पुराणा जयशाली श्रीकृष्ण म्हणजे श्रीविष्णु हा शंकराकडे कैलासपर्वतीं कोणत्या प्रकारें गेला व त्याचप्रमाणें त्याला कैलासपर्वतीं नागभूषण जो शंकर याचा साक्षात्कार कसा झाला, हें सर्व मला सविस्तर सांगावें.

वैशंपायन म्हणाले:—हे राजा, नीट चित्त देऊन[1] ऐक कीं, कृष्ण कैलासपर्वतीं कसा गेला

१या ठिकाणीं 'जनार्दन' या शब्दाची व्युत्पत्ति चतुर्धरांनीं जनैः अर्द्यते गम्यते प्रलयकाले, 'याच्यते इष्ट सिध्यर्थे, स्थितिकाले ' अशी करून स्थितिकालीं व प्रलयकालीं तोच आधार आहे. अर्थात् शंकराची अपेक्षाच नाहीं, असें दाखविलें आहे.

१ चतुर्धर या श्लोकाचा अर्थ अध्यात्मपर लावीत बसला आहे. पण तसें करण्याचें आग्रास प्रयोजन दिसत नाहीं. ही चतुर्धराला लकबच आहे.

व तेथें वृषभवाहन देवेश्वर शंकर याचा साक्षात्कार कसा झाला, त्याचप्रमाणें कृष्णानें तेथें तप कोणत्या प्रकारें केलें, व मुनींनीं त्याप्रसंगीं कसें वर्तन केलें—एकंदरींत त्या स्थळीं हरिहरांसंबंधें काय काय वृत्तांत घडला तो, हे नरेंद्रा, जसाचे तसाच ऐक. मात्र या कामीं भगवान् व्यास यांनीं मला जसें वृत्त सांगितलें आहे, तसेंचे तसेंच मी गरुडवहान केशवाला प्रथम नमस्कार करून माझे शक्तीप्रमाणें व बुध्यनुरूप तुला सांगतों. तर हे सुव्रता, तूं तें यत्नपूर्वक श्रवण कर आणि जो कोणी दुरात्मा, तपोविहीन किंवा अनधीत असेल, अशाला हें सांगूं नये. जे पुण्यवान् असतील, अशांना हें सर्वदा पुण्यप्राप्ति करून देणारें आहे. तसेंच हें स्वर्ग, यश, धन व चित्तशुद्धि यांस देणारें असून पुण्यात्म्यांनीं अखंड ध्यानांत वागविण्याजोगें व अनेक उपनिषदांचा गर्भितार्थ संग्रह करणारें व वेदार्थाचा सिद्धांत ठरविणारें आहे. हें ब्राह्मणांना अत्यवश्यक असून नारदादि वेदपरायण तपोनिष्ठ मुनि या जीवशिवैक्यप्रतिपादक प्रसंगाचें अखंड मनन करीत असतात; असो. आतां त्या कैलासपर्वतावर हरि व हर या उभयही सुलक्षण देवांचें परस्पर वृत्त घडलें तें मोठें पुण्यकारक असून अत्यद्भुतही आहे. तें असें.

हे राजा, नरकप्रभृति राक्षसगण मारले गेले व देवांशीं वैर करणारे बहुतेक राजेही नायनाट झालेले; सारांश, देवांचे शत्रु अत्यल्प उरले असतां ईश्वर जगन्नाथ पुरुषश्रेष्ठ विष्णु हा कृष्णरूपानें यादवांसह द्वारावतींत राहून सदैव पृथ्वीचें पालन करूं लागला त्या द्वारावती नगरींत असतां श्रीहरीचे सहवासास देवी रुक्मिणी असे. कधीं कधीं तो जगत्पती रात्रौ तिचे महालांतच शयन करी. व त्या प्रेमळ सुंदरीशीं, मोठ्या प्रेमानें, वेळ राहील तसे, नानाप्रकारचे विलास करीत असे. असा प्रकार चालला असतां स्वर्णालंकार घातलेली देवी रुक्मिणी म्हणाली, 'हे देवेशा माधवा, मला आपलेपासून एक आनंदकर, बलाढ्य, रूपवान् केवळ तुझ्याचसारखा वीर्यवान्, तपोनिधी व यादवांचा नायक, सर्व शास्त्रार्थकुशल, राजविद्येंत अग्रेसर, अशा प्रकारचा पुत्र मिळावा, अशी माझी इच्छा आहे. ही पूर्ण करणें आपणांस सर्वथा उचित आहे. हे केशवा, तूंच जगत्पति, सर्व वस्तूंचा कर्ता, दाता, व भोक्ता आहेस. कोणाला कोणतीही गोष्ट देण्याचा अखंड अधिकार तुजकडेसच आहे. त्यांतूनही ज्यांनीं आपला देह सर्वदा तुझे शुश्रूषेस वाहिला आहे, अशा तुझ्या भक्तांचें इच्छित पुरविण्याविषयीं तर तुझी विशेषच ख्याति आहे. हे देवेशा, आणखी मीं काय बोलावें? मी इतकेंच म्हणत्यें कीं, हे देवदेवा, जगत्पते, माझी जर तुझे ठिकाणीं खरी खरी भक्ति असेल व तुझी मजवरील कृपा वरपांगी नसेल तर, हे जनार्दना, तूं मला वीर्यवंत असा सुलक्षण पुत्र द्यावा, हें उचित आहे.

वैशंपायन सांगतातः—याप्रमाणें जेव्हां रुक्मीचा शत्रु, देवदेवेश कृष्ण याला त्याची लाडकी पट्टराणी रुक्मिणी खूष करून घेऊन बोलली, त्या वेळीं तो यादवेश समयास उचित असें वचन तत्काल रुक्मिणीस बोलला. तो म्हणालाः—हे भामिनि, तूं जशी इच्छा करीत आहेस तसला पुत्र मी तुला देणार आहें. कारण, हे देवि, तूं माझी निरंतर भक्त आहेस. या संबंधानें तुला तिळप्राय संशय घेण्याचें कारण नाहीं. आणि याकरितांच मी तुला शत्रूंचें उन्मूलन करणारा असा वीर्यवान् पुत्र अवश्य देतों. तूं निश्चित ऐस. सज्जनांचें इच्छित पुरविणारे असे जे पुण्य लोक आहेत त्यांची प्राप्ति कोणाही मनुष्याला पुत्राचे योगानें होत असते. म्हणून पुत्र

शब्दाचा यौगिक अर्थच असा आहे. कारण, पुत म्हणजे नरकाला म्हणतात आणि नरक नरक तो काय, दुःख हाच नरक. एतावता पुत् म्हणजे नरक किंवा दुःख यापासून जो त्रायते म्हणजे पितरांचें रक्षण करितो तो पुत्र आणि म्हणूनच ऐहिक व पारलौकिकही दुःख-निवृत्ति व्हावी म्हणून मनुष्य पुत्रप्राप्तीची इच्छा करितो. हे प्रिये, पुत्रवंत पुरुषाला अनंत शुभलोक प्राप्त होतात. आतां स्त्रीला "जाया" म्हणतात याचें कारण पति हा गर्भाचें रूप घेऊन जायेच्या म्हणजे स्त्रीच्या उदरांत प्रविष्ट होतो. हिलाच पुढें त्या गर्भाची माता असें म्हणतात; आणि हिचे ठिकाणीं पति पुनरपि नवें किंवा ताजें रूप घेऊन दहा महिने भरतांच पुत्ररूपानें प्रकट होतो. पुत्रवानाला इंद्रदेखील वचकून असतो.कारण पुत्रवानानें जिंकिला नाहीं असा कोणता लोक आहे? पुत्रहीनाला शुभ लोकप्राप्ति होत नाहीं. बाकी कुपुत्र असण्यापेक्षां वांझपण बरें. कारण, कुपुत्र हा पितरांना नरकांत घालतो, व स्वर्ग प्राप्त होणें तो सत्पुत्रापासूनच होत असतो. याकरितां आपणास पुत्र व्हावा अशी ज्या पुरुषास इच्छा होईल तो जर शहाणा असेल तर त्यानें सत्पुत्र म्हणजे विनीत, विद्यायुक्त, दयाशील व धार्मिक असा पुत्र प्राप्त करून घेण्याची खटपट करावी. विद्यायुक्त म्हणण्याचें विशेष कारण असें आहे कीं, विद्येवांचून अंगीं खरा विनय येत नाहीं.

असो. यासाठीं मी तुला पुत्र देणें तो विद्यावान् व उत्तम धार्मिक असाच देईन. आणि अशा प्रकारचा पुत्र व्हावा म्हणून मी हा याच पावलीं पर्वतश्रेष्ठ कैलासाला जातों व तेथें नीललोहित महादेव शंकर याची उपासना करून आणि ब्रह्मचर्य व तपश्चर्या यांचे योगानें जन्महीन व सर्वव्यापक, विरूपाक्ष, आदिदेव जो सनातन भव, शंकर त्याला संतुष्ट करून त्या प्राणिहिताविषयीं निरलस अशा शंकरापासून तुजसाठीं पुत्र मिळवून येईन. आणि त्या अव्यय शंकराला भेटण्याकरितां मी आजचे आजच निघतों. मी तपाचरणानें त्याला संतुष्ट केलें असतां तो मला खचीत पुत्र देईल. मी महादेवाकडे कैलासास गेलों म्हणजे तेथें उमेस व महादेवास वंदन करून मग मुनींची आवडती व पुण्यमय जी बदरिका नामक तपोभूमि तींत शिरेन. त्या दिव्य भूमींत अग्निहोत्रांची गर्दी असून गंगेचे उदकानें ती सर्वदा धुतली जात असते. ती अनेक मृग व पक्षी यांनीं गजबजलेली असून तींत सिंह, गज यांचेही कळपचे कळप आहेत. बदरीफळें म्हणजे बोरें यांची तर तींत केवळ दाटी असून तींतील वृक्षांना वानर अक्षयी गदगद हालवीत असतात. तींतील गगनचुंबित वृक्ष वेत्रलतांनीं वेढलेले असून, केळीची तर तेथें बनेंचे बनेंच आहेत. वेदरहस्याचें मनन करण्यांत कुशल, वेदसाह्यानें ज्यांनीं तत्त्व निर्णय केला असून जे प्रत्यक्षादि प्रमाणविचारांत निपुण आहेत व यावत् सृष्टींत हें एकच कायतें आहे व हेंच खरें तत्त्व आहे, यावांचून कांहीं नाहीं असा ज्यांचे मनाचा ठाम निश्चय झाला आहे, अशा मुनींनीं तिचा कांहीं भागांत आश्रय केला आहे. त्याचप्रमाणें तिच्या दुसऱ्या कांहीं भागीं साक्षात्कारी सिद्ध पुरुषांनीं वसति भरली आहे. त्याचप्रमाणें इतिहास व पुराणें यांमध्यें निष्णात असे महर्षिंही तिचा आश्रय धरून आहेत. तसेंच हें मर्त्य कलेवर सोडून पुढें स्वर्गलोकास जावें अशी इच्छा धरणारांनीं तेथें सर्वदा वसती केली आहे. या प्रकारची ती अत्यंत विस्तीर्ण व सुप्रसिद्ध आणि पुण्याचें

"जायते पतिः अस्यां सा जाया" अशी या शब्दाची व्युत्पत्ति आहे.

केवळ वसतिस्थानच अशी बदरिकासंज्ञक दिव्य तपोभूमि तींत मी जाईन. असें बोलून देवाधिदेव जनार्दन थांबला.

## अध्याय चौऱ्याहत्तरावा.

—:०:—

### श्रीकृष्णाचा कैलासास जाण्याचा विचार.

वैशंपायन सांगतातः—रात्र संपून प्रभात होतांच जनार्दनानें कैलासास निघण्याचा हेतु केला. व त्यासाठीं अग्नीला होम देऊन व स्वस्तिवाचन करवून श्रेष्ठ ब्राह्मणांस दक्षिणा देण्यानें तें कार्य संपवून, त्याचप्रमाणें विप्रांना गाई दान करून व ब्राह्मणांस नमस्कार करून तो जगत्पति कृष्ण सभामंडपांत शिरला. तेथें मोठ्या आसनावर बसून आणि बलराम, सात्यकि, हार्दिक्य, शुक, सारण, महाबुद्धि उग्रसेन, तसेच इतर सर्वही वृष्णि व यादव यांस, व विशेषतः ज्याच्या सल्लामसलतीचे बळावर सर्व यादव सुखानें नांदत होते व जो धर्मपरायण असून सर्व यदु-वृष्णींचा मार्गदर्शक होता व ज्या महात्म्याच्या नीतीला देव देखील भिऊन असत आणि ज्याचे बुद्धिबलाचे आश्रयानें विष्णु सर्वदा लोकांना वागवितो, असा जो इतर कोणाहूनही नीतिज्ञानांत अधिक व कांतीनें देवतुल्य असा वृष्णिश्रेष्ठ वीर उद्धव, यास एकत्र बोलावून भगवान् कृष्ण म्हणाला. " मी काय म्हणतों, तें ऐकावें; त्यांतूनही माझे पित्याचा सखा उद्धव, यानें माझें वचन विशेषतः ध्यानांत ध्यावें. तुह्मां सर्वांस विदित आहेच कीं, मी बालपणापासून दुष्टांचें हनन करण्याविषयीं सारखा यत्नांत आहें. हे उग्रसेन राजा, पूतना राक्षसीला मी बालपणीं कशी मारिली तें आपण समक्ष पाहिलेंच आहे. त्याचप्रमाणें, हे यादवहो, मी केवळ बाल असतांही बालपणांत केशि दानवास मारिलें. गोवर्धन पर्वत उचलून गोधनाचें रक्षण केलें. सर्व देवांचे अग्रभागीं मला बसवून इंद्रानें मजवर अभिषेक केला. मीं कंसही यमसदनास पाठविला व तीच अवस्था चाणूर-मुष्टीक यांचीही केली. उग्रसेनाला राज्यावर बसविलें. द्वारावती नगरी वसविली. वरील कंसादिकांशिवाय इतरही बलाढ्य राजे मीं मारिले. तो मोठा गाजलेला वीर जरासंध पण त्याला देखील, हे राजा, हे माझे यादव बंधूहो, मीं बलाढ्य भीमसेनाचे हातानें माझे बुद्धिबलानें, न्यायाला न सोडितां, ठार केला. गोमंत पर्वतावरून परत जातांना युद्धांत शृगालाला मारिलें. त्याचप्रमाणें तो दुष्ट दुरात्मा वीर नरकासुर त्यालाही नाहींसा केला. सारांश, हे राजश्रेष्ठहो, या प्रकारें मी ही पृथ्वी निष्कंटक करून सोडिली आहे. परंतु, हे यादवहो, या नरकासुराचाच सोबती असा एक वीर राजा अलीकडे उत्पन्न झाला आहे; याचें नांव पौण्ड्र असें आहे. हा वीर्यवंतांचा नायक असून सर्वदा माझा द्वेष करणारा आहे. हा द्रोणाचार्यशिष्य, राजश्रेष्ठ, बलाढ्य, ब्रह्मास्त्रवेत्ता, यशस्वी, शास्त्रज्ञ, नीतिज्ञ, सर्वांचा प्रत्यक्ष नायक, यत्नशील, मोठा योद्धा व केवळ दुसरा परशुरामच असा युद्धप्रिय राजा आहे. तो आमचा कट्टा वैरी असून सदा माझें न्यून शोधीत असतो. त्या वीराला किंचित्का छिद्र सांपडलें कीं, तो या आपल्या नगरीला भोंवेल. हे राजश्रेष्ठहो, तो पुण्ड्रांचा बलाढ्य राजा अशातशानें वठणीस येणारा नव्हे. याकरितां तुह्मी सर्वही हातीं धनुष्यें घेऊन सर्वदा युद्धास सज्ज असा. आणि जेणेंकरून या आपल्या यादवकुलाचे वसतीची ही नगरी त्याजकडून पीडित न होईल, असा यत्न ठेवा. हे राजा, मी तर कांहीं कारणास्तव कैलासास जात आहें. प्रकृतीचाही कर्ता जो शंकर त्याला भेटावें असें मनांत आलें आहे. याकारितां मी

परत येई तों तुम्हीं सर्वजण कंबर बांधून असा. त्या पुण्ड्रकाला जर कळलें कीं, मी द्वारकेंत नाहीं, तर तो राजेंद्र चाल करून येऊन या नगरीवर हल्ला करील; आणि त्यानें मनांत घेतलें तर ही सर्वही पुरी यादवशून्य करण्यास तो समर्थ आहे, असा माझा तरी अभिप्राय आहे. यास्तव, हे राजेहो, आपले खड्ग, पाश, परशु, पाषाण, गोफणी, इत्यादि घेऊन सज्ज असा. या नगरीच्या बाकीच्या सर्व वेशी बंद करून जाण्यायेण्याकरितां एकच थोरली वेस मोकळी ठेवा. आणि ज्या कोणास या नगरीं तून प्रसंगानें बाहेर जाणें येईल, त्यांनीं राजाचे मुद्रेवांचून ( सहीशिक्याचे परवानगीवांचून) जाऊं नये. त्याचप्रमाणें कोणीही या नगरींत येऊं पाहील, तर त्यानें द्वारपालाला राजमुद्रा प्रत्यक्ष दाखविल्याशिवाय त्याचा प्रवेश होऊं देऊं नये. हे सर्व नियम मी परत येई तोंपर्यंत असेचे असे चालवावे. त्याचप्रमाणें कोणीही मृगयेसाठीं किंवा इतर कोणत्याही क्रीडेसाठीं शहराचे हद्दीबाहेर जाऊं नये. व जाण्यायेण्यांत आपले कोण, परके कोण, यावर सर्वदा नीट नजर ठेवावी. मी परत येई तों या प्रकारचें वर्तन ठेवावें.

याप्रमाणें सरसकट यादवांस सांगून त्याशिवाय त्यानें सात्यकीला निराळें असें कांहीं सांगितलें. ( तें पुढील अध्यायीं. )

## अध्याय पंचाहत्तरावा.

—:०:—

### द्वारावतीचे रक्षणार्थ यादवांस उपदेश.

श्री भगवान् म्हणतातः—हे योद्धृश्रेष्ठा, माझें वाक्य ऐक, आणि सर्वदा सज्ज अस; आणि तूं हातीं खड्ग, गदा, व धनुष्यही घेऊन व अंगांत चिलखत अडकवून अक्षयी जय्यत रहा; आणि अनेक राजांनीं जिचा आश्रय केला आहे अशा या द्वारावतीचें रक्षण कर. हे समर्था यदुश्रेष्ठा, रात्रीची तूं झोंप घेतां कामा नये. सात्यके, तुला शास्त्राचा फार नाद आहे खरा, पण प्रस्तुत प्रसंगीं तूं ही कामगिरी सोडून शास्त्रचर्चा करण्यांत गुंतूं नको हो. हे वृष्णिपा, त्याचप्रमाणें तुजपाशीं कोणी शास्त्रार्थाचा वाद घालण्यास येतील, तरी त्यांच्याशीं तूं वाद घालण्याच्या भरीस पडून चालणार नाहीं. तूं तूर्त इतर सर्व वाद सोडून केवळ असा वाग कीं, जेणेंकरून माझ्या ह्या राजधानीचा आब जाऊन हंसें होणार नाहीं.

सात्यकीनें उत्तर केलेंः—हे जनार्दना, तुझें वचन माझे अंगीं शक्ति असेल तीप्रमाणें मी पार पाडीन. हे जगन्नाथा, तुझी आज्ञा मला केव्हांही शिरसा वंद्य आहे. हे माधवा, मी आपला या बलरामाच्या आज्ञांकित चाकरासारखा वागेन ( मग तर झालें. ) आणि तुझें परत येणें होईतोंपर्यंत फार जपून राहीन. हे गोविंदा, हे माधवा, तुझी जर मजवर पूर्ण कृपा आहे, तर रणांत शत्रूचा निग्रह करणें यांत मला जड तें काय जावयाचें आहे ? रणांत मजपुढें इंद्र, यम, कुबेर किंवा वरुण उभा राहिला, तरी या सर्वांना मी जिंकीन. मग त्या पौण्ड्र राजाची कथा ती काय ? हे हरि, तूं खुशाल आपले कामाला जा. आणि आपलें काम साधून ये. मी अखंड जागा आहें.

यावर कमलनेत्र कृष्ण पुनः एकवार उद्धवाला म्हणाला, 'हे उद्धवा, माझें हें वाक्य ऐक आणि यत्नपूर्वक तें अमलांत आण. हे राजा, तूं आपल्या मुत्सद्दीपणानें या राजधानीचा बचाव कर. बाबा, सर्वदा सावध राहून आमची पाठ राख. तुला ही गोष्ट सांगण्याची वेळ आली, याबद्दल मला लज्जा वाटते. कारण तूं सर्वांना विद्येच्या परतीराला नेणारा, आणि ( अशा ) विद्वानाला शिकवीत बसण्याचें

धाडस कोण तरी शहाणा माणूस करील? सारांश, तुला सांगावें तें काय? उचित कार्य कोणतें व अकार्य कोणतें हें तूं सर्वथा जाणतच आहेस. आणि याचकरितां बाबा वृष्णिपाला, मी तुला शिकवीत बसण्याचें पुरें करितों.'

उद्धव म्हणालाः—हे परमसमर्था गोविंदा, तुझ्या या बोलीला काय म्हणावें? ही का तुझी मजवर कृपा, का हें तुझें मजवरील प्रेम? हे जगन्नाथा, मला तर असें खास वाटतें कीं, माझे ठिकाणीं इतक्या गुणांचा आरोप म्हणजे हा केवळ आपल्या प्रसादाचा विस्तार आहे, दुसरें कांहीं नाहीं. कारण, हे केशवा, तूं ज्याला प्रसन्न झालास, त्याला अनुकूल नाहीं, अशी कोणतीच गोष्ट नाहीं. कारण, या निखिल जगताचा मुख्यतः कर्ता-हर्ता काय तो तूंच आहेस. सर्व कार्यांचा उद्गम, त्याचप्रमाणें वक्ता, श्रोता, प्रमाणवेत्ताही तूंच आहेस व ध्याता, ध्यान व ध्येय हीं तूंच आहेस, असें ब्रह्मवेत्ते समजतात. देवशत्रूंना जिंकणारा व स्वर्गवासियांचा पालक तूंच आहेस. तूं आमचा नाथ आहेस, याच कारणानें आम्ही सर्व शत्रूंस निर्दळून जीवमान आहों. आणि मी हीच काय ती सर्व नीति समजतों. कारण, खरा खरा नीतिशास्त्रप्रणेता तूंच आहेस. हे मंत्रस्वरूपा, आजकाल तुझ्या पलीकडे नीतिप्रदर्शक असा दुसरा कोण आहे, सांग बरें? माझी तर निश्चित अशी समजूत आहे कीं, कोणत्या कामांत कसें चालावें हें सांगणारा एक तूंच आहेस. जे नीतिज्ञ पुरुष आहेत त्यांचें म्हणणें, 'नीतिमार्ग हा मोठा खटेल व गूढ आहे.' हे जनार्दना, साम, दान, दंड व भेद या चार प्रकारची नीति सांगितली आहे; व हिचा उपयोग आपण शत्रूचे तावडींत सांपडलों किंवा शत्रु आपले तावडींत सांपडला आहे, अशा वेळीं करावयाचा असतो. दंडाचा प्रयोग जे दंड्य किंवा दुर्बल असतील अशांचे ठिकाणीं करावा. उभय पक्षांचा समतोलपणा असेल अशा वेळीं सामाचा उपयोग करावा. शत्रु बलाढ्य असेल तर त्या ठिकाणीं दानाची योजना करावी व या तिन्ही उपायांचा जेथें उपयोग दिसत नाहीं अशा ठिकाणीं थोरला उपाय म्हणजे भेद हा करावा, असा नीतिज्ञांचा अभिप्राय आहे. आणि ज्ञाते या सर्वही भिन्न उपायांचें गुरुत्व तुजकडेसच देतात. या कामीं फार बोलण्यांत चव काय? सर्व कांहीं तुझेच ठिकाणीं रहातें आहे, यांत काय तें समज.

वैशंपायन सांगतातः—असें बोलून तो सरल नीतिराज उद्धव थांबला. तेव्हां, हे राजा, तो भगवान् विष्णु त्या यादव सभेंत महाबाहु बलराम, राजा उग्रसेन, त्याचप्रमाणें हार्दिक्य यांस बोलला. यांपैकीं बलरामाला तो तत्ववेत्ता कृष्ण म्हणाला, 'दादा, आपण केव्हांही निष्काळजी राहूं नये. सर्वदा जपून असावें. हे महाबाहो, आपण दक्ष राहिल्यावर लोकांना पीडा होण्याचें भयच नको. याकरितां सर्वदा आपली गदा घेऊन सावध असावें. अक्षयींच खेळ खेळत राहणें कांहीं चांगलें नव्हे. हे प्रभो, आपण यत्नपूर्वक या द्वारावती नगरीचें रक्षण करावें. आणि आम्ही उपाहासास जेणेंकरून पात्र होणार नाहीं असें वागावें, म्हणजे आपली गदा जय्यत असूं द्यावी, हेंच सांगणें. त्याचप्रमाणें, यत्नपूर्वक सर्वदा कंबर बांधून असा; आळसानें हातपाय गाळून बसूं नका, हीच प्रार्थना आहे. यावर बलरामानें त्या वृष्णिवंशज कृष्णाला, "फार बरें आहे," असें उत्तर दिलें. आणि मग तेथें जमलेले

१ लौकिकांत, साम, दाम, असे म्हणण्याचा पाठ पडला आहे. परंतु खरा शब्द दान असून दाम हा साम शब्दाचे साहचर्यामुळें कानास रुचला आहे. व दान तरी दामावांचून होत नाहीं, म्हणून तो क्षम्यही झाला आहे.

सर्वही यादव आपापले घरीं गेले आणि जगन्नाथ कृष्ण हा पर्वतश्रेष्ठ कैलासास जाण्याचे नादास लागला.

## अध्याय एकाहत्तरावा.

—:०:—

### कृष्णाचें बदरिकाश्रमीं जाणें.

वैशंपायन सांगतातः—नंतर जगत्पति विष्णु यानें 'हे ताक्ष्या, त्वरित ये' म्हणून पक्षिश्रेष्ठ गरुडाचें चिंतन केलें. त्याबरोबर, हे कुरूद्वहा, ज्याला ज्ञानराशि असें म्हटलें आहे तो परमपूज्य, बलवान्, पराक्रमी, योगी, शास्त्रकर्ता, यज्ञमूर्ति, पुराणात्मा, सामवेद हा ज्याचें मस्तक, ऋग्वेद हेच पंख, वर्णानें पिंगट, एकाद्या जटेल्यासारखा दिसणारा, तांबड्या चोंचीचा, सोमरस हरण करणारा, विशाळ मस्तकाचा, सर्पशत्रु, कमलनेत्र, प्रत्यक्ष दुसरा विष्णुच, इंद्रालाही जिंकणारा देवदेवाचें वाहन, आपल्या दर्शनमात्रानें दानव स्त्रियांचे गर्भपात करणारा व आपल्या पक्षबलानें राक्षस व असुर यांचे समूहास जिंकणारा, असा तो वीर्यशाली गरुड कृष्णासमोर प्रकट झाला. आणि भूमीवर गुडघे टेंकून "हे विष्णो, हे जगत्पते, हे देवदेवेशा, हे हरे, हे स्वामिन्, तुला नमस्कार असो." असें म्हणत विष्णूला लोटांगणीं आला. तेव्हां कृष्णानें त्याला हस्तस्पर्श करून म्हटलें, 'हे ताक्ष्यश्रेष्ठा, बरा आलास. मला शूलधारी सनातन शंकर याला भेटावें अशी इच्छा झाली आहे व यासाठीं कैलास पर्वतीं जाण्याचें आहे.' गरुड म्हणाला, "ठीक, माझी तयारी आहे."

त्याबरोबर जनार्दन त्यावर आरूढ होऊन आसपास उभे असलेल्या यादवांना म्हणाला, "मी जातों; तुम्ही आतां रहा." नंतर तो जगत्पति श्रीहरि उत्तर दिशेला चालला. वाटेंत जातांना गरुडानें आपल्या महानादानें त्रैलोक्य कंपित करून सोडिलें व आपल्या पायांनीं जातां जातां समुद्र[1] खवळून सोडिला. आणि पाठीवर जनार्दनाला बसवून नेत असतांही पंखांच्या झडपेनें मार्गांतील पर्वत हालविले. नंतर आकाशांत असणारे गंधर्वांसह सर्वही देव, यांनीं त्या कमलनेत्र ईश्वराचें गोड वाणीनें स्तोत्र केलें.

ते म्हणाले:—हे देवा जगन्नाथा, हे व्यापका, हे जगत्पते, हे अजिंक्या, तुझा उत्कर्ष असो. हे भूतभावना, हे भावना, हे दैत्य-दानवनाशका नृसिंहा, तुला नमस्कार असो. हे योगिध्येया, हे परमगते, हे देवा, हे हरे, तुझा जयजयकार असो. हे नारायणा, हे द्युतिमंता, हे चित्ताकर्षका, हे कृष्णा, हे दुःखहारका, हे हरे, हे आदिकर्त्या, हे पुराणात्मन्, हे ब्रह्मयोने, हे सनातना, हे सकलेश्वरा, हे निर्गुणा, हे गुणरूपा, हे भक्तिप्रिया, हे भक्ता, हे दानवांतका, हे अचिंत्यमूर्ते, हे सर्वेश्वरा, तुला वारंवार नमस्कार असो."

या प्रकारच्या अनेक शब्दांनीं त्या कालीं देव, गंधर्व, साध्य, चारण, ऋषि यांनीं त्या अव्यय व समर्थ देवाची स्तुति केली. तीं स्तुतिवाक्यें कानीं पडताच तो जगन्नाथ, ते सुरगण व वेदपारगमुनि यांस समागमें घेऊन पूर्वकालीं जेथें स्वतः श्रीविष्णूनें घोर तप केलें होतें, त्या स्थलीं गेला. या स्थलीं प्रभावशाली श्रीविष्णूनें लोककल्याणकारक असें एक अयुत वर्षेपर्यंत लोकहित करण्याचे बुद्धीनें तप केलें. आणि या प्रकारचें तप करून त्या जगत्पतीनें आपलें

---

१ आजच्या नकाशांत द्वारकेंतून उत्तरदिशेनें कैलासाकडे जाणाराला वाटेंत इतका समुद्राचा संबंध येतां दिसत नाहीं, शिवाय पावलांनीं समुद्रक्षोभ कसा होणार?

स्वतःचे नर व नारायण या रूपांनीं दोन भाग केले. या स्थानांतून सरिच्छ्रेष्ठ भागीरथीचा पवित्र प्रवाह धांवतो आहे. वेदार्थज्ञ अशा वृत्र ब्राह्मणाला मारून त्या ब्रह्महत्येचे निवारणार्थ इंद्रानें याचस्थलीं अयुत वर्षें तप केलें. याच स्थलीं जनार्दन देवाचें ध्यान करून सांप्रतचे सिद्ध हे सिद्धस्थितीला पोंचले. लोकांना दुःख देणाऱ्या रावणाला मारल्यावर "कसल्याही ब्राह्मणाला कोणींही मारिलें, तरी त्यानें त्या ब्रह्महत्येच्या निवारणार्थ तप हें केलेंच पाहिजे." असा जो इंद्रानें नियम घालून ठेविला आहे, तो पालन करण्याकरितां म्हणून प्रत्यक्ष रामचंद्रानें याच स्थलीं घोर तप केलें. शुद्धाचरणानें चालणारे देव व मुनी देखील याच स्थलीं सिद्धीस पावतात. या स्थलीं साक्षात् जगत्पति केशवाची अखंड वसति आहे. या स्थलीं मुनिगणांचे साह्यानें सर्वदा यज्ञ चालू असतात. या भूमीचे केवळ स्मरणानें देखील मनुष्य स्वर्गास जाईल. मुनिश्रेष्ठ हे या पुण्यभूमीस स्वर्गाचा सोपान ( जिना ) असें समजून तिचा आश्रय करितात. हे राजा, या स्थलीं जे शत्रू असतील, त्यांची बुद्धि पालटून ते हमेश मित्र होतील. उत्तम धर्मानें चालणारे जे कोणी पुण्यशील आहेत, अशांचा हा आखाडाच आहे, असें समजतात. देवांनीं देखील याच स्थलीं विष्णूची आराधना करून स्वर्ग पटकाविला. निर्मत्सर ऋषी या क्षेत्राला "सिद्धक्षेत्र" अशी संज्ञा देतात. असें जें हें विशाल महापवित्र व ऋषींचें आवडतें बदरीवन, तें पाहण्याकरितां तो ईश्वर विष्णु संध्याकाळचे सुमारास देवगण व तत्त्वज्ञ मुनी यांसह त्यांत शिरला.

त्या समयीं तेथे सर्वत्र अग्नीला होम देण्याची एकच गडबड उडाली होती. पक्षी किलबिल करून राहिले होते व आपल्या घरट्यांत येऊन बसत होते. गाईंच्या जिकडे तिकड धारा निघत होत्या. सवभर मुनिवर व ऋषिवर हे आसनें घालून ध्यानस्थ बसले होते. सिद्ध हे समाधि लावून जनार्दनाचें चिंतन करीत आहेत. ठिकठिकाणीं होमाचें तूप अग्नीवर कढत होत ठेविलें आहे. यज्ञीय अग्नि चेतविले जात आहेत. आणि तेथेच कुंडांचे ठिकाणीं सर्वत्र अग्नींना होम देत आहेत. अतिथींचा सत्कार चालला आहे व सृष्टि संध्यारागांत मग्न झाली आहे. अशा समयीं जनार्दन विष्णु त्या मुनींच्या आवडत्या व तपोमय अशा भूमीस देवांसह प्राप्त झाला. तो प्रभु कृष्ण तेथें आला तो नेमकाच तेथील मुख्याश्रमामध्येंच शिरला. आणि गरुडावरून उतरून ज्या भागांत दिव्यांचा प्रकाश झक पडला होता, तेथें आपले बरोबरचे देवगणांसह राहिला.

## अध्याय सत्त्याहत्तरावा.

—:०:—

### कृष्णाचें बदरिकाश्रमीं आतिथ्य.

वैशंपायन सांगतातः—नंतर त्या आश्रमांतील मुनिगण, देवाधिदेव हा आला आहे, असें पाहतांच, आपली अग्निहोत्रक्रिया संपवून व दारांत आलेल्या श्रेष्ठ अतिथींचा सत्कार वगैरे करून, ज्याच्या त्याच्या अनुकूलतेप्रमाणें हातीं अर्घ्याचें सामान घेऊन त्या अव्यय ईश्वराचें दर्शन घेण्याकरितां आपापल्या झोंपडींतून बाहेर पडून एकत्र जमले. या मंडळींत दीर्घकालपर्यंत तपाचरण करून समाधि साधण्याविषयीं निश्चय करून बसलेले असे कित्येक मुनी होते; कित्ये जटाधारी होते; कित्येकांनीं डोकें मुंडलें होतें. कित्येकांच्या आंगच्या शिरा आणि धमन्या लांबच लांब पसरलेल्या दिसत होत्या. ( रोडपणामुळें ) कित्येकांच्या अंगावर गुंजभर देखील मांस नव्हतें. कित्येक

अगदीं सुकट होते. कित्येक तर शुद्ध भूतां-सारखे विकट होते. कोणी पाल्यावर ठेंचलेलें हिरवेंच अन्न खाऊन असत. कोणी झाडांचें पानां-वर निर्वाह करणारे, कोणी वेदविद्या पुरी झाल्यामुळें ब्रह्मचर्यसमाप्तीचें स्नान केले आहेत, व निराहार राहून मोठें तप करीत आहेत; कित्येक विष्णुभक्त व विष्णुपरायण होऊन अखंड विष्णूचें स्मरण करण्यांत गुंतले आहेत असे, कित्येक अगदीं मुक्त होण्याचे रंगास आलेले, कित्येक केवळ ध्यानांतच गढलेले; कित्येक तपानिधि ध्यानयुक्त मनानें श्री विष्णूचा साक्षात्कार झालेले; कोणी संवत्सरांतून एकवार आहार करणारे; कोणी केवळ जलप्राशन करून राहणारे; कोणी आपल्या तपःसामर्थ्यानें इंद्राला देखील भय उत्पन्न करणारे; कोणी श्रुतिस्मृतींचे चिंतनांत गर्क असणारे, असे अनेक होते. याशिवाय ठळक ठळक मंडळींत वसिष्ठ, वामदेव, रैभ्य, धूम्र, जाबालि, कश्यप, कण्व, भारद्वज, गौतम, अत्रि, अश्वशिरा, भद्र, शंख, शंखनिधि, कुणी, पवित्र दृष्टीचा परा-शरपुत्र, महामति याज्ञवल्क्य, कक्षीवान्, अंगिरा, भद्र, दीप्ततपा नांवाचा मुनि, असित, देवल, महातपस्वी वाल्मीकि, हे आणि दुसरेही कांहीं होते. ते सर्वही तो जनार्दन, हरि, विष्णु, जो भक्तवत्सल कृष्ण, त्याचे सन्निध जाऊन भक्तीनें नम्र होत्साते त्यास प्रणाम करिते झाले. प्रणाम करितांना ते केशवास म्हणालेः---हे कृष्णा, हे देवा, हे देवाधिदेवा, हे ॐकाररूपा, हे जगन्नाथा, हे दुःखहारका, आम्ही सर्व तुला शिरसा वंदन करितों. तोंडानें, हे कृष्णा, हे विष्णो, हे हृषी-केश, हे केशव, याप्रमाणें मुहुर्मुहुः उच्चार करून प्रणाम करीत असणारे ते ब्राह्मण त्या जगत्पतीला म्हणाले, ' हे प्रभो, हें अर्घ्य घ्यावें; हें पाद्य स्वीकारावें; ह्या आसनावर बसावें. हे देवा, आपली आम्हांवर अशी कृपा झाल्या-मुळें आह्मी स्वतःस कृतकार्य समजतों. ते सर्वही जण अञ्जलि जोडून, देवापुढें उभे राहून त्याचे देखत म्हणाले, हे प्रभो, आमचें उचित कर्तव्य आमचे हातून योग्य रीतीनें होत नाहीं, यामुळें आम्हांवर रोष तर नाहींना ?[1]

यावर कृष्णानें त्या ऋषींनीं आणिलेल्या सामग्रीचा ( इतर ) देवांसह यथायोग्य विनियोग करून त्या ऋषींस म्हटलें:--' हे मुनिश्रेष्ठहो, तुम्ही आपलें कर्तव्य पूर्णपणें केलेंत. तुमच्या तपाची उत्कृष्ट वृद्धि असो. ' याप्रकारें त्या पुरातन परमात्मानें सर्व ऋषींस आश्वासन देऊन, आपले गरुडावर प्रसन्न होऊन त्याला रात्रीं पुरतें एका बैठकीवर स्वस्थ बसवयास सांगितलें. इतकें करून पुनरपि त्या जनार्दनानें त्या जितेंद्रिय ऋषिमंडळीला कुशल प्रश्न करून त्यांचें तप, अग्निहोत्र व घरची कुटुंबादि व्यवस्था हीं सुरळीत चाललीं आहेतना, म्हणून पुसलें; याप्रकारें त्या ईश्वरानें, जगन्ना-थानें त्या सर्वांची पूसतपास केली. त्या सर्वांही " सर्वकडून आमचें सर्वत्र कुशल आहे " असें कृष्णास उत्तर दिलें. नंतर त्यांनीं कृष्णरूपी विष्णूचें व त्या बरोबरचे सर्व देवमंडळीचें नीवार, फळें, मुळें वगैरे खाऊं घालून अगत्य-पूर्वक आतिथ्य केलें. त्या आतिथ्याचा स्वीकार करून श्रीहरि तर त्यांवर फारच प्रसन्न झाला.

१ अस्त्येव अन्यसमाधिभीरुत्वं देवानाम् -
**कालिदास.**

अर्थः---मृत्युलोकांत कोणी समाधि लावूं लागला म्हणजे हा आपणांस गचांडी देतो काय, अशी देवांना भीति पडत असते.

## अध्याय अठ्याहत्तरावा.

—:०:—

### कृष्णाची समाधि व कोलाहलश्रवण.

वैशंपायन सांगतातः---नंतर तो अतर्क्य-

गति प्रभु यादवेश्वर विष्णु, गंगेच्या उत्तर तीरीं, त्यानें स्वतःच ज्या स्थळीं पूर्वकालीं तप केलेलें होतें तें स्थान पहाण्याकरितां गेला. या कामाकरितां तो श्रीहरि स्वतः अंगींच त्या तपोवनांत शिरला. शिरून त्यानें बहुत वेळपर्यंत तो रमणीय प्रदेश पाहिला. नंतर पुण्यवर्धन करणाऱ्या अशा तेथील आश्रमांत तो बसला आणि तेथें बसून तो कमलनेत्र जगन्नाथ देवेश्वर समाधिबलानें ठिकाणीं चित्त स्थिर करून कांहीं अचिंत्य तत्वाचें ध्यान करीत राहिला. याप्रमाणें तो देवश्रेष्ठ हरि निवातस्थ दीपाप्रमाणें अचल चित्तानें समाधिगत राहिला असतां, त्या स्थळीं भोंवतालीं पुढीलप्रमाणें महान् घोर असा शब्द उठला. "हं, खा; खा; आनंद करा; चला चला; या हरणांवर तुटून पडा आणि या शार्ङ्गधारी विष्णूचे कृपेनें ( आज चैन आहे, याकरितां ) सर्व शिकारी कुत्रे इकडे सोडून द्या. अरे, हा विष्णु, ज्याला कृष्ण, ईश, हरि किंवा अच्युत म्हणतात, तो या स्थानीं बसला आहे. हे स्वामिन् हे माधवा, हे केशवा, हे देवेशा, हे विष्णो, तुला नमस्कार असो." अशा प्रकारचा मोठा थोरला कोलाहल त्या रात्रीं त्या स्थळीं तेथें उठला. त्याचे मागून, हे राजा, तेथें मृगशत्रु जे सिंह त्यांचा व मृगांमागून धावणारे शिकारी कुत्रे यांचाही एक मोठा शब्द उठला; त्याचप्रमाणें हे राजा, त्या स्थलीं भयार्त होऊन बेंबटणारे हरिण, डुरकणारे वाघ, गुरगुरणारे अस्वल, ओरडणारे हत्ती, यांचेही अंतराअंतरानें शब्द उठून एकंदरींत वादळांत खळबळून उठलेल्या समुद्राचे गर्जनेचा भास होऊं लागला. तो त्या रात्रीं तेथें उठलेला नाद इतका मोठा होता कीं, त्या पायीं त्रैलोक्य घाबरून गेलें.

अशा प्रकारचा तो शब्द त्या स्थलीं समाधींत स्थित असलेल्या हरीचे कानांत घुसून त्या योगानें त्याची समाधि चळली; त्या वेळीं तो जगत्पति सुस्कारा टाकून विचार करूं लागला कीं, हा एवढा प्रचंड गलबा आहे तरी कशाचा म्हणावा? शब्द तर अमला प्रचंड असून त्यांत माझी स्तुतिही आहे. तेव्हां असा शब्द कोणाचा असेल? नीट कान देऊन पाहिलें असतां शिकारी कुत्रे रानांत सैरावैरा भुंकत धांवत आहेत, त्यांचा यांत शब्द असून इतर सर्व प्रकारचे श्वापदांचाही शब्द एकवटून सर्वभर उठला आहे; आणि त्यांतच माझ्या स्तुतीनें युक्त अशा मनुष्यवाणींचें मिसळण आहे.

याप्रकारें त्या शब्दाचें स्वरूप नीट लक्षांत आणून आणि सर्व दिशांकडे दृष्टि फेंकून त्या शब्दांचा नेमका उद्भव कोठून तें जाणण्याकरितां तो श्रीहरि टपून बसला; इतक्यांत तो केशव ज्या स्थानीं बसला होता, तेथें हरिण धांवत आले व त्यांचाच माग धरून, हे राजा, तो शिकारीवर्ग आपल्या अनुयायांसह आला. त्याचबरोबर तेथें शेंकडों दिवट्याही पेटल्या; त्यामुळें तेथील सर्व अंधार नाहींसा होऊन लखलखीत दिवसासारखी प्रभा झाली. इतक्यांत पाठोपाठ तेथें पिशाचांचे घोळके दिसूं लागले. ते पिशाच मोठे घोर असून नानाप्रकारचे विकट स्वर काढून आरडत होते. ते मांस खात होते व घटाघट रक्त पीत होते. अशा प्रकारें वेडेवांकडे तोंडाचे अनेक घोर पिशाच तेथें प्रकट झाले. हे राजा, त्या वेळीं त्या मृग द्वेष्ट्या पारधी लोकांचे बाणांनीं विद्ध होत्साते कांहीं मृग बाणांच्या तडाक्यांत सांपडत होते. कांहीं सांपडून चुकले होते. कांहीं मरून पडण्याचे रंगांत होते; कांहीं मरून पडले होते व कांहीं बाणांनीं घायाळ झाल्यामुळें इकडे तिकडे धांवत होते. अशा प्रसंगांत सांपडल्यामुळें शेंकडों हजारों मृग

खडबडून जाऊन तो देव कृष्ण जेथें बसला होता, तेथें येऊन दृढीनें उभे राहिले. आम्ही असेंही ऐकत आलों कीं, ते मृग श्रीकृष्णाला पोटांत घेऊन आपण त्याचे सभोंवार गराडा घालून उभे राहिले; त्याचप्रमाणें वेड्यावांकड्या आकृतीच्या, विक्राळ, अंगांवर रोमांच उभे करणाऱ्या, अशा पिशाची पोटाशीं आपले पारग घेऊन केशव ज्या स्थळीं उभा होता, तेथेंच येऊन भिडल्या. हे राजेंद्रा, त्या शिकारी कुत्र्यांच्याही झुंडी त्याच स्थळीं इकडून तिकडे भटकत होत्या; त्या वेळीं तो भगवान् विष्णु याप्रमाणें चहूं बाजूंनीं कोंडला गेला असतां आश्चर्यचकित होऊन हा प्रकार आहे तरी काय म्हणून तिकडेच पहात बसला, तो केशव आपल्याशीं एखाद्या सामान्य मनुष्याप्रमाणें विचार करीतच बसला, कीं हा एवढा लाबरुंद शब्द तरी कोणाचा? ही सर्व आलेली मंडळी ही कोणाची अनुचर म्हणावी? व जी स्तुति श्रवण करून माझें मन प्रसन्न झालें, असें हें माझें स्तोत्र तरी कोण करितो आहे? आणि मी प्रसन्न झाल्यामुळें इतरांना अति दुर्लभ असा मजपासून मुक्तिलाभ होण्याचा सुयोग कोणाच्या वांट्यास आला म्हणावा?

## अध्याय एकुणऐशीवा.

—:०:—

### पिशाचांचें आगमन.

वैशंपायन सांगतातः—वरील मंडळीचे मागून विकट मुद्रेचे व महाभयंकर असे दोन पिशाच ( तेथें आले ). ते दोघे लांबटांग्ये असून त्यांचे रोम पिंगट होते. त्यांच्या जिभा लांबच लांब असून हनुवट्या मोठाल्या होत्या; त्यांचे केश लांब सडक होते व त्यांचे डोळे विद्रूप असून ते तोंडानें "हाय हाय" म्हणून ओरडत होते. मांसाचे पेटारे ते खात होते व रक्ताचे घटचे घट पीत होते. त्यांचे सर्वांगाभोंवतीं आंतड्यांचे वेढे पडले होते. ते उंच ढेंगाळ व पातळपोटचे होते. त्यांनीं लांब व रुंदट पातीचे शूलांत ओंवलेलीं ( टोंचलेलीं ) मुंडकीं धारण केलीं असून ते आपल्या उभय हस्तांनीं ठिकठिकाणीं प्रेतांचे कवळचे कवळ ओढून आणीत होते. आणि. हे राजा, पिशाचयोनीला शोभेल, अशा प्रकारचें नानातऱ्हेचें विचकट हंसणें हंसत होते. नानाप्रकारचीं ग्राम्य वचनें बोलत होते. आपल्या मांड्या व पाय यांच्या थडकांनीं मोठमोठे वृक्ष कांपवीत होते. तोंडाचे कोंपरे वरचेवर चाटीत होते व दांत कडकडा चावीत होते. हाडें व स्नायु, त्याचप्रमाणें शिरा व धमन्या, यांनीं सर्वांगीं व्यापलेले व मुखानें अखंड "हे कृष्णा, हे कृष्णा, हे माधवा," असा घोष करीत होते. "हा विष्णु आमच्या केव्हां तरी दृष्टीस पडेल; सांप्रत तो कोठें बरें बसला असेल? त्या स्वामीची या वेळीं वसति कोणते स्थळीं असेल? व त्याला पाहण्याकरितां कोणत्या दिशेनें प्रयत्न करावा? तो देवेश हरि याच स्थलीं आहे कीं, अन्य कोठें आहे? काय म्हणावें? ज्याला ब्रह्मवेत्ते लोक साक्षात् 'परब्रह्म' असें म्हणतात, तो कमलपत्राक्ष इंद्रानुज हरि आहे तरी कोठें? कारण, या जन्मरहित व सर्वव्यापी पुरुषाला भेटण्यासाठीं आम्ही उत्कंठित झालों आहों. त्या जगत्पतीचे ठिकाणीं हें जगत्त्रय अंतकालीं लीन होतें, असें म्हणतात. असला तो अजन्मा सृष्टिकर्ता या वेळीं आम्हांस कुठे आढळेल? हा लोक म्हणजे प्राण्यांचे अंतर्यामीं राहणाऱ्या त्या जगत्पतीचाच विस्तार आहे. अशा त्या जगन्नियंत्या देव हरीचें दर्शन घेण्याविषयीं सांप्रत आमचा यत्न चालू आहे. कारण, आमचे दुर्दैवानें प्राणीमात्रानें हिडिस् म्हणून जिचा तिटकारा करावा, अशा प्रकारची

ही घोर पैशाचस्थिति जबरीनें आम्हांस प्राप्त झाली आहे. या स्थितींत सर्वत्र नरमांस व नरास्थि यांचे योगानें गलिच्छपणा माजलेला असून तिला पाहून सर्वांस भय उत्पन्न होतें. हरहर! किती तरी आमचें दुष्ट पूर्वकर्म असलें पाहिजे, कीं ज्या पूर्वसंचितामुळें आम्हांला असल्या हिडिस योनीबद्दलच सर्वदा प्रेम वाटावें. आणि जोंपर्यंत आमचें दुष्टकर्म शिलक असेल, तों पर्यंत ही प्रीति अशीच राहणार व तोंपर्यंत प्राणीमात्राला पीडा करणारी व सर्वांनीं द्वेष्य मानलेली अशी आमची अवस्था आह्मांस खास सोडणार नाहीं. निःसंशय जन्मोजन्मीं आह्मी अनेक पापांचे घडे सांठविले असले पाहिजेत आणि म्हणूनच त्यांचें हें भयंकर फल अजूनही नष्ट होत नाहीं. सांप्रत या कुत्र्यांच्या साहाय्यानें प्राण्यांचे प्राण घेण्याकडे आमची योजना केली आहे; कसें करावें? लोकांत प्राणी पहावे तों बाल्यस्थितींत त्यांचें चित्त अज्ञानांत गुरफाटलें असल्यामुळें त्यांना योग्य कोणतें व अयोग्य कोणतें, हें कळत नसतें. बरें, पुढें तारुण्यांत आले असतां अनेक प्रकारचे विषयांचे गोत्यांत सांपडून भ्रमिष्ट होऊन जातात आणि त्या विषयांचे दाढेंत असल्यानें स्वतःचे पारलौकिक कल्याणाचा यत्न त्यांचे हातून होत नाहीं. त्यांचीं चित्तें विषयांनीं घेरलीं असल्यामुळें त्यांना सत्यज्ञानच होत नाहीं; बरें, पुढें वार्धक्य येतें, त्या वेळीं तर अनेक व्याधींनीं व नानातऱ्हेच्या पीडा उत्पन्न करणारे ज्वरादि रोग यांहीं ते व्याप्त होऊन जातात, त्यामुळें तेथेंही दुष्ट इंद्रियांचें तडाक्यांत सांपडल्यानें त्यांचे हातून आत्मकल्याणाचा यत्न होत नाहीं; मग पुढें तसेंच मरण येतें व पुनरपि ते गर्भवासांत पडतात. असा क्रम सतत चालतो. त्या गर्भवासांत असतांना विष्ठामूत्राचे भयंकर कर्दमांत सांपडल्यानें अनेक प्रकारचे दुःखांत पडतात; नंतर कांहीं कालानें अशा त्या घोर गर्भस्थितींतून बाहेर पडून या संसारचक्रांत सांपडतात. तेथें आल्यावर एकमेकांचे बोकांडीं बसतात व दुष्कर्मांचे घडे भरूं लागतात. या प्रकारें सर्वदा दुःखांनीं चिकार भरलेल्या अशा या संसारांतच रहाटत राहून अज्ञानामुळें अनेक रूपांची पातकें करीत असतात. हा या संसाराचा प्रभाव प्राणिमात्राला व्यापून राहिला आहे व तो असा लोंचट आहे कीं कसलेही उपाय केले आणि कसलीं तीव्र धारेचीं शस्त्रें आणिलीं, तरी तो तुटणारा नाहीं. यामुळें हे देहात्मवादी मर्त्य याचे कचाटींतून सुटत नाहींत व ते असा संकल्प करितात कीं, आज आपण या राजास मारून यापासून इतकें डबोलें उपटूं. राजरोस न सांपडेल तर मीं हें इतकें द्रव्य चोरीनें हरण करून घेईन. मी सशक्त व दांडगा आहें आणि हा गरीब व शांत आहे. तेव्हां याला तुच्छ करून टाकून याजपासून इतकें द्रव्य लाटीन.' या प्रकारें विषयाचे गुरफाट्यांत सांपडलेले हे मूर्ख प्राण्यांना पीडा देण्याचा यत्न करीत असतात. अशा प्रकारच्या या दुःखमूल संसाराचें निर्मूलन करण्याला एकच खात्रीचें औषध आहे. तें औषध म्हणजे शंखचक्र गदा धारणकर्ता देव पुराणपुरुष, आदिदेव, ज्याला ब्रह्मवेत्ते आत्मा असें म्हणतात तोच आहे. याकरितां आम्ही हरप्रयत्न करून अशा त्या हरीची साक्षात् गांठ घेणार. या प्रकारें भाषण करीत करीत ते दोघे पिशाच श्रीहरीचे सन्निध प्रकट झाले.

# अध्याय ऐंशीवा.

—:०:—

## घंटाकर्णाचा ध्यानयोग.

वैशंपायन सांगतात:—मग त्या भगवान् हरीनें त्या अत्यंत भयंकर व हातीं दिवट्या घेऊन आलेले दोघेही मांसभक्षक पिशाचांकडे पाहिलें व त्या पिशाचांनींही सुखासनावर बसलेल्या त्या लोकलोकेश्वर देवकीसुताला पाहून त्याजकडे कांहीं काळ टक लाविली. नंतर तो केशव ज्या स्थळीं बसला होता त्या जागेशीं भिडून उभे राहून व तो परमात्मा केशव आहे ही ओळख टाकून त्याला एखाद्या प्राकृताप्रमाणें लेखून ते विचारूं लागले कीं, ' अरे, हे मरणधर्मी मनुष्या, तूं कोण आहेस, कोणाचा आहेस ? बरें तुझें इकडे येणें कोठून झालें व अशा या हरिणांनीं व श्वापदांनीं युक्त, व्याघ्रादिकांनीं व पिशाचगणांनीं भरलेल्या, निर्मनुष्य व भयंकर गहन अरण्यांत तूं कां म्हणून आलास? तूं तर फार कोमल, निर्मल अंगाचा, कमलतुल्य नेत्रांनीं युक्त, कमलकांती व श्यामलवर्णी, केवळ लक्ष्मीचा साक्षात् पतिच म्हणजे ज्याला पाहून आमचे मनांत प्रेम उत्पन्न होतें असला दुसरा विष्णुच, येथें आल्यासारखा भासतोस, हें कसें ? याकरितां, हे मर्त्या, असल्या या घोर वनांत केवळ एकटा बसून ध्यानमग्न असा राहणारा तूं आहेस तरी कोण ? तूं का देव, कीं यक्ष, कीं गंधर्व, कीं किन्नर, कीं इंद्र, कीं कुबेर, कीं यम, कीं वरुण !—कोण ? तें बोल. कारण, हे मानदा, यांत खरें काय आहे तें जाणण्याची आम्हांस इच्छा आहे.

या प्रकारें त्या उभय पिशाचांनीं प्रश्न केला असतां, लांब लांब पावलें टाकणारा ( वामनावतारीं ) तो विष्णु त्यांना म्हणाला, " ज्यांचीं मनें ताळ्यावर आहेत असे मनुष्य मला ' क्षत्रिय ' असें म्हणतात. मी यदुवंशांत उत्पन्न झालों असून क्षात्रधर्मानें वागत असतों. आणि मी सर्व सज्जनांचें पालन व दुष्टांचें शासन करीत असतों. सांप्रत देव उमापति यांचें दर्शन घेण्यासाठीं कैलासास जाण्याचा माझा हेतु आहे. याप्रमाणें माझा सर्व वृत्तांत आहे. आतां तुम्ही मला सांगा कीं, तुम्हीं दोघे कोण आणि या ब्राह्मणाचे आश्रमांत तुम्हीं काय म्हणून पाऊल टाकलेंत. ही भूमि मोठी पवित्र असून येथें अनेक ब्राह्मण राहत असतात व हिला ' बदरी ' अशी संज्ञा असून क्षुद्र प्राण्याचा हिच्यांत प्रवेश कोठेंही नसतो. केवळ जे तपोयुक्त तपस्वी असतील अशांचें हें आवडतें निवासस्थान आहे. त्याचप्रमाणें सिद्धही येथें राहतात. परंतु मांसाहार करणारे कुत्रे किंवा पिशाच्च हे कधीं आढळत नाहींत. याकरितां येथें या मृगांना मारूं नका. ही कांहीं मृगयेची जागा नव्हे. या भूमींत क्षुद्र, कृतघ्न किंवा नास्तिक यांनीं पाऊल देखील टाकावयाचें नाहीं. मी या भूमीचा रक्षक आहें, हें तुम्हांस उघड सांगतों. आणि या माझ्या सूचनेचा जर तुम्ही अतिक्रम कराल तर तुम्हांस मी तत्काळ हरप्रयत्नानें शासन करीन, हें खूब समजून रहा. तर तुम्ही दोघे कोण, आलां कुठें, बरोबर हा सैन्याचा घोळका कोणाचा, तें सांगा; व येथें ऋषिलोक वसती धरून आहेत, यास्तव इकडे फिरकूं नका. कारण, त्या योगानें तपस्व्यांच्या तपाला आडकाठी येईल. याकरितां तुम्हीं या स्थळींच खुंटून रहा आणि मग काय बोलणें असेल तें खुशाल बोला. असें न कराल तर मीं तुमचें तोंडच्या शब्दांनीं व वेळ पडल्यास शरीरबलानेंही निवारण करण्यास चुकणार नाहीं, हें ध्यानांत धरा.

वैशंपायन सांगतात:—अशा प्रकारें श्री-

विष्णूनें प्रश्न केला तेव्हां ते दोघेही पिशाच्च तत्काळ बोलूंच लागले. त्यांपैकीं एक दीर्घ भुजांनीं युक्त मोठा घोर पिशाच्च होता, तो अगदीं त्याचे मनांतली गोष्ट बोलला.

पिशाच म्हणाला:—" जगताचा स्वामी व पालक जो आदिदेव, वरेण्य, पवित्र व निर्मल, सर्वव्यापक व दुःखहर्ता देव कृष्ण त्याला प्रथम वंदन करून मी आतां बोलतों. तूं मात्र एकचित्त हो आणि माझें बोलणें ऐक. तुझी इच्छा असेल तर नीट कान दे, म्हणजे तूं विचारिलेंस तें सर्व कांहीं मी सांगणार आहें. आणि तूं तें तसेंचे तसेंच लक्षांत घे. मी असला हा दिसण्यांत भयंकर, मांसावर निर्वाह करणारा, विद्रूप, घोर, प्रत्यक्ष दुसरा मृत्युच असा पिशाच आहें. माझें नांव घंटाकर्ण असें आहे; आणि हा माझा सख्खा धाकटा भाऊ आहे. पराक्रमानें मी काळाचाही काळ आहें. आणि ही जी तुला शिकारीची मोठी तयारी दिसत आहे ही सर्व श्री विष्णूचे पूजेकरितां आहे. हें सर्व सैन्य माझेंच हाताखालचें आहे व हे कुत्रेही माझेच आहेत. मी भूतगणांनीं सेवित अशा कैलास नामक महापर्वतावरून इकडे आलों. माझ्या पापाचरणामुळें मला हा पिशाच देह प्राप्त झाला असतांही अक्षय विष्णूची सतत मी निंदा करीत असें. आणि या विष्णूचें नांवदेखील माझे कानांत घुसूं नये असा विचार करून मी या माझे दोन्ही कानांशीं घणघणणाऱ्या घंटा बांधून ठेविल्या[1] आहेत. असो. मी कैलासनिवासी जो वृषभध्वज शंकर त्याला गांठून व त्याची आराधना करून त्या कल्याणरूप महादेवाची बहुत स्तुति केली, त्या स्तुतीनें प्रसन्न होऊन तो हर मला म्हणाला, 'वर माग' त्या वेळीं मी त्या महादेवापाशीं मुक्ति मागितली. मी मुक्ति मागतों आहें असें पाहून तो त्रिनेत्र मला म्हणाला, 'बाबारे' कोणासही मुक्ति देणें हा निखालस विष्णूचा अधिकार आहे. याकरितां तूं बदरीवनांत जाऊन तेथें नरनारायणाश्रमांत जनार्दनाची आराधना करून त्या गोविंदापासून मुक्ति मिळव (तुला मिळेल). या प्रकारें त्या शूलधारी देवाधिदेवानें सांगून मला तेथून जाण्याची आज्ञा दिली. तेव्हांपासून तो गरुडध्वज गोविंद यालाच आपलें परम दैवत असें समजून व वाटेंत त्याचीच प्रार्थना करीत मी सांप्रत या मुक्तिदायक स्थळीं येऊन पोंचलों आहें. तुला उत्सुकता असेल तर आणखीही माझा एक कार्यभाग आहे, तो ऐक.

पश्चिम समुद्राचे कांठीं द्वारावती नामक नगरी आहे. ती समुद्राचे लाटांत सांपडलेली असून यादव व वृष्णि यांनीं गजबजलेली आहे. त्या पुरीवर पुरुषश्रेष्ठ विष्णु राज्य करीत आहे. लोककल्याणार्थ त्या द्वारकापुरींत वस्ती करणाऱ्या त्या हरीला पाहण्याकरितां, हे मऱ्या, आम्ही आपल्या या सर्व अनुचरांसह आज बाहेर पडलों आहों, समजलास? आणि आजचे आज आम्ही सर्वेश्वर विष्णूचें प्रत्यक्ष दर्शन घेणार, तो विष्णु लोकांचें उत्पत्तिस्थान असून जगताचा पति व कर्ता, हर्ता आणि पालकही तोच आहे. तोच हरि सर्वांचा मूळ उगम, सर्वांचा कारण, सर्वांचा कर्ता, व सनातन स्वरूपानें पुराणपुरुष, अखिल प्रभूंचाही प्रभु आहे. अशा त्या वरदात्या, सर्वश्रेष्ठ हरीला पाहण्यासाठीं आम्हीं आज कंबर बांधिली आहे. ज्याचे प्रसादामुळेंच हें सकल जगत्, मनुष्यादि प्राणी, गंधर्व, महोरग इत्यादिकांच्या समूहानें भरून गेलें, अशा त्या जगद्योनि, स्वयंभु, जनार्दन हरीला पाहण्याचे खटपटींत आम्ही सांप्रत

[1] म्हणूनच त्याला 'घंटाकर्ण' हें नांव दिलें आहे.

आहों. ज्याचे उदरांतून हें सर्व विश्व प्रकट होतें व कल्पांतीं त्यांतच पुनः लीन होतें व प्रत्यक्ष ज्याचे आज्ञेंतच तें सदा चालतें, त्या पुरुषश्रेष्ठ हरीला आम्हीं पाहूं. जो देव उत्पत्तिकर्ता, तसाच पालनकर्ता व संहारकर्ता आहे, तोच हरि. तर, अशा त्या सर्वांत प्रथम, पुरातन, शक्तिमान् व अविनाशी व सनातन अशा भुवनपति हरीला आम्हीं भेटूं. ब्रह्मदेवाचा जनक, भुवनांचा पालक आणि या पृथ्वीचा कर्ता, असा तो हरिच आहे. त्याची मति योगबलानें सर्वदाच विशुद्ध असते. पण अशाचा आम्हीं द्वेष केल्यामुळें आमची मात्र बुद्धि कलुषित झाली आहे. याकरितां आम्हींही योगाचा आश्रय करून त्याला प्राप्त करून घेऊं. तो जगत्पति या अखिल विश्वाला ( कल्पांतीं ) गिळून आणि मग बालरूप घेऊन प्रत्यक्ष सकल ब्रह्मांडाचा निवास असूनही लहानशा वटपत्रावर पाय चाळवीत व हात हालवीत निजतो. त्याच्या उदरांत पुराण मार्कंडेय मुनीला प्रवेश मिळाला असतां तेथें भगवन्मायेचे प्रभावानें बाहेरल्याप्रमाणेंच सकल विश्व त्याला दिसूं लागलें. असा कांहीं तो मोठाच चमत्कार झाला. तो महात्मा पुरुषोत्तम सृष्टयुद्भवापूर्वी हें सर्व विश्व पोटांत सांठवून आपण समुद्राच्या ओघावर निजतो व देवी लक्ष्मी हातांत चामर घेऊन त्याची सेवा करीत असते. त्या प्रभूच्या नाभीपासून सुवर्णकांतीचें, पत्रांसह कमल उत्पन्न झालें व तेंच विस्तीर्ण कमळ जगताचे प्रथम उत्पत्तिसमयीं, लोकेगुरु जो ब्रह्मदेव त्याचें जन्मस्थान झालें मुनींनीं ज्याचें यश गाइलें आहे, असा तो महा भूपति पुराण कालीं वराहाचें रूप घेऊन महा मेघाप्रमाणें गर्जना करीत आपले दाढेवर ही विस्तीर्ण पृथ्वी भक्कम बसवून उचलिता झाला. आम्हीं जो फार जुनाट, समर्थ, सकलकर्ता, सकलसाक्षी, यज्ञस्वरूपी व यज्ञपति पुरुषोत्तम, जगन्नाथ हरि त्याला पाहण्यास उत्कंठित झालों आहों. या पुराणदेवाचें कोणी नाना दृष्टीनें वर्णन करितात. कोणी अभेद दृष्टि ठेवून एकरूपानें वर्णन करितात. तथापि ज्याचें सत्य स्वरूप उपनिषदांनीं निश्चित केलें आहे, अशा त्या ईशाला भेटण्यास आम्ही उद्युक्त झालों आहों. श्रुति, स्मृति, न्यायशास्त्र इत्यादि भिन्न पंथांत पडलेले लोक त्याचें कधीं एकात्मतेनें, कधीं अनेकात्मतेनेंही वर्णन करितात; परंतु ज्याला पुरातन विद्यावेत्ते जन्महीन आत्मा असेंच म्हणतात, त्या ईशाला साक्षात् करण्यासाठीं आम्ही आज सज्ज झालों आहों. ज्या सर्वगामी, प्रकाशरूप, जन्महीन, सर्वश्रेष्ठ, व स्तुत्यर्ह वरदात्याला पुरातन मुनि ‘ एकान्त तत्व ’ असें म्हणतात त्या जनार्दन हरीला पाहण्यासाठीं आम्ही सांप्रत कृतप्रतिज्ञ आहों. ज्या जगत्पतीचे ठिकाणीं हें सर्वही विश्व उत्पत्तिसमयीं सूत्रांत मणी ओंविल्याप्रमाणें ओंविलें गेलें आहे, त्याचें साक्षात् दर्शन करण्यासाठीं आम्हीं या क्षणीं येथें मिळालों आहों. यापरतें दुसरें काय सांगूं ? हे मृत्युशीला, आम्ही येथून आतां दुसरे कोठें तरी जातों, तूंही तुला वाटेल तिकडे यथेच्छ जा; आमची तुला आडकाठी नाहीं, याकरितां मनास रुचेल तिकडे चालता हो. आतां ऐन मध्यान्ह समय आहे, याचा मात्र विचार करीत बसूं नको.

असें बोलून तो विकटतोंड्या भयंकर पिशाच सपाट जागीं पुष्कळसें रक्त पिऊन व मनसोक्त मांसराशी भक्षण करून, व विद्वान् असल्यामुळें भक्षणदोषनिवृत्त्यर्थ उदकस्पर्श करून, आणि तेथेंच बाजूला बरोबरचें शिकारीचें सर्व साधन ठेवून देऊन, त्याचप्रमाणें शिकार धरण्यासाठीं केलेली

आंतड्याच्या तांतीची मोठी भयंकर व विस्तीर्ण वागर ( जाळें ) तेथेंच नीट ठेवून देऊन, दर्भयुक्त आसन मांडून व तें उदकानें शिंपून आणि मोठ्या यत्नानें बरोबरचे ते सगळे कुत्रे दूर लावून देऊन, स्थिरासन घालून कुत्र्यांचा पालक असूनही समाधि साधण्याविषयीं यत्न करूं लागला. मग त्या कालीं एकाग्र चित्त करून व केशवाला नमस्कार करून तो घोर पिशाच त्या भक्तवत्सल केशवाचे उद्देशानें पुढील मंत्र म्हणूं लागला, तो मंत्र, नमो भागवते वासुदेवाय इ० त्या चक्रधर भगवान् वासुदेवाला नमस्कार असो. हे बुद्धिमंता गदाधरा वासुदेवा, तुला नमस्कार असो. त्या प्रभावशाली व सर्वव्यापि नारायणाला ॐकारपूर्वक नमस्कार असो. हे केशवा, तुझे नामसंकीर्तनानें माझी चित्तशुद्धि होवो. आणि असलें हें घोर व कष्टमय पिशाचजन्म मला नसो. हे गोपते, तुझ्या नामस्मरणसामर्थ्यानें मला देवदूताचा जन्म येवो. हे समर्था, तुझ्या चक्राच्या आघातानें माझा हा सांप्रतचा देह नष्ट होवो. आणि पुनः मला जन्मच न येवो एवढी माझी प्रार्थना आहे. तूं याचकांचा कल्पवृक्ष आहेस, व सर्वांस सर्व कालीं सर्व कांहीं देणारा आहेस. हे देवेशा, माझा जेथें जेथें मिळून जन्म होईल तेथें तेथें तूं माझ्या हृदयांत अस; ही माझी दुसरी प्रार्थना आहे. ( पुनः जन्म झाला असतां ) हे देवा, तेथें तुला वारंवार माझा नमस्कार घडो आणि माझी एवढी मागणी माझे पदरांत निर्विघ्न पडो. माझा तुला अखंड नमस्कार असो. मला ज्या काळीं मरण येईल त्या वेळीं माझा स्मृतिलोप होऊं देऊं नको. ( तुझें स्मरण मला राहूं दे ). हे देवा, मला अशी प्रेरणा कर कीं, जिच्या योगानें प्रतिदिनीं आणि प्रतिक्षणीं माझें चित्त तुझे ठिकाणीं स्थिर राहील. नाहीं तर, हा दुष्ट आहे, हा पिशाच आहे, यावर कसली दया करावी, अशा तऱ्हेचें मनांत आणशील, पण तसें करूं नको. हे प्रभो, हे देवा, हा आपला भक्त आहे असें मजबद्दल आपल्या मनांत वागव. हे भगवंता, हे समर्था, तुला नमस्कार असो. माझे हातून दुसऱ्याला पीडा प्राप्त न होवो. आणि आतां माझीं हीं इंद्रियें आपआपल्या विशिष्ट विषयांत व्यापृत होऊं देऊं नको. आणि, हे केशवा, अंतसमयीं तर तुझ्या कृपाबलानें माझें हें घ्राण पृथ्वीप्रतें जावो,

१ या एकाच श्लोकांत एकाच पुरुषाला उद्देशून " तस्मै आणि तुभ्यं " असा तृतीय व द्वितीय पुरुषीं प्रयोग आहे. हा व्याकरणाला जरी असंमत आहे, तरी भाविक भक्ताला प्रेमभरांत क्षम्य आहे. प्रथम परोक्ष. मग अपरोक्ष आणि मग एकरूप किंवा तद्रूप किंवा–तस्यैवाहं, तवैवाहं, त्वमेवाहं या ज्या प्रेमाच्या पायऱ्याच आहेत.

१अंतकालेच मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरम् ।भगवद्गी.

२ या ठिकाणीं कलकत्ता व लक्ष्मीव्यंकटेश्वर या प्रतींत " पृथिवीं पातुमे घ्राणं " याप्रमाणें, या सर्व श्लोकांत "यातु"चे ठिकाणीं 'पातु' असे पाठ आहेत. परंतु ते केवळ लेखकप्रमादानें 'य,' व, 'प' यांमधील भेद लोपून झाले असावे. व तपासनिसांसही 'यातु,' यांतील रहस्य कळले नसून त्यांनीं ते शुद्ध मानले असावे. परंतु एक तर पुढील श्लोकांत हीच विचारसरणी कायम असून 'श्रोत्रमाकाश मप्येतु मनः प्राणंच गच्छतु,' यात 'एतु' आणि 'गच्छतु' हे गमनार्थकच म्हणजे " यातु " या शब्दाचेच पर्याय वापरले आहेत. व दुसरें, याचे पुढील श्लोकांत "जलेमां रक्षता नित्यं " इ० त ' रक्षणाची ' पृथक् प्रार्थना आहे. ती ' पातु ' असा पाठ पत्करिल्यास द्विरुक्त ऊर्फ फाजील होते, यास्तव आमचे जवळील लेखी पोथीचा " यातु " हाच पाठ समंजस समजून आम्हीं पत्करिला आहे. आतां "पृथिवीं यातु मेघ्राणं" इत्यादिकांचा मतलब असा काहे कीं, पंचीकरणाप्रमाणें ' घ्राण ' हा पृथ्वी या महाभूताचा अंश आहे. इ० इ० व याचमुळें मनुष्य मेला असतां संस्कृतांत 'पंचत्वंगतः' म्हणजे 'पांचाचे अवस्थेला गेला' 'किंवा-पुनः पंचतत्वांत मिळाला " असें म्हण याची चाल आहे. तीस अनुसरून ही घंटाकर्णाची प्रार्थना आहे.

माझी ही रसना ( जिव्हा ) सृष्टांतील जल या महाभूतांत मिसळून जावा. माझा हा नेत्र ( हे नेत्र ) सूर्यांत मिळोत. माझी ही स्पर्शशक्ति वायूशीं एकरूप होऊन जावो. हें श्रवणेंद्रिय आकाशांत लीन होवो आणि मन हें प्राणवायूंत मिसळून जावो. हे हरे, जल माझें सतत रक्षण करो. पृथ्वी ही माझें पालन करो, हे सूर्यतुल्य तेजस्वी विष्णो, सूर्यही माझें रक्षण करो, हे जनार्दना, वायु आणि आकाश यांनींही माझें दुःखापासून संरक्षण करावें. हे देवा, हें माझें मन सर्वगामी होऊं नये. ( होऊं देऊं नको. ) आणि विषयांतरापासून राख—किंवा—शब्दादि विषय आणि भेदबुद्धि यांपासून तें सुरक्षित ( अलिप्त ) रहावें, असें कर. कारण मन भयंकर तऱ्हेनें विपरीत झालें म्हणजे तेंच पुरुषाचे घातास कारण होतें व परपीडनरूप पातकांचे ठिकाणीं तें पुरुषास प्रवृत्त करितें, असा नेहमींचा अनुभव आहे. याकरितां, हे देवा जनार्दना, असलें हें मन वारंवार तूं रक्षण कर. माझे मनांत गढूळपणा नसावा—तर माझें मन स्वच्छ असावें ( असें कर. ) कारण, मनुष्याचें जें कलुषित चित्त तेंच त्याला नरकांत पाडीत असतें. ( प्रक्षालनादिकांनीं ) बाह्य इंद्रियें मलरहित होतात. परंतु, आंतर इंद्रिय जें मन तें जर गढूळ असेल, तर हीं बाह्यतः स्वच्छ असणारीं इंद्रियें कांहीं कामास येत नाहींत. हे केशवा, एकादा पुरुष केवळ मुठींत एकादी ( गोमूत्रासारखी ) पवित्र वस्तु धरून बसेल किंवा बाह्येंद्रिय—प्रक्षालन करील, तर अशानें त्याचें काय कार्य कसें होणार? त्याचा हा बाह्येंद्रियांसंबंधानें नियम फुकट आहे. याकरितां, हे जनार्दना, सर्व प्रयत्न करून माझें एवढें चित्त तूं सांभाळ. हे जनार्दना, हा इंद्रियसमूहही मोठा दांडगा आहे. ( हा मनाला ओढीत असतो, यासाठीं ) याला दूर सार. हे जगन्नाथा, माझी द्वाड वाणी परनिंदेपासून राख. हे जनार्दना, त्याचप्रमाणें माझें हें मन परदारा

१ अहंकार हा अपानवायूचा अंश व मन, बुद्धि, चित्त हे, प्राण, उदान, समान, यांचे अंश आहेत. ज्ञानदेवकृत पंचीकरण.

२ मुळांत बरेच ठिकाणीं तृतीय पुरुषीं एकवचनीं 'रक्षतां' असा आत्मने पदीं प्रयोग आहे. परंतु रक्ष् हा धातु प्रायः परस्मैपदींच असतो.

३ " न मनः सर्वगं देव रक्षतां विषयांतरे " या ठिकाणीं 'सर्वगं' याचा अर्थ चतुर्धरांनीं 'परमात्मगतं' असा केला आहे. पण इतकें आडवळण घेऊन अर्थ काढीत बसण्याचें कारण दिसत नाही. त्याचें मन जर 'सर्वगं' म्हणजे परमात्मगामि असतेंच तर मग त्याला मागावयाचें उरलेंच नव्हतें. यास्तव इतक्या आडरानांत शिरून अर्थ काढण्यांत आह्मांस स्वारस्य दिसत नाहीं. त्याचप्रमाणें 'विषयांतर' या पदाचाही अर्थ 'सर्वगं' पदाचे अर्थाइतका आडमार्गी नाहीं; तथापि, अम्मळ डोकें चोळूनच चतुर्धरांस काढावा लागला आहे, तो काढण्यांत मात्र त्यांच्या भेदक दृष्टीची तारीफ आहे. परंतु हेही श्रम अस्थानीं आहेत, असें आमचे अल्प मतीला वाटतें. आमचे मते चतुर्धरांसारखें माराकुटींत न पडतां हा श्लोक अल्पशा अध्याहारानें लावितां येतो.

मूळ श्लोकार्ध 'न मनः सर्वगं देव रक्षतां विषयांतरे' अयि देव, सर्वगं मनः ( भवान् ) रक्षतां, (यथा) विषयांतरे नस्यात्. म्हणजे हे देवा, हें माझें बारा मुलख भटकणारें मन तूं सांभाळ, कीं जेणेकरून तें ( त्वद्व्यतिरिक्त ) अन्य विषयाचे ठिकाणीं जाणार नाहीं. याहीपेक्षां दुसरी एक तोड आहे. चतुर्धरांनीं घेतलेलेच पदार्थ जरी घेतले, तरी त्यांनीं मन हें कर्तृ, व 'विषयांतरे' हें कर्मपद मानिलें आहे. पण त्याने 'रक्षताम्' हें रूप एकवचनीं मानावें लागतें. पण 'रक्ष' हा परस्मैपदी असल्यानें हें फारसें ठीक नाही. याकरितां याचा अन्वय कसा करावाः—

अयि देव, विषयान्तरे ( प्र० द्वि० ) सर्वगं मनः न रक्षताम् म्हणजे शब्दस्पर्शादि नानाविध विषय व अन्तर म्हणजे भेदबुद्धि हीं दोन्ही या सर्वगं (सर्वः शर्वः शिवः स्थाणुः—विष्णुसहस्रनाम )—सर्व म्हणजे विष्णु त्याचे ठिकाणीं ग म्हणजे गेलेलें किंवा असलेलें जें माझें मन त्याला न राखोत, म्हणजे त्याला आपल्या ताब्यांत न ठेवोत. ( कारण त्यांचे ताब्यांत गेलेलें मन घाताला कारण होतें. )

व परधन यांपासून सांभाळ. हे केशवा, तुझे प्रसादानें माझी सर्वत्र दयादृष्टिच असावी. तुझेच ठिकाणीं माझी अढळ भक्ति असावी व भूतमात्राचे ठायीं दया असावी. फार बोलण्यांत काय हांशील आहे? माझें एवढें वाक्य ऐक म्हणजे झालें. हे देवदेवेशा जनार्दना, सुख, दुःख, प्रेम, भोजन, गमन, जाग्रति, स्वप्न इत्यादि हरएक प्रसंगीं माझें मन तुझे ठायीं गढलेलें राहूंदे."

याप्रकारें बोलत असतां तो घोर भगवद्भक्त पिशाच—जो केवळ जातीनेंच हीन होता मनानें नव्हता—तो समाधिमग्न झाला. तो मांसभक्षी पिशाच आपला देह आंतड्यांचे बंधांनीं दृढ आंवळून ठेवून, आणि मन संयमानें निश्चल करून, सुखांत बसला. समाधींत बसला असतां तो दुःखहर्ता, जगद्योनि, पितांबरधारी, एकाकार, निरामय, नित्य, शुद्ध, ज्ञानगम्य व सर्व देहधाऱ्यांचा उत्पत्तिहेतु, जो परमेश्वर त्याचें ध्यान करीत व आपले नासिकाग्राकडे दृष्टि देऊन सनातन ब्रह्माचा जप करीत, वातरहित प्रदेशांतील दीपाप्रमाणें तो स्थिर होता. प्रणव हा वाचक व ब्रह्म हेंच त्या पदाचें वाच्य, असा मनांत निर्धार करून तो वारंवार त्या प्रणवाचा जप करीत होता. आपलें चित्त एकाग्र व अखंड विष्णूचेच ठिकाणीं अर्पिलेलें असें करून मग तें विकल्परहित चित्त त्यानें हृदयाचे ठिकाणीं प्रविष्ट केलें. तेथें सुंदर दलांनीं युक्त अशा हृदयकमलाचे ठिकाणीं जगत्पतीची स्थापना करून तो मांसाशन महायोगी सुखांत त्रैलोक्यनिवासी सनातन विष्णूचें स्मरण व जप करीत बसला.

१ या ठिकाणीं आमचे लेखी पोथीचा पाठ-"जात्याहीनो न चित्ततः" असा आहे, तो फारच उत्कृष्ट आहे. इतर पाठ "जात्याहीनोऽन्याचित्तक" (कलकत्ता), व "जात्याहीनो न चिंतितः (मुंबई), व 'जात्याहीनो न चित्रकः' हा वांईकरांचा पाठ, हे गचाळ आहेत.

## अध्याय एक्यायशीवा.

—:०:—

### घण्टाकर्णास भगवत्प्राप्ति.

वैशंपायन सांगतातः—त्या कालीं भगवान् विष्णूंनीं पाहिलें, तों तो पिशाच स्वतःचेच ठिकाणीं स्थित असलेल्या शुद्ध व ज्ञानयुक्त अशा आत्मस्वरूपाचें चिंतन करीत असून सकृत् प्रणव ( ॐकार ) पठण करून एकांतांत निश्चित स्वरूपानें आत्म्याची प्रार्थना करीत आहे. तें पाहून तो जगन्नाथ हरि त्या पिशाचाचे पदरीं एवढा पुण्यसंचय कोठून असावा याचें कारण शोधूं लागला. मग त्याच्या त्या पुण्यकर्माचें कारण शोधून काढण्यासाठीं विष्णूनें बराच वेळ अंतर्यामीं ध्यान केल्यावर त्याचे असें लक्षांत आलें कीं, हा पिशाचच कुबेराच्या उपदेशावरून, भूतलावरच, अनेकवार "हे वासुदेव, हे कृष्ण, हे माधव, हे जनार्दन, हरे, विष्णो, भूतभावन, भावन, नरकारे, जगन्नाथ, नारायण, हे परायण ( परमगति )" याप्रकारें माझीं नावें अहोरात्र अखंड पढत असतो. तो झोंपेंत असो, जागा असो, उभा असो, चालत असो, खात असो, बोलत असो, मांसाचे डबे पार करीत असो, किंवा रक्त घोटीत असो, बहुतेक वेळपर्यंत अनेक मृगांना पीडा देत असो किंवा अनेक मृगांचा प्राणघात करो; तो प्राणघात करितांना, भोजन करितांना, जाग्रत् अवस्थेंत, निद्रेंत व कोणतेंही कार्य करीत असतां, त्या कर्माचा कर्ता मी ( वासुदेव ) असें मानीत असतो. आणि अशा याच्या ह्या उत्कट कर्माचाच आतां हा परिपाक होऊन याची हीं आत्मवृत्ति झाली आहे.

या प्रकारचा जगन्नाथाचा आपल्याशीं त्या

पिशाचाचे स्थितीविषयीं निर्णय ठरतांच, त्याविषयीं त्याचे मनांत प्रेम उत्पन्न झालें आणि त्या कालीं आपलें अनन्यभावानें चिंतन करणाऱ्या त्या पिशाचास त्या जगत्पतीनें आत्मरूपाचें दर्शन दिलें. हे भूमिपाला, तें दर्शन कोणते स्थलीं दिलें म्हणशील तर अनन्य चिंतनानें शुद्ध झालेलें जें त्या पिशाचाचें अंतःकरण त्यांत. अर्थात् त्यामुळें त्या पिशाचाला तत्काल स्वतःचे हृदयकमळाचे ठिकाणीं रेशमी पितांबर नेसलेला, पद्मनेत्र, श्यामवर्ण, शंख-चक्र-गदाधर, किरीट-कौस्तुभधारी, श्रीवत्सलांच्छनानें ज्याचें उरःस्थल झांकलें आहे असा, सर्वव्यापि व सर्व दुःखहर्ता वनमालायुक्त केशव दिसला. तेव्हां त्या सुंदर, नीलमेघकांति, गरुडवाहन, दुःखभंजन, चतुर्भुज, शुभवाचायुक्त, सर्वगामी, निश्चल, कल्याणरूप, आद्यंतहीन, सनातन, मायाधिष्ठान असून स्वतः निर्माय ( निष्कपट ) सत्ययुक्त, शुद्ध, बुद्धिगम्य, सर्वदा निर्मल अशा अनेकरूपधारी जगत्पति विष्णूला आपले हृदयभवनांतच प्रकट झालेला पाहून तो पिशाच तसेच डोळे झांकलेले धरून " आपण कृतार्थ झालों " असें आपणापाशीं मानिता झाला. तो मनांत म्हाणाला, तो सर्वगामी कल्याणमय हरि, विष्णु आज मी प्रत्यक्ष पाहिला. बाकी त्या हरीनें मजवर कृपा केली म्हणूनच मला त्याला पाहतां आलें. असो. जन्मास येऊन जें कांहीं कर्तव्य तें आज माझें सिद्ध झालें. याउपर आतां मला करावयाचें असें तें काय उरलें आहे? आज माझे हृदय-ग्रंथींचा उच्छेद झाला, इंद्रियें माझे आधीन होऊन राहिलीं व हरिस्मरणाबरोबर मनही बहुधा माझे अंकितच होऊन बसलें, असें मी समजतों. माझ्या इच्छाही दूर झाल्या आणि सर्वप्रकारें माझें चित्त प्रसन्न झालें आहे व मी या माझ्या बरोबरच्या पिशाच मंडळींतून सुटलों. हा जो माझा धाकटा बंधु आहे तोही मजप्रमाणेंच श्रीहरीचा भक्त आहे. त्या अर्थीं तोही कालमानानें पिशाचयोनींतून सुटून श्रीविष्णूशीं एकरूप होऊन जाईल.

याप्रकारें विचार करून तो आपले शरीराभोंवतीं असलेला आंतड्यांचा पाश तोडून, शरीर सम करून सर्व दिशांकडे पाहून हळूहळू क्रमानें पंचही प्राणांचा लय करून शेवटीं सुखानें भगत्स्वरूपांत प्रविष्ट झाला.

## अध्याय ब्यायशीवा.

—:०:—

### घंटाकर्णकृत विष्णुस्तव.

वैशंपायन सांगतातः—पुढें समाधीमध्यें ज्या प्रकारचें स्वरूप अवलोकन केलें होतें, त्याच प्रकारच्या स्वरूपानें युक्त असलेला जगताचा अधिपति व पिता जो श्रीविष्णु त्याला अवलोकन करून तो मांसभक्षक राक्षस ' हा विष्णु, हा विष्णु ' असें म्हणाला. व पुनरपि, मीं समाधीमध्यें ज्या प्रकारचें ह्याचें स्वरूप अवलोकन केलें त्याच प्रकारच्या स्वरूपांत हा येथेंही दिसत आहे, असें म्हणून आनंदानें जणूं नाचत व हंसत पुनः पुनः तेंच वाक्य उच्चारूं लागला. तो म्हणाला, " शार्ङ्ग नांवाचें धनुष्य, बाण, चक्र, आणि गदा धारण करणारा, हातांत ध्वजरूप चिन्ह असलेला, भात्यांतून बाण आकर्षण करण्यासाठीं भात्यावर हात ठेविलेला, ( विराटस्वरूपी असल्यानें ) हजारों मस्तकांनीं युक्त असलेला, सर्व देवतांचा अधिपति, जगाचें उत्पत्तिस्थान असा रथारूढ असलेला हाच तो श्रीविष्णु सर्व जगाला व्यापून असलेला व म्हणूनच विश्वाचा आत्मा, विजयशील, जगताचा अधिपति, सर्वांस आधिभूत, ( कूटस्थ असल्यामुळें ) जीवरूपी चैतन्याहून श्रेष्ठ, सार्वकालिक सत्ता

असलेला, जो विश्वाचा कर्ता तोच हा श्रीविष्णु. ह्याच प्रकाशमान् अशा श्रीविष्णूच्या दोहों स्तनांच्या मध्यभागीं, ज्याच्या स्वच्छ कांतीनें (सृष्टीच्या आरंभीं) हें जग, ज्याप्रमाणें चंद्राच्या योगानें रात्र सुशोभित दिसते,त्याप्रमाणें शोभत होतें, तो कौस्तुभ संज्ञक रत्नरूपी दीप वास्तव्य करीत आहे. ज्यानें प्रत्यक्ष वराहस्वरूप धारण करून आपल्या दाढेनें पृथ्वीला जलाच्या राशींतून वर काढिली, तोच हा श्रीविष्णु. वामनाचें स्वरूप धारण करून भयंकर पराक्रमी अशा बलीला बलात्कारानें बद्ध करून ज्यानें इंद्राला स्वर्गाचें राज्य दिलें व त्यामुळें ऋषींनीं भक्तिपूर्वक ज्याचें स्तवन केलें तोच हा श्रीविष्णु. ह्या श्रीविष्णूनें[1] दाढांमुळें भयंकर दिसणारें प्रचंड नरसिंहस्वरूप धारण केलें आणि संग्रामामध्यें दैत्यांचा फडशा उडवून सर्व जगाचा शोक नाहींसा केला. ज्यानें समुद्रमंथनाच्या वेळीं महासागरांत आपल्या एकाच हातानें मंदरनामक पर्वत धारण केला व सव दैत्यांचा पराजय करून ज्या महात्म्यानें इंद्राला अमृत अर्पण केलें, तो आज येथें माझ्यासमोर प्रत्यक्ष उभा आहे. सुप्रसिद्ध, भयंकर मधुकैटभ संज्ञक दानवांचा नाश करून जो समुद्रामध्यें सुखकारक अशा शेषशयनावर देवी लक्ष्मीसहवर्तमान शयन करितो; ज्याला विद्वान् लोक सर्वांस आदिभूत, सर्वांचा पोषक, सर्वांचा उत्पादक, (परमात्मस्वरूपी असल्यामुळें) सूक्ष्माहूनही सूक्ष्म व म्हणूनच ज्ञान होण्यास अशक्य आणि (जगत्स्वरूपी असल्यामुळें) स्थूलाहूनही अत्यंत स्थूल, विश्वव्यापक हरि असें म्हणतात; संहारकालीं ज्याच्या ठिकाणीं हें सर्व विश्व लीन होऊन रहातें व सृष्टीच्या आरंभीं ज्याच्यापासून पुनरपि तें निर्माण होतें, तोच हा श्रीविष्णु होय. ज्या जनार्दनाच्या इच्छामात्रानें या सर्व विश्वाची प्रवृत्ति झाली व होत आहे, तोच कल्याणकारक विश्वव्यापक परमात्मा यादवाधिपति श्रीकृष्णाच्या रूपानें या ठिकाणीं मजपुढें उभा आहे. जो भृगुकुलामध्यें उत्पन्न झाला असून जामदग्न्य (परशुराम) या नांवानें ज्याची प्रसिद्धि आहे, ज्यानें श्रीशंकराचें शिष्यत्व स्वीकारून धनुर्विद्या संपादन केली व प्रचंड अशा संग्रामामध्यें हत्ती, घोडे, रथ वगैरे बरोबर घेऊन चालून आलेल्या, हजार बाहू असलेल्या, कृतवीर्यपुत्र अर्जुनाला कुठाररूपी शस्त्रानें, शौर्यानें ठार केलें; ज्यानें एकवीस वेळ हा भूलोक निःक्षत्रिय केला व कुरुक्षेत्रावर जाऊन क्षत्रियांच्या रक्तानें पितरांचें तर्पण केलें. पुढें ज्यानें रघुकुलामध्यें जन्म घेतलें व राम असें नाम धारण केलें, सीतेच्या स्वरूपानें अवतीर्ण झालेली लक्ष्मी ज्याच्या बरोबर होती व लक्ष्मण हा ज्याचा अनुचर होता, ज्यानें समुद्रामध्यें सेतु बांधून आपल्या शीघ्रगामी बाणांनीं राक्षसाधिपति रावणाचा वध केला, ज्यानें बिभीषणाला लंकेचें राज्य दिलें व ज्यानें दहा अश्वमेध केले, तोच हा श्रीविष्णु. जो वसुदेवाच्या कुलामध्यें उत्पन्न झाला व म्हणूनच ज्याला वासुदेव असें म्हणतात; ज्यानें बलरामाच्या साह्यानें गोकुलामध्यें क्रीडा केली; ज्यानें बालपणीं उताणें निजून पूतनेनें दिलेल्या स्तनाचें प्राशन केलें व त्या दैत्यस्त्रीला गतप्राण करून सुखानें वास्तव्य केलें. जो गोकुलामध्यें दुग्धपान करीत असे, व बहु दहीं

[1] येथें अवतारक्रमाचा व्यत्यास झाला आहे असें दिसतें. कारण, वराह अवतारानंतर नृसिंह अवतार व त्यानंतर वामनावतार असा क्रम आहे. पण, सर्वही प्रतींत अशाच प्रकारचा पाठ दिसतो. म्हणून त्या-चक्रमाचें भाषांतर केलेलें आहे, वस्तुतः यापुढें मधुकैटभ वधाचा वगैरेही वृत्तांत आल्यामुळें येथें अवतारक्रमाची विवक्षाच नाहीं, असें मानणें सयुक्तिक दिसतें.

भक्षण करीत असे, या अपराधामुळें रुष्ट झालेल्या मातेनें ज्याला दाव्यानें पोटाशीं घट्ट बांधिलें अशा स्थितीतच ज्यानें यमलार्जुनांचा ( जुळेवृक्षांचा ) ध्वंस केला; जो श्रीविष्णु गोकुलामध्यें क्रीडा करीत असतांना गोपींनीं त्याचें चुंबन घेतलें व त्याचेकडून स्तनपान करविलें. हा श्रीकृष्ण गोकुलामध्यें वास्तव्य करणाऱ्या गोपांसहवर्तमान वृंदावनामध्यें वास करीत असतां, हे राजा, तेथें त्यानें अश्वाचा वध केला, ( व अत्यंत तेजस्वी असल्यामुळें ) जो सूर्याप्रमाणें शोभूं लागला; गोपबालकांनी सेवा केलेल्या ज्या श्रीविष्णूनें कालिय नामक नागाच्या फणीवर नृत्यरूपी क्रीडा केली आणि यमुनेच्या प्रचंड डोहामध्यें ज्या जगन्नायकानें सर्पाधिपति कालियाचें मर्दन करून आपलें आत्यंतिक शौर्य प्रकट केलें; ज्यानें तालवनामध्यें ताडांच्या फलाबरोबरच भयंकर अशा धेनुक दैत्याचा छेद केला व त्यामुळें गोपांना आश्चर्यचकित करून सोडिलें; ज्या महाबुद्धि श्रीकृष्णानें मेघ आले असतां प्रचंड सामर्थ्यानें गोवर्धन पर्वत उचलून धरिला व त्यामुळें, इंद्राच्या सामर्थ्याची फजिती उडवून गोप गोपी आणि गोसमुदाय यांना आनंदित केलें; जो मायेनें मनुष्यदेह धारण केलेला ऐश्वर्यसंपन्न प्रभु गोपींच्या हृदयावर विहार करून अधरपान करीत असे; जो श्रीकृष्ण लीलेनें कामी बनून रात्रीं एकांतांत मुखाचें चुंबन घेत गोपींसहवर्तमान सुखानें शयन करीत असे. आणि जो त्या वेळीं ( लीलेनें ) कामी बनून स्त्रियांच्या वक्षस्थलावर शयन करून अधरपान करीत असे; जो अक्रूराच्या बोलावण्यावरून मथुरेकडे जाऊं लागला व यमुनेच्या जलामध्यें अक्रूरानें नागलोकामध्यें वास्तव्य करणाऱ्या ज्या ईश्वराचें अर्चन केलें, तोच हा श्रीविष्णु. तेथून ( यमुनेवरून ) पुढें जात असतां मार्गामध्यें एका भयंकर धोब्याचीं सर्व वस्त्रें काढून घेऊन ज्या ईश्वरानें त्याला गतप्राण करून सोडलें व जो बलरामासहवर्तमान स्वच्छंदानें मथुरेकडे गेला तोच हा श्रीविष्णु. तेथें गेल्यानंतर अभीष्ट मनोरथ पूर्ण करणाऱ्या ज्या यदुकुलोद्भवानें एका मालाकारानें दिलेलीं अनेक पुष्पमाल्यें ग्रहण करून त्याला मोठा वर दिला आणि सुगंधयुक्त असें उटणें देणाऱ्या कुब्जा ( कुबडया ) स्त्रीस अत्यंत सौंदर्यसंपन्न करून सोडिलें. पुढें ज्यानें प्रचंड धनुष्य ग्रहण करून तें मध्येंच मोडून टाकिलें व प्रलयकालीन मेघाप्रमाणें प्रचंड सिंहनाद केला. तदनंतर ज्या ऐश्वर्यसंपन्न श्रीकृष्णानें कुवलयापीड नामक गजाचा दांत उपटून काढून त्याला ठार केला आणि ज्या भयंकर वीरानें कंसाच्या ठिकाणीं अनेक प्रकारची भीति उत्पन्न करून मल्लयुद्ध करण्याच्या जागीं नृत्य केलें आणि कंस पहात असतां त्याला न जुमानतां शत्रूंना ठार करणाऱ्या चाणूरनामक भयंकर मल्लास गतप्राण करून यादवांना आनंदित करून सोडिलें. व नंतर शत्रूच्या पक्षाचा संहार करणाऱ्या व आपल्या पित्याचा द्वेष करणाऱ्या कंसास ठार करून उग्रसेननामक यादवाला राज्यावर बसवून, संदीपनपुत्र काश्य नामक आपल्या गुरूकडे, ज्यानें गमन केलें व त्या महर्षीपासून सर्व विद्यासंपादन करून त्याचा नष्ट झालेला पुत्र त्यास आणून देऊन जो आपल्या ज्येष्ठ बंधूसहवर्तमान यादवांच्या मथुरानगरीकडे सत्वर निघून गेला; ज्या महाज्ञानी जगन्नायक श्रीकृष्णानें अत्यंत रेजस्वी नरकासुराशीं भयंकर संग्राम करून त्याचें प्राणहरण केलें आणि अनेक देवता, ब्राह्मण, ऋषि आणि वीर या सर्वांचें पालन केलें. तो सर्व जगताला सुख देणारा भगवान् श्रीविष्णु आज मीं अवलोकन

केला, यामुळें मी आज खरोखर धन्य झालों आहें. आतां माझें कर्तव्य अवशिष्ट राहिलें नाहीं. मला मोक्षप्राप्ति झालीच. कारण, ज्याला श्रीविष्णूचें प्रत्यक्ष दर्शन झालें त्याला मोक्ष म्हणजे अगदीं हातांतील पदार्थ होय. तो श्रीविष्णु आज या ठिकाणीं मला प्रत्यक्ष दिसत आहे, यावरून मी पूर्वजन्मीं धर्म संचित करून ठेविला आहे; हें खास. मला जें हे फळ मिळालेलें मी पहात आहें, तें त्याचेंच होय. मी सर्वथैव पुण्यवान् असून आतां माझ्या संसाररूपी बंधनाचा नाश होऊन गेला आहे. मी या श्रीविष्णूला आतां काय देऊं आणि आतां बोलूं तरी काय? हे श्रीविष्णो, मी आतां काय करूं? आपणाला इष्ट असेल तें सांगा.

वैशंपायन सांगतातः—राजा जनमेजया, याप्रमाणें बोलल्यानंतर त्या मांसभक्षक राक्षसानें अनेकवार प्रचंड गर्जना केली. आणि वांकडेंतिकडें हंसून, 'हे हरे, हे श्रीकृष्णा, हे यादवाधिपते, हे केशवा, असें म्हणत श्रीकृष्णाच्या समक्ष ( त्यानें ) नानाप्रकारें नृत्य केलें.

## अध्याय त्र्यायशींवा.

—:०:—

### घंटाकर्णमोक्ष वर्णन.

वैशंपायन सांगतातः—राजा जनमेजया, याप्रमाणें अस्ताव्यस्तपणें अनेकवार हांसून व सामर्थ्यानुरूप नृत्य करून नंतर त्या राक्षसानें त्वरेनें एका मृत ब्राह्मणाचें प्रेत घेतलें व त्याचे दोन तुकडे करून त्यांतील अतिशय भयंकर व हिडिस असें मांस काढलें, व कुरणाप्रमाणें वाढलेल्या केशांनीं युक्त असलेला त्यांतील एक तुकडा घेऊन त्यानें त्याजवर जलानें प्रयत्नपूर्वक प्रोक्षण केलें आणि तो एका अतिशय उत्कृष्ट पात्रामध्यें ठेवून त्यानें श्रीकृष्णाला नमस्कार केला. आणि हात जोडून लवून उभाराहून म्हटलें कीं, 'हे जगन्नायका प्रभो श्रीकृष्णा, हें तुजला योग्य अर्थात्, तुजसारख्यांनीं स्वीकार करण्यास लायक अशा प्रकारचें भक्ष्य मी तुला अर्पण करीत आहें. त्याचा तूं स्वीकार कर. हे विष्णो, आम्ही शक्तीच्या भारानें अगदीं वाकून गेलों आहों हें निःसंशय आहे. तूं माझा धनी आहेस आणि मी तुझा सेवक आहें व सेवक भक्तीनें जें अर्पण करील त्याचा धन्यानें स्वीकार केला पाहिजे. हें जें भक्ष्य मी अर्पण करीत आहें तें मी उत्कृष्ट प्रकारें ( संस्कार करून ) तयार केलेलें एका ब्राह्मणाचें ताजें आणि उत्तम प्रेत अर्थात् तज्जन्य मांस आहे. आम्हां राक्षसांना हें शास्त्रामध्यें अवश्यक म्हणून सांगितलेलें आहे. यास्तव, हे भगवन्, जर कांहीं दोष नसेल तर आपण याचा स्वीकार करावा." असें बोलून तो पुनश्च अस्ताव्यस्तपणें हंसला आणि ज्याला स्पर्श सुद्धां करणें योग्य नाहीं, अशा प्रकारचा तो प्रेताचा तुकडा श्रीकृष्णास देण्याची बुद्धिपूर्वक इच्छा करूं लागला. त्यामुळें, प्रसन्न होऊन श्रीकृष्णानीं आपल्या अंतःकरणांत त्याची वाहवा केली. आणि, अहाहा किती तरी प्रत्येक गोष्टीमध्यें मजवर याचें हें प्रेम! असें मनांत म्हणून यादवश्रेष्ठ श्रीकृष्ण त्याला म्हणाले. 'हे मांसभक्षका, पिशाचा, सर्व ठिकाणीं या मांसाचा उपयोग नाहीं, यास्तव तें मला देऊं नको. मजसारखे लोक उत्कृष्ट अशाहि ब्राह्मणाच्या प्रेताला स्पर्श करीत नसतात—धर्माभिलाषी प्राण्यांनीं ब्राह्मणाची सर्व प्रकारें पूजाच करणें योग्य आहे.—पण, घोरकर्म करणारे पिशाच ब्राह्मणाची हिंसा करण्याचा प्रयत्न करितात. परंतु ब्राह्मणांना ठार

करूं नये; कारण, त्यांची हिंसा नरकप्रद असते सारांश, आम्ही या मांसाला स्पर्शही करणें योग्य नाहीं. याविषयीं संशय नाहीं हे मांसभक्षका, जिच्या योगानें तुझें मन निर्मळ झालें आहे, ती तुझी भक्ति पाहून मला मात्र आनंद होत आहे. तुझे चित्ताची शुद्धि झाली, यामुळें मला संतोष वाटत आहे. निरंतर माझे नामाचा उच्चार केल्यामुळें तुझें अंतःकरण शुद्ध झालें आहे.'

असें बोलून भगवान् श्रीकृष्ण अंतःकरणांत अतिशय आनंद पावले. व त्या पिशाचाला पापापासून मुक्त करण्यासाठीं त्यांनीं आपल्या सुकुमार हस्तानें त्याच्या सर्व शरीरास स्पर्श केला. तेव्हां त्या पिशाचाचें स्वरूप मदनाच्या तोडीचें कांतिमान् बनलें. त्याचे केश लांब आणि कुरळे, बाहू दीर्घ, नेत्र सुंदर, बोटें, नखें, मुख आणि नासिका हीं प्रमाणबद्ध असलेलीं, नेत्र कमला सारखे व शरीरकांति कमलवर्णाप्रमाणें झाली. त्याच्या अंगावर कमलकेशराचे अलंकार निर्माण झाले, त्याच्या बाहूवर बाहुभूषणें होतीं व त्यानें बाजूबंद धारण केलेले होते आणि रेशमी वस्त्र परिधान केलें होतें. तो सत्वगुणसंपन्न आणि ज्ञानवान् बनलेला असून दुसरा इंद्रच प्रत्यक्ष आला आहे कीं काय असा दिसत होता. तो गंधर्वाप्रमाणें गायन करीत होता व योगसिद्धि झालेल्या सिद्धाप्रमाणें भासत होता. योग्यच आहे: कारण, प्रत्यक्ष श्रीविष्णूनें त्याच्या अंगावरून आपला सुकुमार हात फिरविला होता. अशा प्रकारचें स्वरूप कोणत्याहि कालीं कोणाचेंही बिनकूल नव्हतें. तर हे राजा, जनमेजया, अतिशय कठीण व म्हणूनच भयंकर, असें तप अनेकवार केलें असतांही ऋषींना अद्यापि त्या पिशाचाला मिळालेल्या शरीरासारख्या सुंदर शरीराची प्राप्ति होत नाहीं.

राजा, जगन्नायक श्रीविष्णूचा आश्रय करणारा असा कोण प्राणी आहे कीं ज्याला क्लेश भोगावे लागतील? निरंतर श्रीविष्णूचें ध्यान करणारा, त्याच्या स्तोत्रांचें पठण करणारा आणि त्याचा जप करणारा जो पुरुष त्याचें सर्वत्र कल्याणच होतें. हे पृथ्वीपते, त्याला मिळणार नाहीं असें काय आहे? असो; तदनंतर मूर्तिमंत जणु दुसरा मदनच अशा त्या पिशाचाला भगवान् म्हणाले: 'हे पिशाचा, तुला अक्षय्य स्वर्गवास घडेल. जोंपर्यंत स्वर्गामध्यें इंद्र आहे तोंपर्यंत माझ्या आज्ञेवरून तूं स्वर्गामध्येंच वास्तव्य करशील, इतरत्र असणार नाहींस. पुढें इंद्र स्वर्गांतून नष्ट झाल्यानंतर तुला माझ्या सायुज्याची प्राप्ति होइल. तुझा जो बंधु आहे तोहि जोंपर्यंत प्रस्तुतचा इंद्र आहे तोपर्यंत स्वर्गवासी बनून राहील. तुझें कल्याण होवो. तुझ्या मनांत असेल तो वर माग. तुला ज्या ठिकाणीं जें हवें असेल तें मी त्या ठिकाणीं देईन. त्याविषयीं शंका बाळगूं नको."

घंटाकर्ण म्हणाला, हे देवा श्रीविष्णो, अंतःकरणाचा निग्रह करून आपल्या व माझ्या या समागमाचें स्मरण करील त्याची आपल्या ठिकाणीं निश्चल भक्ति जडावी; व अंतःकरण शुद्ध व्हावें. तो केव्हांही पापी बनूं नये व त्याचें अंतःकरण मलीन होऊं नये; हाच वर मला द्या.

यावर, 'ठीक आहे; असें घडून येईल. आतां तूं इंद्राच्या घरचा पाहुणा हो. इंद्र तुझी

१ येथें मूळांत 'अंगद आणि केयूर असे' द शब्द आहेत. कोशावरून पहातां ते समानार्थक दिसतात. तथापि, कांहीं टीकाकारांना अंगद शब्दाचा अर्थ बाजुबंद असा केला आहे. यामुळें आम्ही तो येथें दिला आहे. मुळांत ज्या अर्थी दोन शब्द आहेत त्या अर्थी ते भिन्नार्थक असले पाहिजेत हें उघड आहे. म्हणू टीकाकारांचा हा अर्थ बरोबर दिसतो.

वाट पहात उभा आहे, तेव्हां तूं स्वर्गाला जा.' असें बोलून भगवान् श्रीकृष्णांनीं, पिशाचानें ज्या ब्राह्मणाचें शव आणिलें होतें त्या ब्राह्मणास पुनरपि जिवंत केलें. तेव्हां त्यानें स्तुति केली असतां श्रीकृष्णांनीं बहुमान करून त्याची रवानगी केली. नंतर तेथून ज्या ठिकाणीं योगसिद्धि झालेले अग्निहोत्री मुनी वास्तव्य करीत होते तेथें त्यानें गमन केलें.

हे जगत्पालका राजा, श्रीकृष्णाच्या आज्ञेवरून तो घंटाकर्ण स्वर्गवासी बनला. यास्तव, जर तुला अंतःकरणाची शुद्धि व्हावी अशी इच्छा असेल तर तूं हें आख्यान सदैव पठन कर. कारण, तसें केल्यानें तुझें अंतःकरण शुद्ध होईल.

---

## अध्याय चौऱ्याशींवा.

—:•:—

### कैलासयात्रावर्णन.

वैशंपायन म्हणतातः---तदनंतर भगवान् विष्णूनीं त्या महात्म्या पिशाचाचा सर्व वृत्तांत बरोबर रीतीनें पहिल्यापासून मुनींला सांगितला. तेव्हां तो ऐकून त्या सर्वांना फार आश्चर्य वाटलें. ते म्हणाले, आपल्या दर्शनानें ह्या पिशाचाला त्याच्या कर्माचें कितितरी उत्कृष्ट फल मिळालें!

पुढें रात्र निघून जाऊन सूर्योदय झाला असतां भक्तिमान् लोकांना प्रिय असणाऱ्या श्रीकृष्णाची त्या सर्व मुनींनीं पूजा केली, तेव्हां आनंदित होऊन श्रीकृष्ण गरुडावर आरोहण करून उत्कृष्ट अशा कैलासपर्वतावर निघून गेले. त्या वेळीं त्यांनीं "तुम्ही देखील तिकडे जा, असें त्या ऋषिश्रेष्ठांना सांगितलें. तदनंतर ज्या ठिकाणीं नियमनिष्ठ होऊन चांद्रायणादि व्रतांचें आचरण करणारे व सामर्थ्यसंपन्न असल्यानें सर्व जगतावर सत्ता असलेले सिद्ध तपश्चर्या करीत आहेत, ज्या ठिकाणीं प्रत्यक्ष कुबेर सर्वदा श्रीशंकराची उपासना करीत आहेत, जेथें हंसाचें वसतिस्थान असलेलें असें मानस सरोवर आहे, ज्याठिकाणीं गणांचें आधिपत्य संपादन करून नेहमीं श्रीशंकराच्या सांनिध्यास रहाणाऱ्या भृंगिरूटि कल्याणकारक अशा श्रीशंकराचें सेवन करीत आहेत; ज्या ठिकाणीं सिंह, सूकर व्याघ्र इत्यादि हिंसक प्राणी गज, हरिण इत्यादिकांसहवर्तमान वनामध्यें रममाण होऊन व परस्परांच्या हिताविषयीं आसक्त होऊन क्रीडा करीत आहेत, जेथें गंगादिक समुद्रगामिनी नद्यांचा उगम झालेला आहे, ज्या स्थलीं शंकरांनीं ब्रह्मदेवाच्या मस्तकाचा छेद केला, जेथें उत्पन्न झालेले मोठमोठे वेत पिशाचांना काठ्यांच्या कामीं उपयोगीं पडतात, जेथें भगवान् शंकर पार्वतीसहवर्तमान वास्तव्य करितात, ज्या ठिकाणीं ऋषींच्या प्रार्थनेवरून पूर्वीं हिमाचलानें आपली कन्या जगन्निर्माण करणारा व जगताचें पालन करणारा जो कल्याण कारक शिव त्याला अर्पण केली, जेथें शेकडों पाकळ्या असलेल्या कमलांनीं व शेवटीं एक कमळ उणें पडल्यामुळें स्वतःच्या नेत्रांनींही श्रीशंकराचें पूजन करून अनेक दिवसांनीं श्रीविष्णूनें सुदर्शनचक्र प्राप्त करून घेतलें, ज्या ठिकाणीं गुहांचा आश्रय करून सिद्ध, किन्नर क्रीडा करितात व आपल्या प्रियस्त्रियांसहवर्तमान उत्कृष्ट प्रकारच्या मद्याचें पान करून आनंदमग्न होऊन रहातात, रावण आपल्या सर्व बाहूंनीं ज्याला उचलून थकला, त्या कैलासनामक महापर्वतावर आरोहण केल्यानंतर यदुवंशज देवकीनंदन श्रीकृष्ण तपश्चर्या-

१ हरिस्ते साहस्रं कमलबलि माधाय पदयो। र्यदेकोने तस्मिन्निजमुदहरन्नेत्रकमलम्।

२ अमुष्य त्वत्सेवासमधिगतसारं भुजवनं बलात्कैलासेऽपित्वदधिवसतौ विक्रमयतः। महिम्न स्तोत्र.

करण्यासाठीं मानससरोवराच्या उत्तरतीरावर निघून गेले. व तेथें लीलेनें मनुष्यस्वरूप धारण करणाऱ्या पण वस्तुतः सर्वांचें नियमन करणाऱ्या व म्हणूनच जगन्नायक असलेल्या विश्वव्यापक व कल्याणकारक अशा श्रीकृष्णानें जटा वाढवून आणि वल्कलें परिधान करून तपश्चर्या करण्याचा निश्चय केला व वेदतुल्य अशा गरुडावरून खालीं उतरून पवित्र अशा भूमीवर उपवेशन केलें.

त्या जगन्नायकानें फाल्गुनमासीं तपश्चर्येला आरंभ केला आणि बारावर्षें तपश्चर्या करण्याचा निश्चय केला. त्या वेळीं तो शाकाहार करीत असे, एकनिष्ठपणें वेदाध्ययन करीत असे, आणि जप करीत असे. मनुष्यस्वरूप धारण केलेला तो भगवान् कोणत्या उद्देशानें तपश्चर्या करीत होता याचें ज्ञान आम्हाला पूर्णपणें नाहीं. कारण अशा समर्थ लोकांचे मनोगत कळणें फार कठीण आहे. असो; पिशाचाचें वास्तव्य असलेल्या त्या पर्वतावर जेव्हां श्रीकृष्ण उत्कृष्टप्रकारें तपश्चर्या करूं लागले, तेव्हां कश्यपपुत्र जो गरुड तो त्याना होमासाठीं इंधनें गोळा करून आणीत असे. सुदर्शन नामक उत्कृष्ट चक्र हें त्या वेळीं श्रीकृष्णासाठीं पुष्पें तोडून आणीत असे, पांचजन्य संज्ञक शंख हा सर्व दिशांचे ठिकाणीं राहून संरक्षण करीत असे, नंदक नांवाचें खड्ग प्रयत्नपूर्वक विपुल दर्भ आणून देत असे. कौमोदकी गदा ही श्रीकृष्णाची सेवा करीत असे. सर्व दैत्यांचें धाबें दणाणून सोडणारें, भयंकर असें जें शार्ङ्ग नांवाचें धनुष्य तें आपण होऊन सेवकाप्रमाणें श्रीकृष्णापुढें त्याच्या इच्छेनुरूप राहू लागलें. असो; त्यावेळीं लक्ष्मीपती भगवान् श्रीकृष्ण अग्नीचें पूजन करून अनेक समिधा व घृत वगैरे होमद्रव्याच्या योगानें सदैव होम करीत असत. याप्रमाणें केव्हां सर्वद्रव्यें एकत्र करून व केव्हां प्रत्येक निरनिराळें घेऊन होम करून त्यांनीं अग्नीची तृप्ति केली. अंतःकरणाचा निग्रह करून श्रीकृष्णांनीं एके महिन्यांत एकवारच भोजन केलें व दुसऱ्या पर्यायाचे वेळीं षण्मासांत एक वेळ भोजन केलें. पुढें एकावर्षांत कोणत्यातरी षण्मासांत एके वेळीं भोजन केलें. अशा रीतीनें बारा वर्षाला एक महिना कमी असेतोंपर्यंत त्या जगदीश्वर श्रीकृष्णानें तपश्चर्या केली व पुढें तें सर्व तप समाप्त करून विश्वव्यापक प्रत्यक्ष जगन्नायक श्रीकृष्ण अग्नीमध्यें होम करीत व वेदमंत्र, आरण्यक आणि प्रणव यांचें पठण करीत ध्यानांमध्यें आसक्त होऊन त्याठिकाणीं राहिले.

## अध्याय पंचायशींवा.

—:०:—

### इंद्रादिकांचें आगमन.

वैशंपायन सांगतातः—तदनंतर उत्कृष्ट अशा ऐरावतावर आरोहण करून इंद्र तपश्चर्या करणाऱ्या जगन्नायक विष्णूला अवलोकन करण्यासाठीं तेथें आला. त्यानंतर प्रत्यक्ष भगवान् यमहि महिषावर आरोहण करून व सेवक बरोबर घेऊन त्या पर्वतश्रेष्ठ कैलासावर प्राप्त झाला. वरुणही हंसावर आरोहण करून व बरोबर आपले परिजन घेऊन श्रीकृष्णाचें दर्शन घेण्यासाठीं कैलासशिखरावर गेला. त्यावेळीं त्याच्या मस्तकावर शुभ्र छत्र धरिलें असून त्याचे सेवक पांढऱ्या पंख्यानें त्याला वारा घालीत होते. याचप्रमाणें हे राजा, आदित्य, वसु, रुद्र, व दुसरेही सर्व देव श्रीकृष्णाला अवलोकन करण्यासाठीं आले. राजा, जनमेजया, सिद्ध, ऋषि, गंधर्व, यक्ष, किन्नर आणि नृत्य व गायन यांमध्यें कुशल असलेल्या सर्व अप्सराहि त्या ठिकाणीं आल्या.

याप्रमाणें कैलासावर आल्यानंतर पर्वत,

नारद, इतर सर्व ऋषिश्रेष्ठ आणि सर्व देवतांचे समूह यांचे नेत्र श्रीकृष्णाला पाहून आश्चर्यचकित होऊन गेले आणि म्हणाले, ' अहाहा, काय आश्चर्य आहे, पहा! योगी लोकांमीं ध्यान करण्याला योग्य असा सर्वांचा पिता प्रत्यक्ष श्रीकृष्णहि स्वतः तप करीत आहे खरोखर अशा प्रकारची गोष्ट पूर्वीं कधीं झालीहि नाहीं व पुढें कधीं होणारहि नाहीं. असें म्हणून ते देवतांचे समुदाय ही तपश्चर्या किती काळ चालली असेल असा विचार करूं लागले.

अस्तु; पुढें जगन्नायक श्रीकृष्णाचें तें सर्व व्रत पूर्णपणें समाप्त झाल्यानंतर त्या लोकांच्या कल्याणाची इच्छा करणाऱ्या श्रीकृष्णास अवलोकन करण्यासाठीं पार्वतीसहवर्तमान सर्वेश्वर श्रीशंकर त्या ठिकाणीं आले. त्यावेळीं त्यांच्याबरोबर गुह्यकासहवर्तमान त्यांचा प्रियमित्र कुबेर असून भूतांचे समुदायहि होते. त्या ऐश्वर्यसंपन्न श्रीशंकरांच्या मस्तकावर किंचित् पिंगट जटा रुळत असल्यामुळें त्यांच्या कांतीनें त्यांची मूर्ति आरक्तवर्ण दिसत होती. व त्यांनीं आपल्या मस्तकावर अर्धचंद्ररूपी अलंकार धारण केला होता. त्यांच्या हातांत बाण, खड्ग, दर्भ, कमंडलु, दीप, एक मोठा डिम आणि शूल; व त्यांच्या गळयांत रुद्राक्षाच्या माळा होत्या. त्यांनीं वृषभावर आरोहण केलें असून आपलें मुख श्रीपार्वतीच्या हृदयावर टेंकलेलें होतें. श्रीपार्वतीनेंही त्यांना आलिंगन दिलें होतें. त्यांच्या मस्तकावर गंगा होती. तिच्या जलप्रवाहानें त्यांच्या मस्तकावरील चंद्ररूपी अलंकार धुतला जात असे. मधून मधून शंकरही अनेकवार तिजकडे ( गंगेकडे ) दृष्टि फेंकीत असत. त्यांचें मुख भस्मरूपी अंगरागानें चर्चिलेलें होतें व त्यांच्या जटा मोठमोठ्या सर्पांनीं बांधलेल्या होत्या. तसेंच रुंडमाळेच्या योगानें त्यांना विशेष शोभा आलेली होती. ज्याला सांख्यशास्त्रामध्यें निमग्न होऊन राहिलेले लोक सर्वांस अधिभूत, सर्वश्रेष्ठ, व प्रमाणाहूनहि सर्वांहून अधिक असा पुरुष समजतात; कांहीं लोकांच्या मतें सर्व चतुर्विंशति तत्त्वें हीं ज्याचे विकार आहेत. कांहीं लोक ज्या अनादि महेश्वराला कणादसंज्ञक पुराणपुरुष असें म्हणतात, ज्या अविनाशी ईश्वरानें दक्षयज्ञाचा ध्वंस करून सर्व देवांचा धुव्वा उडवून दिला. ज्याला तत्वज्ञानी लोक सर्व प्राण्यांच्या वस्तुस्थितीचें ज्ञान असलेला, सर्व प्राण्यांचा नियंता, सर्व प्राण्यांची काळजी वहाणारा, सुंदर कांतिसंपन्न व विषमलोचन देवश्रेष्ठ, सर्वांमध्यें वास्तव्य करीत असल्यामुळें अनंतदृष्टि, कालस्वरूपी, चतुर्भुज, रोदनार्थक-रुद्र अशी संज्ञा असलेला, जगताचा अधिपति, कल्याणकारक, जाणतां येण्यास अशक्य, सर्वांस आधारभूत असल्यामुळें स्वतः आधारशून्य, सर्वांस अधिभूत, शांत, नित्य ( अविनाशी), सर्व स्वरूपी असल्यामुळें प्रावर्णस्वरूपी व म्हणूनच प्रावर्णरहित अर्थात् नग्न, नग्न अशा परिवारानें युक्त, सर्प धारण करणारा व अग्निप्रमाणें तेजस्वी असें समजतात; ते श्रीशंकर श्रीकृष्णाला अवलोकन करण्यासाठीं त्या-ठिकाणीं प्राप्त झाले.

राजा जनमेजया, पृथ्वी वगैरे या सर्व त्या श्रीशंकराच्याच मूर्ति होत. पृथ्वी, जल, अग्नि, वायु, आकाश, सूर्य, चंद्र आणि यजमान याच त्या श्रीशंकराच्या आठ मूर्ति होत. अस्तु

१ चोवीस तत्त्वें हीं तत्त्वें सांख्यांनीं विशेषतः मानिलेला आहेत तीं अशीः—१ प्रकृति, २ महत्, ३ अहंकार, ४ शब्दतन्मात्र, ५ स्पर्शतन्मात्र, ६ रूपतन्मात्र, ७ रसतन्मात्र, ८ गंधतन्मात्र, ९ मन १० ते १९ पांच ज्ञानेंद्रियें व पांच कर्मेंद्रियें आणि २० ते २४ पंचमहाभूतें. सांख्यांच्या मतें ' पुरुष, हेंही पंचविसावें तत्त्व आहे.

२ या सृष्टिःस्रष्टुराद्या वहति विधिहुतं या हविर्याच होत्री । इ० कालिदासीय शाकुंतले १।१

याप्रमाणें ते महायोगनिष्ठ देवश्रेष्ठ, कैलासनायक, पालकवर्य, सर्वांचें आदिकारण, शूलपाणी, उमापति शंकर, जगन्नायक श्रीकृष्णाला अवलोकन करण्यासाठीं भूतसमुदायांना बरोबर घेऊन त्या ठिकाणीं प्राप्त झाले.

## अध्याय शायशींवा.

—:०:—

### महादेवागमन.

वैशंपायन सांगतातः—राजा जनमेजया, श्रीशंकराच्यापुढें हजारों भूतसमुदाय होते. त्यांमध्यें घटाकर्ण, विरूपाक्ष, कुंडधार, कुमुद्रुद्र, दीर्घरोमा, दीर्घभुज, दीर्घबाहु, निरंजन, उरुनेत्र, शतमुख, शतग्रीव, शतोदर, कुंडोदर, महाग्रीव, स्थूलजिव्ह, द्विबाहुक, पार्श्ववक्त्र, सिंहमुख, उन्नतांस, महाहनु, त्रिबाहु, पंचबाहु, व्याघ्रवक्त्र आणि सितानन हे मुख्य होते. हे व आणखी मुख आणि नेत्र दीर्घ असलेले अनेक पिशाच तेथें होते. ते नाचत असत, मोठमोठ्यानें हंसत असत व परस्परांच्या पाठीवर थापा देत असत. त्यांतील कित्येकांचे आकार फार भयंकर होते व कित्येकांचीं तोंडें वेडींवांकडीं होतीं. ते प्रेतें भक्षण करीत असत, प्रेतें उचलून आणीत असत; आणि अहाराच्या ऐवजीं रक्त आणि मांस यांचा उपयोग करीत असत. ते ठिकठिकाणीं असंख्यात प्रेतें हांहां म्हणतां भक्षण करून टाकीत. अनेक प्रेतांचे तुकडे करीत असत व भयंकर रक्त प्राशन करीत असत. त्यांचे आकार भेसुर,उंच, आणि रुंद असे असून ते शिरा आणि स्नायु यांनीं व्याप्त झालेले दिसत होते. त्या पिशाचांचे प्रकार अनेक असून ते वीर होते. त्यांनीं शूलावर मनुष्यांची शरीरें टोंचून धरिलीं होतीं. कंठामध्यें मनुष्यमस्तकांच्या माळा घातलेल्या होत्या, शरीराभोंवतीं आंतड्यांचे दोर गुंडाळून घेतले होते. ते मोठमोठ्यानें हंसून व डिम वाजवून सर्व पृथ्वी दणाणून सोडीत होते. कित्येकांच्या मस्तकावर जटा होत्या. कित्येकांनीं मस्तकांचें मुंडन केलें होतें. कित्येकांच्या हातांत मनुष्याच्या कपाळाच्या करटच्या होत्या व कित्येक अतिशय भयंकर दिसत होते. सारांश, वेडींवांकडीं तोंडें असलेले भयंकर असे ते अनेक प्रकारचे पिशाच होते. त्याचप्रमाणें परमेश्वराचें चिंतन करणारे व इंद्रियांशीं झगडून त्यांचा जय करण्यामध्यें वीर असे मुनीहि तथें होते. ते वेद आणि वेदांग यांतील अनेक प्रकारचीं वाक्यें उच्चारीत होते; त्यांतील कित्येकांच्या हातांमध्यें कमंडलु होते, कित्येकांनीं आपल्या हातांत दर्भ धारण केले होते. व कांहींनीं कार्पासवस्त्र परिधान केलें होतें. ते शिववर्णनयुक्त अशा स्तोत्रांनीं श्रीशंकरांचें भक्तिपूर्वक स्तवन करीत असत.

याप्रमाणें श्रीशंकराच्या एके बाजूस ऋषींचे समुदाय, दुसरे बाजूस पिशाचगण व इतरत्र आपल्या प्रियेशींसहवर्तमान सिद्ध आणि गंधर्व होते. त्यांमध्यें नृत्यकुशल असलेल्या गंधर्व कन्यका नृत्य आणि गायन करीत होत्या. अन्यत्र विद्याधरसंज्ञक देवता श्रीशंकरांचें स्तवन करीत होत्या. तसेंच श्रीशंकरांच्या पुढें अप्सरांचे समुदाय नृत्य करीत होते. अशाप्रकारें अतिशय भयंकर मांसभक्षक पिशाच आणि भूतें, तसेंच किन्नर, ऋषि, देवता, सर्वही लोकाची काळजी वहाणारी भगवती पार्वती, व गंगा यांसहवर्तमान सर्व जगताचें उत्पत्तिस्थान, वैभवसंपन्न, जटामंडित चंद्ररूपी शिरोभूषण धारण करणारे, चतुर, प्रणवमयस्वरूप असलेले, अत्यंत पराक्रमसंपन्न, श्रीशंकर स्वेच्छेच्या अनुरोधानें श्रीकृष्णास अवलोकन करण्यासाठीं तेथें आले.

# अध्याय सत्याएशींवा.

—:०:—

## विष्णुकृत शिवस्तुति

वैशंपायन सांगतातः—राजा जनमेजया, याप्रमाणें भूतें, सर्प व अनेक प्रकारचे पिशाचगण यांसहवर्तमान वृषभवाहन कल्याणकारक श्रीशंकर तेथें आले व त्यांनीं तेथें देवश्रेष्ठ जगन्नायक श्रीकृष्ण,पवित्र अशा होमद्रव्यांनीं अग्निमध्यें होम करून तपश्चर्या करीत आहे, त्यानें जटा वाढविल्या आहेत, वल्कल परिधान केलें आहे, गरुड त्याला होमकाष्ठें आणून देत आहे, चक्र पुष्पें आणीत आहे, खड्ग दर्भ घेऊन येत आहे आणि गदा त्याची सेवा करीत आहे, असें पाहिलें. त्या देवाधिदेव श्रीकृष्णासभोंवतीं इंद्रादि देवतांचे समुदाय आणि ऋषिगण होते. कोणत्याही प्राण्याला ज्याचें ध्यान करितां येणं अशक्य आहे असल्या कांहीं वस्तूचें ते श्रीकृष्ण ध्यान करीत आहेत, असेंही त्यांना दिसून आलें. त्यामुळें शांतचित्त, ललाटनेत्र, सर्व प्राण्यांची काळजी वाहणारे पार्वतीपति भगवान् श्रीशंकर संतुष्ट झाले व वृषभावरून खालीं उतरले

तेव्हां भूतें, पिशाचें, राक्षस, किन्नर आणि ब्राह्मणश्रेष्ठ ऋषि यानीं जयजयकार केला. ते म्हणाले, “हे जगन्नायका, लोकसुखदायका, रुद्रा, आपला जय असो; इंद्रियें आपल्या ताब्यांत ठेवणाऱ्या,समुद्रामध्यें शयन करणाऱ्या, सर्वांस आधारभूत श्रीकृष्णा, तुझा जय असो. सर्वांस आदिभूत, प्रकाशमय, संहारकारक, आणि ऐश्वर्यसंपन्न अशा हे शंकरा, आपला जयजयकार असो; हे आदिदेवा, जगन्नायका, सर्वांवर लक्ष ठेवणाऱ्या, श्रीशंकरा, आपला जय असो. कौस्तुभरत्नाच्या योगानें शरीर चमकणाऱ्या श्रीकृष्णा तुझा जय होवो. हे भस्मभूषिता श्रीशिवा, आपला जय होवो. हातामध्यें चक्र आणि गदा धारण करणाऱ्या व मौक्तिक मालांच्या योगानें शरीर देदीप्यमान असलेल्या श्रीविष्णो, आणि शूल धारण करणाऱ्या व सर्परूपी अलंकार धारण करणाऱ्या श्रीशंकरा, आपला जयजयकार असो;” असें म्हणून त्या सर्व ऋषींनीं व इतरहि देवतादिकांनीं श्रीशंकराला व विष्णूला प्रणाम केला. तेव्हां भगवान् श्रीकृष्ण उठून उभे राहिले आणि श्रीवृषभध्वज त्रिनेत्र,लोककल्याणकारक भगवान् श्रीशंकर आपल्यापुढें उभे आहेत असें पाहून आनंदित अंतःकरणानें त्यांची स्तुति करूं लागले.

श्रीकृष्ण म्हणाले, “हे विषकंठ, हे नीलकंठ, हे जगदुत्पादक, हे कांतिमय, हे सर्वांतर्गत, आपणाला नमस्कार असो. हे वृष्टिकारका, हे मृत्युंजया, हे विश्वस्वरूपा, हे धर्ममूर्ते, हे सर्वश्रेष्ठा, हे जगत्संहारका, आपल्यास नमस्कार असो. वस्तुतः शरीरशून्य असतांहि लीलेनें मूर्ति धारण केल्यामुळें पिनाकसंज्ञक धनुष्य धारण करणारे, सर्वस्वरूपी असल्यामुळें कुब्ज ( खुजा ) व दुर्बलही असणारे, कल्याणमय व कल्याणकारक अशा आपणाला नमस्कार असो संतोषसंपन्न, प्रलयकालीं सर्व प्राणी शरीरांत लीन होत असल्यामुळें सर्व भक्षक, सर्वांचा संहार करीत असल्यामुळें हिंसक, पण वस्तुतः कल्याणस्वरूपी, व शांतिसंपन्न अशा हे कैलासनायका, आपल्याला नमस्कार असो. रेचक आणि पूरक हीं प्राणायामाचीं स्वरूपें धारण करणाऱ्या,हे हारहरस्वरूपा, भक्तांवर दया करीत असल्यामुळें सौम्य व दुष्टांचा निग्रह करीत असल्यामुळें भयंकर असणाऱ्या, व भयंकराहूनहि भयंकर अशा प्रलकालीन संहाराची अभिरुची असणाऱ्या हे श्रीहरा, आपल्याला प्रणाम असो. क्वचित् प्रसंगी घंटा धारण करणारे व कांहीं वेळीं मुळींच घंटा नसलेले, जगाच्या उत्पादकांचेहि

उत्पादक अशा कल्याणमय शांत कैलासनायका, आपणास नमन असो. जगांतील नानाप्रकारचे प्राणी हीं ज्याचीं शरीरें आहेत, जो जगतांमध्यें भरून राहिला आहे, ज्यानें त्रिपुरासुराचा संहार केला, जो सर्वांस आदिभूत व म्हणूनच जगताचें बीज, त्या पवित्र अष्टमूर्ति धारण करणाऱ्या शंकरास माझें वंदन असो. पिनाक धनुष्य, शूल, खड्ग, व खट्वांग संज्ञक आयुध धारण करणारे, गजचर्मरूपी वस्त्र धारण करणारे, देवाधिदेव परब्रह्मरूपी, हरिहररूपी, तीव्रतेजोयुक्त, भक्तिप्रिय, सर्व जगाहून पृथक्भूत, पण मायेच्यायोगानें विश्वरूपी मूर्ति धारण करणारे, भक्तांना वर देणारे, शरत्कालीन मेघाप्रमाणें शुभ्र शरीर असलेले, चंद्रसूर्यस्वरूपी व म्हणूनच देदीप्यमान देवाधिदेव व विश्वनायक अशा श्रीशंकरांस माझा प्रणाम असो. सर्वस्वरूपी असल्यामुळें भेसूर, व विकारयुक्त, जटाधारी, व मस्तकाचें मुंडन केलेलें अशीं अनेक प्रकारचीं स्वरूपें धारण करणारे, पण वस्तुतः जन्मशून्य अशा, सर्व प्राण्यांची काळजी वहाणाऱ्या श्रीशंकरा, आपणांस नमस्कार असो. ज्याचे केश पिंगट वर्णाचे आहेत अथवा श्रीविष्णु आणि ब्रह्मदेव यांजवर ज्याची सत्ता चालते अथवा श्रीकृष्ण हा ज्याच्या केशाचा अवतार आहे व अनेक स्वरूपें धारण करणारा असल्यामुळें जो पिंगट वर्णही आहे, श्रीकृष्ण हा ज्याचें स्वरूप आहे व म्हणूनच अर्जुनाचें सारथ्य करण्याच्या वेळीं ज्याच्या हातामध्यें त्याच्या अश्वांच्या काढण्या असतात, अथवा जो सूर्यस्वरूपी असल्यामुळें किरणरूपी हस्तांनीं युक्त आहे, व जो भयपावणाऱ्या लोकांच्या भीतीचें हरण करणारा आहे, त्या श्रीशंकरास नमस्कार असो. जो भीतिस्वरूपी असून भयंकर प्राण्यांच्या अंतकरणांत भीति उत्पन्न करणारा आहे, ज्यानें दक्षाच्या यज्ञाचा विध्वंस केला व भग नामक देवतेचे नेत्र हरण केले, त्या श्रीहराला नमस्कार असो. हे उमापते, हे कैलासवासिन्, हे आदिदेव, हे दीप्तिशील, हे जगदुत्पादक, हे संसारस्वरूप आपणाला नमस्कार असो. ज्याच्या हातीं कपाल आहे, ज्यानें ब्रह्मदेवाच्या मस्तकाचा छेद केला, त्याला तीन नेत्र आहेत व जो जगताचें कल्याण करणारा आहे त्या तुज श्रीशंकराला नमस्कार असो हे चंद्र-

१ याठिकाणीं मूळांत 'हरिकेशाय, अभीषुहस्ताय व भीरु भीरुहराय' अशीं तीन पदें आहेत व त्याचा अर्थ नीलकंठांनीं श्रीकृष्ण हा ज्याच्या केशाचा अवतार आहे, जो श्रीकृष्णस्वरूपी असल्यामुळें अर्जुनाचा सारथी आहे, व जो अत्यंत भीरु असून जगताचा संहार करणाराही आहे, असा क्रमानें केलेला आहे. पण श्रीकृष्ण शंकराची स्तुति करीत असतां अशा प्रकारचें वर्णन करणें कितपत योग्य होईल हा प्रश्न आहे व प्रकारांतरानें बरोबर अर्थ जुळत असतां श्रीकृष्णांनीं स्वतःला आपल्या उपास्याची बरोबरी होईल, अशा रीतीनें उल्लेखिलें आहे, असें म्हणणेंही शोभण्यासारखें नाहीं. यामुळें याठिकाणीं नीलकंठाचा अर्थ जरा बाजूस ठेविला पाहिजे. पण, ज्यांना त्यांनीं तो कसा केला आहे, हें जाणण्याची इच्छा असेल त्यांच्यासाठीं आम्ही तो अर्थ देऊन, प्रकारांतरानें जुळणारा अर्थही दिला आहे. पैकीं हरिकेश हें नाव श्रीशंकरांना आहे, असें 'रुद्राध्यायावरून' दिसून येतें व त्याचा पिंगल वर्ण केश असलेला असा अर्थही केलेला आढळून येतो. (शब्दकल्पद्रुम पहा) श्रीविष्णु आणि ब्रह्मदेव यांजवर श्रीशंकराची सत्ता असल्याचें अनेक पुराणादिकांतून प्रसिद्ध आहे या विषयींचें विशेष विवेचन हवें असल्यास **शिवतत्त्वविवेक** पहावा. म्हणूनच हा अर्थ आम्हीं दिला आहे. रुद्राध्यायामध्यें "उतैनं गोपा अदृशं" ह्या ऋचेंत, सूर्याच्या स्वरूपानें श्रीशंकरांचें वर्णन असल्याचें सर्वांस विदितच आहे. व शिवाय सूर्यही श्रीशंकराच्या अष्टमूर्तिंपैकीं एक मूर्ति आहे म्हणूनच अभीषुहस्ताय ' या पदाचा अर्थ आम्हीं अशाच अभिप्रायानें दिला आहे. 'भीरु भीरुहराय ' या पदांत दुसरें ' भीरु ' पद भावप्रधान आहे. अर्थातच त्याचा अर्थ 'भीरुता' आहे, हें लक्षांत घेतलें म्हणज नीलकंठांनीं केलेल्या अर्थाहून दुसराच अर्थ सरस आहे हें कळून येईल.

शेखर, हे वरदायक, हे सर्वश्रेष्ठ, यज्ञरूपी असल्यामुळें यज्ञांग, इध्म (समिधा) हवि (होमद्रव्य ), स्रुव आणि दर्भ एतत्स्वरूपी असणाऱ्या आपणास नमस्कार असो. शक्तिसंपन्न नागरूपी पाश प्रिय असलेले, सर्वस्वरूपी असल्यामुळें विरूप, सुरूप, आणि मद्यपानप्रिय अशा आपणास नमस्कार असो. स्मशानामध्यें रममाण होणारे, जयशब्द प्रिय असलेले, अविनाशी, कठोरस्वरूपी, कठोरताप्रिय, आणि मूर्तिमंत कठोरताच असणारे, वामनस्वरूप धारण करणारे जे आपण त्या आपणांस नमस्कार असो. कल्याणप्रिय, कल्याणमय, कल्याणस्वरूप धारण करणारे, विरूप, सुरूप आणि अत्यंत भयंकर अशा आपणास नमस्कार असो. वेदरूपी शब्दांचा कर्ता, किंकिणीरूपी भूषणें धारण करणारा, घंटारूपी अलंकार धारण करणाऱ्या वृषभाच्या योगानें शोभणारा, तीव्रगुणस्वरूपी, तीव्रतासूचक आकार असलेले प्राणि प्रिय असलेला, सर्वस्वरूपी व म्हणूनच वस्त्रस्वरूपीहि असल्यामुळें प्रावर्णरहित व म्हणूनच नग्न, शेषस्वरूपी व शेषस्वरूपप्रिय असलेला, सर्व प्राण्यांचें वसतिस्थान असून सर्वहि प्राण्यांचे ठिकाणीं वास्तव्य करणारा, अर्थात् सर्वांचा आत्मा, ऐश्वर्यदायक, सुंदर दीप्तिमान्, देवश्रेष्ठ, अशा तुज शंकराला नमस्कार असो; हे स्तव्यश्रेष्ठा, अशी कोणती वाणी आहे कीं ती आपली अनुरूप स्तुति होऊं शकेल ? असा कोणता प्राणी आहे कीं जो आपलें स्तवन उत्तम प्रकारें करूं शकेल आणि हे स्तुत्यश्रेष्ठा, असा कोण आहे कीं, आपली स्तुति करण्यास ज्याची जिव्हा स्फुरण पावेल ? हे भगवन्, जगत्संहारक, सर्वस्वरूपी, सर्व जीवनायक, देव, श्रीशंकर, मी आपला दास आहें. आपण माझें संरक्षण करा. तसेंच हे भक्तप्रिया जगन्नाथा, श्रीशंकरा, आपल्यावर भक्ति करणाऱ्या सर्व लोकांचेंहि आपण सदैव संरक्षण करा.

१ 'ऋानुवाक् स्तुतिरूपाते ' असा आमचा पाठ आहे. 'ननुवाक' ' असा वांईकरांचा आहे. '

## अध्याय अठ्याशींवा.

—:०:—

### श्रीशिवकृत विष्णु ( कृष्ण ) स्तुति.

वैशंपायन सांगतातः—राजा जनमेजया, तदनंतर शूळ धारण करणाऱ्या प्रकाशमान, पार्वतीपती साक्षात् श्रीकरांनीं चक्रधारण करणाऱ्या श्रीकृष्णाचे हातास: आपल्या हातांनीं स्पर्श केला आणि अंतःकरण सुसंस्कृत असलेले ऋषि व देव ऐकत असतां त्याला म्हटलें. " देवाधिदेवा, लोकसुखदायका श्रीविष्णो, हें काय, आपली इच्छा काय आहे ? ही तपश्चर्या आपण कशासाठीं करतां ? आपण प्रत्यक्ष विश्वव्यापक परमात्मा आहांत. हे विष्णो, तपश्चर्या करणाऱ्या लोकांचें जें तप तें आपणच आहांत. हे जनार्दना, आपली ही तपश्चर्या जर पुत्रप्राप्ती करितां असेल तर ती करावयास नको. कारण हे जगन्नायका, आपल्याला मी पूर्वींच पुत्र दिला आहे. हे कारणस्वरूपा, याचें कारण काय तें आपण ऐका. हे हरे, पूर्वीं कृतयुगामध्यें मी दहाहजार वर्षेंपर्यंत अतिशय भयंकर अशी तपश्चर्या करीत होतों, त्या वेळीं हे देवाधिदेवा, उपवर झालेली पार्वती आपल्या पित्याचे आज्ञेवरून त्या टिकाणीं माझी सेवा करीत होती. याप्रमाणें माझी तपश्चर्या चालली असतां इंद्र भयभीत झाला आणि त्यानें मदनाला मजकडे पाठविलें. तेव्हां मदन वसंतसंज्ञक आपल्या मित्रासहवर्तमान मजकडे आला. त्यावेळीं हे हरे, ही पार्वती पुष्पादिक समर्पण करून माझी सेवा करीत होती. अशा वेळीं मदनानें मला लक्ष्य करून मजवर बाण फेंकला. तेव्हां मदनाला त्या स्थितींत पहातांच मी क्रुद्ध

झालों आणि हे देवाधिदेवा, माझ्या नेत्रांतून अग्नि बाहेर पडला आणि हे हरे त्या वेळीं त्या अ- ग्नीनें मदनाला भस्म करून सोडिलें. पुढें हे विष्णो, मी विचार करूं लागलों, तेव्हां मदनाची ही कृति इंद्राच्या इच्छेवरून घडली होती असें मला कळून आलें. अर्थातच हा मदनाचा स्वेच्छेनें घडलेला अपराध नव्हता, यामुळें हे देवेश्वरा, मदनावर तेव्हांपासून मी दया करीत आहें. ब्रह्मदेवानेंहि त्याचेवर दया करण्यावि षयीं माझी विनंति केली तेव्हां हे जनार्दना, मी आनंदित झालों, आणि हे जगन्नायका, त्यानें ( मदनानें, ) तुझा पुत्र व्हावें अशी मी योजना केली. वास्तव, हे देवा, प्रद्युम्न या नांवानें प्रख्यात असा तो तुझा ज्येष्ठ पुत्र होईल. हे देवाधिदेवा, आपला ज्येष्ठ पुत्र हा तो मदनच होय हें आपण निःसंशय समजावें.

याप्रमाणें, श्रीकृष्णाला सांगून नंतर ऋषींना ऐकण्याची इच्छा असल्यामुळें, पार्वतीसहवर्त मान असलेले श्रीशंकर श्रीकृष्णाचें पारमार्थिक स्वरूपाचें जणुं ज्ञान करून देण्यासाठीं हात जोडून बोलूं लागले. याप्रमाणें जेव्हां श्रीशंक- रांनीं कृष्णापुढें हात जोडले, तेव्हां देवता, ऋषि, गंधर्व, सिद्ध आणि किन्नर यांनीही देवा- दिदेव विश्वव्यापक श्रीकृष्णापुढें हात जोडले

श्रीशंकर म्हणाले, " हे जनार्दन, सांख्य- शास्त्रज्ञानीं प्रकृति म्हणून जें जगताचें कारण सांगितलें आहे, त्याजपासून महत्तत्व उत्पन्न झालें आहे. अर्थातच ती प्रकृति हें या मह- त्तत्वाचें कारण होय. यालाच प्रधान असें नांव आहे. साम्यावस्थेंत असलेले सत्व, रज, आणि तम हे तीन गुण हेंच याचें स्वरूप आहे. याजपासून सर्व विश्वाची उत्पत्ति झाल्यामुळें हे विश्वव्यापका, हें ( प्रधान ) जगदुत्पादक असें एक अंडेंच होय, असें म्हटलें तरी चालेल. अस्तु; हे विष्णो, त्या महत्तत्वाचें कारण, जी प्रकृति ती तूंच आहेस आणि तिच्याच स्वरूपानें परिणाम पावून तूं सर्वांवर आपली सत्ता चालवीत आहेस, असें तत्त्वज्ञानी लोक म्हण- तात. हे जगन्नायका, त्या प्रचंड अशा महत्त- त्वापासून विशाल असा अहंकार उत्पन्न झाला. तो प्रथम निर्माण झालेला अहंकाररूपी परिणाम ( रूपांतर ) तूंच आहेस. हें प्रभो देवा, अहंकारापासून सर्वांस कारणभूत आणि वि शाळ अशीं पंचतन्मात्रें[1] झालीं, व त्या पंचतन्मात्रां पासून आकाश, वायु, अग्नि, जल, पृथ्वी, आणि हीं पंचमहाभूतें निर्माण झालीं. हे जग- न्नायका, तीं पंचमहाभूतेंही तुझेंच स्वरूप होत. तसेंच अहंकारापासून चक्षु, घ्राण, त्वक्, रसना व श्रोत्र, हीं पांच ज्ञानेंद्रियें व वाक्, हस्त, पाद, पायु आणि उपस्थ हीं पांच कर्मेंद्रियें आणि त्या इंद्रियांना त्या त्या विषयाचे ठिकाणीं प्रवृत्त करणारें मन, हीं निर्माण झालीं असून तीं सर्व अंतःकरणाचें नियमन केलेल्या अशा तुझींच स्वरूपें आहेत. हे जगन्नायका, देवा- धिदेवा श्रीकृष्णा, तूंच योग्य अशा या इंद्रि- यसमुदायाला आपआपल्या विषयांमध्यें आसक्त करितोस. ज्या वेळीं तूं रजोगुणांशीं युक्त झालास त्या वेळीं प्राणी निर्माण केलेस. ज्या वेळीं तूं सत्त्वगुण युक्त असतोस त्या वेळीं जगताचें पालन करतोस आणि जेव्हां तूं तमो- गुणानें पछाडला जातोस, तेव्हां तूं या जग- ताचा संहार करतोस. सारांश, अंतःकरणाचा निग्रह केला असतांही, या सत्वादि तीन गुणांचा योग घडल्यामुळें ब्रह्मादि तीन मूर्ति धारण करून तूंच जगताची उत्पत्ति, पालन

१ तन्मात्र म्हणजे पंचमहाभूतांचे सूक्ष्म अंश. अर्थातच सूक्ष्मावस्थेंत असलेलीं पंचमहाभूतें होत. हीं शब्द–तन्मात्र, स्पर्शतन्मात्र, रूपतन्मात्र रस- तन्मात्र आणि गंधतन्मात्र अशीं पाच आहेत. व या पांचापासून क्रमानें आकाशादि पंचमहाभूतांची उत्पत्ति झाली आहे.

आणि नाश हीं करितोस. हे जगज्जनका माधवा, प्राण्यांनीं सुखदुःखादिकांचा अनुभव घ्यावा म्हणून जीवस्वरूपानें त्याच्यांत वास्तव्य करून चक्षुरादि इंद्रियांचीं रूपादि विषयांकडे योजना तूंच करतोस. आणि म्हणूनच अशा प्रकारें इंद्रियांच्या द्वारें सर्व विषयांचा उपभोग घेत तूं सर्व प्राण्यांचे ठिकाणीं जीवस्वरूपानें वास्तव्य करींत आहेस. हे प्रभो, तूंच सृष्टिकालीं ब्रह्मा, पालनकालीं विष्णु आणि संहारकालीं रुद्र ही संज्ञा धारण करणारा आहेस व म्हणूनच ब्रह्मादि तीन देवता या तुझ्याच तीन मूर्ति आहेत. हे हरे, पृथ्वी, जल, अग्नि, वायु, आकाश, मन आणि बुद्धि या परस्परांहून भिन्न असलेल्या व सर्वत्र वास्तव्य करणाऱ्या तुझ्याच प्रकृति होत. तूं सर्वही प्राण्यांच्या ठिकाणीं जीवस्वरूपानें वास्तव्य करीत आहेस. अर्थातच सर्व प्राणी हीं तुझींच शरीरें आहेत व म्हणूनच तुला असंख्य मस्तकें, असंख्यात नेत्र, व अगणित पाय असून तुझा वंश, तुझी संतति व तुझीं स्वरूपेंही हीं असंख्यात आहेत. स्वर्गाचा अधिपति तूंच आहेस. जंबुप्रभृति सात द्वीपें व क्षारप्रभृति सात समुद्र यांनीं युक्त असणाऱ्या या सर्व पृथ्वीला व्यापून अर्थातच सूक्ष्मस्वरूपानें सर्वत्र वास्तव्य करून दहा अंगुळें अधिक उरलेला जो परमात्मा तो तूंच आहेस. हे जनार्दना, आजपर्यंत झालेले व येथून पुढें होणारे जें जग तें सर्व तूंच आहेस. विराट् ही देवता तुजपासूनच निर्माण झाली असून सार्वभौमही तुजपासूनच उत्पन्न झाला आहे. हे सर्वांस आदिभूता, तुझ्याच मुखापासून लोकांचें पापापासून संरक्षण करणारे ब्राह्मण, बाहूपासून जगताचें पालन करणारे क्षत्रिय, मांडीपासून वैश्य, आणि पायापासून शूद्र निर्माण झाले. सारांश, हे जगन्नायका श्रीकृष्णा, तुझ्याच देहापासून हे सर्व वर्ण निर्माण झाले आहेत. हे देवाधिदेवा, तुझ्याच मनापासून अतुल कांतिमान्, सर्व प्राण्यांना सुख देणारा व थंडगार किरण असलेला चंद्र उत्पन्न झाला. ज्याच्या प्रकाशानें सर्व जग प्रकाशित होतें व जो सर्व प्राण्यांचे केवळ नेत्र आहे तो प्रशंसनीय किरणांनीं युक्त असलेला, सूर्य तुझ्याच किरणांपासून उत्पन्न झालेला आहे. तुझ्याच मुखापासून इंद्र आणि अग्नि, प्राणांपासून वायु आणि नाभीपासून अंतरिक्ष उत्पन्न झालें असून हे गोपालकृष्णा, तुझ्याच मस्तकापासून प्रचंड स्वर्ग निर्माण झाला. तुझ्याच पायापासून भूमि निर्माण झाली. आणि हे जगन्नायका, तुझ्याच कर्णांपासून दिशा उत्पन्न झाल्या. हे केशवा, याप्रमाणें सर्व जग निर्माण करून व सर्व लोकांना व्यापून तूं सर्वत्र भरून रहात आहेस म्हणूनच तुला 'विष्णु' असें म्हणतात. हा विष्णु शब्द ज्या ( विष् ) धातूपासून झाला आहे, त्या धातूचा अर्थ व्यापणें असा आहे. हे आजपर्यंत झालेल्या व पुढें होणाऱ्या जगताच्या आदिपते, तुला नारायण अशीहि संज्ञा आहे. कारण, नार म्हणजे जल हें तुझें अयन म्हणजे आश्रयस्थान आहे, अर्थातच तूं समुद्रवासी आहेस. हे देवा, तूं सर्व प्राण्यांचा संहार करतोस म्हणून तुला हरि म्हणतात. व सदैव सर्वांचें कल्याण करितोस म्हणून तुला शंकर असेंही म्हणतात. तूं सर्वांहून मोठा आहेस व सर्वांची अभिवृद्धि करतोस म्हणून ब्रह्मा ही संज्ञा तुला प्राप्त झाली आहे. मधु

१ दहा अंगुळें म्हणजे अगणितच समजावें. कारण चराचर भूतें ह्याचा एक पाद असून शिलकी भाग तीन पाद आहे. अर्थात् उरलेला भाग अधिक आहे.

१ 'ब्रह्मा' हा शब्द 'बृह्' विस्तार पावणें या धातूपासून झाला आहे.

असें इंद्रियांना नांव आहे त्याचें तूं सूदन म्हणजे नियमन करितोस म्हणून तुला मधुसूदन असें म्हणतात. हे विष्णो, देवामध्यें हृषीकेश अशी तुझी ख्याती आहे, कारण, हृषीकांचा म्हणजे इंद्रियांचा तूं ईश म्हणजे सत्ताधीश आहेस. 'क' म्हणजे ब्रह्मदेव आणि ईश म्हणजे सर्व प्राण्यांचा अधिपति असा मी हे उभयतां तुझ्या शरीरापासून निर्माण झालों, म्हणूनच '**केशव**' असें तुला नांव पडलें. तुला माधव असेंही नांव आहे. कारण, 'मा' म्हणजे विद्या हिचा तूं धव ( पति ) आहेस. हे देवा, तुजला मुनिजन 'गोविंद' असें म्हणतात. याचें कारण, तुजला गोचें म्हणजे वाणीचें ज्ञान आहे. अर्थात् ज्याला वाणी पूर्णपणें समजते असा तूंच आहेस. तूं त्रिविक्रम आहेस अशी प्रसिद्धि आहे. कारण, त्रीं म्हणजे तीनें वेद या सर्वांना तूं आक्रमून अर्थात् व्यापून राहिला आहेस ( वेदांमध्यें तूं सूक्ष्माहून सूक्ष्म आणि स्थूलाहून स्थूल आहेस असें सांगितलें आहे. अर्थात् तूं लहान आहेस म्हणून तुला 'वामन' असें म्हणतात. तूं सर्वांचें मनन ( चिंतन ) करितोस म्हणून तुला 'मुनि' असें म्हणतात. व सर्वांचें नियमन करितोस म्हणून तुला 'यति' म्हणतात. तूं तपश्चर्या करितोस म्हणून तुला 'तपस्वी' अशी संज्ञा आहे. तुझ्या ठिकाणीं सर्व भूतें वास्तव्य करितात म्हणून तुला 'भूतावास' असें नाम आहे. तूं सर्व प्राण्यांचा ईश ( नियामक ) आहेस म्हणून तुला ईश्वर असें म्हणतात. सर्व वेदामध्यें प्रणव ( ॐकार ), छंदामध्यें गायत्री, अक्षरामध्यें अकार, आणि वर्णाश्रयानें असणारा ध्वनीमध्यें स्फोट, हा तूंच आहेस. रुद्रामध्यें मी, वसूंमध्यें अग्नि, वृक्षजातींमध्यें अश्वत्थ, लोकांना वडील असलेल्यापैकीं ब्रह्मदेव, पर्वतश्रेष्ठांमध्यें मेरु, देवर्षींमध्यें नारद, दानवांमध्यें भक्तवत्सल, दैत्यांत प्रऱ्हाद, सर्व सर्पांमध्यें वासुकी, सर्व गुह्यकांमध्यें कुबेर, जलचरांमध्यें त्यांचा राजा वरुण, आणि तीन मार्गांनें जाणारी गंगा तूंच आहेस. तूंच सर्व प्राण्यांस आदि, मध्य व अंतभूत आहेस. तुजपासून सर्व विश्व निर्माण झालें असून, तें तुझ्याच ठिकाणीं सर्व लीनहि होतें. हे जनार्दन, सर्वत्र वास्तव्य करणारा मी हा तूंच असून, तूं तो मीच आहें. हे जगन्नायका, आपणा उभयतांमध्यें शाब्दिक किंवा आर्थिक असा भेद मुळींच नाहीं. हे गोविंद, या लोकांमध्यें तुझीं जी पूज्य अशीं नावें आहेत तीं सर्व माझींच आहेत. याविषयीं संशय घेणें नलगे. हे इंद्रियाधिपति जगन्नाथ, तुझी जी उपासना तीच माझीही उपासना असून जो तुझा द्वेष करितो तो माझाही द्वेष्टा होय, यांत संशय नाहीं. हे देवा, तुझी जी व्यापकता ती माझीच व्यापकता होय व म्हणूनच सर्व प्राण्यांचा नियंता असल्यामुळें मलाहि 'भूतपति' अशी संज्ञा आहे. हे हरे, ज्या ठिकाणीं तूं नाहींस असें कांहींही नाहीं. हे जगन्नायका, जें कांहीं आजवर होऊन गेलें आहे, जें विद्यमान आहे आणि जें पुढें होणार आहे, हें तूंच आहेस. कारण हे देवाधिदेवा, तुजवां-

१ वाटल त्या भाषेत भक्त बोलो, परमात्माला त्याचें गाऱ्हाण कळतें.

२ वेद चार अशी जरी ख्याति आहे, तरी अमरांत वेदाला 'त्रयी' असेंच म्हटलें आहे, व ऋक्, यजुस व साम हेच मुख्य आहेत.

१ स्फुटति–व्यक्तो भवति–अर्थो यस्मात् सःस्फोटः' ज्याच्यापासून अर्थ व्यक्त होतो ते वाचक, लाक्षणिक आणि व्यंजक हे शब्द, किंवा या शब्दावर असणारी जाति, यास स्फोट असें म्हणतात, ( श्रीकृष्णभट्टमौनि याची स्फोटचंद्रिका.

पृष्ठ १ लें पहा.

२ सर्वः, शर्वः, शिवः, स्थाणुः इ० कित्येक तरी नावें जीं शिवपर समजलीं जातात तीं विष्णूचीं म्हणून विष्णुसहस्रनामांत दिलीं आहेत.

चून या विश्वांत कांहींच नाहीं. हे प्रभो, देवता सदैव तुझ्या गुणाचें वर्णन करीत असतात. तूं ऋग्वेद, यजुर्वेद आणि सामवेदही आहेस. हे सर्व प्राण्याची काळजी वहाणाऱ्या प्रभो, मी फार काय सांगावें? जें सर्व कांहीं आहे तें तूंच आहेस. हे देवा, हे विष्णो, हे माधवा, हे केशवा, तुला सर्व प्रकारें नमस्कार असो. हे सर्वस्वरूपा हरे, तुला सदैव नमस्कार असो. हे कमलनाभ, तुला नमन असो; हे ईश्वरा, मी तुला वंदन करितों.

## अध्याय एकुणनव्वदावा.

—:०:—

### श्रीविष्णुस्वरूप-निरूपण.

वैशंपायन सांगतातः—राजा जनमेजया, याप्रमाणें देवाधिदेव श्रीकृष्ण यांस उद्देशून बोलल्यानंतर, श्रीशंकर पुनरपि ऋषींना म्हणाले कीं हे विप्रहो, जे कोणी तुह्मी भक्तियुक्त होऊन येथें दर्शनार्थ आलां आहां ते तुह्मी असें समजा कीं अंतःकरण सारखें जडवून ज्याचें चिंतन करावयाचें तें तत्व हा श्रीकृष्णच होय. आपलें अत्यंत कल्याण हेंच असून श्रेष्ठ असें द्रव्यहि हेंच होय. आपल्या जन्मांतील कर्तव्य ज्याच्या प्राप्तीसाठीं करावयाचें, तें हेंच असून आपल्या तपश्चर्येचें फलहि हेंच आहे. पुण्याचें वास्तव्यस्थान असा जो आपला शाश्वतिक धर्म तो हाच असून मोक्ष देणारा आणि मोक्ष प्राप्तीचा उपाय हाच आहे. हाच प्रत्यक्ष पुण्य देणारा असून आपण जीं कर्में करीत आहांत त्याचें फलही हाच आहे. ब्रह्मवादी विद्वान् लोक ज्याची प्रशंसा करितात तो हाच आहे. वेदत्रयाला आधारभूत असा हाच असून, हे विप्रहो, ब्रह्मवेत्ते ज्याची सदैव इच्छा करितात तोहि हाच आहे. सांख्य आणि योग या शास्त्रांचा आश्रय करणारे लोक देखील याचीच प्रशंसा करितात. वेदाध्ययन केलेले लोक ब्रह्मवेत्त्यांना आत्मपदाकडे पोंचविण्याला मार्गभूत असा हाच आहे, असें म्हणतात. आपण देखील अशाच प्रकारें समजा याविषयीं संशय घेऊं नका. सत्वगुणाचा अवलंब करून आपण सदैव श्रीकृष्णाचेंच ध्यान करा. कारण, विश्वव्यापक श्रीकृष्णाहून श्रेष्ठ अशी देवता जगतामध्यें दुसरी नाहीं. हे विप्रहो, ॐ हें अक्षर परमेश्वराचें वाचक[1] असल्यामुळें सदैव त्याचेंच पठण करा. आणि त्याचा अर्थ जो श्रीविष्णु त्याचें ध्यान करीत जा. असें झालें असतां तुह्माला मोक्षप्राप्ती होईल यांत संशय नाहीं. कारण, अशा रीतीनें तुह्मीं श्रीविष्णूचें ध्यान केलें म्हणजे तो प्रत्यक्ष येऊन तुह्माला प्रसन्न होईल. आणि तो देव श्रीविष्णु तुमच्या जन्ममरणाचा पूर्णपणें नाश करील. अर्थात् तुह्माला मोक्ष देईल. यास्तव, हे विप्रहो, जर तुह्माला भ्रंशहीन अशा ब्रह्मपदाच्या प्राप्तीची इच्छा असेल तर तुह्मी श्रीविष्णूचें ध्यान करा. हा सर्वांचा पिता असून सांसारिक वैभवाचा अर्थात् संसारमय दुःखाचा नाश करणारा आहे. यास्तव, या श्रीविष्णूचें स्मरण करा आणि वेदत्रयस्वरूपी अशा या श्रीविष्णूचें नामपठणही करा. आपण प्रयत्नपूर्वक सदैव मनोनिग्रह करा. कारण, हे तपोधनहो, अंतःकरण शुद्ध झालें म्हणजे विष्णु प्रसन्न होतो. नानाप्रकारच्या प्रयत्नांनीं आपण माझें ध्यान करा. आणि त्या द्वारानें मग श्री विष्णूचें ज्ञान संपादन करा. हे विप्रहो, श्रीविष्णूची प्राप्ती व्हावी एतदर्थ आपण सदैव माझी उपासना केली पाहिजे. हा जो उपाय मी आपणास सांगितला आहे त्याविषयीं संशय नाहीं. हे विप्र, मायाविशिष्ट

१ तस्य वाचकः प्रणवः —योगदर्शन.

जो परमात्मा तो हा श्री विष्णूच आहे, त्याची प्राप्ती व्हावी एतदर्थ तुह्मी आपल्या पातकाचा नाश करण्याचा प्रयत्न करा. तो अशा रीतीनें कीं ज्या योगानें तुमची सर्व बुद्धि निर्मल होऊन जाईल. सारांश, हे ब्राह्मण श्रेष्ठहो, ज्या योगानें हा देव श्रीविष्णु प्रसन्न होईल, तशा प्रकारचें आचरण तुह्मी करा.

वैशंपायन म्हणाले:—राजा जनमेजया, याप्रमाणें श्रीशंकरांनीं सांगितलें असतां त्या सर्व पुण्यशील ऋषींनीं तें बरोबर रीतीनें जाणलें व आपल्या संशयाचा निरास केला. ते हात जोडून श्रीशंकराला म्हणाले:—आपण ह्मणतां तें सर्व तसेंच आहे. आमचा सर्व संशय नष्ट झाला, आपण जी ही निरुपम गोष्ट सांगितली ती आह्मी स्वीकारिली व यासाठींच आज आह्मी आपल्या वसतिस्थानीं अर्थात् कैलास पर्वतावर आलों. आपणा उभयतांच्या समागमामुळें आमच्या प्रचंड अशा सर्व मोहाचा नाश झाला. हे देवाधिदेवा, आपण जें सांगत आहां तेंच आह्माला अत्यंत कल्याणकारक आहे.

असो, भगवान् रुद्रानें सांगितलें त्याप्रमाणें आह्मी श्रीविष्णूच्या प्राप्तीसंबधानें प्रयत्न करूं असें म्हणून आनंदित झालेल्या त्या ऋषींनीं सर्व लोकांच्या पातकाचा संहार करणाऱ्या श्रीविष्णूला प्रणाम केला.

## अध्याय नव्वदावा.

—:०:—

### शिवकृत श्रीविष्णुस्तोत्र.

वैशंपायन म्हणतात:—राजा जनमेजया, तदनंतर सर्वांना जणुं आश्चर्यचकित करून सोडणारा भगवान् रुद्र, सर्व ऋषि श्रवण करीत असतां, स्पृहणीय वचनरूपी स्तोत्रांनीं पापापहारक जगन्नायक श्रीविष्णूची स्तुति करूं लागला.

रुद्र म्हणाला:—हे अच्युत, ज्ञानसंपन्न अशा तुज भगवान् वासुदेवाला नमस्कार असो. ज्याच्या प्रकाशाच्या योगानें हें सर्व जग प्रत्यहीं प्रकाशित होतें, त्या सूर्यस्वरूपी अशा तुला नमस्कार असो. जो शीतल किरण असलेला प्रभु या सर्व लोकांना गार करून सोडतो त्या चंद्राचें स्वरूप धारण करणाऱ्या तुज विष्णूला नमस्कार असो. सर्व प्राण्यांची काळजी वाहणारा जो वस्तुतः एक असतांही जीवस्वरूपी असल्यामुळें अनेक स्वरूपांनीं युक्त आहे व जो सर्व लोकांना आनंदित करितो त्या सर्वस्वरूपी अशा तुज परमात्म्याला नमस्कार असो. हे हरे, वाक्स्वरूपी अशा तुजला नमस्कार असो. ज्यानें आपल्या हातामध्यें दर्भ व वल्कलें सदैव धारण केलीं असून, सर्व वेदांचें पोषण केलें आहे, त्या ब्रह्मदेवाचें स्वरूप धारण केलेल्या तुजला नमस्कार असो. हे भगवन्, सर्व जगतावर सदैव दृष्टि असलेला व प्रलयकालीं सर्वांचा संहार करणारा क्रोधरूपी व विकृतस्वरूप धारण करणारा जो रुद्र तो तुझेंच स्वरूप आहे, अशा तुजला नमस्कार असो. जगदुत्पत्तिकालीं सर्व प्राण्यांचा उत्पादक तूंच आहेस. सर्व प्राण्यांना प्राण देणारा, वस्तुतः जन्मशून्य असलेला, विश्वव्यापक, जगाचा उत्पादक व ब्रह्मदेवाचें स्वरूप धारण करणारा जो तूं त्या तुला नमस्कार असो. हे देवाधिदेव, मूलप्रकृति अशी संज्ञा असलेलें सर्व प्राण्यांचें जें उत्पत्तिस्थान व सर्वांस जें आदिभूत त्या प्रधानाचें स्वरूप धारण करणाऱ्या तुजला वारंवार नमस्कार असो. हे हरे, प्राण्यांच्या पृथ्वीमध्यें गंधाच्या स्वरूपानें वास्तव्य करणारा, घन व घनस्वभाव[1] असलेला गंधस्वरूपी जो तूं त्या तुला नमस्कार असो.

१ 'घनता' हा पृथ्वीचा गुण आहे; व पृथ्वी ही गंधतन्मात्रक आहे.

प्राण्यांच्या सुखाला कारणीभूत, जलामध्यें सर्वत्र वास्तव्य करणारा व अनेक प्रकारचीं स्वरूपें धारण करणारा, रसस्वरूपी जो तूं त्या तुला नमस्कार असो. आपल्या तेजानें सर्व जगताला प्रकाशित करणारा, किरणसंपन्न, सर्व प्राण्यांचें सदैव हित करणारा असा जो भगवान् सूर्य तत्स्वरूपी अशा हे जगन्नायका देवा, तुजला नमस्कार असो. सुखदुःख देणारा. शीत-व-उष्ण स्पर्श ज्या वायूचा गुण आहे, त्या स्पर्शरूपी स्वभाव असलेल्या वायूचें स्वरूप धारण करणाऱ्या तुजला नमस्कार असो. सर्वांच्या कानीं पडणारा व आकाशाचे ठिकाणीं राहणारा जो शब्द तो, हे भगवन् विष्णो, तूंच आहेस. सर्वस्वरूपी अशा तुजला नमस्कार असो. हे जगन्नाथ आपल्या मायेनें मनुष्याचें स्वरूप धारण करून ज्यानें सर्व जगताचें पालन केलें त्या मायायुक्त व मायासंपर्कशून्य अशा परब्रह्माची प्राप्ति करून देणाऱ्या तुजला नमस्कार असो. सर्व जगाचें आदिकारण, जगत्स्वरूपी असल्यामुळें गुणात्मक व परमात्मस्वरूपी असल्यामुळें निर्गुण, निराकार असल्यामुळें चिंतन करण्यास अशक्य आणि साकार असल्यामुळें सुखानें चिंतन करितां येणारा ध्येयस्वरूपी जो तूं त्या तुजला नमस्कार असो. श्रीशंकर, श्रीविष्णु आणि श्रीब्रह्मदेव एतत्स्वरूपी, परब्रह्माच्या प्राप्तीचें साधन, ब्रह्मवेत्ता व विशाल अशा ब्रह्मार्चे रूप धारण करणारा, जो तूं त्या तुजला नमस्कार असो. जगत्स्वरूपी व म्हणूनच अनेक स्वरूपें असलेला व म्हणूनच अनंत मस्तकें, अनंत हस्त, अनंत मुखें आणि अनंत नेत्र असलेल्या तुज विश्वजनकाला नमस्कार असो. हे हरे, सर्व प्रकारच्या वाणींनीं युक्त असलेला व सर्व प्राण्यांचे ठिकाणीं सदैव वास्तव्य करणारा, इंद्रिय, जीव, आणि विषय यांचीं स्वरूपें धारण करणारा, जो तूं त्या तुजला नमस्कार असो. वेदांस केवळ भूषणभूत अशा हयग्रीवाचें रूप धारण करणाऱ्या तुला नमस्कार असो. हे अग्निपते, अग्निस्वरूपी अशा सर्व अधिपतीस तुला नमस्कार असो. सर्व तेजांचा अधिपति सूर्यस्वरूपी, शनैश्चररूपी अथवा यमस्वरूपी अशा तुजला नमन असो. हे हरे, शीत गुण विशिष्ट मूर्ति असलेल्या सौम्य चंद्रस्वरूपी अशा तुजला वंदन असो. यज्ञ, यज्ञाधिदेवता, होमद्रव्य, होमद्रव्यसंस्कार, स्रुवा, पात्रें आणि यज्ञाचीं इतर अंगें एतत्स्वरूपी असलेल्या तुज परमात्म्यास प्रणाम असो. ॐकारस्वरूपी मूर्ति असलेला व सगुण आणि निर्गुणही असल्यामुळें नश्वर आणि अनश्वरही असलेला, ज्ञानरूपी, वेदस्वरूपी, शस्त्र धारण करणारा, शस्त्ररूपी, गदा, खड्ग, शंख, चक्र, शूल आणि ढाल हीं धारण करणाऱ्या वरदायक अशा तुजला वारंवार प्रणिपात असो. हे गुरो, ज्ञानप्रिय, ज्ञानसंपन्न, ज्ञानरूपी, सुखात्मक, जगत्संहारक, विश्वव्यापक, सर्वांच्या ठिकाणीं जीवस्वरूपानें वास्तव्य करणाऱ्या अशा तुजला नमस्कार असो. सर्व लोकांचा अधिपति, सर्वांचा उत्पादक, स्वभावतः शुद्ध आणि यज्ञवराहरूपी अशा तुजला वंदन असो. हे विष्णो हे हरे, हे वासुदेव, हे ज्ञानसंपन्न, हे सर्वत्र वास्तव्य करणाऱ्या तुजला वारंवार नमस्कार असो. हे जनार्दन, या सर्व लोकांचें संरक्षण कर.

याप्रमाणें श्रीविष्णूची स्तुति केल्यानंतर श्रीशंकर त्या मुनिश्रेष्ठांस म्हणाले कीं, आपण या स्तोत्राचें पठण करीत सर्व प्राण्यांचें उत्कृष्ट प्रकारें संरक्षण करणाऱ्या श्रीविष्णूकडे जात जा. तो तुमचें कल्याण करील. पापांपासून मुक्त करणारें हें स्तोत्र जे कोणी हृदयांमध्यें धारण करतील, पठण करतील अथवा श्रवण करतील त्यांजवर धर्मस्वरूपी श्रीविष्णु प्रसन्न

अंत:करणानें अनुग्रह करतील व मोक्ष देतील यांत संशय नाहीं. प्रशंसनीय व्रत आचरण करणाऱ्या आपणाला जर मोक्षप्राप्तीची इच्छा असेल तर आपण अंत:करणामध्यें भक्तवत्सल श्रीविष्णूचें ध्यान करावें.

इतकें भाषण केल्यावर श्रीमती देवी पार्वती आणि गण यांसहवर्तमान, सर्व प्राण्यांविषयीं काळजी वाहणारे भगवान् शंकर त्याच ठिकाणीं अंतर्धान पावले. त्या वेळीं सर्व ऋषींनीं त्यांना नमस्कार केला. आणि श्रीशंकर हेंच परब्रह्म असून जलशायी श्रीविष्णु हा श्रीशंकरच आहे असें समजून आल्यामुळें त्यांना अत्यंत सुख झालें व अतिशय आश्चर्यही वाटलें. या ज्ञानामुळें ते आपल्यास कृतार्थ मानूं लागले. तदनंतर हे नृपश्रेष्ठा, सर्व लोकपालही विश्व-व्यापक श्रीकृष्णास आनंदानें नमस्कार करून आपल्या गणां-सहवर्तमान आपआपल्या मंदि-राकडे गेले. सायंकाळीं भगवान् जगन्नायक शंख, चक्र, गदा, खड्ग, शार्ङ्ग धनुष्य, तूणीर आणि कवच धारण करणारे भगवान् श्रीकृष्ण पक्षिश्रेष्ठ गरुडावर आरोहण करून सर्व देव मुनिजनांचें वास्तव्य असलेल्या बदरिकाश्रमा-कडे आल्या मार्गानें निघून गेले. तेथें गेल्या-नंतर जसजशी गांठ पडेल तसतशा रीतीनें सर्व ऋषींनीं प्रणाम करून त्यांचें पूजन केलें. व नंतर ते सुखासनावर बसले.

## अध्याय एक्याण्णवावा.

—:०:—

### पौंड्रकाची गर्वोक्ति.

वैशंपायन म्हणाले:—राजा जनमेजया, पौंड्रक नांवाचा एक सर्वश्रेष्ठ नृपति होता तो मोठा पराक्रमी व सामर्थ्य संपन्न योद्धा असून त्याजपाशीं उत्कृष्ट सैन्यहि होतें. हा राजा, यादवांचा शत्रु असून आपल्या सामर्थ्याच्या जोरावर श्रीकृष्णाचा नेहमी द्वेष करीत असे. त्यानें याच वेळीं सर्व राजांस बोलावून आणिलें आणि त्यांच्या सभेंत भाषण केलें.

तो म्हणाला, मी सर्व पृथ्वी जिंकली आणि सर्व नृपश्रेष्ठांचाहि पराजय केला; तथापि बलानें उन्मत्त झालेले व कृष्णाच्या आश्रयामुळें गर्व-युक्त झालेले सर्व यादव कृष्णाचा आश्रय अस-ल्यामुळेंच मला कर देत नाहींत. तो कृष्णहि चक्राच्या जोरावर मला तृणतुल्य समजत आहे. त्या गौळ्याला आपल्या हातीं चक्र आहे, ह्याची सदैव मोठी घमेंड आहे. शंख, चक्र, गदा, शार्ङ्गधनुष्य, बाण आणि तूणीर हीं आपल्यापाशीं आहेत व आपल्याला साहा-य्यकर्तेंहि आहेत, इत्यादि गोष्टीमुळें त्याला सांप्रत मोठा ताठा चढलेला आहे. लोकांमध्यें 'वासुदेव' असें माझें नांव प्रसिद्ध असतां मदोन्मत्त झालेल्या त्या गवळ्यानें तेंच नांव स्वतः घेतलें आहे. हे नृपश्रेष्ठहो, माझेंही चक्र मोठें व तीक्ष्ण आहे. तें फार भयंकर असून त्याला एक हजार आरा आहेत, त्यालाही सुदर्शन असें नांव आहे. तें त्याच्या चक्राचा गर्व हरण करणारें इतकेंच नव्हे तर त्याचा नाशही करणारे आहे. त्या गौळ्याच्या पोराचें चक्र जसें नानाप्रकारचीं स्वरूपें धारण करीत असून अकुंठित आहे, त्याचप्रमाणें माझेंही आहे. प्रचंड टणत्कार करणारे माझेंही शार्ङ्ग नांवाचें दिव्य धनुष्य आहे. मजपाशींही प्रचंड आणि बळकट अशी कौमोदकी नांवाचीही गदा आहे. ही मी एक हजार भार[1] पोलादानें उत्कृष्ट

[1] येथें भार हा शब्द संस्कृतांतील असून तो एक प्रकारच्या वजनाचें माप दाखविणारा आहे असें समजावें. याचें प्रमाण—चार तोळे म्हणजे एक पल. शंभर पलें म्हणजे एक तुला. आणि वीस तुला म्हणजे एक भार, असें आहे. यावरून पहातां एक हजार भार वजन म्हणजे आजकालचें एक लक्ष शेर ( किंवा सवाशें खंडी ) भरतात, ( एक शेर वजन ८० रुपये भार ).

प्रकारानें बनविलेली आहे. माझा हा विशाल आणि बळकट असा नंदन नांवाचा भयंकर खड्ग यमाचाही संहार करणारा आहे. व म्हणूनच त्या कृष्णाच्या खड्गाचाही नाश करण्यास समर्थ आहे. त्याचप्रमाणें हा मी देखील गदा, शंख, चक्र, खड्ग आणि कवच धारण करून संग्रामामध्यें कृष्णाचा पराजय करीन यांत संशय नाहीं. हे नृपहो, तुह्मीं मलाच सदोदित गदी, चक्री, शंखी, शार्ङ्गी वीर असें म्हणा. मलाच तुह्मी वासुदेवही म्हणा. त्या यादवश्रेष्ठाला म्हणूं नका. कारण त्या गौळ्याच्या पोराला ठार केल्यानंतर मी केवळ एकटाच वासुदेव असणार माझा मित्र जो महात्मा नरक त्याचा बलत्कारानें ज्यानें वध केला त्याला मीच ठार करणार. हे नृपहो, मला जर तुह्मीं ( वासुदेव ) असें न म्हणाल तर तुह्माला शंभर भार दंड करण्यांत येईल. तसेंच शंभर निष्क सुवर्ण व विपुल धान्य, हे तुह्माला दंडादाखल द्यावें लागेल.

हे राजा, कोणाच्याही अंतःकरणाला सहन होणार नाहीं अशा प्रकारचें जेव्हा त्या नृपश्रेष्ठानें भाषण केलें, तेव्हां ज्यांना शौर्य आणि सामर्थ्य यांतील रसांची ओळख आहे, असे जे कांहीं बलाढ्य राजे होते त्यांना लज्जा वाटली. परंतु दुसरे जे कोणी सामर्थ्याच्या धुंदीनें शेंफारून गेले होते, तेही त्या राजाप्रमाणेंच ओरडून 'आह्मीं संग्रामांत कृष्णाचा पराजय करूं ' असें म्हणाले.

~~~~~~

## अध्याय ब्याण्णवावा.

—:०:—

### पौंड्रकनारदसंवाद.

वैशंपायन म्हणाले:—पुढें सर्व लोकांचें ज्ञान असलेले मुनिश्रेष्ठ नारद कैलास शिखरावरून निघून पौंड्रकाच्या नगरासमीप आले व तेथें आकाशांतून खालीं उतरून त्या राजाकडे गेले. मग नंतर द्वारपालानें अनुज्ञा दिल्यानंतर ते त्या राजाच्या मंदिरांत गेले. तेव्हां राजानें त्या महामुनीला अर्घ्यादि उपचार अर्पण केले. पुढें शुभ्र वस्त्रानें आच्छादित केलेल्या आसनावर नारद बसले असतां, सामर्थ्यानें ताठून गेलेल्या त्या पौंड्रकानें कुशल प्रश्नपूर्वक त्यांस असें म्हटलें, ' आपण सर्व कामांत कुशल आहांत आणि महात्मे जे देवसिद्ध गंधर्व यांमध्यें प्रख्यात आहांत. आपण वाटेल तेथें जाऊं शकतां, वाटेल तेथें वाटेल त्या वेळीं जाण्यास आपणास कधी प्रतिबंध नसतो. सारांश, हे ब्राह्मणश्रेष्ठा, आपणाला जेथें जातां येणार नाहीं असें एकहि स्थळ या ब्रह्मांडांत नाही. यास्तव हे नारदा, आपण ज्या ज्या ठिकाणीं जाल त्या त्या ठिकाणीं तपाची सिद्धि झालेला आणि शौर्यानें लोकांत प्रसिद्ध असलेला जो ( अस्मादिक ) पौंड्रक तोच ' वासुदेव ' या शब्दानें प्रख्यात आहे असें सांगा. शंख, चक्र, गदा, शार्ङ्ग, खड्ग, तूणीर आणि कवच धारण करणारा, सिंहाप्रमाणें शूर अशाही राजांचा पराजय करणारा, सर्वांना सर्वकाळ दान करणारा, संपूर्ण राज्याचा उपभोक्ता, स्वतःच्या सामर्थ्यानें राज्य करणारा, स्वजनांचें संरक्षण करणारा, आणि शत्रूंच्या सैन्यांकडून पराजय न पावणारा बलाढ्य असा जो हा पौंड्रक तोच खरा वासुदेव म्हणून प्रख्यात आहे असें म्हणा. सांप्रत, ज्या एका गौळ्याला ' वासुदेव ' असें नांव पडलें आहे, त्याच्या अंगीं हें माझें नांव धारण करण्याइतकें शौर्य आणि सामर्थ्य नाहीं. हे ब्राह्मणश्रेष्ठा, तो गवळी लहानपणापासूनच फुकट माझें नांव लावून घेत आहे. पण आपण हें निश्चितपणें समजा कीं, बलाढ्य अशा त्या कृष्णाचा पराजय करून मी एकटाच या जग-
~~~~~~

सामर्थ्ये ' वासुदेव ' होऊन राहणार. मी स्वतःच्या सामर्थ्यानें सर्व यादवांना धुडकावून लावून त्याची नगरी धुळीस मिळविणार. हे महाज्ञानी नारदा, जेथें तो कृष्ण राहतो त्या द्वारकेशीं मी टक्कर देणार. हे सर्व बलाढ्य नृपति मला येऊन मिळाले असून मजकडे वेगानें चालणारे अश्व व वायूप्रमाणें वेग असलेले रथही मजपाशीं असून मदोन्मत्त झालेले एक हजार उंट आणि दहा लक्ष हत्ती आहेत. त्या सैन्याच्या साह्यानें मी संग्रामामध्यें कृष्णाला ठार करणार. यास्तव, हे विप्र, आपण माझ्या नगरामध्यें आणि इंद्राकडेही मी ह्मणतों तसेंच सदैव सांगा. हे प्रभो, माझी आपणाला ही प्रार्थना आहे. हे तपोधना, मी आपणाला नमस्कार करतों.

नारद म्हणालेः—हे राजा, जेथें जेथें ब्रह्मांड आहे त्या त्या ठिकाणीं वाटेल त्या वेळीं मी जाऊं शकतों. मी कोणत्याही कामाकरितां गेलों तरी कोणीही मला प्रतिबंध करीत नाहीं. तथापि हे नृपश्रेष्ठा, हातीं चक्र धारण करणारा देवाधिदेव श्रीकृष्ण त्या पृथ्वीचें पालन करीत असतां, तूं सांगतोस तसें मला कसें म्हणतां येईल ? सर्वत्र वास्तव्य करणाऱ्या व सर्व दुष्टांचा त्यांच्या संबंधी लोकासहवर्तमान नाश करणाऱ्या श्रीकृष्णापुढें दुसरा वासुदेव म्हणून कोण असणार ? बुद्धि आणि इंद्रियें यांचें देखील नियमन करणाऱ्या श्रीकृष्णापुढें असें कोण बोलूं शकणार आहे ? केवळ हलक्या जातीचे क्षुद्र लोक मात्र अज्ञानामुळें असें बोलूं शकतील. कल्पनातीत सामर्थ्य असलेला शार्ङ्ग धनुष्य आणि गदा धारण करणारा सर्वगामी श्रीकृष्ण तुझ्या या दर्पाचा नाश करील. तो आदिदेव पुराणपुरुष श्रीकृष्ण तुझ्या दर्पाचा खात्रीनें नाश करील. हे महा राजा त्याच्या हातीं असलेलें शार्ङ्ग धनुष्य आणि अतिशय भयंकर खड्ग, यांचे प्रहार अद्यापि तुझ्यावर होऊं लागले नाहींत. तुझें हें भाषण केवळ उपहास्य आहे. हे राजा, तुझें अत्यंत हंसें व्हावें असाच काल सांप्रत आलेला आहे.

## अध्याय त्र्याण्णवावा.

—:०:—

### पौंड्रकाची द्वारकेवर स्वारी.

वैशंपायन म्हणतातः—हे महाराजा, तदनंतर अतिशय धुंद होऊन गेलेला पौंड्रक कोपाविष्ट होऊन त्या राजांच्या सभेंत विप्रश्रेष्ठ अशा नारदास म्हणाला, कीं हे ब्रह्मर्षे, तूं हें काय बोलतो आहेस ? तुला वाटलें असेल कीं, मी ब्राह्मण आहे, पण मी ब्राह्मणांचा सुद्धां राजा आहें, अर्थात् ब्राह्मणांना सुद्धां शासन करण्याचें सामर्थ्य मजमध्यें आहे. अथवा, जा तूं तुला वाटेल तिकडे. तुझें शासन मी करूं इच्छित नाहीं. कारण तूं नेहमीं शाप देत असतोस. अहो महाज्ञानी, आपली आह्माला भीति वाटते. जा आतां आपण वाटेल तिकडे.

याप्रमाणें नृपश्रेष्ठ बोलला असतां नारदमुनि मुकाट्यान निघाले व ज्या ठिकाणीं श्रीकृष्ण होते तेथें आकाश मार्गानें निघून गेले. पुढें त्यांनीं पौंड्रकासंबंधाचा सर्व वृत्तांत श्रीकृष्णाला कळविला. तो ऐकून भगवान् श्रीकृष्ण म्हणाले, ' नारदा, तो वाटेल तें बोलूं दे. हे द्विजश्रेष्ठा, उद्यांच मी त्याची खोड जिरवितों. ' असें म्हणून श्रीकृष्ण बदरीकाश्रमामध्यें स्वस्थ राहिले. इकडे ऐश्वर्यसंपन्न, सत्यप्रतिज्ञ, महाशूर पौंड्रकही अनेक सैन्य, हजारों हत्ती व घोडे, अनेक लक्ष पायदळ, कोट्यवधि शस्त्रें आणि एकलव्यप्रभृति नृपति यांना बरोबर घेऊन मध्यरात्रीं द्वारकेवर स्वारी करण्यास निघाला. त्या वेळीं त्याजपाशीं आठ हजार रथ, दहा हजार हत्ती आणि

एक अर्बुद पायदळ, इतकें सैन्य जमलेलें होतें. हे महाराजा, या सैन्यानें युक्त असलेला तो नृपश्रेष्ठ उदयाचलावर असलेल्या सूर्याप्रमाणें शोभेनें चमकत होता. त्या रात्रीं भयंकर अंधःकार असल्यामुळें पायदळांनीं हातांत दिवट्या धरलेल्या होत्या. याप्रमाणें, सैन्यांतील ते महाबलाढ्य शौर्यसंपन्न नृपश्रेष्ठ अनेक प्रकारचीं शस्त्रें फेंकीत द्वारकेला गेले.

हे राजा, वीर्यसंपन्न अशा त्या पौंड्रकाचा रथही फार प्रचंड होता. त्यांत अनेक शस्त्रें भरलेलीं असून पट्टे, तरवारी, गदा, परिघ, शक्ति, तोमर, बाण, इटे, धनुष्यें, प्रास, यांनीं तो रथ व्याप्त होऊन गेला होता. ध्वज आणि माला यांची त्याजवर गर्दी होती. व त्याजवर लहान लहान घंटा लावलेल्या होत्या. तो प्रलयकालीन मेघाप्रमाणें भयंकर आणि क्रौर्यसूचक दिसत असून त्याचा आवाजही एखाद्या प्रचंड वाद्यासारखा होता व त्याचें तेज अग्नि किंवा सूर्य यांच्यासारखें होतें. त्या रथावरही पौंड्रकानें कांहीं मशाली लाविल्या होत्या.

अशा प्रकारच्या रथामध्यें बसून तो शौर्यसंपन्न राजा पौंड्रक द्वारकेकडे गेला. जगन्नायक श्रीकृष्णाला व सर्व यादवांनाही ठार करावें अशी त्याची इच्छा होती. तेथें त्या महातेजस्वी पौंड्रकानें आपले सैन्यांतील मुख्य मुख्य राजांना सैन्यांतून निवडून काढिलें; व द्वारकेच्या वेशींत आल्यानंतर सर्व सैन्याची मोठ्या प्रयत्नानें व्यवस्था लावून तो तेथें असलेल्या सर्व राजांना म्हणाला कीं, यादवांना स्पष्टपणें ऐकूं जाईल अशा रीतीनें मोठ्यानें माझें नांव उच्चारून आपण नौबद वाजवा. तुह्मी असें म्हणा कीं, यादवहो, या येथें. करा करा लढाई; नाहीं तर आमचें देणें आहे तें द्या. हा अत्यंत शूर असा पौंड्रक राजा आपणाशीं युद्ध करण्याच्या इच्छेनें व कृष्णाच्या बाहूच्या आश्रयास असलेल्या तुह्मां सर्वांचा वध करण्याच्या इराद्यानें येथें आलेला आहे.

पौंड्रकानें अशी आज्ञा करून पाठविलेले ते सर्व राजे निघाले, तेव्हां त्यांना यादवांचे पुष्कळ बातमीदार भेटले. त्या राजांनीं लक्षावधि मशाली पेटविल्या होत्या आणि ते क्षत्रिय हातांत शस्त्रें घेऊन सिंहाप्रमाणें गर्जना करीत युद्धाच्या इच्छेनें द्वारकानगरीच्या अग्रभागीं सरसावले. त्यांचे शस्त्रांना इतकी धार होती कीं, त्यामुळें त्यांनाही घोंटाळ्यांत पडावें लागत असे. ते सर्व राजे जिकडे तिकडे पसरले. ते म्हणूं लागले, तो यादवांचा पुढारी, जगताचा राजा, कृष्ण कोठें आहे? कुठें आहे तो वीर सात्यकी आणि हार्दिक्य? सर्व यादवांमध्यें उत्कृष्ट ठरलेला तो बलराम कोणीकडे आहे? असें म्हणत ते सर्व नृपश्रेष्ठ लढाई करण्याच्या उद्देशानें श्रीकृष्णाच्या द्वारकानगरीमध्यें गेले. त्यांनीं चोहोंकडून आणलेलीं अनेक शस्त्रें धनुष्यें व बाण हातीं घेतले असून सर्वांनींही चिलखतें चढविलेलीं होतीं.

## अध्याय चवऱ्याण्णवावा.

—:०:—

### पौंड्रकाचा यादवाशीं सामना.

वैशंपायन म्हणतातः—तदनंतर तो सैनिकाचा समुदाय, रात्रीं येऊन ठेपलेलें तें संकट, मोठमोठ्या शस्त्रांची गर्दी, व त्यांच्या खळबळीमुळें उत्पन्न झालेला कल्पांतकालीन वायूप्रमाणें प्रचंड वायु, हीं पहातांच सर्व यादव

१ येथें मूळांत 'सूचक' असा शब्द असून टीकाकारांनीं त्याचा अर्थ बाह्य आणि आभ्यंतर वार्तांचें ज्ञान असलेले यादव योद्धे, असा केला आहे. पण 'सूच', या धातूपासून निघालेल्या या सूचक शब्दाचा अर्थ सैन्याच्या हालचालीची सूचना देणारे असा असला पाहिजे असें वाटतें.

संग्राम करण्याच्या इच्छेनें हातीं शस्त्रें घेऊन तयार झाले. त्या सर्व यादवांनीं हातामध्यें मशाली घेतल्या व अंगामध्यें चिलखतें चढविलीं. ते सर्वही शस्त्रानें लढणारे असून वाटेल त्या प्रकारचें युद्ध करण्यामध्यें कुशल होते. सात्यकी, बलराम, हार्दिक्य, निशठ, महाबुद्धि, उद्धव आणि इतरही सर्व यादव यानींही शस्त्रांची गर्दी केली. त्या शूरांनीं हातांमध्यें तरवारी, गदा व इतरही शस्त्रें घेतलेलीं होतीं. कित्येक रथांत बसलेले होते व कित्येक आयुधें घेऊन घोड्यावर बसलेले होते. कांहीं उदार अंतःकरणाचे, प्रत्यही शस्त्राचा उपयोग करणारे नरश्रेष्ठ, धनुष्य घेऊन युद्ध करण्याविषयीं उद्युक्त झाले; व हातांत मशाली घेऊन तत्काल नगरांतून बाहेर पडून चोहोंकडे पसरले. त्या वेळीं त्या यादवांच्या तोंडून "कोठें आहे तो पौंड्रक" असे उद्गार निघत होते. त्यांच्या हातांतील मशालींनीं तो प्रदेश प्रकाशित झाल्यामुळें तेथें अंधकाराचा लेशही उरला नाहीं. सभोंवारचे प्रदेशांत झक उजेड झाला.

पुढें यादवांचें शत्रूबरोबर अत्यंत भयंकर युद्ध सुरू झालें. त्या वेळीं अंगावर शहारे येतील अशा प्रकारचा प्रचंड नाद होऊं लागला. तेव्हां घोड्याशीं घोडे, हत्तीशीं त्यांच्या कळपांतील म्होरके हत्ती, रथाशीं रथ, स्वाराशीं स्वार, तरवारवाल्याशीं तरवारवाले, आणि गदावाल्याशीं गदावाले जाऊन भिडले. हे परस्परांशीं जाऊन भिडल्यानंतर हातघाई सुरू होऊन तुंबळ रण माजलें. प्रलयकालीन ध्वनीप्रमाणें त्या महात्म्यांच्या प्रचंड गर्जना सुरू होऊन मोठी खळबळ उडून गेली. त्यांनीं धांवून जाऊन कित्येकांवर प्रहार केले व कांहीं राजांना मारण्याचा चोहोंकडे सपाटा चालविला. 'हा पहा, अत्यंत शूर, विशालबाहु असलेला, पुरुष हातीं तरवार घेऊन आम्हावर येऊन पडत आहे.' "हा पहा, तिकडून अत्यंत भयंकर बाण येत आहे." "हा पहा, महा पराक्रमी राजा हातीं गदा घेऊन आम्हां सर्वांना पीडा देत आहे." "हा पहा, अंगांत चिलखत चढविलेला वीर धनुष्यबाण, गदा, आणि तूणीर घेऊन रथांत बसून चोहोंकडे कसा वेगानें पळत आहे!" "हा पहा, वीर हातांत प्रचंड शूल घेऊन सर्व बाजूंनीं इकडून तिकडे फिरत आहे!" "हा पहा, अणकुचीदार दांत असलेला हत्ती चोहोंकडे पळत आहे." "हा पहा, कोणी शूर वायूच्या वेगानें चोहोंकडे धांवत आहे." अशा प्रकारचे उद्गार सैनिकांच्या तोंडून निघूं लागले. त्या वेळीं बाणाला बाण, काठ्याला काठ्या, भाल्याशीं भाले, गदांला गदा, परिघांला परिघ आणि शूलांना शूल प्रतिघात करूं लागले. हे महाराजा, याप्रमाणें सुरवात झाल्यानंतर मोठें प्रचंड युद्ध माजलें व भयंकर गर्जना सुरू झाल्या. त्या वेळीं त्या संग्रामांत कलकलाट करणारीं मोठमोठीं हजारों भूतें प्रकट झालीं. शंखांचा प्रचंड नादयुक्त शब्द रात्रौ त्या रणांगणांत सुरू झाला. अशा रीतीनें यादव आणि पौंड्रक-सैन्य यांच्यामध्यें सुरू झालेल्या त्या भयंकर संग्रामांत अंगावर शहारे येतील अशा प्रकारचा भयंकर ध्वनी होऊं लागला. त्या-वेळीं कित्येक भूपति त्या ध्वनीनें गर्भगळित झाल्यामुळें भूमीवर पडले व कित्येक तर मान अस्ताव्यस्त टाकून रणांगणावर पडलेल्या लोकांना लागूनच पडून राहिले. कित्येक हातीं शस्त्रें घेतलेले महावीर भूपति भूमीवर लोळूं लागले. कित्येकांच्या चिलखतांचें तुकडे तुकडे होऊन गेले. हजारों लोक जमीनीशीं खिळून राहिले. शस्त्रप्रहार करणाऱ्या अनेक मोठमोठ्या वीरांचीं शरीरें छिन्नविछिन्न होऊन गेलीं.

कित्येक जणूं यमाच्या राज्यांतील लोकसंख्या वाढविण्यासाठींच गतप्राण होऊन पडले.

हे राजा, याप्रमाणें संग्राम करूं लागलेल्या त्या सर्व लोकांचा संहार चालला असतां प्रलयकालीन संहार करणाऱ्या यमाच्या तोंडीचा एकलव्य नांवाचा एक निषादांचा ( भिल्लांचा) अधिपति हातीं प्रचंड धनुष्य घेऊन हजारों बाण सोडून यादवांना जर्जर करूं लागला. त्यानें मर्मभेद करणारे शेंकडों तीक्ष्ण बाण सोडून सर्व यादवांचें सैन्य चोहोंकडून अगदीं ठेंचून काढिलें. त्याजबरोबर लढाई करूं लागलेल्या हजारों क्षत्रियांची त्यानें खोड जिरविली. त्यानें निशठ नांवाच्या यादवाला नमत्या पेरांचे पंचवीस बाण मारिले; व सारणाला दहा, हार्दिक्याला पांच, उग्रसेनाला नव्वद, वसुदेवाला सात, उद्धवाला दहा आणि अक्रूराला पांच बाण मारून विद्ध केलें. याप्रमाणें त्यानें प्रत्येकावर तीक्ष्ण बाणांचे प्रहार केले व यादवांच्या सैन्यास पळावयास लावलें. त्या शूर एकलव्यानें मोठ्यानें ओरडून आपलें नाव यादवश्रेष्ठांच्या कानांवर घातलें. आणि म्हटलें, ‘ हा मी सामर्थ्यसंपन्न एकलव्य आहें, आतां पहातों कोठें जातो तो महाबलाढ्य वीर सात्यकी आणि मदानें धुंद झालेला तो गदा हातीं घेतलेला प्रत्यक्ष बलराम तरी आतां कोठें जातो तो ! ’ त्यानें सिंहासारखी गर्जना करून याप्रमाणें म्हटलें. या त्याच्या गर्जनेनें सिंहसुद्धां खरोखर आश्चर्यचकित झाले असतील.

## अध्याय पंचाणववावा

—:०:—

### सात्यकी आणि पौंड्रक यांचे वीरालाप.

वैशंपायन म्हणाले:––महाराजा जनमेजया, पुढें जेव्हां सैन्य परत फिरलें, संग्रामामध्यें चोहोंकडे प्राणनाश होऊं लागल्यामुळें ते शौर्यसंपन्न यादव गर्भगळीत होऊन गेले, मशाली शांत झाल्या आणि चोहोंकडे स्तब्धता पसरली, तेव्हां उत्कृष्ट अशा यादवसैन्याला आपण पराजित केलें आहे असें समजून महाशूर पौंड्रक आपल्या सैनिकांना म्हणाला “ हे नृपश्रेष्ठहो, तुम्ही सत्वर या नगरीमध्यें शिरा आणि जेथें ज्याचा उपयोग असेल त्या मानानें टांक्या, बर्चा, कुऱ्हाडी, भाले, सामान्य प्रतीचे आणि ओढणीनें ओढून नेले जाणारे पाषाण, यांचा योग्यप्रकारें उपयोग करून, तुम्ही या नगरीमध्यें चोहोंकडे फिरा; मोठमोठीं तटबंदी, आणि वाडेहीं धुळीस मिळवून सोडा, लग्नाच्या मुली आणि दासी या असतील तेथें पकडा आणि बहुमूल्य रत्नें व पुष्कळ द्रव्य लुटून घ्या. ”

अशी पौंड्रकाची आज्ञा होतांच धिप्पाड शरीर असलेले ते सर्व राजे हातांत कुऱ्हाडी घेऊन चोहोंकडे शिरले. आणि तटबंदी वाडे आणि जनसमुदाय यांचा उच्छेद करण्याची त्यांनीं सुरवात केली. जेव्हां तटबंदीवर त्यांच्या टांक्या झडूं लागल्या, तेव्हां प्रचंड शब्द होऊं लागला. हे महाराजा, त्या महबलाढ्य राजांनीं पूर्व द्वारावर जाऊन तेथील तटबंदी उध्वस्त करून सोडिली. तो अत्यंत भयंकर शब्द कानीं येतांच सात्यकीच्या अंगांत क्रोधाचा संचार झाला. तो मनांत म्हणाला, यादवाधिपति श्रीकृष्णानें अविनाशी अशा श्रीशंकरांचें दर्शन घेण्यासाठीं कैलासशिखराकडे जातेवेळीं सर्व भार मजवर टाकिलेला आहे. यामुळें त्या द्वारवती नगरीचें रक्षण मी अवश्य केलें पाहिजे. असा मनामध्यें विचार करून त्यानें, महात्म्या दारूकाच्या पुत्रानें सज्ज करून पुढें आणलेल्या

१ यावरून विवाहित स्त्रियांस धरणें ही तो अनीति समजत होता, असें दिसतें. एतावता अनीतींतहि नीतीचा पदर होता.

विशाल आणि भयंकर अशा रथामध्यें आरोहण केलें. यावेळीं तो स्वतःच सारथीहि बनला. त्यानें कितीही शस्त्रप्रहार झाले तरी बिनकूल भंगणार नाहीं, असें भयंकर चिलखत अंगावर चढविलें व एक प्रचंड धनुष्य आणि विषारी सर्पाप्रमाणें भयंकर बाण हीं ग्रहणकेलीं. बाहुभूषणें आणि कुंडलें धारण केलीं.

अस्तु; याप्रमाणें बाणांचे भाते, बाण, धनुष्यें, गदा व खड्ग हीं बरोबर घेऊन श्रीकृष्णाच्या भाषणाचें स्मरण करीत तो शिनिपुत्र सात्यकी युद्ध करण्यासाठीं निघाला. तो वीरश्रेष्ठ ज्या ठिकाणीं मशालीचा प्रकाश पडला होता तेथें गेला. त्याच्याचप्रमाणें महावीर बलरामहि प्रकाशमान अशा रथामध्यें बसून आणि गदा व बाण घेऊन संग्राम करण्याच्या इच्छेनें चालून गेला. इतर यादवहि सिंहाप्रमाणें गर्जना करीत आणि भयंकर कलकलाट करीत जाऊं लागले. साक्षात् बलवान् उद्धवहि संग्रामामध्यें वाटेल त्या ठिकाणीं उत्कृष्ट प्रकारें नेऊन पोंचविणाऱ्या, प्रचंड गर्जना करीत असलेल्या, मदोन्मत्त आणि शीघ्रगामी, अशा हत्तीवर बसून युद्धासाठीं गेला. त्या महाबलाढ्य उद्धवाला जेव्हां हत्तीचें गतिकौशल्य बरोबर कळून आलें, तेव्हां अत्यंत आनंद झाला. तदनंतर हार्दिक्य वगैरे इतरहि यादव कोणी रथावर व कोणी गजावर आरोहण करून संग्रामाच्या उत्कृष्ट इच्छेनें निघाले.

त्या सर्व सामर्थ्यसंपन्न यादवांच्या पुढें मशालीची चोहोंकडे गर्दी झाली होती. ते सिंहाप्रमाणें मोठमोठ्यानें गर्जना करीत होते. आणि त्यांना श्रीकृष्णाच्या वचनाचें स्मरण होत होतें. अस्तु; संग्रामाची अत्यंत इच्छा असलेले ते सर्व महाबलाढ्य यादव पूर्वद्वारांत येऊन एकत्र होऊन उभे राहिले. याप्रमाणें हें अत्यंत भयंकर सैन्य येऊन उभें असून मार्गावर मशालींच्या प्रकाशाचा चोहोंकडे लखलकाट पडला आहे, असें पाहून, राजा जनमेजया, धनुष्य, बाण, गदा आणि तूणीर हीं जवळ असलेल्या शूर सात्यकीनें धनुष्याला प्रचंड बाण जोडला व वायव्य अस्त्राची योजना केली. त्या प्रतापशाली सात्यकीनें आपलें उत्कृष्ट धनुष्य कानापर्यंत ओढलें आणि शत्रुसैन्यावर वायव्यास्त्र सोडलें. तेव्हां त्या ठिकाणीं शत्रुपक्षाकडील जे नरश्रेष्ठ होते ते सर्व त्या वायव्यास्त्राच्या प्रभावानें पराजित होऊन जेथें पौंड्रक उभा होता तेथें जाऊन उभे राहिले. त्या वायव्यास्त्रापासून निर्माण झालेल्या वायूच्या वेगानें त्यांना जणु उडवून दिलें होतें. याप्रमाणें, ते नृपश्रेष्ठ पळून गेल्यानंतर जेथें ते पूर्वीं होते तेथें येऊन सात्यकी उभा राहिला आणि सर्पाच्या शरीराप्रमाणें भयंकर असा शीघ्रगामी तीक्ष्ण बाण घेऊन म्हणाला " आतां कोठें काय करीत बसला आहे तो महाबलाढ्य महाज्ञानी, धनुष्य बाण धारण करणारा नृप-

१ येथें ' नीतिमत्तरं ' असें ' गजा ' चें विशेषण असल्यानें, नीति याचा अर्थ –' नी या धातूवरून नेणें, वाहून नेणें, किंवा सुशिक्षितपणा, गतिकौशल्य असा करणें प्रशस्त वाटलें

२ ' ययौ नीतिंविचिन्वानः परांप्रीतिं महाबलः ' असें मूळ आहे. याचा अर्थ, ' नीतीचा विचार करणारा तो महाबल फार प्रसन्न झाला. ' असा वांईकरांनीं केला आहे, तो जरी त्याज्य नाहीं, तरी या स्थळीं सात्यकीचे प्रीतीला कारण त्या गजाची नीति म्हणजे गतिकुशलत्ताच होती, असें आम्हांस वाटतें, म्हणून आम्ही हत्तीचे गतिकौशल्य पाहून आनंदित झाला, अशा प्रकारचा अर्थ केला आहे. कुशल घोडेस्वाराला अश्वाची सुंदर चाल पाहून आनंद होतो. कोठेंहि गुणी व गुणज्ञ यांची गांठ पडलीं म्हणजे असा प्रकार होणें स्वाभाविक आहे. आणि हा अर्थ गुणज्ञ उद्धव व वर्णन चतुर कवि या उभयतांस भूषणावह आहे.

१ ' वायव्य ' या शब्दाचा अर्थच वायूचें, वायुयुक्त, वायुसंबंधीं, असा आहे.

श्रेष्ठ पौंड्रक!" तो दुष्टहृदयी अधम राजा जर माझ्या दृष्टीस पडला तर मी त्याला ठार करून सोडीन. मी श्रीकृष्णाचा दास असून पौंड्रकाचा वध करण्याच्या इच्छेनें येथें उभा राहिलों आहें. या सर्व क्षत्रियांच्या देखत त्या दुष्टाचा शिरच्छेद करून मी गिधाडांना आणि कुत्र्यांना त्याचें बलिदान करितों. रात्रीं चोहोंकडे महात्मे यादव झोंपी गेले असतां कोणता शूर पुरुष असलें हें चोरासारखें काम करणार आहे? खरोखर हा पौंड्रकराजा बलाढ्य राजा नसून सर्वथैव चोर आहे. त्या अधम राजाच्या अंगीं जर ताकद असती तर त्यानें अशा प्रकारचें हें चोराचें काम केलें नसतें. आतां त्या बलाढ्य म्हणविणाऱ्या राजानें ज्या अर्थीं हें चोरकर्म केलें आहे त्या अर्थीं त्याला आतां कोणत्याही प्रकारें येथून जातां येईल, असें मला दिसत नाहीं. असें म्हणून त्या वीर्यसंपन्न महाबलाढ्य सात्यकीनें हास्य केलें व दोरीचा टणत्कार करून धनुष्याला बाणजोडला.

इकडे त्या ज्ञानसंपन्न सात्यकीचें हें भाषण ऐकून तो वीर पौंड्रक त्याजपाशीं आला आणि म्हणाला "कोठें आहे तो कृष्ण, तो गवळी कोणीकडे गुंतला आहे? स्त्रिया, पशु, अशा सारख्यांचे प्राण घेणारा आणि कांहीं लोकांनीं आपला धनी म्हणून सेवन केलेला तो कृष्ण आहे कुठें? माझें नांव स्वतःला लावून घेऊन आतां तो कोठें रहाणार? माझा मित्र महात्मा नरक याचे म्हणजे प्रत्यक्ष माझेच प्राण घेणारा तो वीर कोठें आहे? बा सात्यके, या संग्रामांत त्या दुष्टाचे मीं प्राण घेणार आणि ते घेतले म्हणजे हे वीरा, तूं तुला वाटेल तिकडे जा. तुझ्या अंगीं युद्ध करण्याचें सामर्थ्य नाहीं. अथवा, जरा थांब म्हणजे तुला दिसून येईल माझें सामर्थ्य. शरीरास स्पर्श होतांच दुःखांनीं व्याकुळ करून सोडणाऱ्या या बाणांनीं तुझें मस्तक तोडून टाकतों. हे वीरा, मी तुला ठार केला म्हणजे या भूमीला तुझें रक्त प्राशन करण्यास मिळेल आणि त्या गवळ्याला ( श्रीकृष्णाला ) सात्यकी ठार झाला हें ऐकावयास मिळेल. त्या गुरेराख्याला जी अतिशय घमेंड आहे, ती तूं ठार होतांच तत्काल नष्ट होऊन जाईल. द्वारकेचें संरक्षण करण्याचें काम तुझ्यावर सोंपवून तो कैलासपर्वताला गेला आहे. असें आम्हीं पूर्वीं ऐकलें आहे. असो; हे यदुश्रेष्ठा महाज्ञानी सात्यके, अंगांत ताकद असेल तर, घे तुला वाटेल तितका तीक्ष्ण बाण आणि हो युद्धाला तयार." असें बोलून तो पौंड्रक बाण घेऊन संग्राम करण्यासाठीं येऊन ठाकला.

---

## अध्याय शहाण्णवावा.

--:०:--

### सात्यकी आणि पौंड्रक यांचा संग्राम.

वैशंपायन म्हणाले:—महाराजा जनमेजया, तदनंतर यादवश्रेष्ठ सात्यकी कोपाविष्ट झाला आणि अंतःकरणांत श्रीकृष्णाचें स्मरण केल्यासारखें करून असे उद्गार काढता झाला. तो म्हणाला, ज्याला जिवंत रहाण्याची इच्छा आहे असा कोणता अधम भूपति जगन्नायक श्रीकृष्णाला असें म्हणूं शकणार आहे? अर्थात् कोणीच नाहीं. तथापि तूं त्याचे संबंधानें तशा प्रकारचे उद्गार काढीत आहेस त्या अर्थीं मृत्यु चोहोंबाजूंनीं तुझ्या समीप येऊन ठेपला आहे हें खास. तशा प्रकारचे शब्द तोंडांतून निघतांच तुझ्या जिव्हेचे शेंकडों तुकडेच झाले पाहिजेत. असो, पौंड्रका, हा पहा मी तुझें शीर तुझ्या शरीरापासून वेगळे करितों. हें शीर जोंपर्यंत तुझ्या धडापासून अलग झालें नाहीं, तोंपर्यंतच सांप्रत असलेलें 'वासुदेव' हें नांव तुला चालू

असणार. तेंच तुझें शीर अलग झालें म्हणजे मग उद्यापासून ' वासुदेव ' या नांवाचा अधिकारी तो भगवान् ( कृष्णच ) राहील. हे दुष्टा, तुझा शिरच्छेद झाल्यानंतर सर्वांचा कर्ता आणि जीवरूपानें सर्वांचे ठिकाणीं वास्तव्य करणारा जो जगन्नायक श्रीकृष्ण, तो एकटाच ( वासुदेव ) राहील. यास्तव हे दुष्ट राजा, हा मी तुझें मस्तक शरीरावरून खालीं उतरतों. हें काम श्रीकृष्णाचेच हातून व्हावयास पाहिजे होतें. परंतु, भगवान् श्रीकृष्ण याच वेळीं येणार नाहीं, म्हणून तें मीच करितों. आतां तुझ्या सर्व शस्त्रांचा प्रभाव आणि स्वतःचें एकंदर सामर्थ्य काय आहे, तें दाखीव. हे राजा, येथून पुढें फार वेळ तें तुझें सामर्थ्य टिकावयाचें नाहीं. कारण, मी तुला ठार करणार आहें. यास्तव, तूं आतां वाटेल तितका प्रयत्न करून आपला असेल नसेल तेवढा सर्व पराक्रम दाखीव. मी अगदीं निश्चयानें उभा आहे. मी देखील धनुष्यबाण, गदा, खड्ग वगैरे सर्व आयुधें घेऊनच सर्वथैव तुजपुढें येऊन ठाकलों आहें. तुला खरेंच सांगतों, कीं तूं या आमचे नगराकडे यावयाचें नव्हतेंस. असो; तुज वासुदेवाची भेट झाली यामुळें मला सर्वथैव कृतकृत्य झाल्यासारखें वाटत आहे. आतां तुझ्या अंगाचे तिळातिळा ऐवढे तुकडे करून मी ते श्वानांच्या पुढें घालतों.

असें बोलून महाबलाढ्य सात्यकीनें बाण घेतला आणि तो, धनुष्याला जोडून धनुष्य कानापर्यंत ओढून, पौंड्रकावर फेंकला. हे नृपश्रेष्ठा, सात्यकीनें सोडलेल्या त्या तीक्ष्ण बाणानें विद्ध होतांच प्रतापशाली पौंड्रक वासुदेव रक्त ओकूं लागला. हे नृपश्रेष्ठा, त्याच्या नेत्रांतून व शरीरांतून ऊन्ह ऊन्ह रक्ताच्या धारा निघूं लागल्या. तेसमयीं प्रतापशाली राजा पौंड्रक वासुदेव क्रोधाविष्ट झाला. त्यानें निमुळत्या पेराचे नऊ दहा बाण घेतले. आणि अनेक प्रकारें गर्जना करीत सात्यकीवर नेम धरून फेकले. व पुनरपि, मृत्यूची बरोबरी करूं शकणारा नाराच नांवाचा एक धार दिलेला बाण घेऊन धनुष्य ओढून त्यानें त्या रात्रीं सात्यकीवर सोडला, यामुळ तत्पक्षीयांना आनंद होऊं लागला. तो नाराच बाण जेव्हां यादवश्रेष्ठ सत्यप्रतिज्ञ वीर सात्यकी याच्या ललाटांत जोरानें येऊन शिरला तेव्हां तो सत्पुरुषश्रेष्ठ सात्यकी निश्चेष्ट झाल्यासारखा होऊन रथाच्या मध्यभागीं बसला. तेव्हां राजा पौंड्रकानें त्याच्या सारथीवर दहा आणि चार घोड्यांवर पंचवीस बाण सोडून त्यांना जखमी केलें. हे राजा, रक्तानें सर्व शरीर माखून गेलेले ते अश्व आणि तो सारथी हे सर्व पौंड्रक वासुदेव पहात आहे तोंच व्याकुळ होऊन गेले. हें पाहून पौंड्रक वासुदेवानें आपल्या रथांतून सिंहाप्रमाणें गर्जना केली. ती कानीं पडतांच हे राजा, सात्यकी शुद्धीवर आला आणि सारथीची झालेली ती स्थिति आणि तशाप्रकारें जखमी झालेले ते घोडे, यांस पहातांच महापराक्रमी क्षत्रियश्रेष्ठ शिनिपौत्र सात्यकी याच्या अंगांत क्रोधाचा संचार झाला आणि " ठीक आहे. आतां पुरतेपणें पाहून घेतों तुझा पराक्रम, " असें बोलून त्या महाबलाढ्य सात्यकीनें हातीं बाण घेतला आणि तो पौंड्रकाच्या छातींत मारला. हे राजा, तो बाण लागतांच पौंड्रक वासुदेव त्या संग्रामांत तडफडूं लागला. त्याच्या छातींतून अत्यंत कढत रक्ताचा भयंकर प्रवाह सुरू झाला. ज्याप्रमाणें सर्प फुस्कारे टाकतो त्याप्रमाणें सुस्कारे टाकीत तो तत्काल रथाच्या मध्यभागीं पडला. त्याला काय करावयाचें याचें ज्ञान सुद्धां राहिलें नाहीं. तो केवळ पडून राहिला होता. याचवेळीं यादवश्रेष्ठ सात्यकीनें दहा बाण सोडून

त्याचा रथ मोडून टाकिला, एका बाणानें ध्वजाचा छेद केला, आणि चार बाणांनीं सारथीवर आणि अश्वावरही प्रहार केला. कांहीं वेळानें पौंड्रक शुद्धीवर येऊन पहात असतांही हे नृपश्रेष्ठा, सात्यकीनें त्याच्या सारथीचा शिरच्छेद केला आणि रथाचे बंद तोडून टाकले. पौंड्रकाचे घोडेहि गतप्राण होऊन पडले. त्या महाबलाढ्य सात्यकीनें मोठ्या वेगानें दहा बाण सोडून पौंड्रकाच्या रथाच्या चक्राचें तिळातिळा एवढे तुकडे करून सोडले. हे राजा, तो त्या पौंड्रक वासुदेवाला अतिशय हसूं लागला. पुढें त्या यदुनंदन बलाढ्य सात्यकीनें सर्व क्षत्रिय प्रत्यक्ष पहात असतां त्यांच्या देखत प्रचंड गर्जना केली आणि सत्तर बाण सोडून पौंड्रकाला पीडित करून सोडलें. त्यानें सोडलेले ते बाण टोळधाडीप्रमाणें पौंड्रकावर चोहोंबाजूंनीं जाऊन पडले. त्याच्या मस्तकावर आजूबाजूस पुढें आणि पाठीमागें बाणच बाण होऊन गेले. तो सर्व बाजूंनीं बाणांनीं व्याप्त होऊन गेला व तृष्णाकुल झाला. पौंड्रक हा धैर्याचा केवळ राशीच होता म्हणूनच तशा-प्रसंगीं टिकला. त्यावेळीं जसा एखादा बुद्धिमान् पण साह्यशून्य पुरुष असावा त्याप्रमाणें तो होऊन राहिला. पुढें त्या प्रतापशाली बलाढ्य पौंड्रकाला क्रोध आला व त्यानें अर्धचंद्र बाण घेऊन त्या संग्रामांत सात्यकीवर प्रहार केला. यावेळीं तो क्रोधानें सारखा धुमसत होता. सात्यकी त्याजवर चालून येऊं लागला, तेव्हां त्यानें सात बाण सोडून त्याला विद्ध केलें. सात्यकीनेंही शीघ्रगामी पांच बाण सोडून पौंड्रकाच्या धनुष्याचे तुकडे तुकडे केले आणि सिंहाप्रमाणें गर्जना केली. तेव्हां हे प्रभो, पौंड्रकानें गदा घेतली आणि प्रत्येक पावलाला गरगरा फिरवीत त्यानें सत्वर जाऊन ती सात्यकीच्या छातीवर मारली. तोंच यादवकुमार सात्यकीनें डाव्याहातानें ती गदा हिसकून घेतली. आणि पुनश्च बाण घेऊन त्या झटापटींत पौंड्रकावर प्रहार केला. पण तो बाण प्रतापशाली पौंड्रकानें मधल्यामध्येंच धरिला, आणि शक्तिसंज्ञक दहा अस्त्रें सोडून त्यानें सात्यकीला विद्ध करून सोडलें. तेव्हां यादवश्रेष्ठ नरपालक सत्यप्रतिज्ञ वीर सात्यकी यानें आपलें तें पहिलें धनुष्य टाकून दिलें आणि सत्वर दुसरें धनुष्य घेऊन पौंड्रकावर बाणांचा प्रहर केला.

## अध्याय सत्याण्णवावा.

—:०:—

### सात्यकी आणि पौंड्रक यांचा संग्राम.

वैशंपायन म्हणतातः—राजा जनमेजया, तदनंतर यदुनंदन सात्यकीनें कोपाविष्ट होऊन हातामध्यें गदा घेतली आणि त्या तीक्ष्ण गदेनें पौंड्रकावर सत्वर प्रहार केला. तेव्हां बलाढ्य पौंड्रकानेंही सात्यकीवर गदेचा आघात केला. त्यावेळीं गदा उगारलेले अत्यंत भयंकर ते उभयतां वीर परस्परांचा वध करूं इच्छिणाऱ्या वनांतील मदोन्मत्त सिंहाप्रमाणें शोभूं लागले. तदनंतर क्रुद्ध होऊन सात्यकी अप्रदक्षिण क्रमानें मंडल करूं लागला. व पौंड्रक वासुदेव प्रदक्षिण क्रमानें मंडल काढूं लागला. त्यावेळींच त्यानें सात्यकीच्या दोहों स्तनांच्या मध्यभागीं गदाप्रहर केला. तेव्हां वीर सात्यकीनेंहि पौंड्रकाच्या छातीवर गदेचा प्रहर केला. तो प्रहार जोरानें लागतांच तो वीर पौंड्रक वासुदेव गुडघे टेंकून भूमीवर पडला. व लागलीच उडून त्यानें सात्यकीच्या कपाळावर गदा मारली. तेव्हां सात्यकीहि किंचित् खिन्न होऊन

१ येथें मूळांत "सव्यं मंडल मागमत्" असें वचन आहे. येथें मंडल शब्दाचा अर्थ मंडलक्रमानें चक्राकार फिरणें असा आहे. दुसऱ्याचा वार चुकवावा इत्यादि हेतूंनीं पूर्वींचे वीर संग्रामामध्यें अशा रीतीनें फिरत असत.

खालीं बसला व लागलींच उठून त्या वीरानें पौंड्रकावर गदाप्रहर केला. त्यावेळीं मूर्तिमंत जणुं दुसरा मृत्युच अशा बलाढ्य वीर पौंड्रक वासुदेवानें पुनश्च सात्यकीला गदा मारिली. या वेळीं पौंड्रक वासुदेव आपल्या दृष्टीनें त्याला जाळून टाकीत आहे कीं काय, असा भास होत होता. त्यानें हातानें फेंकून मारलेल्या त्या गदेचा प्रहार होतांच सात्यकी एकदम आसन्नमरण झाल्याप्रमाणें भूमीवर मूर्छित होऊन पडला. तेव्हां पुनरपि पौंड्रकानें त्याज वर गदा फेंकली. इतक्यांत सात्यकी सावध झाला आणि हे महाराजा, त्यानें उडी मारून ती गदा धरली आणि आपल्या दोन्ही हातांनीं जोरानें दाबून तिचे दोन तुकडे केले. पुढें त्या वीरानें अतिशय प्रचंड आणि सुंदर अशी आपली पोलादी गदा एकदम फेंकून दिली. आणि सिंहनाद केला. तेव्हां महाबलाढ्य पौंड्रक वासुदेवानेंहि आपली गदा टाकून दिली व डाव्या हातानें सात्यकीला धरून उजव्या हातानें मूठ वळली आणि त्या अत्यंत भयंकर मुष्टीनें त्या पराक्रमी पौंड्रक वासुदेवानें सात्यकीच्या स्तनांच्या मध्यभागीं प्रहार केला. यदुकुलोत्पन्नवीर सात्यकीनेंहि गदा फेंकून दिल्यानंतर त्या रणांगणांत करतलानें पौंड्रक वासुदेवावर प्रहार केला. तेव्हां पौंड्रक वासुदेवानेंहि सत्यप्रतिज्ञ सात्यकीवर करतल-प्रहार केला.

अशा रीतीनें त्या उभयतांचें तें भयंकर करतल युद्ध सुरू झालें. पुढें गुडघ्यांनीं, मुष्टीनीं बाहूंनीं आणि मस्तकानें परस्परांना प्रहार करून त्यांनीं युद्ध केलें. त्यांनीं परस्परांच्या छातीवर छातीचे, गुडघ्यावर गुडघ्यांचे आणि हातांवर हातांचे प्रहार करून संग्राम केला. त्यावेळीं हे नृपश्रेष्ठा, अरण्यामध्यें परस्परांच्या समीप असलेल्या तालवृक्षांचा परस्परांवर आघात होऊन जसा प्रचंड ध्वनि उत्पन्न व्हावा त्याप्रमाणें भयंकर शब्द होऊं लागला. अशा रीतीनें ते प्रख्यात वीर पौंड्रक आणि सात्यकी समरांगणीं युद्ध करीत असतां अतिशय रात्र होऊन जाऊन जिकडे तिकडे शुकशुकाट होऊन गेला. तेव्हां त्या महाबलाढ्य वीरांनीं शस्त्रांचा नाद सोडिला आणि त्या समरांगण-रूपी प्रचंड मैदानांत ते उभयतां प्रख्यात मल्लांप्रमाणें मल्लयुद्ध करूं लागले. तेव्हां त्या नृपश्रेष्ठांचें सैन्य संशयांत पडलें. आतां काय वीर सात्यकी पौंड्रकाकडून ठार होणार अथवा तो महात्मा सात्यकी पौंड्रक वासुदेवाला गत-प्राण करून सोडणार, असें त्यांना वाटूं लागलें. हे उभयतांही महावीर आज परस्परांना ठार करण्याच्या इराद्यानें संग्राम करीत आहेत हे दृढ निश्चयी वीर जेव्हां स्वर्गवासी होतील तेव्हांच थांबतील, एरव्हीं थांबणार नाहींत. काय हा या बलाढ्य वीरांचा शूरपणा! केवढें हें यांचे धैर्य! खरोखर या लोकांत हे महा-बळाढ्य आणि स्वभावतःच अत्यंत सज्जन असे आहेत. अशा प्रकारचें भयंकर युद्ध देवांदै-त्यांत सुद्धां पूर्वीं झालेलें नाहीं. खरोखर अशा प्रकारचा हा भयंकर संग्राम आमच्या केव्हांहि पाहण्यांत अगर ऐकण्यांत आलेला नाहीं. असे उभय पक्षाच्याहि सैन्यांतील लोक, मध्य-रात्रीं आकाश मेघाच्छादित असतांना त्या उभयतांमध्यें चाललेलें तें अत्यंत भयंकर युद्ध पाहून बोलूं लागले.

असो; त्या उभयतां वीरांमध्यें तत्काल बाहुयुद्धाची झटापट उडाली. त्यावेळीं सात्य-कीनें पौंड्रकावर दहा मुष्टिप्रहार केले, व महा बलाढ्य पौंड्रकानेंहि सात्यकीला पांच मुष्टि

१ येथें मूळ 'शस्त्रंत्यक्त्वा' असें आहे. पण शस्त्रें त्यांनीं या पूर्वींच टाकून गुद्दागुद्दी आरंभली होती, म्हणून भाषांतर थोडें बचावून केलें आहे.

मारल्या. त्यासमयीं हे राजा, त्या उभयतांनीं परस्परांवर केलेल्या आघातांच्या योगानें सर्वांना आश्चर्यचकित करून सोडणारा व एकंदर ब्रह्मांड क्षुब्ध करून सोडणारा चट् चट् असा शब्द जिकडे तिकडे होऊं लागला.

## अध्याय अठ्ठ्याण्णवावा.

—:०:—

### एकलव्याच्या सैन्याचा संहार.

वैशंपायन सांगतातः—राजा जनमेजया, याच वेळीं निषादाधिपति एकलव्यानें क्रुद्ध होऊन लगबगीनें हातांत धनुष्य घेतलें आणि तत्काल बलरामाला दहा बाण सोडून विद्ध केलें; व सर्व क्षत्रिय पहात असता दुसऱ्या दहा बाणांनीं त्याचें धनुष्य मधोमध तोडून टाकिलें. तेव्हां जगन्नायक बलरामानें दहा बाणांनीं त्याचे सारथ्यावर प्रहार केला; तीस बाणांनीं त्याच्या रथाचे तुकडे केले आणि भल्ल ( भाल्याच्या आकाराचा ) नांवाचा एक बाण सोडून त्याचा ध्वज छिन्नविच्छिन्न करून टाकिला. तदनंतर वीर्यदृष्टच्या माननीय असलेल्या त्या एकलव्य निषादानें एक मोठें धनुष्य घेतलें. त्याची दोरी फार बळकट असून लांबी दहा ताल[1] होती. त्यानें सर्व लोकांमध्यें असलेल्या बलरामाला तत्काल शरप्रहार केला. तेव्हां महापराक्रमी बलराम क्रुद्ध होऊन शेषनामक सर्पाप्रमाणें फूत्कार टाकूं लागला आणि त्या मधुवंशामध्यें उत्पन्न झालेल्या श्रीकृष्णच्या ज्येष्ठ बंधूनें सर्पतुल्य दहा बाण सोडून त्याच्या त्या दिव्य धनुष्याचे मुष्टिप्रदेशाचे ठिकाणीं दोन तुकडे केले. तेव्हां निषादाधिपति एकलव्यानें आकारानें अतिशय भयंकर असें एक तीक्ष्ण खड्ग त्वरेनें घेऊन जोरानें तें बलरामावर फेकलें. पण प्रतापशाली यदुवीर यादवकुमार चतुर बलराम यानें पांच बाण सोडून तें येऊन पोंचण्यापूर्वीच त्याचे तिळातिळा एवढे तुकडे करून टाकले. तदनंतर निषादकुलोत्पन्न एकलव्यानें केवळ पोलादानें बनविलेलें दुसरें एक मोठें उत्कृष्ट खड्ग घेऊन बलरामाचे सारथीच्या शरीरावर नेम धरून फेकलें. पण मधुकुलोत्पन्न यदुकुमार वीर बलरामानें त्या प्रचंड संग्रामांत तें खड्ग दोन हाताच्या अंतरावर आहे तोंच दहा बाण सोडून त्याची शकलें करून टाकलीं. हें पाहून महाबलाढ्य राजा एकलव्य यानें घंटांच्या माळांनीं व्याप्त असलेलें शक्तिनामक अस्त्र घेऊन बलरामावर फेकलें व सिंहासारखी प्रचंड गर्जना केली. त्यानें सोडलेली ती सर्व प्रकारें निर्दोष असलेली शक्ति बलरामाच्या समीप येऊन ठेपली. ती अत्यंत भयंकर शक्ति त्याजवर झडप घालीत आहे, तोंच त्या प्रतापशाली बलरामानें तिला हातांत धरली आणि तो निषादाधिपति एकलव्य व इतरहि सर्व लोक यांना आश्चर्यचकित करून सोडलें. इतकेंच नव्हे, तर त्या मधुकुलोत्पन्न बलरामानें तीच शक्ति तशाच प्रकारें उलट फेंकून एकलव्याच्या छातीवर तत्काल प्रहार केला. तेव्हां स्वतःच्याच शक्तीचा प्रहार झालेला तो निषादपति एकलव्य सर्व अवयव व्याकुळ होऊन भूमितलावर पडला. बलरामानें प्रहार केलेल्या त्या निषादाचे प्राण तरी वांचतात कीं नाहीं याचा संशय पडला.

हे नृपश्रेष्ठा, त्या एकलव्याला साहाय्य करणारे दुसरेही शेंकडों हजारों निषाद होते. त्याच्या सैन्यांत अठ्यायशीं हजार लढवय्ये निषाद होते. हे नृपश्रेष्ठा, प्रदीप्त होणाऱ्या अग्नीवर ज्याप्रमाणें टोळांनीं धाड घालावी

[1] हाताचा अंगठा आणि मधलें बोट हीं लांब केलीं असतां जेवढें प्रमाण भरेल त्यास ताल असें म्हणतात. ( शब्दकल्पद्रुम )

त्याप्रमाणें महापराक्रमी यादववीरांना न जुमानतां त्यांनीं बलरामावर झडप घातली. त्यांपैकीं कित्येकांच्या हातांत गदा होत्या, कांहींनीं खड्ग धारण केलें होतें व कितीएक महाबलाढ्य निषादांनीं प्रचंड धनुष्यें घेतलीं होतीं. त्यांनीं अनेक सहस्र बाण, शक्ति, परशु, गदा, पट्टे, शूल, परिघ, ( अडसराच्या आकाराचें एक अयुध ), इटे, तोमर ( गुरगुंज ), बर्ची, आणि साध्या कुऱ्हाडी, यांचा ते उपयोग करीत होते. त्यांनीं दुसरा मूर्तिमंत परशुरामच कीं काय अशा बलरामाला बाणांचा प्रहार करून खालीं पाडलें. कित्येकांनीं त्याजवर कुऱ्हाडीचे प्रहार केले. कांहींनीं भाल्याचे आघात केले. कित्येक जणांनीं त्याला परशूनें मारलें. कांहींनीं त्याला गदांनीं ताडण केलें व इतरांनीं त्याला शक्तींनीं विद्धकेलें. याप्रकारें अग्नीप्रमाणें चमकणाऱ्या बलरामावर जेव्हां एकदम प्रहार झाले तेव्हां कोपाविष्ट होऊन बलरामानें तत्काल एका हातानें आपला नांगर उगारला व त्या नांगरानें सर्वांना ओढून दुसऱ्या हातांत असलेल्या मुसळानें त्यांना तो चेंचू लागला. हे नृपश्रेष्ठा, याप्रमाणें जेव्हां पर्वतावर राहणाऱ्या त्या निषादांचा बलरामानें संहार आरंभिला तेव्हां ते शेंकडों हजारों निषाद पृथ्वीच्या पाठीवर धडाधड पडूं लागले. हे महाराजा, याप्रमाणें त्या सर्व महाबलाढ्य निषादांना एका क्षणांत ठार करून महाशाली बलराम सिंहाप्रमाणें गर्जना करीत तेथें उभा राहिला. तेव्हां त्या रात्रीं मांसभक्षक अत्यंत भयंकर पिशाच तेथें पडलेल्या प्रेतांच्या शरीरांतील मांस ओढून घेऊन भक्षण करीत व त्यांचा कोठा फाडून विपुल रक्त प्राशन करीत बसले.

~~~~~~~~~

## अध्याय नव्याणवावा.

—:०:—

### पौंड्रक युद्ध.

वैशंपायन म्हणाले:—राजा जनमेजया, त्यावेळीं ते सर्वही मांसभक्षक पिशाच तत्काल प्रेतें भक्षण करून नानाप्रकारें भयंकर रीतीनें हसूं लागले, तेव्हां सर्व भूमी दणाणून गेली. हे राजा, त्या मांसभक्षक राक्षसांनीं आणि पिशाचांनीं विपुल रक्त प्राशन केलें.आणि पायांपासून तों शेंडीपर्यंत प्रेताच्या शरीराचे सर्व भाग भक्षण करून सोडले. हे भूपते, त्या संग्रामामुळें तृप्त होऊन ते त्या नगरीमध्यें आनंदानें नाचूं लागले. त्यावेळीं कावळे, बगळे,गिधाडें,ससाणे, कोल्हे आणि भयंकर राक्षस यांचा तिकडे मांस भक्षणासाठीं ओघ चालू लागला.

इतक्यांत, तो पराक्रमी निषाद एकलव्य शुद्धीवर आला. तेव्हां पर्वतावर संचार करणारे सर्व निषाद ठार झाल्याचें त्यास दिसून आलें. तें पाहून त्यानें क्रोधानें हातीं गदा घेतली व बलरामावर चाल केली. आणि हे राजा, त्या निषादपतीनें त्याच्या मस्तकावर गदाप्रहर केला. तेव्हां हे महीपते, हलसंज्ञक आयुध धारण करणाऱ्या मदमत्त बलरामानेंहि गदा घेऊन त्या पराक्रमी निषादावर निर्दयपणें प्रहार केला. हे महाबाहो, त्यावेळीं त्या उभयतांमध्यें तुंबळ गदायुद्ध सुरू झालें. तें चालू असतां गदांचा आवाज आकाशामध्यें घुमूं लागला. हे महाराजा, कल्पांतकालीं परस्परांवर जोरानें आदळणाऱ्या समुद्रांचा ज्याप्रकारचा ध्वनि होतो, त्या प्रकारचा अत्यंत भयंकर ध्वनि तेथें होऊं लागला. त्यायोगानें पृथ्वी धारण करणाऱ्या शेषाची आणि पाताळांतील इतरहि नागांची खळबळ उडून गेली व सर्व आकाश आणि पृथ्वी यामध्यें जिकडे तिकडे ध्वनीच ध्वनीं होऊन गेला. याप्रमाणें हा संग्राम
~~~~~~~~~

चालला असतां संग्रामपंडित राजा पौंड्रक यानें त्वरेनें गदा घेऊन यदुकुमार सात्यकीवर लगबगीनें प्रहार केला तेव्हां बलाढ्य सात्यकीनेंहि पौंड्रक वासुदेवाला गदेनें झोडून काढिलें. त्या प्रचंड संग्रामांत त्या उभयतांचाही प्रचंड ध्वनि सुरू झाला. याप्रमाणें ते चौघेजण परस्परांना ठार करण्याच्या इराद्यानें संग्राम करूं लागले असतां हे राजा, सर्व ब्रह्मांडाला हालवून सोडील अशा प्रकारचा अत्यंत भयंकर आवाज तेथें होऊं लागला. त्या संग्रामामुळें त्या रणांगणांमध्यें धूळ उडूं लागली. हे राजा, अशा रीतीनें संग्राम सुरू झाला असतां रात्रीचा अंधकार कमी होऊन नक्षत्रें निस्तेज दिसूं लागली आणि पहाट झाली, असें कळून आलें. तेव्हां तो संग्राम कांहींवेळ बंद पडला. पुढें भगवान् सूर्य उदय पावला आणि चंद्र अस्तास गेला. तेव्हां हे राजा, त्या चौघा पराक्रमी वीरांचें युद्ध पुनरपि सुरू झालें. हें युद्ध देव आणि दैत्य यांच्यामध्यें झालेल्या युद्धाच्या तोडीचें होतें.

---

## अध्याय शंभरावा.

—:०:—

### श्रीकृष्ण आणि पौंड्रक यांचे वीरालाप.

वैशंपायन सांगतातः—राजा जनमेजया, तदनंतर रात्र जाऊन प्रभातकालाची स्वच्छकांति फांकली असतां, इकडे बदरीकाश्रमांत जगन्नायक देवकी पुत्र भगवान् श्रीकृष्ण यांनीं तेथून द्वारकानगरीकडे जाण्याचें मनांत आणलें. हे राजा, त्या प्रभु श्रीकृष्णानीं प्रथम सर्व मुनींना नमस्कार केला व नंतर गरुडावर आरोहण करून मोठ्या वेगानें द्वारकेकडे प्रयाण केलें. हे नृपते, जेव्हां देवाधिदेव श्रीकृष्ण गमन करूं लागले, तेव्हां युद्ध करणाऱ्या त्या वीरांच्या प्रचंड गर्जना त्यांच्या कानीं आल्या. तेव्हां जगन्नायक श्रीकृष्ण विचार करूं लागले कीं, हा शब्द कशाचाबरें असल? हा भयंकर ध्वनी संग्रामांतील असून त्यांत दादांच्या (बलरामाच्या) आणि सात्यकीच्या आवाजाचें मिश्रण दिसतें. यावरून पौंड्रकानें द्वारकानगरीवर चाल केली असावी, हें खास. आणि त्यामुळेंच त्या दुरात्म्या पौंड्रकाशींच यदुकुलोत्पन्न आणि वृष्णिवंशज वीरांचें युद्ध झालें असलें पाहिजे. परस्परांशीं युद्ध करणाऱ्या त्या वीरांचाच स्पष्टपणें ऐकूं येणारा हा अतिशय मोठा शब्द आहे. याविषयीं विचारच करावयाला नको. असा मनांत विचार करून साक्षात् श्रीकृष्णानीं यदुकुल श्रेष्ठांना आनंदित करण्यासाठीं प्रचंड ध्वनीं असलेला आपला पांचजन्य नांवाचा शंख वाजवून त्याच्या ध्वनीनें पृथ्वी आणि आकाश भरून सोडलें. हे राजा, तो शंखध्वनी कानावर येतांच यदुकुलोत्पन्न आणि वृष्णिकुलोत्पन्न वीरांनीं अनुमान केलें कीं, हे भगवान् श्रीकृष्ण इकडे येत आहेत. कारण हा त्यांच्या पांचजन्य शंखाचा अवाज आहे.

हे राजा, तो ध्वनी ऐकतांच यदुकुलोत्पन्न आणि वृष्णिकुलोत्पन्न वीरांची भीति पार निघून गेली. त्याचवेळीं अत्यंत देदीप्यमान् गरुडाहि त्यांच्या दृष्टीस पडूं लागला. तदनंतर त्यांना यादवाधिपति देवकीपुत्र श्रीकृष्ण यांचेंहि दर्शन झालें. त्या जगन्नायकाच्या पुढें सूत मागध हे स्तुतिपाठक लोक चालले होते. त्यांनीं स्तोत्रें म्हणून तीं श्रवण केलेल्या ऐश्वर्यसंपन्न कमलनयन विश्व-

---

१ द्वारकेंतल्या आरोळ्या आपल्या प्रचंडत्वानें बदरिकाश्रमीं ऐकूं जात होत्या असें जरी एथें लिहिलें आहे. तरी श्रीकृष्णांच्या योगसिद्ध दूरश्रवण शक्तीचें हें फल होतें, 'असें मानणें' अधिक बरें.

व्यापक श्रीकृष्णाकडे सर्व यादव गेले आणि त्यांच्या सभोंवती उभे राहिले. तेव्हां श्रीकृष्णांनीं गरुडाला "तूं आतां स्वर्गाला जा" अशी आज्ञा देऊन त्याची रवानगी केली. व नंतर दारुकाला ( या नांवाच्या आपल्या सारथ्याला ) माझा रथ आण, असें सांगितलें. तोहि 'ठीक आहे, आणतों,' असें म्हणून जाऊन तत्काल रथ घेऊन आला. आणि 'हे भगवान्, हा रथ; आणखी मजकडे काय काम आहे?" असें म्हणून नमस्कार करून श्रीकृष्णाच्या पुढें उभा राहिला. श्रीकृष्णही गरुड निघून गेल्यानंतर रथामध्यें सत्वर आरोहण करून जेथें संग्राम चालला होता त्या ठिकाणीं गेले. आणि हे महाराजा, त्या यदुकुलश्रेष्ठ श्रीकृष्णानीं तेथें गेल्यानंतर ते महात्मे संग्राम करीत असतां आपला पांचजन्य नांवाचा प्रचंड शंख वाजविला. तेव्हां श्रीकृष्ण संग्राम करण्याविषयीं उत्सुक आहेत असें पहातांच पौंड्रक वासुदेव सात्यकीला मागें टाकून श्रीकृष्णावर चालून जाऊं लागला. तेव्हां हे राजा, सात्यकीनें क्रोधानें त्याला प्रतिबंध केला. तो म्हणाला, हे राजा, येथून पुढें जाऊं नको. येथून न हालणें हाच वीरांचा कायमचा धर्म आहे. तेव्हां हे नृपश्रेष्ठा, अगोदर तूं माझा पराजय कर आणि मग या प्रचंड संग्रामांत दुसऱ्याशीं सामना करण्यासाठीं जा. हे महावीरा, तूं क्षत्रिय आहेस आणि मी संग्राम करण्यासाठीं उत्सुक होऊन उभा ठाकलों आहें असें असतां तुला येथून जाणें बरें नाहीं. हा पहा, मी या संग्रामांत आतां तुझा सर्व गर्व नाहींसा करतों. असें म्हणून तो यादवश्रेष्ठ सात्यकी त्याच्या पुढें येऊन उभा राहिला.

हें श्रीकृष्ण पहात होते; पण, पौंड्रक वासुदेवानें त्या शिनिपौत्र सात्यकीला न जुमानतां श्रीकृष्णाकडे चाल केली. तेव्हां क्रोधानें बेभान होऊन गेलेल्या सात्यकीनें निर्भत्सना करून श्रीकृष्णाच्या समक्ष होईल तितकें करून शक्य तितक्या जोरानें पौंड्रकवासुदेवावर गदाप्रहार केला. खरा पराक्रमी जो सात्यकी त्याचें हें कृत्य पाहून भगवान् श्रीकृष्णानीं मान डोलविली. आणि संग्रामापासून त्याला परावृत्त करून "पौंड्रकाला इच्छेस वाटेल तसें करूं द्या," असें म्हटलें. याप्रमाणें श्रीकृष्णांनीं नको म्हटल्यानंतर सात्यकी थांबला. तेव्हां राजा पौंड्रक श्रीकृष्णाला म्हणाला, 'अरे ए, यदुकुलांतल्या गवळ्या, यावेळीं कोठें गेला होतास? तुला पहाण्यासाठीं मी वासुदेव आतां येथें आलों आहें. कृष्णा, माझें सैन्य फार मोठें आहे. तेव्हां तुला आणि तुझ्या सैन्यालाहि पार करून, या भूतलावर मी आतां एकटाच वासुदेव होणार. हे गोविंदा, तुझें अत्यंत देदीप्यमान् असें जें प्रख्यात प्रचंड चक्र आहे त्याच्या योगानेंच मला संग्रामामध्यें पीडा झाली होती. तुझें तें चक्र आहे म्हणूनच सांप्रत तुझा पराक्रम आहे. पण, हे सर्व क्षत्रिय पहात आहेत तोंच मी तें सर्व नष्ट करून सोडतों. हे जनार्दना, मजपाशीं शंखहि आहे, गदाहि आहे आणि चक्रहि आहे. ज्यांना कांहीं ज्ञान आहे, असे पराक्रमशाली पुरुष मलाच सदैव वासुदेव असें म्हणतील. तूं आरंभीं अत्यंत वृद्ध अशा कांहीं पुरुषांना, कांहीं स्त्रियांना, कित्येक पोरांना आणि पुष्कळ गायींना, गतप्राण केलें, त्याचा तुला आतां अतिशय ताठा चढला आहे. पण, जर तूं माझ्या समोर उभा राहिलास तर मी तो तुझा सर्व ताठा नाहींसा करीन. तेव्हां हे गोविंदा, जर तूं युद्धासाठींच उभा असशील तर घे शस्त्र! असें म्हणून तो पौंड्रक वासुदेव बाण घेऊन जगन्नायक श्रीकृष्णाच्या समीप उभा राहिला.

त्यानें केलेलें तें भाषण ऐकून श्रीकृष्ण जरा हंसले, आणि राजा पौंड्रकाला म्हणाले,

हे राजा, मी सदैव पातकी आहें, गाई, पोरें आणि बायका यांचे प्राण घेणारा आहें, इत्यादि प्रकारें तुला वाटेल तें तूं बोल. हे राजा, तूं चक्र, गदा आणि शार्ङ्ग धनुष्य धारण करणारा अस. हे प्रभो, वासुदेव हें नांव मला व्यर्थ पडलेलें आहे. शार्ङ्गी, चक्री, गदी, शंखी इत्यादिकहि माझ्या संज्ञा फुकट आहेत. हें सर्व तूं म्हणतोस तें ठीक आहे. तथापि, मी जें कांहीं थोडें सांगणार आहें तें तुला वाटेल तर ऐकून घे. हे प्रभो, जगन्नायक असा मी हयात असतां अर्थात्, माझ्या शरीरामध्यें प्राण असतां बलाढ्य क्षत्रिय माझ्याच नांवानें तुला संबोधितात हें खरें आहे. तुझें दैत्यांचा नाश करणारें जें अतिशय भयंकर आणि प्रचंड चक्र आहे, त्याच्या सारखेंच माझें चक्र आहे हें खरें. पण त्याचा तो सारखेपणा केवळ वर्तुलांत आहे सामर्थ्यांत नाहीं. सारांश, शस्त्रांत आणि इतरत्रहि सर्वत्र शब्दानेंच माझें आणि तुझें साम्य आहे. हे राजा, सर्व प्राण्यांना सर्वदैव प्राण देणारा मी 'गोप' आहें खरा. म्हणजे मी सर्व लोकांचा गोप्ता ( संरक्षक ) आहें. व दुष्टांचें सदैव शासन करणारा आहें. यामुळेंहि मला गोप म्हणतां येईल. असो; हे अधमा राजा, शत्रूंचा पराजय केल्यानंतरच वाटेल ती बडबड केली तर शोभेल. पण, मी येथें शस्त्र घेऊन ठाकलों आहें, असें असतां माझा पराजय केल्यावांचूनच तूं काय म्हणून हे शब्द उच्चारीत आहेस. हे पौंड्रका, जर शक्ति असेल तर मला ठार कर आणि मग वाटेल तें बोल. हा मी रथारूढ होऊन धनुष्य, चक्र, गदा आणि खड्ग घेऊन तुजपुढें उभा आहें. तेव्हां इतरांची मानखंडना करणाऱ्या हे पौंड्रका, चढ रथावर आणि हो संग्रामाला तयार. असें बोलून भगवान् श्रीकृष्णानीं सिंहासारखी गर्जना केली.

# अध्याय एकशेंएकावा.

—:०:—

## पौंड्रकवध.

वैशंपायन सांगतातः—राजा जनमेजया, तदनंतर प्रतापशाली श्रीकृष्णानीं एक तीक्ष्ण बाण घेऊन त्याचा एकदम पौंड्रकावर प्रहार केला. पौंड्रकवासुदेवानेंही यदुनंदन श्रीकृष्णावर शीघ्रगामी दहा बाण सोडून सत्वर प्रहार केला व नंतर पंचवीस दारुकावर ( श्रीकृष्णाच्या सारथ्यावर ) आणि दहा घोड्यांवर मारून त्यानें पुनश्च सत्तर बाण श्रीकृष्णावर सोडले. तेव्हां केशिदैत्यनाशक यदुकुलोत्पन्न श्रीकृष्ण बराच वेळ हंसले आणि आपल्या अंतःकरणामध्यें त्याची आनंदपूर्वक प्रशंसा करूं लागले. पुढें त्या शत्रुसंहारकारक बलाढ्य श्रीकृष्णानीं शार्ङ्ग धनुष्य ओढलें आणि नाराचसंज्ञक एक तीक्ष्ण बाण सोडून पौंड्रकाच्या ध्वजाचे तुकडे करून सोडले. त्यांनीं पुनश्च चार बाण सोडून त्याच्या सारथीचें शीर खालीं उतरलें आणि चारहि घोडे ठार करून टाकले. तसेंच त्या राजा पौंड्रकाच्या रथाचा चुराडा उडविला. रथामागें असलेला संरक्षक पुरुष आणि सारथी या उभयतांना ठार केलें व त्याच्या चक्राचे तिळातिळा एवढे तुकडे करून किंचित् हास्य करीत ते उभे राहिले. तेव्हां पौंड्रक वासुदेवानें तत्काल रथांतून उडी टाकली आणि एक तीक्ष्ण खड्ग घेऊन श्रीकृष्णावर फेकलें. पण, त्याचेहि शेकडों तुकडे करून श्रीकृष्ण स्वस्थ उभे राहिले. तेव्हां प्रत्यक्ष मृत्यूच्या तोडीचें महाभयंकर परिघ नांवाचें आयुध घेऊन प्रतापशाली पौंड्रक वासुदेवानें सर्व क्षत्रिय पहात असतां यदुकुलवीर श्रीकृष्णावर फेंकलें. तथापि, यादव कुलोत्पन्न श्रीकृष्णानीं त्याचेहि दोन तुकडे करून सोडले.

तदनंतर एक हजार धांवा असलेलें, तीसभार[1] वजनाचें, तोंडाला लोखंड असलेलें अत्यंत तेजस्वी व फार भयंकर, चक्र घेऊन हे महाराजा, पौंड्रक वासुदेव श्रीकृष्णाला असें म्हणालाः---

हे यदुकुलोत्पन्न गोविंदा, पहा; तुझ्या चक्राचा चुराडा उडवून देणारें हें माझें अत्यंत भयंकर तीक्ष्ण चक्र. अरे घमेंडखोरा, या सर्व क्षत्रियांच्या देखत मी या चक्रानें तुझी घमेंड उतरून देतों. हें अत्यंत भयंकर चक्र केवळ तुझ्याच करितां निर्माण केलेलें आहे. दुसऱ्याला हें सहन करितां येणें शक्यच नाहीं. हे संहारकारका कृष्णा, मोठमोठ्या वीरांच्या छातीवर चढणारें हें चक्र जर शक्ति असेल तर भग्न करून सोड." असें बोलून महाबलाढ्य, अतिशय पराक्रमी, नृपश्रेष्ठ पौंड्रकानें तें चक्र शंभरवेळां गरगरां फिरविलें आणि उडी मारून तेथून तें श्रीकृष्णावर फेंकून दिलें, व त्या पराक्रमी पौंड्रकानें सिंहाप्रमाणें अतिशय भयंकर गर्जना केली. तें पहून देवकीपुत्र भगवान् श्रीकृष्णाला आश्चर्य वाटलें. आणि अहाहा, केवढें हें या पौंड्रकाचें धैर्य ! आणि इतरांना सहन करितां येणें अशक्य असा काय हा याचा पराक्रम ! असें मनांत म्हणून तो आपल्या रथांतून उठून दुसरीकडे गेला. यामुळें त्या चक्राचा कांहीं उपयोग झाला नाहीं. तेव्हां पौंड्रकानें एक शिळा घेऊन श्रीकृष्णावर फेंकली. पण यदुकुलधरंधर श्रीकृष्णानीं ती त्याच्याकडे परत लावली.

अशा रीतीनें पौंड्रकाशीं बराच वेळ खेळ खेळल्यानंतर विश्वव्यापक, शत्रु संहाराविषयीं सर्वदैव उद्युक्त, शार्ङ्ग धनुष्य धारण करणारे भगवान् श्रीकृष्णानीं, शत्रूंचें रक्त प्राशन करणारें, दैत्यांच्या मांसानें सर्वांग लिप्त झालेलें, आपल्या प्रभावाच्या योगानें स्त्रियांचा गर्भपात करणारें, दैत्यदानवांचा चुराडा उडविणारें, केव्हां केव्हां शंभर आणि केव्हां केव्हां हजार धांवा असणारें, अतिशय आश्चर्यकारक सुवर्णनिर्मित, भयंकर, दैत्यांचा थरकांप करून सोडणारें, ईश्वरसामर्थ्यरूपी कवचानें आच्छादित असलेलें, प्रत्यहीं देवगणांनीं पूजन केलें जाणारें, अविनाशि असें उत्कृष्ट तीक्ष्ण चक्र घेऊन, त्या योगानें नृपश्रेष्ठ पौंड्रकावर प्रहार केला. शत्रूंचें मांस भक्षण करणारें तें चक्र तत्काल पौंड्रकाचें शरीर विदारण करून पुनश्च सर्वेश्वर श्रीकृष्णाच्या हातीं येऊन राहिलें. तेव्हां पौंड्रक राजा गतप्राण होऊन भूमीवर पडला.

अस्तु, याप्रमाणें ज्यांच्या गतीचें ज्ञान होणें अशक्य आहे ते भगवान् श्रीकृष्ण पौंड्रकाला ठार करून सुधर्मा नामक सभेंत गेले. याप्रसंगीं यादवांनीं त्यांचें गौरव केलें.

## अध्याय एकशें दुसरा.

—:०:—

### एकलव्यनिर्याण.

वैशंपायन सांगतातः---राजा जनमेजया, तदनंतर वीरश्रेष्ठ बलरामानें निषादपति एकलव्याच्या स्तनद्वयावर शक्तीचा प्रहार करून सिंहाप्रमाणें गर्जना केली. तेव्हां निषादनाथ एकलव्य क्रुद्ध झाला; आणि त्यानें महाबलाढ्य मदमत्त बलरामाला स्तन आणि हृदय यांचे ठिकाणीं गदेचे प्रहार केले. लोकविख्यात अशा त्या एकलव्यानें गदाप्रहार केला असतां महाबलाढ्य यादवश्रेष्ठ बलरामानें तत्काल दोहीं हातांनीं एक गदा घेतली आणि ती एकलव्यावर फेंकली. ती अत्यंत भयंकर गदा आपल्यावर येत असून प्राण घेणारी आहे, असें कळून येतांच निषादपति एकलव्य मकरादि-

[1] आठ हजार तोळे म्हणजे एक भार.

कांचें वास्तव्य स्थान अशा समुद्राकडे धांवला. तो निषादपति राजा एकलव्य धावूं लागला तेव्हां तो जिकडे जाईल तिकडे त्याच्या मागून बलरामही जाऊं लागला. तेव्हां हे राजा, निषादपति एकलव्य गर्भगळित होऊन समुद्रांत पांच योजनेपर्यंत गेला आणि दुसऱ्या एका बेटामध्यें जाऊन राहिला. अशा रीतीनें त्या निषादपतीचा मोड केल्यानंतर बलराम परतले. आणि इकडे माणिक्यप्रभृति रत्नांनीं सुशोभित अशी जी एक सभा यादवांनीं केली होती, तिजमध्यें प्रविष्ट झाले. पूर्वीं युद्धामध्यें आसक्त झालेला सात्यकी देखील या वेळीं त्या सभेमध्यें आला; तसेंच हे राजा, इतरही अनेक यादव स्वतःच्या शक्यतेप्रमाणें तेथें येऊन दाखल झाले.

याप्रमाणें सर्व यादव वीर येऊन तेथें चोहोंकडे बसल्यानंतर त्या सर्वांना योग्यतनुरूप नमस्कार करून देवकीपुत्र भगवान् श्रीकृष्णानीं योग्य प्रसंगीं भाषण केलें. ते म्हणाले, " मी कैलासशिखर पाहिलें आणि तेथें नीलवर्णकंठ आणि आरक्तवर्ण जटा यांनीं सुशोभित अशा शंकरांचें दर्शन घेतलें. यादवश्रेष्ठ हो, श्रीशंकरानीं प्रसन्न होऊन मला वरदान दिलें. त्या ठिकाणीं देव आले होते आणि तप हेंच धन समजणारे मुनीही आले होते. मला पाहून शंकर प्रसन्न झाले आणि शेवटीं माझी स्तुति करून ते निघून गेले. हे यादवश्रेष्ठहो, त्या रात्रीं मला एक अद्भुत गोष्ट पहावयास मिळाली. ती अशीः—

अतिशय भयंकर असे दोन पिशाच माझ्या संबंधानं बोलत शिकार करीत चालले होते. ते अंतःकरणांत सदैव माझें चिंतन करीत होते. हे नृपश्रेष्ठहो, मला अवलोकन करितांच ते तपस्वी पिशाच आनंदित झाले. आणि त्या महात्म्यांनीं भक्तीनें लवून मला प्रणाम केला. तेव्हां मीही त्याना सर्वथैव प्रसन्न झालों व अत्यंत उत्कृष्ट अशा स्वर्गरूपी स्थानाची त्यांना प्राप्ति करून दिली. सारांश, कैलासशिखरावर शंकरांना प्रसन्न करून घेतल्यानंतर आज मी येथें आलों.

वैशंपायन म्हणाले:—राजा जनमेजया, याप्रमाणें देवाधिदेव श्रीकृष्णानीं भाषण केल्यानंतर सर्व यादवांनीं त्यांची प्रशंसा केली. आणि श्रीकृष्णाच्या आश्रयामुळें सर्वथैव कृतकृत्य झालेले ते सर्व यादव आपआपल्या मंदिराकडे निघून गेले. तदनंतर जगन्नायक ऐश्वर्यसंपन्न श्रीकृष्ण अंतःपुरामध्यें गेले. आणि त्यांनीं रुक्मिणी व सत्यभामा यांना घडलेली सर्व हकीकत सांगितली. प्रेमपूर्ण अशा श्रीकृष्णाची भेट झाल्यामुळें त्या उभयतांही आनंदित होऊन गेल्या.

अस्तु, हे राजा, याप्रमाणें मी तुला श्रीकृष्णाचें हें सर्व चरित्र निवेदन केलें आहे. त्यानीं महाबलाढ्य दुष्टांचा संहार करून पृथ्वीचें पालन केलें. घोर कृत्यें करणारा नरकासुर तशाच प्रकारचा नृपश्रेष्ठ पौंड्रक, हयग्रीव, निशुंभ, सुंद आणि उपसुंद यांचा संहार करून मुनिश्रेष्ठानीं अर्चन केलेल्या देवाधिपति श्रीकृष्णानीं ब्राह्मणांचें संरक्षण केलें. त्यांनीं ब्राह्मणांना द्रव्य दिलें, गोप्रदानें केलीं, अग्निहोत्र ठेविलें,व ब्राह्मणांना अत्यंत संतुष्ट ठेविलें. ब्रह्मचर्याचें पालन करून ऋषींना, अनेक प्रकारचे यज्ञ करून देवतांना, आणि श्राद्धें करून सर्वदा सर्व पितरांना, संतुष्ट ठेविलें. हे राजा, देवाधिदेव श्रीकृष्ण राज्य करीत असतां सर्व राज्य निष्कंटकपणें चाललें होतें. आणि ब्राह्मणादि सर्व प्रजा, सुखानें जीवनयात्रा चालवीत होत्या.

## अध्याय एकशें तिसरा.

—:०:—

### जनमेजयाचा प्रश्न.

जनमेजय म्हणालाः—हे तपोधन द्विजश्रेष्ठ, शंखचक्र गदा धारण करणाऱ्या श्रीकृष्णाचें चरित्र पुनरपि श्रवण करावें अशी माझी इच्छा आहे. कारण तें चरित्र आपणाकडून एकवार ऐकलें तरीही माझी तृप्ति होत नाहीं. चक्र धारण करणाऱ्या देवाधिदेव विश्वव्यापक श्रीकृष्णाचें चरित्र रात्रंदिवसही ऐकून अथवा त्याच्या ठिकाणीं रममाण होऊन तृप्त होईल, अर्थात्, तें ऐकण्याविषयीं पुनरपि इच्छा होणार नाहीं, असा कोण आहे? श्रीकृष्णाची कथा श्रवण करणें हाच मुख्य पुरुषार्थ होय. यास्तव, सर्व प्राण्यांना सदोदित आश्चर्यचकित करून सोडणारें, जगताच्या कल्याणास कारणीभूत असे हंस, डिंभक, आणि महात्मा दानव विचक्र, यांच्याशीं श्रीकृष्णाचें युद्ध कशा प्रकारचें झालें? विचक्र हा हंस आणि डिंभक यांचा मित्र होता असें माझ्या ऐकण्यांत आहे. हंस आणि डिंभक हे पराक्रमी दानव भृगुकुलोत्पन्न परशुराम याचे शिष्य होते. ते सर्व अस्त्रविद्येमध्यें चतुर असून त्या वीरांना श्रीविष्णूपासून वरप्राप्ति झालेली होती. हे विप्र, त्या उभयतां भूपतींशीं जगन्नायक श्रीकृष्णाचा पूर्वीं भयंकर संग्राम झाला, असें आपण सांगितलें. तेव्हां ते उभयतां कोणाचे पुत्र होते आणि त्यांचा तो भयंकर संग्राम कसा झाला? विचक्राचे तीक्ष्ण शूल धारण करणारे आणि आवेशसंपन्न असे अठ्यायशीं हजार दैत्य, हे महाराजा, त्या संग्रामामध्यें सैनिक होते. तो संधी साधून यादवांशीं युद्ध करण्याची इच्छा करीत होता. देव व दैत्य यांमध्यें प्रचंड संग्राम चालला असतां तो दुर्जय दानव देवतांचा पराजय करीत असे व त्याचा वध करण्याविषयीं श्रीकृष्ण सदैव प्रयत्न करीत असत असें मी ऐकलेलें आहे. यास्तव, तो सर्व कथाभाग आपण मला कृपाकरून निवेदन करावा.

## अध्याय एकशें चवथा.

—:०:—

### हंस आणि डिंभक यांची उत्पत्ति

वैशंपायन म्हणालेः—हे नृपश्रेष्ठा, पूर्वीं शाल्व देशामध्यें शुद्ध अंतःकरणाचा व सर्व प्राण्यांवर दया करण्याविषयीं तत्पर असणारा ब्रह्मदत्त नांवाचा एक उत्कृष्ट राजा होऊन गेला. तो प्रत्यहीं अंतःकरणापासून पंचमहायज्ञ करीत असे. त्यानें इंद्रिय आणि मन यांचा जय केला होता. तो वेदवेत्ता असून ब्रह्मज्ञानीही होता. तो सदैव अनेक यज्ञ करीत असल्यामुळें जणु यज्ञमयच बनून गेला होता. तो मोठा कल्याणकारक असे. हे भूपते, त्याला दोन भार्या होत्या. त्याही अत्यंत रूपवती, गुणसंपन्न आणि अत्यंत वैभवशाली होत्या. पण, हे नृपश्रेष्ठा, त्यांना अपत्य नव्हतें. ज्याप्रमाणें स्वर्गामध्यें इंद्र शचीच्या सहवासानें आनंद पावतो त्याप्रमाणें तो त्या उभयतां स्त्रियांच्या सहवासांत आनंदमग्न होऊन राहिलेला असे. त्याचा मित्रसह नांवाचा एक ब्राह्मणश्रेष्ठ मित्र होता. तो महायोगी असून वेद आणि वेदान्त यांचें एकनिष्ठपणें ज्ञान संपादन करणारा होता. पण, हे राजा, त्याही ब्राह्मणश्रेष्ठाला अपत्य नव्हतें. राजा ब्रह्मदत्त आणि त्याच्या उभयतां स्त्रिया यांनीं एकाग्र अंतःकरणानें, पुत्रप्राप्तीसाठीं शूल धारण करणाऱ्या जगन्निवास श्रीशंकराचें दहा वर्षेपर्यंत आराधन केलें; व त्या ब्राह्मणानेंही पुत्रप्राप्तीसाठीं विष्णुयाग सुरू केला. हे नृपश्रेष्ठा, नीलकंठ आणि आरक्तवर्ण जटा धारण

करणारे श्रीशंकर, त्याच्या आराधनानें संतुष्ट झाले आणि रात्रीं स्वप्नामध्यें दर्शन देऊन त्या राजाला म्हणाले, ‘ हे उत्कृष्ट नियमनिष्ठ राजा, मी तुला प्रसन्न झालों आहें. तुझें कल्याण होवो. तुला वाटेल तो वर मागून घे. ’ हें ऐकून राजानें आनंदानें किंचित् हास्य केलें व मला दोन पुत्र व्हावे असें श्रीजगन्नायक श्रीशंकरास म्हटलें. तेव्हां ‘ तथास्तु ’ असें म्हणून वृषभवाहन श्रीशंकर अंतर्धान पावले. पुढें तो राजा जागा झाला.

इकडे त्या विद्वान् मित्रसह ब्राह्मणानेंही अविनाशीं जगन्नायक देव श्रीविष्णु ह्यांचें पांच वर्षें भक्तिपूर्वक अर्चन केलें. तेव्हां त्या योगानें प्रसन्न होऊन देवाधिदेव श्रीविष्णूंनीं ‘स्वतःच्या तोडीचा एक पुत्र होईल ’ असा त्याला वर दिला. हे महाराजा, त्या राजस्त्रियांच्या उदरामध्यें श्रीशंकराच्या तेजानें युक्त असे गर्भ राहिले व त्या ब्राह्मणाच्या स्त्रीच्या उदरांतही गर्भरूपानें विष्णुतेज वास्तव्य करूं लागलें. हे महाराजा, त्या महासामर्थ्यसंपन्न नृपस्त्रियांना कांहीं दिवस गेल्यानंतर शंकरांनीं निर्माण केलेले दोन पुत्र झाले. तेव्हां राजानें ब्राह्मणांना पुष्कळ द्रव्य देऊन त्या पुत्रांच्या नामकरणादि क्रिया यथाविधि केल्या. विनयशील अंतःकरण असलेल्या त्या ब्राह्मणालाही एक पुत्र झाला. हे राजा, तो पुत्र म्हणजे पुत्राच्या रूपानें राहणारा प्रत्यक्ष जगन्नायक श्रीविष्णुच होय. त्या ब्राह्मणानेंही आपले पुत्राचे जातकर्मादि सर्व संस्कार केले. ते दोन राजपुत्र आणि हा ब्राह्मणपुत्र हे तिघेही वयानें सारखेच होते. त्या तिघांनीं मिळून सर्व वेदांचें आणि राजनीतीचें अध्ययन केलें. ते तिघेही धनुर्वेद आणि अस्त्रविद्या यांमध्यें कुशल झाले. त्या राजपुत्रापैकीं ज्येष्ठाचें नांव हंस असून कनिष्ठाचें डिंभक असें होतें. आणि हे राजा, त्या ब्राह्मणपुत्राचें नांव जनार्दन असें होतें. त्या सर्व कुमारांची परस्परांशीं मैत्री जमली होती.

## अध्याय एकशें पांचवा.

—:०:—

### हंसादिकांस वरप्राप्ति.

वैशंपायन सांगतातः—श्रीशंकराचे स्वतःचे अंशभूत असे महाज्ञानी हंस आणि डिंभक हे तपश्चर्या करण्याचे उद्देशानें तत्काल हिमालयाच्या समीपभागीं गेले. आणि तेथें नीलकंठ उमापति जगन्निवास श्रीशंकर यांना उद्देशून त्यांनीं तपश्चर्या करण्यास प्रारंभ केला. हे राजा, स्वतःला वीर्याची आणि अस्त्राची प्राप्ति व्हावी असा त्यांनीं अंतःकरणामध्यें हेतु धरिला होता. ते केवळ वायु आणि जल प्राशन करून शुचिर्भूत आणि एकाग्र अंतःकरणानें तपश्चर्या करीत होते. ते रात्रंदिवस हे देवादिदेवा शंकरा, हरा, शर्वा, शिवा, आनंदमूर्ते, नीलकंठा, उमापते, वृषभवाहना, विषमलोचना, हरिद्र्वर्णनेत्रा, जगन्नायका, भक्तप्रिया, कैलासाधिपते, ईश्वरा, वासुदेवा, कल्याणकारका, विनाशशून्या, सद्योजाता, महादेवा, सर्व प्राण्यांच्या हृदयामध्यें वास्तव्य करणाऱ्या, सर्व प्रकाशमान् वस्तुंहूनहि प्रकाशमान् असणाऱ्या, सर्व प्राण्यांची काळजी वहाणाऱ्या, प्रणवस्वरूपा सदाशिवा, तुजला नमस्कार असो; इत्यादिक प्रकारें श्रीशंकराचीं नांवें उच्चारून प्रत्यहीं अभ्युदयकारक श्रीशंकरांचें स्तवन करून व अंतःकरणामध्यें सदैव त्याचें चिंतन करून तपश्चर्या करूं लागले. त्यांनीं ममत्व आणि अहंकार यांचा त्याग केला असून मौनव्रत धारण केलें होतें. हे राजा, त्यांनीं पांच वर्षें स्वतःच्या सामर्थ्यावर अशा प्रकारची तपश्चर्या केली. तेव्हां त्यांच्या त्या आत्म-

संयमनानें श्रीशंकर त्यांना प्रसन्न झाले आणि हस्तामध्यें शूल धारण करणाऱ्या, व्याघ्रचर्मरूपी वस्त्र परिधान करणाऱ्या, भक्तांच्या पातकांचा संहार करणाऱ्या कल्याणकारक त्रिनेत्र उमापति श्रीशंकरांनीं त्यांना आपलें दर्शन दिलें. अर्धचंद्ररूपी शिरोभूषण धारण करणारे श्रीशंकर आपल्यापुढें उभे आहेत असें पहातांच त्या उभयतांनीं आनंदित अंतःकरणानें त्यांना तत्काल नमस्कार केला. तेव्हां श्रीशंकर म्हणाले, ' तुह्मां उभयतांचेंही कल्याण होवो, तुह्मी मजकडून वर मागून घ्या. तुमच्या इच्छे प्रमाणें सर्व घडून येईल. ' हे राजा, हें ऐकून ते उभयतां म्हणाले कीं हे भगवन्, आपण जर आह्माला प्रसन्न झालां आहां तर देवदैत्य इत्यादिकांच्या मुख्य सैन्यांकडून अथवा यक्ष, गंधर्व, दानव इत्यादिकांकडून आमचा पराभव होणें केव्हांही शक्य असूं नये. हे सर्वात्मका, हा आह्माला वर मिळावा. आणि हे विषमलोचना, आह्माला जो दुसरा वर पाहिजे तो असा कीं, ज्यांची देवता रुद्र आहे अशा सर्व अस्त्रांचा आह्मापाशीं संग्रह असावा. माहेश्वर, तसेंच ब्रह्मशिर नावाचें भयंकर आणि प्रचंड अस्त्र, ज्याचा भेद होणें शक्य नाहीं असें दिव्य कवच, जें छिन्नविछिन्न होणें अशक्य आहे असें धनुष्य आणि परशु, हीं आयुधें, आणि हे महादेवा, आह्मी युद्धांत चाललों असतां आमचें संरक्षण करून आह्माला साहाय्य करण्यासाठीं दोन भूतें, हीं आह्माला मिळावीं" हें ऐकून देवादिदेव श्रीशंकरांनीं 'तथास्तु' असें म्हटलें आणि तत्काल सर्व प्राण्यांचें हित करण्याविषयीं आसक्त असणाऱ्या कुंडोदर आणि विरूपाक्ष या भूतांनां त्यांनीं आज्ञा केली कीं हे भूताधिपतींनो, हे हंस आणि डिंभक भयंकर संग्रामामध्यें जाऊं लागले म्हणजे या बलाढ्य अशा उभयतांना तुह्मी साहाय्य करा. अशी आज्ञा करून भगवान् शंकर त्याच ठिकाणीं अंतर्धान पावले.

तदनंतर वीर्यसंपन्न झालेले ते हंस आणि डिंभक प्रत्यक्ष श्रीशंकराप्रमाणें शोभूं लागले. श्रीशंकराच्या कृपेनें त्यांच्या सर्व अस्त्रांचा अभ्यास झाला असून त्या अत्यंत वीर्यसंपन्नांना शस्त्रांची आणि चापांची प्राप्ती झाली होती. त्यांनीं अंगांत चिलखत चढविलेलें होतें. देव अथवा दानव हे या वीरांचा पराभव करण्यास असमर्थ होते. नीलकंठ आणि आरक्तवर्ण जटा धारण करणाऱ्या देवाधिदेव श्रीशंकराचे ते अत्यंत भक्त होते. ते आपल्या शरीरावर सदैव भस्माचें उद्धूलन करीत असून प्रत्यहीं श्रीशंकराचा उत्सव करीत असत व त्याजवर जलधारा धरून अभिषेक करीत असत. ते सदैव त्रिपुंड्र धारण करीत असत. मस्तकावर जटा धारण करीत असत. सर्वांगावर रुद्राक्ष धारण करीत असत. व्याघ्रचर्मानीं सर्व शरीर प्रावृत करीत असत. 'शिव, शांत, ज्ञानसंपन्न महादेव याला नमस्कार असो. इत्यादि प्रकारें[1] नांवाचा उच्चार करून ते श्रीशंकराची स्तुति करीत असत. अस्तु; अशा रीतीनें श्रीशंकराकडून वर संपादन केल्यानंतर ते आपल्या गृहाकडे गेले. व त्या उभयतां बलाढ्यांनीं आपला पिता, पित्याचा मित्र मित्रसह[2] आणि आपली माता यांच्या चरणाला वंदन केलें. हे राजा, धर्माच्या ठिकाणीं अंतःकरण आसक्त असलेला महाज्ञानी जनार्दनही पुष्कळ काल निघून गेल्यानंतर योगबलानें विद्येमध्यें पारंगत झाला. तो सर्व इंद्रियांचा निग्रह करून पीतवर्ण कौशेय वस्त्र परिधान करणाऱ्या विश्वव्यापक श्रीविष्णूची उपासना करीत असे. तो ब्रह्मनिष्ठ होता. पुढें हंस आणि डिंभक यांचा विवाह झाला,

१ ' नमः शिवाय शांताय महादेवाय धीमते '
२ ' मित्रसह ब्राह्मणाचा पुत्र. '

तेव्हां धर्मात्म्या जनार्दनाचाही विवाह झाला. ते सर्वेही प्रत्यहीं पंचयज्ञ करणारे, यज्ञक्रियेंत गढून असलेले, स्वस्त्रीच्याच ठिकाणीं आसक्त असलेले, वडिलांची सेवा करण्यांत व्यापृत असलेले, असे होते. आणि हे राजा, धर्म हेंच मुख्य कल्याणाचें साधन आहे, असें ते मानीत असत.

## अध्याय एकशें सहावा.

—:०:—

### हंस आणि डिंभक याची मृगया.

वैशंपायन म्हणाले:——राजा जनमेजया, पुढें एके समयीं ते उभयतां वीर हंस आणि डिंभक त्या जनार्दनासहवर्तमान मृगया करण्यासाठीं निघून गेले. त्या वेळीं त्यांच्याबरोबर असंख्यात रथ, अनेक अश्व आणि पुष्कळ गज होते. हे महाराजा, त्या वीरांनीं अरण्यांत गेल्यानंतर आपल्या तीक्ष्ण बाणांनीं सिंह, व्याघ्र, वराह व इतरही अनेक दुष्ट पशूंना जिकडे तिकडे गतप्राण करून सोडलें. हे राजा, शिकार करतेवेळीं त्यांचे बरोबर शिकार करणारे श्वानही होते. हे नरनाथ, मृगया करीत असतांना "हा पहा, स्थूल शरीराचा आणि दीर्घ नेत्र असलेला वराह इकडे येत आहे, तोडा याला बाणांनीं. हा पहा, सिंह निसटतो आहे. हा दुसरा रानरेडा आपल्या शिंगांत सर्पास टोंचून घेऊन पळत आहे. हे पहा, हरिण आपल्या अर्भकांसहवर्तमान चोहोंकडे धांवत आहेत. हा भयभीत झालेल्या ससांचा प्रचंड समुदाय चोहोंकडे भ्रमण करीत आहे. हीं पशुबालकें आपल्या मातेचें स्तनपान करीत आहेत. खरोखर हीं मोठीं गोजिरवाणी दिसत आहेत. त्यांचा प्राण घेणें योग्य नाहीं. केवळ अनेक श्वान सोडून यांना घेरून सोडावें आणि पकडून ठेवावें हेंच योग्य आहे." अशा प्रकारचे मोठमोठ्यानें उच्चारलेले शब्द मृगया करणाऱ्या क्षत्रियांच्या आणि धांवणाऱ्या व्याघ्रांच्या मुखांतून बाहेर पडूं लागले.

अशा रीतीनें अनेक व्याघ्र, सिंह आणि इतर पशु यांना गतप्राण करून सोडल्यानंतर, सूर्य आकाश–मध्यावर आरूढ झाला असतां, ते वीर श्रांत होऊन गेले. आणि हे महाराजा, "बस झाली आतां मृगया आम्हाला; फारच श्रम होत आहेत" असें म्हणून ते पुष्कर नांवाच्या एका सरोवराकडे गेले. त्या सरोवरावर मुनि आणि सिद्ध येत असत. त्या सरोवराच्या समीप गेल्यानंतर तेथें ते सुखानें बसले. तेथील प्रदेश दलदलीचा असून त्याजवर एकसारखा वारा खेळत होता. तदनंतर श्रमानें व्याकुल झालेल्या त्या सर्व लोकांनीं सरोवरामध्यें बुड्या मारल्या आणि क्षुधेनें अत्यंत पीडित झालेल्या लोकांप्रमाणें कमलांचे देंठ आणि पानें हीं काढून भक्षण केलीं. जनार्दनासहवर्तमान ते हंस आणि डिंभक हे त्या सरोवराचे बाजूस एके ठिकाणीं जाऊन श्रमपरिहार करीत बसले होते. त्या सरोवराच्या तीरावर विसावा घेतल्यानंतर सुखानें बसले असतां श्रेष्ठ अशा मुनींनी उच्चारलेला वेदध्वनि त्यांच्या कानावर आला. हा स्वरयुक्त वेदध्वनि या मध्यान्हकालीं चालू असलेल्या यज्ञामध्येंच सर्व ऋषींनीं उच्चारलेला असला पाहिजे, असें त्या राजांना वाटलें. तो वेदध्वनि श्रवण करितांच त्या उभयतां नरपतींना आनंद झाला. आणि मुनींनीं चालविलेला तो यज्ञ पहावा असें त्या वेळीं त्यानीं मनांत आणलें. तेव्हां त्यांनीं बरोबर अनेक पशु असलेलें आपलें सर्व सैन्य तेथेंच ठेविलें. आणि हे महाराजा, तो वीर जनार्दन, हंस आणि डिंभक, हे एक प्रचंड चाप आणि कांहीं बाण इतकेंच बरोबर घेऊन पायीं चालतच महर्षि काश्यपाच्या आश्रमाकडे गेले. या वेळीं काश्यप मह-

र्षींनी जपहोमादिकांमध्यें तत्पर असलेल्या मुनींच्या साहाय्यानें विष्णुयाग चालविलेला होता.

## अध्याय एकशें सातवा.

—:०:—

### दुर्वासदर्शन.

वैशंपायन सांगतातः—हे राजा जनमेजया, तो धर्मात्मा जनार्दन, हंस आणि डिंभक यांनीं त्या यज्ञाच्या ठिकाणीं गेल्यानंतर सभेमध्यें प्रवेश करून त्या मुनिश्रेष्ठांना नमस्कार केला. ते येतांच महात्म्या मुनींनीं आणि त्यांच्या शिष्यांनीं अर्घ्य, पाद्य आणि आसनें देऊन त्यांचा प्रयत्नपूर्वक बहुमान केला. हे राजा, त्यांच्या त्या बहुमानाचा स्वीकार केल्यानंतर ते उभयतां नरपति, हंस आणि डिंभक, आणि तो ब्राह्मणश्रेष्ठ जनार्दन, हे महात्मे आनंदित अंतःकरणानें तेथें स्वस्थ बसले. तदनंतर हे राजा, संयम करणारा हंस त्या मुनींना म्हणाला, ' हे मुनिश्रेष्ठहो, सर्व साधनें संपादन करून असाच यज्ञ करावा अशी आमच्या पित्याचीही इच्छा आहे. यास्तव, या यज्ञाची समाप्ति झाल्यानंतर आपण तिकडे गमन करा. हे ऋषिश्रेष्ठहो, आम्ही दिग्विजय करून धर्मनिष्ठ नृपति असा जो आमचा पिता त्याजकडून राजसूय यज्ञ करविणार आहों. यास्तव, आपण विप्रश्रेष्ठांनीं आपले शिष्य आणि परिवार यांसहवर्तमान तेथें आगमन करावें. आम्हीं परस्परांच्या साह्यानें आजच दिग्विजय करणार. येथें राहूनच आपल्या सैनिकसमुदायांकडून हें कार्य घडवून आणण्याचें आम्हांमध्यें सामर्थ्य[1] आहे. आम्हां उभयतांपुढें उभे देखील राहण्याची देवांतांना अगर दैत्यांना शक्ति नाहीं. आम्हीं कैलास पर्वतावर वास्तव्य करणाऱ्या श्रीशंकराकडून प्रयत्नानें वर मिळविलेला आहे. आणि अनेक प्रकारचीं अस्त्रेंहि संपादन केलेलीं आहेत. यामुळें असंख्यातही शत्रूंकडून आमचा पराजय होणें शक्य नाहीं. " असें बोलून दर्प व अंगची मस्ती यांनी पछाडून सोडलेला तो हंस थांबला. तेव्हां ऋषि म्हणालेः—हे नृपश्रेष्ठा, जर यज्ञ झाला तर आम्हीं आपल्या शिष्यांसहवर्तमान तिकडे जाऊं. नाहीं झाला तर येथें आहोंतच.

वैशंपायन सांगतातः—[ याप्रमाणें त्या कर्मनिष्ठ याज्ञिकांशीं संवाद करून नंतर नैष्कर्म्यशीलांचा उच्छेद करण्याच्या हेतूनें ते निघाले! अशी नीलकंठाची येथें प्रस्तावना आहे. ] तदनंतर हे महाराजा, देशपर्यटण करण्याचा अंतःकरणामध्यें निश्चय करून ते उभयतां बंधु ज्या ठिकाणीं दुर्वास ऋषि वास्तव्य करीत होते, त्या पुष्कर सरोवराच्या उत्तर तीरावर गेले. त्या ठिकाणीं हे प्रभो, संन्यस्त झालेले, नियमनिष्ठ होऊन प्रणवाचें किंवा वेदांचें अध्ययन करणारे, 'ब्रह्मविदाप्नोति- परं ' इत्यादि ब्रह्मप्रतिपादक उपनिषदानी निर्दिष्ट जें पद, म्हणजे सद्वस्तु, त्याच्या प्राप्त्यर्थ झटत असलेले व त्यांच्या[1] ( सूत्रपदांच्या ) अर्थाचें आलोचन करण्याविषयीं तत्पर असलेले, ममत्व आणि अहंकार यांचा संपर्क

---

१ येथें मुंबईपाठ " शक्तावयमिहैवैतत्कर्तुं सैनिकसंचयैः " असा आहे. परंतु नीलकंठाचे टीकेवरून ' शक्तावहयमेवैतत्कर्तुं० ' असा पाठ दिसतो; व एशियाटिक सोसायटीचे प्रतींत तसाच आभास मिळालाही. त्याचा नीलकंठानें अर्थः हयसामग्रीरहित, केवळ सैनिकांनीं ' असा केला आहे, तो ठीकच आहे. ' नुसते पायदळच पुरे. रिसाला नको.'

१ येथें 'ब्रह्मसूत्रपदे सक्ता' असे मूळ आहे, त्याचा अर्थ वर दिलाच आहे. श्रीमद्भगवद्गीतेंत " ब्रह्मसूत्रपदैश्चैव हेतमद्भिर्विनिश्चितैः " असा उल्लेख आहे. तेथे "ब्रह्मसूत्र पदै याचा अर्थ, बादरायणांची शारीरसूत्रें असा घेऊन गीतेचे कालनिर्णयाला तो आधार आहे असें कोणी मानितात. परंतु या स्थळीं अशांचें काय म्हणणें आहे ?

नसलेले, केवळ कौपीन हेंच तेवढें आच्छादन धारण करण्याचा नियम केलेले; सर्व जगताच्या उत्पत्तीचें स्थान, विश्वव्यापक, जगन्नायक, वैभवसंपन्न, विशालस्वरूप, कल्याणमय, शांतिसंपन्न, सर्वगामि, वेदान्तप्रतिपाद्य, प्रत्यक्षाला अविषय, अंतशून्य, अविनाशि, सर्वदैव प्राण्याशीं संलग्न असलेलें, सर्वहि प्राण्यांना आधारभूत, विकारशून्य, दुर्वास मुनींनीं सदैव उपासना केलें जाणारें, वेदान्तातील मूर्तिमंत मुख्यरसच असें असलेलें, गौरवसंपन्न, विषमनेत्र, जें शिवरूपि परब्रह्म, त्याचें अंतःकरणामध्यें ध्यान करणारे; तर्काच्या योगानें सत्यभूत वस्तूचा निश्चय केलेले; व ज्ञानानें अंतःकरण निर्मल झालेले, असे कित्येक हंस, परमहंस, दुर्वास मुनींचे शिष्य होते.

त्याठिकाणीं ते महात्मे हंस आणि डिंभक गेल्यानंतर त्यांनीं ब्रह्मचर्यसंपन्न, महाज्ञानी, परब्रह्माचा शोध करीत असलेले, दुर्वासमुनि यांचें त्यांनीं दर्शन घेतलें. हे महाराजा, तो दुर्वासा जर क्रुद्ध झाला तर या सर्व लोकांना जाळून टाकण्याला समर्थ आहे. तो क्रुद्ध झाला असतां केव्हांही त्याला अवलोकन करण्याचें सामर्थ्य देवांच्याहि अंगीं नाहीं. तो प्रत्यक्ष रुद्राची मूर्ति असून अनेक प्रकारचीं स्वरूपें धारण करणारा, आरक्तवर्ण कौपीन हेंच एक वस्त्र असलेला, परमहंस असून मूर्तिमंत कोपच होता. हे महाज्ञानी जनमेजया, त्याला अवलोकन करितांच त्या उभयतांचे असे विचार चालले. ते मनांत म्हणाले, काषाय वस्त्र धारण करणारा, प्रचंड भूताप्रमाणें दिसणारा, हा कोण? ब्राह्मणादिवर्ण विभागांचें ज्ञान सर्वांहून यालाच अधिक आहे? गृहस्थाश्रम सोडून यानें हा आश्रम तरी कोणता घेतला आहे? खरोखर गृहस्थ हाच धर्माचें स्वरूप होय. उत्कृष्ट प्रकारचें धर्मज्ञान असेल तर तें गृहस्थालाच असतें. धर्माचा प्राण कायतो गृहस्थच. गृहस्थ हाच वर्णव्यवस्थेस कारणीभूत व म्हणून गृहस्थ हाच खरा वर्ण होय. गृहस्थ हा प्राण्यांची प्रत्यक्ष माता असून त्यांचा प्राणही तोच आहे. या गृहस्थस्वरूपाचा त्याग करून हा अत्यंत मूर्खाप्रमाणें भलतेंच स्वरूप धारण करून रहात आहे. त्या अर्थी हा उन्मत्त तरी असावा अथवा याचें स्वरूपच असें भिकार असावें किंवा हा मूर्खच असावा अथवा हा सदैव ध्यान केल्यासारखें दाखवीत आहे, त्याअर्थी हा फसविणारा तरी असावा. याचें ज्ञानच अगदीं निकृष्ट प्रतीचें असेल काय, आणि म्हणूनच हे कशाचे तरी ध्यान करीत आहेत? अशांना मार्गाला लावणें फारच कठीण आहे. तथापि, निराळ्याच आश्रमांचे उत्पादक अशा या सर्व बुद्धिहीन पुरुषांना आम्हीं गृहस्थाश्रमी करून सोडणार. मूर्खपणाच्या ज्ञानमार्गामध्यें गढून गेलेले, दुराग्रहानें पछाडलेले, आणि अंतःकरण दोषयुक्त असलेले, असे हे जे मूर्ख ब्राह्मण त्यांजवर आम्ही या संबंधानें बलात्कारच करणार. यांना शिक्षण देणारा कोण मूर्ख येथें असेल हें कांहीं आम्हांला कळत नाहीं. अस्तु; यांना धर्माच्या अनुरोधानें असलेल्या मार्गाकडे लावून नंतर आपण परत फिरूं.

१ 'कुटीचक, बहूदक, हंस, परमहंस, या संन्याशांच्या पायऱ्या आहेत.

१ नीलकंठाचें म्हणणें, हें वाक्य त्यांनीं उपहास हेतूनें उच्चारिलें असल्यामुळें याचा भाव 'हा सर्वहि वर्णांवरचा म्ह० पलीकडचा म्ह० जाति बहिष्कृत आहे,' असा समजावा. असें आहे.

२ यथा वायुं समाश्रित्य वर्तंते सर्व जंतवः ।
तथा गृहस्थमाश्रित्य वर्तंते सर्व आश्रमाः ॥
भगवान् मनु.

हे राजा, अंतःकरणाला मोह पडल्यामुळें आणि भाग्याचा क्षय झाल्यामुळें अशा प्रकारचे विचार मनांत येऊन ते उभयतां नरपति आणि तो ब्राह्मण जनार्दन हे, अंतःकरणाचा अत्यंत निग्रह केलेल्या, दुर्वास मुनीकडे गेले आणि तो अतींद्रिय ज्ञान संपन्न दुर्वासा आणि इतरहि नियमनिष्ठ यति यांना हे नृपश्रेष्ठा, कोपाविष्ट होऊन ते उभयतां नृपति बोलूं लागले.

## अध्याय एकशें आठवा.

—:०:—

### राजपुत्रकृत संन्यासनिंदा.

हंस व डिंभक म्हणालेः—हे ब्राह्मणा, तूं हें काय चालविलें आहेस, तुझ्या अंतःकरणाला ज्ञानाच्या एका लेशाचाही संपर्क झालेला नाहीं. ज्याचा तूं अवलंब केला आहेस तो हा आश्रम तरी कोणता ? गृहस्थाश्रमाचा त्याग करण्यांत तुला कोणत्या मोठ्या पदाची प्राप्ति झाली आहे? मला अशी स्पष्टपणें शंका येत आहे कीं, तूं मूर्तिमंत दंभच आहेस. तुला असें करण्याचें कांहीं कारण नाहीं. अरे मूर्खा, तुला असें करण्यांत सुख होत असेल. परंतु, या तुझ्या कृत्यानें सर्व लोकांचा नाश होणार आहे. या सर्व लोकांना तूं असें करावयाला शिकवीत आहेस; पण, तूं यामुळें खास नरकांत पडणार. अरे मूर्खा, स्वतः तर तुझा नाश झालाच आहे. पण, तूं आणखी प्रयत्नपूर्वक इतरांचाही नाश करणार आहेस. हे मंदबुद्धे ब्राह्मणा, तुझें शासन करणारा कोणीच कसा नाहीं ? ज्यानें तुला हें शिक्षण दिलें असेल तो पातकी होय. यामध्यें मुळींच संशय नाहीं. यास्तव हे ब्राह्मणा, तूं हा आश्रम सोडून दे. आणि अंतःकरणाचा निग्रह करून गृहस्थाश्रमी हो. हे विप्रा, तूं प्रत्यहीं पंचमहायज्ञ करीत जा. गृहस्थाश्रमाच्या पालनाविषयीं एकनिष्ठतेनें प्रयत्न कर म्हणजे पुढें तूं स्वर्गाला जाशील. स्वर्ग हेंच अतिशय मोठें सुख आहे. हे ब्राह्मणा, तुला जर जिवंत रहावयाची इच्छा असेल तर हाच एक श्रेयस्कर मार्ग आहे.

हें त्याचें भाषण ऐकून धर्मात्मा ब्राह्मण 'जनार्दन' यानें दुर्वास मुनीचें दर्शन घेऊन त्यांना नमस्कार केला आणि त्या उभयतांना ( हंस, डिंभकांना ) अत्यंत नम्रपणें म्हटलें. हे राजानों, या मुनीच्या तेजापुढें आपलें तेज अगदीं फिकें आहे. तेव्हां अशा प्रकारचे हे भयंकर शब्द तुम्हीं मुखांतून काढूं नका. अशा प्रकारचे भयंकर शब्द ऐकणेंहि खरोखर योग्य नाहीं. इहलोकीं असो अथवा स्वर्गांत असो; ज्या मूर्खाला जीवंत म्हणून रहावें असें वाटत असेल, तो कोणीहि असला, तरी त्याचें असें बोलण्याचें काय सामर्थ्य आहे? तुमची विचारशक्तिच कमी असून एकंदरींनें तुमचा हा विनाशकालच प्राप्त झाला आहे. तुमचें जें कांहीं आयुष्य अवशिष्ट असेल त्याचा आज खरोखर शेवट लागला. आज खरोखर या ब्राह्मणांनीं केलेल्या शिक्षेच्या योगानें आपले प्राण पार निघून गेले असें समजा. हे यति म्हणजे केवळ पवित्र असून ज्ञानाच्या योगानें त्यांचीं अंतःकरणें देदीप्यमान् झालेलीं आहेत. यांचीं कर्में ज्ञानरूपी अग्नीच्या योगानें दग्ध होऊन गेलीं असून हे योगक्रियेच्या योगानें प्राण्याच्या ठिकाणीं आपल्या प्राणवायूचें [१] हवन करीत असतात. तुम्हां दोघां-

१ प्राणायाम करितांना पूरकाच्या वेळीं श्वास निरोध करून वायु खालीं न्यावयाचा असतो अर्थात तो अपान वायूमध्यें जाऊन मिळतो व रेचकाच्यावेळीं तो ऊर्ध्वगामी करावयाचा असतो, हे जे वायूचें ऊर्ध्वाधःकरण त्यासच 'प्राणहोम' असे म्हणतात. "अपाने जुह्वति प्राणं प्राणेऽपानं तथैवच" असें जें

वाचून अशा प्रकारचे शब्द मुखांतून काढण्यास कोण समर्थ आहे? एकंदरीनें समजलें मला. आतां येथें आपल्या जीविताची समाप्ति झाली. हे नरपतीनो, पूर्वीं ऋषींनीं ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ आणि संन्यास असे चार आश्रम करून ठेविले आहेत. त्यांपैकीं संन्यास हा चौथा आश्रम सांगितला आहे. जो महाज्ञानी पुरुष या आश्रमामध्यें असेल तो अत्यंत पवित्र होय. तुम्हीं नम्रपणानें वृद्धांची उत्कृष्ट प्रकारें सेवा केलेली नाहीं आणि तपस्वी लोकांकडून ज्ञान संपादनहि केलेलें नाहीं. कारण तसें असतें तर मग असें कोण बोलणार? हे राजा, जोंपर्यंत माझ्या शरीरांत प्राण आहे, तोंपर्यंत मला असले हे भयंकर शब्द मुळींच ऐकतां यावयाचे नाहींत. हे मूर्खा राजा, तुझ्या या मित्रत्वाला घेऊन मला काय करावयाचें आहे. हे नरपते, तूं गुरूंच्यापासून ज्ञानप्राप्ति करून घेतली नाहींस. अशा प्रकारें ( गुरूपासून ) संपादन केलेलें ज्ञान हें धर्माचें इच्छानुसारि फल होय. आणि तुमच्या सारख्यानें जबरदस्तीनें संपादन केलेलें ज्ञान पापाच्या उत्पत्तीस कारण आहे. आतां मीं तुम्हांला सोडून तरी जातों; एखाद्या शिलातलावर स्वतःला आपटून तरी घेतों; भयंकर विष तरी प्राशन करतों; मोठमोठ्या पाण्यांच्या लाटांमध्यें जाऊन तरीं पडतों अथवा तुम्हीं पहात असतां आणि ऐकत असतां त्यांच्यामध्यें प्राणत्याग तरी करतों. असें म्हणून, 'तुम्हीं असें बोलूं नका' असें म्हणत' तो जनार्दन विलाप करूं लागला.

---

मागील पृष्ठावरील.

भगवद्गीतेमध्यें सांगितलेले आहे, तेंच येथें सांगितलेलें आहे. शरीराच्या अंतर्भागीं संचार करणाऱ्या वायूला 'प्राण' असें म्हणतात. हाच प्राण शब्दाचा अर्थ येथेंहि घ्यावयाचा.

## अध्याय एकशें नववा.

—:०:—

### दुर्वासमुनींचा कोप.

वैशंपायन सांगतातः—राजा जनमेजया, तदनंतर दुर्वासमुनि अत्यंत क्रुद्ध झाले. ते जणु त्या राजांच्या प्राणाला जाळून खाक करीत आहेत असें वाटूं लागलें. त्यांच्या प्रत्येक इंद्रियांत क्रोध अगदीं खिळून गेला. त्यांनीं सदैव अग्नीनें युक्त असलेली आपली भयंकर दृष्टि त्या उभयतांवर फेंकली. हे राजा त्या वेळीं ते या सर्व जगताला जाळून भस्म करितात कीं काय असें भासूं लागलें. केवळ त्या जनार्दन ब्राह्मणाकडे मात्र ते सौम्य दृष्टीनें अवलोकन करीत होते. हे राजा, ते म्हणाले, 'अरे राजानों, तुमचा विध्वंस होईल, विध्वंस. चला निघा येथून. विलंब लावूं नका. तुमच्या या भाषणानें उत्पन्न होणाऱ्या क्रोधाला मी आश्रय देऊं शकत नाहीं. नाहीं तर हे राजानों, तुम्हां सर्व भूपतींना दग्ध करून सोडण्याचें माझ्या अंगीं सामर्थ्य आहे. तुमच्या या कृत्याहून धाडसाचें असें कोणतें कृत्य आहे? माझ्या पुढें भाषण तरी करण्याची कोणाची शक्ति आहे?' अरे मूर्खानों, जगद्विख्यात शंख—चक्र—गदाधारी श्रीविष्णु तुमचा हा ताठा नाहींसा करील. आतां मी तुम्हांला काय बोलावयाचें आहे?' असें बोलून ते धर्मनिष्ठ यतिश्रेष्ठ दुर्वासमुनि तेथून उठून जाऊं लागले. तेव्हां हंस त्यांना प्रतिबंध करण्याचा प्रयत्न करूं लागला.

हे सज्जनश्रेष्ठा जनमेजया, त्या क्रूर यमाप्रमाणें भासणाऱ्या नृपश्रेष्ठ हंसानें त्यांचे बाहूला (दंडाला) धरून त्यांचें कौपिन छिन्नविच्छिन्न करून टाकलें. त्यावेळीं इतर यति बेभान होऊन जाऊन दाही दिशा पळूं लागले. तो जनार्दन ब्राह्मण मात्र हाय हाय काय हें

धाडस! असें म्हणून मित्रत्वाच्या नात्यानें त्यांचें यथाशक्ति निवारण करूं लागला. खरे धर्मनिष्ठ दुर्वासमुनि त्यांचा वध करण्याविषयीं जरी समर्थ होते, तथापि, तसें न करितां ते हंस आणि डिंभक यांना हलके हलके म्हणाले, 'अरे राजकुलोत्पन्न अधमानों, केवळ शापानें तुम्हांला गतप्राण करून सोडण्याविषयीं जरी मी समर्थ आहें, तरी मी तुमचा नाश करीत नाहीं. कारण, येथें आम्हीं संन्यासाश्रमामध्यें आहोंत. हातामध्यें शंख, चक्र, गदा धारण करणारा यादवश्रेष्ठ जगन्नायक देव श्रीकृष्ण हा तुमचा गर्व दूर करील. तो जगदीश्वर यादवश्रेष्ठ जगताचें संरक्षण करीत असल्यामुळें व त्याच्याच हातून तुमचा जीव नष्ट व्हावयाचा असल्यामुळें तुमचा जीव ( जीवित ) हा उत्कृष्ट होय, असें माझें मत आहे. कारण, तो उत्कृष्ट नसता तर श्रीकृष्णासारख्याच्या हातून त्याचा नाश झाला नसता. जरासंध हा तुमच्या बांधवांपैकीं आहे; तथापि, तो, लोक ज्याचा विरोध करतील, अशा प्रकारचें हें भाषण करण्याची इच्छाहि करीत नाहीं. कारण, तो निरंतर धर्माच्याच मार्गामध्यें असतो. तुम्हीं जें हें कृत्य केलें आहे, एवढ्यानें तो यापुढें तुमचा मित्र राहणार नाहीं. त्या मगध देशाधिपति जरासंधाशीं यापुढें तुमचा भयंकर द्वेष माजेल. तुमचें हें भयंकर कृत्य कानीं पडल्यानंतर जर त्या तुमच्या बांधवानें सहन केलें तर त्याचा धर्म नष्ट होईल, हें निःसंशय होय "

असें भाषण करून ते यतिश्रेष्ठ दुर्वासमुनि हंसाला, "चल, नीघ नीघ येथून." असें वारंवार म्हणाले. आणि त्या जनार्दन विप्राला म्हणाले, 'हे ब्राह्मणश्रेष्ठा, तुझें कल्याण होईल. श्रीविष्णूच्या ठिकाणीं तुझी भक्ति जडेल. आज उद्यां किंवा परवा शंख, चक्र, गदा धारण करणाऱ्या त्या श्रीकृष्णाची तुला भेट होईल. तूं सदैव साधु राहशील. साधूंचा इहलोकीं अथवा परलोकींहि नाश होत नाहीं; जा; आणि हें घडलेलें सर्व वृत्त तुला माहीतच आहे, तें सर्व जसें घडलें आहे तसेंच आपल्या पित्याला जाऊन सांग.

१ श्रीविष्णूचे हातानें मरण आल्यानें त्यांस मुक्ति मिळणार म्हणून.

## अध्याय एकशें दहावा.

—:०:—

### हंस डिंभकांचा अत्याचार आणि यतींचें द्वारकाप्रयाण.

वैशंपायन म्हणालेः—राजा जनमेजया, तदनंतर, कालानेंच प्रेरणा केलेल्या त्या हंसडिंभकांनीं त्या दुर्वासमुनींचें शिंकें, कमंडलु, काष्ठमय भोजनपात्र, दंड आणि इतरहि अनेक उत्कृष्ट पात्रें चोहोंकडे छिन्नविच्छिन्न करून टाकलीं. इतकेंच नव्हे तर हे महाराजा, त्यांनीं त्या ठिकाणीं व्याध लोकांकडून पुष्कळ मांस भाजविलें व तें तेथेंच भक्षण करून आपल्या नगरीकडे प्रयाण केलें. धर्मनिष्ठ ब्राह्मण जनार्दनहि मित्रत्वामुळें त्यांच्या मागून गेला. पण आतां यांचा खास नाश होणार, असें कळून आल्यामुळें त्याला फार दुःख झालें.

याप्रमाणें ते सर्व निघून गेल्यानंतर ते यतिश्रेष्ठ दुर्वासमुनि पलायन करीत असलेल्या त्या सर्वश्रेष्ठ यतींना म्हणाले, आतां आपण या पवित्र पुष्कर देशांतून निघूं आणि हलके हलके धैर्य धरून वाटेंत ठिकठिकाणीं विसावा घेत द्वारकेमध्यें जाऊं; आणि हे यतिश्रेष्ठहो, तेथें शंख, चक्र, गदाधारी श्रीकृष्णाचें दर्शन घेऊन त्या प्रभूला हा सर्व वृत्तांत निवेदन करूं. तो धर्ममार्गामध्यें राहून या सर्व जगताचें पालन करीत असतो. सर्वांस आदिभूत

सर्व जगताचा पिता, अंतःकरणाचा निग्रह केलेला तत्त्ववेत्ता, सर्वांना प्रिय असलेला, जो श्रीविष्णूचा अवतार, त्या भूनें लोकांस कंटकाप्रमाणें असलेल्या व सर्व महा भयंकर पापाचरण करणाऱ्या दुष्टांचा संहार करून आजपर्यंत या पृथ्वीचें पालन केलेलें आहे. तोच ज्ञानाचे ठायीं अंतःकरण जडलेल्या आम्हां सर्वांचें संरक्षण करील. हे विप्रहो, आज आपण असेंच करणें योग्य आहे. तेव्हां आतां गमन करूं लागा. हे सज्जनश्रेष्ठहो, त्या दोघांनीं आमचा पात्रभंग वगैरे करण्याचें जें धाडस केलें आहे तें आपण सर्व श्रीकृष्णाच्या पूर्णपणें दृष्टीखालीं घालूं. हे राजा, यावर 'ठीक आहे; असेंच करावयाचें,' अशी त्या ज्ञानदृष्टि यतींनीं प्रतिज्ञा केली; आणि त्या दोघांनीं तोडून टाकलेलीं शिंकीं, फोडलेलीं काष्ठमय भोजनपात्रें, फाडलेले कापडाचे तुकडे लंगोट्या, वल्कलें, आणि शकलें, अर्धवट लोंबत असलेले कमंडलु, हीं सर्व बरोबर घेऊन ते श्रीकृष्णाचें दर्शन घेण्यासाठीं निघाले. तिकडे निघालेल्या त्या मुनींची संख्या पांच हजार असून प्रत्यक्ष श्रीशंकराचा अवतार, तपाचें केवळ उत्पत्तिस्थान, जे दुर्वासमुनि त्यांना त्यांनीं आपलें पुढारी केलेलें होतें. याप्रमाणें निघाल्यानंतर कंठाखालील सर्वांग केशयुक्त असलेले, व मस्तकावर केश नसलेले ते दमसंपन्न महात्मे एका अहोरात्रांत श्रीकृष्णानें पालन केलेल्या द्वारकेला[1] जाऊन पोहोंचले. आणि हे नृपश्रेष्ठा, तेथें गेल्यानंतर प्रातःकालीं त्या सर्व यतिश्रेष्ठांनीं एका विहिरीवर जाऊन मोठ्या प्रयत्नानें स्नानाचमनादि सर्व विधि आटपले. आणि नंतर सुधर्मा नामक सभेमध्यें बसलेल्या श्रेष्ठस्वरूप धारण करणाऱ्या व लोककंटकांचा संहार करण्याविषयीं तत्पर असलेल्या श्रीकृष्णाचें दर्शन घेण्याविषयीं ते उद्युक्त झाले.

१ पुष्करापासून द्वारका एका रात्रींत गांठणें, हें आजच्याचें सामर्थ्य नव्हे.

## अध्याय एकशें अकरावा.

—:०:—

## दुर्वासमुनीचें आत्मवृत्त निवेदन.

वैशंपायन म्हणालेः—राजा जनमेजया, या वेळीं जगन्नायक, विश्वव्यापक, कमलनयन, श्यामवर्ण, पीतवर्ण, लांबवस्त्र धारण करणारे, शरीरावर लोंबत असलेल्या अलंकारांनीं सुशोभित दिसणारे, किरीट धारण करणारे, नील-र्ण, कुरळे केश असले, लक्ष्मीपति, इंद्रियागम्य, अविनाशी, प्रकाशमय, जीवस्वरूपी असल्यामुळें अंशयुक्त आणि परब्रह्मस्वरूपी असल्यामुळें अखंड, कल्याणमय श्रीकृष्ण, सात्यकीप्रभृति इतर यादव कुमारांना बरोबर घेऊन क्रीडा करण्याच्या प्रदेशावर गेले. आणि हे राजा, तेथें अर्थात् सुधर्मासभेच्या मध्यभागीं प्रियकारी, शामवर्ण श्रीकृष्ण सात्यकी बरोबर गोलक्रीडा[1] करूं लागले होते.

१ या ठिकाणी गोलक्रीडा असा शब्द मूळांत आहे. यावर गोल म्ह० गोलाकार फांसे व ते घेऊन केलेली क्रिडा ती गोलक्रीडा असा टीकाकारांनीं अर्थ केला आहे. पण, जोपर्यंत फांसे गोलाकार असल्याचें आढळत नाहीं, अथवा तशा प्रकारचा कोठें उल्लेख नाहीं तोंपर्यंत हा अर्थ बरोबर आहे असें म्हणतां येणें अशक्य आहे. गोल हा शब्द स्त्रीलिंगी आहे असें कांहीं कोशकारांनीं मानलेलें आहे. व त्या स्त्रीलिंगी शब्दाचा अर्थ बालकांचा एक खेळण्याचा पदार्थ असा केलेला आहे. हा पदार्थ म्हणजे गोटी होय. असें दिसतें. लिंगाचा नियम कायमचा नाहीं असें 'लिंगमनीयतं लोकाश्रयत्वाल्लिंगस्य' या भाष्यकाराच्या वचनावरून ठरत आहे. व म्हणूनच जगन्नाथ पंडितराया सारख्या महावैयाकरणांनीं राशी वगैरे शब्द मूळचे स्त्रीलिंगी असतां पुल्लिंगी वापरलेले आहेत. ( गंगालहरी पहा. ) त्याचप्रमाणें येथेंहि गोल शब्द पुल्लिंगी वापरला असल्यास आश्चर्य नाहीं. याप्रमाणें कोशावरून पहातां गोलक्रीडा शब्दाचा

" हा माझा गोल पहिल्यानें. यानंतर तुझा होऊं दे. " याप्रमाणें त्या वेळीं कमलनयन श्रीकृष्ण सात्यकीला म्हणत होते. हे राजा, या वेळीं वसुदेवप्रभृति यादव श्रीकृष्णाच्या दोहीं बाजूस असून उद्धवप्रभृति कांहीं यादव इतरत्र कोठें तरी बसलेले होते. हे नरपते, ज्याप्रमाणें पूर्वी श्रीराम त्याप्रमाणें इतर कार्यांचा त्याग करून, सर्व प्राण्यांची काळजी वहाणाऱ्या व सर्व चेतनांचे ठिकाणीं जीवस्वरूपानें वास्तव्य करणाऱ्या श्रीकृष्णांनीं सात्यकीशीं क्रीडा केली. पुष्कळ वेळ क्रीडा केल्या नंतर मध्यान्हकालीं श्रीकृष्ण थांबले. हे राजा, पूर्वीच द्वारामध्यें आलेल्या व द्वारपालांनीं प्रतिबंध केल्यामुळें तेथेंच असलेल्या ऋषींनीं आतां श्रीकृष्णाचें दर्शन घेण्याची हीच संधी आहे असें मनांत आणलें. आणि दीर्घकाल तपश्चर्या केलेल्या व तप हेंच द्रव्य समजणाऱ्या दुर्वासमुनींना पुढें करून त्या सर्व शुद्ध अंतःकरण असलेल्या मुनींनीं यादवाधिपति श्रीकृष्णाचें दर्शन घेतलें. त्या वेळीं श्रीकृष्ण गोलक्रीडेमध्यें मग्न होऊन गेले होते. त्या कमलदलाप्रमाणें विशाल नेत्र असलेल्या श्रीकृष्णाच्या हातांमध्यें गोलक असून त्यांची एकदृष्टि गोलकाकडे लागलेली असून दुसरी सात्यकीवर जाऊन त्याला आनंदवीत होती.

---

मागील पृष्ठावरील.

अर्थ गोट्यांचा खेळ असा जरी होत आहे तरी श्रीकृष्णासारखा प्रौढ पुरुष गोट्यांनीं खेळेल अशी कल्पना करितां येणें शक्य नाहीं. यामुळें हा चेंडूफळी सारखा अथवा पाश्चात् त्यांच्या टेनिसासारखा एखादा खेळ असावा व तो खेळण्याचें साधन गोलाकार असावें असें दिसतें. हृ साधन प्रत्येकाच्या हातीं निरनिराळे असून त्याचा उपयोग आळीपाळीनें केला जात असावा असें याच्या पढील श्लोकावरून दिसतें आणि त्या खेळासाठीं एखादी स्वतंत्र जागा तयार केली जात असावी असे 'क्रीडाविहारोपगतः' या श्रीकृष्णास दिलेल्या विशेषणावरून दिसतें.

हे महाराजा, आरंभीं त्याना पुढें ते यति दिसले. त्या वेळीं यादवाधिपति श्रीकृष्ण, सात्यकी, बलराम, वसुदेव, अक्रूर, उग्रसेन आणि इतरही यादव यांमध्यें गडबड उडून गेली. हें काय असावें, अशी त्यांच्या अंतःकरणाला शंका येऊं लागली. हंसानें दुःख दिलेले दुर्वासमुनि पुढें असून त्यांच्या मागून अनेक मुनि येत आहेत असें त्यांनीं पाहिलें. या वेळीं दुर्वासमुनि त्रैलोक्याला जणु जाळून भस्म करून टाकीत आहेत असें दिसत होतें. त्यांचें कौपीन फाटल्यामुळें अर्धवटअसून तें मनांत कोणाचें तरी स्मरण करीत आहेत व त्यांच्या मनाला ताप झाला आहे असें भासत होतें. त्यांचें हृदय रोषानें जणु पेटत असून त्याच्या नेत्रांतून प्रचंड वन्हीच बाहेर पडत आहे कीं काय असा भास होत होता. त्यांनीं आपल्या हातांत एक मोडलेला दंड घेतला होता व ते श्रीकृष्णाचें दर्शन घेऊं लागले होते. त्यांना अवलोकन करितांच ते सर्व यादवश्रेष्ठ भयभीत होऊन गेले. आणि हे प्रभु, दुर्वासमुनि इतके क्रुद्ध झाले आहेत, तेव्हां आतां काय करतील आणि आह्माला काय बोलतील, असें त्यांच्या मनांत आलें व ते सर्व यादव हात जोडून त्याजपुढें गेले आणि महाराज हें आसन ग्रहण करावें असें म्हणाले. इतक्यांत श्रीकृष्ण किंचित उडी मारून त्यांच्या पुढें गेले आणि म्हणाले ' हें आसन आहे यावर आपण बसा. हे विप्र, मी सांप्रत सुखरूप आहें. आपलें कोणतें कार्य मी केलें पाहिजे, मी आपला दास आहें. ' असें म्हणाले.

तेव्हां संन्यस्त स्वरूप धारण करणारे दुर्वासमुनि थोडा वेळ आसनावर बसले. ते बसतांच इतरही सर्व मात्सर्यशून्य यति योग्यतेप्रमाणें त्या त्या आसनावर सुखानें बसले. तदनंतर किरीट धारण करणाऱ्या श्रीकृष्णांनीं

अर्घ्यादिक उपचारांच्या योगानें त्यांचें पूजन केलें आणि पुनरपि सामर्थ्यसंपन्न दुर्वासमुनींना म्हटलें 'हे ब्राह्मणश्रेष्ठ, या दासा ''डे कोणत्या उद्देशानें आपलें आगमन झालें आहे ? आपण येण्याचें कारण कांहीं तरी मोठें असावें, असें माझ्या बुद्धीला वाटत आहे. पण हे विप्र, बारकाईनें विचार करूं लागले असतां आम्हाला त्याचें मुळींच ज्ञान होत नाहीं. उत्कृष्ट व्रताचरण करणारे लोकही क्षत्रियांकडे येतात. परंतु, त्यांची ती आगमनक्रिया कोणत्या तरी इच्छेनें प्रेरणा केल्यामुळें घडत असते. पण हे द्विजश्रेष्ठहो, आपण पातकाचा संपर्कही नस लेले निरिच्छ संन्याशी आहां. हे द्विजश्रेष्ठहो, आपल्याला इच्छा मुळींच नसल्यामुळें आम्हाकडे मागण्यासारखें असें कांहींच नाहीं. सारांश हे ब्रह्मन्, आपल्या आगमनाचें कारण आम्हाला स्पष्टपणें कळून येत नाहीं. केवळ आपण आला आहां एवढ्यावरूनच कांहीं तरी कारण असलें पाहिजे असें अनुमान होत आहे. यास्तव जर कांहीं कारण असेल तर आपण निवेदन करा. म्हणजे आम्हाला कळून येईल.

हे राजा, अशा रीतीनें श्रीकृष्णांनीं भाषण केलें असतां हंसानें केलेल्या अपराधाचें स्मरण झाल्यामुळें त्या ब्राह्मणाला अत्यंत कोप आला. हा कोप पूर्वीच्या कोपापेक्षांही अधिक होता. या वेळीं दुर्वासमुनि त्रैलोक्याला जणु दग्ध करूं इच्छित आहेत आणि आपणाकडे अवलोकन करणाऱ्या लोकांना जणु भक्षण करून टाकीत आहेत किंवा जाळून टाकीत आहेत असें भासत होतें. क्रोधामुळें त्यांचे नेत्र आरक्त झालेले होते. अशामुळें कोपानें बेभान होऊन गेलेले दुर्वासमुनि हंसल्यासारखें करून श्रीकृष्णाला म्हणाले 'हे यादवाधिपते, तूं आम्हाला असें कां विचारीत आहेस हें कांहीं कळत नाहीं. तूं देवाधिदेव आहेस हें मी जाणून आहें. म्हणूनच तुझें हें भाषण आम्हाला फसविण्यासाठींच असावें अशी शंका येते. हे श्रीकृष्णा, आह्मी जुने पुराणे आहोंत आम्हाला पूर्वीच्या वृत्तांताची माहिती आहे. तूं देवाधिदेव आहेस आणि केवळ मायेच्याच योगानें मनुष्यशरीर धारण केलेलें आहेस. हे जगन्नायका, तूं प्रभु असतांही आमच्यापाशीं अशी छपवाछपवी कां करीत आहेस? तूं तच्छब्दवाच्य परब्रह्म आहेस, म्हणूनच ब्रह्मज्ञानी लोकांना मिळणारें जें परमपद तेंही तुझी मूर्तिच होय. पूर्वीं ब्रह्मदेवानें ज्याचें आराधन केलें, आह्मी ज्याचें ज्ञान संपादन केलें आणि हें सर्व विश्व ज्याच्यापासून निर्माण झालें तें परमपद हेंच होय. इतिहासज्ञ लोकांच्या अंतःकरणाला ज्याच्या केवळ स्थूल आकाराचें ज्ञान पूर्वीं झालेलें आहे, तेंच हे विश्वेश्वरा, तुझें शरीर परमपद होय. ज्याची कर्में केल्यानें प्राप्ति होते, ज्याचें स्मरण करून आह्मी सुख पावलो आहों, जें प्रत्यक्ष असतांही मंदबुद्धि लोकांना कळत येत नाहीं, तेंच हें तुझें स्वरूप होय. हे हरे, आह्मी तशा प्रकारचे अज्ञ नाहीं. हे श्रीकृष्णा, आम्हाला कळत नाहीं असें जें तूं म्हणत आहेस, तें केवळ धाडस आहे. हे केशनाशका, ज्यांना तुझ्या मूल स्वरूपाचें ज्ञान आहे, त्यांना प्रश्न करून तें आहे किंवा नाहीं याचा विचार काढण्यांत तुला काय फल मिळणार आहे ? हे भगवन्, आम्हाला पूर्णपणें माहीत आहे कीं, या तुझ्या सुप्रसिद्ध तेजाचाच विचार वेदान्तामध्यें केलेला आहे. हे प्रभो, ज्ञानाच्या योगानें तृप्त झालेले निष्पाप योगी लोक आपल्या हृदयकमलामध्यें ज्याचें अवलोकन करितात, तें हें तुझें शरीरच होय. परब्रह्म म्हणून प्रतिपादन करून वेद ज्या तेजाचें स्तोत्र गात आहेत तें

परमेश्वर स्वरूप हेंच होय. हें मी जाणत आहें. हे विष्णो, वेदांमध्यें ज्याला विश्वव्यापक परमात्म्याचें उत्कृष्ट तेज असें म्हटलेलें आहे, तेंच हें तुझें शरीर होय. हें मी जाणून आहें. हे प्रभो श्रीकृष्णा, ॐकारमूलक वेद ही ज्याची वाणी आहे असें म्हटलेलें आहे तोच परमात्मा तूं आहेस, यास्तव 'मला कळत नाहीं' असे शब्द तूं आपल्या मुखांतून काढूं नको. जर तुझ्या ज्ञानाला अगोचर कांहीं असतें तर मग असें म्हणणें तुला अगदीं योग्य झालें असतें. पण तसें कांहीं नाहीं. यास्तव, हे श्रीकृष्णा, मला माहीत नाहीं असें ह्मणण्याचें साहस तूं करूं नको. हे केशवा, ज्याच्यापासून जगाची उत्पत्ति झाली व ज्याचे ठिकाणीं संहारकालीं ज्याचा लय झाला तें ईश्वरतेज म्हणजे तूंच आहेस. हे मला समजत आहे. पूर्वी होऊन गेलेल्या व पुढें होणाऱ्या सर्व सृष्टीचा नियंता तूंच आहेस व तेंच तुझें स्वरूप माझ्या अंतःकरणामध्यें सदैव स्फुरण पावत असतें. फार काय सांगूं? तुझें ज्या ज्या रूपानें स्मरण होईल त्या त्या स्वरूपानें तूं माझ्या शरीरांत वास्तव्य करीत असतोस.

हे प्रभो, ज्या वेळीं श्रीविष्णु वायु स्वरूपी आहे असें समजून माझें अंतकरण धारणा करतें, तेव्हां तूं त्याच रूपानें माझ्या हृदयामध्यें रहातोस. जेव्हां माझें मन श्रीविष्णु आकाशस्वरूपी आहे असें समजून धारणा करितें, त्या वेळीं हे प्रभो, तूं त्याच रूपानें माझ्या हृदयामध्यें प्रकट होऊन रहातोस. जेव्हां श्रीविष्णु पृथ्वीस्वरूपी आहे अशी माझ्या बुद्धीची धारणा होते, तेव्हां तूं मला पार्थिव स्वरूप धारण करणारा भासतोस. जेव्हां श्रीविष्णु जलस्वरूपी आहे असें समजून मी चिंतन करूं लागतों, तेव्हां तूं माझ्या हृदयामध्यें जलस्वरूपी होऊन रहातोस. हे पुरुषोत्तमा, जेव्हां तूं तेज आहेस असें म्हणून मी तुझें स्मरण करूं लागतों, तेव्हां तूं तेंच स्वरूप धारण करून माझ्या हृदयामध्यें स्फुरण पावतोस. हे केशवा श्रीविष्णु चंद्र आहे असें माझ्या बुद्धीला वाटलें कीं तुझें चंद्रमय स्वरूप माझ्यां नेत्राला प्रत्यक्ष दिसतें व त्यामुळें मला आनंद होतो. हे जगन्नायका, जेव्हां तूं सूर्यस्वरूपी आहेस असें माझ्या मनांत येईल तेव्हां त्या भावनेच्या योगानें तूं सूर्यस्वरूपानेंच मजपुढें विराजमान होतोस. सारांश, जें जें म्हणून कांहीं आहे, तें तें सर्व तूंच आहेस असा आमच्या बुद्धीचा निश्चय आहे. यास्तव, हे जनार्दना, मला माहीत नाहीं असें ह्मणतां येणें तुला शक्य नाहीं. हे श्रीकृष्णा, अशा रीतीनें प्रत्येक पदार्थामध्यें तूं वास्तव्य करीत असतांना तुझ्या अंतःकरणांत आमच्या पीडेची कल्पनाहीं नाहीं, असें होणें शक्य आहे काय? हे विष्णो, आह्मीं अत्यंत दुःखी झालों आहों व म्हणूनच तुजकडे आलों आहों. हे श्रीकृष्णा, आमची ही अशी स्थिति झालेली आहे. ती तुझ्या अंतःकरणांत उतरत नाहीं काय ? असे जर असेल तर आमच्या दैवाचा समूल नाश झाला आहे असें मला वाटतें. हे विश्वव्यापका प्रभो, जर आमचें स्मरण तुला नसलें तर आह्मीं अगदीं देवहीन हों. श्रीकृष्णा, क्षत्रियांच्या वंशांत उत्पन्न झालेले हंस आणि डिंभक या नांवाचे कोणी दोन पुरुष श्रीशंकराकडून मिळालेल्या वराच्या योगानें अतिशय चढून गेले असून, हे श्रीकृष्णा, आमच्या आश्रमामध्यें येऊन ते जिकडे तिकडे धाऊं लागले. गृहस्थाश्रम हाच सर्वदैव श्रेष्ठ होय असें म्हणूं लागले. पुष्कळ प्रकारचे अपशब्द उच्चारूं लागले आणि अनेक अयोग्य वाक्यें उच्चारून आमचा सारखा तिरस्कार करूं लागले. हे देवा, इतकेंच करून ते थांबले नाहींत. हें पहा, ज्याला पाप

असें ह्मणतां येईल व जें सहन करितां येणें अशक्य आहे अशा प्रकारचें त्यांचें हें दुसरें कृत्य. हे देवा, आमची शिंकीं, काष्ठमय पात्रें, भोजनपात्रें आणि कळकाचे दंड यांचे त्यांनीं हजारों तुकडे करून टाकले आहेत. हें तूं आपल्या नजरेखालीं घाल. हे श्रीकृष्णा, त्यांचें आणखीही दुसरें धाडसाचें कृत्य पहा. हे जगन्नायका, आमच्या कौपीनाचे त्यानीं अनेक तुकडे करून टाकले आणि जें आमचें मोठें द्रव्य, त्या कमंडलुचींही शकलें करून टाकलीं. हे देवा, क्षत्रियांच्या व्रताचा अवलंब करून आमचें सदैव तूं संरक्षण करीत असतां, अशा प्रकारची गोष्ट घडून यावी, हें अत्यंत आश्चर्य होय. आमची बुद्धी मंद आणि भाग्यही कमी. तेव्हां हे प्रभो, आह्मी काय करूं शकणार ? आतां हे जगन्नायका, तूं आह्मांला येवढेंच सांग कीं आतां आह्माला आधार कोणाचा ? श्रीकृष्णा, ते दोघे जर जिवंत रहातील तर या त्रैलोक्याचा नाश झाला म्हणून समज. मग ब्राह्मण असोत, क्षत्रिय असोत, वैश्य असोत किंवा शूद्र असोत. कोणी अवशिष्ट रहाणार नाहींत. हे राजा, ते अत्यंत बलाढ्य असून मदोन्मत्त झालेले आहेत. त्यांची शिक्षा अतिशय क्रूरपणाची असते. त्यांच्यापुढें इंद्रासुद्धां कोणीही देव उभा देखील रहाण्याविषयीं समर्थ नाहीं. भीष्म नाहीं, भयंकर पराक्रमी राजा बाल्हिक नाहीं आणि सर्व क्षत्रियांला भयंकर असणारा वीर जरासंध हा देखील ज्यांना केव्हांही कोणी प्रतिद्वंद्वि नाहीं त्या, श्रीशंकराच्या वरानें चढून गेलेल्या, त्या उभतांच्या पुढें बहुतकरून उभाही राहूं शकणार नाहीं. यास्तव हे प्रभो, तूंच त्या उभयता वीरांचा संहार करून या जगताचें संरक्षण कर. नाहीं तर तूं संरक्षण करणारा आहेस हे शब्द व्यर्थ होतील. आतां तुह्मा अधिक सांगण्यांत काय अर्थ आहे, केवळ एवढेंच सांगतों कीं तूं या जगताचें संरक्षण कर. असें बोलून क्रोधामुळें बेभान होऊन गेलेल्या मुनींनीं आपलें भाषण संपविलें.

## अध्याय एकशे बारावा.

—:०:—

### श्रीकृष्णाची प्रतिज्ञा.

वैशंपायन सांगतातः—राजा जनमेजया, त्या दुर्वास मुनींचें भाषण ऐकून यादवाधिपति श्रीकृष्णानीं एक हलकासा सुस्कारा टाकला आणि त्यांजकडे पाहून म्हटलें. ' हे मुने, आपण या सर्व गोष्टींबद्दल क्षमा करा. हा माझाच अपराध आहे. पण मीं सांगतों तें आपण ऐका आणि शांत व्हा. हे विप्र, मी त्या हंसाला आणि डिंभकाला संग्रामामध्यें पराजित करीन. मग त्याला श्रीशंकरांनीं वर दिला असो; इंद्रानें दिला असो, कुबेरानें दिला असो, अथवा यम, वरुण, किंवा चतुर्मुख ब्रह्मदेव यांनीं दिलेला असो; मी त्या उभयतांना, त्यांच्या बंधूना आणि त्यांच्या सैन्यालाहि ठार करून आपणाला पुनरपि आनंदित करीन. हें मी आपल्याला सत्याची शपथ घेऊन सांगतों. आपण कोपाच्या आधीन होऊं नका. त्या अधम नृपतींना ठार करून मीं आपलें संरक्षण करीन. त्या दुष्टांना मी जाणून आहें. त्यांनीं आपला अपराध केला आहे. ते फार कडक शासन करीत असतात. असें आम्हीं पूर्वींहि ऐकलेलें आहे. ते फार बलाढ्य आहेत. जात्याच मत्त आहेत आणि त्यांतूनहि श्रीशंकराकडून वर मिळाल्यामुळें शेंफारून गेले आहेत. जरासंधाच्या कल्याणाची इच्छा करणाऱ्या त्या उभयतांचा पराजय थोड्याशा प्रयत्नानें होणार नाहीं. ज्याला त्या उभयतांच्या साहाय्यावाचून सर्व पृथ्वी

क़ाबीज करून घेण्याचें सामर्थ्य आहे, तो राजा जरासंध, त्यांच्यासाठीं निःसंशय आपले प्राण सुद्धां खर्ची घालील. हे ब्राह्मणश्रेष्ठ, मी त्या उभयतांना ते असतील तेथें पराजित करतों. कारण, तसें केल्यानें कल्याण होणार आहे. ते कोठें तरी जाऊन राहिलेले आहेत, असें आमच्या ऐकण्यांत आहे. तथापि, जेथें जेथें ते असतील, तेथें जाऊन मी त्यांना गतप्राण करीन. याविषयीं आपण संशय बाळगूं नका. तपश्चर्यादि आत्मकार्यामध्यें व्यग्र असणाऱ्या हे यतींनों, आतां आपण स्वेच्छेनुरूप गमन करा. मी त्या रणधुरंधरांना थोडक्याच कालांत पराजित करीन.

हें ऐकून अंतःकरण प्रसन्न झालेल्या दुर्वास मुनींनीं प्रेमानें यादवाधिपति श्रीकृष्णास म्हटलें. हे श्रीकृष्णा, सर्व जगताचें कल्याण करणाऱ्या तुझें कल्याण होवो. हे जगन्नायका केशवा, तुजला असाध्य असें काय आहे ? तूं त्रैलोक्याचा अधिपति व त्रैलोक्यामध्यें प्राणस्वरूपानें वास्तव्य करणारा असून देवांच्याही देवतांचा अधिपति सर्वत्र समदृष्टि आणि सर्वांचा संहार करणारा आहेस. हे विष्णो, हे देवा, हे हरे, श्रीकृष्णा, हे चक्रपाणे, तुजला नमस्कार असो; स्वभावतः शुद्ध, परब्रह्मस्वरूपी, नियमनिष्ठ, वेदाला विषयभूत, देवाधिपति आणि भक्तवत्सल अशा आपल्याला नमस्कार असो; हे जगन्नाथ, मी, अज्ञानानें असो अथवा ज्ञानपूर्वक असो, जें बोललों त्याबद्दल आपण क्षमा करा. हे भगवन्, मी तेंच आपण अहां, आपल्यामध्यें आणि माझ्यामध्यें भेद नाहीं. यास्तव मला आपण क्षमा करा. आपण सत्पुरुष आहां आणि क्षमा हेंच सत्पुरुषांचें सार होय.

श्रीकृष्ण म्हणाले, हे विप्र, क्षमा हेंच आमचें सदैव सार आहे. आपण मात्र मला क्षमा करा. व ती कराल अशी माझी खात्री आहे. कारण, आपण संन्याशी आहां. क्षमा हेंच संन्याशांचें सर्वस्व होय. त्यांचें जें कांहीं अमर्याद सामर्थ्य तेंहि क्षमाच आहे. हे द्विज, ज्या प्रमाणें तत्वज्ञान त्याच प्रमाणें क्षमा देखील मोक्षाला सदैव कारणीभूत आहे. क्षमा हाच धर्म, क्षमा हेंच सत्य, क्षमा हेंच दान, क्षमा हीच कीर्ति, आणि क्षमा हेंच स्वर्गावर आरोहण करण्याचे सोपान ( जिना ), असें वेदवेत्ते लोक म्हणत असतात. यास्तव, आपण वाटेल तो प्रयत्न करून स्वतःच्या ठिकाणीं असलेल्या क्षमेचें संरक्षण करा. हे यतिश्रेष्ठहो, आपणा सर्वांना परमेश्वराचें प्रत्यक्ष ज्ञान आहे. हे विप्र, आपणा सर्व यतींचे आराधन करावयाचें आहे. हे विप्र, आपण सर्व यतींनी आज येथें भोजन करावें.

यावर, 'ठीक आहे' असें म्हणून त्यांनीं श्रीकृष्णाच्या गृहामध्यें भोजन करण्याची इच्छा दर्शविली. तदनंतर ऐश्वर्यसंपन्न विश्वव्यापक श्रीकृष्ण आपल्या मंदिरामध्यें गेले आणि भक्ष्य, भोज्य, लेह्य आणि पेय असा चार प्रकारचा आहार यथाविधि तयार करून यतिश्रेष्ठांनीं पूजन केल्या जाणाऱ्या श्रीकृष्णानीं त्या सर्व यतींना भोजन घातलें. आणि हे राजा जनमेजया, त्या देवाधिपति श्रीकृष्णानीं मऊ अशीं रेशमी उंची वस्त्रें फाडफाडून त्या सर्व यतींना अर्पण केलीं. त्यामुळें तेहि सर्व संतुष्ट झाले व पूर्वीं आले होते तशाच प्रमाणें निघून गेले.

## अध्याय एकशें तेरावा.

—:०:—

### हंस-डिंभकांचें दूतप्रेषण.

वैशंपायन सांगतातः—राजा जनमेजया, तदनंतर दुर्वासमुनि महात्म्या नारदाशीं सहवर्तमान ब्रह्मतत्वासंबंधानें विचार करीत सुखानें

त्या ठिकाणीं विहार करूं लागले. इकडे श्रीकृष्णहि हंस आणि डिंभक या उभयतांचें वास्तव्य कोठें आहे या संबंधाचा विचार करूं लागले. याच वेळीं हंस आणि डिंभक हे उभयतां पराक्रमशाली पृथ्वीपति आपला पिता ब्रह्मदत्त याला लोकसमुदायामध्यें म्हणाले, कीं ' हे नृपश्रेष्ठ तात, या महिन्यामध्यें आपण राजसूय नांवाचा महायज्ञ करावा. आम्हीं तो घडून येण्यासंबंधानें अतिशय प्रयत्न करूं. हे महाराजा, दिग्विजयाविषयीं तत्पर होऊन बरोबर गज, अश्व, रथ इत्यादि सैन्य घेऊन आम्हीं उभयतां आज आपल्या यज्ञसंबंधानें प्रयत्न करणार आहोंत. हे नृपश्रेष्ठा, यज्ञसिद्धिसाठीं लागणारें सर्व साहित्य आपण आणा.'

हे महाबाहो, जनमेजया, त्यावर ब्रह्मदत्तानेंहि 'ठीक आहे' असें उत्तर दिलें. पण, विप्रश्रेष्ठ जनार्दन याला ही गोष्ट शक्य वाटली नाहीं. त्यानें ते उभयतां साहस करण्याविषयीं तत्पर झाले आहेत असें पाहिलें व आपला मित्र हंस यास म्हटलें, ' हंसा, माझें भाषण ऐक. आणि नंतर काय तें ठरीव. तूं पराक्रमी आहेस, तथापि, हे दीर्घायु नृपश्रेष्ठा, सांप्रत तूं साहस करण्याविषयीं उद्युक्त झाला आहेस. कारण, भीष्म, जरासंध, नृपश्रेष्ठ बाल्हिक आणि इतरहि सर्व यादव वीर हयात असतांना तूं दिग्विजयाचा विचार करीत आहेस. हे नृपश्रेष्ठा, तो इंद्रियजय केलेला सत्यप्रतिज्ञ वृद्ध भीष्म मोठा बलाढ्य आहे. ज्यानें एकवीस वेळ पृथ्वीचा जय केला, त्या भृगुकुलश्रेष्ठ परशुरामाचा या भीष्मानें सर्व क्षत्रियांदेखत संग्रामामध्यें पराभव केलेला आहे. जरासंधाचें शौर्य काय आहे हें तुला संग्रामामध्यें कळून आलेलेंच आहे. ते सर्व यादव वीर तर संग्रामासंबंधानें अत्यंत मदोन्मत्त होऊन गेलेले आहेत. त्यांचा शस्त्राभ्यासहि फार चांगला आहे. त्यांच्याचमध्यें शत्रूंचा पराजय केलेला इंद्रियांचा नियंता चातुर्यसंपन्न श्रीकृष्ण सदैव वास्तव्य करीत आहे. ज्यानें सदैव जरासंधाशीं संग्राम केला असून ज्याला युद्धाच्या योगानें बिलकूल श्रम होत नाहींत त्या श्रीकृष्णाच्या पुढें सामर्थ्यसंपन्न असाहि नृपश्रेष्ठ जीवंत स्थितींत उभा राहूं शकणार नाहीं. तसेंच मदमत्त असणारा बलाढ्य बलराम जर कोपाविष्ट झाला तर या सर्व लोकांचा संहार करूं शकेल असें मला खास वाटत आहे. त्याच्याच प्रमाणें वीर सात्यकी देखील संग्रामामध्यें शत्रूंचा पराजय करण्यास समर्थ आहे. इतरहि सर्व यादव अशाच प्रकारचे असून श्रीकृष्णाचा आश्रय हें त्यांना एक कवचच आहे. शिवाय आपण पूर्वीं संन्याशांशीं विरोध केला, तेव्हां दुर्वासमुनि सर्व संन्याशांना बरोबर घेऊन श्रीकृष्णाचें दर्शन घ्यावयास गेले, असें हे नृपश्रेष्ठा, आमच्या घरीं भोजनास आलेल्या एका ब्राह्मणाच्या तोंडून मी ऐकलेलें आहे. अशी एकंदर स्थिति आहे. यास्तव आपला मनोरथ कसा सिद्ध होईल या संबंधाचा आपल्या मंत्रीमंडळींशीं अगोदर विचार केला पाहिजे. तो झाला म्हणजे मग आपण राजसूय महायज्ञ घडवून आणूं.'

हंस म्हणाला, अरे भीष्म म्हणजे कोण ? तो तर म्हातारा. तेव्हां आतां त्याची बुद्धिहि कमी झालेली आणि सामर्थ्यहि सदैव क्षीण झालेलें. तेव्हां तो थेरडा का आमच्या पुढें संग्रामासाठीं येऊन ठाकण्यास समर्थ असणार? हे ब्राह्मणा, यादवांच्या अंगीं समरांगणांत येऊन ठाकण्याचें सामर्थ्य आहे, या म्हणण्याचें आम्हास मोठें आश्चर्य वाटतें. हे ब्राह्मण श्रेष्ठा, जा त्या यादवश्रेष्ठाकडे सत्वर आणि माझ्या आज्ञेवरून त्यांना असें सांग कीं, आम्हाला यज्ञासाठीं सुंदर आणि विपुल अशीं सर्व

प्रकारचीं द्रव्यें अर्पण कर, अरे कृष्णा, पुष्कळसें मीठ घेऊन तूं सत्वर इकडे निघून ये. याविषयीं तुजकडून विलंब होतां कामा नये. हे विप्रा, तूं त्वरित गतीनें जाऊन त्या यादव श्रेष्ठाला असें सांग. तूं मला प्रिय आहेस म्हणून सांगतों कीं, या माझ्या बोलण्यावर तूं कांहीं एक उत्तर देऊं नकोस. मित्रत्वाच्या नात्यानें तूं हें जाऊन सांग. मी तुजकडे मित्रत्वाच्याच दृष्टीनें वारंवार पहात आहें.'

राजा जनमेजया, याप्रमाणें हंसानें प्रेरणा केली असतां त्याजवर प्रेम असल्यामुळें आणि मित्रत्वामुळें त्यानें कांहींच उत्तर दिलें नाहीं. पण तो धर्मात्मा जनार्दन जाण्याविषयीं उद्युक्त झाला. आणि आज, उद्यां, परवां इतक्यांत जाईन असा विचार करून प्रत्यहीं गमन करण्याचा विचार करूं लागला. व नंतर एके दिवशीं तो धर्मात्मा एका शीघ्रगामी अश्वावर आरोहण करून एकटाच शंख, चक्र, गदा धारण करणाऱ्या व जगताच्या उत्पत्तीस कारणीभूत असणाऱ्या श्रीकृष्णाचें दर्शन घेण्यासाठीं अंतःकरणामध्यें त्याचें स्मरण करीत करीत सत्वर द्वारकेकडे निघून गेला.

## अध्याय एकशें चवदावा.

—:०:—

### जनार्दनाचें द्वारकेस प्रयाण.

वैशंपायन म्हणाले:—हे नृपश्रेष्ठा, तदनंतर तो उत्कृष्ट प्रकारचा वेदवेत्ता ब्राह्मण जनार्दन एका घोड्यानिशी श्रीकृष्णाकडे चालला. हे राजा, ज्याप्रमाणें ग्रीष्मकालीं सूर्यकिरणानीं तप्त झालेला प्रवासी पाणी दृष्टीस पडतांच तें प्राशन करण्याच्या इच्छेनें त्वरेनें धावूं लागतो, त्या प्रमाणें तो ब्राह्मण जनार्दनही श्रीकृष्णाचें दर्शन घेण्यासाठीं वेगानें जाऊं लागला. आणि जातां जातां आपल्या उत्कृष्ट अश्वाला टांच देत असतांना तो मनांत म्हणाला कीं, हंस हाच खरोखर मला प्रिय आहे. व तोच माझें प्रिय आणि हित करणारा आहे. कारण, त्यानें इकडे पाठविल्यामुळेंच मला प्रभु श्रीकृष्णाचें दर्शन घडणार. खरोखर मीच एक सदैव धन्य होणार आहें. मजपेक्षां अधिक धन्य असा दुसरा कोणीही नाहीं. कारण, द्वारका नगरीमध्यें वास्तव्य करणाऱ्या श्रीकृष्णाचें मला दर्शन घडणार. उदार अंतःकरणाची माझी मातृदेवी ही खरोखर धन्य होय. कारण, श्रीकृष्णाला अवलोकन करून कृतार्थ होऊन परत गेल्यानंतर मी तिच्या दृष्टीस पडणार. आतां देवाधिदेव शार्ङ्गधनुष्य धारण करणारा जो भगवान् श्रीकृष्ण त्याचें विकसित झालेल्या सुवर्णकमलांतील केशराप्रमाणें कांति असलेलें मुख मला अवलोकन करावयास मिळणार. शंख, चक्र, गदा आणि पायांपर्यंत रुळणारी पुष्पमाला यांच्या योगानें विभूषित असलेले, नीलकमलपत्राप्रमाणें कांति असलेले श्रीकृष्णाचें शरीर आतां माझ्या दृष्टीस पडणार. देवाधिदेव श्रीकृष्णाचे ते कमलकेशरतुल्य कांति असलेले नेत्र पहावयास मिळाल्यामुळें माझ्या अंतःकरणाचें दैन्य दूर होऊन दुःखाचाही नाश होईल व मी सुखी होईन. तो योगाच्या ठिकाणीं अंतःकरण आसक्त असलेला श्रीकृष्ण मजकडे सौम्य दृष्टीनें पाहील काय ? मला प्रिय असें भाषण करील काय अथवा मला ' तुझें कल्याण असो ' असें तरी म्हणेल काय? जीमध्यें सर्व त्रैलोक्य प्रकाशमान होऊन राहिलेलें आहे ती श्रीकृष्णाची मूर्ति आतां मी अवलोकन करणार. श्रीकृष्णाच्या चरणकमलांचें दर्शन घेण्यासंबंधानें माझ्या अंतःकरणाला त्वरा होत आहे. मला गमन करतांना सारखें त्या परमात्म्याचें स्मरण होत आहे. व त्याचें तें स्फुरण पावणाऱ्या रक्तकांतीनें विरा-

जमान असलेलें वक्षस्थल जणु डोळ्यापुढें उभें रहात आहे. पीतवर्ण रेशमी वस्त्र परिधान केलेला, लांब अशा हारानें विभूषित असलेला व अधरावर किंचित हास्य शोभत असलेला श्रीकृष्ण मला वारंवार नेत्रासमोर दिसत आहे. श्रीकृष्णाच्या मूर्तीचें स्मरण होऊं लागलें म्हणजे माझ्या अंगावर हे असे रोमांच उभे रहात आहेत आणि मीं चालूं लागलों म्हणजे शंख, चक्र, गदा आणि खड्ग धारण केलेला भगवान् श्रीकृष्ण माझ्यापुढें चमकूं लागतो. इतकेंच नाहीं तर तो जगज्जनक माझ्या पुढून चालतो आहे असा मला भास होत आहे. हाच तो भगवान् असें सांगण्याविषयीं माझी जिव्हा जणु स्फुरण पावत आहे. पण त्याचें दर्शन झालें म्हणजे, 'तूं कर दे' असें म्हणणें हें मात्र मोठें कष्टदायक आहे, असें मला वाटतें. खरोखर हा त्या राजाचा ( हंसाचा ) निरोप म्हणजे मूर्तिमंत धाडसच होय. असें माझ्या बुद्धीला वाटतें. श्रीकृष्ण ! आणि तो हंसाचा करभार देणारा आज्ञाधारक, ऑं ! आतां मी निर्दयानें त्याच्या पुढें जाऊन हें सर्व सांगावयाचें ! ज्या अर्थीं मी त्याजपाशीं जाऊन असें बोलणार त्या अर्थीं मी अगदीं मूर्खांचा अग्रणी आणि निर्लज्ज होय. हे यदुकुलश्रेष्ठा कृष्णा, हंसाला कर दे. तुझ्याकडून कराच्या रूपानें पुष्कळ मीठ लौकर मिळालें पाहिजे. असें श्रीकृष्णाच्या पुढें जाऊन म्हणणें योग्य नाहीं. तथापि, हंसाशीं स्नेह असल्यामुळें मला हे असले भयंकर शब्द उच्चारले पाहिजेत. सुसंस्कृत अंतःकरणाच्या लोकांना, हा मित्रपणा खरोखर कष्टदायक असतो. आतां मी असें बोलूं लागलों म्हणजे ऐकणाऱ्याला हे माझेच उद्गार आहेत असें वाटेल. तेव्हां काय करावें. अथवा श्रीकृष्णाला प्रत्येक गोष्टीचें ज्ञान आहे. कारण, तो प्रत्येकाच्या हृदयामध्यें वास्तव्य करीत आहे. सर्व प्राण्यांचें कल्याण करण्यामध्यें आसक्त असलेल्या त्या श्रीकृष्णाला कोणाचा काय भाव आहे, याचें ज्ञान सदैव आहे. तेव्हां माझ्याकडे कांहीं अपराध नाहीं. माझें करणें हा केवळ मित्रपणाचा प्रभाव होय. हें सर्व त्याला अवगत असेलच. तेव्हां आपल्या पुढें भयंकर शब्द उद्गारण्याविषयीं उद्युक्त झालेल्या माझें तो श्रीकृष्ण सर्वथैव संरक्षण करो. मी तर ज्याच्या मस्तकावर नीलवर्ण कुरळे केश आहेत, ज्याचा कंठ शंखाप्रमाणें आहे, ज्याज्या वक्षस्थळावर श्रीवत्ससंज्ञक चिन्ह आहे, ज्याच्या विशाल हस्तामध्यें कमळ चमकत आहे शरीरावर असलेल्या रत्नांच्या कांतीनें जो विराजमान झालेला आहे,ज्यानें हातांमध्यें चक्र धारण केलेलें आहे, ज्याचें वैभव विचाराला अगोचर असून जो भूत, भविष्य आणि वर्तमान कालातील सर्व वस्तूंचा नियंता आहे, त्या जगद्रक्षक, जगन्नायक, विश्वव्यापक, यदुकुलश्रेष्ठ दुग्धसागरशायी, श्रीकृष्णाचें दर्शन स्वतःच्या इच्छेनें घेणार. आज माझे सर्व यज्ञ खरोखर सफळ झाले. कारण, आज मला श्रीकृष्णाचें दर्शन खास घडणार आणि मी सर्वथैव कृतकृत्य होऊन माझा सर्व ताप नष्ट होणार. श्रीकृष्णाच्या दर्शनानें आज माझा जन्म खात्रीनें सफळ होणार. सर्व जगताला व्यापून असणाऱ्या श्रीकृष्णाच्या दर्शनानें आज माझ्या नेत्रांचें साफल्य होणार. मी भयंकर गोष्ट बोलणार आहे. तथापि, श्रीकृष्ण मजवर प्रेमच करो, अशी माझी इच्छा आहे. मी एकदां त्या परमेश्वराला डोळे भरून पहाणार. त्याच्या नखशिखांत शरीराचें मी वारंवार दर्शन घेणार. माझ्या या दोहीं नेत्रांनीं मी केवळ त्या श्रीकृष्णाचे मूर्तीचाच आस्वाद घेत रहाणार. कल्याणकारक अशी त्याच्या पायांची धूळ आपल्या मस्तकावर धारण करून मी

कृतकृत्य होणार. त्याच्या पायांचे रज म्हणजे स्वर्गाचा मूर्तिमंत मार्ग होय. आज मेघध्वनी प्रमाणें गंभीर असलेला श्रीकृष्णाचा शब्द माझ्या कानीं पडणार. जगन्नायक श्रीकृष्णाचे चरणकमल आज मला पहावयास मिळणार. पौर्णिमेच्या चंद्राच्या तोडीच्या त्या श्रीकृष्णाच्या मुखाचें आज मला दर्शन घडणार. श्रीकृष्णाचें हें जगन्मय स्वरूप मी सर्वत्र अवलोकन करीत आहें. त्यांच्यापुढें अयोग्य शब्द उच्चारण्याचें मी मनांत आणलें आहें. तेव्हां त्यानें मजवर दया करावी अशी मी प्रार्थना करीत आहें. ज्याच्या कर्णामध्यें कुंडलें हालत आहेत, ज्याचें शरीर उत्कृष्ट प्रकारच्या चंदनानें चर्चिलेलें आहे, ज्याच्या दोहीं बाजूच्या बाहूंवर बाहुभूषणांतील रत्नांची प्रभा चमकत आहे. ज्याच्या डाव्या हातांत प्रचंड शंख विराज मान आहे, जो किरणमालांनीं विभूषित आहे, ज्याची कांति उदयकालिक सूर्याच्या तोडीची आहे, चक्रतेजाच्या ज्वालांनीं ज्याला एकप्रकारची शोभा आलेली आहे, कांतीनें देदीप्यमान असणारी सलकडीं ज्याच्या हातांत आहेत, ज्याचीं बाहुभूषणें तावून काढलेल्या सुवर्णानें मंडित आहेत, ज्यानें पीतवर्ण रेशमी वस्त्र परिधान केलेलें आहे आणि ज्याचें वक्षःस्थल विशाल आहे. त्या देवाधिदेवे श्रीकृष्णाचें दर्शन मला केव्हां घडणार?—आज कीं आणखी केव्हां तरी—केव्हांहि असो. त्याच्या मूर्तीचें दर्शन घेण्याविषयीं उद्युक्त झालों एवढ्यामुळेंच मी सदैव कृतकृत्य झालों आहें. बलरामानें ज्याचा आश्रय केला आहे त्या जगन्नायक श्रीकृष्णाचें दर्शन घेण्याविषयीं मी उद्युक्त झालों आहे, त्या अर्थीं मला नमस्कार असो मी खरोखर वंदनीय होय. मला खात्रीनें आजच विजयशाली जगज्जनक श्रीकृष्णाचें दर्शन घडणार. ज्याचे विशाल वक्षःस्थलाचे ठिकाणीं शोभा संपन्न अशा कौस्तुभ रत्नांची कांति चकाकत आहे, जें पीतवर्ण वस्त्रांनें युक्त आहे, ज्यावर असलेलीं कुंडलें मकराच्या आकाराचीं असून नेत्र कमलाच्या तोडीचे आहेत, ज्याचे ठिकाणीं उत्कृष्ट किरीट असून ज्याच्या वरच्या बाजूच्या दोन हातांमध्यें चक्र आणि गदा हीं आहेत, तें नीलवर्ण आणि तेजोमय श्रीकृष्णाचें शरीर मला कल्याणकारक होवो. निष्णात आणि पवित्र अशा बुद्धिरूपी मंदरपर्वताला निर्दोष असा शास्त्ररूपी प्रचंड सर्प लावून वेदरूपी महासागराचें मंथन चालविलें असतांना जें प्रकाशमान होतें व देवतादेखील ज्याचें सदैव सेवन करितात, तें श्रीकृष्ण नामरूपी अमृत मी आज यथेच्छ प्राशन करितों. जें श्रीकृष्णारूपी तेज परब्रह्मस्वरूपी व जीवस्वरूपीही आहे व म्हणूनच जे अनादि आणि अनंत असून अत्यंत स्थूल व अतिशय सूक्ष्म व एक आणि अनेकही आहे, मोक्षेच्छु पुरुष हृदयामध्यें ज्याचें चिंतन करितात व देवाला जें प्राधान्येंकरून वंद्य आहे, तें त्रैलोक्याच्या उत्पत्तीस कारणीभूत असलेलें श्रीकृष्णरूपी तेज माझ्या हृदयामध्यें सदैव वास्तव्य करो; आणि माझ्या दृष्टीलाही पडो.

या प्रमाणें अंतःकरणांत विचार चाललेला तो ब्राह्मणश्रेष्ठ स्वतःला धन्य समजून आपला उत्कृष्ट घोडा फेंकीत द्वारका नगरीकडे गेला.

## अध्याय एकशें पंधरावा.

—:०:—

### जनार्दनाचे संदेश-निवेदन.

वैशंपायन सांगतातः—राजा जनमेजया, याप्रमाणें द्वारकेला निघून गेल्यानंतर तो ब्राह्मण जनार्दन सुधर्मा सभेच्या द्वारामध्यें गेला. तेव्हां द्वारपालानें त्याच्या संबंधींचें सर्व वृत्त श्रीकृष्णाला निवेदन केलें. श्रीकृ-

ष्णाची अनुज्ञा मिळतांच तो धर्मनिष्ठ ब्राह्मणश्रेष्ठ त्या सुधर्मा सभेमध्यें गेला. तेथें जातांच ज्याच्या समीप बलराम बसलेला आहे, ज्याच्या अग्रभागीं सात्यकी उभा आहे, ज्याच्या एका बाजूला नारदमुनि उभे राहिले आहेत, दुर्वासमुनीशीं ज्याच्या गोष्टी चाललेल्या आहेत, उग्रसेन ज्याचा बहुमान करीत आहे आणि हे महाराजा, गात असलेल्या गंधर्वश्रेष्ठांनीं व नृत्य करीत असलेल्या अप्सरांच्या समुदायांनीं ज्याची सेवा चालविलेली आहे आणि सूत मागध बंदी इत्यादि स्तुतिपाठक लोकांनीं ज्याच्या स्तुतीचें गायन चालविलेलें आहे, सामवेदाचें गायन करणारे ब्राह्मण सामवेदाच्या रूपानें ज्याचीं स्तुति स्तोत्रें उत्तमप्रकारें गात आहेत व जो मूर्तिमंत असा उत्तम प्रकारचा धर्म असून मोठ्या आसनावर विराजमान झालेला आहे, त्या श्रीकृष्णाचें त्याला दर्शन घडलें. श्रीकृष्णाला अवलोकन करतांच त्याचें अंतःकरण आनंदित होऊन गेलें. त्याच्या शरीरावर रोमांच उभे राहिले. त्यानें 'महाराज, मी जनार्दन आहें' असें आपलें नांव निवेदन करून प्रथम श्रीकृष्णाच्या चरणाला नमस्कार केला व तदनंतर भूमीवर मस्तक टेंकून बलरामाला प्रणाम केला. नंतर तो म्हणाला 'हे देवाधिदेवा, मी हंस आणि डिंभक या उभयतांकडून आलेला दूत आहें.' याप्रमाणें तो सांगत आहे तोंच श्रीकृष्ण त्याला म्हणाले, 'हे ब्राह्मणश्रेष्ठा, अगोदर या आसनावर बैस. आणि नंतर मग तुझ्या आगमनाचें कारण आहे तें निवेदन कर.' यावर 'ठीक आहे' असें उत्तर देऊन तो ब्राह्मण त्या मोठ्या आसनावर बसला. हे नृपश्रेष्ठा जनमेजया, श्रीकृष्णांनीं त्या ब्राह्मणश्रेष्ठाचें गौरव केलें आणि त्याला कुशल प्रश्न विचारले. त्यांनी ब्रह्मदत्त हंस आणि डिंभक यांच्याहि कुशल वृत्ताविषयीं त्याला प्रश्न केला. ते म्हणाले, 'हे द्विज, हंस आणि डिंभक हे सुखरूप आहेतना ? त्यांचा पराक्रम आमच्या कानीं आलेलाच आहे. आणि त्यावरूनच त्यांचें काय कार्य आहे हें आम्हाला आपाततः कळून आलेलेंच आहे. हे विप्र जनार्दन, आपल्या पित्याचें कुशल आहेना?'

जनार्दन म्हणालाः—हे श्रीकृष्णा, माझ्या पित्याचें ब्रह्मदत्ताचेंहि कुशल आहे. तसेंच हे जगन्नायका, हंस आणि डिंभक हेहि उभयतां सुखरूप आहेत.

श्रीभगवान् म्हणाले—हे द्विजश्रेष्ठ, त्या हंस आणि डिंभक या उभयतां भूपतींनीं काय म्हटलें तें सर्व मला निशंकपणें निवेदन करा. मग तें सांगण्याला योग्य असो, अयोग्य असो अथवा दुसरें कांहीं असो. हे ब्राह्मणश्रेष्ठा, तें ऐकून घेऊन जें योग्य तें आम्हीं करूं. हे विप्र, याप्रसंगीं आपण सर्वथैव दूत आहां. यास्तव, सांगण्यासारखें आणि न सांगण्यासारखें, अशा प्रकारचा विचार आपल्यामध्यें असतां उपयोगी नाहीं. काम सांगणाऱ्या स्वामीनें जें सांगितलें असेल तें दूताच्या जातीनें उच्चारलेंच पाहिजे. या ठिकाणीं वक्तव्यासंबंधानें अथवा अवाच्यासंबंधानें शंका बाळगण्याचें आपल्याला कारण नाहीं. यास्तव, हे जनार्दन, त्या उभयतांनीं जें म्हटलें असेल तें आपण निवेदन करा.

याप्रमाणें श्रीकृष्णानीं सांगितल्यानंतर तो जनार्दन ब्राह्मण म्हणालाः—

भगवन्, आपणाला सर्वेही गोष्टींचें प्रत्यक्ष ज्ञान आहे, मग आपण असे अजाण मनुष्याप्रमाणें काय बोलत आहां ? हे श्रीकृष्ण, जगतांत घडणारी कोणतीही गोष्ट आपल्याला परोक्ष अशी नाहीं. आपण आपल्या अंतःकरणानें सर्व कांहीं प्रत्यक्ष पहात आहा. मग आपण मला " तूं सांग " असें काय म्हणत

आहां? हे विश्वव्यापका जगन्नायका, ज्ञाते लोक आपल्या स्तोत्राचें गायन करीत असतात. याप्रमाणें प्रत्यक्ष गोष्टींचा, त्याप्रमाणें अप्रत्यक्षहि गोष्टींचा, विचार आपण केवळ इच्छामात्रानेंच करूं शकतां. हें सर्व जग आपणच आहां. कारण, या जगाला जीवस्वरूपानें आपणच आधार आहां. ज्या ठिकाणीं आपण नाहीं असा सर्व स्थावरजंगमांत एकहि पदार्थ नाहीं. मग आपणाला अज्ञात असें काय असणार ? अर्थातच कांहींही नाहीं. हे जगन्नायका, आपलें वास्तव्य सर्वत्र आहे. सर्व प्राण्यांचे अधिपति आपणच आहां. हे माधव, जगताचा संहार करणारी रुद्रदेवता, सर्वांचा पालन करणारा श्रीविष्णु आणि विश्व निर्माण करणारा भगवान् ब्रह्मदेव हे सर्व आपणच आहां. मग मला आपण " तूं सांग, असें कां म्हणतां ? हे लक्ष्मीपते, आपण ज्ञानस्वरूपी आहां, अशी ज्ञाते लोक आपली स्तुति करीत असतात. हे पुरुषोत्तम, प्राणाचें ज्ञान असणारे लोक आपणाला 'प्राण' असें म्हणतात आणि शब्दवेत्ते आपणाला 'शब्द' असें म्हणतात. असें असतां हे हृषीकेश, आपण मला ' तूं सांग ' असें कां म्हणतां ? अस्तु, हे देवाधिदेवा, आपणच मला सांग सांग म्हणून वारंवार आज्ञा करीत आहां. तेव्हां तें मीं आतां सांगतों, आपण ऐका.

' भगवन्, ब्रह्मदत्त हा आतां राजसूय यज्ञ करणार आहे व त्याचसाठीं सर्व यादवश्रेष्ठांकडून कर घेण्यासाठीं आपल्यालाही आमंत्रण देण्यासाठीं हंस आणि डिंभक या उभयतांनीं मला पाठविलें आहे. हे श्रीकृष्ण, त्या यज्ञासाठीं आपण त्यांना पुष्कळ मीठ दिलें पाहिजे. मला या उद्देशानेंच त्यांनीं पाठविलें आहे. त्यांच्या आज्ञेवरून आपण आतां कर दिला पाहिजे. हे जगन्नायका, त्यांनीं आपणाला आणखी काय सांगितलें आहे, हें ऐका. हे प्रभो, श्रीकृष्णा, पुष्कळ मीठ घेऊन तूं त्वरित निघून ये. असे त्या उभयतां राजांचे शब्द आहेत.

राजा जनमेजया, याप्रमाणें त्याठिकाणीं त्या ब्राह्मणश्रेष्ठ दूतानें भाषण केलें असता ऐश्वर्यसंपन्न श्रीकृष्ण अगोदर पुष्कळ वेळ मोठ्यानें हंसले. आणि नंतर त्या दूताला म्हणाले:—'हे दूता द्विजश्रेष्ठा, आपण जें मला सांगितलें तें योग्यच आहे. मी कर देणाऱ्या नृपतींपैकींच एक आहें. त्या अर्थीं त्यांना कर दिलाच पाहिजे. पण हे ब्राह्मणश्रेष्ठा, केवढें हें त्यांचें धाडस. त्या क्षत्रियकुमारांचें काय हें धाडस ! माझ्याकडून कर घेणें हें त्यांचें खास धाडस होय. मजकडून कर घेणें ही गोष्ट आजपर्यंत माझ्या कानावरही आलेली नाहीं.' असें दूताशीं भाषण केल्यानंतर श्रीकृष्ण यादवांकडे वळून म्हणाले, हे यादवश्रेष्ठहो, माझ्याकडून कर घेणें हा केवळ उपहास होय. तो ब्रह्मदत्त राजा म्हणे राजसूययज्ञ करणार आहे, आणि ते हंस आणि डिंभक तो त्याजकडून करविणार आहेत व त्या दुष्टासाठीं यादवश्रेष्ठ त्याच्या घरीं मीठ वाहून नेणार आहे. वहावा ! हे यादवश्रेष्ठहो, हा श्रीकृष्ण त्यांना कर देणाऱ्यांपैकीं एक ! झालाच माझा पराजय ! उपहास उपहास ! ! हे यादवहो, पुनःपुनः हें त्यांचें वचन वचन ऐकून ठेवा.

याप्रमाणें देवाधिदेव श्रीकृष्णानीं शब्द उच्चारतांच बलरामप्रभृति सर्व यादव त्या भाषणाला हंसण्यासाठीं एकत्र येऊन उभे राहिले. ते सर्वही यादव परस्परांच्या हातावर टाळी देत आणि " श्रीकृष्ण कर देणाऱ्यांपैकीं एक " असें म्हणून अतिशय हंसत. त्या वेळीं त्या टाळ्यांचा कडकडाट आणि हास्याचा ध्वनि यांनीं भूमी आणि आकाश हीं दुमदुमून गेलीं. हे नृपश्रेष्ठा, जनमेजया, यावेळीं, "अरेरे मी आपल्या मित्राला संतुष्ट करण्यासाठीं

दूताचें काम केलें. हाय! हाय!!" असें म्हणून तो ब्राह्मण लाजेनें खालीं तोंड घालून स्तब्ध होऊन राहिला.

## अध्याय एकशें सोळावा.

—:०:—

### श्रीकृष्णाचें उत्तर.

वैशंपायन सांगतातः—राजा जनमेजया, याप्रमाणें सर्व यादव हास्य करूं लागले असतां केशिदैत्यनाशक श्रीकृष्ण त्या दूताला म्हणाले;"हे द्विज, आपण शीघ्रगतीनें जाऊन माझ्या सांगण्यावरून हंस आणि डिंभक या उभयतांना असें बोला. त्यांना म्हणावें, मी तुम्हाला कर देणार. पण तो शार्ङ्ग धनुष्यांतून फेंकलेल्या दगडासारख्या कठोर, तीक्ष्ण धारेच्या बाणांनीं अथवा धार पाजलेल्या खड्गानें देणार. तो कर म्हणजे आपला शिरच्छेद हा होय. माझ्या हातानें फेंकलेलें हें चक्र देखील आपणाला कर देईल. तुमच्या धाडसाला कारणीभूत असा जो वर तो श्री रुद्रानें दिलेला आहे. तेव्हां आतां तोच तुमचें संरक्षण करो. त्याला पराजित करून मी तुम्हां उभयतांना ठार करीन. आतां असें एक स्थल ठरवा कीं, जेथें तुमची व आमची गांठ पडेल. तेथें मी माझें सैन्य आणि वाहनें घेऊन येईन. आणि हे नृपतीनों, तुम्हींही निर्भयपणें त्या ठिकाणीं या. मग हें ठिकाण पुष्करावर असो, प्रयागावर असो अथवा मथुरे जवळ असो; मी तेथें आपल्या सैन्यानिशीं येईन. त्याबद्दल तुम्हाला काळजी नको."

'अथवा हे ब्राह्मणश्रेष्ठा, आपल्या मुखांतून असे शब्द निघणें शक्य नाहीं, तेव्हां जें सांगणें आपल्याला शक्य नाहीं, तें आपल्या बरोबर त्याच कामासाठीं आलेला हा सात्यकि सांगेल. आपण केवळ साक्षीभूत असा म्हणजे झालें. हे ब्राह्मणश्रेष्ठा, मी प्रतिज्ञापूर्वक सांगतों कीं, आपल्यावर माझें नेहमी प्रेम राहील. व त्या योगानें, दु:खानें व्याप्त करून सोडलेल्या या संसारामध्यें आपण विजयी व्हाल. अर्थात् या संसारिक दुखांची बाधा आपणाला बिनकूल होणार नाहीं. हे जनार्दन, आपण सदैव माझ्या कथांचें संकीर्तन करण्याविषयीं तत्पर होऊन रहा.

## अध्याय एकशें सतरावा.

—:०:—

### हंसवाक्य वर्णन.

वैशंपायन सांगतातः—राजा जनमेजया, याप्रमाणें ब्राह्मणाला सांगितल्यानंतर श्रीकृष्ण आणखी सात्यकीलाहि म्हणाले,' सात्यके, या ब्राह्मणाबरोबर जा आणि त्या दोघांच्या पुढें जाऊन, मी जें बोललों आहें तें सर्व माझ्या म्हणण्यावरून सांग. आणि विशेषेंकरून ज्या योगानें संग्रामांत आम्हां दोघांची ( त्यांची व माझी ) गांठ पडेल अशा रीतीनें जोरानें बोल. हे यदुकुलश्रेष्ठा, तूं दुसऱ्या कोणालाही बरोबर साह्य न घेतां एका घोड्यानिशी जा. बरोबर धनुष्य घे आणि हातांत अंगुलित्राण[1] घालून गोधा बांध.' हें ऐकून सात्यकी 'ठीक आहे' असे म्हणून एका शीघ्रगामी घोड्यावर बसला आणि हे राजा, बरोबर कोणालाही न घेतां त्यानें जाण्याचें मनांत आणले. श्रीकृष्णानींही तत्काल त्या जनार्दन दूताला निरोप दिला. त्यावेळीं तो जनार्दन हंस आणि डिंभक यांना उद्देशून 'काय हें धाडस, किती हें साहस' असें म्हणाला

१ धनुष्याची दोरी ओढतांना अगर बाण सोडतांना हाताच्या बोटास इजा होऊं नये म्हणून अगुंस्तानासारखी वस्तु बोटाला घालीत असत, तिला अंगुलित्राण असें म्हणतात व धनुष्याचा दोरीच्या आघातानें मनगटाला वगैरे पीडा होऊं नये म्हणून तेथें जें चामडें बांधतात त्याला गोधा असें म्हणतात.

आणि श्रीलक्ष्मी देवीच्या प्रियतमास अर्थात् श्रीकृष्णास नमस्कार करून निघाला व सात्यकीला बरोबर घेऊन शाल्वनगराकडे गेला. तेथें गेल्यानंतर उत्कृष्ट प्रकारचा ब्रह्मवेत्ता तो ब्राह्मण प्रथम सात्यकीला आसन देऊन नंतर आपण एका मोठ्या आसनावर बसला. सात्यकीसहवर्तमान सुखानें बसल्यावेळीं त्या ब्राह्मणानें हंस आणि डिंभक यांची दृष्टि सात्यकीकडे वळविली. तो म्हणाला, हा सात्यकी श्रीकृष्णाकडून दूत आलेला आहे. हा त्याचा डावा हातच आहे. हें ऐकून हंस म्हणाला, पूर्वीं मी केवळ याला ऐकलेला आहे. पण आज याचें प्रत्यक्ष दर्शन झालें. हा धनुर्वेद,वेद, शास्त्रें आणि शास्त्रविद्या यामध्यें हा धैर्यसंपन्न पुरुष निपुण आहे. असें आम्हीं सदैव ऐकत आहों. तो हा आज आमच्या अवलोकनांत आला, यामुळें आम्हास आनंद होत आहे. असें म्हणून त्यानें सात्यकीला "श्रीकृष्ण सुखरूप आहेना, बलराम सुखरूप आहेना आणि उग्रसेन प्रभृति सर्व यादवांचें क्षेम आहेना" असें विचारलें. तेव्हां सात्यकीनें मुख किंचित विकसित करून, होय. असें उत्तर दिलें. तदनंतर भाषण करण्यामध्यें चतुर असलेला हंस जनार्दनाला म्हणाला, 'तुला श्रीकृष्णाची भेट झाली काय, आमचें कार्य घडून आलें काय, हें सर्व मला पूर्णपणें सांग. व्यर्थ काळ दवडूं नको.'

## अध्याय एकशें अठरावा.

—:०:—

### सात्यकीचें भाषण.

वैशंपायन सांगतात:—राजा जनमेजया, याप्रमाणें हंसानें भाषण केल्यानंतर धर्मात्मा वीर जनार्दन हंसत हंसत श्रीकृष्णाची सारखी स्तुति करीत म्हणाला:—हां, पाहिला पाहिला मी. हातामध्यें शंखचक्र धारण करणारा, तापून लाल झालेल्या, सुवर्णाप्रमाणें देदीप्यमान बाहुभूषणें असलेला, प्रभामंडल चमकत असलेलीं रत्नें धारण करणारा श्रीकृष्ण. वृद्ध वृद्ध यादव आणि श्रेष्ठ श्रेष्ठ मुनि ज्याची सेवा करीत आहेत,प्रभुत्व संपन्न लोक आणि मागध ज्याची स्तुति गात आहेत, ज्याच्या प्रवालाप्रमाणें आरक्तवर्ण असलेल्या व कोमल पल्लवाप्रमाणें सुकुमार असलेल्या अधरावर हास्य विराजमान आहे, पुरातन अशा विद्वान् लोकांनीं आणि देवतांनीं यथाशास्त्र विचार करून ज्याचें ज्ञान प्राप्त करून घेतलें आहे, ज्याची शरीरकांति विकास पावलेल्या नील कमला प्रमाणें सुंदर आहे, ज्याचे उदराला प्रफुल्ल अशा सुवर्ण कमलाच्या योगानें विशिष्ट शोभा आलेली आहे, ज्याला उत्पत्ति नसून जो जगताचा उत्पादक आहे, जो आपल्या भाषणाच्या योगानें यादवांना संतुष्ट करीत आहे, जो पुरातन अशा मुनिश्रेष्ठाशीं चालू असलेल्या वेदार्थाचें यथाशास्त्र निरूपण करीत आहे, जो जगताच्या हितासाठीं सुप्रसिद्ध अशा अनेक शत्रूंचा चुराडा उडवून या जगतामध्येंच वास्तव्य करीत आहे, अथवा जग हेंच ज्याचें स्वरूपच आहे, त्या सर्व जगताचें हित करणाऱ्यामध्यें श्रेष्ठ अशा श्रीकृष्णाचें मी पुनः पुनः दर्शन घेतलें. यादवश्रेष्ठाशीं क्रीडा करीत असलेला, क्रीडेच्या कालीं आनंद पावणारा, ऐश्वर्यसंपन्न अशा यादवश्रेष्ठांना आनंदित करणारा, स्तुतीस पात्र यादवाधिपति ऐश्वर्यसंपन्न कमलनेत्र रुक्मिणीसहवर्तमान बसलेला, समुद्रामध्यें शयन करणारा, भक्तप्रिय असलेला म्हणूनच भक्तजनामध्यें वास्तव्य करणारा,

१ येथें मूळांत "उन्माथित" असाहि पाठ एके ठिकाणीं आहे. पण तो असंबद्ध आहे. रा० ए० सो० बं० च्या प्रतींत "उन्मिषित" असा पाठ आहे व तोच बरोबर आहे म्हणून आम्ही घेतला आहे.

कल्याण कारक जो श्रीकृष्ण, त्याचें मी अतिशय सुखानें वारंवार दर्शन घेतलें. माझें अंतःकरण तल्लीन होऊन गेलें, यामुळें जरी मी माझे नेत्र घट्ट मिटले होते, तरी नेत्रांनीं श्रीकृष्णाच्या अनादि शरीराचें प्राशन सारखें चालविलें होतें. त्या वेळीं मी खरोखर धन्य आहें. असें माझ्या मनाला वाटलें. त्या ऐश्वर्यसंपन्न, अधिकारशाली, प्राणिस्वरूपी, सर्वांची काळजी वहाणाऱ्या, सर्वांस आदिभूत असलेल्या, दोन कमळें धारण करणाऱ्या, कटिप्रदेश सुंदर असलेल्या, विशाल कांतिसंपन्न अशा श्रीकृष्णाचें दर्शन मला घडलें. त्याचें चिंतन करून करून माझें अंतःकरण गार झालें. ज्याच्या वक्षस्थलावर कौस्तुभ रत्न विराजमान असून ज्याच्यावर शेकडों चामरें सारखी ढळत आहेत. तो जगन्नायक श्रीकृष्ण मी आपल्या नेत्रांनीं पाहिला. तो यादवश्रेष्ठ श्रीकृष्ण द्वेषयुक्त अंतःकरणानें तुमचें एकसारखें स्मरण करीत आहे. " ते ( तुम्ही उभयतां ) कोठें आहेत, कोणाला माहीत आहे काय ? ते कोठें आहेत ते. ते मूर्ख माझ्या नजरेस कोठें पडतील ? त्यांना माझ्या समोर आणण्याचा काय उपाय ? " अशा प्रकारचा विचार त्या शंख धारण करणाऱ्या देवाधिदेवानें सारखा चालविला आहे. आपल्याला कर द्यावयाचा हें ऐकतांच ज्याच्या मुखांतून हास्य निघूं लागलें, नारद आणि यतिश्रेष्ठ दुर्वासा यांच्याशीं ज्याचें भाषण चाललें आहे असा, व परब्रह्माच्या विचारानें ओतप्रोत भरलेलीं वचनें शिष्यांस पढविण्याविषयीं मुनिश्रेष्ठ दुर्वासाला अनुज्ञा देणारा. अर्थात, "आपले विघ्नाचें मी निवारण करतों; पूर्वीं प्रमाणें आपलें अध्यापन चालूं होऊंद्या" असें सांगणारा, जो श्रीकृष्ण त्याचें मी दर्शन घेतलें. त्या वेळीं हे नृपश्रेष्ठा, माझ्या मनांत वारंवार असें येऊं लागलें कीं, त्या उभयतांनीं हातीं घेतलेलें हें कार्य असाध्य आहे. यानंतर तरी असलें कार्य त्यांनीं हातीं घेऊं नये. हंसा, हा सर्व वृत्तांत घडून आल्या नंतर तुझें ग्रहण कसें करावयाचें या विषयींचा विचार श्रीकृष्णानीं केला. त्या विषयींची सर्व हकीकत हा सात्यकी निवेदन करील.

हें भाषण ऐकून हंस क्रोधानें म्हणाला, अरे ब्राह्मणाच्या पोरा, काय हें तुझे बोल. त्रैलोक्याला देखील पादाक्रांत करून टाकण्याची इच्छा करीत असणाऱ्या आम्हां उभयतांच्या पुढें अशा प्रकारचे शब्द उच्चारावयाचा मोह तुला त्या कृष्णानेंच आपल्या मायेच्या योगानें पाडलेला आहे. अशा प्रकारच्या लीला करण्याचे प्रकार त्याला माहीत आहेत. त्याला अवलोकन करतांच तुला हा मोठा भ्रम उत्पन्न झाला. शंख, चक्र, गदा आणि वनमाला यांनीं थाटलेला, यादव वीरांच्या समाजामध्यें फोफावणाऱ्या कीर्तीला सर्वस्व समजणारा, सूत मागध इत्यादिकांनीं केलेल्या स्तुतिस्तोत्रांच्या योगानें वीरांच्या बाहूंस स्फुरण चढवीत असलेला, अत्यंत आश्चर्यकारक अशा विपुल कीर्तीनें लोकसमुदायाला विभूषित करणारा, वृष्णि आणि यदु यांच्या कुलामध्यें उत्पन्न झालेल्या लोकांच्या समुदायाला आपल्या चार बाहूंच्या सामर्थ्यानें अगदीं भारून सोडणारा, जो कृष्ण त्याला अवलोकन करतांच आज तुला केवढा हा भ्रम पडून गेला आहे! अहो ब्राह्मण महाराज, तो दुष्ट अद्यापि देखील तुमच्या अंतःकरणामध्यें भ्रम उत्पन्न करीत आहे. तुमची बुद्धीच कोती. हेच तें त्याचें गारुड. अरे ब्राह्मणा, तुझ्या या चपलपणाचें कारण त्यानें पाडलेला भ्रम हेंच होय. अरे, तूं माझी तुलना त्याच्याशीं करावी काय! हे विप्र, मी म्हणूनच तुझ्या मुखांतून निघालेले हे शब्द केवळ मित्रत्वामुळें सहन करीत आहें. नाहीं तर हे

कोण सोसणार. जा मूर्खा. तुला वाटेल तिकडे चालता हो. सर्व पृथ्वी तुझीच आहे. फीर तुला वाटेल तिकडे. आमचा तर हा पहिला संकल्प आहे कीं, त्या यादवाच्या बच्चाची खोड जिरवून अनेक यादवांना गतप्राण करून सर्व यादवांना परास्त करावयाचें. हे ब्राह्मणा, चल; नीघ तूं येथून. सदोदित माझ्या सहवासाला राहून शत्रुपक्षाची स्तुति करण्याविषयीं तत्पर असलेला, कर्णकटु भाषणें करणारा, धाडशी असा जरी तूं आहेस, तरी मी तुला कांहीं करीत नाहीं. मजवर कितीही जरी संकटें ओढवलीं तरी ब्राह्मणांचा वध करणें हें कांहीं माझ्या हातून घडावयाचें नाहीं. असें ब्राह्मणाला म्हणून, नंतर तो हंस सात्यकीला म्हणाला, 'अहो यादववंशज, आपला येथें येण्याचा उद्देश काय? त्या नंदाच्या पोराचें काय म्हणणें आहे? त्यानें माझा कर दिला आहे काय?'

सात्यकि म्हणालाः—हंसा, त्या शंख, चक्र, गदा धारण करणाऱ्या श्रीकृष्णाचें हें भाषण मी खरें सांगत आहें. ते म्हणाले, ज्याच्या अग्रभागीं तीक्ष्ण धारा आहेत असे पाषाणाप्रमाणें कठीण बाण शार्ङ्ग धनुष्यांतून सोडून त्यांच्या योगानें अथवा अतिशय धार असलेल्या खड्गाच्या योगानें तुझ्या कराचें सर्व द्रव्य मी तुला अर्पण करीन. हंसा, माझ्या करदानाचें संक्षिप्त स्वरूप म्हणजे मी तुझा शिरच्छेद करणार हें होय. अरे हे अधमा मूर्खा, राजा, याहूनही तुझें धाडस कसलें असावयाचें? अरे नीचा, जो राजा देवाधिदेव जगन्नायक श्रीकृष्णाकडून कर ग्रहण करण्याची इच्छा करीत असेल त्याला द्यावयाचा कर थोडक्यांत म्हटला म्हणजे त्याच्या जिव्हेचा छेद हाच होय. त्या श्रीकृष्णाच्या शार्ङ्ग धनुष्याचा टणत्कार आणि शंखाचा अवाज कानीं पडला म्हणजे कोणाला आपल्या जीविताची आशा वाटणार आहे? श्रीशंकराकडून मिळालेल्या वरामुळें तूं आजकाल शेफारून गेला आहेस. तूं आता असाच रहा. हंसा, अशा प्रकारचे हे शब्द कोण उच्चारूं शकणार? हे आह्मी बलभद्रप्रभृति श्रीकृष्णाचें सहाय्य करीते आहोंत. पहिला बलराम, दुसरा हा मी सात्यकि, तिसरा कृतवर्मा, चवथा बलाढ्य निशठ, पांचवा बभ्रु, सहावा उत्कल, सातवा शस्त्रास्त्र निपुण ज्ञानसंपन्न तारण, आठवा सारंग, नववा विपृथु आणि दहावा ज्ञानसंपन्न उद्धव, हे आह्मी सर्व संग्रामामध्यें बलाढ्य लोक, शंख, चक्र, गदा धारण करणारा आमचा संरक्षक जो देवाधिदेव श्रीकृष्ण त्याच्या सदैव पुढें असतों. हें तर राहूंदेच. पण त्या श्रीकृष्णाचें जें सामर्थ्यामध्यें अश्विनीकुमाराच्या तोडीचे असे दोन वीरपुत्र आहेत, तेच तुह्मां उभयतांना संग्रामामध्यें गतप्राण करून सोडण्याविषयीं समर्थ आहेत. तेही सामर्थ्यानें धुंद होऊन गेलेले आहेत. ज्या श्रीशंकरानें तुह्माला वर दिलेला आहे तो केवळ वर देऊन पर्वतावर जाऊन वास्तव्य करीत आहे, त्याचा या प्रसंगीं तुह्माला उपयोग होणार नाहीं. तुमचें सामर्थ्य थोडें; असें असतां धनुष्य घेऊन शत्रूशीं संग्राम करण्याविषयीं तुह्मी उद्युक्त झालेले आहांत. श्रीकृष्णाचे असे आमच्या सारखे सेवक लोक शत्रूशीं युद्ध करीत असतां, त्या त्रैलोक्याच्या संरक्षकापासून कर घेण्याच्या इच्छेनें त्याजकडे कोण जाऊं शकणार आहे? जो त्रैलोक्याचें संरक्षण करीत आहे, तो श्रीकृष्ण, शार्ङ्गधनुष्यातून केवळ एकच तीक्ष्ण बाण सोडून तुह्माला खात्रीनें ठार करील. त्या जगन्नायक श्रीकृष्णानें पुनः आणखी असें विचारलें आहे कीं, आमचा संग्राम कोठें होणार. काय सदैव पुण्यदायक अशा पुष्कर क्षेत्रावर किंवा गोवर्धन गिरीवर अथवा मथुरेंत तुह्मी

मला आपलें सामर्थ्य दाखविणार? हंसा, शंख' चक्र धारण करणारा देवाधिदेव श्रीकृष्ण जगताचें पालन करण्यांत तत्पर असतांना स्वतः राजसूय महायज्ञ करण्याचें कोण मनांत आणणार आहे? आणि मी असें करणार. असें म्हणून तुजवांचून दुसरा कोणता कल्याणशाली पुरुष सुख पावणार आहे? मूर्खा, तूं जर अशी इच्छा केलीस तर या भूतलावर उपहासास मात्र पात्र होशील. असें बोलून वीर सात्यकी हंसल्यासारखें करून भूमीवर बसला.

## अध्याय एकशें एकुणिसावा.

—:०:—

### हंस आणि डिंभक यांचे उद्गार.

वैशंपायन म्हणालेः—राजा जनमेजया, हें ऐकून ते हंस आणि डिंभक हे उभयतां कोपाविष्ट झाले. क्रोधाच्या योगानें त्यांचे नेत्र व्याप्त होऊन गेले. ते जणूं आपले कोपाच्या योगानें सर्व दिशा जाळून खाक करीत आहेत कीं काय असें वाटत होतें. त्यांनीं सर्व भूपतींवर दृष्टि फेंकली आणि हातानें हाताला पिळोखे देऊन म्हटलें (या वेळीं त्यांच्या मनांत श्रीकृष्णाचा तो लांबलचक निरोप सारखा घोळत होता व ते उभयतां सत्यप्रतिज्ञ अशा सात्यकीला तिरस्कारानें म्हणूं लागले) 'अरे यादवाच्या पोरा, कुठला तो नंदाचा पोरगा आणि कुठला सामर्थ्याची घमेंड असलेला तो बलराम. काय बोलतो आहेस तूं हें आमच्यापुढें. चल जा. नीघ येथून तूं मूर्खा. या वेळीं तूं दूत[१] आहेस. नाहींतर अशा प्रकारचे कठोर शब्द तुझ्या मुखांतून बाहेर पडत आहेत, तोंच तुझा वध करून टाकला असता. खरोखर तूं अगदीं निर्लज्ज आहेस म्हणूनच अशा प्रकारचें भाषण करीत आहेस. आह्मी या सर्व जगताचें शासन करण्यासाठींच उद्युक्त असलेले नरपति आहोंत. या मृत्युलोकांमध्यें असा कोण पुरुष जीवंत आहे कीं जो आह्माला कर देणार नाहीं? आतां आह्मीं या सर्व गोपालांना ठार करतों. अनेक यादवांना बद्ध करितों. आणि आमच्या कराचें सर्व द्रव्य वसूल करतों. चल जा नीचा येथून. तूं दूताच्या स्थितींत आहेस यामुळें वध करण्याला अयोग्य आहेस. हें समजूनच हे अशा प्रकारचे पुष्कळ असंबद्ध उद्गार तूं काढीत आहेस. ज्या परमेश्वरानें आम्हाला वर दिला आहे आणि ज्या प्रभूनें आम्हाला अस्त्रें अर्पण केलीं आहेत, तोच महत्वसंपन्न अशा आम्हां उभयतांचें संग्रामांत जातेवेळीं संरक्षण करील. त्या गौळ्याला (कृष्णाला) युद्धामध्यें पराजित करून त्याच्या जागीं आम्ही आपल्या पित्याला बसवून तूं जे लोक आम्हाला सांगितलेस ते सर्वच युद्धाला भिणारे आहेत. त्यांना आणि त्यांच्या सर्व सैन्याला प्रथम गतप्राण करून सोडीन आणि नंतर कृष्णाला पराजित करीन. जिच्या हातांमध्यें धनुष्यें आहेत, जिनें ×इष्टें आणि मुसल नामक आयुधें धारण केलीं असून अंगावर चिलखतें चढविलीं आहेत, जिनें हजारों रथांवर आरोहण केलें असून जी गदा आणि परिघ यांनीं व्याप्त होऊन गेलेली आहे. जिच्यापाशीं सर्व सैन्याला दग्ध करून सोडण्याची विपुल साधनें असून जींमध्यें विपुल सामर्थ्य आणि संग्रामाचीं प्रचंड साधनें आहेत अशा मोठ्या सेनेचाही संहार करण्याचें सामर्थ्य आम्हांमध्यें आहे. सेनाध्यक्षहो, करा चाल भयंकर सैन्याची चोहोंकडे. सात्यके, जा तूं. तूं वध करण्याच्या स्थितींतच नाहींस म्हणूनच तुला कांहीं मरणाची भीति नाहीं. अरे राजा, उद्यां किंवा परवां पुष्करावर आमचा संग्राम होईल. तेव्हां कळून येईल आह्माला कृष्णाचें आणि

१ दूत कांहीं बोलला तरी अवध्य आहे, ही नीति फार प्राचीन आहे.

बलरामाचें वीर्य. दुसऱ्याही ज्या राजांचीं नांवें तूं उच्चारलींस त्यांचेंही सामर्थ्य संग्राममध्यें आह्माला कळून येईल.

सात्यकि म्हणाला, राजा, हंसा, उद्यां किंवा परवां तुमचे प्राण घेण्यासाठीं मी येईन. आजच मी जर दूत नसतों तर तुह्मां उभयतांना ठार करून सोडलें असतें. असो; पण उद्यां किंवा परवां मात्र तुह्मीं अस्तित्वांत रहाणार नाहीं; तुमचीं भाषणें फारच कटु आहेत. दूताच्या कामामध्यें मनुष्यांना सदैव जें निरुपम दुःख अनुभवावें लागतें त्याचा भार आज मजवर पडलेला आहे, नाहीं तर आजच तुमचे प्राण घेऊन हे नीच राजांनो, तुह्मांला माझ्या बाहुबलाचा ताठा काय आहे आणि शौर्य किती आहे तें दाखविलें असतें आणि सुखी झालों असतों. असो; पण आतां हातांमध्यें शंख, चक्र, गदा धारण करणारा, शार्ङ्ग नामक धनुष्य घेणारा, किरीटाच्या योगानें शोभणारा, नीलवर्ण कुरळे केश असलेला, बाहु लांब असलेला, शोभासंपन्न, सर्व लोकांच्या उत्पत्तीचें स्थान अतिशय उत्कृष्ट स्वरूप असलेला विश्वरूपी दैत्यदानवांचे प्राण घेणारा, योगी जन ध्यान करीत असलेला, अनादि, कमलपत्राप्रमाणें सुंदर नेत्र असलेला, श्यामवर्ण, सिंहगति, जगताची उत्पत्ति, स्थिति आणि संहार हीं एकटाच करणारा, सर्व जगताचा उत्पादक, जो श्रीकृष्ण तो संग्रामामध्यें उत्कृष्ट धार असलेल्या एकाच बाणाच्या योगानें तुमचा हा सर्व ताठा उतरून देईल.

असें बोलून हे महाराजा, रथावर आरोहण करून सात्यकि चालता झाला.

## अध्याय एकशें विसावा.

—:०:—

### श्रीकृष्णाचें पुष्कराकडे प्रयाण.

वैशंपायन म्हणाले:—राजा जनमेजया, तो शिनिकुलश्रेष्ठ सात्यकि तेथून निघून श्रीकृष्णाच्या नगरामध्यें ( द्वारकेमध्यें ) आला आणि त्यानें त्या उभयतांसंबंधींचा घडलेला सर्व वृत्तांत श्रीकृष्णास निवेदन केला. तदनंतर रात्र निघून जाऊन प्रभातकालचा स्वच्छ प्रकाश पडला असतां हातांमध्यें चक्र, गदा धारण करणारे केशदैत्यनाशक श्रीकृष्ण सेनाधिपतींस ह्मणाले, 'हे सेनाधिपतींनो, ज्यांमध्यें रथ, गज आणि अश्व आहेत. जे प्रास ( इटा ) खड्ग आणि परिघ इत्यादि आयुधांनीं व्याप्त होऊन गेलेलें आहे. ज्यांमध्यें अनेक ध्वज आहेत व जें अनेक प्रकारचे अलंकार आणि साहित्य यांच्या योगानें युक्त आहे तें आमचें सर्व सैन्य तयार करा.

हें ऐकतांच 'ठीक आहे' असें म्हणून त्या आज्ञाधारकानीं श्रीकृष्णाच्या आज्ञेप्रमाणें सर्व केलें. ते सर्व सेनेंतील मुख्य पुरुष अतिशय बळकट धनुष्यें हातांत घेऊन अंगावर चिलखत चढवून सैन्याच्या अगदीं पुढें चालले. हे राजा, हातांमध्यें धनुष्य घेतलेला महाबलाढ्य सात्यकीही पुढें चालला होता. त्या वेळीं तो अतिशय कोपाविष्ट झालेला दिसत होता. त्याच्याचप्रमाणें इतरही अनेक अत्यंत उत्कृष्ट शूर यादव मोठमोठीं आयुधें हातांमध्यें घेऊन सिंहाप्रमाणें गर्जना करीत गमन करूं लागले. नंतर श्रीकृष्णही जो शार्ङ्ग धनुष्याचा भार सहन करील अशा एका दारुकानें सज्ज केलेल्या रथामध्यें आरोहण करून व एक भयंकर धनुष्य आणि बाण घेऊन निघाले. यावेळीं नवीन मेघाप्रमाणें कांति असलेल्या श्रीकृष्णांनीं हातामध्यें शंख, चक्र, गदा, आणि

खड्ग हीं धारण केलीं होतीं. त्याजपाशीं उत्कृष्ट बाणहि होते. त्यांनीं हातामध्यें अंगुलित्राण घातलें असून गोधा नांवाची चर्मपट्टिकाही बांधलेली होती त्यांचें वक्षस्थल कंठांमध्यें धारण केलेल्या कमलमालांनीं व्याप्त होऊन गेलेलें होतें. आनंदयुक्त झालेले ब्राह्मण त्यांची स्तुति करीत होते. सूत आणि मागध हे चोहोंकडे त्यांच्या कीर्तीचें गायन करीत होते. त्यांनीं सर्व सेना एकत्र केली आणि उत्तरेकडे प्रयाण केलें या वेळीं श्रीकृष्णानीं शत्रूंना भीति उत्पन्न करणारा असा आपला पांचजन्य नांवाचा शंख मुखाला लावला आणि मोठ्या जोरानें फुंकला. त्या वेळीं आवाज मोठा होऊं लागला. हे राजा, त्या उत्कृष्ट शंखातून निघालेल्या ध्वनीनें सर्व आकाश आणि पृथ्वी ही भरून सोडली. श्रीकृष्णानीं शंख वाजवितांच दुसऱ्याही हजारों वीरांनीं आपआपले शंख वाजविले. हे राजा, ग्रीष्मकाल समाप्त होतांच ज्याप्रमाणें मेघ ध्वनि करतात त्याप्रमाणें अनेक दुंदुभी आणि मृदंग हेही आघात होतांच प्रचंड ध्वनी करूं लागले. याप्रमाणें निघाल्यानंतर हे महाराजा, ते सर्व यादव पुण्याची अभिवृद्धि करणाऱ्या पुष्कर सरोवरावर आले आणि हंस डिंभकांची मार्गप्रतीक्षा करीत युद्ध करण्याच्या उद्देशानें तेथें राहिले. त्या सर्व यादवांनीं तेथें आपला तळ दिला, तंबू ठोकले आणि ते सर्वहीजण आपआपल्या तंबूमध्यें जाऊन सुखानें राहिले. भगवान् श्रीकृष्णानींही तें उत्कृष्ट सरोवर अवलोकन करतांच त्यामध्यें स्नान केलें. आणि यतिश्रेष्ठांना प्रणाम केला. पुढें ब्राह्मणांचा चोहोंकडे चाललेला वेदध्वनी श्रवण करीत ते त्या हंस डिंभकांच्या आगमनाची मार्गप्रतीक्षा करीत त्या सरोवराच्या तीरावर सुखानें राहिले.

## अध्याय एकशें एकविसावा.

--:०:--

### दोहीं सैन्याचें पुष्कर तीर्थावर प्रयाण.

वैशंपायन म्हणाले:—राजा जनमेजया, यानंतर ते हंस आणि डिंभक हे उभयतांही पुष्कर तीर्थाकडे चालले. हे राजा, त्यांनीं रथांत आरोहण केलें असून मोठमोठीं धनुष्यें घेतलीं होतीं. त्यांजबरोबर ध्वजहि होते. त्यांच्या अघाडीला मोठमोठे वीर होते. ते जणुकाय सर्व जगताचा संहारच करणार आहेत असे भयंकर दिसत होते. त्यांचें सर्वांग भस्मचर्चित असून त्यांच्या कपाळाला त्रिपुंड्र व कंठामध्यें रुद्राक्षमाळा होत्या. ते सिंहाप्रमाणें गर्जना करीत असून सर्व जगताचा संहार करणारे दुसरे दोन रुद्रच कीं काय असे भासत होते. हे नृपश्रेष्ठा, त्यांच्या पाठीमागून शेकडों सैन्यें चाललीं होतीं त्यांचे एकत्र जमलेलें एकंदर सैन्य केवळ दहा अक्षौहिणीच[1] होतें. हे महाराजा, पूर्वीं या दोघां बलाढ्य वीरांचा पर्वतासारखा धिप्पाड असा विचक्र नांवाचा एक दैत्य मित्र होता. त्यानें सामर्थ्यसंपन्न अशा श्रीकृष्णाशीं पूर्वीं युद्ध केलेलें होतें. ज्याच्यापुढें वज्रधारण करणारा इंद्र उभा देखील राहूं शकत नसे. हे महाराजा, देव आणि दैत्य यांचा संग्राम झाला त्यावेळीं ज्या महावीरानें देवांचा चुराडा उडवून इंद्राचा पराजय केला आणि ज्यानें द्वारकेमध्यें येऊन यादवश्रेष्ठांना पीडा दिली. तो त्यावेळीं लौकरच युद्ध होण्याचा प्रसंग आला आहे, हें ऐकून हंस आणि डिंभक याचें साह्य करण्याविषयीं उद्युक्त झाला. कारण, हे नृपश्रेष्ठा, त्याच्यामध्यें यादवां संबंधाचा द्वेष वास्तव्य करीत होता. त्याजबरोबर परिघ संज्ञक आयुध

१ एकवीस हजार आठशें सत्तर हत्ती तितकेच रथ ६५६१० घोडे आणि १०९३५० पायदळ या सर्वांस मिळून एक अक्षौहिणी असें म्हणतात.

धारण करणारे अनेक लक्ष यादव होते. तसेंच हिडिंब या नांवाचा एक राक्षसाधिपति त्या विचक्राचा अतिशय मित्र होता. तो त्याजसाठीं संग्रामाम यें आपले प्राणहि खर्च करणारा होता. तो राक्षसश्रेष्ठ हिडिंब हातामध्यें पाषाण, शूल आणि खड्ग धारण करणाऱ्या इतर अनेक राक्षसांना बरोबर घेऊन विचक्राला साह्य करण्यासाठीं आला. हे महाराजा, त्याच्या पाठीशीं असलेल्या हातांमध्यें शिला आणि परिघ धारण करणाऱ्या त्या राक्षसांची संख्या ८८००० होती.

अस्तु; श्रीकृष्णावर स्वारी करण्यासाठीं निघालेल्या त्या हंस डिंभकांचें तें प्रचंड सैन्य, राक्षस आणि दैत्य या उभयतांनीं मिश्रित झालेलें होतें. ते सर्व त्रैलोक्याला आश्चर्यचकीत करून सोडणारे अतिशय भयंकर सैन्य अवलोकन करितांच सर्व त्रैलोक्य भयभीत होऊन गेलें. हिडिंब आणि विचक्र या उभयतांना बरोबर घेउन ते हंस आणि डिंभक श्रीकृष्णाला ठार करण्याच्या उद्देशानें वेगानें पुष्कर तीर्थावर चालले. हे राजा, यादवांशीं त्यांचें युद्ध होणार ही बातमी जरासंधाच्या कानीं गेली. तथापि, स्वतःला पाप लागेल असें समजून, युद्धासाठीं गमन करणाऱ्या त्या हंस डिंभकांना त्यानें साह्य केलें नाहीं. इकडे ते सर्व दैत्य अतिशय त्वरेनें गमन करीत करीत पुष्करावर गेले. हे राजा, श्रीकृष्णाकडे जात असतां ते राक्षसभूपति सिंहाप्रमाणें गर्जना करीत होते आणि " मीच अगोदर कृष्णाशीं लढाई करणार " असें परस्परांना म्हणत होते. हे राजा, ते सर्व नृपश्रेष्ठ तपोवृद्ध अशा मुनींनी सेवन केलेल्या अत्यंत कल्याणकारक व सर्व लोकामध्यें आदिभूत अर्थात् अतिशय पुरातन अशा पुष्करतीर्थावर आले. हे पृथ्वीपते, राजा जनमेजया, पुष्करतीर्थ आणि कमलनयन श्रीविष्णु हेच दर्शनाच्या योगानें आणि स्पर्शनाच्या योगानें पापाचें निर्मूलन करणारे आहेत. हे नृपश्रेष्ठा, माहात्मे पुरुष, श्रेष्ठ श्रेष्ठ मुनि आणि देवतांचे समुदाय हे या उभयतांची सेवा करीत असतात. सर्व प्रकारच्या पातकाचा नाश करण्याविषयीं हे दोघेच समर्थ आहेत. त्या उभयतांचें जेथें सानिध्य होतें त्या ठिकाणींच ते सर्व नृपति येऊन राहिले. तेथें त्यांना पुण्याचें वसतिस्थान, ब्राह्मणांनीं सेवन केलेलें पुष्करतीर्थ, आणि अश्वत्थवृक्षाचेठायीं निरंतर वास्तव्य करणारा पापापहारक सर्वश्रेष्ठ श्रीकृष्ण यांचें दर्शन घडलें. हे नृपश्रेष्ठा, तूं त्या उभयतांना अंतःकरणपूर्वक नमस्कार कर त्याठिकाणीं गमन करणाऱ्या प्राण्यास जें जें अभीष्ट असेल तें तें सर्व घडून येतें यामध्यें संशय नाहीं. हे नरपते त्याठिकाणीं प्राप्त झालेलें तें सैन्य [1]भेरी [2]पणव, झर्झरी आणि डिंडिम यांच्या ध्वनीनें व्याप्त होऊन गेलेले होते. त्यामध्यें राक्षसांच्या गर्जनांचा प्रतिध्वनी उमटत होता. हे नरपते, पुष्कर सरोवराच्या तीरावर आल्यानंतर त्या

---

१ भेरी, एकप्रकारचा नगारा, २पणव, गाण्याच्या उपयोगी पडणारे नगाऱ्याच्या आकाराचें एक वाद्य. (शब्दकल्पद्रुम ) झर्झरी, यासच झल्लरी असें नांव आहे. तिची लांबी बारा अंगुलें असून परिघ अठरा अंगुलें असतो. व तोंडाला चामडें लावलेलें असतें तिच्या गळयाशीं दोन भोकें असतात व त्यांत शेवटीं कांटे बांधलेला दोरा आडकवलेला असतो. ही डाव्या हातांत धरून उजव्या हातानें वाजवितात. ( संगीत रत्नाकर ) डिंडिम म्हणजे डिम यासच दौंडी असें म्हणतात. ( अमरविवेक ) झर्झरी यांस झांगड, असें नांव आहे असें अमरविवेककार म्हणतात.

सैन्यानें युद्धासाठीं येऊन ठाकलेला श्रीकृष्ण अवलोकन[1] केला.

## अध्याय एकशें बाविसावा.

—:०:—

### पुष्कर तीर्थावरील संग्राम.

वैशंपायन सांगतातः—राजा जनमेजया, तदनंतर ध्वज फडकत असलेलीं तीं दोन सैन्यें परस्परांना येऊन भिडलीं. मोठमोठे परीघ, गदा, शक्ति, इत्यादि शस्त्रांची त्यांमध्यें गर्दी उडालेली होती. भेरी, झर्झर, डिंडिम इत्यादि वाद्यांचा त्यांमध्यें एकसारखा गजर चाललेला होता. त्या सैन्यांनीं हातांमध्यें शूल, उत्कृष्ट प्रकारचीं खड्गें आणि धनुष्यें इत्यादि मोठमोठीं शस्त्रें घेतलेलीं होतीं व तीं परस्परांमध्यें उत्साह उत्पन्न करीत होतीं. त्या उभय सैन्यामध्यें भयंकर संग्राम सुरू झाला. हे महाराजा, यावेळीं वीरांनीं धनुष्यांतून फेंकलेले ते बाण हजारों मनुष्यांचीं शरीरें फोडून दूर निघून गेले. तसेंच, वीरांनीं आपल्या हातांतून शत्रूंच्या वक्षस्थलावर फेकलेलें खड्ग चमकत जाऊन त्यांचीं मस्तकें उडवून आकाशांत निघून गेले. हे राजा, अनेक नृपतींनीं हातांतून फेकलेले अनेक परिघांनीं नरपतींच्या आणि राक्षसांच्या शरीराचे तिळातिळा एवढे तुकडे होऊन गेले. परस्परांचा वध करण्याची इच्छा करणारे दैत्य यावेळीं गर्जना करूं लागले. हे नृपश्रेष्ठा, दैत्य, राक्षस आणि राजे यांनीं परिघाच्या योगानें परस्परांचा प्राण घेण्याचा चोहोंकडे एकसारखा सपाटा चालविला. दुसरे कांहीं मत्त गजाप्रमाणें धावणारे महाबलाढ्य राक्षस आणि दैत्य सर्पाप्रमाणें आकार असलेले मोठमोठे बाण धनुष्यांतून सोडून इतरांचा वध करूं लागले. हे राजा, धनुष्यांतून सोडलेल्या मोठमोठ्या बाणांनीं परस्परांचा वध होऊं लागला. महाराजा जनमेजया, या वेळीं हत्तीला हत्ती जाऊन थडकले, अश्वाला अश्व जाऊन भिडले, रथाशीं रथ जाऊन धडकले आणि स्वाराशीं स्वार जाऊन भिडले. हे महाराजा, पट्टे, खड्ग, धनुष्याला लावून ओढलेले मोठमोठे बाण, भाले, परिघ, इटे, शक्ति, परशु, आणि भिंदिपाल इत्यादि महाभयंकर आयुधांच्या योगानें त्या सैन्यानें त्या संग्रामांत परस्परांवर प्रहार केले. हे राजा, इकडून तिकडे धांवणारे आणि बेसुर आवाज काढणारे अनेक राक्षस, दैत्य आणि क्षत्रिय यांनीं धनुष्यांतून फेकलेल्या, पाषाणाप्रमाणें कठोर असलेल्या बाणांनीं परस्परांचे प्राण घेतले. हे महाराजा, खड्गाच्या प्रहारामुळें गतप्राण होऊन कित्येक वीर पृथ्वीवर पडले, कित्येक अत्यंत वीर्यशाली योद्ध्यांचीं मस्तकें गदेच्या आघातानें चूर होऊन गेलीं. आणि हे महाराजा, हातामध्यें परिघ संज्ञक आयुध घेणाऱ्या कित्येक वीरांच्या परिघांनीं अनेक लोकांचे कंठ छिन्नभिन्न होऊन गेले. कित्येक यमाच्या राष्ट्रांत गेले, कित्येकांनीं स्वर्गाचा मार्ग सुधारला. कित्येक अप्सरांचा समागम होऊन भूतलावर पडलेलें आपलें प्रेत अवलोकन करूं लागले. कित्येकांनीं भ्रांतिष्ट पुरुषाप्रमाणें परकीयांचा व त्यांच्याच बरोबर स्वकीयांचाही वध केला. हे राजा, या वेळीं त्या सैन्यांत हजारों शंख, दुंदुभि, आणि अनेक मृदंग यांचा ध्वनीं होऊं लागला. त्या वेळीं सूर्य भर दोन प्रहरांवर आला असून अतिशय भयंकरपणें ताप देत होता. तदनंतर

१ येथें " दर्शयामास " असें मूळांत आहे व त्याचा अर्थ सैन्यानें परस्परांस दाखविला असा टीकाकारांनीं केला आहे. परंतु आम्ही तो घेतलेला नाही. चुरादिगण हा आकृतिगण आहे यामुळें दृश्‌धातु त्यांत आहे, असें मानतां येण्यासारखें आहे व म्हणूनच आम्हीं असा अर्थ केला आहे.

हे राजा, भयंकर आणि विस्तृत उदर असलेले बेडौल स्वरूपाचे पिशाच आणि महा भयंकर राक्षस आनंदित होऊन जीं केश-रूपी तृणानें आच्छादित झालेलीं आहेत अशीं मांसें भक्षण करूं लागले, व विपुल रक्तहि प्राशन करूं लागले त्या ठिकाणीं अनेक प्रेतें आणि खड्गप्रहार करून भूमीवर पाडलेले अनेक कबंध ( धडें ) यांचीं अभिवृद्धि झालेली होती. त्यावेळीं त्या प्रेतभक्षक पिशाच्यादिकांनीं त्या संग्रामभूमींतील प्रदेशाचे अनेक विभाग करून घेतले. पिशाच्या प्रमाणेंच त्या ठिकाणीं ससाणे, कंक, गृध्र इत्यादि पक्षि आणि भालू वगैरे पशु प्रेतांना ओढून काढून भक्षण करूं लागले. हे नृपश्रेष्ठा, या वेळीं सत्यायशीं हजार गज आणि दहा लक्ष तीस हजार अश्व गतप्राण झाले. हे महाराजा, एक लक्ष रथांचा त्यांत आरोहण केलेल्या वीरासह चुराडा उडाला. हातांमध्यें शस्त्र घेतलेले तीस कोटी घोडेस्वार अगदीं ठार होऊन गेले. त्या मध्याह्नकालींहि कित्येकांचा वध झाला. कित्येकांनीं समरांगणांतून पळ काढिला. हे राजा, कित्येक तृषाक्रांत झाल्यामुळें पुष्कर सरोवरांत जाउन शिरले. कित्येक भुईसरपट पडले. आणि आम्ही भयभीत झालों आहोंत असें म्हणाले. कित्येक केश सुटलेले वीरांनीं आपल्या रथांचा त्याग करून खालीं उड्या घेतल्या. दांत ओंठ खात असलेले कित्येक अश्वारूढ वीर सैन्याच्या पुढेंच गतप्राण झाले. हे नृपश्रेष्ठा, त्या वेळीं पुष्कर तीर्थावर पूर्वीं देवदैत्यांनध्यें होऊन गेलेल्या संग्रामाच्या तोडीचें प्रचंड युद्ध झालें.

~~~~~~

# अध्याय एकशें तेविसावा.

—:o:—

## विचक्रवध.

वैशंपायन ह्मणाले:—राजा जनमेजया, यानंतर जोडीजोडीनें युद्ध सुरू झालें. शार्ङ्ग-धनुष्य धारण करणारे श्रीकृष्ण विचक्र दैत्याला झुंजवूं लागले. हंसाशीं बलभद्राचा संग्राम सुरू झाला, डिंभकाशीं सात्यकी लढूं लागला. वसुदेव आणि उग्रसेन यांच्याशीं नरमांसभक्षक हिडिंब युद्ध करूं लागला आणि हे नृपश्रेष्ठा, व्याकुल न झालेले इतर अनेक वीर दुसऱ्या अनेक वीरांशीं सामना करूं लागले. पुढें संग्रामामध्यें सर्वांना आश्चर्यचकित करून सोडीत श्रीकृष्णानीं ज्याचे धारेचा अग्रभाग अत्यंत तीक्ष्ण आहे, अशा अनेक बाणांचा त्या दैत्याच्या अर्थात् विचक्राच्या वक्षस्थलावर सर्व प्रहार केला. आकाशामध्यें इंद्रासहवर्तमान देवता हा संग्राम अवलोकन करीत होत्या. त्या वेळीं इंद्राच्या समक्ष त्या विचक्र दैत्यानें एक बळकट आणि तीक्ष्ण असा बाण सोडून आपलें जोरदार धनुष्य कानापर्यंत ओढलें, आणि बाण सोडून श्रीकृष्णाच्या दोहों स्तनांच्या मध्यभागीं प्रहार केला. त्याच्या त्या बाणानें वक्षस्थल विद्ध होतांच विश्वव्यापक भगवान् श्रीकृष्णाच्या मुखांतून सृष्टीच्या आरंभीं ज्याप्रमाणें लोक बाहेर पडले त्याप्रमाणें रक्त बाहेर पडलें. तदनंतर श्रीकृष्णानीं कोपाविष्ट होऊन क्षुराप्रमाणें ( वस्त्रा ) तीक्ष्ण असा बाण सोडून विचक्राचा ध्वज छिन्नविछिन्न करून सोडला आणि चार अश्व आणि सारथी यांना दुसरे तीन बाण सोडून गतप्राण करून टाकिलें. या वेळचा संग्राम हा बृहस्पतीची पत्नि जी तारा तिजसंबंधानें पूर्वीं होऊन गेलेल्या संग्रामाच्या तोडीचा होता.

इतकें झाल्यानंतर श्रीकृष्णानीं आपला प्रचंड
~~~~~~

शंख वाजविला. तेव्हां तो विचक्रदैत्य क्रोधानें अगदीं बेभान होऊन गेला. त्यानें रथांतून एकदम खालीं उडी टाकली आणि जिचा प्रहार सहन होणें अशक्य अशी अत्यंत भयंकर जोरदार गदा घेऊन त्यानें प्रथम श्रीकृष्णाच्या किरीटावर आणि नंतर ललाटावर प्रहार केला व सिंहाप्रमाणें गर्जना केली. पुढें लागलीच त्या दैत्यानें एक प्रचंड शिळा घेतली आणि गदेपेक्षां दसपट गरगरा फिरवून श्रीकृष्णाच्या वक्षस्थलावर फेंकली. ती शिळा आपल्यावर येत आहे असें पाहतांच श्रीकृष्णानीं हातानें धरली आणि तीच उलट फेंकून त्या दैत्याला प्रहार केला. त्यामुळें तो दैत्य पीडित होऊन भूमीवर पडला. तो गतप्राण झाल्यासारखा भासूं लागला. आणि श्वासोच्छ्वास करीत पडला. कांहीं वेळानें शुद्धि आल्यानंतर तो दैत्य कोपाविष्ट झाला त्यामुळें तो पूर्वीपेक्षां दुप्पट चमकूं लागला. त्यानें हातांत परिघ घेतलें आणि श्रीकृष्णाला म्हटलें 'कृष्णा, या परिघाच्या योगानें मी तुझा सर्व गर्व समूळ नष्ट करून टाकतों. कृष्णा, देवदैत्यांमध्यें संग्राम झाला त्या वेळेचा माझा पराक्रम तुला अवगत आहे. सांप्रतही माझे त्या वेळचे तेच विशाल बाहु असून मीही तोच आहें, हें तुला माहीत नाहीं असें नाहीं. तथापि, माझ्या सामर्थ्याचें ज्ञान असूनही हे वीरा, तूं माझ्याशीं संग्राम करीत आहेस. अस्तु; हे महाबाहो, आतां माझ्या हातांतून सुटलेल्या या परिघाचें निवारण कर, असें बोलून त्या दैत्यानें सर्व लोकांसमक्ष, शंख, चक्र, गदा धारण करणाऱ्या देवाधिदेव लोकनायक श्रीकृष्णावर तो परिघ फेंकला. पण, श्रीकृष्णानीं, " ठीक आहे, आतां तूं ठार झालासच असें समज " असें म्हणत म्हणत, तो परीघ आपल्या हातानें धरला आणि तीक्ष्ण खड्गाच्या योगानें त्याचे तुकडे तुकडे करून सोडले. तेव्हां दैत्याधिपति विचक्र यानें शेंकडों फांद्या आणि विशाल अग्रभाग असलेला एक वृक्ष उपटून हातांत घेतला व त्याच्या योगानें सामर्थ्यसंपन्न अशा श्रीकृष्णाला चेंचून काढण्याचा उपक्रम केला. पण, श्रीकृष्णानीं आपल्या खड्गाच्या योगानें त्याचेही तिळातिळा एवढे तुकडे करून सोडले. याप्रमाणें बराच वेळ त्या दैत्याशीं क्रीडा केल्या नंतर श्रीकृष्णानीं त्या दैत्याचा वध करण्याचें मनांत आणिलें. त्या महात्म्या श्रीकृष्णानीं एक तीक्ष्ण बाण घेतला आणि आग्नेय अस्त्राची योजना करून त्याचा त्या दैत्यावर प्रहार केला. सर्व लोक हें पहात आहेत, तोंच तो बाण त्या दैत्याला भस्म करून पूर्वीप्रमाणेंच श्रीकृष्णाच्या हातामध्यें परत येऊन राहिला. याप्रमाणें विचक्राचा वध झाल्यानंतर त्याच्या सैन्यांतील अवशिष्ट राहिलेले दैत्य दशदिशा पळूं लागले. ते जे त्या वेळीं महासागराकडे निघून गेले, ते अद्यापीही परत फिरले नाहींत.

## अध्याय एकशें चोविसावा.

—:०:—

### हंस आणि बलराम यांचा संग्राम.

वैशंपायन म्हणाले:—इकडे वीरश्रेष्ठ धर्मनिष्ठ बलरामानेंही तत्काल धनुष्य घेतलें आणि हंसावर दहा बाण फेंकले. तेव्हां हंसानें बलरामाला उलट विद्ध करून सोडण्याच्या उद्देशानें पांच शीघ्रगामी बाण सोडले. पण, बलरामानें दहा बाण सोडून मध्यंतरीच त्यांचे तुकडे करून सोडले. आणि तत्काल जोरानें एक बाण हंसाच्या ललाटावर मारून हंसाला विद्ध केलें. त्या बाणानें जोरानें येतांयेतांच हंसाची शुद्धि हरण केली. अर्थात् तो रथाच्या मध्यभागीं बराच वेळ मूर्छित होऊन पडला.तद-

नंतर शुद्धीवर येऊन त्यानें भात्यांतून एक बाण काढून घेतला. आणि त्याच्या योगानें यादव-श्रेष्ठ बलरामाला विद्ध करून सिंहाप्रमाणें गर्जना केली. संग्रामामध्यें त्यानें केलेल्या या कृत्याचे योगानें देव देखील आश्चर्यचकीत होऊन गेले. त्याच्या बाणानें विद्ध होतांच बलराम कढत कढत रक्त ओकीत श्वास टाकीत त्या रणांगणांत पडला. रक्तानें शरीर व्याप्त झाल्यामुळें तो केशराच्या पाण्यानें अंग भिजल्यासारखा दिसूं लागला. दैत्याच्या बाणानें विद्ध झाल्यामुळें त्याला अतिशय कोप आला. तेव्हां लक्षावधी बाण सोडून, नीलवस्त्र परिधान करणाऱ्या त्या बलरामानें हंसाप्रमाणें गति असलेल्या त्या वीर्यसंपन्न हंसाला पीडित करून सोडलें. बलरामानें सोडलेल्या अत्यंत वेगानें जाणाऱ्या त्या भयंकर तीक्ष्ण बाणांनीं, हे राजा, हंसाच्या रथावर, ध्वजावर, धनुष्यावर, चक्रावर, आणि बाणांच्या दोहीं भात्यांवर सर्व बाजूनीं झडप घालून हंसाला पीडित करून सोडलें. तेव्हां हे महाराजा, वीर्यमदानें धुंद होऊन गेलेल्या प्रसंगोचित कार्य जाणणाऱ्या त्या हंसाला कोप आला. त्यानें एक बाण सोडून बलरामाला विद्ध केलें. दुसऱ्या बाणानें त्याचा ध्वज छिन्नविच्छिन्न करून सोडला आणि दुसरे चार बाण सोडून त्याच्या सारथ्यास यमाला अर्पण केले. तेव्हां कोपाविष्ट होऊन महाबाहु बलरामानें हातांमध्यें गदा घेतली. आणि शेषाप्रमाणें फूत्कार करीत हंसावर चाल केली. त्यानें त्या गदेच्या योगानें हंसाच्या रथाचे, ध्वजाचे, चक्राचे, अश्वांचे आणि सारथ्यांचें तिळतिळा एवढे तुकडे करून टाकले. आणि वारंवार गर्जना केली. इतकें झाल्यानंतर त्या बलाढ्य बलरामानें हंसावर गदाप्रहार केला. तेव्हां हंसानेंही हातांत गदा घेतली आणि रथांतून खालीं उडी टाकली. तदनंतर त्या प्रचंड समरांगणामध्यें पराक्रमानें सुप्रसिद्ध असलेले अत्यंत शौर्यसंपन्न महारथी बलराम आणि हंस युद्ध करूं लागले. परस्परांचा वध करूं इच्छिणाऱ्या त्या हंसाप्रमाणें गति असलेल्या त्या वीरांनीं त्या प्रचंड संग्रामामध्यें गाजविलेला उत्कृष्ट प्रकारचा पराक्रम सर्वांना आश्चर्यचकित करून सोडणारा होता. पूर्वी जेव्हां देव आणि दैत्य यांमध्यें संग्राम झाला तेव्हां आकाशामध्यें ज्याप्रमाणें इंद्र आणि वृत्र हे परस्परांचा पराजय करण्याचा प्रयत्न करीत होते, त्याप्रमाणेंच हेही करीत होते. त्या भयंकर संग्रामांत त्या उभयतांचें सर्वांग रक्तानें व्याप्त होऊन गेलेलें होतें. परस्परांच्या सामर्थ्यामुळें त्या उभयतांना अत्यंत श्रम होत होते. पुढें हे नृपश्रेष्ठा, बलराम उजविकडच्या मार्गानें चालू लागून व हंस डावीकडच्या मार्गाचा आश्रय करून संग्राम करूं लागला. गजाप्रमाणें गति असलेल्या त्या उभयतांनीं गदेच्या योगानें परस्परांना चेंचून काढिलें आणि परस्परांचे प्राण घेण्यासाठीं शक्य तितक्या जोरानें परस्परांवर प्रहार केले. पूर्वी देवदैत्यांमध्यें चाललेल्या संग्रामाच्या तोडीचें हें अतिशय विकोपास गेलेलें त्याचें युद्ध त्या विशाल समरांगणांमध्यें सुरू होतें. या वेळीं अवलोकन करीत असलेल्या देवता आणि ऋषि आश्चर्यचकित होऊन गेले. "अहो, अशा प्रकारचें युद्ध पूर्वी कधीं आमच्या पहाण्यांत आलेलें नाहीं; इतकेंच नव्हे, ऐकण्यांतही आलेलें नाहीं." अशा प्रकारचे उद्गार आश्चर्यामुळें देव, गंधर्व आणि किन्नर यांच्या मुखांतून निघूं लागले. ते उभयतां वीर परस्परांना चेतवीत, उत्कृष्ट प्रकारचें युद्ध करीत होते. यानंतर त्या विशाल रणांगणामध्यें अत्यंत चतुर हंस उजव्या बाजूनें व बलाढ्य बलराम डाव्या बाजूनें एकसारखा फिरूं ला-

गला. त्या उभयतां वीरांनीं आपले गुढघे जरा वांकविलेले होते. आणि देव अवलोकन करीत असतां त्या उत्कृष्ट संग्रामपटूनीं गदेच्या योगानें परस्परांवर अतिशय प्रहार केले.

## अध्याय एकशें पंचविसावा.

—:०:—

### सात्यकी आणि डिंभक याचा संग्राम.

वैशंपायन म्हणाले:—राजा जनमेजया, पुढें क्षत्रियांमध्यें प्रसिद्ध असलेले बलाढ्य वीर सात्यकी आणि डिंभक परस्परांमध्यें पराकाष्ठेचें युद्ध करूं लागले.त्या उभयतांनींही प्रचंड संग्रामाविषयीं चांगले श्रम केले होते व ज्ञानवृद्ध अशा लोकाची सेवाही केली होती. अस्तु; वीर्यसंपन्न सात्यकीनें वेदांमध्यें पारंगत असलेल्या डिंभकाला त्याच्या मुखावर आणि छातीवर दहा तीक्ष्ण बाण सोडून विद्ध केलें. तेव्हां युद्धाविषयींचा ताठा असलेल्या क्षत्रियश्रेष्ठ बलाढ्य डिंभकानेंहि पांच हजार बाण सोडून सात्यकीला विद्ध केलें. पण, यादववीर सात्यकीनें गर्जनेच्या रूपानें निषेध करीत ते बाण मध्यंतरींच छिन्नविछिन्न करून टाकले. आणि सात बाण डिंभकाच्या शरीरांत मारले. तेव्हां त्या नृपश्रेष्ठानें कोपाविष्ट होऊन एक लक्ष बाण उलट सात्यकीच्या शरीरांत भोंसकले. हें पाहून पराक्रमशाली यदुकुलोत्पन्न सात्यकीनें अर्धचंद्रसंज्ञक बाण सोडून डिंभकाचें धनुष्य तोडून टाकलें. तेव्हां वीर्यशाली डिंभकानें दुसरें एक धनुष्य घेतलें आणि तेल लावून धार दिलेल्या वस्ताऱ्यासारखी तीक्ष्ण धार असलेला एक भयंकर बाण सात्यकीच्या शरीरांत भोंसकला. त्यामुळें सात्यकी रक्त ओकूं लागला. हे राजा, या वेळीं तो सात्यकी वसंतऋतूमध्यें फुललेल्या पळसाप्रमाणें अतिशय शोभत होता. पुढें लागलीच त्यानें, त्या डिंभकानें फिरून हातीं घेतलेल्या त्या धनुष्याचे तुकडे करून सोडले. पण, डिंभकानें फिरून दुसरें धनुष्य घेतलें आणि पहात असलेल्या सर्व क्षत्रियांच्या समक्ष सात्यकीवर तीक्ष्ण बाणांचे प्रहार केले. पण, सात्यकीनें तीक्ष्ण पुंख असलेला एक बाण सोडून त्या युद्धांत त्या दुष्ट डिंभकाचें तें प्रचंड धनुष्यही तोडून टाकलें. तथापि, हे नृपश्रेष्ठा, त्या भूपश्रेष्ठ डिंभकानें तत्काल दुसरें धनुष्य घेऊन त्याच्या साह्यानें सात्यकीला विद्ध करून सोडलें.

हे राजाधिराज, अशा प्रकारें त्या डिंभकाचीं एकशें दहा धनुष्यें सात्यकीनें पहाणाऱ्या सर्व क्षत्रियांच्या समक्ष तोडून टाकलीं. पुढें ते डिंभक आणि सात्यकी हे उभयतां वीर धनुष्यें टाकून देऊन आणि अतिशय भयंकर खड्ग हातांमध्यें घेऊन परस्परांशीं युद्ध करावयास येऊन ठाकले. राजा जनमेजया, डिंभक आणि सात्यकी हे वीर खड्गप्रयोगाचें ज्ञान असलेल्या लोकांमध्यें श्रेष्ठ होते. हे राजा, महाभाग्यशाली दुःशासनाचा पुत्र, सोमदत्ताचा पुत्र, पराक्रमशाली अभिमन्यु, आणि नकुल हे चार आणि डिंभक आणि सात्यकी हे दोन, मिळून सहा वीर युद्धामध्यें खड्गप्रयोग करण्याचें उत्कृष्ट ज्ञान असलेल्या लोकामध्यें श्रेष्ठ होत. त्यांतही, हे नृपश्रेष्ठा, सात्यकी आणि डिंभक हे उभयतां श्रेष्ठ होत. युद्धाची अत्यंत इच्छा असलेल्या त्या उभयतां वीरांनीं खड्गयुद्ध केलें. भ्रान्त, उद्भ्रांन्त, आविद्ध, प्रविद्ध, बाहुनिसृत, आकर, विकर, भिन्न, निर्मर्याद, अमानुष, संकोचित, कुलचित, सव्य, जानु, विजानु, आहित, चित्रक, क्षिप्त, कुद्रव, लवण, धृत, सर्वबाहु, विनिर्बाहु, सव्येतर, उत्तर, त्रिबाहु, उत्तुंगबाहु, सव्योन्नत, उदासी, पृष्ठतः प्रथित, यौधिक, आणि प्रथित अशा प्रकारचें खड्ग-

युद्धाचे बत्तीस प्रकार त्या खड्गयुद्ध करणाऱ्या उभयतां वीरांनीं केले. त्यांनीं परस्परांवर वारंवार प्रहार केले. तथापि, हे महाराजा, युद्धाविषयीं दृढनिश्चय असल्यामुळें पुष्करावर असलेल्या त्या उभयतां वीरांना बिलकुल श्रम झाले नाहींत. तेव्हां, हे महाराजा, देव, गंधर्व, सिद्ध आणि मुनिश्रेष्ठ, यांनीं परस्परांचा पराजय करण्याविषयीं परिश्रम करीत असलेल्या त्या उभयतां वीरांची प्रशंसा केली. ते म्हणाले, अहाहा, काय हें वीर्य आणि काय या पराक्रमी वीरांचें धैर्य. खरोखर संग्रामाविषयीं समर्थ आणि खड्ग व धनुष्य यांच्या उपयोगामध्यें पारंगत असे हेच दोघे आहेत. त्यांपैकीं एक, अर्थात् डिंभक, हा श्रीशंकराचा आणि दुसरा अर्थात सात्यकि हा बुद्धिमान् अशा द्रोणाचार्याचा शिष्य आहे, हे महाराजा, अर्जुन, सात्यकी, आणि जगन्नायक श्रीकृष्ण हे तिघेच युद्धक्रियेविषयीं सर्वदा प्रसिद्ध आहेत आणि डिंभक, कार्तिकेय व श्रीशंकर हे महारथ म्हणून प्रसिद्ध आहेत. या सर्वांचीच वीर्यासंबंधानें व सामर्थ्यासंबंधानें प्रसिद्धि आहे. याप्रमाणें युद्धाच्या अवलोकनाच्या उत्कट इच्छेनें आकाशांत उभे असलेले ते देव, गंधर्व, सिद्ध, यक्ष, आणि महासर्प एकसमयावच्छेदें करून म्हणूं लागले.

## अध्याय एकशें सव्विसावा

—:o:—

### हिंडिबपराभव.

वैशंपायन सांगतातः—राजा जनमेजया, अत्यंत सुखी, युद्धाचा पुष्कळ आनुभव मिळविलेले, वार्धक्याच्या योगानें सर्व शरीर जर्जर झालेले, सर्वांगावर पांढरेपणा आलेले, आनुभविक आणि शास्त्रीयज्ञान असलेले, आणि नृपतींच्या आचरणमार्गांमध्यें चतुर असलेले, वसुदेव आणि उग्रसेन हे उभयतां यादव त्या युद्धरूपी प्रचंड रंगभूमीवर दुष्ट अंतःकरणाच्या हिंडिब नामक राक्षसाशीं संग्राम करूं लागले. त्यांनीं हजारों बाण सोडून त्या नरभक्षक राक्षसश्रेष्ठ दुष्ट हिंडिबाला चेंचून काढिलें. राक्षसश्रेष्ठ हिंडिब हा त्या संग्रामांत चोहोंकडे मनुष्यांना भक्षण करीत होता. तो दुष्ट एकदम फार वाढला. या वेळीं त्याचे बाहु लांब, हनुवटी विशाल, उदर मोठें, नेत्र भेसुर असून पिंगट, केश पिंगट, आणि नासिका ससाण्यासारखी होती. तो फार भयंकर दिसत होता. त्याचे केश ताठलेले होते व बाहु फार विशाल होते. त्याचें शरीर पर्वतासारखें धिप्पाड असून दाढा लांब आणि तोंड कोल्ह्यासारखें होतें. तो जणूं सर्व जग भक्षण करण्यासाठीं उद्युक्त झाला आहे कीं काय, असें भासत होतें. त्याची छाती विशाल, स्कंदप्रदेश उंच, आणि मान लांब असून तो एखाद्या हत्तीप्रमाणें मदोन्मत्त झालेला होता. तो पेटारेच्या पेटारे भरतील इतकें मांस भक्षण करीत होता. व विपुल रक्त प्राशन करीत होता. हे राजा, त्यानें अनेक हत्ती घेऊन हत्तींवर, अनेक अश्व अश्वांवर, रथ रथांवर आणि स्वार स्वारांवर आपटून नाहींसे करून टाकले. तो मनुष्याला पुढें पहातांच केवळ नासिकेच्या श्वासानेंच त्याचा संहार करून टाकीत असे. हे महाराजा, त्या नरमांसभक्षक हिंडिबानें चोहोंकडे असलेले यादवांचे अनेक सरदार आपल्या घशाखालीं उतरले. जे जे म्हणून पुढें दिसले त्यांना त्यांना त्या भेसुरस्वरूपी राक्षसानें गतप्राण करून सोडलें. त्या नरमांसभक्षक हिंडिबानें इतरही अनेक याद-

१ तरवारीचे हात करण्याच्या या प्रकारांपैकीं तेरा प्रकार महाभारतात पूर्वी येऊन गेले आहेत इतरांचा अर्थ कळणें साधनांच्या अभावामुळें अशक्य आहे.

वांना एकदम धरून फेंकून दिलें. आणि, हे राजा, ज्याप्रमाणें प्रलयकालीं कोपाविष्ट झालेला रुद्र सर्व प्राण्यांना भक्षण करितो, त्याप्रमाणें त्या राक्षसानें एका क्षणांत त्या सर्वांना भक्षण करून सोडलें. त्या वेळीं अत्यंत वीर्यशाली असेही कित्येक यादव दाही दिशा पळून गेले. व ज्याप्रमाणें कुंभकर्णानें वानरांना त्याप्रमाणें त्यानें कित्येक यादवश्रेष्ठांना भक्षण करून सोडलें.

अशा रीतीनें त्या मनुष्यभक्षकानें तें सर्व यादवसैन्य नष्टप्राय करून सोडलें. यामुळें अवशिष्ट राहिलेलें यादवसैन्य चित्रफलकावर काढलेल्या चित्राप्रमाणें निश्चेष्ट होऊन राहिलें. त्या वेळीं ते यादवश्रेष्ठ वृद्ध वसुदेव आणि उग्रसेन हे उभयतां क्रुद्ध झाले आणि अत्यंत भयंकर धनुष्य हातीं घेऊन कोपाविष्ट झालेल्या सिंहासमोर जाऊन ठाकणाऱ्या अत्यंत वृद्ध हरिणांप्रमाणें त्या राक्षसाच्या पुढें जाऊन उभे राहिले. ते पहातांच तो प्रचंड राक्षस तोंडाचा जबडा पसरून त्या वृद्धांवर धांवला. त्यांना भक्षण करावें अशी त्याची इच्छा होती. त्या भेसुर दृष्टि असलेल्या राक्षसाचें तोंड पाताळाप्रमाणें दिसत होतें. तदनंतर तो राक्षस सैन्यांतील पुरुषांचीं शरीरें भक्षण करीत करीत धाऊं लागला. तेव्हां, हे राजा, त्या उभयतां वीर यादवश्रेष्ठांनीं बाणांचा वर्षाव करून, जबडा पसरलेल्या यमाप्रमाणें अतिशय भयंकर दिसणाऱ्या त्या हिडिंबाला व्याप्त करून सोडलें. पण बेडौल शरीर असलेला व तोंड पसरलेला तो भयंकर देवशत्रु राक्षस ते सर्वही बाण भक्षण करून धांवूं लागला. तेव्हां त्या वेडेंवांकडें तोंड असलेल्या दुष्ट राक्षसानें त्या उभयतांचीं धनुष्यें तोंडांत टाकून मोडून टाकिलीं. आणि, हे राजा, तो राक्षसश्रेष्ठ सर्व राजांच्या मध्यभागीं असलेल्या, वृद्धांची सेवा करणाऱ्या, पृथ्वीपालक वसुदेवाला धरण्यासाठीं दोन्ही हात पसरून प्रयत्न करूं लागला. हिडिंब म्हणालाः—हे उग्रसेना, तुला आणि वसुदेवाला अशा उभयतांनाही मी भक्षण करून टाकीन. तूं मजपुढें कशासाठीं उभा राहिला आहेस ? ये, ये. शीर माझ्या तोंडांत. तुम्ही दोघेही माझे दोन घांसच आहांत. ब्रह्मदेवानें निर्माण केलेला कृष्णाचा पिता वसुदेव हा वृद्ध असून युद्धामध्यें त्वरेनें गमन केल्यामुळें श्रमानें थकून गेला आहे. आणि क्षुधाक्रांतही झाला आहे. तथापि तुम्हां उभयतांना माझ्या तोंडांतून बाहेर पडतां यावयाचें नाहीं. तुम्ही सत्वर माझ्या मुखांत प्रवेश करा. तुम्हां उभयतांचें रक्त प्राशन करून मी तृप्त आणि सुखी होईन. आणि नंतर तुम्हां उभयतां वृद्धांचें मांस खुशाल खात बसेन. असें म्हणत म्हणत तो प्रचंड हनुवटी असलेला राक्षसाधिपति हिडिंब जबडा पसरून वेगानें इकडे तिकडे धावूं लागला. तेव्हां वसुदेव आणि उग्रसेन या उभयतां यादवश्रेष्ठांनीं हातीं शस्त्र नसल्यामुळें भयभीत होऊन, हे राजा, चोहोंकडे दृष्टि फेंकली आणि शेवटीं संग्रामांतून पळ काढला.

इतक्यांत ही गोष्ट पराक्रमशाली बलरामाच्या दृष्टोत्पत्तीस आली. तेव्हां वसुदेव आणि उग्रसेन या उभयतांची ती झालेली स्थिति अवलोकन करून आणि आपल्याशीं युद्ध करणाऱ्या हंसाशीं ऐश्वर्यसंपन्न अशा श्रीकृष्णाची योजना करून बलराम तेथून निघाला आणि त्या दुष्ट राक्षसाच्या समीप आला. आणि त्याला म्हणाला, 'अरे राक्षसा, उगीच धाडस करूं नकोस. या उभयतां नृपश्रेष्ठांस सोडून तुला जर शत्रूचा निःपात करण्याची इच्छा असेल तर हा मी तुझ्यापुढें उभा आहें, कर माझ्याशीं दोन हात. मीच तुला ठार करीन.

कशाला पाहिजे तुझी ही दरडावणी. याप्रमाणें बलराम बोलत असतां तो राक्षस त्या प्रचंड संग्रामामध्यें त्या उभयतांना ( वसुदेव आणि उग्रसेन ) यांना सोडून देऊन "हा, फार दुष्ट आहे. तेव्हां यालाच अगोदर तोंडांत टाकला पाहिजे." असें म्हणून पूर्वीप्रमाणेंच जबडा पसरून बलरामावर धांवला. तेव्हां बलराम धनुष्य आणि बाण फेकून देऊन मूठ वळवून राक्षसाच्या पुढें येऊन छड्डू ठोकीत उभा राहिला. तदनंतर अंतःकरण दुष्ट असलेल्या व जबडा पसरलेल्या यमाप्रमाणें दिसणाऱ्या हिडिंबानें भयंकर मूठ वळवून बलरामाच्या वक्षस्थलावर प्रहार केला. तेव्हां त्याच्या मुष्टिप्रहारानें क्रुद्ध होऊन निर्दोष अशा बलरामानेंही त्या राक्षसाधिपतीला मुष्टीनें आघात केला. तेव्हां त्या राक्षस आणि मनुष्य या उभय जातींतील दोहों वीरांमध्यें मुष्टियुद्धाला सुरवात झाली. त्या युद्धरूपी रंगभूमीवर ते उभयतां नरवीर आणि राक्षसवीर संग्राम करूं लागले असतां चट् चट् असा भयंकर आवाज होऊं लागला. तदनंतर ज्याप्रमाणें इंद्रानें वज्रप्रहार करावा त्याप्रमाणें त्या संग्रामांत त्या राक्षसाधिपतीनें बलरामाच्या वक्षस्थलावर मुष्टिप्रहार केला. तेव्हां सामर्थ्यसंपन्न बलरामानेंही जोरानें मूठ वळवून देवांशीं द्वेष करणाऱ्या हिडिंबाच्या हृदयप्रदेशावर प्रहार केला. आणि दोन्ही तळहातांनीं त्याच्या तोंडांत लगावल्या. त्याच्या तळहाताचे आघात लागतांच राक्षसाधिपति हिडिंब गुडघे टेंकून भूमीवर पडला. आणि गतप्राण झाला. तेव्हां बलरामानें दोहोंहातांनीं धरून त्या राक्षसाला हातांनीं हिसका देऊन उचललें. आणि स्वतःचें सामर्थ्य प्रदर्शित करण्याचे उद्देशानें शक्य तितक्या जोरानें गरगरां फिरवून त्याला या ठिकाणाहून त्या ठिकाणीं आणि त्या ठिकाणाहून या ठिकाणीं नेऊन आपटलें. पुढें सर्व लोकांदेखत बलरामानें त्या राक्षसश्रेष्ठाला उचलून दोन कोस दूर फेंकून दिलें. तेव्हां त्या ठिकाणीं शुद्धीवर येऊन तो राक्षसाधिपति निघून गेला. त्याला बेशुद्ध करून फेंकून दिल्यानंतर त्या प्रचंड संग्रामामध्यें जे कोणी राक्षस अवशिष्ट राहिले होते ते बलरामाच्या भीतीनें दशादिशा पळून गेले.

इतकें झाल्यानंतर आपला प्रकाश आंवरून भगवान् सूर्य अस्ताला गेला. आणि सर्व लोकांच्या दृष्टी अंधकारानें व्याप्त करून टाकल्या. सर्व ब्रह्मांडामध्यें श्रेष्ठ, सर्व जगताचा केवळ जनक व प्रजापालक सूर्य समुद्रजलामध्यें प्रविष्ट झाल्यानंतर, हे नरश्रेष्ठा, नक्षत्राधिपति चंद्र उदय पावला व त्यामुळें संध्याकालीन अंधःकार नष्ट होऊन गेला. तेव्हां हे राजा, आतां उद्यां प्रभातकालीं किन्नरांच्या गीतध्वनीनें व्याप्त असलेल्या गोवर्धन पर्वतावर युद्ध होईल, असें सांगून त्या वेळीं तेथें असलेल्या नृपश्रेष्ठांनीं त्या युद्धमहोत्सवाचें काम बंद ठेविलें.

## अध्याय एकशें सत्ताविसावा.

—:०:—

### श्रीकृष्ण आणि हंस यांचा संग्राम.

वैशंपायन म्हणालेः—हे मनुष्यपालका राजा, ते उभयतां हंस आणि डिंभक मिळून त्या रात्रींच प्रचंड अशा गोवर्धन पर्वतावर गेले. तिकडे प्रभातकालची स्वच्छ प्रभा पडून पुढें सूर्योदय झाला असतां केशिदैत्यनाशक श्रीकृष्णही शीघ्र निघून गोवर्धन पर्वतावर गेले. हे राजा, त्यांच्याच बरोबर सात्यकी, बलराम आणि सारणप्रभृति यादव ज्याच्यावर गंधर्व आणि अप्सरा यांचा अनेक प्रकारचा ध्वनी घुमून राहिला आहे, अशा गोवर्धन

पर्वतावर गेले. हे नृपश्रेष्ठा, यादव त्या पर्वताच्या उत्तरेकडील बाजूस गेल्यानंतर यमुनेच्या जवळच हंस, डिंभक आणि यादव यांच्यामध्यें युद्धाला सुरवात झाली. त्या वेळीं वसुदेवानें हंस आणि डिंभक यांच्या शरीरांत सात बाण भोंसकले. सारणानें त्याजवर पंचवीस बाण सोडले. कंकानें दहा बाणांनीं त्यांना विद्ध केलें. उग्रसेनानें निमुळत्या पेरांचे ऱ्याहत्तर बाण सोडून त्याजवर प्रहार केला. तसेंच हे राजा, विराटानें तीस, सात्यकीनें सात, विपृथूनें ऐशीं, उद्धवानें दहा, प्रद्युम्नानें तीस, सांबानें सात, आणि अनाधृष्टीनें निमुळत्या पेरांचे एकसष्ट बाण त्यांजवर फेंकले. अशा रीतीनें, हे राजा, त्या सर्वही यादवांनीं मिळून त्या दोघांबरोबर सर्वांना आश्चर्यचकित करून सोडणारें अत्यंत भयंकर जोराचें युद्ध केलें. त्या वेळीं श्रीकृष्ण तें पहात होते. तदनंतर, हे महाराजा, त्या हंस व डिंभक या उभयतांनींही स्वतःच्या सामर्थ्यानें चढून गेलेले जे यदुकुलोत्पन्न राजे त्या सर्वांनाही उलट विद्ध करून सोडलें त्यांनीं आपलें लवचिक परंतु तीक्ष्ण अशा दहा दहा बाणांनीं प्रत्येकाला विद्ध करून त्या सर्व यादवांचा अतिशय संहार चालविला. तेव्हां ते सर्वही यादव पीडित होऊन अतिशय रक्त ओकूं लागले व भीतीनें सैरावैरा धांवूं लागले. त्या वेळीं, हे राजा, वैशाखमासी फुललेल्या पळसाप्रमाणें ते शोभूं लागले. हे राजा, वसुदेवपुत्र श्रीकृष्ण आणि बलराम हे उभयतां हातांत धनुष्य घेऊन त्या उभयतांच्या समोर गेले. आणि आकाशामध्यें युद्ध करणारे कार्तिकेय आणि इंद्र यांच्याप्रमाणें तुंबळ युद्ध करूं लागले. त्यांचें तें पूर्वीं देवदैत्यांमध्यें झालेल्या संग्रामाच्या तोडीचें युद्ध सिद्ध, यक्ष, गंधर्व आणि महर्षि विमानांतून अवलोकन करूं लागले.

तदनंतर, हे राजा, त्या बलाढ्य हंस आणि डिंभकाच्या संरक्षणार्थ श्रीशंकरांनीं पाठविलेले दोन भूताधिपति दूत संग्रामामध्यें प्रकट झाले. या वेळीं सामर्थ्यसंपन्न श्रीकृष्ण आणि हंस युद्ध करूं लागले असून बलराम आणि डिंभक हे संग्रामार्थ परस्परांस भिडले होते. हे सर्वही जण शस्त्र, अस्त्र आणि सामर्थ्य यांमध्यें सारखेच होते. त्या सर्वही जणांनीं आपआपल्या रथांत बसून शंख वाजविले. जितेंद्रिय, कमललोचन श्रीकृष्णांनींही शंख फुंकून सर्वांना आश्चर्यचकित करून सोडलें. यानंतर, हे महाराजा, लांब उदर असलेलीं तीं दोन महा भयंकर भूतें हातीं शूल घेऊन श्रीकृष्णावर धांवलीं; आणि शूलानें श्रीकृष्णाला चेंचून काढूं लागलीं. गंधर्वांच्या समीप याप्रमाणें आपल्यावर त्यांचे प्रहार होऊं लागल्यानंतर श्रीकृष्णाच्या अधरावर किंचित् हास्य झळकूं लागलें. रथिश्रेष्ठ दीप्तिशाली श्रीकृष्णांनीं तत्काल रथांतून खालीं उडी टाकली. आणि त्या उभयतांना धरून एखाद्या जळक्या लांकडाप्रमाणें शंभर वेळ गरगरां फिरवून कैलासाकडे फेंकून दिलें. तेव्हां, हे महाज्ञानी राजा, ते उभयतां कैलासाच्या शिखरावर जाऊन पडले. तें श्रीकृष्णाचें कर्म पहातांच हंसाचे डोळे रागानें लाल होऊन गेले, आणि तो भाषण करूं लागला. त्याचें तें भाषण सर्व देव ऐकत होते. तो म्हणाला, ' कृष्णा, राजसूययज्ञाला विघ्न काय म्हणून करतो आहेस ? पृथ्वीपति ब्रह्मदत्त तो महान् यज्ञ करणार आहे; तेव्हां जर तुला स्वतःच्या प्राणरक्षाची इच्छा असेल तर योग्य प्रकारें कर दे. नाहीं तर एक क्षणभर संग्रामाला उभा रहा म्हणजे आपला शत्रु आपल्याहून जबरदस्त आहे असें, हे नंदाच्या पोरा, तुला कळून येईल. व तूं आपसुखानेंच

कर देशील आणि नंतर माझा पिता यज्ञ करील. ज्याप्रमाणें श्रीशंकर देवांचे त्याप्रमाणें मी सर्व राजांचा सदैव अधिपति आहें. हा पहा मी आतां या लढाईत तुझ्या त्या अद्वितीय सामर्थ्याचा फडशा पाडतों.' असें म्हणून, हे राजा, त्यानें शालवृक्षासारखे लांबलचक असें धनुष्य घेऊन बाण लावून शक्य तितक्या जोरानें ओढलें आणि तो बाण श्रीकृष्णाच्या ललाटावर फेंकला. त्यामुळें श्रीकृष्णास पीडा तर झालीच नाहीं, पण उलट तो बाण श्रीकृष्णाच्या भालप्रदेशावर एक तिलकच होऊन राहिला. तेव्हां श्रीकृष्ण सात्यकीला म्हणाले, हे समर्था, दारुकाला पाठीमागें बसवून तूंच माझा रथ हांक.

याप्रमाणें श्रीकृष्णाची आज्ञा होतांच सात्यकी रथ हांकीत हांकीत मोठ्या त्वरेनें त्या संग्रामांत अनेक मंडळें कढून दाखवूं लागला. त्या वेळीं हंसानें एक बाण सोडून ऐश्वर्यसंपन्न श्रीकृष्णाला जोरानें विद्ध करून सोडलें. तेव्हां, हे राजेंद्रा, अविनाशी श्रीकृष्णानें सात्यकीला प्रेरणा करीत करीत एका बाणावर आग्नेयास्त्राची योजना केली. आणि हंसाला म्हटलें 'अरे दुष्टा, या बाणानें मी तुला भस्म करून टाकतों. असेल शक्ति तर कर प्रतीकार. अरे लुच्चा, निष्कारण फाजील बडबड करूं नको; तूं क्षत्रिय आहेस. माझ्याकडून कर घेण्याची इच्छा असेल तर दाखीव आज आपला पराक्रम. हंसा, तूं पुष्कर तीर्थावर वास्तव्य करणाऱ्या यतींना पीडा दिलेली आहेस. हे नराधमा, मी जगन्नायक जीवंत असतां तूं ब्राह्मणांना शिक्षा केलीस, आं! ब्रह्मद्वेष करणाऱ्या दुष्ट क्षत्रियरूपी कंटकांचा फन्ना उडवून मी सज्जनांचें पालन करणार आहें. अरे अधमराजा, यतिश्रेष्ठांच्या शापानेंच तुझे प्राण गेलेले आहेत. तथापि केवळ निमित्तभूत म्हणून मी आज तुला मृत्यूच्या हवालीं करून ब्राह्मणाचें संरक्षण करणार आहें.' असें बोलून श्रीकृष्णांनीं युद्धामध्यें तें अस्त्र सोडलें. पण वारुणास्त्र सोडून हंसानें त्याचा प्रतीकार केला. तेव्हां श्रीकृष्णांनीं त्या युद्धामध्यें हंसावर वायव्यास्त्र सोडलें. पण नृपश्रेष्ठ हंसानें माहेंद्रास्त्र सोडून त्याचें निवारण केलें. तेव्हां श्रीकृष्णांनीं अतिशय भयंकर माहेश्वरास्त्र फेंकलें. तेंही रौद्रास्त्र सोडून तत्काल हंसानें परत फिरविलें. तेव्हां गांधर्व, राक्षस आणि पैशाच हीं अस्त्रें श्रीकृष्णांनीं सोडलीं. हें पाहून हंसानेंही तत्काल श्रीकृष्णाच्या चार अस्त्रांचें निवारण करण्यासाठीं ब्राह्म, कौबेर, आसुर आणि याम्य अशीं चार अस्त्रें सोडलीं. तेव्हां देवाधिदेव श्रीकृष्णांनीं ब्रह्मशिर नांवाचें महाभयंकर प्राणहारक अस्त्र हंसाला उद्देशून सोडलें. त्या अतिशय भयंकर वीर्य असलेल्या अस्त्राची श्रीकृष्णांनीं हंसाकडे योजना केली. तेव्हां, हे राजेंद्रा, नृपश्रेष्ठ हंस भयभीत झाला; आणि महारौद्र नांवाचें अस्त्र पाहून त्याच्या योगानें त्यानें त्या श्रीकृष्णाच्या बाणाचें निवारण केलें. हें पाहून सर्व प्राण्यांची काळजी वहाणाऱ्या व सर्वांचे ठायीं जीवस्वरूपानें वास्तव्य करणाऱ्या देवाधिदेव पापापहारक भगवान् श्रीकृष्णांनीं यमुनेच्या जलानें आचमन केलें. आणि एका तीक्ष्ण बाणावर वैष्णवास्त्राची योजना करून, हे राजा, त्या अस्त्राची हंसवधाच्या कामीं त्यांनीं योजना केली. याच अस्त्राच्या योगानें पूर्वीं देवांनीं दैत्यांना संग्रामामध्यें ठार करून राज्य संपादन केलें होतें.

## अध्याय एकशें अठ्ठाविसावा.

—:०:—

### हंसवध.

वैशंपायन म्हणाले:—हे नरपतिश्रेष्ठा,

जनमेजया, तें महाभयंकर अस्त्र अवलोकन करितांच राजा हंस निश्चेष्ट झाल्याप्रमाणें भासूं लागला. त्यानें तत्काल रथांतून उडी टाकली आणि यमुनेचा रस्ता सुधारला. व नंतर ज्या ठिकाणीं इंद्रियाधिपति श्रीकृष्णांनीं कालियनागाचें मर्दन केलें त्या महाभयंकर डोहांत त्यानें उडी घातली. हा डोह मोठा विशाल आणि अतिशय भयंकर असून याचा वर्ण काळ्या भोर अशा काजळाप्रमाणें अतिशय काळा होता, आणि त्याची खोली पाताळापर्यंत होती. हंसानें त्या डोहांत उडी मारतांच, इंद्रानें समुद्रांत पाडलेल्या पर्वतांचा ज्याप्रमाणें अवाज व्हावा, त्याप्रमाणें मोठा भयंकर शब्द झाला. देवाधिदेव जगन्नायक श्रीकृष्ण देखील सर्व जगताला जणु आश्चर्यचकित करून सोडण्यासाठींच रथांतून उडी टाकून त्या हंसावर जाऊन पडले. तदनंतर पराक्रमशाली श्रीकृष्णांनीं त्याला लाथांनीं मारला. हे नृपश्रेष्ठा, श्रीकृष्णाकडून लत्ताप्रहार मिळतांच तो हंस मरण पावला असें कित्येकांचें मत आहे व कित्येक तो पाताळांत गेला व तेथें त्याला सर्पांनीं भक्षण करून टाकला, असें म्हणतात. कसेंही असो; तथापि, हे राजेंद्रा, तो तेव्हांपासून आजपावेतों कोणाच्याही दृष्टीस पडला नाहीं, असें आमच्या ऐकण्यांत आहे. याप्रमाणें त्याचा नाश केल्यानंतर श्रीकृष्ण पूर्वींप्रमाणें आपल्या रथावर आले. हे महाराजा, श्रीकृष्णांनीं त्याला गतप्राण केल्यानंतर तुझ्या पितामहाचा ज्येष्ठ बंधु धर्मपुत्र युधिष्ठिर यानें राजसूययज्ञ केला. या वेळीं जर हंस जिवंत असता तर मग त्या यज्ञाला कोणीं मान दिला असता ? कारण हे प्रभो, श्रीशंकरापासून त्या हंसाला वर मिळाला असून तो सदैव सर्व अस्त्रज्ञानसंपन्न होता. हे महाराजा, शत्रुनाशक श्रीकृष्णांनीं 'हंस ठार केला, हंस ठार केला' अशी बातमी एका क्षणांत सर्व जगभर पसरली. तेव्हां 'लोकनायक, विश्वव्यापक, सामर्थ्यसंपन्न श्रीकृष्णानें यमुनेच्या भयंकर डोहामध्यें हंसाचा वध केला' अशा अर्थाचें गायन गंधर्व लोक स्वर्गामध्यें रात्रंदिवस करूं लागले.

## अध्याय एकशें एकोणतिसावा.

—:०:—

### डिंभकाचा वध.

वैशंपायन सांगतातः—राजा जनमेजया, अत्यंत पराक्रमशाली आणि भयंकर अशा आपल्या बंधूचा वध झाला आहे असें स्मरण करून त्या प्रचंड संग्रामामध्यें स्वतःशीं झुंजत असलेल्या बलरामाचा त्याग करून वीर्यशाली डिंभक यमुनेकडे गेला. तेव्हां हलसंज्ञक आयुध धारण करणारा बलरामही त्याच्या मागोमाग वेगानें धांवला. डिंभकानें, ज्या ठिकाणीं हंसानें उडी घेतली होती, त्याच ठिकाणीं यमुनेमध्यें उडी घेतली. आणि, हे महाराजा, सर्व जलसंचय खळबळून सोडला, तथापि तो सांपडला नाहीं. यामुळें कोपाविष्ट होऊन डिंभकानें यमुनेचें पाणी अतिशय हालवून सोडलें. तो एकदम आंत बुडी मारी आणि वर येई. असें त्यानें वारंवार केलें. तथापि, हे राजा, त्याला त्याचा पराक्रमी बंधु दिसला नाहीं. तेव्हां तो महापराक्रमी डिंभक पाण्यांतून वर आला, आणि श्रीकृष्णाकडे पाहून म्हणाला, 'अरे गौळ्याच्या पोरा, ज्याला हंस म्हणतात तो कोठें आहे?' यावर प्रतापशाली मूर्तिमंत धर्म अशा श्रीकृष्णांनीं शांत अंतःकरणानें उत्तर दिलें कीं, 'हे निंद्य राजा, यमुनेला विचार.' हें ऐकून तो बंधुप्रीतिसंपन्न डिंभक पुनरपि यमुनेच्या जलांत शिरला. त्यानें अनेक प्रकारें हंसाचा शोध केला. तथापि त्याला तो

सांपडला नाहीं, यामुळें राजा डिंभकाचें अंतःकरण अगदीं वेडें बनून गेलें, आणि तो विलाप करूं लागला. तो म्हणाला, "हे नृपश्रेष्ठा हंसा, मला बंधुविरहित करून सोडून तूं कोणीकडे चालला आहेस? हे बंधो, मला येथें सोडून देऊन तूं येथून काय म्हणून जात आहेस?"

हे नृपश्रेष्ठा, त्या बंधुप्रीतिसंपन्न डिंभकानें अशा रीतीनें शोक केल्यानंतर देहत्याग करण्याचें मनांत आणिलें. त्यानें प्राणत्यागाचा निश्चय करून यमुनेच्या डोहामध्यें उडी मारली. आणि वर येऊन आपल्या हातानें जिव्हा ओढली आणि वारंवार बंधुसंबंधानें शोक केला. तदनंतर, हे राजा, त्या धाडशी डिंभकानें आपली जिव्हा समूळ उपटून काढिली. आणि जणूं नरकप्राप्त्यर्थ यमुनेच्या जलामध्यें प्राण सोडले. याप्रमाणें हंसाचा वध केल्यानंतर व पराक्रमशाली डिंभक गतप्राण झाल्यानंतर प्रसन्नांतःकरण, प्रतापशाली, आनंदपूर्ण, कमलनयन श्रीकृष्ण सर्व प्राण्यांना जणूं आश्चर्यचकित करून सोडीत परत फिरले. आणि, हे महाराजा, बलरामासहवर्तमान त्यांनीं पूर्वीं उपभोग घेतलेल्या गोवर्धन पर्वतावर कांहीं वेळ राहून विसांवा घेतला.

## अध्याय एकशें तिसावा

—:०:—

### यशोदा आणि नंद यांस श्रीकृष्णाची भेट.

वैशंपायन सांगतातः—राजा जनमेजया, यशोदा आणि गोपाल नंद या उभयतांना श्रीकृष्णाच्या दर्शनाची बलवत्तर इच्छा होती. आपला ज्येष्ठ बंधु बलराम यासहवर्तमान श्रीकृष्ण गोवर्धन पर्वतावर येऊन राहिले आहेत, हें ऐकतांच त्या उभयतांना आनंद झाला. आणि बरोबर लोणी, दहीं, दुधाचे पदार्थ, खिचडी, आणि वनांतील पुष्पें आणि मयूरपिच्छाचीं ( पिसें ) बाहुभूषणें घेऊन व दुसऱ्याही अनेक गोपगोपींना बरोबर घेऊन ते एकदम गोवर्धन पर्वतावर गेले. तेथें कृष्णवर्ण मृगाप्रमाणें नेत्र असलेला महा पराक्रमी श्रीकृष्ण आपल्या ज्येष्ठ बंधूसह एका वृक्षावर बसलेला त्यांच्या दृष्टीस पडला. त्या उभयतांस तेथें पहातांच महा बलाढ्य श्रीकृष्ण व बलराम या उभयतांनीं आनंदित अंतःकरणानें त्यांना नमस्कार केला. त्या उभयतां देवांनीं दुधाचे केलेले अनेक महामूल्य पदार्थ अवलोकन केले. श्रीकृष्ण म्हणाले, 'आई, गोकुळांतील गोळवाड्यांत आपलें धेनुरूपी द्रव्य सुखरूप आहेना? हे तात, पुष्कळ दूध देणाऱ्या गाई आणि त्यांचे लहान मोठे वत्स सुखरूप आहेतना? गाई चांगल्या आहेतना; आणि त्या दूधही चांगलें देताताना? आई, वत्सांचें पालन करणाऱ्या गोपबालकांना दूध प्यावयास मिळतेंना? आपल्याकडे दांवीं आणि खुंटे विपुल आहेतना? बाबा, पुष्कळ प्रकारचें तृण आपल्याकडे सदैव असतेंना? सुगंधी चंदनादि लांकडाच्या केलेल्या गाड्या आपल्याकडे कायम आहेतना? आम्ही तेथें असतांना पुत्रवती असलेल्या गोपींना आणखी कांहीं अपत्यें झालीं आहेत काय? आई, सर्व गोकुळामध्यें बिलकूल न फुटलेले घट विपुल आहेतना? बाबा, प्रत्यहीं गाई निरुपम असें दुग्ध देताताना? ताज्या लोण्याचें तूप, दूध, दहीं यांची निष्पत्ति धेनूंच्या योगानें होतेना? सर्व धेनुरूपी द्रव्य आरोग्ययुक्त आहेना?' नंद म्हणाला हे यादवश्रेष्ठा प्रभो श्रीकृष्णा, तूं म्हणतोस त्याप्रमाणें हें सर्व गोकुल बहुधा आरोग्ययुक्त आहे, सर्वकाल हें आमचें गोधन सुखरूप आहे. आणि, हे देवाधिदेवा, तूंच संरक्षण करणारा असल्यामुळें आम्हीं, आमच्या द्रव्यभूत अशा गाई

आणि त्यांचे वत्स हे सर्व निरोगी आहों. श्रीकृष्णा, तुझें दर्शन होत नाहीं, हेंच काय तें दुःख मला सदैव आहे, आणि हेंच काय तें दुःख असल्यामुळें माझें अंतःकरण सदैव अगदीं चूर होऊन जातें.

वैशंपायन म्हणालेः—राजा जनमेजया, अशा रीतीनें तो नंद विलाप करूं लागला. तेव्हां श्रीकृष्णांनीं त्याला 'आतां आपण जा,' असें म्हटलें व यशोदेलाही 'आई, आतां घरीं जा,' असें सांगून 'जे तुझें स्तोत्र गातील ते स्वर्गाला जातील. आणि जे तुला प्रणाम करतील ते मला सदैव अत्यंत प्रिय होतील. आणि ते माझे सदैव भक्तही होतील. ये तर आतां, असें म्हटलें.' याप्रमाणें दिव्य स्वरूपी अशा आपल्या मातापितरांना सांगून अविनाशी अशा श्रीकृष्णांनीं गाढ आलिंगन देऊन त्यांना संतुष्ट केलें व त्यांची रवानगी केली. तेव्हां यशोदा आणि नंदगोप आपल्या घराकडे निघून गेले. तदनंतर इंद्रियजय केलेले श्यामवर्ण श्रीकृष्ण यदु आणि वृष्णि यांच्या कुलांमध्यें उत्पन्न झालेल्या पुरुषांसहवर्तमान द्वारकानगरीकडे जाण्याच्या विचारास लागले. राजा जनमेजया, जो कोणी सदैव हा वृत्तांत पठण अथवा श्रवण करील, त्याला द्रव्य आणि पुत्र यांची प्राप्ति होऊन शेवटीं मोक्षही मिळेल.

## अध्याय एकशें एकतिसावा.

—:०:—

### श्रीकृष्णाचें द्वारकेस आगमन.

वैशंपायन सांगतातः—तदनंतर श्रीकृष्ण तेथून निघून गमन करीत करीत यादवांसहवर्तमान पुष्कर तीर्थावर आले. हे नृपश्रेष्ठा, त्यांना तेथें पुष्करावरील मुनिश्रेष्ठांचें दर्शन झालें. तेव्हां ते निर्मत्सर ऋषी देवाधिदेव श्रीकृष्णाला येऊन भेटले आणि अर्घ्यादि उपचार समर्पण करून वर्तमान, भूत व भविष्यकालीन गोष्टींचा नियंता जो विश्वाधिपति श्रीकृष्ण त्याला म्हणाले, 'हे लोकसुखदायका श्रीकृष्णा, ज्याच्या योगानें संग्रामामध्यें हंस आणि डिंभक यांचा वध झाला तें तुझें वीर्य अतिशय आश्चर्यकारक होय. देवांना देखील पराजय करण्यास अशक्य आणि अत्यंत दुःसह जो विचक्र दैत्य त्याचा देखील, हे देवा, तूं संग्रामांत वध केलास. आमच्या दृष्टीनें त्याला जेरीस आणतां येणें अशक्य होतें. आतां उत्कृष्ट प्रकारचें तप आचरण करतांना अथवा इतर कोणत्याही प्रकारचें कार्य करतांना आमचें क्षेम असेल. हे हरे, आतां तुझें स्मरण करून आम्हीं निष्पाप होऊं. तुझें चिंतन करणाऱ्या लोकांचें प्रत्येक दुःख तूं हरण करितोस. हे प्रभो, तुझें स्मरण सर्वदा प्राण्याला पुण्यदायक होतें. हे हरे, तपश्चर्येकडे आमची प्रवृत्ति करणारा व आम्हांला तपश्चर्येचें फल देणारा तूंच आहेस. तूंच प्रणव आहेस, वषट्कार, यज्ञ व पितामहादि पितर हे सर्व तूंच आहेस. प्रत्यक्ष परमात्म्याची तेजोमय मूर्ति तूंच असून, ब्रह्मा, रुद्र, हे सर्व तूंच आहेस. तूं सर्व प्राण्यांचा प्राण आहेस, म्हणूनच तुला अंतरात्मा असें म्हणतात. हे जगन्नायका, यज्ञ, दान इत्यादि करून सर्व प्राणी ज्याची उपासना करितात तो तूंच आहेस. हे देवा, जगदुत्पादक आणि जगन्मय अशा तुजला नमस्कार असो; हे देवा, ब्रह्मद्वेष्ट्यांचा सदैव वध करून तूं या जगताचें संरक्षण कर.

याप्रमाणें ऋषींनीं केलेल्या प्रार्थनेवर 'ठीक आहे,' असें उत्तर देऊन श्रीकृष्ण द्वारकेला गेले. आणि तेथें यादवांशीं सहवर्तमान वास्तव्य करूं लागले. या वेळीं मागधादि स्तुतिपाठक लोक त्याची स्तुति करीत असत. राजा जन-

मेजया, तूं प्रश्न केल्यावरून मीं देवाधिदेव श्रीकृष्णाचा हा व्यापार तुला कथन केला. आतां आणखी काय ऐकावें अशी तुझी इच्छा आहे?

## अध्याय एकशें बत्तिसावा.

### महाभारतश्रवणाचें पर्वशः फल.

जनमेजय म्हणालाः—हे भगवन्, सुज्ञ लोकांनीं भारताचें श्रवण कोणत्या प्रकारें करावें, त्याच्या योगानें प्राप्त होणारें फल कोणतें, याचे समाप्तीच्या वेळीं कोणत्या देवतांचें पूजन करावें, आणि, हे भगवन्, प्रत्येक पर्वाच्या समाप्तीच्या वेळीं दान काय करावें, आणि वाचनाच्या कामीं कोणत्या प्रकारच्या वाचकाची योजना करावी, हें मला कथन करा.

वैशंपायन सांगतातः—हे राजा, तूं मला प्रश्न करीत आहेस त्याअर्थीं भारताच्या श्रवणाचा विधि, त्याच्या श्रवणापासून प्राप्त होणारें फल हें सर्व तूं मजपासून श्रवण कर. हे पृथ्वीपते, स्वर्गामध्यें वास्तव्य करणारे सर्व देव क्रीडेसाठीं पृथ्वीवर गेले. आणि भारत प्रतिपादित सर्व कार्यें करून फिरून स्वर्गावर आले. हे राजा, मी तुला ऋषी आणि देवता यांचे पृथ्वीवर झालेले अवतार सांगतों, ते एकाग्र अंतःकरणानें तूं ऐक. हे भरतश्रेष्ठा, या भारतवर्षामध्यें रुद्र, साध्य, अविनाशी विश्वदेव, आदित्य, देदीप्यमान् अश्विनीकुमार लोकपाल, महर्षि, गंधर्वांसहवर्तमान गुह्यक, नाग, विद्याधर, सिद्ध, धर्म, ब्रह्मदेव, मुनिश्रेष्ठ कात्यायन, पर्वत, समुद्र, नद्या, अप्सरांचे समुदाय, ग्रह, संवत्सर, अयनें, ऋतु यांच्या अधिष्ठात्री देवता, देव, दैत्य, सारांश, सर्व स्थावर, जंगम एकत्र दृष्टिगोचर होतें. या भारतामध्यें त्या सर्वांचें चरित्र वर्णन केलेलें आहे. तेव्हां या महाभारताच्या द्वारा त्यांच्या थोरवीचें श्रवण केल्यानें आणि त्यांचीं नांवें आणि कर्में यांचें संकीर्तन केल्यानें भयंकर पातक केलें असलें तरीही मनुष्य तत्काल मुक्त होतो. हा भारतरूपी सर्व इतिहास शुद्ध अंतःकरणानें व पवित्रपणानें योग्य प्रकारें क्रमानें श्रवण केल्यानंतर श्रवणाच्या शेवटीं वर ज्यांचा नामनिर्देष केला आहे त्यांच्या तृप्त्यर्थ श्राद्धें करावींत. हे भरतकुलश्रेष्ठा, ब्राह्मणांना भक्तीनें शक्त्यनुसार मोठमोठीं दानें अर्पण करावीं. नानाप्रकारचीं रत्नें द्यावीं. धार काढण्यासाठीं कांशाचीं भांडीं देऊन गायी अर्पण कराव्यात, उत्कृष्ट प्रकारें अलंकृत केलेल्या व सर्व प्रकारच्या अभीष्ट गुणांनीं युक्त असलेल्या कन्यांचें दान करावें. अनेक प्रकारचीं वाहनें द्यावीं, आश्चर्यकारक अशीं मंदिरें अर्पण करावीं, भूमी, वस्त्रें आणि सुवर्ण यांचें दान करावें. घोडे, मदोन्मत्त हत्ती, शय्या, पालखी, उत्कृष्ट प्रकारें सुशोभित केलेले रथ हेही अर्पण करावें, फार काय, पण घरामध्यें जें जें कांहीं मोठें मूल्यवान् म्हणून असेल तें तें ब्राह्मणांना अर्पण करावें. इतकेंच नव्हे, तर स्वतःचा आत्मा, स्त्री व पुत्र हींही अर्पण करावीं. अत्यंत श्रद्धेनें केलेलें जें दान तेंच खरें दान होय. अशा रीतीनें सामर्थ्याच्या अनुरोधानें क्रमाक्रमानें भारताचें श्रवण तडीस नेणारा, आनंदी, अचंचल, सत्य आणि सारल्य यांचे ठिकाणीं रममाण झालेला, प्रयत्नशील, पवित्र, शरीर आणि अंतःकरण शुद्ध ठेवण्याविषयीं तत्पर असलेला, श्रद्धासंपन्न आणि क्रोधशून्य अशा भारतश्रवणेच्छु पुरुषाला फलप्राप्ति कशी होते तें सांगतों, ऐक. भारतश्रवण करणाऱ्या पुरुषानें, शुचिर्भूत, शीलसंपन्न आचरण असलेला, श्वेतवस्त्र परिधान करणारा, जितेंद्रिय, ( उपनयनादि ) संस्कारसंपन्न, सर्व शास्त्रांचें ज्ञान असलेला, श्रद्धालु,

मात्सर्यशून्य, रूपवान्, भाग्यशाली, सहिष्णु, सत्यवादि, दान आणि गौरव यांचा स्वीकार करणारा अशा प्रकारचे वाचकाची योजना करावी. वाचकानें वाचण्याच्या वेळीं फार विलंब करूं नये, वर्णांचा उच्चार कर्कश करूं नये, गंभीरपणानें त्रेसष्टवर्णांचा यथास्थानीं स्पष्ट उच्चार करून अभिनय करून वाचावें, वाचतांना एखादें पद किंवा अक्षर सुटूं देऊं नये. अंतःकरण स्वस्थ ठेवावें. एकाग्रता असूं द्यावी आणि आत्मसंयमन केलेलें असावें. प्रथम नारायणाला व पुरुषश्रेष्ठ अशा नराला ( अर्जुनाला ) तसेंच देवी सरस्वतीला नमस्कार करून अभ्युदयकारक अशा भारतादिकांचें पठण करावें.

हे भरतकुलोत्पन्ना राजा, अशा प्रकारच्या वाचकाच्या तोंडून, नियमनिष्ठ आणि शुचिर्भूत अशा श्रोत्यानें महाभारत श्रवण केलें असतां त्याला फलप्राप्ति होते. पहिली समाप्ति करण्याचे प्रसंगीं ब्राह्मणांना त्यांच्या इष्ट वस्तु देऊन तृप्त करावें, म्हणजे मनुष्याला अग्निष्टोम यज्ञाचें फल मिळतें. अप्सरांच्या समुदायांनीं व्याप्त असलेल्या प्रचंड विमानांची त्याला प्राप्ति होते. तो आनंदित होऊन आणि समाधान पावून देवांसहवर्तमान स्वर्गाला जातो. दुसऱ्या समाप्तीला असेंच केल्यास अतिरात्र यज्ञाच्या फलाची प्राप्ति होते. व सर्वरत्ननिर्मित दिव्य विमानामध्यें आरोहण घडतें. तो मनुष्य दिव्य पुष्पमाला व दिव्य वस्त्रें व दिव्य बाहुभूषणें धारण करून व स्वर्गीय सुगंधानें विभूषित होऊन देवलोकामध्यें जातो व तेथें पूज्य होऊन रहातो. तिसरे समाप्तीचे प्रसंगीं अशाच प्रकारचें आचरण केलें असतां द्वादशाह संज्ञक यज्ञाच्या फलाची प्राप्ति होते. व देवतुल्य बनून दहा हजार वर्षें स्वर्गामध्यें वास्तव्य घडतें. चौथ्या समाप्तीच्या वेळीं त्याच्या दुप्पट फल प्राप्त होऊन उदय पावणाऱ्या सूर्याप्रमाणें भासणाऱ्या अग्नीप्रमाणें देदीप्यमान् अशा विमानामध्यें देवांसहवर्तमान आरोहण करून तो मनुष्य स्वर्गाला जातो. व इंद्राच्या मंदिरामध्यें दहा वर्षेंपर्यंत आनंदांत रहातो. सहाव्या समाप्तीच्या वेळीं याच्या दुप्पट व सातव्या समाप्तीच्या वेळीं याच्या तिप्पट फल मिळतें. आणि तो मनुष्य कैलासपर्वताच्या शिखराप्रमाणें आकार असलेलें, वैदूर्य रत्नांची वेदिका ( कट्टा ) असलेलें, अनेक प्रकारच्या रत्नांनीं आवृत्त व रत्नें आणि प्रवाल यांनीं विभूषित असलेलें, इच्छानुरूप गमन करणारें, व अप्सरांच्या समुदायानें युक्त असलेलें जें विमान त्यांत आरोहण करून जणूं दुसरा सूर्यच कीं काय, असा भासणारा तो पुरुष सर्व लोकांमध्यें संचार करतो. आठव्या समाप्तीला त्याला राजसूय यज्ञाचें फल मिळतें व चंद्राच्या किरणांप्रमाणें शुभ्र आणि मनाप्रमाणें वेगवान् अशा अश्वांनीं युक्त असलेल्या व जणूं चंद्रच उदय पावला आहे कीं काय, असें भासणाऱ्या विमानामध्यें त्याला आरोहण घडतें. चंद्राप्रमाणें सुंदर अशीं सुंदर स्त्रियांचीं मुखें त्याची सेवा करूं लागतात व उत्कृष्ट प्रकारच्या स्त्रियांच्या कमरपट्ट्याच्या आणि तोरड्यांच्या अवाजानें तो गाढ निद्रेंतून जागा होतो. हे भरतकुलोत्पन्ना, नवव्या समाप्तीला अश्वमेधाची प्राप्ति होते व समाप्ति करणारा पुरुष सुवर्णमय स्तंभांचा समुदाय व वैदूर्यरत्नांची वेदिका यांनीं युक्त असून सुवर्णमय सुंदर वातायनें ( खिडक्या ) सर्व बाजूस असलेल्या, अप्सरांच्या समुदायांनीं सेवन केलेल्या आणि वेदिकेवर संचार करणाऱ्या गंधर्वांनीं युक्त असलेल्या विमानामध्यें आरोहण करून उत्कृष्ट प्रकारच्या कांतीनें देदीप्यमान् दिव्य माल्यें आणि वस्त्रें धारण करणारा व स्वर्गीय चंद-

नानें अलंकृत असा होऊन जणूं दुसरा देवच कीं काय, असा देवतांशीं सहवर्तमान आनंदानें रहातो. दहाव्या पारायणाच्या वेळीं अशाच प्रकारें ब्राह्मणांना प्रणाम केला असतां ज्यावर लहान लहान घंटांचा मंजुळ अवाज होत आहे, जें पताका आणि ध्वज यांनीं सुशोभित आहे, ज्यामध्यें रत्नमय वेदिका चमकत आहे, ज्याला वैदूर्यरत्नाचीं तोरणें आहेत, ज्याच्या सभोंवतीं सुवर्णाच्या जाळ्या आहेत व ज्याच्यापुढें पोवळ्यांनीं बनविलेली गच्ची आहे, ज्यामध्यें गायनकुशल गंधर्व आणि अप्सरा वास्तव्य करीत आहेत आणि जें केवळ पुण्याचें वसतिस्थानच आहे अशा विमानाची सुखानें प्राप्ति होते. व तो समाप्तिकर्ता पुरुष सूर्याप्रमाणें कांति असलेले किरीट आणि सुवर्णमय अलंकार धारण करून स्वर्गीय पुष्पमालांनीं अलंकृत होऊन व अंगाला दिव्य चंदनाच्या उट्या लावून स्वर्गसुखाचा अनुभव घेत स्वर्गांतील अनेक लोकांबरोबर संचार करितो आणि देवतांच्या प्रसादानें त्याला उत्कृष्ट प्रकारच्या वैभवाची प्राप्ति होते. याप्रमाणें अनेक वर्षे स्वर्गामध्यें पूज्य होऊन राहून पुढें एकवीस हजार वर्षेपर्यंत गंधर्वांशीं सहवर्तमान रम्य अशा इंद्रलोकामध्यें इंद्राशीं सहवर्तमान आनंदानें रहातो. त्याचप्रमाणें स्वर्गीय स्त्रियांच्या समुदायांनीं व्याप्त होऊन देवाप्रमाणें स्वर्गांतील अनेक वाहनांमध्यें, विमानांमध्यें आणि नानाप्रकारच्या लोकांमध्यें वास्तव्य करितो. तदनंतर सूर्याच्या मंदिरामध्यें, पुढें चंद्राच्या गृहामध्यें, त्यानंतर शंकराच्या मंदिरामध्यें वास्तव्य करून, हे राजा, त्यानंतर तो विष्णुलोकांतील रहिवासी बनून रहातो. हे महाराजा, याप्रमाणें हें सर्व घडून येतें, याविषयीं विचारच करावयास नको. श्रोत्यानें श्रद्धालु असलें पाहिजे. असें माझ्या गुरूनीं सांगितलें आहे. ज्या ज्या वस्तूची अंतःकरणाला इच्छा असेल ती ती वस्तु वाचकाला द्यावी. हत्ती, घोडे, रथ वगैरे वाहनें विशेषेंकरून समर्पण करावीं. कडीं, कुंडलें, यज्ञोपवीत, चित्रविचित्र वर्णाचें वस्त्र, आणि सुगंधी द्रव्यें हीं द्यावीं. विशेषेंकरून त्याचें पूजन करावें. असें केल्यानें विष्णुलोकाची प्राप्ति होते.

हे राजा, महाभारत श्रवण करितांना प्रत्येक पर्वाच्या शेवटीं ज्या वस्तूंचें दान करावयाचें त्या तुला आतां सांगतों. हे भरतकुलश्रेष्ठ राजा, क्षत्रियांची जाती, वास्तव्य प्रदेश, सामर्थ्य, अंतःकरणाचा मोठेपणा, आणि धर्माकडे असलेली प्रवृत्ति, हीं सर्व लक्षांत घेऊन त्याला अनुरूप अशींच दानें मी तुला सांगणार आहें. प्रथम ब्राह्मणांकडून स्वस्तिवाचन करवून नंतर आदिपर्वाच्या श्रवणाचें काम सुरू करावें आणि पर्वाची समाप्ति झाल्यानंतर आपल्या शक्तीच्या अनुरोधानें ब्राह्मणसंतर्पण करावें. हे राजा, प्रथम वाचकाला वस्त्रें आणि सुगंधी द्रव्यें अर्पण करून नंतर मध आणि दुधाचे पदार्थ याचें त्याला यथास्थित भोजन घालावें आणि नंतर, हे राजा, आस्तिक ब्राह्मणाला फळें, मुळें, दुधाचे पदार्थ, मध, तूप, यांचें भोजन घालावें. गूळभात वाढावा. मालपुवा, अनरसे, मोदक हेही पदार्थ वाढावे. हे नृपश्रेष्ठा, सभापर्वाचे वेळीं ब्राह्मणांना हविष्यान्नाचें भोजन घालावें. वनपर्वाच्या वेळीं फलमूलादिकांच्या योगानें ब्राह्मणांची तृप्ति करावी, अरणीपर्व सुरू होतांच उदकुंभ ( पाण्यानें भरलेल्या घागरींचें ) दान करावें. आणि तृप्त करून सोडणारीं अरण्यांतील उत्कृष्ट फळें, मूळें आणि सर्व प्रकारच्या अभीष्ट गुणांनीं संपन्न असें अन्न ब्राह्मणांना द्यावें. विराट पर्वाच्या वेळीं नानाप्रकारचीं वस्त्रें द्यावीं. हे भरतकुलश्रेष्ठा, उद्योगपर्वाच्या वेळीं ब्राह्म-

णांना सर्व प्रकारच्या इष्ट गुणांनीं युक्त असें भोजन द्यावें व गंधमाल्यादिकांनीं त्यांना विभूषित करावें. हे नृपश्रेष्ठा, भीष्मपर्वाच्या वेळीं उत्कृष्ट प्रकारचें बनविलेलें अन्न ब्राह्मणांना अर्पण करावें. हे नृपश्रेष्ठा, द्रोणपर्वाच्या वेळीं ब्राह्मणांना उत्तम प्रकारचें भोजन घालावें आणि धनुष्यें, बाण व उत्कृष्ट प्रकारचीं खड्गें अर्पण करावीं. कर्णपर्वाचे वेळीं अंतःकरणाचें संयमन करून ब्राह्मणांना सर्व इष्ट पदार्थांनीं युक्त, उत्कृष्ट प्रकारें बनविलेल्या अन्नाचें उत्तम प्रकारें भोजन घालावें. हे राजेंद्रा, शल्यपर्वाच्या वेळीं मोदक, गूळभात व घारगे यांच्या योगानें ब्राह्मणांची तृप्ति करावी. त्यांना सर्व प्रकारचें अन्न द्यावें. गदापर्वाच्या वेळीं ब्राह्मणांना मुगांची खिचडी अर्पण करावी. स्त्रीपर्वाचे वेळीं रत्नांचें दान करून ब्रह्मणांना तृप्त करावें. ऐषिकपर्वाचे वेळीं ब्राह्मणांना आरंभीं तूपभात द्यावा आणि नंतर, अर्थात् समाप्तीच्या वेळीं, उत्तम रीतीनें तयार केलेलें सर्वगुणसंपन्न अन्न अर्पण करावें. शांतिपर्व समाप्त होतांच ब्राह्मणांना हविष्यान्नाचें भोजन घालावें. मौसलपर्वाच्या वेळीं सर्वगुणसंपन्न सुगंधी द्रव्यें, पुष्पमाला आणि उटणीं हीं अर्पण करावीं, याचप्रमाणें महाप्रस्थानिक पर्वाचे समयीं सर्व अभिष्ट गुणांनीं युक्त असें भोजन ब्राह्मणांना घालावें. स्वर्गारोहण पर्वाच्या वेळीं ब्राह्मणाला एक गाय आणि एक निष्क सुवर्ण अर्पण करावें. हे पृथ्वीपते, जर द्रव्याचा अभाव असेल तर अर्धनिष्क तरी सुवर्ण आणि धेनुही अर्पण करावी. तसेंच, प्रत्येक समाप्तीच्या वेळीं सुज्ञ श्रोत्यानें ब्रह्मणाला सुवर्ण आणि पुस्तक अर्पण करावें. व हरिवंशपर्व समाप्त झाल्यानंतर दुधाच्या पदार्थांचें भोजन घालावें.

हे नृपकुमारा, महाभारताचा एक श्लोक, श्लोकाचा एक चरण अथवा त्यांतील एक अक्षर तरी जो मनुष्य एकाग्र अंतःकरणानें श्रवण करील तोच श्रीविष्णूला प्रिय होईल. तदनंतर पौराणिक आणि त्याची पत्नि या उभयतांचें यथाशास्त्र पूजन करावें. पौराणिक म्हणजे पूज्य अशी साक्षात् लक्ष्मीनारायण देवताच होय. यास्तव त्याचें पूजन करावें. ज्यानें भूमी, वस्त्रें, आणि उत्कृष्ट प्रकारच्या धेनु यांचें दान करून पौराणिकाचें पूजन केलें असेल त्यानें साक्षात् देवकीनंदन श्रीकृष्णाचेंच पूजन केलें असें समजावें. हे भरतकुलश्रेष्ठा राजा, प्रत्येक पर्वाच्या समाप्तीच्या वेळीं असेंच पूजन करावें. सर्व पर्वांची समाप्ति झाल्यानंतर शास्त्रनिष्णात अशा श्रोत्यानें शुचिर्भूतपणें सर्व पर्वांना रेशमी वस्त्रांचें वेष्टन घालून उत्कृष्ट ठिकाणीं ठेवावें. व स्वतः शुक्ल वस्त्र परिधान करून उत्कृष्ट प्रकारचे अलंकार धारण करून शुचिर्भूत, शोभासंपन्न, इंद्रियनिग्रहसंपन्न आणि सदाचारी लोकांना संमत बनून, हे राजा, त्या पर्वांच्या पुस्तकाचें गंध, माला इत्यादिकांनीं यथायोग्य निरनिराळे पूजन करावें. तदनंतर भक्ष्य, मांस, पेयपदार्थ, अभीष्ट असलेल्या अनेक प्रकारच्या शुभवस्तु, सुवर्ण, धेनु, वस्त्र आणि दक्षिणा हीं अर्पण करावीं. प्रत्येक वेळेला अंतःकरणामध्यें नम्रपणा धारण करून बारा तोळे सुवर्ण अर्पण करावें. शक्ति नसेल तर त्याच्या अर्धें अर्थात् सहा तोळे अर्पण करावें. निदान एक चतुर्थांश म्हणजे तीन तोळे तरी सुवर्ण द्यावें. द्रव्याविषयीं शाठ्य करूं नये. जें जें आपणाला प्रिय असेल, तें तें सर्व ब्राह्मणाला अर्पण करावें. एकंदरींत आपला गुरु जो पौराणिक त्याचा सर्व प्रकारें भक्तिपूर्वक संतोष करावा. सर्व देवतांचें नामसंकीर्तन करावें. नरनारायणांच्या नामांचाही उच्चार करावा. तदनंतर गंध आणि पुष्पमाला यांचे योगानें ब्राह्मणश्रेष्ठांना उत्कृष्ट

प्रकारें अलंकृत करून त्यांना अभीष्ट असणाऱ्या लहानमोठ्या वस्तु अर्पण करून संतुष्ट करावें. असें करणाऱ्या पुरुषास अतिरात्र यज्ञ केल्याचें फल प्राप्त होतें. प्रत्येक पर्वाच्या योगानेंही यज्ञफलाची प्राप्ति होते. हे भरतकुलश्रेष्ठा, विद्वान् अशा पौराणिकानें पदांचा, अक्षरांचा आणि स्वराचा स्पष्टपणें उच्चार करून भारतांतील भविष्यकालीन कथाबोधक भाग श्रोत्यांच्या कानावर घालावा. ब्राह्मणश्रेष्ठाचें भोजन झाल्यानंतर पौराणिकाला भोजन घालून व उत्कृष्ट प्रकारें अलंकृत करून यथायोग्य दान करावें. पौराणिक संतुष्ट झाला असतां देवतांना अत्युत्कृष्ट आनंद होतो व त्या योगानें कल्याण होतें. ब्राह्मण संतुष्ट झाले असतां सर्व देवता संतुष्ट होतात. यास्तव, हे भरतकुलश्रेष्ठा, योग्य प्रकारें आणि क्रमाक्रमानें सर्व प्रकारच्या अभीष्ट वस्तु देऊन सज्जनांनीं ब्राह्मणाचें पोषण करावें.

हे नरश्रेष्ठा, तूं मला प्रश्न केल्यावरून मीं हा भारतश्रवणाचा विधि तुला कथन केला आहे. यावर श्रद्धा ठेवली पाहिजे. हे नृपश्रेष्ठा, ज्याला आपलें उत्कृष्ट प्रकारें कल्याण व्हावें अशी इच्छा असेल त्यानें भारताचें श्रवण करण्याविषयीं व तें तडीस नेण्याविषयीं सदैव प्रयत्न करावा. सर्वदा भारत श्रवण करावें व भारतच पठण करावें; ज्याच्या घरामध्यें भारत असतें त्याच्या विजय हा केवळ हातामध्यें असतो. भारत हें मूर्तिमंत असें उत्कृष्ट प्रकारचें पुण्यच होय. भारतामध्यें नानाप्रकारच्या कथा आहेत. देव देखील भारताच्या रसाचा आस्वाद घेत असतात. यास्तव भारत पठण करावें. हे भरतकुलश्रेष्ठा, भारत हें सर्व शास्त्रांमध्यें उत्कृष्ट होय. भारतापासून मोक्षाची सुद्धां प्राप्ति होते. हें मी तुला खरें सांगतों. महाभारताची कथा, भूमी, धेनु, ब्राह्मण, सरस्वती, आणि श्रीविष्णु यांचा नामोच्चार केला असतां केव्हांही हीनस्थिति प्राप्त होत नाहीं. हे भरतकुलश्रेष्ठा, वेद, रामायण आणि पवित्र असें भारत या सर्वांमध्यें आरंभीं, मध्यें व शेवटीं श्रीविष्णूचें स्तोत्र आहे. ज्या ठिकाणीं श्रीविष्णूच्या अलौकिक कथा आहेत व ज्यांमध्यें अविनाशी अशीं वेदवचनें गोंविलेलीं आहेत तें महाभारत ज्याला इहलोकींच परमात्मपदाच्या प्राप्तीची इच्छा असेल त्यानें श्रवण करावें. महाभारत हें अत्यंत पवित्र होय. हें धर्माचें प्रमाण होय. हें सर्व गुणांनीं युक्त आहे. यास्तव कल्याणेच्छु पुरुषानें भारत श्रवण करावें. या असार संसारामध्यें आपल्या अभीष्ट फलप्राप्तीला हरिवंश श्रवण हेंच साधनीभूत होय. यास्तव हरिवंश श्रवण करावें. असें व्यासांनीं सांगितलें आहे. हजार अश्वमेध आणि शंभर वाजपेय यज्ञ यांच्या योगानें प्राप्त होणारें फल हरिवंशाचें श्रवण केलें असतां मिळतें.

अस्तु; हे श्रीविष्णो, जरा आणि मरण यांनीं रहित, ध्यान करण्याला योग्य, आदि आणि अंत यांनीं शून्य, उपाधियुक्त असल्यामुळें सगुण, आणि उपाधिरहित असल्यामुळें निर्गुण, सर्वांस आदिभूत विश्वस्वरूपी असल्यामुळें स्थूल परमात्मस्वरूप, अत्यंत सूक्ष्म असल्यामुळें उपमारहित, अनुमानगम्य, योग्यांच्या ज्ञानाला विषयीभूत, त्रैलोक्यजनक आणि ऐश्वर्यसंपन्न अशा तुजला मी शरण आलों आहें. सर्व लोक संकटांतून पार पडोत. सर्वांना कल्याण झालेलें पहावयास मिळो. आणि हरिवंश पूर्णपणें श्रवण केल्याच्या योगानें सर्वांनाही अभीष्ट फलाची प्राप्ति होवो.

# अध्याय एकशें तेतिसावा.

—:०:—

## त्रिपुरासुरवध.

जनमेजय म्हणालाः—हे ब्रह्मनिष्ठ, आकाशामध्यें संचार करणाऱ्या त्रिपुराचा श्रीशंकरांनीं जो वध केला त्याचा बरोबर वृत्तांत संक्षिप्तपणें ऐकावा अशी माझी इच्छा आहे.

१ त्रिपुरासुरवध हें एक आख्यान आहे व तें इतिहास या दृष्टीनें या महाभारतरूपी इतिहास ग्रंथांत गोविलेलें आहे. त्रिपुरासुरवध ही वस्तुस्थिति आहे. हें रूपक नाहीं. वस्तुस्थितीला रूपक केव्हांही म्हणतां येणार नाहीं. कारण रूपक समजल्यानें इतिहासाचा नायनाट होऊन जाईल. परंतु, भारताचे टीकाकार श्रीनीलकंठ यांचा रोख अशा प्रकारच्या कोणत्याही ऐतिहासिक गोष्टीला रूपकाचें स्वरूप देऊन वेदांताकडे खेंचावें या गोष्टीकडे विशेष आहे. व म्हणूनच त्यांनीं या त्रिपुरवधाख्यानाचा वेदांतपर अर्थ करण्याची खटपट केलेली आहे. ही गोष्ट आम्हास पसंत नाहीं. अशा रीतीनें प्रत्येक गोष्टीचा अर्थ करूं लागल्यास वाटेल त्या वाक्याचा वाटेल तो अर्थ होऊं शकेल. उदाहरणार्थः—एखाद्यानें धर्मशाळेंत लोक उतरले आहेत असें म्हटलें तर त्याचा अर्थ प्राणी संसारामध्यें पडले आहेत, असा होऊं लागेल. समईमध्यें दिवा जळत आहे असें म्हटलें तर शरीरामध्यें जीव चमकत आहे, असा अर्थ होऊं लागेल आणि सरोवरांतील कमळें मिटलीं असें वाक्य उच्चारल्यास संसारांतील प्राण्याचे डोळे झांकले असा अर्थ होऊं लागेल. सारांश, वस्तुस्थितीचा सर्वथैव लोप होऊं लागेल. एखादें वेदांताचें प्रकरण सुरू असून वेदान्ताचा उपदेश करण्यासाठीं अशा प्रकारचें आख्यान घातलें असेल व तें रूपक आहे असें मानल्यावांचून त्याचा उपन्यास असंगत होत असेल तर प्रकरणाच्या जोरावर त्या आख्यानाला रूपक मानतां येईल, पण येथें तसा कांहीं प्रकार दिसत नाहीं. शिवाय महाभारत हा ग्रंथ ऐतिहासिक आहे. त्यांत वेदान्तप्रकरणींसुद्धां दिलेलीं आख्यानें प्रायः उदाहरणरूपच असतात; रूपकें नसतात, असें दिसून येतें. यामुळेंच आह्मीं सदरहु आख्यानाचा अर्थ केला आहे. जी गोष्ट आम्हास पसंत नाहीं व योग्य आहे असेंही दिसत नाहीं ती केवळ लोकरंजनार्थ लिहिण्याची आमची बिनकूल इच्छा नाहीं. रूपकांतच घोंटाळून राहण्याची ज्याला इच्छा असेल त्या नीलकंठभक्तांनीं नीलकंठाची टीकाच अवलोकन करावी.

वैशंपायन म्हणालेः—हे राजा, सर्व प्राण्यांशीं विरोध करणाऱ्या सामर्थ्यशाली त्रिपुरसंज्ञक दैत्यांचा वध कसा झाला, हें सर्व मी तुला तुझ्या प्रश्नावरून॰ सविस्तर सांगतों. हे राजा, पूर्वीं सर्व प्राण्यांचा वध करूं इच्छिणाऱ्या त्या तीन दैत्यश्रेष्ठांचा श्रीशंकरांनीं आपल्या सरळ जाणाऱ्या तीन शूलांनीं कसा वध केला तें ऐक.

हे नरश्रेष्ठा, पूर्वीं आकाशामध्यें प्रकट झालेला मेघसमुदायच कीं काय, अशीं भासणारीं दैत्यांचीं तीन नगरें इतस्ततः संचार करीत होतीं. तीं अनेक प्रकारच्या मोठमोठ्या धातूंचीं बनविलेलीं होतीं. त्यांच्या सभोंवतीं विशाल आणि शोभायमान असे सुवर्णाचे तट होते. सर्व प्रकारचीं रत्नें खचलेले रत्नमय आणि प्रकाशमान असे दरवाजे त्या नगरांला होते. उत्कृष्ट प्रकारची शोभा असल्यामुळें तेजःपुंज दिसणारीं तीं नगरें उच्च अशा गंधर्वनगराप्रमाणें भासत होतीं. तीं नगरें त्या दैत्यांनीं केवळ आपल्या क्रियाशक्तीनेंच निर्माण केलेलीं होतीं. तीं सूर्याप्रमाणें उत्कृष्ट दिसणारीं नगरें, सामर्थ्याचा गर्व असलेले, व पंख असलेले घोडे, उत्साही अंतःकरणानें इकडून तिकडे नेत असत. ते घोडे खेकाळत जोरानें धांवत असत, त्या वेळीं श्यामवर्ण पत्राप्रमाणें कान्ति असलेल्या आपल्या टापांच्या योगानें आकाशाला जणूं आपलेकडे बोलावीत आहेत, असें भासत असे. ज्या वेळीं ते वाऱ्याच्या वेगानें पळत असत त्या वेळीं आकाशाला देखील मागें टाकीत आहेत कीं काय, असें वाटत असे. त्या नगरामध्यें असलेले दैत्य ज्यांनीं आपलीं पातकें तपश्चर्येनें दग्ध करून टाकलीं आहेत, अशा अग्नीप्रमाणें पवित्र असलेल्या ऋषींच्या दृष्टीला मात्र दिसत असत. त्या नगरामध्यें गाणेंबजावणें यांची सारखी

गर्दी चालली होती, यामुळें तें गंधर्वांच्या नगराप्रमाणें दिसत होतें. तें अतिशय कांति असलेलें नगर आश्चर्यकारक आयुधांनीं व्याप्त असलेल्या, तापलेल्या सुवर्णाप्रमाणें कांति असलेल्या व उत्कृष्ट प्रकारें शृंगारिलेल्या व प्रत्यक्ष इंद्रमंदिराप्रमाणें भासणाऱ्या, उंच उंच अशा अनेक मंदिरांच्या योगानें शोभत होतें. तसेंच कैलासाच्या शिखराप्रमाणें अतिशय मोठ्या अशा वाड्यांच्या शिखरांनीं त्या दैत्य-नगराला शोभा आलेली होती. त्यामध्यें उत्कृष्ट प्रकारचे अनेक चमकदार बंगले होते. यामुळें ज्यामध्यें अनेक सूर्य आहेत, असें तें एक आकाशच आहे कीं काय, असें वाटत होतें. त्या नगराची कांति तापलेल्या सुवर्णाप्रमाणें दिसत होती. आणि हे महाराजा, तें नगर असें शोभत होतें कीं, जणूं तेजाच्या योगानें पेटतच आहे. त्या नगरांत वीरांचे उत्कृष्ट प्रकारचे सिंहनाद पुष्कळ चाललेले होते. तसेंच सिंहाच्याही ध्वनीनें तें दुमदुमून राहिलेलें होतें. सदोदित सुंदर लोकांची गर्दी असलेलें तें नगर चैत्ररथ नांवाच्या उपवनाप्रमाणें भासत होतें. त्यामध्यें ध्वज उभारलेले होते व तें तरवारींच्या योगानें विभूषित झालेलें होतें. हे राजा, तें त्रिपुर आकाशामध्यें प्रचंड विजेप्रमाणें भासत होतें. हे भरतकुलोत्पन्ना, दैत्यश्रेष्ठ सूर्यनाभ, चंद्रनाभ, आणि दुसरेही सामर्थ्यानें धुंद होऊन गेलेले पराक्रमी दैत्य त्या नगरामध्यें रहात असून विधात्यानें मोह उत्पन्न केल्यामुळें, हे भारता, त्यांनीं देवयान आणि पितृयान या दोन्ही सद्भक्तीच्या मार्गाला पायांखालीं तुडवून मोडून टाकिलें. हे नरश्रेष्ठा, त्या धनुष्य धारण करणाऱ्या दैत्यश्रेष्ठांनीं याप्रमाणें अग्नीच्या सामर्थ्याशीं संबंध असलेला देवयानसंज्ञक आणि पितरांच्या सामर्थ्याशीं संबद्ध असलेला पितृयान नांवाचा उत्कृष्ट मार्ग नष्ट करून टाकला. तेव्हां, हे भरतकुलश्रेष्ठा, हे मार्ग आणि त्या मार्गासंबंधाचीं कर्में उच्छिन्न झाल्यामुळें देवगणांचीं तोंडें म्लान झालीं आणि ते सर्व दीन होऊन ब्रह्मदेवापाशीं धावत गेले व उभे राहून पीडासूचक स्वरानें बोलूं लागले. ते म्हणाले, भगवन्, आम्हांला हविर्भाग अर्पण करणारे आपणच आहांत. पण, सांप्रत त्या भागांचा उच्छेद करून शत्रूंचे समुदाय आम्हांला गतप्राण करून सोडीत आहेत. तेव्हां हे वक्तृश्रेष्ठा, त्यांच्या वधाचा असा एखादा उपाय आपण आम्हांला सांगा कीं, ज्या योगानें बाहुबलानें युक्त असणारे आम्हीं संग्रामामध्यें शत्रूंना त्राहित्राहि करून सोडूं.

हें ऐकून वरप्रद ब्रह्मदेवानें देवांचें सांत्वन केलें आणि त्यांस म्हटलें. "हे सर्व देवतांनो, शत्रूंचें खरें स्वरूप मी तुम्हांला सांगतों, तें ऐका. अविनाशी अशा श्रीशंकरांवांचून इतर कोणाच्याही हातून त्या सर्व दानवांचा वध होणें शक्य नाहीं." हें ब्रह्मदेवाचें भाषण ऐकून, हे भरतकुलोत्पन्ना, त्या देवतांनीं अंतःकरणानें आणि वाणीनेंही आपला संतोष व्यक्त केला. तदनंतर, रुद्रासहवर्तमान ते सर्व देव भूमीवर आले व विंध्याद्रीच्या टेंकड्या, मेरुपर्वत आणि पृथ्वीचा मध्यभाग या ठिकाणीं राहून योगज्ञानसंपन्न असे ते सर्व देव ऋषि बनले आणि प्रणवाचा जप करून तीव्र तपश्चर्येनें त्यांनीं कश्यपपुत्र श्रीशंकराची प्राप्ति करून घेतली. त्या वेळीं ते कडकडीत ब्रह्मचर्यव्रत आचरण करीत असल्यामुळें उत्कृष्ट अशाही त्यांच्या क्रिया विफळ होऊन राहिल्या. त्यांनीं शयनासाठीं दर्भसमुदाय पसरले होते. ताम्रमय धातु हेच त्यांचे अलंकार बनले होते. त्या वेळीं, हे कुरुश्रेष्ठा, अरण्यामध्यें संचार करणाऱ्या आपोआप मरण पावलेल्या काळविटांच्या शरी-

रावरून काढून घेतलेलीं मृदु चर्में हींच त्यांचीं उत्कृष्ट प्रकारचीं परिधान वस्त्रें होतीं. याप्रमाणें तपस्वी बनल्यानंतर ते सर्व देव एकदां आकाशांत गेले आणि मायेनें आवृत होत्साते व्याघ्रचर्म परिधान करून श्रीशंकराच्या मंदिरामध्यें गेले आणि दीनपणें नमस्कार करून त्या दीननायक भगवान् शंकरास स्पष्ट वाणीनें म्हणाले, "हे भगवन्, ज्याप्रमाणें भस्मानें आवृत असलेल्या अग्नीमध्यें टाकलेलें होमद्रव्य निष्फल होय, त्याप्रमाणेंच आपण पराङ्मुख असतां आम्हांला कोणीही केलेलें वरदान व्यर्थ होय. यास्तव, आपण प्रसन्न व्हा आणि योग्य वेळीं, व योग्य स्थळीं देवाधिदेव ब्रह्मा ह्यानें आम्हां सर्व देवतांच्या समक्ष जें सांगितलें आहे तें करा."

हें देवांचें भाषण ऐकून व पुढें येणाऱ्या कार्याचें महत्त्व लक्षांत घेऊन श्रीशंकर इंद्रादिदेवतांशीं सहवर्तमान सज्ज झाले. या वेळीं सुवर्णाप्रमाणें कांति असलेले, अलंकार धारण करणारे, सज्ज झालेले सर्व रुद्र श्रीशंकरासहवर्तमान सौरमार्गामध्यें प्रविष्ट झाले आणि आपल्या तेजानें जणूं सर्व जगताचें भस्म करून टाकीत आहेत कीं काय, असे भासूं लागले. सज्ज झालेले ते सर्व देव चतुर आणि बलाढ्य असून पर्वताप्रमाणें धिप्पाड होते. त्या सर्वांनीं स्वेच्छेनुरूप नानाप्रकारचीं रूपें धारण केलीं होतीं. अशा रीतीनें सर्व दानवांचा संहार करण्यासाठीं सज्ज झालेल्या कुबेरप्रभृति सर्व देवतांशीं सहवर्तमान श्रीशंकर धनुष्यबाण घेऊन त्रिपुराशीं युद्ध करूं लागले. हे राजा, या वेळीं संग्रामामध्यें असलेल्या दैत्यांचीं शरीरें कमी अधिक मानानें छिन्नविच्छिन्न होऊन गेलीं. आणि ते नगरद्वारावरून पडल्याप्रमाणें खालीं पडले. त्यावेळीं ते फुटून पडलेल्या पर्वताप्रमाणें भासूं लागले. हे राजा, या वेळीं देवांनीं फेंकलेल्या शक्ति, चक्र, परशु, बाण इत्यादि आयुधांच्या योगानें दैत्यांचीं मर्मस्थानें छिन्नविछिन्न होऊन गेलीं व त्यामुळें वज्रप्रहाराच्या योगानें पंखें छिन्न झाल्यामुळें भूमीवर पडलेल्या पर्वताप्रमाणें, युद्धांत असलेले त्यांचे समुदाय धडधडा पडूं लागले आणि अस्त्रांच्या देदीप्यमान तेजानें दग्ध होऊन प्राण सोडूं लागले.

याप्रमाणें त्या देवदैत्यांमध्यें परस्पर संग्राम चालून संहार सुरू झाल्यामुळें दैत्यांचा नाश झाला व दिवसा दिव्य दृष्टीनेंही ते दिसेनासे झाले तेव्हां सूर्य अस्तास जाऊन रात्र सुरू होतांच संग्रामकर्मानें मुखें छिन्नविच्छिन्न झालेले ते देवश्रेष्ठ भूतलावर अवतरले. पण रात्रीं तीक्ष्ण बाणांच्या योगानें दैत्यांनीं जय मिळविला. आणि ते प्रचंड गर्जना करणाऱ्या मेघांप्रमाणें मोठमोठ्या आवाजानें गर्जना करूं लागले. अशा रीतीनें जयप्राप्ति होतांच त्यांची परस्परांत बडबड सुरू झाली. तेव्हां संग्रामांत जय मिळविण्याची इच्छा करणारे सर्व देव भयभीत होऊन गेले, व म्हणूं लागले कीं, आम्ही बलाढ्य असून सांप्रत जय मिळाल्यामुळें दैत्यही प्रास ( इटे ) खड्ग, तोमर इत्यादि आयुधांच्या योगानें विराजमान होऊन राहिलेले आहेत. शुक्रानें कल्पिलेल्या मार्गाच्या अनुरोधानें चालल्यामुळें ज्ञान होऊन ते आयुधधारी दैत्यश्रेष्ठ बलाढ्य बनून गेले आहेत.

याप्रमाणें देवतांचा पराभव झाला आहे असें पाहून श्रीशंकरांनीं रथावर आरोहण केलें. या वेळीं सर्व देव त्यांच्याबरोबर होते. त्यांनीं मोठ्यानें गर्जना केली; तेव्हां प्रलयकालीं सर्व जगताला भस्म करून टाकणाऱ्या सूर्याप्रमाणें ते तेजस्वी दिसूं लागले. त्यांच्या तेजानें ते सर्व दैत्य जणूं होरपळून जाऊं लागले. त्यांच्या त्या रथाला मनाप्रमाणें वेग असलेले अश्व जोडलेले होते. तो रथ आका-

शामध्यें विद्युल्लतेनें युक्त असलेल्या मेघांप्रमाणें भासूं लागला. हे भरतकुलोत्पन्ना राजा, ध्वजाच्या अग्रभागीं गर्जना करीत असलेल्या वृषभाच्या योगानें त्या रथाला इंद्रधनुष्यानें विराजमान असलेल्या मेघाप्रमाणें शोभा आलेली होती. तदनंतर आकाशामध्यें असलेले सिद्ध पूर्वींच्या पवित्र चारित्रांचा उल्लेख करून श्रीशंकराची स्तुति करूं लागले. तसेच सत्य निष्ठ आणि तपश्चर्येच्या योगानें शांतिसंपन्न झालेले ऋषि आणि अमृत प्राशन करणारे देवतांचे समुदाय यांनींही त्यांचें स्तवन केलें. हे राजा, पितृलोकामध्यें वास्तव्य करणाऱ्या, आनंदानें मुख विकसित झालेल्या, सुंदर अप्सरा आणि गंधर्व यांनींहि गायनाच्या रूपानें श्रीशंकराचें स्तवन केलें. याप्रमाणें संग्रामार्थ येऊन ठेपलेल्या देवतांना अवलोकन करतांच, तटबंदी आणि मोठमोठीं मंदिरें असलेल्या व शेंकडों शतघ्नीनामक आयुधांनीं युक्त असलेल्या, त्या सर्व प्राण्यांना भीति उत्पन्न करणाऱ्या नगरांतील दैत्य आणि दानव, देवांच्या द्वेषानें तीक्ष्ण टोकांच्या बाणानें वर्षाव करूं लागले. हे भरतकुलोत्पन्ना, त्या युद्धपटु दैत्यांनीं शतघ्नी, बाण आणि शूल यांच्या योगानें शत्रूंचा संहार करून मोठा पराक्रम गाजविला. त्यांनीं गदांनीं शत्रूंच्या गदांचा आणि बाणांनीं बाणांचा चुराडा उडविला. व आपल्या अस्त्रांनीं शत्रूंचीं अस्त्रें आणि मायांनीं माया कुंठित करून सोडल्या. पुढें दुसऱ्या कांहीं दैत्यांनीं बाण, शक्ति आणि परशु हीं शत्रूवर फेंकण्यासाठीं सज्ज केलीं. आणि पूर्वीं शेंकडों हजारों वेळ फेंकलेलीं महा भयंकर वज्रेंही उगारलीं. शत्रूंनीं मायावीपणानें निर्माण केलेल्या खड्गांच्या योगानें देव मृत्युपंथास लागले. अशा रीतीनें शत्रूंच्या बाणांच्या वर्षावानें देवतांचा प्राणनाश होऊं लागला. अशा वेळीं श्रीशंकर असलेला तो रथ गंधर्वनगराप्रमाणें दिसत होता. इटे, तरवारी, गुरगुंज इत्यादि शस्त्रांचा दैत्यांनीं त्याजवर भडिमार चालविला होता. त्या प्रचंड, अत्यंत बळकट आणि प्रेक्षकांस आश्चर्यचकित करून सोडणाऱ्या अनेक दैत्य-शस्त्रांनीं इंद्र व्याप्त होऊन गेला. तदनंतर, हे राजा, मध्यंतरीं एक दिव्य ध्वनि उत्पन्न झाला आणि, हे भरतकुलोत्पन्ना, ब्रह्मपुत्र आणि इतरही सर्व लोक पहात असतां, वस्तुतः कोणालाही पाडाव करतां न येणारा असतांही पराभूत झालेला श्रीशंकराचा रथ त्यांच्यापुढें भूमीवर उभा पडला. हे राजा, तो उत्कृष्ट रथ भूमीवर येऊन पडला असतां सर्व प्राणी धडाधड पडूं लागले. पर्वतांचीं शिखरें हालूं लागलीं, वृक्ष डळमळूं लागले, समुद्र खवळून गेले आणि दाही दिशा भयाण दिसूं लागल्या. तेव्हां वृद्ध ब्राह्मण उत्कृष्ट मंत्राचा जप करूं लागले. त्यांनीं योगसामर्थ्यानें अंतःकरण एकाग्र केलें. सर्वत्र जयप्राप्तीची इच्छा करणाऱ्या सर्व प्राण्यांना इहपरलोकीं शांति मिळावी म्हणून त्यांनीं तेजोमय वेदमंत्राचा जप चालविला. हे भरतकुलोत्पन्ना, पुढें जेव्हां ते परमात्मस्वरूपी अशा रथंतर संज्ञक सामाचा जप करूं लागले, तेव्हां ते तेजानें देदीप्यमान् भासूं लागले. हें रथंतर साम म्हणजे श्रीविष्णु, महात्मे श्रीशंकर, स्वेच्छेनुरूप वाटेल तें स्वरूप धारण करणाऱ्या सर्व बलिष्ठ देवता, आणि निर्जन वनामध्यें वास्तव्य करणारे तपस्वी ऋषि, यांचें मूर्तिमंत तेजच होय. अस्तु; पुढें महायोगी श्रीविष्णु यांनीं तात्विकदृष्ट्या चोहोंकडे अवलोकन करून वृषभाचें रूप धारण केलें. आणि त्या बलाढ्य वृषभरूपी श्रीविष्णूंनीं सामर्थ्य आणि शौर्य यांनीं पूर्ण संपन्न असलेल्या देवतांच्या समुदायांनीं दडपून गेलेला तो रथ शिंगांनीं

वर काढिला आणि मंथनकालच्या समुद्राप्रमाणें जोरानें गर्जना केली. पुढें उत्कृष्ट प्रकारचीं शिंगें असलेल्या त्या वृषभानें पृथ्वीच्या सभोंवतीं एकावर एक असलेल्या सात वायूंपैकीं तिसऱ्या वायूचा प्रदेश व्याप्त करून सोडिला. आणि पर्वकालीन प्रचंड सागराप्रमाणें भयंकर गर्जना केली. तेव्हां तिच्या योगानें संग्रामवधानें उन्मत्त झालेले ते दैत्य त्रस्त होऊन गेले आणि पुनरपि सज्ज होऊन त्या बलाढ्यांनीं युद्ध आरंभिलें. ते सर्वेही दैत्य अतिशय बलाढ्य आणि शौर्यसंपन्न असून धनुष्य घेऊन देवसैन्याला चुरडून टाकीत होते. तेव्हां अविनाशी अशा श्रीशंकरांनीं ज्याला उत्कृष्ट पातें आहे असा अग्निमय तीक्ष्ण ब्रह्मदंड संज्ञक बाण धनुष्याला जोडला. आणि त्याजवर ब्रह्मास्त्राची योजना करून तो प्रमाणाच्या अनुरोधानें तीन प्रकारची संज्ञा प्राप्त झालेल्या दैत्यांच्या नगरावर फेंकला. हे भरतकुलोत्पन्ना, त्या प्रभु श्रीशंकरांनीं उग्र तपानें परब्रह्माचे ठायीं आत्मा जडवून शौर्यानें तीन प्रकारचे बाण धनुष्याला जोडून दैत्यांच्या नगरावर फेंकले. हे बाण सर्वांचे प्राण हरण करणारे, देदीप्यमान, सुवर्णतुल्य, उत्कृष्ट रंगाचे आणि अतिशय स्वच्छ होते. ते उत्कृष्ट बाण जणूं भयंकर विषारी सर्पाप्रमाणें दिसत होते. त्या वेगवान् आणि अत्यंत प्रज्वलित अशा तीन बाणांनीं त्या दैत्यांच्या नगराचीं शकलें होऊन गेलीं. हे भरतकुलोत्पन्ना राजा, शरप्रहारानें प्रज्वलित होऊन त्या नगराचीं द्वारें आणि मंदिरें भग्न होऊन गेलीं आणि विंध्यपर्वताच्या शिखराप्रमाणें भूमीवर पडलीं. हे भरतकुलोत्पन्ना भूपते, तीं नगरें आंतून व बाहेरून अग्नीनें प्रदीप्त होऊन गेल्यामुळें वैडूर्य रत्नाप्रमाणें रंग असलेल्या पर्वताच्या शिखरांप्रमाणें दिसत होतीं.

असो; हे राजा, याप्रमाणें श्रीशंकरांनीं ब्रह्मास्त्राच्या योगानें तीं नगरें दग्ध करून टाकिलीं. अशा प्रकारें त्रिपुरवध होतांच देवांनीं आनंदानें असें वाक्य उच्चारलें कीं, "हे पुरुषोत्तमा, तूं माजलेल्या सर्वेही शत्रूंचा संहार कर." पुढें सामर्थ्य आणि शौर्यसंपन्न असलेल्या सर्व देवता, ब्रह्मदेव, श्रीशंकर आणि ब्रह्मदेवाच्याच तोंडींचे ऋषि यांनीं योगसामर्थ्यानें चकित करून सोडणाऱ्या महायोगी श्रीविष्णूचीच स्तुति केली.

## अध्याय एकशें चौतिसावा.

—:०:—

### वृत्तांतक्रमनिवेदन.

वैशंपायन म्हणाले:—राजा, या हरिवंशांत जे वृत्तांत क्रमानें सांगितले आहेत ते तुला आतां निवेदन करतों. त्यांत प्रथम प्राथमिक सृष्टि, पुढें प्राण्यांची उत्पत्ति हीं सांगितलीं असून पुढें वेन्याचें आख्यान, मनूंचें कथन, वैवस्वत कुलाची उत्पत्ति, धुंधुमाराची कथा, गालवाची उत्पत्ति, इक्ष्वाकु कुलाचा निर्देश, पितृकल्प, सोम आणि बुध यांची उत्पत्ति, कीर्ति वाढविणारा अमावसु वंशाचा वृत्तांत, इंद्राचा राज्यभ्रंश आणि पुनरपि राज्यप्रतिष्ठा, क्षत्रवृद्धाची उत्पत्ति, दिवोदासाची प्रतिष्ठा, क्षत्रिय त्रिशंकु याचा वृत्तांत, ययातीचें चरित्र, पुरुवंशाचें वर्णन, कृष्णजन्माचें निरूपण व स्यमंतक मण्याचें आख्यान, ही संक्षेपानें सांगितलीं असून पुढें श्रीविष्णूचे अवतार सांगितलेले आहेत. तदनंतर तारकामय युद्ध, ब्रह्मलोकाचें वर्णन, श्रीविष्णूचें योगनिद्रेंतून उत्थान, ब्रह्मदेवाचें वाक्य, पृथ्वीचें वाक्य, देवांचे अंशावतार, नारदाचें वाक्य, आर्यास्तुति, कृष्णजन्माचें सविस्तर वर्णन, श्रीकृष्णाचें गोकुलगमन, शकटपरिवर्तन, पूतनावध, यमलार्जुनभंजन, वृकद-

र्शन, वृंदावननिवेशन, वर्षाकालवर्णन, यमुनेच्या डोहाचें अवलोकन, कालियामर्दन, धेनुकभंजन, प्रलंबासुरवध, शरत्कालवर्णन, गिरियज्ञाची प्रवृत्ति, गोवर्धनधारण, श्रीकृष्णास अभिषेक, गोपिक्रीडा, अरिष्टासुराचा संहार, अक्रूरप्रेषण, अंधकाचीं वाक्यें, केशीचा संहार, अक्रूराचें आगमन, नागलोकाचें दर्शन, धनुष्यभंगनिरूपण, कंसाचें वाक्य, कुवलयापीडाचा वध, चाणूर, आणि अंधक यांचा नाश, कंसाचा मृत्यु, कंसस्त्रियांचा विलाप, उग्रसेनाभिषेक, यादवांचें आश्वासन, बलराम आणि श्रीकृष्ण यांचें गुरुगृहांतून प्रत्यागमन, मथुरेचा रोध, जरासंधाची निवृत्ति, विकद्रूचें भाषण, रामाचें दर्शन आणि भाषण, गोमंत गिरीवर आरोहण, जरासंध गमन, गोमंतगिरीचा दाह, करवीरपुरांत गमन आणि तेथें शृगालाचा वध, मथुरेकडे यमुनेचें आकर्षण, मथुरेहून अपक्रमण, उपायानें कालयवनाचा वध, द्वारकानिर्माण, रुक्मिणीहरण, रुक्मिणीविवाह, रुक्मिमरण, बलदेवाचें पवित्र आन्हिककर्म आणि माहात्म्य, नरकासुराचा वध, पारिजातहरण, पुनरपि विशिष्ट प्रकारानें द्वारकानिर्माण, द्वारकाप्रवेश सभाप्रवेश, नारदाचें भाषण, वृष्णिवंशाचें निवेदन, षट्पुरवधाचें आख्यान, मे·यकाचा उच्छेद, श्रीकृष्णाची समुद्रयात्रा, जलक्रीडोत्सव, वीर अशा यादवकुमारांचें मधुपान, श्रीकृष्णाचें छालिक्यसंज्ञक संगीत, भानुकन्या भानुमती हिचें हरण, शंबराचा वध, धन्योपाख्यान, वासुदेवाचें माहात्म्य, बाणासुरवधाचें सविस्तर वर्णन, भविष्यकथन, पुष्करप्रादुर्भाव वर्णन, वराह, नरसिंह आणि वामन या अवतारांचें सविस्तर वर्णन, श्रीकृष्णाची कैलासयात्रा, पौंड्रकाचा वध, हंस आणि डिंभक यांचा नाश आणि त्रिपुरसंहार.

याप्रमाणें, हे नरश्रेष्ठा, सर्व पातकांचा नाश करणारा हरिवंशांतील वृत्तांताचा हा संक्षेप आहे. हे कुरुकुलश्रेष्ठा, जो कोणी मनुष्य अंतःकरण एकाग्र करून धन, कीर्ति, आयुष्य. भक्ति आणि मुक्ति इत्यादि फल देणाऱ्या या वृत्तांताचें प्रातःकालीं व सायंकालीं श्रवण करील, तो सर्व मनोरथ पूण होऊन विष्णुलोकास जाईल.

## अध्याय एकशें पस्तिसावा.

—:०:—

### फलश्रुति व दानें.

जनमेजय म्हणालाः—हे मुनिश्रेष्ठा, हरिवंश पुराण श्रवण केलें असतां काय फल मिळतें व काय दान करावें लागतें, हें मला कथन करा.

वैशंपायन सांगतातः—हे भरतकुलश्रेष्ठा, हरिवंश पुराण श्रवण केलें असतां, कायिक, वाचिक आणि मानसिक जें पातक मनुष्यास घडलें असेल तें सर्व सूर्योदय होतांच नाश पावणाऱ्या बर्फाप्रमाणें नष्ट होऊन जातें. अष्टादश पुराणांच्या श्रवणानें ज्या फलाची प्राप्ति होते तेंच फल विष्णुभक्ताला हरिवंश श्रवणानें मिळतें. हरिवंशांतील अर्धा अथवा पावही श्लोक श्रद्धेनें श्रवण केला असतां विष्णुपदाची प्राप्ति होते. हे राजा, या कलियुगामध्यें जंबुद्वीपांत हरिवंश श्रवण करणारे दुर्लभ होतील हें मी तुला खरें खरें सांगतों. हा हरिवंश म्हणजे श्रीविष्णूची मूर्तिमंत कीर्ति असून पुत्रेच्छु स्त्रियांनींही त्याचें श्रवण करावें. यथोक्त फल मिळावें अशी इच्छा असेल तर श्रोत्यानें आपल्या शक्त्यनुसार वाचकाला तीन निष्क सुवर्ण दक्षणा द्यावी; आपल्याला श्रेय मिळावें अशी इच्छा असेल तर त्यानें सुवर्णशृंगी, सवस्त्र, कपिलवर्ण सवत्स धेनु वाचकाला अर्पण करावी, तसेंच, हे भरतकुलश्रेष्ठा, हातांतील व कानांतील अलं-

कार देऊन उत्कृष्ट प्रकारचें वाहन दान द्यावें. तसेंच, हे राजा, ब्राह्मणाला भूमिदान करावें. कारण, भूमिदानाच्या तोडीचें दान आजपर्यंत झालें नसून पुढेंही होणार नाहीं. जो मनुष्य हरिवंशाचें श्रवण करील किंवा दुसऱ्याला श्रवण करवील तो सर्व पातकांपासून मुक्त होऊन विष्णुपदास पावेल. हे भरतकुलश्रेष्ठा, तो स्वतःचा, आपल्या स्त्रीचा आणि अकरा पिढ्यांतील सर्व पितरांचा उद्धार करील हे राजा, हरिवंश श्रवण केल्यानंतर श्रोत्यानें त्यांतील श्लोकसंख्येच्या एक दशांश होम करावा. हे नरश्रेष्ठा, हें सर्व मीं तुजपुढें सांगितलें आहे. याचें केवळ स्मरण केलें असतांही मनुष्य सर्व पातकांपासून मुक्त होतो. पुत्र नसेल त्यास पुत्राची व द्रव्य नसेल त्यास द्रव्याची प्राप्ति होते. इतकेंच नव्हे, तर नरमेध आणि अश्वमेध यांच्या योगानें मनुष्याला जें फल मिळतें, त्या फलाची हरिवंशश्रवणाच्या योगानें खात्रीनें प्राप्ति होते. ब्रह्महत्या, भ्रूणहत्या, गोहत्या, मद्यपान आणि गुरुदारगमन अशा प्रकारचीं जरी पातकें घडलीं असलीं तरी हरिवंशाच्या एकवारही श्रवणानें मनुष्य त्यांपासून मुक्त होऊन शुद्ध होतो, यांत संशय नाहीं. हे राजा, हें श्रीकृष्णाचें अपार आणि आश्चर्यकारक महत्वपूर्ण माहात्म्य मीं तुला निवेदन केलें आहे. हें श्रवण करतांच मनुष्याला लोकांमध्यें अत्यंत दुर्लभ अशाही फलाची सत्वर प्राप्ति होते.



कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा बुध्द्याऽऽत्मना वाऽनुसृतस्वभावात् ।
करोति यद्यत्सकलं परस्मै नारायणायेति समर्पयेत्तत् ॥ १ ॥

इति विद्यातपोयोनिरयोनिर्विष्णुरीडितः ।
वाग्यज्ञेनार्चितो देवः प्रीयतां मे जनार्दनः ॥ २ ॥

काले वर्षतु पर्जन्यः पृथिवी शस्यशालिनी ।
देशोऽयं क्षोभरहितो ब्राह्मणाः संतु निर्भयाः ॥ ३ ॥

अपुत्राः पुत्रिणः संतु पुत्रिणः संतु पौत्रिणः ।
अधनाः सधनाः संतु सर्वे संतु निरामयाः ॥ ४ ॥

मनुष्य कायावाचामनेंकरून इंद्रियांनीं, बुद्धीनें आत्म्याच्या योगानें अथवा पूर्वसंस्कारांनीं अनुवृत्त झालेल्या स्वभावामुळें जें जें कर्म करीत असेल तें तें त्यानें सर्व नारायणस्वरूपीं परमात्म्याला अर्पण करावें. ॥ १ ॥

अशा रीतीनें वाग्रूपी यज्ञाचे योगानें अर्चन केलेला, विद्या आणि तप यांचें उत्पत्तिस्थान, जन्मशून्य आणि वेदादिकांनीं प्रशंसित, विश्वव्यापक देव श्रीविष्णु मजवर प्रसन्न होवो. ॥ २ ॥

वेळेवर पर्जन्यवृष्टि होवो, पृथ्वी धान्यानें सुशोभित होवो; या देशांत कोणत्याहि प्रकारची क्षुब्धता नसो. आणि ब्राह्मण निर्भय असोत. ॥ ३ ॥

अपुत्र पुत्रवान् होवोत, पुत्रवान् पौत्रयुक्त होवोत, निर्धन लोक धनी बनोत आणि सर्वच निरोगी असोत. ॥ ४ ॥



## REVIVAL OF THE YOGIC POWERS OF OLD.

## योगशक्तीचें पुनरुज्जीवन.

May an age of living faith and spiritual power succeed the present age of materialism and religious impotency, so that the socalled miracles of history may be reproduced as the Common facts of our own age. It is to be hoped that the world will again witness the spectacle of the doings of men and women who are endued with power from on High, or whose natural faculties and abilities are reinforced and augmented by an influence emanating from the Central life and the Omnipresent spiritual realm of Existence, intelligence and causation. The miracles will cease to be such, from their frequency, and lose the element of wonder, when science reveals the laws by which they are effected,

**सारांश**—हल्लींचा हा जडवादाचा व धार्मिक अवनतीचा काळ नाहीसा होऊन, प्राचीन इतिहास पुराणांतून पूर्वजांनीं केलेल्या ज्या अद्भूत व अतिमानुष चमत्कारांचें वर्णन आपण ऐकतों त्या चमत्काराचे शास्त्रीय गुह्य सर्वांस परिचित होऊन असले चमत्कार म्हणजे नित्यपाठांतल्या गोष्टींप्रमाणें होऊन जातील व स्वयंसिद्ध दिव्य शक्तींचीं मनुष्यें उपजूं लागतील; किंवा विशिष्ट बुद्धिमान् मनुष्यें सर्वव्यापि चैतन्यसिंधूशीं संयुक्त होऊन अदभूत सामर्थ्य युक्त होतील, असा काळ येवो ( येण्याचीं चिन्हे दिसूं लागलीं आहेत.

## FAITH IN GOD.

( ईश्वरभक्ति )

" He who would cure diseases of the mind and body, by psychic and spiritual force, must have faith iu God. when the disciples of Jesus found themselves unabie to cure a certain case of insanity and obsession, on inquiring the cause of their inefficiency, he replied, " Because of your unbelief. ', In another place he directed them, as a qualification for executing their commission to cure all manner of sickness and disease among the people, to have *faith in God*, or to have the *faith of God*,—a faith directly imparted. Such a faith is not only one of the essentials of a strong Volition, but connects the soul with the central life, and augments the power of every faculty of the human mind. It puts the soul in vital Conjunction with the divine omnipotence. The christian world has never fully understood the power of a living faith. Jesus affirms " *If thou canst believe, all things are possible to him that believeth.* " It reinforces human weakness with the divine creative power; without it, whatever qualifications we may possess, ' there shall be no might in thy hand. " It invests the soul with a serene consciousness of power, and there can be no substitute for the eternal caimness that closes round the mind of him who dwells in God. "

**सारांश**—ज्याला संकल्पमात्रानें इतरांच्या

आधिव्याधि दूर करणें इत्यादि अद्भुत शक्ति अंगीं याव्या अशी इच्छा असेल त्याचे ठिकाणीं प्रधान साधन म्हणजे 'अगाध ईशश्रद्धा,' पाहिजे. त्या श्रद्धेच्या जोरानें परमात्म्याशीं संलग्नता प्राप्त होते व त्यायोगें त्या अखिलशक्तिमंताचे तेजाचा प्रभाव भक्ताचे ठिकाणीं प्रकट होऊं लागतो, अर्थात्, त्या कर्तुमकर्तुमन्यथा कर्तुं समर्थ प्रभूचे शक्तीचे विलास त्याचे ठायीं आविर्भूत होतात. आणि साधक अखंड शांतिसुखांत नांदतो. परंतु, ईशश्रद्धेचे हें अद्भुत सामर्थ्य जीवांच्या ठायीं न ठसल्यानें ते दैन्य अनुभवितात; पण, हें दैन्य घालविणें हें प्रत्येकाचे हातीं आहे.

---

## OTHER NECESSARY ELEMENTS "

## ( उपांगें )

" The sublime calmness of an evenly balanced mind, the possession of a self respect resulting from intellectual and moral elevation, perfect self-control, and presence of mind, the power of concentrating the mental and will-force, a stubborn faith that is ready to grapple with seeming impossibilites, a facil. ity in adapting one's self to the condition and wants of all persons, a profound knowledge of human nature, an ardent love of doing good, and a spirit of kindness that condescends to the poor and longs to lift up the hands and call down a blessing upon every human being, are the essential elements.

**सारांशः**—सर्वत्र समचित्तत्व, अगाध शांति, उच्च बुद्धिमत्ता, व नीतिमत्ता, पूर्ण आत्मजय, प्रत्युत्पन्न-मतित्व, चित्तस्थैर्य, अपराजित असा दृढनिश्चय, परचित्ताभिनिवेश, सार्वत्रिक भूतदया, आचांडाल शुभेच्छा इत्यादि गोष्टी साधकाचे अंगीं अवश्य आहेत. त्यावांचून दैवी कृपा किंवा दैवी सामर्थ्य त्याचे अंगीं येणें शक्य नाहीं. म्हणून ह्या गोष्टी अंगीं आणण्याचा प्रथम यत्न केला पाहिजे.

---

## THE UNCREATE OR STILL.

## ( अव्याकृत )

In the uncreate are all things that ever were, that are or ever shall be.

The uncreate is a limitless, pulsating sea of energy, with currents and cross-currents, waves and ripples and depths of stillness.

**सारांशः**–भूत, भावि व वर्तमान हीं सर्वहि अव्याकृताचे पोटांत पूर्णपणें वसतात. अव्याकृत हें अनंत अमर्याद आहे. तो एक शक्तिसिंधु आहे. त्याचे पोटांत मोठमोठे ओघ, लाटा, तरंग, असून शांत असे ऱ्हदहि आहेत.

---

## THE PRANAVA OR OMKAR.

The first letter of the sacred word 'A' signifies the self, the second letter 'U' signifies the not-self, and the third letter 'M' signifies the everlasting relation, the unbroken nexus of Negation by the self of the not self between them.

According to this interpretation of the Aum, the full meaning of it would be the proposition. Ego–Non-Ego–Non ( est ), or I–Not I–Not ( am ) which sums up all the world-process into a single proposition and a single act of consciousness

—Bhagwandas.

## ॐकारवर्णन

**सारांशः**—ॐकारांतील प्रथमाक्षर "अ" हें आत्मवस्तूचें निदर्शक आहे. द्वितीयाक्षर "उ" हें अनात्म वस्तूचें निदर्शक आहे व तिसरें "म्" हें या उभयवस्तूंचा सनातन संबंध दाखवितें.

या दृष्टीनें पहातां अर्थातच या एका शब्दानें ब्रह्म, सृष्टि, व त्यांचें परस्पर संबंधित्व हीं दिसून येतात.

## CONCENTRATION.

Without concentration you can do nothing. Without concentration was not anything made that was made. All the force in the Universe amounts to nothing, if not concentrated.

Every object in the universe from an atom to a blazing sun, from amœba to man is in Existence as a result of concentration.

When the mind scatters, the body follows, for the two are one. You often hear people say " nothing seems to interest me. " All because, the habit of dividing the attention has become second nature.

Eternal youth is a result of continued concetration.

" *The Constitution of man* "

## चित्तैकाग्र्य.

**सारांशः**-चित्तैकाग्र्यावांचून कांहींच होणें शक्य नाहीं. त्या वांचून आजपर्यंत कांहीं झालेलें नाहीं. केवढाहि अफाट शक्ति असो, ती एकीभूत झाल्याशिवाय फुकट आहे.

या सृष्टींतील त्रसरेणूपासून प्रचंड सूर्यमंडलापर्यंतची प्रत्येक वस्तूही चित्तैकाग्र्यानेंच निर्माण झाली आहे.

शरीर हें चित्तानुसारी असल्यामुळें चित्त विक्षिप्त झालें असतां शरीरहि विकृत होतें. पुष्कळदां मनुष्यें म्हणतात 'काय करावें?'-कांहींच गोड लागत नाहीं. अशा माणसांना चित्तैकाग्र्य करण्याचें सामर्थ्य नसतें हेच कारण समजावें.

ज्याला चित्तैकाग्र्य साधेल त्याला अखंड यौवन हातचें आहे.

---

## PRANAYAM

## ( प्राणायामाचें महत्व )

All disorders of the human body and brain are due to shutting off the sun's rays before they can reach the *Solar plexus*—The deep and regular breather cannot be sick or mentrally weak.

He who breathes correctly approaches intelligence and will from the Sun. The freer his breathing the greater the degree of intelligent will. He who breathes freely acts freely, *He who breathes deeply, thinks deeply.*

Practise ( deep ) breathing even half as diligently as you have practised not breathing and you work out the *Salvation* that is within you.

If you will practise Pranáyam until you have made it a *habit* of thought, you will be a new creature; sorrow and melancholy, fears and fightings will have ceased for ever. Energy, ambition, power, joy, will have grown up in their place; your shrunken and bent body will have straightened up; you will stand with a curve extra in the Small of your back, intead of one curve at the shoulders, such as you had, when you were a monkey; you will walk with a spring on the ball of your feet, instead of coming down on your heels or shufling along the old ways; your eyes will be bright and steady and ready to look kindly into every other pair of eyes, your mouth will be straight instead of

dropping at the corners as in the old wailing days and your lips will be soft and sweet to kiss; your skin will be fresh and clear and your voice will ring out, like bells over quiet waters, instead of being smothered in your throat and tinctured with whines or snarls as of old; in short, you will be a new being, born again of the spirit and ready to live and love and do.

*Elizabeth.*

**सारांशः**—शरीराचे अनारोग्याचें मुख्य कारण सूर्यकिरणांचा कुंडलिनीपर्यंत प्रवेश न होणें हें होय जो खोल व दीर्घ श्वास घेतो त्याचे आरोग्य अखंड आहे.

\+ \+ \+ \+

प्राणायाम अंगवळणी पडे इतका जर त्याचा दृढाभ्यास कराल तर तुह्मी निराळेच बनाल. दुःख, शोक, भय, चिंता हीं तुम्हांला कायमचा रामराम ठोकतील; व त्यांच्या जागीं ओजस्विता, उत्साह, शक्ति, आनंद हीं उत्पन्न होतील. तुमचें वांकलेलें शरीर ताठ होईल. तुम्ही आज जे माकडांसारखे पोंक्ये झालां आहां ते छाती वर काढून चालूं लागाल. सारांश, तुमचीं सर्व इंद्रियें नवीं होतील व कांत टाकलेल्या सर्पाप्रमाणें तुम्ही नवे व्हाल. हें प्राणायामाचें महत्त्व आहे.

---

## PRANAYAM.

## ( प्राणायाम )

The Hindoos make measured breathing preliminary at almost every sitting. There is a world of discipline in their breathing exercises, and I cannot recommend them too heartily. Inhale, counting, say four; hold the same; count and exhale and rest the same. Modify this exercise from time to time. All well directed breathing exercises harmonize the system and fit you mentally for the more serious work. One of their exercises you will find at first quite difficult, but I feel I ought not to pass without mentioning it here.

Inhale deeply through the left nostril centering thought on the nerve current, or spinal colume, as if you were sending your breath through it, so that it may strike mentally on the last plexus, which they call the seat of the *kundalini.* Then hold for a short time and exhale slowly through the right nostril. This practice is conducive to repose or rest. If you have tired nerves, it will calm them down so that such peacefulness will come, that you will feel you have never before known what *rest* meant.

*Wilson.*

**सारांशः**—यांत विल्सन साहेबांनीं आपली प्राणायामाची रीति देऊन तिची अत्यंत तारीफ केली आहे. व हिंदुलोकांत 'प्राणायाम' ह्मणजे प्रत्येक धार्मिक क्रियेला आदिभूत धरिला आहे व हिंदुलोक प्रत्येक क्रिया प्राणायामपूर्वक करितात! असें ते मोठ्या कौतुकानें व आदरबुद्धीनें सांगतात. पण आह्मास त्याचें काय?

---

## 3 PRANAYAM.

"You will, by Pranayam, learn to store up more power as well as, to use less power. The Hindus, who have studied and practised this part of Physical and mental culture for thousands of years, speak of the breath as the most valuable help towards the storing of energy. Their word Prana is often confused with

breathing or breath; really it is a generic word for every kind of "energy."

*Eustace Miles.*

**सारांशः**—यूस्टेस माइल्स नांवाचे इंग्रज गृहस्थ आपले ( आर्यांच्या ) प्राणायामाची प्रशंसा करून ही पद्धत आमच्यांत हजारों वर्षांपासून चालू आहे, व तिच्या योगानें शरीरांत शक्तिसंचय दांडगा होतो असें सांगतात. व 'प्राण' याचा अर्थ केवळ श्वास असा नसून प्रत्येक प्रकारचें 'बल किंवा शक्ति' आहे असें म्हणतात.

---

## GLORIES OF LIGHT & COLORS
## वर्ण व प्रकाश यांचें वैभव.

In the year 1870 ( Says Dr. Babbit ) I commenced cultivating, in a dark room and with closed eyes, my interier vision, and in a few weeks or months was able to see those glories of light and colors which no tongue can describe or intellect conceive of, unless they have seen them. I saw many grades of violet and thermel and indigo of wonderful depth, and blue and red and yellow and orange, *more brilliant than the sun.* ××× Sometimes fountains of light would pour down towards one from luminous centers merging into all the irridescent splendors on their way. ×××..× What was more marvellous than almost anything else was the infinite millions of radiations, emanations and luminous currents which at times I would see streaming *from* and *into* and *through* all tnings and filling all fhe surrounding space with coruscations and lightning activities. I believe that if the amazing streams of forces which sweep in all direetions could be suddenly revealed to all people many would go wild with fright for fear they should be dashed to pieces.

**सारांशः**—डा. बॅबिट म्हणतो सन "१८७० साली मीं एका अंधारे खोलींत जाऊन व तेथें डोळे मिटून घेऊन अंतर्दृष्टि संपादण्याचा यत्न सुरू केला. व थोडक्याच आठवड्यांत किंवा महिन्यांत मला अवर्णनीय किंवा कल्पनातीत असे दिव्य वर्ण व तेजें दिसूं लागलीं. ते नैकविध वर्ण प्रत्यक्ष सूर्यापेक्षांहि अधिक भास्वर असत. आणि चमत्कार हा कीं यावद्वस्तूंच्या आंतबाहेर व्यापून असून त्यांतूनच बाहेर वाहतांना दिसत. या प्रमाणें त्यांनीं सर्व दिशा व्यापून टाकिल्या होत्या. मला वाटतें कीं हे दिव्य वर्ण व प्रकाश जर प्राकृत मनुष्यांच्या चर्मचक्षूंना एकाएकीं प्रकट झाले तर हे आपणांस आतां गिळंकृत करतील कीं काय अशी त्यांना भेदरी बसून ते भयानें सैरावैरा धांवूं लागतील."

वरील अनुभव वाचणारांनीं भगवंतांनीं अर्जुनाला आपलें दिव्यरूप दाखविलें असतां अर्जुनाचे उद्गार आहेत, ते सत्य कीं मिथ्या असतील हें आपल्याच मनाला विचारावें, अर्जुन म्हणतोः—

पश्यामि त्वां दुर्निरीक्ष्यं समंतात्। दीप्तानलार्कद्युतिमप्रमेयम् ॥ पश्यामि त्वां दीप्तहुताशवक्त्रं। स्वतेजसा विश्वमिदं तपंतं ॥ द्यावापृथिव्योरिदमंतरं हि व्याप्तं त्वयैकेन दिशश्च सर्वाः। दृष्ट्वाद्भुतं रूपमुग्रं तवेदं लोकत्रयं प्रव्यथितं महात्मन् ॥ नभःस्पृशं दीप्तमनेकवर्णं व्यात्ताननं दीप्तविशालनेत्रम्। दृष्ट्वाहित्वां प्रव्यथितांतरात्मा धृतिं न विंदामि शमंच विष्णो। तेजोभिरापूर्य जगत्समग्रं भासस्तवोग्राः प्रतपंति विष्णो॥

\+ \+ \+ \+

हें दिव्य वर्ण व प्रकाश पाहून डा. बॅबिट म्हणतो, मला भगवद्गीतेंतील पुढील वर्णन आठवतें:—

"The glory and amazing splendour of this mighty being, may be likened to the Sun rising at once into the heavens, with a thousand times more than usual brightness." &c. &c.

दिविसूर्यसहस्रस्य भवेद्युगपदुत्थिता ।
यदिभाःसदृशीसास्यात् भासस्तस्य महात्मनः ।
इत्यादि श्लोकांचेंच वरील इंग्रजी भाषांतर आहे. डा. बॅबिटला स्वश्रमानें जो दिव्य प्रकाश दिसतो तो आह्मांस खास दिसेल. परंतु गीतेची नुसती वाचणी करण्यापलीकडे आमची मजल जाईल तेव्हां सत्यप्रतीति येईल. हें वाचून तरी कोणी यत्न केल्यास आमचे श्रमाचें सार्थक झालेंसें होईल.

---

## OCEAN OF LIGHT.

## ( तेजोर्णव )

Miss Jay in 1856, in the presence of the Hon. Joshua R. Giddings and Stephen Dudley, Esq. in New-York, exclaimed as follows:—

I see a sea of light extending everywhere, a never fading light. *It is not the Sun or the Moon or the Stars;* oh, that I had the power to deseribe it ! I must call it divine light. It will never grow dim. I see no limit, but only an immensity of light. The Sun fades beside it. The source appears like light creating light.'

**सारांशः**—सन १८५६ सालीं न्यूयार्क शहरीं नामांकित गृहस्थासमक्ष मिस् जे ही एकाएकीं ओरडूं लागली कीं, 'ओ हो' याला काय म्हणावें, मला सर्वभर तेजाचा समुद्रच दिसतो आहे. आणि हें तेज कधींच मंदावत नाहीं. बरें, हें तेज नव्हे सूर्याचें, नव्हे चंद्राचें, नव्हे ताऱ्या-नक्षत्रांचें. काय करूं, मला त्याचें यथार्थ वर्णनच करितां येत नाहीं. मी तर याला ईश्वरी तेज म्हणतें. हें कधींच मंद होत नाहीं. बरें, याचा कोठें अंतहि दिसत नाहीं–अखंडदंडायमान असें सर्वत्र तेजच तेज पसरलें आहे. या तेजानिकट प्रत्यक्ष सूर्य फिका पडतो आहे. आणि प्रकाशाचा जसा झरा उसळतो आहे.

[ गीतेंतील वर्णन खरें कीं खोटें याचा वाचकांनीं विचार करावा. ]

## HOW TO DEVELOP THIS FINER VISION.

## ( दिव्य दृष्टी कशी साधावी )

One of the most practical Methods of developing these forces is *to sit somewhat* reclining in an easy position with the back to the north or a little north-east, have merely a dim light rather than otherwise, close the eyes, turn the eyeballs a little upward, if they can be held so without pain, and then steadily and gently make an effort as if to see. This can be practised for a half hour to an hour or so each time, and while doing so the thoughts should not be allowed to wander but the aim should be to see if lights, colours forms and motions make their appearance. If colours do not appear in a few days the prospect for clairvoyance is poor, unless assistance can be imparted by persons already developed. Dr. Fahnestock of Pennsylvania has developed what he calls Statuvolence or artificial somnambulism, which he says can be acquired by all in from one to twenty sittings while most of the persons who attain to it gain the *clear Vision*.

**सारांश**—ही शक्ति अंगीं आणण्याची अगदीं साधी युक्ति म्हणजे साधकानें उत्तरेस किंवा ईशान्येस पाठ करून कोंहींसें रेळतें व मोकळें बसावें, भोंवतीं अंधुक प्रकाश असावा ( अगदीं मिट्ट काळोख नको ). डोळे झांकावे, डोळ्यांतील बाहुल्या थोड्याशा वर फिरवाव्या, आणि कळ न लागतां तशाच ताठ ठेवितां येतील तर ठेवाव्या आणि तशा स्थितींत हळु हळु पण नेटानें आपण कांहीं तरी पाहतोंच आहों असा दृष्टीचा आंत रोंख धरावा. हा प्रकार खास

किंवा अर्ध तास चालवावा. तो चालू असतां विचारांचें भ्रमण अगदीं होऊं देऊं नये. मात्र अंतर्दृष्टीपुढें विचित्र वर्ण, आकार, प्रकाश किंवा हालचाली दिसतील तर तीं पाहण्याकडे लक्ष असावें. थोड्याच दिवसांत जर वर्ण दिसूं न लागतील तर अशा साधकाला वस्तादजीच्या मदतीशिवाय दिव्यदृष्टि प्राप्त होणें कठीण असें समजावें. अमेरिकेंतील पेनसिल्व्हेनियां प्रांतांतील फनेस्टाक नामक गृहस्थाला ही विद्या सिद्ध झाली आहे. व वीस बैठकींत या विद्येंत बहुधा विद्यार्थी तयार होतो व तो तयार झाला कीं बहुतकरून त्याला अतींद्रिय दृष्टि येते असें त्याचें म्हणणें आहे.

## MAGNETIC SLEEP NECESSARY ?

It is by no means necessary to get into this magnetic sleep in order to have this finer vision. Many can so cause the finer ethers of their brain to gain the ascedency over the coarser as to be able to see immediately, and without even closing the eyes, some learn to throw the animal forces away from the front brain by their will-power, meantime assisting the action by throwing *their eye-balls upwards and back* as in a sleeping condition. Those less devloped in the matter will frequently have to look at some object *in front or above them*, or thinking of some place intensely in order to draw the psychic forces sufficiently outward, and this in many cases a half hour, an hour, or more at a time.

**सारांश**—ही दिव्यदृष्टि येण्याला सर्वदा दुसऱ्याचे भारणीनें तंद्री आणणेंच अवश्य आहे असें नाहीं; पुष्कळजणांना केवळ स्वतःच्या इच्छाशक्तीनेंच ही स्वतःवर अल्पकालांत आणितां येते, आणि त्यांना डोळे मिटण्याचें देखील कारण पडत नाहीं. ते आपल्या इच्छाशक्तीनेंच मेंदूचे पुढील भागांतील चेतनशक्ती मागील बाजूस खेंचतात व या क्रियेस साह्यभूत म्हणून, निद्रेतल्याप्रमाणें डोळ्यांचीं बुबुळें वर चढवून उरफाटतात म्हणजे झालें. ज्यांची इतपत तयारी नसेल तर त्यांना प्रथम कांहीं वेळ आपल्या समोरच्या किंवा डोकीवरल्या एकाद्या पदार्थाकडे तास अर्धा तास टक लावून पहात बसावें लागतें. किंवा एकाद्या दूरच्या स्थलाबद्दल अत्यंत निदिध्यास धरावा लागतो.

## THIS FINER VISION EXALTS ONE'S CONCEPTION.

## ( या दृष्टीनें कल्पनांस उदात्तत्व चढतें )

These finer interior views...show that there are *Universes Within Universes*, and that the condition of things which we inhabit is not the real Univese, but the mere shadowy outer shell of being, while the real cosmos is so much more intense and swift and powerful than the grosser grade of materiality around us that the latter compares with the former somewhat as a mist compares with a solid substance. And yet there are those who think that this lower universe is all that there is for man, while the sublimer realms of existence are to go to waste as a worthless thing. Even so low a grade of being as a chrysalis can awaken from its coffin and move off into the sun-light, but man standing upon the very pinnacle of nature, and the natural master of its domains must vanish in eternal oblivion according to these theories before the possibilities of things around him.

सारांशः—ह्या दिव्य प्रकाशाचें दर्शनानें मनुष्याचे विचार उदात्त होतात; व आपणास चर्मचक्षूला दिसणारी ही बाह्य जड सृष्टि ही खरी सृष्टि नसून ही केवळ भासरूप किंवा छायारूप आहे व खरी सृष्टि ती दिव्यस्वरूप असून अनंत ब्रह्मांडात्मक व सघन आहे असा अनुभव पटतो. परंतु, खेदाची गोष्ट ही कीं, लाखों मनुष्य जन्मास येऊन खावें, प्यावें आणि मरावें या पलीकडे कांहींच करीत नाहींत, सुरवंटासारखा मूढ कीटक, पण तोहि आपल्या कोशांतच अखंड गुरफाटून न पडतां सपक्ष होतो व सूर्यप्रकाशांत उडूं लागतो;आणि आह्मापैकीं कोटों मनुष्य, प्रकृतीच्या डोक्यावर चढून दिव्य विलास अनुभवण्यास योग्य असे त्यांस देवानें घडविले असूनही 'जन्मा आला हेला आणि पाणी वाहतां मेला' अशाप्रमाणें जन्मांतून फुकट जातात, याहून अधिक शोकावह तें काय?

## MANY CAN SEE THESE HIGHER COLOURS.

## ( हे वर्ण पुष्कळांस दृश्य आहेत. )

Thousands of persons are able to see these finer grades of colors, and some much more easily and clearly than myself. Some can see them with the eyes wide open in broad day light and that while in the midst of company or surrorunded by the turmoil of daily cares. An eminent legal friend informed me, that he had seen these colors in all their splendor for many years, but at first he found it necessary not only to *close his eyes* but put a bandage over them before he could witness them. A wellknown judge informed me that he could often tell the general character of a speaker's thoughts before they were uttered from the colors of these emanations.

सारांश—हे दिव्य व तैजस वर्ण शेंकडों माणसांना दिसूं शकतात व दिसतात. कित्येकांना तर प्रकृत लेखकापेक्षां अधिक स्पष्टतेनें व अनायासानें दिसतात. लेखकाच्या एका कायदेमित्राला हे दिव्यवर्ण अनेक वर्षांपासून दिसतात; मात्र आरंभीं कांहीं दिवस हे वर्ण दिसण्याकरितां त्याला डोळे मिटून धरून पट्या बांधाव्या लागत. एका जज्जाचें म्हणणें कीं साक्षीदार मजपुढें येतांच त्याचे शरीरापासून उठणाऱ्या वर्णांवरून तो बोलण्याचे पूर्वीच मला त्याचे साक्षीचें रूप समजे, इत्यादि अनेक उदाहरणें मुळांत दिलीं आहेत.

## COLOUR RADIATIONS OF THE BRAIN.

## ( मेंदूंतून उठणारे वर्ण. )

In the base of the brain ( the animal loves ) the colours are a dark red, and in persons of very low nature almost black, while in the upper brain the colours assume a yellow tint, and are far more brilliant. In a high nature, the colors over the moral and spiritual powers are almost dazzling, with the yellow tint nearly merged into white and far more exquisite than sunlight. In the higher front brain, the region of the reasoning intellect, blue is the predominant color and is higher as it approaches the top brain and a darker blue as it comes down to the perceptives ( over the brow ) and a little touch of the violet in its outer edges. Benevolence emits a soft light green of indescribable beauty. Over firmness the colour is scarlet and over self-esteem, purple. As you move down the sides of the head from the moral powers towards the lower loves, it becomes orange, then red, then dark. Low

natures some-times emit such a dark cloud from the base of the brain as though I could scarcely see them. When a person laughs or sends forth happy thoughts it causes a dancing play of bright colours; but when in violent passion a snapping and sparkling red is emitted."

**सारांश**—मिसेस मिनि मर्टन ह्मणते कीं, मनुष्याच्या मेंदूचे तळभागाचा वर्ण काळा-तांबडा असतो त्यांतूनहि तो मनुष्य नीच प्रवृत्तीचा असेल तर बहुतेक काळाच वर्ण असतो मेंदूचे वरील भागाचा वर्ण पिंवळसर असतो व अत्यंत तेजस्वी असतो.

* * * *

अति नीच वृत्तीचे मनुष्यांचे डोळ्याभोंवतीं असल्या काळया कुट रंगाचा ढग उभा राहतो कीं, त्यांतून कांहीं न्याहाळतच नाहीं. जेव्हां एकादा मनुष्य हंसतो किंवा सुविचार प्रकट करितो तेव्हां त्याचे भोंवतीं झगझगीत वर्ण नाचतांना दिसतात. तोच क्रोधाचे आवेशांत असल्यास जळजळीत लाल रंग उमटतो.

[ आमचे योगग्रंथांत पृथिव्यादि पंचतत्वें, सत्व रजस्तमादि गुण, देहांतलि षट्चक्रें, मनोवृत्ति त्याच प्रमाणें गायनांतील रागरागिण्या या सर्वांचे विशिष्टवर्ण दृष्टीस पडतात, म्हणून वर्णनें आहेत, तीं मिथ्या नव्हत, हें वाचकांनीं लक्षांत घ्यावें. त्याचप्रमाणें नीच वृत्तींनीं मलीन, काळसर असे वर्ण उमटतात व सद्वृत्तींचे वर्ण दिव्य व आल्हादकारक असतात, यावरून सुविचारांचें महत्त्व, व ईर्ष्या, द्वेष, कलह, असूया, मत्सर, क्रोध, लोभ, काम इत्यादि दुष्ट मनोविकारांचें त्याज्यत्वहि ध्यानांत बाळगावें. ]

---

### " ALL THINGS RADIATE THEIR OWN CHARACTER. "

### ( वस्तुमात्र आपली छाप मारितें. )

All things radiate their own character upon all surrounding objects, so that sensitive human beings can often describe them minutely. Prof, Denton gives an an account of two ladies who on beholding a piece of matter from the ruins of Pompei, saw belching fire and smoke, and seemed to be almost fightened at the excitement and turmoil which was indicated thereby and this, when the object was covered with a paper and they were certainly uncons-cious of where it came from. Dr. Buchanan has shown in many cases in his lectures before medical classes how drugs merely held in the hand will produce the same symptoms on most persons that they would if taken internally only in a milder form, and has fomd in very many places persons sufficiently sensitive to read the character of another from an object which thay have handled, especially from a letter which they have written.

One of the eminent lady physicions of New York received a salary of 3000 per annum from a Life Insurance Co. on account of possessing this quality of character-reading. A gentleman of a remarkabiy vigorous appearance had passed the examination of the physician of the company, and was pronounced as sound as a bullet. " He wished to be insured for 10,000. Before accepting of his case, however, they handed a little slip of paper with some of his writing on it to the lady. Almost immediately, coming into rapport with the subject by means of the emanations from the paper, she declared that he would be a dead man within eight weeks, and warn-

ed them against taking him. They asked him to defer the matter. Seven weeks and two days after, the President of the company came with much excitement to the residence of the lady, and informed her that the gentleman had fallen dead with heart disease, on his own door-step that morning. In another case, a southern gentleman applied for an insurance policy of Rs. 10,000. This lady, on examining his autograph, saw a certain melancholy and diseased condition, which, she declared would lead him to commit suicide and advised them against taking his case. They concluded to risk it however, and so lost their money, as he committed suicide the same year in Virginia.

**सारांश**—या सृष्टींतील प्रत्येक वस्तु आपल्या स्वरूपाची छाप आपल्या संबंधी पदार्थांवर मारीत असते व दिव्यदृष्टीचे मनुष्यांस त्याचें पूर्ण ज्ञान होऊं शकतें. प्रो० डेंटन सांगतो कीं, अतिपुरातन काळीं ज्वालामुखीनें दग्ध झालेलें जें पॉंपी शहर त्या शहराचे दग्ध पदार्थांपैकीं एक तुकडा कागदांत गुंडाळून मीं असल्या दृष्टीच्या दोन स्त्रियांपुढें ठेविला. त्यांना तो तुकडा कोठचा, कशाचा ही श्रुतवार्ताहि माहित नसतां, तो पाहतांच जणूं कांहीं आपले नजीक आगीचे व धुराचे लोळ उठले आहेत असें म्हणून त्यांनीं घाबरून जाऊन एकच कल्होळ मांडिला. कारण, त्या जळक्या तुकड्यावरून त्या दोन हजार वर्षांपूर्वी पेटलेल्या शहराचा जळतांचा देखावा त्यांचे दृष्टीपुढें मूर्तिमंत त्या क्षणीं उभा राहिला. ( या ईश्वरी मायेला काय म्हणावें, व संगतीचा परिणाम जडांवर जर ऐवढा होतो, तर चेतनावर किती होत असेल,व सत्संगति व कुसंगति यांचे महत्व किती आहे. हें वाचकांनींच पहावें. )

* * * *

एकादे गृहस्थाचे हातचा लेख पाहतांच त्या गृहस्थाचा यावत् वृत्तांत तेवढ्या अक्षरावरून स्पष्ट कळून येतो, अशीं माणसें आहेत.

न्यूयार्क एथें असल्या दिव्यदृष्टीची एक स्त्री वैद्य होती. तिला एका आयुष्याचा विमा उतरणाऱ्या मंडळीनें फार मोठा पगार देऊन ठेविलें होतें. एकदां त्या कंपनींत विमा उतरण्याकरितां एक धडधाकड गृहस्थ आला. कंपनीचे डाक्टरांनीं त्याची शारीरिक तपासणी करून हा तोफेच्या गोळ्यासारखा दणदणीत आहे म्हणून मत दिलें. नंतर, सदर गृहस्थानें लिहिलेली एक चिठी होती ती कंपनीचे अध्यक्षानें या स्त्रीपुढें टाकून तिचा अभिप्राय विचारला. ती चिठी पाहतांच त्या स्त्रीनें सांगितलें कीं, हा गृहस्थ दोन महिन्यांहून पुढें जगणार नाहीं. त्यावरून कंपनीनें त्या गृहस्थास दोन महिने थांबण्याविषयीं लिहिलें. त्याला त्यांतील हेतु माहित नसल्यानें त्यानें ती गोष्ट कबूल केली. या गोष्टीस सात आठवडे व दोन दिवस लोटतात तों कंपनीचा अध्यक्ष धांवतच त्या स्त्रीचे घरीं येऊन तिला म्हणाला ' तुमचें भविष्य खरें झालें, तो गृहस्थ त्याचे दाराचे उंबरठ्यांतच काळजाचे रोगानें मरून पडला.' याच बाईला दुसऱ्या एका विमा उतरूं पाहणाराचें हातचें पत्र दाखविलें असतां, याचा विमा घेऊं नये, कारण हा लौकरच आत्महत्या करील असें ती म्हणाली; पण कंपनीनें तें न मानून त्याचा विमा घेतला. परंतु, चमत्कार हा कीं एका वर्षाचे आंतच त्या गृहस्थानें व्हर्जीनिआ प्रांतांत जाऊन आत्महत्या केली !

१ आमच्या ऋषींच्या त्रिकालज्ञतेच्या गोष्टी मिथ्या म्हणणारांनीं अंमळ जपून बोलावें.

## CLAIRVOYANCE.

### ( दिव्यदृष्टि )

Clairvoyance means no more than clear seeing, that is to say, with the eyes of the mind, in some mysterious fashion, which has nothing to do with optics, but never theless, is a bonafide perception of actual things.

Clairvoyance is a faculty as old as the world.

This faculty gives to some of its votaries the power of examining the structure of atoms far too small for any microscopic investigation. This power is equally good in examining the world's history in long past ages.

*Sinnett.*

**सारांश**-दिव्यदृष्टि म्हणजे अतींद्रिय किंवा अंतर्दृष्टि. हिचा बाह्यदृष्टीशीं किंवा चर्मदृष्टीशीं कांहीं संबंध नाहीं. तथापि चर्मचक्षूंप्रमाणेंच तिच्या योगानें दिसणाऱ्या वस्तु प्रत्यक्ष असतात, काल्पनिक नसतात. ही दृष्टि या जगतांत सृष्टीचे आरंभापासूनच आहे. या दृष्टीचे जे उपासक आहेत त्यांना अत्यंत सूक्ष्मदर्शक यंत्राला अगम्य असे जे त्रसरेणूंहून सूक्ष्म भाग त्यांची ही घटना तपासून पाहण्याचें सामर्थ्य येतें. त्याप्रमाणेंच या दृष्टीच्या योगानें लाखों-नव्हे-कोटों वर्षांपूर्वीच्या गतकालचा इतिहास आजच्याप्रमाणें ढळढळीत दिसतो.

---

## CLAIRVOYANCE.

## ( दिव्यदृष्टि )

Clairvoyance frequently commences by the sleeper's seeing the operator's hand. The eyelids if opened forcibly, will show the eye turned upward and back, so that the pupil cannot be seen at all in many cases, and when it can, it is fixed and motionless, showing that sight must be caused by some inner vision. " The clairvoyant seems to go to a place mentally or rather to float on the air for a while, when all at once he will exclaim "now I am there and will thus describe distant cities which he has never seen. When altogether ignorant of anatomy, he sees in all their beauty and marvellous perfection the muscles, vessels, bones, nerves, glands, brains and other viscera, and describes the minutest ramifications of nerves and vessels with an accuracy surpassing that of the most skilful anatomist. He will trace any vessel or nerve in its most complex distibution; *the whole to him is transparent* bathed in delicate light, and full of life and motion. "

**सारांशः**--दिव्य अंतर्दृष्टीचे मनुष्याला तंद्री आल्यावर त्याचे डोळे जर मुद्दाम कोणी उघडून पाहील, तर त्यांचीं बुबुळें बहुतेक उरफाटलेलीं व आंतील बाहुलीही पार आंत गेलेली अशा स्थितींत आढळतील. कदाचित् बाहुली दिसलीच तरी ती ताठ व निश्चल असते. अर्थात् यावेळीं चर्मचक्षु निरुपयोगी असून त्याला सर्व कांहीं अंतर्दृष्टीनेंच दिसत असतें. अशा स्थितींत तो पूर्वी कधीं न पाहिलेल्या दूरस्थ वस्तूंचें व मोठमोठ्या शहरांचेंहि व्यवस्थित व हुबेहुब वर्णन देतो. त्याचे शरीरांतील शिरा, नाड्या, धमन्या, स्रोतें यांच्या सूक्ष्म गती व शाखा यांचें वर्णन तो इतकें बिनचूक देतो कीं तें ऐकून शरीररचनावेत्ते तोंडांत बोटें घालून राहतात. पण यांत नवल किंवा अविश्वसनीय असें कांहींच वाटण्याचें कारण नाहीं. कारण, त्याला हें शरीर म्हणजे कांचेच्या पिंजऱ्याप्रमाणें पारदर्शक असतें. व त्यामुळें त्याचे दृष्टिपुढें त्यांतून कांहींच लपत नाहीं.

[ चीरफाडीवांचून आमच्या अतींद्रिय द्रष्ट्या ऋषींनीं शारीर लिहिलें असल्यास त्यांत असंभाव्य काय म्हणावें ? ]

---

## CHARGING OF WATERAND OTHER SUBSTANCES.

## ( पाणी इ० भारणें. )

Dr. Ashburner says:--The fact stated here has been exhibited in my house hundreds of times. Water

has beens *Magnetized with Magnets, Mesmerised with the fingers, by breathing,* by the exertion of the will: over and over again the tumblers in which these odyllically healed quantities of water have been contained, have been instantly detected by somnambulist in the lucid state of sleepwaking. who have been in another room when the fluid was charged.

**सारांशः**--डा० ॲशबर्नर म्हणतो; १ लोहचुंबकाचे योगानें, २ अंगुलिस्पर्शानें, ३ फुंकरानें किंवा ४ निव्वळ इच्छाशक्तीनें पात्रांतील पाणी भारण्याचे प्रयोग खुद्द माझ्या घरांत हजारों हजार वेळा करून पाहिलेले आहेत. आणि त्यांतहि विशेष गंमत ही कीं आपण पलीकडील बंद केलेल्या खोलींत योगदृष्टीच्या मनुष्याला बसवून त्याला नकळत इकडे माजघरांत कोणत्याहि पद्धतीनें एकाद्या भांड्यांतलें पाणी भारावें आणि नंतर त्या मनुष्याला बाहेर बोलवावें, म्हणजे भारलेले पाण्याचेच भांड्यावर तो नेमका हात ठेवी.

---

## THE PHILOSOPHY OF AMULETS AND CHARMS.

## ( दोरे ताईत वगैरेंची उपपत्ति )

It has been fouud that the odyllic and psychic influence may be imparted to various inanimate and inorganic substances, which will retain it for an indefinite length of time. Our clothing, the houses we dwell in, the beds on which we sleep and every object we handle, or that comes in contact with our persons, as has been before remarked, is impregnated with our bodily and mental effluvia. The emanating sphere pervades, and as it ware animates these otherwise inanimate objects with our spiritual and physical life. And when held in hand by a good sympathetic clairvoyant or psychometer they affect him with our states, and give him a perception of our character, even after the lapse of many years, We leave the impress of our life upon every thing around us, and the psychometric sense is adequate to read the record. Various objects may be so pervaded with our psychic influence as sensibly to affect another person, especially when in the impressible state. This is the philosophy of amulets and charms. Their influence after being charged with the psychic and odyllic force of another, is far from being wholly imaginary. It may be as real as any of the phenomena of chemistry. These objects worn about the person, exert a secret, and sometimes, in the case of persons of much sensitiveness, a powerful influence.

Various substances may be used for this purpose. A letter written to a patient is highly charged with a psychological force. It produces a tanative influence, sometimes far beyond that of any medicine. It is pervaded with the life and soul principle of the writer.

Of all substances, water seems to be the best adapted to this use. Mesmer asserted that water could be magnetised, but the idea was met with ridicule;-the fate of nearly all new discoveries. The Experi-

ments of Reichenbach confirmed the truth of Mesmer's remark and placed it on a scientific basis. Dr. Gregory made thousands of experiments and found the truth of the same.

To charge a tumbler of water with the psychic influence requires a minute or two of time. Place the glass upon the palm of the left hand, and bring the fingers and thumb around the sides. Then hold the palm of the right hand over the top, moving it occasionally, at the same time gazing into it and directing your will-force to it. You will feel a sensation of heat in the hollow of the hand which is held over the tumbler. The fingers of the positive hand may be placed together and their points held near the water. This concentrates the psychic force of the hand into it. A magnet can also be so employed, but the hand is to be preferred.

**सारांश**--हें आत्मिक तेज किंवा शक्ति जड पदार्थांत घालून त्यांना दीर्घकाल टिकणारें असें कृत्रिम चैतन्य देतां येतें. अंगावरची वस्त्रें, राहातें घर, निजायचे बिछाने, किंवा आपल्या हातानें वापरलेली किंवा अंगाशीं संस्पृष्ट झालेली कोणतीहि वस्तु हें चैतन्य धारण करूं शकतें; व जो दिव्यदृष्टीचा मनुष्य असेल त्यांचे हातीं गेल्यास त्याला शेंकडों वर्षांनंतरहि आपला यावत् इतिहास सांगते ! आपली छाप अनेक पदार्थांवर उठते. ताईत, भालदोरे वगैरेंतील रहस्य तरी हेंच आहे. या कामीं पाणी हें सर्व द्रव्यांत श्रेष्ठ आहे. मेस्मर जेव्हां असें बोलला तेव्हां लोकांनीं त्याची टर केली. कोणी कांहीं नवीन वस्तुस्थिति काढिली कीं त्यांचें हें कपाळच. पुढें रिशेनबेकनें मेस्मरचे म्हणण्याची सत्यता शेंकडोंदां अनुभविली. त्यानंतर डा. ग्रेगरीनें तर कमालच केली.

हें पाणी भारण्यास दोन मिनिटें पुरतात. एका भांड्यांत पाणी घालून तें डावे तळहातावर ठेवावें व त्या हाताचा अंगठा व बोटें त्या भांड्याचे भोंवतीं आणावीं. नंतर उजव हाताचा तळवा त्या पात्रावर धरावा, तो मधें मधें काढून त्या पात्रांतील पाण्याकडे टक लावावी आणि त्याचवेळीं आपल्या इच्छाशक्तीचा ओघ सारखा त्या पाण्यावर सोडावा. असें चाललें असतां पात्राचे तोंडावर उपडा धरलेल्या तळहाताचे पोकळींत उष्णतेचा भास होऊं लागतो. उजवे हाताचीं बोटें जुळून त्यांचे शेंडे पात्रांतील पाण्याच्या वर धरावे. या योगानें आत्मिक शक्ति एकीभूत होऊन हातांतून उतरते. हें काम लोहचुंबकानेंहि भागतें. तथापि, हाताचा उपयोग अधिक चांगला.

---

## OPAQUE BODIES BECOME TRANSPARENT.

## ( तमोमय पदार्थ पारदर्शक होतात )

Mlle. Atzmannsdorfer in the "State of somnambulism" saw "the glowing steel transparent almost like glass." "Friedrich Weidlich saw the flame in air two inches long. I then sank the magnet, lying in a glass basin, into water. The flame (for the most part) instantly disappeared, but he saw the magnet glowing and translucent almost like the glass itself." "Metals in the odylic glow, appear to sensitives translucent, glowing through and through hollow balls." A mercantile gentleman of my acquaintance, in New York, can become so *enrapport* with these finer grades of light, as to be able to *see through the human body as though it were made of glass.* Here, then, is the philosophy of clear-seeing or *clairvoyance*, although many have the faculty so

feebly developed that they are liable to commit mistakes.

सारांशः—अग्रमॉन डारफर हिला मोहिनी निद्रेचे वेळीं जळतें पोलाद हें कांचेप्रमाणें पारदर्शक दिसलें. विद्युल्लिक याला तर दोन इंच ज्वाला हवेंत दिसली. पुढें तो लोहचुंबक पाण्यांत बुडवितांच त्याची ज्वाला विझली खरी, पण तो कांचेप्रमाणेंच चकाकित व पारदर्शी झाला.

न्यूयार्कमधील एका व्यापाऱ्याला या दिव्य तेजाशीं संलग्न होण्याची खुबी साधली आहे. त्यायोगें त्याला आपले ह्या मानवी शरीरांतील सर्व गोष्टी कांचेचे घरांतल्याप्रमाणें आरपार स्वच्छ दिसत यावरून दिव्यदृष्टी ही निर्विवाद आहे. आतां ज्यांची ही दृष्टि पूर्णतेला आली नाहीं अशांचे हातून पुष्कळदां अनर्थ होतात ही गोष्ट वेगळी.

## STILLNESS.
## शांति.

'Be still and know' is not a command; it is a simple statement of truth. Knowledge from within cannot come to us unless we are still nor can it come if we doubt or fear. To open the way that it may come, with stillness we must combine trust folloing that as a heritage, wlll come patient receptive listening.

सारांशः—'शांत रहा आणि ज्ञान मिळवा.' ही आज्ञा नसून हा ज्ञानार्जनाचा सरळ सरळ मार्गच सांगितला आहे. आपण अंगीं अगाध शांति आणि त्याशिवाय आणि मन निःसंदेह आणि विश्वस्त असल्याशिवाय आंतरज्ञान हें प्रकट होणारच नाहीं. अध्यात्मज्ञानाचा मार्ग खोलणें तर शांति व विश्वास यांचा पूर्ण मिलाफ झाला पाहिजे. तो झाला म्हणजे आंतून उमटेल तें कान पाहून ऐकणें हें ओघानेंच येईल.

## श्रद्धा व आत्मज्ञान.

To appropriate God, it is first to know and believe in God. Considered as a great impersonality, you can reach out to that force surrounding you, knowing your real self to be of it, one with it and then only you appropriate what is your own.

To know oneself is to recognise one's divinity to be acquainted with one's own soul. That is the highest the truest religion.

सारांशः—देव आपलासा करणें तर प्रथम त्याला ओळखून त्यावर विश्वासलें पाहिजे. तो निराकार असून तुझ्या आंत बाहेर सर्वत्र व्यापून राहणारा शक्तिमय आहे. व तुझा खरा आत्मा, तद्रूपच नव्हे तोच आहे, हें जेव्हां तुला पक्कें बिंबेल तेव्हांच तुझें देवत्व प्रकट होईल.

आत्मज्ञान म्हणजे स्वतःचें देवत्व अनुभवणें आणि हाच कायतो परमोच्च धर्म आहे.

## FAITH.
## विश्वास.

Faith is the key that unlocks the treasure-house of the universe. This is a conclusion which may be rightly drawn from each and every religion. This is a single kernel of truth they all contain. The path to the end is through the gateway of faith. If the faith be absolute, the result will come, note carefully please, if the faith be absolute the result will come, whether it be a blind or an intelligent faith.

सारांशः—विश्वास किंवा श्रद्धा ही हें विश्वभांडार खोलण्याची किल्ली आहे. प्रत्येक धर्मांतील सार हेंच आहे. श्रद्धा हें परमपदाचें द्वार आहे. ही श्रद्धा जर निर्वाणी असेल तर इष्टप्राप्ती झालीच पाहिजे. मग ती श्रद्धा खुळी असो कीं समंजस असो. मात्र ती निर्वाणी–निरतिशय असली पाहिजे, हें विसरतां कामा नये.

## A SPIRITUAL BODY.
## लिंगशरीर.

In my own experience I have met several who at times have been able to look upon there own bodies which were lying near them and occasionally have found difficulty in re-entering them. These would be connected with shining life cords with their own bodies and sometimes would see the indescribable radiance of the inner world. Dr. Cleaveland speaks of a carpenter who fell from the staging of a building to the ground. "As I struck the ground" said he "I suddenly bounded up, seeming to have a new body, and to be standing among the spectators, looking at my old one. I saw them trying to bring it to me. I made several friutiess attempts to re-enter my body, and finally suceeded." Is not this a most cheering thought, giving tokens of immortal life and a more beautiful existence to those who have become innately beautiful? Our outward flesh easily becomes corrupt or worm-eaten and at death is disintegrated. But this inner body is finer than light itself or any known ethers, and have no clements of decay in it, must continue to live.

सारांशः—असे कित्येक लोक पाहण्यांत आहेत कीं जे हें शरीर सोडून वाटेल तेव्हां बाहेर जातात व पुनः इच्छेबरोबर त्यांत प्रवेश करितात. डा. क्लीवलंडनें एका सुताराची गोष्ट दिली आहे. हा सुतार परांच्यावरून खाली आदळला असतां देहापासून सुटून वेगळा झाला व तिन्हाईताप्रमाणें आपल्या देहास बराच वेळ पाहून मग मोठ्या कष्टानें परतला. अशी जर स्थिति आहे तर हा हाडामांसाचा नासकां देह जरी पडला, तरी खेदाजोगें काय आहे?

---

## ILLUSION.
## माया.

The illusion is not that the earth exists, but that it exists apart from man and his need of it. Were the whole race capable of lifting itself suddenly in an instant of time above the sphere of desire, the earth would crumble to pieces and vanish away. The forces and beings which are engaged in serving the desire of man by keeping it together for him would be released from their task and immediately all that is visible to our physical sight would change its character permanently. The solidity and hardness of matter which appear to the physical man among the most absolutely certain factors that present themselves to his conscionsness, are complete illusions produced by the influence of invisible beings on the brain of the man himself. The qualities of solidity, hardness and straightness are less essily apprehended by a psychic who is accustomed to consciously leave his body, than by the man who believes himself to be imprisoned.

From the moment when the man has glanced across the threshold and retained the memory of so doing, he loses all fear of the pair of oppositics, that fear which lies like

a pall upon the race. The words life and death as used by men in ordinary life, have no longer any meaning for him, because ha has caught sight for himself of that which is beyond the threshold of physical concionsness.

When once his physical brain has recognised that the earth and its powers and pleasures exist purely as an illusion in that brain, he will without pause or hesitation cease to walk up and down within such an imaganary limitation and will enter upon the open road of progress. This will lead him over the threshold of physical consciousness and over successive thresholds, till he is able to pass beyond the rule of desire. Then he will become a helper of the race, dispassionate, all-loving.

Illusions-Collins.

**सारांशः**--हें दृश्य जगत् सत्य आहे असें वाटणें ही माया नव्हे; परंतु: हें आपणावेगळें आहे आणि यावांचून आपणा मनुष्यांचें चालणार नाहीं· असें वाटणें ही माया होय. खरें पाहतां, जर यावत् मानवी जात एकजुटीनें एकाचक्षणीं वासनातीत होऊं शकेल तर ही जडसृष्टी तत्काल नष्टच होईल. कारण तिचे अस्तित्वाचें प्रयोजनच उरणार नाहीं. तसें झालें असतां मनुष्यांच्या वासना तृप्त करण्याकारितां आज या जडदृश्याचें अस्तित्व कायम ठेवण्याचे कामीं ज्या कोणी सूक्ष्म शक्ति व देवता गुंतल्या आहेत त्या मोकळ्या होतील आणि जे मिळून जड दृश्य आपणांस दिसतें आहे, त्यांचें रूप कायमचें बदलेल. तुझें पाऊल ठरलें पाहिजे अशी तुझी इच्छा आहे म्हणून तदर्थ या धरित्रीला घनतेचा स्वीकार करावा लागत आहे; एरव्ही तिचें कांहीं अडलें नाहीं.

जड पदार्थांची घनता व काठिण्य हे धर्म अगदीं अपरिहार्य आहेत असें पुष्कळांस वाटतें, परंतु वास्तविक हे सर्व भ्रम आहेत; व अदृश्य देवतांनीही संसारी माणसांना भूल पाडली आहे, या पलीकडे कांहीं नाहीं. कारण हे धर्म देहरूप कारागृहांत कोंडून पडलेल्या मनुष्यांस जितपत भीतिप्रद वाटतात, तितपत ते देहांतून लिंगशरीरानें वेगळे होणारांस वाटत नाहींत.

या देहाची आडकाठी ओलांडून जो स्वैर विहार करूं शकतो, त्याला परत देहांत आल्यावरही शीतोष्णादि द्वंद्वांची कांहींच पर्वा वाटत नाहीं. त्यांचा बागुलबोवा देहात्मबुद्धि जीवांनाच कायतो. फार काय. पण सामान्यांना अपरिहार्य भासणारे जन्ममृत्यु ह्यांचा देखील त्याला कांहीं विशेष वाटत नाहीं (कारण, जन्म व मृत्यु ह्मणजे काय तर या देहाशीं संयोग आणि वियोग. हे तर त्याचे नित्याचे खेळ आहेत.)

ही पृथ्वी, ती वरील सौख्यें, व भौतिकशक्ति हीं सर्व मिथ्या आहेत असें एकदां त्याचे मनानें घेतलें म्हणजे तो यांत तदुत्तर न घोटाळतां प्रगतीच्या मार्गाला फटकतो. या मार्गानें जातां जातां तो पूर्ण निर्वासन झाला कीं सिद्ध होतो. मग तो विश्वबंधु व प्रेमसिंधु विकारवश न होतां जगताचें कल्याणच करीत राहतो.

---

## PHYSICAL POSTURE.

## आसन.

First learn to sit and be still physically. Select an hour in the day or evening, a full hour, and just an hour when you can be free from interruptions, and take that same hour each day and no other.

Next be careful that the spinal column be kept erect-there is a fluid passing through it to the base of the brain, with which your thought has every thing to do. In a lying posture, this fluid presses against the base of the brain; and if concentration is attempted in that

position, it will be found exceedingly difficult to sustain it. More than that, that position bars unfoldment.

Knowing now the position to take, and the absolute requirement (·in the initial work of cultivating acquaintance with your soul ) of coming to these sitting the same hour each day you are ready to commence your work. For the first few weeks, and probably for a full month, I advise you to pay no attention whatever to your thoughts during these hour sittings; let them run on, let them run whither they will. Your first discipline is physical; this too many have ignored. Within a month by such discipline, you can stop in your walk even, and find a delightful stillness surrounding you, and the mind absolutely free. This physical rest and stillness is most essential to true progress.

Having gained this stillness you commence to command thought. Send it on the simplest of errands at first. Keep it within your physical selfhood. Centre it on some portion of the body. Say the hand and then try to trace every sensation you feel in the hand. Follow this by directing to other parts of the body. An increased supply of blood is sent to these members by this Exercîse, and atrophied organs and muscles have thereby been restored to their normal condition.

Following the study of sensation leads us, naturally and logically to that of the study of images. The lowest forms of life feel, even the amœba, and so sensations are known to them.To image requires intellect; in its exercise it calls on both memory and imagination. Let your first image be of the real and not of the ideal. Say a City You visited long ago. Call up in memory all it readily gives forth; and passively waiting enjoy, as you can looking at these mental pictures. The next day you will find these picturse most distinct. Some details you had even noticed when you ssw the church, or town house, &c. now appear A street you scarcely recoginse comes to your vision more or less distinctly. A week or two of these sittings pass; and your soul, through the sub-conscious mind will have revealed, all it has to reveal on that subject. Possibly you have not gained any valuable knowledge; but if you have been patient and followed this course carefully, you have opened communication with your soul. You can want nothing to which your thought rightly directed, may not help you. Follow for some weeks the calling up of image which will put memory to its test. Say the school and playmates of childhood,their youthful faces, theirl names there characterisfics The sou has forgotten nothing; let it prove this to your consciousness. Within three months of faithful work following these simple lines, you will find

yourself fast approaching mastery of your own thinking self. That mastery opens the portals to the soul the treasure house.

**सारांशः**—योगांतील पहिला धडा म्हणजे शरीर स्थिर करून प्रशांत स्थितींत बसणें. याकामीं नित्याचा वेळ ठरीव पाहिजे. मग तो सकाळचा असो वा सायंकाळचा असो. मात्र तोच निश्चित पाहिजे. त्यांत एक पळाचाहि बदल कामा नये. या वेळीं चित्त निर्वेध असावें.

आसनावर बसतांना पाठीचा कणा ताठ व समरेख ठेवण्याविषयीं खबरदारी घ्यावी. कारण, याचे पोटांत एक सूक्ष्म वाहिनी आहे.व ती मधून एक द्रव पदार्थ वाहत असतो व तो थेट मज्जाजालाचे मूळाशीं जात असतो. आपले विचारांचा सुयंत्रपणा या प्रवाहाच्या अस्खलित गतीवर अवलंबून आहे. यामुळेंच कोणी ध्यानाचे वेळीं आडवा तिडवा पडल्यास या प्रवाहास अडथळा आल्यानें एकाग्रता होत नाहीं--झालीच तर ती ठरत नाहीं. शिवाय अशानें कुंडलिनीचें उत्थान होत नाहीं.

असो. याप्रमाण आसन व नियतकाळीं बैठकीवर येणें या दोन गोष्टी ठसल्यावर पुढील कामास लागावें प्रथम प्रथम सरासरी महिनाभर विचारांचे नादीं पडूं नये, ते धांवतील तिकडे धांवूं द्यावे. कारण प्रथमचा धडा म्हणजे शरीरस्थैर्य साधणें हाच होय. पण याची फार लोक हेळसांड करितात. असो. निश्चयानें वर प्रमाणें आसन व शरीरस्थैर्याचा अभ्यास एक महिना केल्यास तुम्हीं रस्त्यांत चालतां चालतां मध्येंच थांबलां तरीहि तुमचे भोंवतीं आनंदकारक शांतीचा वेढा असून तुमचें मन अगदीं निर्वेध आहे असें तुम्हांस आढळून येईल. याकरितां शरीरस्थैर्य व विश्रांति हीं आध्यात्मिक प्रगतीला अवश्य आहेत.

शरीर याप्रमाणें वश झाल्यावर मनाचें वशीकरण साधावें. या कामीं प्र त्याला या देहांत ठेवूनच सो ी कामगिरी सांगावी. त्याला शरीराचे हस्तपादादि एकादे अवयवावरच एकाग्र होण्यास शिकवावें व त्यावेळीं त्या हातांत कोणकोणते व्यापार चालतात हें सूक्ष्मतेनें निरीक्षण करण्यास सांगावें. हाताचें साधलें कीं शरीराचे इतर भागांकडे योजावें. या योजनेनें मनाचे प्रवाहाबरोबर रक्ताचा प्रवाह त्या भागाकडे गेल्यानें त्या भागांस उत्तेजन व आरोग्य येतें.

शरीरांतील सूक्ष्म संवेदना ओळखण्याचा अभ्यास झाला म्हणजे, बाह्य पदार्थांचे आकृतींचे ठिकाणीं मनःसंयम करण्यास शिकावें. याला बुद्धीचें साह्य लागतें; व बुद्धीला स्मृति व कल्पना यांची मदत लागते. प्रथम खराखुऱ्या वस्तूचीच आकृती मनांत आणावी. काल्पनीकाची बरी नव्हे. उ० एकाद्या पूर्वपरिचित शहराचीही आकृति मनापुढें उभी करून तसेंच तटस्थ तिजकडे अंतर्दृष्टीनें पहात रहावें व तें सुख भोगीत असावें. दुसऱ्या दिवसाला तीच आकृति अधिक स्पष्ट दिसूं लागेल. व त्या मधील ज्या बारीक सारीक गोष्टी तुम्ही समक्ष पाहिल्या नसतील—उ० एकादें देऊळ किंवा सार्वजनिक मंदिर तेंहि तुमचेपुढें उभें राहील. किंवा एकादा अपरिचित रस्ताच डोळ्यांपुढे येईल. या प्रकारें आठ पंधरा दिवस अभ्यास झाल्यानें मनाचे पेटींत जेवढें कांहीं कोंडलेलें असेल तें सारें उघड होईल. एवढ्यानें तुम्हांला मोठेंसें महत्त्वाचें ज्ञान झालें असें नव्हे; पण तुम्ही धिमाईनें असाच सतत क्रम ठेवल्यास तुम्हांला आत्म्याचा मार्ग खुला झाला. व तसें झालें कीं, तुम्हांला जी जी इच्छा होईल ती ती सिद्ध होण्यास जड पडणार नाहीं. याप्रकारें गतवस्तूंच्या मूर्ति मनापुढें आणण्याचा कांहीं आठवडे क्रम ठेवा म्हणजे स्मृतीहि तरतरीत होईल. आपलें विद्यागृह, खेळगडी, त्यांचे चेहरे, नांवें इ. इ. सर्व मनापुढें आणावीं कारण हीं कितीहि काळ लोटला असला तरी अंतरांत पक्कीं साठविलीं आहेत हें खूप समजावें. व याचा अनुभव घ्यावाच. याप्रकारें एकनिष्ठेनें व नेटानें तीनच महिने अभ्यास केल्यास मनाचें स्वामित्व किंवा मनोजय जवळ जवळ साध्य झालासें तुमचे अनुभवास येईल व तसें झालें कीं अखिलज्ञानाचें—नव्हे अखिल वस्तूंचें भांडार जो आत्मा त्याचाहि मार्ग मोकळा झाला असेंच समजावें.

---

# योगखंड.



ज्याप्रमाणें रोगी उत्तम वैद्याच्या सान्निध्यानें रोगाचा नाश करून आरोग्याला प्राप्त करून घेतो, त्याचप्रमाणें योगाभ्यास करूं इच्छिणाऱ्यांनीं अनुभवी विद्वानांची संगती धरून, योगांगांचें अनुष्ठान करून अविद्यादि क्लेशांचें निरसन करून आनंद प्राप्त करून घ्यावा.

## स्त्रियांनींही योग करावा.

जीवात्मा हाच साधक आहे, तो पुरुष, स्त्री किंवा नपुंसक नसून ज्या प्रकारच्या शरीरांत तो असतो तसा तो भासतो. तात्पर्य, स्त्रीत्व किंवा पुरुषत्व हे देहधर्म; व देहांहून आत्मा अन्य असल्यामुळें अमुकानें योगाभ्यास करावा व अमुकानें करूं नये, असें नाहीं. अर्थात् पुरुषांप्रमाणें स्त्रियांनींही योगाभ्यास करावा.

## योग व त्याची प्राप्ति.

योग शब्दाचा अर्थ "मिळणें, जोडणें, एकत्र होणें" असा आहे. परमात्म्याचा व जीवात्म्याचा संयोग होणें; किंवा जीवाला परमेश्वरस्वरूपाचा साक्षात्कार होऊन त्यामध्येंच त्याला लीन होतां येणें, याला योग असें म्हणावयाचें. ही अवस्था ज्या उपायांच्या योगानें साधते त्या उपायांला 'योगाभ्यास' असें म्हणतात. जीवात्मा जेव्हां परमात्म्याशीं संयोग पावतो, तेव्हां त्याला "योग" असें म्हणतात; व जेव्हां तो इंद्रियांला वश होऊन विषयांमध्यें लुब्ध झाल्यामुळें कुकर्में करून ईश्वराज्ञेचें उल्लंघन करितो, तेव्हां त्याला परमेश्वराचा "वियोग" म्हणतात. परमेश्वर ज्ञानमय आहे व प्रकृति अज्ञानयुक्त आहे; या दोन पदार्थांच्यामध्यें जीवात्मा आहे. जेव्हां जीवात्मा प्रकृतीमध्यें लुब्ध होतो, तेव्हा तिच्या साहचर्यानें त्याच्यामध्यें अज्ञान उत्पन्न होऊन तो अविचारानें अनेक कुकर्में करतो; पण जेव्हां सद्गुरूच्या साहाय्यानें जीव प्रकृतीच्या पाशातून सुटून परमेश्वराच्या ज्ञानांबुधीमध्य आनंदानें पोहूं लागतो, तेव्हां त्याच्यामध्यें ज्ञान उत्पन्न होत असल्यामुळें तो सुखमय स्थितीचा पूर्ण अनुभव घेत असतो. जीव हा शुद्ध स्फटिकासारखा आहे. स्फटिक काळ्या पदार्थाकडे नेला असतां काळा दिसतो व पांढऱ्या पदार्थाकडे नेऊन ठेविला असतां पांढराच भासतो; तद्वत्च शुद्ध जीव अज्ञानयुक्त प्रकृतीच्या मोहांत सांपडला म्हणजे अज्ञानी होऊन दुःख भोगतो व जेव्हां ज्ञानमय परमात्म्याकडे वळतो तेव्हां तो सुखी व ज्ञानी होतो. **परमेश्वराकडे जीवाचें जाणें हा योग** व त्याला सोडून दुसरी वाट स्वीकारणें हा "वियोग" होय. **योग साधणें म्हणजे चित्तवृत्तीचा निरोध करणें होय.** मनुष्याच्या चित्तवृत्ति बाहेर पसरतात, व अनेक विचार उत्पन्न करून मनामध्यें चांचल्य उत्पन्न करितात, ही चंचलतेची स्थिति नाहींशी होऊन **चित्तैकाग्र्य संपादणें हाच योग होय.**

योगश्चित्तवृत्तिनिरोधः ॥ योगदर्शन १।२॥

## योगाभ्यासाचा विधि.

योगाभ्यास करावयाचे वेळीं, शरीरशुद्धीनंतर मनोरम अशा एकांत व शुद्ध जागीं आसनावर बसून, मन शुद्ध करून, तें स्वतःला बाह्य व्यापारापासून सोडवून अंतर्मुख होईल असा प्रयत्न करावा; म्हणजे सर्वव्यापक, सर्वांतर्यामी, न्यायी व सच्चिदानंदादि–लक्षणयुक्त परमेश्वराचें उत्तम प्रकारें सान्निध्य मिळविण्याचा यत्न करावा. या वेळीं परमेश्वराचेंच **चिंतन** करावें व त्याचीच **स्तुति, प्रार्थना व उपासना करावी.** अशा रीतीनें नेहमीं करीत गेलें असतां, आत्म्याचे इन्द्रियादि व्यवहार व मानसिकवृत्ति यांचा **परमात्म्याशीं संयोग होऊं**

लागतो; नेहमींचीं कामें करावयाचीं असतां, **परमेश्वर सर्व ठिकाणीं आहे** व सर्व **पाहणारा आहे** असा भाव जागृत ठेवून सर्व **दुराचरणें** सोडून देऊन सदोदित **सदाचरणेंच** करीत असावें. कारण, **दुष्कृत्यें करून मलीन झालेल्या आत्म्याला परमात्मदर्शन होणें अशक्य आहे.** यद्यपि काया-वाचा-मनेंकरून एकदम दुराचरण सोडणें कठीण आहे; तथापि शक्य तितका अवश्य प्रयत्न केलाच पाहिजे. एखादे वेळीं जर वाईट गोष्ट **मनांत** आली तर तीप्रमाणें **शरीरानें** तरी आचरण करूं नये. जर तसें वाईट आचरण केलें तर मनावर जास्त जास्त संस्कार दृढ होत जाऊन शेवटीं हीनतम स्थिति प्राप्त होईल. मनांत आलें तरी शरीराकडून वाईट आचरण करूं नये. अशा रीतीनें **संयम** करतां करतां मनांतही वाईट गोष्टी येणार नाहींत; अशी सहजच स्थिति प्राप्त होईल. पण याला नित्य नियमानें व निश्चयानें अष्टांगांचा थोडथोडा अभ्यास करीत गेलें पाहिजे.

### योगाचीं अंगें.

(१) यम, (२) नियम, (३) आसन, (४) प्राणायाम, (५) प्रत्याहार, (६) धारणा, (७) ध्यान व (८) समाधि, हीं योगांचीं आठ अंगें आहेत.

### अष्टांगांचीं फलें.

(१) **यम** व (२) **नियम** या दोहोंच्या अभ्यासानें असत्याचा त्याग होऊन सत्यावर निष्ठा बसते व पूर्णपणें बाह्य व आभ्यंतर शुद्धि होते. (३) **आसन** सिद्ध झाल्यानें पुष्कळ वेळपर्यंत निश्चलपणानें एकेठायीं सुखांत बसतां येतें (४) **प्राणायाम** साधत गेला म्हणजे प्राण-अपानादि वायू स्वाधीन होऊन मन स्थिर होत जातें (५) मन ताब्यांत येऊं लागलें म्हणजे इंद्रियें बाह्य विषयांपासून पराङ्मुख होऊं लागतात, यालाच '**प्रत्याहार**' असें म्हणतात (६) नासिकाग्रादिक प्रदेशांवर मन स्थिर करणें याला "**धारणा**" असें म्हणतात (७) पूर्वोक्त धारणेच्या प्रदेशांमध्येंच मनादिक सर्व इंद्रियांची स्थिति करून, पूर्णपणें तेथेंच "**चित्त**" स्थिर करणें यालाच **ध्यानाचा** अभ्यास करणें असें म्हणतात. (८) ध्यान स्थिर झाल्यावर चित्ताची जी एक समाहित दशा (एकवट स्थिति) होते त्याला '**समाधि**' असें म्हणतात. या अवस्थेला मन पोंचल्यानंतर तें चंचल होत नाहीं.

### योगांतील विघ्नें.

**व्याधिस्त्यानसंशयप्रमादालस्याविरतिभ्रान्तिदर्शनालब्धभूमिकत्वानवस्थितत्वानि चित्तविक्षेपास्तेऽन्तरायाः ॥**

योग १।३०॥

योगाला व तसेंच हरएक कार्याला नऊ प्रकारचीं विघ्नें होत असतात, यांतील एक विघ्न जरी उत्पन्न झालें तथापि चित्ताची एकाग्रता नाहींशी होते, म्हणून योगाभ्यास करणारानें यांतील एकाही विघ्नाचा प्रभाव आपल्यावर न होईल असें करावें. (१) **व्याधिः**—शरीरांतील सप्तधातूंमध्यें विकार उत्पन्न होऊन त्यांपासून ज्या ज्वरादि पीडा होतात त्या व्याधि होत; या शारीरिक पिडांपासून ध्यान करण्यांत फार विघ्न होतें. (२) **स्त्यानम्**:—सत्कर्मांवर अप्रीति, दुष्ट कर्मांवर प्रीति, कर्म मुळींच न करण्याची इच्छा, या स्थितीला स्त्यान म्हणतात. या विघ्नाच्या उत्पत्तीमुळें मनुष्य प्रायः दुराचरणी बनतो (३) **संशयः**—कोणत्याही पदार्थाविषयीं निश्चयात्मक ज्ञान नसणें, हें खरें कीं तें खरें हें न समजणें, याला संशय असें म्हणतात. (४) **प्रमादः**—समाधिसाधनांचें यथावत् अनुष्ठान करण्यामध्यें चुका होणें याला

प्रमाद म्हणतात. असे प्रमाद होऊं लागल्यानें अनुष्ठान व्हावें तसें होत नाहीं व त्यामुळें साधक त्या योगाच्या उपायाबद्दल उदासीन होतो. ( ५ ) **आलस्यम्**:–शरीर व मन यांच्याकडून कांहीं काम न घेणें; अशा रीतीनें शरीर व मन आळशी झालें म्हणजे त्यामध्यें जडत्व येतें व त्याकडून योगसाधन होत नाहीं; त्याचप्रमाणें इतर कृत्येंहि होत नाहींत. ( ६ ) **अविरतिः**–विषयोपभोग आणखी घ्यावे अशी इच्छा राहणें; या अविरतीनें आत्मा विषयांमध्यें मोहित होऊन जातो. ( ७ ) **भ्रांतिदर्शनम्**:–पदार्थमात्रांविषयीं उलटें ज्ञान होणें; जडाला चेतन समजणें व चेतन आत्म्याला जड समजणें इत्यादि. ( ८ ) **अलब्धभूमिकत्वम्**:–समाधीमध्यें प्रवेश न होणें, समाधि न लागणें. ( ९ ) **अनवस्थितत्वम्**–समाधि लागूं लागल्यावरही तो फार वेळपर्यंत न ठिकणें, पुष्कळ वेळ चित्ताचें स्थैर्य न राहणें. या प्रकारचीं हीं नऊ विघ्नें आहेत. हीं नऊ विघ्नें योगाभ्यास करणाराचे शत्रू आहेत; यांचा त्यानें प्रथमतः पुरा पाडाव केला पाहिजे.

## ॐकाराचें स्वरूप.

अथर्ववेदांतील मांडूक्योपनिषदांत असें सांगितलें आहे कीं,—' ॐ ' हें अक्षर, हें सर्वमय आहे. हा जो सर्व प्रपंच आहे, तो ॐकाररूप आहे. भूत, वर्तमान व भविष्य हें सर्व ॐकाररूप आहे; आणि जें कांहीं ह्या त्रिकालांवांचून आहे तें सुद्धां ॐकाररूप आहे हें सर्व ब्रह्मरूप आहे. हा आत्मा—पण ब्रह्मरूप आहे.

या आत्म्याचे चार पाद आहेत जागृत स्थान, बाह्य पदार्थांचें जाणणें, सात अंगें, एकोणवीस मुखें, स्थूल भोगाचा भोक्ता आणि वैश्वानर, हा प्रथम पाद आहे. मूर्धा, नेत्र, प्राण, धड, मूत्रस्थान, पाय व मुख हीं सात अंगें आणि पांच प्राण, पांच कर्मेंद्रियें, पांच ज्ञानेंद्रियें व चार अंतःकरणभेद हीं **एकोणीस मुखें** होत. हीं एकोणवीस, भोगांला साधन असल्यामुळें ह्यांस मुखें म्हणतात. ह्या मुखांनींच स्थूल शब्दादिकांचा बाह्य वृत्तीनें जागृदवस्थेंत भोग होतो हा आत्म्याचा प्रथमपाद समजावा ॥ १ ॥ स्वप्नावस्था, अंतःप्रज्ञ ( तैजस अंतःकरणाची वृत्ति बाहेर न जातां आंतले आंतच ज्ञानाकारपरिणामास पावते; आणि विश्वाची बाहेर जाते, म्हणून तैजस अंतःकरणास अंतःप्रज्ञ व विश्वास बहिःप्रज्ञ असें म्हणतात ) सात अंगवाला ( हीं अंगें मनोमय आहेत ) एकोणवीस मुखवाला ( हीं मुखेंही मनोमयच आहेत ), सूक्ष्म (वासनामय) भोगांचा भोक्ता, आणि तैजस, हा आत्म्याचा द्वितीय पाद आहे ॥ २ ॥ ज्या वेळेस निद्रावश होऊन कांहींएक इच्छित नाहीं, व कांहींएक स्वप्न पाहत नाहीं, त्या वेळेस त्याला सुषुप्त ( सुषुप्तीस प्राप्त झालेला ) असें म्हणतात. सुषुप्त्यवस्था, एकीभूत, प्रज्ञानघन ( जागृदवस्थेचें व व स्वप्नावस्थेचें ज्ञान, हें घन म्हणजे ज्यांत एक अविद्यारूप होऊन गेलें असतें तें ), आनंदमय, आनंदभोक्ता, चेतोमुख आणि प्राज्ञ; हा आत्म्याचा **तृतीय पाद** आहे ॥ ३ ॥ हाच सर्वेश्वर, हाच सर्वज्ञ, हाच सर्वांचा अंतर्यामी, हाच सर्वांचें उत्पत्तिस्थान व हाच सर्व भूतांचा स्वामी आहे जो अंतःप्रज्ञ, बहिःप्रज्ञ, उभयतःप्रज्ञ, प्रज्ञानघन, प्रज्ञ व अप्रज्ञही नाहीं; जो अदृष्ट, अव्यवहार्य, अग्राह्य, अलक्षण, अचिंत्य, अव्यपदेश्य, ऐकात्म्य, प्रत्ययसार, प्रपंचोपशम, शांत, शिव व अद्वैत असा आहे. हा आत्म्याचा चतुर्थ पाद मानितात ॥४॥ (हीच तुर्यावस्था) तोच आत्मा व तोच जाणण्यास योग्य आहे ॥ ४ ॥ तो हा आत्मा ॐकार अक्षररूप आहे.

॥ तस्य वाचकः प्रणवः ॥ योगदर्शन सू. १८

ओंकार ( ओम् ) हा परमेश्वराचा वाचक आहे. परमेश्वराचीं दुसरींहि पुष्कळ नामें आहेत, पण ओंकार हें त्याचें खास नांव आहे. सर्व नामांमध्यें हें उत्तम नाम आहे. कारण हें पूर्णपणें परमेश्वराला लागू पडतें व इतर नामांची उत्पत्तीहि यापासूनच आहे; म्हणून " या ओंकाराचा जप सदोदित करावा; अर्थाचा विचार करून त्याचें नेहमीं स्मरण करणें याला जप[1] असें म्हणतात. " या ओंकाराच्या अर्थभावनापूर्वक जपाच्या योगानें मन एकाग्र होऊन प्रसन्न होतें. ज्ञान प्राप्त होऊन तें स्थिर होतें, व हृदयामध्यें परमेश्वराची भक्ति बाणत जाते; म्हणून याचाच अखंड जप करावा.

### प्रणवजपाचा विधि.

ध्यानयोगद्वारा मन, मनाच्या वृत्ति, ज्ञानेंद्रियें व त्यांच्या दिव्य शक्ति या सर्वांचें एकदेशामध्यें स्थिरीकरण करून, परमेश्वराच्या ठिकाणीं आत्म्याची तदाकार वृत्ति लावून, उच्चार न करितां मनामध्येंच ओंकाराचा जप करूं लागलें असतां हलके हलके तो जप पूर्ण होऊं शकतो. जेथें धारणा केली जाते तेथेंच केलेला जप लाभकारक होतो, अन्य प्रकारें केलेला जप खंडित झाला असें समजावें, सरासरी **मानानें एका मिनिटांत ६० वेळ ओंकाराचा जप होऊं शकतो.**

याप्रमाणें साठ आवृत्ति झाल्या म्हणजे एक तास उपासना झाली, असें समजण्यास कांहीं हरकत नाहीं. ओंकाराची गणना मनामध्येंच पूर्वी सांगितल्याप्रमाणें करावी, हाताचीं बोटें मोजून करूं नये; कारण तिकडे लक्ष जातें.

### धारणाविधि.

पूर्वीं सांगितल्याप्रमाणें आसनावर बसून शरीर स्थिर करावें, नंतर जिव्हेचें टोंक उलटून तें टाळूला लावावें. नंतर मूल नाडीला ( गुदद्वाराकडील भाग ) वर खेंचून हृदयांत असणाऱ्या वायूला ध्यानपूर्वक वर आकर्षित करून ब्रह्मांडाच्या प्रदेशीं स्थापित करावें व त्याच प्रदेशीं चित्ताच्या सर्व वृत्ति व पंचज्ञानेंद्रियांच्या दिव्य शक्ति लावून मनामध्यें 'ओम्' या महामंत्राचा जप करावा व आत्म्याला तत्पर करावें. याप्रमाणें, **सकाळीं व संध्याकाळीं एक एक तासभर अभ्यास करावा.** याप्रमाणें अभ्यास करूं लागलें असतां ब्रह्मांड प्रदेशीं ओंकाराचें श्रवण होऊं लागतें व प्राणवायूची उष्णता त्वचेला समजूं लागते. याप्रमाणें निश्चयानें अभ्यास केला असतां ही पहिली धारणा साधण्यास कमींत कमी तीन महिने लागतात. नंतर याचप्रमाणें भ्रूमध्यामध्यें दुसरी धारणा व नासिकाग्रावर तिसरी धारणा करून ती दृढ करावी. प्रथम प्राणायामामधील नासिकाग्रावरील धारणा परिपक्व झाल्यावर प्राणवायु बाहेर येतो, तेव्हां अंतःकरण घाबरें होऊन प्राण एकदम आंत जाण्याचा प्रयत्न करतो. म्हणून त्याला प्रथमतः थोडा वेळ बाहेर स्थिर करण्याचा प्रयत्न करून हळू हळू अभ्यास वाढवावा, प्राणवायूला बाहेर ९०० वेळ ओंकाराचा जप होईपर्यंत स्थिर करतां येईल इतका अभ्यास हळू हळू करावा. प्रथमतःच त्याच्यावर जबरदस्ती करूं नये; कारण त्यापासून हानि पोंचण्याचा संभव असतो. अशा रीतीनें ९०० वेळ ओंकाराचा जप निर्विघ्नपणें होऊं लागला म्हणजे मग व्याहृतींचा जप करावा किंवा प्रथमतः ओंकारासहित सप्तव्याहृतींचा त्रिवार जप होईल इतका वेळ प्राणवायूला बाहेर स्थिर करावा. हा अभ्यास वाढवून एकवीस वेळ जप करतां येईल असें करावें. यालाच प्राणायाम असें म्हणतात.

---

1 तज्जपस्तदर्थभावनम्—योगदर्शन.

## ओंकाराच्या जपाचें फळ.

ततः प्रत्यक्चेतनाधिगमोप्यन्तराया भावश्च ॥ यो. १।२९ ॥

'ओंकाराचा जप केल्यानें परमेश्वरविषयक ज्ञान होऊन संपूर्ण विघ्नांचा नाश होतो' अविद्यादि क्लेशांच्या योगानें व रोगरूपी विघ्नांच्या योगानें परमेश्वरप्राप्तीच्या उपायांत अडथळा उत्पन्न होतो, हें सर्वांस माहीत आहेच. हीं सर्व विघ्नें या ॐकाराच्या जपाच्या योगानें नाहींशीं होतात व चित्त एकाग्र होतें. जो मनुष्य प्रणवाचा भक्तीनें जप करतो, ईश्वरचिंतन करतो व त्याची भक्ति करतो, त्याचें मन ईश्वर कृपेनें परमात्म्याकडे आकर्षित होतें व शेवटीं तेथेंच तें स्थिर होतें; अशा रीतीनें समाधि लावूं लागला म्हणजे परमेश्वराचें सर्वव्यापकत्व, आनंदमयत्व, अद्वितीयत्व, इत्यादि गुण त्याला समजूं लागतात.

## (३) आसन व त्याचा विधि.

स्थिर सुखमासनम् ॥ यो. २।४६ ॥

ज्या स्थितीमध्यें आत्मा व शरीर सुखानें स्थिर होतें, त्या स्थितीला आसन असें म्हणतात' आसन म्हणजे बसण्याची पद्धति. ज्या पद्धतीमध्यें बसण्याला सुख होतें व त्रास न होतां पुष्कळ वेळपर्यंत बसतां येतें ती पद्धति उत्तम. आसनें पुष्कळ प्रकारचीं आहेत.

## सिद्धासन.

हें सरळ व सहज साधणारें असल्यामुळें सर्वांत श्रेष्ठ आहे. आसन जर चांगलें नसेल तर शरीराला कंप होऊन चित्तवृत्ति स्थिर राहत नाहींत व समाधि लागूं शकत नाहीं. त्याचप्रमाणें बसण्याची जागाहि रम्य व दुर्गंधरहित असली पाहिजे व ज्यावर बसावयाचें तेंहि ऋतूप्रमाणें सुखप्रद असेंच असलें पाहिजे. शरदृतूमध्यें ऊबदार व इतर ऋतूंमध्यें साधें असें बसावयाला घ्यावें. श्री० भगवद्गीतेंतील आसनाविषयींचे श्लोक सुप्रसिद्धच आहेत.

## प्राणायाम.

प्राणायामाचा विधि:—ज्याप्रमाणें ओकारी झाली असतां पोटांतील अन्न एकदम जोरानें बाहेर पडतें, त्याचप्रमाणें मूल नाडीला वर खेंचून जोरानें हृदयांतील वायूचा बाहेर रेचक करावा व यथाशक्ति त्याला तेथेंच स्थिर करावा. अशा रीतीनें वायु बाहेर राहिल्यानें जीव घाबरा होण्यास सुरुवात झाली म्हणजे हळू हळू त्याला आंत घेण्यास सुरुवात करावी, त्याला भ्रूमध्य व ब्रह्मांड (मूर्धा) यांमध्यें थोडथोडा थांबवून हृदयाकाशामध्यें जाऊं द्यावें, याप्रमाणें पुनः पुनः अभ्यास करावा. हा अभ्यास आपल्या सामर्थ्याप्रमाणें करावा. सामर्थ्याच्या बाहेर करूं नये. आळस टाकून हा अभ्यास जसजसा होत होत जाईल तसतसा प्राण योग्याच्या स्वाधीन होत जातो.

## प्राणायामाचे चार प्रकार.

स तु बाह्याभ्यन्तरस्तम्भवृत्तिर्देशकाल संख्याभिः परिदृष्टो दीर्घसूक्ष्मः ॥ ५० ॥ बाह्याभ्यन्तरविषयापेक्षी चतुर्थः ॥ ५१ ॥ यो. पा. २ ॥

(१) बाह्यवृत्तिप्राणायाम, (२) आभ्यन्तरवृत्ति प्राणायाम, (३) स्तंभवृत्ति प्राणायाम व (४) बाह्याभ्यन्तरापेक्षी प्राणायाम, असे चार प्रकारचे प्राणायाम आहेत. या प्राणायामांच्या योगानें चित्त निर्मल होऊन उपासना करावयाच्या वेळीं स्थिर होतें. हे चारहि प्राणायाम प्रत्येकीं, काल व संख्या यांच्या गणनेनें दीर्घ व सूक्ष्म असे दोन प्रकारचे होतात. तसेंच देश, काल व संख्या यांच्या योगानें यांत प्रत्येकीं तीन तीन भेद होतात. (१) देशोपलक्षित, (२) कालोपलक्षित व (३) संख्योपलक्षित प्राणायाम.

प्राणवायूला कोठ्यांतून बाहेर घालविण्यानें पहिला प्राणायाम होतो, अपानवायूला बाहेरून आंत घेण्यानें दुसरा होतो, समानवायूचें नाभि व हृदय यांतील अवकाशामध्यें स्तंभन करण्यानें तिसरा होतो व प्राण आणि अपानाला नासिकेमध्यें स्तंभन करून चवथा प्राणायाम होतो. हे प्राणायाम आरंभीं थोडा वेळपर्यंत होत असल्यानें त्यांना प्रारंभीं "सूक्ष्म" असें म्हणतात. पुढें संवय झाल्यावर हेच "दीर्घ" होतात. नियत देशामध्यें करण्यानें "देशोपलक्षित," नियतकाळीं करण्यानें "कालोपलक्षित" व ओंकाराच्या जपसंख्येवरून त्याला "संख्योपलक्षित" असें म्हणतात. याप्रमाणें प्राणायामांचे भेद व उपभेद आहेत. या सर्वांमध्यें प्राण, अपान व समान या तीन वायूंचाच संबंध येतो.

दुसरा, तिसरा व चवथा प्राणायाम करण्याला व त्याची धारणा करण्याला पूर्वोक्त एक एकच स्थान नियत केलेलें आहे. पण पहिल्या प्राणायामाला अनेक स्थानें आहेत. जसें—हृदय, कंठकूप, जिव्हामूल, जिव्हामध्य, जिव्हाग्र, नासिकाग्र, भ्रूमध्य, ब्रह्मांड (मूर्धा) चक्षुर्द्वय, श्रोत्रद्वय, पृष्ठमध्य (पाठीच्या कण्याचा मध्य); दोन ओंठांला लागून असणाऱ्या दांतांच्या मध्यभागीं (जेथें जिव्हा लागून तकाराचें उच्चारण होतें तें ठिकाण), याप्रमाणें धारणा करण्याचीं अनेक स्थानें आहेत; व हीं सर्व पहिल्या प्राणायामालाच लागू आहेत. प्राणवायु हृदयप्रदेशीं राहत असल्यामुळें त्याच्या वरच्या अंगावरच प्राणायामाची धारणा होऊं शकते. नाभी वगैरे अधोभागीं ती होऊं शकत नाहीं. येथें हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं प्रथम ब्रह्माण्ड, नंतर भ्रूमध्य व तदनंतर नासिकाग्र याप्रमाणें क्रमशः धारणा केल्या वरच प्राणायाम सिद्ध होऊं शकतो. अन्य स्थळीं जी धारणा केली जाते ती केवळ चित्तैकाग्र्य संपादन करण्यासाठीं होय, त्याचा प्राणायाम सिद्ध होण्याशीं कांहीं संबंध नाहीं. अनेक स्थळीं धारणा केल्यानें योग्याला आपले प्राण पाहिजे त्या ठिकाणीं व पाहिजे त्या वेळीं स्थिर करतां येतात. अशा रीतीनें प्राण वश झाल्यावर त्याबरोबर मनहि वश होतें.

### प्राणायामाची संक्षिप्त रीति.

(१) पहिला बाह्यवृत्ति प्राणायाम करावयाचा असतां, आंतील श्वास बाहेर गेल्यावर त्याला बाहेरच रोखून धरावा. (२) आभ्यन्तरवृत्ति प्राणायाम करावयाचा असतां, वायु आंत घेतल्यानंतर त्याला आंतच स्तंभित करावा. (३) तिसरा स्तम्भवृत्ति प्राणायाम करावयाचा असतां आंतील वायु बाहेर घालवूं नये व बाहेरील वायूला आंत घेऊं नये, जेथल्या तेथें यथाशक्ति स्तंभन करावा. (४) चवथा बाह्याभ्यन्तरापेक्षी प्राणायाम करावयाचा असतां आंतून वायु बाहेर निघूं लागल्याबरोबर त्याला बाहेरच थोडा दाबावा व बाहेरून आंत येऊं लागल्यावर त्याचा थोडा आंत निरोध करावा. याप्रमाणें ही संक्षेपानें रीति आहे.

### मूल नाडीला वर खेंचण्याचें प्रयोजन.

मूल नाडी ही प्राणांचा संस्कार करण्यास योग्य अशी एक पोकळ नाडी आहे. जेव्हां ध्यान वर स्थिर केलें जातें, तेव्हां ही मूल नाडी, प्राणवायूबरोबरच, ज्याप्रमाणें एखाद्या रबराच्या नळींत वारा भरल्यामुळें ती सरळ होऊन स्थिर होते, त्याप्रमाणें वर खेंचली जाऊन स्थिर होते. या मूलनाडीला "सुषुम्ना" असेंहि म्हणतात. ही मूल चक्रापासून मस्तकामधून जाऊन भ्रूमध्यामध्यें इडा व पिंगला यांना मिळा-

लेली आहे. या तीनहि नाड्या ज्या ठिकाणीं ( भ्रूमध्यामध्यें ) मिळतात त्या स्थानाला " त्रिवेणीसंगम " असें म्हणतात.

### आभ्यंतरवृत्ति प्राणायम.

विधि—नाभीच्या अधोभागीं ध्यान लावून वायु आंत घेण्यास सुरवात करावी. गळ्यापर्यंत वायु भरून पूर्णपणें पूरक झाला म्हणजे कंठामध्यें ध्यान लावून वायूचा निरोध करावा. जेव्हां जीव घाबरतो असें वाटूं लागेल, तेव्हां हलके हलके वायु ध्यानाबरोबर बाहेर सोडून द्यावा. पुनः असाच पूरक करून स्तंभक करावा. पहिल्या प्राणायामामध्यें सांगितल्याप्रमाणें " ओम् " या मंत्राचा जप करावा व जपसंख्या वाढविण्याचा प्रतिदिवशीं अभ्यास करावा. या प्राणायामामध्यें कुंभक, पूरक व रेचक हे तीनहि प्रकार करावे लागतात.

ज्याप्रमाणें घागरीमध्यें पाणी भरतात त्याप्रमाणें यामध्यें वायु भरावयाचा असतो. या भरण्याला ' पूरक ' असें म्हणतात. घागरीमध्यें ( पाणी ) भरलेलें तसेंच ठेवणें याला कुंभक असें म्हणतात व त्यांतील थोडथोडें ओतून टाकून पुनः ती घागर मोकळी करतात, त्याप्रमाणें उदर मोकळें करणें याला ' रेचक ' असें म्हणतात. नाभीपासून कंठापर्यंत जो शरीराचा भाग असतो तो कुंभा-( घागरी ) सारखा दिसतो, म्हणून या प्राणामायाच्या कृतींनाहि तसेच " कुंभक " वगेरे शब्द योजिले आहेत. हे तीनहि प्रकार मिळून दुसरा प्राणायाम सिद्ध होतो.

### ( ३ ) स्तंभवृत्ति प्राणायाम.

क्रिया—तिसऱ्या प्राणायामाला " स्तंभवृत्ति " असें म्हणतात. हा प्राणायाम करावयाचा असतां आंतील वायूला बाहेर जाऊं देऊं नये, जेथल्या तेथें त्याचें स्तंभन करून यथाशक्ति स्थिर राहावें. प्राण घाबरूं लागला म्हणजे थोडा वेळ श्वासोच्छ्वास करावा व पुनः हा प्राणायाम करावा.

विधि—प्राणवायूचें स्थान हृदयप्रदेश आहे व अपानवायूचें स्थान गुदप्रदेश आहे. या दोहोंच्या मध्यें नाभिस्थानीं समानवायु राहतो. ध्यानाच्या योगानें प्राण व अपान यांच्या गतींचा निरोध करून त्याला पकडून स्थिर करावा. जेव्हां जीव घाबरूं लागेल तेव्हां ध्यानपूर्वक त्याला सोडावा. याप्रमाणें वारंवार केलें असतां हा सिद्ध होतो. ध्यानद्वारा स्तंभ वृत्तिच्या सहाय्यानें प्राण व अपान यांची गति जेथल्या तेथें स्थिर होते. येथें हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, योगाच्या सर्व क्रिया ध्यानाच्या योगानेंच केल्या पाहिजेत. मन अन्य स्थलीं असून अन्य क्रिया करण्याची खटपट करूं नये. जी क्रिया करावयाची असेल ती ती करतेवेळीं त्या क्रियेमध्येंच मन लावलेलें असावें.

### ( ४ ) बाह्याभ्यन्तरापेक्षी प्राणायाम.

चवथ्या प्राणायामाला "बाह्याभ्यन्तरापेक्षी" असें म्हणतात. जेव्हां श्वास आंतून बाहेर जाईल तेव्हां त्याचा बाहेरच निरोध करावा व जेव्हां तो बाहेरून आंत येईल तेव्हां त्याचा आंत निरोध करणें. हा याचा सामान्य विधि आहे. याचें स्पष्टीकरण असें. जेव्हां प्राणवायु आंतून बाहेर येऊं लागेल तेव्हां त्याला बाहेर येऊं देण्यासाठीं बाहेरील अपानवायूला आंत घेण्याचा प्रयत्न करावा; व जेव्हां तो अपानवायु बाहेरून आंत येऊं लागेल तेव्हां आंतील प्राणवायूचा त्याला धक्का देऊन त्याला आंत घेण्याला प्रतिबंध करावा; याप्रमाणें परस्पर विरुद्ध क्रिया केल्यानें दोनहि प्राणांच्या गतींचा निरोध होऊन ते प्राण वश होतात व त्यांच्याबरोबर मन व इंद्रियें हीं स्वाधीन होतात; पुरुषार्थ व बळ हीं वाढतात व बुद्धि इतकी

सूक्ष्म होते कीं, अत्यंत कठिण विषय असला तरीहि तो लवकर समजतो. प्राणायाम साधत गेल्यानें मनुष्याच्या शरीरांत वीर्य वाढतें, बल व पराक्रम वृद्धि पावतात व तो जितेंद्रिय होतो. त्याला थोड्याच कालामध्यें पुष्कळ शास्त्रांचें अध्ययन करतां येतें व केलेल्या अध्ययनाचें त्याला मुळींच विस्मरण होत नाहीं. चित्त निर्मल होत असल्यामुळें त्याच्याकडून परमेश्वरोपासना उत्तम प्रकारें होते. स्त्रियांनीहि याप्रमाणें वाटेल तो प्राणायाम सिद्ध करावा व वरील फळें प्राप्त करून घ्यावीं. "वरून आणावा प्राण, खालून आणावा अपान व त्याचें नासिकेमध्यें युद्ध करावें समान" असें योगी शिष्यांना सांगत असतात. या वाक्यांत चवथा प्राणायाम कसा करावा हें सांगितलेलें आहे. हृदयप्रदेशांत असणाऱ्या व आंतून बाहेर जाण्याचा प्रयत्न करणाऱ्या प्राणवायूला वर ब्रह्मांडीं चढवून तेथून त्याला भ्रूमध्यामध्यें स्थापित करावा. नंतर बाहेरून आंत येणाऱ्या अपानवायूला नासिकाद्वारें आंत नेऊन भ्रूमध्याच्या खालीं स्थापित करावा. तेथें एकमेकांचा एकमेकांला धक्का देऊन दोघांच्याहि गतीचा निरोध करावा. यालाच दोनहि वायूंचें युद्ध असें म्हणतात. हें युद्ध चाललें असतां मनासहित सर्व इंद्रियशक्तींला तेथें स्थिर करावें. याप्रमाणें केलें असतां लय होऊन जातो कीं, जसें दुधामध्यें पाणी मिळून जातें. यालाच प्राणांमध्यें प्राणांचे हवन करणें असें म्हणतात. लयकरणें व हवन करणें याचा येथें अर्थ एकच आहे. या प्राण व अपान वायूंच्या युद्धाला शतपथादि ब्राह्मणामध्यें अनेक ठिकाणीं "देवासुरसंग्राम" असेंहि लाक्षणिक अर्थानें म्हटलें आहे. कांहीं योगीलोक प्राणवायु व अपानवायु या दोन्ही वायूंच्या गतींचा निरोध करतात, अर्थात् प्राणामध्यें अपानाचें हवन करतात, व अपानामध्यें प्राणाचें हवन करतात व आपला प्राणायाम साधतात. या प्राणायामांच्या योगानें पुढें या दोन वायूंचा असा एकमेकांमध्यें लय होतो.

## तीनहि नाड्यांची नांवें

१ इडा, २ पिंगला, ३ सुषुम्ना, या नाड्यांवर धारणा करून परमेश्वरोपासना केली असतां त्या योग्याला येथील दुःखांपासून मुळींच त्रास होत नाहीं. इडा नाडी व पिंगला नाडी या दोहोंचा जेथें संधि होतो तेथून सुषुम्ना प्रारंभ होतो. आपल्या पाठीच्या कण्याच्या डाव्या बाजूच्या नाडीचक्रास इडा म्हणतात उजवी कडचीस पिंगला म्हणतात आणि सुषुम्ना ही कण्याच्या पोकळींत असते. व या सुषुम्नेच्या पायथ्याशी कुंडलिनी नांवाच्या नाडीचें वेटोळें आहे. या त्रिवेणीसंगमाच्या ठिकाणीं जेव्हां योगी आपल्या आत्म्याला नेऊन स्नान घालतो, तेव्हां तो सर्व पापांपासून मुक्त होतो व नंतर त्याला शुद्ध परमेश्वराचा साक्षात्कार होऊन परम आनंदाचा लाभ होतो. इडा, पिंगला व सुषुम्ना या नाडींला पर्यायनामें अनेक आहेत, त्यांपैकीं कांहीं पुढें दिलीं आहेत. उजव्या नाकपुडींतील स्वर इडा नाडीच्या योगानें चालतो व डाव्या नाकपुडींतील पिंगला नाडीच्या योगानें चालतो. भ्रूमध्यस्थानीं इडा व पिंगला या मिळतात व तेथेंच सुषुम्नाहि त्यांस मिळते. हेंच त्रिवेणी संगमाचें स्थान होय. ज्याचा आत्मा या त्रिवेणीसंगमांतून जाऊन केवळ सुषुम्नेमध्यें मध्यें प्रवेश करतो व तिच्यांतून जाऊन ब्रह्मरंध्रांतून बाहेर पडतो व शरीराचा त्याग करतो, तो मुक्तिधामाला प्राप्त होतो. या ब्रह्मरंध्राशिवाय अन्य म्हणजे नेत्रनासिकादि छिद्रांतून बाहेर पडणाऱ्या जीवाला यथाक्रम पुनर्जन्म भोगावा

लागतो. तसेंच जो योगी कूर्मनाडीमध्यें संयम करून निद्रेच्या आदि व अंताला जाणतो तो ,समाधिद्वारा कूर्मनाडीमध्यें मन व सर्व इंद्रियांसहित संयम करून ब्रह्मरंध्रांतून बाहेर पडून शरीर सोडतो व परमात्म्याच्या आधारानें मोक्षपदाचा उपभोग घेतो.

### गुणत्रय लक्षण, सत्वाचें लक्षण.

तत्र यत्प्रीतिसंयुक्तं किंचिदात्मनि- लक्षयेत् ॥ प्रशान्तमिव शुद्धाभं सत्वं तदुप धारयेत् ॥ ३ ॥ जेव्हां आत्म्यामध्यें प्रसन्नता इत्यादि गुण दिसतील तेव्हां शुद्ध सत्वगुण प्रधान होऊन इतर दोन गुण दबले गेले आहेत असें समजावें "

### रजोगुणाचें चिन्ह.

यत्तु दुःखसमायुक्तमप्रीतिकरमात्मनः तद्रजो प्रतिपं विद्यात्सततं हारि देहिनाम् ।४। जेव्हां आत्मा व मन दुःखयुक्त, प्रसन्नतारहित व विषयांमध्यें इकडे तिकडे भटकत आहेत असें दिसेल तेव्हां रजोगुण वाढला आहे असें समजावे. ॥

### तमोगुणाचें चिन्ह.

यत्तु स्यान्मोहसंयुक्तमव्यक्तं विषयात्मकम् ॥ अप्रतर्क्यमविज्ञेयं तमस्तदुपधारयेत् ॥ ५ ॥ जेव्हां आत्मा व मन हीं दोनहि मोहानें फसलेलीं दिसतात व त्यामध्यें अविवेक, विषयासक्ति, अज्ञान इत्यादि गुण दिसतात । तेव्हां त्यांमध्यें तमोगुण वाढला आहे असें समजावें "

### मूलाधारादि चक्रें

गुद आणि लिंग या दोहोंच्या मध्यभागांत मूलकंद आहे; तेथें ' वं शं षं सं ' या चार वर्णांनीं चिन्हित अशा चार पांकळ्यांनी युक्त, अग्नीच्या वर्णासारखें व भगाकृति असें आधारचक्र आहे. याला वन्हिकुंड असेंहि म्हणतात. त्याचा अधिष्ठाता म्हणजे त्यामध्यें राहणारी देवता भगवान् गणेश आहे. या चक्रांत ज्योतिष्मती भगवती कुंडलिनी आहे.

२ दुसरें:—लिंगाच्या पश्चिमभागीं गुह्य देशांत ' बं भं मं यं रं लं ' या सहा वर्णांनीं चिन्हित अशा सहा पांकळ्यांनीं युक्त, सूर्यवर्णसमान व पोंवळ्याच्या अंकुराप्रमाणें असें स्वाधिष्ठानचक्र आहे. त्याची देवता भगवान् ब्रह्मा.

३ तिसरें:—नाभिदेशांत ' डं ढं णं तं थं दं धं नं पं फं' या दहा वर्णांनीं चिन्हित अशा दहा पांकळ्यांनीं युक्त, रक्तवर्ण असें मणिपूरचक्र आहे त्याची देवता भगवान् विष्णु.

४ चवथें:—' कं खं गं घं ङं चं छं जं झं ञं टं ठं ' या बारा वर्णांनीं चिन्हित अशा बारा पांकळ्यांनीं युक्त, सुवर्णवर्ण, खालीं मुख केलेलें असें हृदयप्रदेशांत " अनाहतचक्र " आहे. याची देवता भगवान् शंकर.

५ पांचवें:—कंठदेशांत ' अ आ इ ई उ ऊ ऋ ॠ ऌ ॡ ए ऐ ओ औ अं अः या सोळा पांकळ्यांनीं युक्त, चंद्रवर्णसमान असें ' विशुद्धि ' चक्र आहे. त्याच्या डाव्या बाजूस इडा, उजवीकडे पिंगला आणि मध्यभागीं सुषुम्ना आहे. याची देवता रुद्र.

" तालुकाचक्र" ज्याला घंटिकास्थान किंवा ब्रह्मांड म्हणतात तें दहाव्या द्वाराचा मार्ग आहे.

दोन्ही भुवईच्या मध्यें ' हं ' आणि ' क्षं' या दोन अक्षरांनीं अंकित अशा दोन पांकळ्यांनीं युक्त, रक्तवर्ण असें ' आज्ञाचक्र " आहे. याला बिंदुस्थान असेंहि म्हणतात. हें नादोत्पत्तीचें स्थान आहे.

निर्वाणसूचक ब्रह्मरंध्र सुईच्या अग्राप्रमाणें आहे. हें मेंदूच्या मध्यवर्ती असतें. याच्या वर दहाव्या द्वारांत राहिलेलें, हजार पांकळ्यांनीं युक्त, स्फटिकवर्णासारखें असें ब्रह्मचक्र आहे. त्यांत संविद्रूप (ज्ञानस्वरूप) सच्चिदानंद आहे.

हीं जीं चक्रें व त्यांचीं दलें म्हणून सांगितलीं त्यांत चक्रें म्हणजे सुषुम्नेबरोबर संबद्ध झालेले एका प्रकारचे शिराग्रंथी, यांनाच पद्में म्हणतात व ग्रंथींचे जे सूक्ष्म शिरातंतू त्यांला दल असें म्हणतात. यांत स्थिति झाली असतां विशेष ज्ञान होतें. त्या योगानें जरी एक रंग एका पद्मांत प्रधान दिसला असला तथापि सूक्ष्म रीतीनें पाहिलें असतां असें प्रत्यक्ष होतें कीं, प्रत्येक दल भिन्न भिन्न रंगाचें आहे. त्या पांकळ्यांच्या द्वारानें मनोवृत्ति भिन्न भिन्न प्रकारची होते; तिचें सुद्धां अवलोकन करावें. उदाहरणार्थ, अनाहतचक्र हें मनःस्थान आहे. त्यांत याप्रमाणें पांकळ्यांचा रंग व त्यांपासून उत्पन्न झालेल्या मनाच्या भावना होतात, त्या साधकानें एकाग्रचित्त होऊन ओळखाव्या.

**पांकळींचें अनुसंधान—मनश्चक्राचें कोष्टक.**

| पांकळीचा देश. | रंग | पांकळीच्या द्वारानें उत्पन्न होणाऱ्या वृत्ती. |
|---|---|---|
| पूर्व | पांढरा | धैर्य, औदार्य, धर्मबुद्धि, यशोलाभ. |
| आग्नेय | रक्त | प्रमाद, आलस्य, निद्रा. |
| दक्षिण | काळा | द्वेष, क्रोध, दुष्टबुद्धि. |
| नैर्ऋत्य | निळा | संसारासक्ति, स्त्रीपुत्रांदिकांत अत्यंत प्रेम. |
| पश्चिम | धूम्रवर्ण | अज्ञानानंद, हास्य, विनोद. |
| वायव्य | श्याम | चिंता, उद्वेग. |
| उत्तर | पिंवळा | भोगादिकांत प्रीति. |
| ईशान्य | गौर | कृपा, क्षमा, शांति, ज्ञान. |

१३

## ध्यान.

तत्र प्रत्ययैकतानता ध्यानम् ॥ २ ॥

ज्या एका वस्तूवर चित्ताची धारणा केली असेल तेथेंच त्याची एकतानता होऊन म्हणजे लय लागून जाऊन अर्थात् एकाग्रता होऊन तें दुसरीकडे न जाऊं देणें, ह्यास ' **ध्यान** ' असें म्हणतात.

## ध्यानयोगाचें प्राधान्य.

परमात्मप्राप्ति किंवा मोक्षप्राप्ति यांचें एक मुख्य साधन " **ध्यान** " हें आहे.

**ध्येयावांचून** ध्यान होत नसतें. **स्थूलापासून ध्यान करीत करीत सूक्ष्मापर्यंत जावें लागतें.** म्हणून प्रथमतः पंचप्राण, नंतर दश इंद्रियें, मग मन आदि—अंतःकरण चतुष्टय यांचे क्रमानें ध्यान करावें. प्राण हे स्थूल आहेत, व अंतःकरण सूक्ष्म आहे. म्हणून आधीं स्थूल प्राणांचें आलंबन करून नंतर सूक्ष्म अंतःकरणावर ध्यान करावें. याप्रमाणें एक एक पदार्थावर ध्यान करून त्याला पूर्णपणें जाणल्यावर जीवात्म्याला निजस्वरूपाचें ज्ञान होऊं लागतें जीवात्मा स्वस्वपारूच्या ज्ञानानें युक्त होऊं लागल्यावर त्याला परमात्म्याविषयीं विचार करतां येतो. **ध्यानयोगाची परिपक्वदशा समाधि आहे व या स्थितींत स्वस्वरूपाचा अनुभव येत असतो.** या अवस्थेमध्यें जीवात्मा मग्न झाला असतां त्याला परमात्म साक्षात्कार होतो. ध्यान परमात्म्याकडे लावलें तर त्याचें ज्ञान होतें, पण जर त्याचा अन्य रीतीनें दुरुपयोग केला तर अधोगति होते. व्यवहारामध्यें दुर्वर्तनी लोकहि त्या त्या दुष्ट विषयाचें ध्यान करतात. व त्या योगानें वाईट फळें भोगतात. जादूगार लोक हातचलाखीचे प्रयोग जे अत्यंत चातुर्यानें करतात, ते त्या ध्यानाच्या योगानेंच होत. त्याचप्रमाणें, इतर दुर्वर्तनी मनुष्यांविषयीं जाणावें. हे लोक ज्या दृढ प्रयत्नानें आपल्या मनानें त्या दुष्ट विषयांचें ध्यान करतात,

त्याचा एक दशांश प्रयत्न जरी त्यांणीं या योगविद्येच्या अभ्यासांत लावला व परमेश्वराला ध्येय समजून त्याचेंच निश्चयानें ध्यान केलें तर धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे चारहि पुरुषार्थ साधतील यांत शंका नाहीं. इतकी ध्यानयोगाची थोरवी आहे.

### भ्रूध्यान–पुरुषध्यान.

### भ्रूध्यान.

दोन्हीं भ्रुकुटींच्या मध्यें देहाच्या मध्यभागापासून मस्तकापर्यंत स्थाणूप्रमाणें ( निश्चल ) स्थित असणारा, प्रकाशरूप, जगताचें कारण व अव्यक्त अशा आत्म्याला मनानें जाणून '**तो मी**' असें एकाग्र चित्तानें अभेद चिंतन करावें. याला भ्रूध्यान म्हणतात.

### पुरुषध्यान.

पूर्वी सांगितलेल्या विकसित हृदयकमलांत, सहस्रदलांनीं युक्त व अधोमुख ( पालथें ) जें दहाव्या द्वारांत कमल आहे, त्यांतून पडणाऱ्या अनेक अमृतधारांनीं भिजून गेलेला व सुधारसानें सिंचन करणाऱ्या चंद्रकिरणांनीं व्याप्त, तसेंच अमृताच्या सिंचनानें सर्वांगीं पुष्ट झालेला तेजोमय असा जो भोक्ता पुरुष त्याचे ठिकाणीं 'तो मीच सच्चिदानंद परब्रह्म आहें' असें अभेद चिंतन करावें. याला "**पुरुष-ध्यान**" म्हणतात. या रीतीनें ध्यानाचा अभ्यास करणारा योगी सहा महिन्यांत मृत्युंजय होतो. आणि वर्षामध्यें जीवन्मुक्त होतो.

### निर्गुणध्यान.

याप्रमाणें सगुणध्यानाचा प्रकार सांगितला. आतां निर्गुणध्यानाचा एक प्रकार तेथेंच याप्रमाणें सांगितला आहे.—

निर्गुणध्यान १ लें: 'ज्योतिर्मय, शुद्ध, व्यापक, कूटस्थ, अनंत, अचल, नित्य, अनाकाश, असवर्ण, अरूप, अरस, अगंध, अप्रमेय, अनामय, आनंदस्वरूप, अजर, सदसत् सर्वकारण, सर्वाधार, जगद्रूप, अमूर्त, अज अव्यय, अदृश्य, ज्ञान्यांनीं सर्वसंवेद्य, सर्वांच्या आंत आणि बाहेर स्थित, सर्वतोमुख, सर्वदृक्, सर्व ठिकाणीं आहेत हस्त आणि पाद ज्याला, अशा विशेषणांनीं युक्त जें सच्चिदानंद परब्रह्म 'तें मी आहें' असें एकाग्र चित्तानें अभेद-चिंतन करणें यास ब्रह्मवादी '**निर्गुणध्यान**' म्हणतात.

१ ध्यानबिंदूपनिषदांत याप्रमाणें सांगितलें आहे, स्वदेहाला खालची अरणि करावी, व प्रणवाला उत्तर ( वरची ) अरणि करावी आणि ध्यानरूप मंथनाच्या अभ्यासानें निगूढ-परमात्माचा साक्षात्कार करून घ्यावा.—

ध्यानसमयीं ज्या वेळीं योग्याचें कुंडलीचक्र गुदा अथवा मूलाधार चक्रावर येतें, त्या वेळेस पुरुष मुक्त झाला असें म्हणतात. अशा वेळीं हृदयरूप गुंफेंत जो सोहंरूपी आत्मा आहे, तो पंचप्राणांच्या असंख्य नाड्यांच्या आकारांत मिश्र होऊन स्तंभाकार भासल्यामुळें, त्यानें स्तंभरूपी सोहमाच्या आकृतींनीं विराट्स्वरूप धारण केलें आहे असें वाटतें. त्यामुळें त्याविषयीं सर्पाकार कुंडलीचा देखावा आपल्या वासनानिर्मित स्वर्ग, मृत्यु आणि पाताळ इत्यादिकांच्या देखाव्यांत प्रकट होतो. हें सविकल्प समाधीचें प्रथमचें चिन्ह आहे. या स्थानीं संयमरूप चित्तवृत्ति शांतपणें स्थिर होऊन योग्यांस चंद्रामृतपान घडल्यानें ते योगी जरा ( म्हातारपण ), व्याधि वगैरे कांहीं एक नड न येतां दीर्घायुषी होतात. असा चमत्कार श्वास जेव्हां सात बोटांवर येऊन पोहोंचतो त्या वेळेस होऊं लागतो. या रीतीनें सर्पाकार कुंडली उलट झाल्यामुळें सोहं-

---

१ कवि मयूर म्हणतात;—
जैसी अभिरुचि विषयीं तैसी परमेश्वरीं घडेल जरी।
तरी मग काय उणें बा, चारी पुरुषार्थ राबतील घरीं।

रूप विराट् आकृति धारण करितो. त्यांत आकाश आणि अग्नि हीं दोन तत्त्वें शरीरांत खालच्या भागांत येतात; आणि पृथ्वी, जल व वायु हीं तीन तत्त्वें कंठचक्राकडे जाऊं लागतात. त्यांत तो सोहं कुंडलीबरोबर एकरूप होऊन स्तंभाकारांत सर्व प्राणवायूंला सरळ करवितो; त्यामुळें चित्ताच्या अनेक वृत्ति या बाह्य ब्रह्मांडाच्या कल्पना करितांना बंद पडतात. म्हणून मनोमयज्ञानांत या सृष्टिसंबंधी कल्पना आंत प्रकट झाल्यानें अनेक देश आणि रचना वगैरे अद्भुत आकारानें त्याला भासूं लागतात. ह्या सर्व प्राणवायूच्या दृढतेच्या अनुसार चित्तकलाच अशा आकारांत स्फुरलेली दिसते.

ज्या समयीं कुंडलीच्या बरोबर सोहं आणि प्राणवायु हे एकरूप होऊन मेरुदंडावर चढून जाण्याची तयारी करितात त्या वेळीं कंठांतल्या 'स्वप्न' नांवाच्या नाडीबरोबर पूर्वी सांगितलेल्या प्राणवायूच्या बहात्तर हजार नाड्या आणि सर्व शरीराचे साडेतीन कोटी लोम (केश) यांविषयीं स्थूल आकाराच्या वर सांगितलेल्या बाहात्तर हजार नाड्या सोहमाच्या प्रकाशित स्वरूपाला यथार्थ आकृतींत सुषुम्नेच्या योगानें प्रकट करितात. ती सुषुम्नाशक्ति सूर्यचंद्रांच्या ऐक्यसंबंधानें रहित होऊन स्वतः ध्यानद्वारें चैतन्यरूप आत्म्याचा साक्षात्कार करविते, त्यामुळें ह्या सर्व नाड्या पंचभूतांच्या सूक्ष्म किरणांच्या आकारांत चहूंकडे व्याप्त झालेल्या दिसतात, आणि त्या कुंडलीचक्राच्या आसपास काळा, लाल, मिळा, पिंवळा, आणि पांढरा वगैरे वर्ण एकत्र होऊन चक्राकार फिरताहेतसे दिसतात आणि त्यांत सोहंरूपी आत्मा, पंचप्राण व कुंडली हीं ऐक्यानें मिळून जातात. त्या समयीं श्वासाची गति बंद पडून झोंपीं गेल्याप्रमाणें तो योगी दिसतो. अशा दिसणाऱ्या स्थितीस "जीवन्मुक्ति" म्हणतात. या स्थितींत अंतःकरण स्वस्थ आनंदांत असतें, आणि जाग्रत् अवस्थेंत निद्रातुल्य असतां एकाग्र वृत्तींचा प्रवाह जाग्रतासारखा भासतो; तरी पण त्या समयीं श्वासोच्छ्वासाची गति बंद पडलेली दिसते. अशा वेळीं ओंकाररूप आत्म्याच्या अभ्यासाविषयीं सोहं आणि कुंडली हे दोघे व्यापून जातात. तसें झाल्यानें एकाग्र चित्ताच्या शांतियुक्त अनेक चित्तकळा अथवा वृत्ती सोहंरूपाच्या मूळांत जशी भावना उत्पन्न करतील, त्याप्रमाणें कल्पना प्रकट होतात. त्यामुळें सोहमांतील प्राणवायूविषयीं दृढ झालेल्या वासनांत चित्ताच्या अनेक वृत्ती भावनेच्या अनुसार प्रवेश करितात. त्यामुळें सर्व वृत्ति देवी, देवता, ऋषि, तपस्वी आणि साधुसंत यांचे आकार धारण करून सोहंरूपी आत्म्याला दाखवितात; एवढेंच नाहीं तर, ते सर्व देव, सोहंरूपी आत्म्याला अनेक प्रकारचे मंत्र, विद्या आणि क्रिया वगैरेंची सूचना सुद्धां करितात. आणि त्यांच्या ज्ञानानें देहद्वारें या सृष्टीच्या सर्व स्वरूपाच्या कृति समजतात. असला देखावा आपल्या ज्ञानाच्या दृढतेनें प्राप्त होतो. अशा प्रकारचा यथार्थ संपूर्ण अनुभव मोठ्या निश्चयी महापुरुषाला येतो.

त्याला दृष्टांत सद्ग्रंथांत पुष्कळ आहेत. अशा स्थितींमध्यें वर्तमान, भूत आणि भविष्य वगैरे काळांचे सगळे नियम समजतात. यालाच योगशास्त्रांत "संयमप्राप्ति" म्हटलें आहे. याच संयमप्राप्तीच्या योगानें महात्मे आणि तत्त्वदर्शी सत्य, त्रेता, द्वापर आणि कलि वगैरे युगांचें भविष्य कथन करून गेले आहेत. अशी स्थिति झाल्यानंतर पुढें आपले सर्व प्राणवायु अदृश्य झालेले दिसतात,

आणि कुंडली तसेंच सोहं ओंकाररूप आत्मा हे ऐक्य धारण करितात त्यामुळें आपल्या स्थूल देहाचें भान रहात नाहीं; म्हणून याला "**निर्विकल्प समाधि**" म्हणतात. त्यांत या प्रसंगीं आपली वासनायुक्त कुंडली पंचप्राणांच्या सर्व नाड्यांमध्यें सजीवरूपानें राहिली आहे. त्यामुळें जर सोहंरूपी आत्म्यांत थोडी जरी कल्पना प्रकट होईल तर त्या योग्याचे सर्व प्राण पुनः मेरुदंडाच्या मार्गानें शरीराच्या सर्व चक्रांत नियमित रीतीनें आपापल्या स्थानांत स्थिर होऊन जातात. त्या योगानें त्या समाधिनिष्ठ पुरुषाचा देह आणि त्याचीं सर्व इंद्रियें पूर्वीप्रमाणें जाग्रत स्थितींत पुनः प्राप्त होऊन **सृष्टिव्यवहार** करितात.

अशा प्रकारचे चमत्कार श्वास **पांच बोटांपर्यंत राहिल्यानें** दिसतात. त्याकरितां जे एकांतवासी पूर्ण योगेश्वर आहेत, ते आपल्या प्राणांला पुष्कळ कालपर्यंत संयमांत ठेवून निर्विकल्प समाधींत राहतात.

याप्रमाणें मनाला जिंकिल्यानें मन आणि वृत्ति हीं दोन्ही शून्य होतात, म्हणजे ते योगी मुक्याप्रमाणें राहतात. याचा सारांश इतकाच कीं, स्फूर्तीचा प्रतिबंध केल्यानें मात्र एकच साक्षी आत्मा राहतो; आणि याचेंच नांव 'तुरीयावस्थासंयमाभास' असें या विद्येच्या ज्ञात्यांनीं सांगितलें आहे. त्यामुळें यामध्यें सर्व प्राण,—सोहं आणि कुंडली हे सर्व एकरूप होऊन ओंकाररूप आत्म्यांत मिळून जातात. हा देखावा आपला सोहंरूपी आत्मा भ्रुकुटीचक्रांत व्यापून गेल्यानें पाहण्यांत येऊं लागतो. याप्रमाणें तुरीयरूप संयमाभासांत ओंकाररूप आत्मा लीन होतो. तसें झाल्यानंतर सोहमाबरोबर व्याप्त झालेली कुंडली आणि प्रण्यांच्या असंख्य नाड्या भिन्न भिन्न तंतूंप्रमाणें अथवा सूर्याच्या अति सूक्ष्म किरणांसारख्या, ज्यांचें माप होऊं शकत नाहीं अशा अमर्याद अनेक रूपांनीं दिसतात. त्यांच्यावर सोहंरूपी आत्म्याची दृष्टि पडल्यानें त्या ज्ञानदृष्टीनें भिन्न भिन्न सूचना देतात. त्यांत कुंडलीरूपी वासनिक चक्र आपल्या स्वरूपांत ऐक्यरूपानें मिळून गेल्यानें जी आपली वासना प्रकट होते, त्या वासनेहून कुंडली भिन्न नाहीं; म्हणून जशी वासना तशीच दृष्टि आपोआप प्रकट होते. या चैतन्यप्रकाशरूपी किरणावर आपण ज्या वेळेस स्थिरता राखून लक्ष ठेवितों, त्या वेळेस आपली चलन होणारी स्फूर्ति मनोमन अंतर्यामी भावनायुक्त ज्ञानाविषयीं प्रथम दृढ केलेल्या संकल्पाप्रमाणें या जगच्चक्रांत व्यवहार करून दाखविते, अथवा त्या सर्व प्राणिमात्राच्या निश्चित केलेल्या संकल्पाप्रमाणें आपला संकल्प उत्पन्न होतो. यावरून अनुभवी ज्ञानी असें सांगतात कीं, या विश्वाच्या दृश्य आणि अदृश्य सर्व वस्तु आपल्या दृढ झालेल्या संकल्पांत राहिलेल्या सत्व, रज आणि तम या गुणांच्या दृढतायुक्त निश्चयार्थांत मिळून जाऊन आपल्या संकल्पाच्या भावनेबरोबर एकत्र एकपणानें लीन होतात, त्यावरून **सर्व कृति आपल्या दृढ झालेल्या संकल्पाच्या आहेत.** अशा प्रकारच्या महा अद्भुत स्वयं ज्ञानानें आकाश, अग्नि, जल, वायु आणि पृथ्वी इत्यादि तत्त्वांच्या बंधारणानें पशु, पक्षी, कीट आणि मनुष्यादिक चराचर विश्वांतील प्राणिमात्राची उत्पत्ति कशा रीतीनें होते तें जाणूं शकतो, एवढेंच नाहीं तर, त्यांचें भक्ष्य, पान, वाणी आणि संकल्पविकल्प वगैरे त्यांच्या अंतःकरणांत राहिलेल्या सर्व क्रियांना आपला संकल्प यथार्थ स्वयंज्ञानानें जाणून त्यांच्य सर्व व्यवहाराला सुद्धां दाखवितो. इतकेंच नव्हे तर, ओंकाररूप आत्माचा जो आभास ओंकाररूप आत्म्याच्या अनंत

प्रकाशरूपी आहे ती जी अविद्या दृश्यरूपानें राहिली आहे, तिचीं सर्व मूलतत्त्वें त्या योग्यास समजण्यांत येतात. याच ज्ञानानें गुप्तविद्या, ज्योतिषविद्या, रमलविद्या, प्रारब्ध, संचित, आणि क्रियमाण, तसेंच अगम्य-वस्तू, शकुनापशकुन, यांच्या भविष्यदर्शनाचा शोध प्रथम समर्थ योगात्म्यांनीं केलेला आहे. अशा ज्ञानाचा संपूर्ण अनुभव ज्या वेळेस श्वास चार बोटांच्या अंतरावर येतो त्या वेळेस प्रत्यक्ष होतो. त्यामुळें याचें नांव योगांत "उपरति" सांगितलें आहे.

### उपरति

उपरति या शब्दाचा अर्थ योगविद्येच्या ग्रंथांत असा आहे कीं, सविकल्प आणि निर्विकल्प समाधीच्या अभ्यासानें प्रमाण, विपर्येय, विकल्प, निद्रा आणि स्मृति अशा पांच वृत्तींचा निरोध होतो, त्या स्थितीस उपरति म्हणतात. इचा अभ्यास करणाऱ्या पुरुषाच्या हृदयाची वासना नष्ट होते, त्या वेळेस ही उपरति मोठें अलौकिक ऐश्वर्य देते. चित्ताच्या सर्व वृत्तींचा निरोध झाल्यानें विस्मरण होतें. हा तत्त्वबोध प्रधानरूप आहे. कारण, हा वैराग्य आणि उपरति या दोहोंतला उपकारी साधन असल्यामुळें साक्षात् मोक्षाला प्राप्त करवितो. असें आहे म्हणून हठाभ्यासी पुरुष हठानें उपरति आणि वैराग्य संपादन करितात. हें सर्व खरें, परंतु जेथपर्यंत पूर्ण ज्ञान प्राप्त झालें नाहीं तेथपर्यंत मोक्षाची प्राप्ति होत नाहीं.

### अंतर्दृष्टीचे चमत्कार.

आतां गुप्त विद्येच्या पूर्ण ज्ञानाला अंतर्दृष्टीनें जे चमत्कार दिसतात ते सांगतों,—सुषुप्तीप्रमाणें जर विस्मृति होऊन जाईल, तर त्या ध्याननिष्ठाच्या उपरतीची सीमा आहे. अशा स्थितींत सोहं आणि ओंकार हे दोन एकाग्रवृत्तींत स्थिर राहतात. त्यामुळें ओंकाररूप आत्म्याच्या ज्योतीचे असंख्य किरणरूप तंतू आपल्या स्वरूपांत परस्पर एकत्र होऊन चक्राप्रमाणें फिरूं लागतात, आणि हे सर्व तंतू पुढें 'महान् तेजोमय गोल आकृतीनें प्रकाशित होतात. या वेळीं या स्वरूपाच्या मध्यभागांत अदृश्य रूपानें जी अविद्या अथवा ईश्वरी माया मूळ गुप्तसंकल्परूपानें राहिलेली आहे तिच्या मध्यभागांत अनंतकोटी ब्रह्मांडांची उत्पति, स्थिति आणि लय होताहेतसे दिसतात; त्यांत असंख्य ब्रह्मदेव, रुद्र, देवता वगैरे, तसेच असंख्य सूर्य, चंद्र आणि नक्षत्रें वगैरेंची सुद्धां उत्पति, स्थिति आणि लय होताहेतसें भासतें. त्यांत जेव्हां ओंकाररूपी आत्म्याचा भाव ज्या संबंधानें अणूंवर होतो, त्या वेळेस ते अणू तसे भावरूपी संकल्प, ज्ञान आणि अनंतकोटी ब्रह्मांडें उत्पन्न करून दाखवितात. पुढें ज्या वेळेस त्या भावना नष्ट होतात तेव्हां वर दर्शविलेल्या अनंत ब्रह्मांडें वगैरेंचा लय झालेला भासतो. अशा प्रकारच्या ध्यानाच्या अभ्यासानें सर्व प्राण्यांबरोबर आपल्या हृदयगत मनोमन ज्ञानानें, आपल्या निश्चितार्थाप्रमाणें सर्व व्यवहार चाललेले दिसतात. यावरून योगी तत्त्वज्ञान प्रकट करूं शकतो. अशा प्रकारचे चमत्कार, आपला श्वास ज्या वेळेस तीन बोटांच्या अंतरांत येतो, त्या वेळेस प्रत्यक्ष दिसतात.

तसें झाल्यानंतर त्यांतून निवृत्त होऊन शेवटीं संपूर्ण द्वैतभावयुक्त मन आणि अविद्या यांचा लय होतो. याचा स्पष्टार्थ असा कीं, संपूर्ण ज्ञानयुक्त ज्ञेयरूपानें ज्ञातारूप आत्म्याची प्रतीति होते. त्यांत आपल्या मनास ज्ञेय म्हणतात; म्हणून या मनरूपी ज्ञेयाचा लय झाल्यानें द्वैतरूप प्रपंचाचा लय ज्ञातारूप आत्म्यांत होऊन जातो. याचा सारांश हा आहे कीं, अशा ध्यानाच्या स्थितींत ज्ञाता, ज्ञेय

आणि ज्ञान; ध्याता, ध्येय आणि ध्यान; कर्ता, कार्य आणि करण; द्रष्टा, दृश्य आणि दर्शन याप्रमाणें सर्वहि त्रिपुटींचा भाव राहत नाहीं; तर ह्या सर्व त्रिपुटी ऐक्यरूपानें ओंकार आत्म्याविषयीं अखंडित प्रवाहाच्या स्थिर धारेप्रमाणें प्रकाश करितात. हिलाहि ' **संयमस्थितीच** ' म्हणतात. कारण, या स्थानीं सोहंरूपी आत्मा कुंडलीरूपी वासना आणि सर्व प्राण हे एकाच ओंकाररूप आत्म्याच्या प्रकाशित तेजोमय किरणांत ऐक्यानें लीन होऊन गेलेले असतात; त्यामुळें देह आणि जगत् यांचा भाव राहतच नाहीं. त्यामुळें ओंकाररूप आत्म्याच्या अविद्येच्या संकल्पानें उत्पन्न झालेल्या अनंत वृत्ती ओंकाराच्या तेजोमय स्वरूपांत लीन झालेल्या दिसतात; आणि आपलें चित्त नष्ट झालेलें भासतें. याप्रमाणें सर्व वृत्ती सर्व तऱ्हेनें लीन झाल्यानें ओंकाररूप दिव्यलक्षणयुक्त पुरुषाची अथवा शुद्ध चैतन्याची प्राप्ती होते. ती अशी,—जशा गंगादि नद्या ज्या वेळीं गतिमान् होऊन समुद्रांत मिळतात त्या समयीं त्या जशा नाम, रूप वगैरे आकृतीचा त्याग करून, समुद्रामध्यें अस्तपणाला धारण करितात, तसा पूर्ण ज्ञानानें योगी अविकृत नामरूपांपासून सुटून मुक्त होऊन पूर्वीं सांगितलेल्या अक्षयरूप व पराहून पर अशा दिव्य लक्षणयुक्त चैतन्यरूप पुरुषाप्रत प्राप्त होतो. अशा स्थितीच्या वेळीं ओंकाररूप आत्म्याच्या अविद्येच्या अणूचा तेजोमय सूर्यासारखा प्रकाशित एक गोळा बनतो. या गोळ्याच्या किरणांचें जें तेज आहे तें या सृष्टींत राहिलेल्या सर्व स्थावर, जंगम, जड, चैतन्याकृतींमध्यें विद्युद्रूपानें राहिलें आहे. ती मूळ विद्युत् ओंकाररूप आत्म्याची ज्योति आहे, आणि तींत जे वर अणू आहेत, ते आत्मज्योतीचा एक किरण आहे. हा किरण आत्म्यामध्यें लीन झाल्यानें तो आत्म्यासारखाच दिसूं लागतो, त्यामुळें आत्मा आणि त्याचा किरण हे दोन निराळे नाहींत, तर एकरूप आहेत. कारण, वर सांगितलेल्या विजेच्या योगानें या सृष्टींत जे जे फेरफार होतात ते सर्व या अणुरूप सूर्यमय आत्म्यानें होतात.

याप्रमाणें वर सांगितलेली विद्युत् ( भावरूप ) सर्व अनंत कोटी ब्रह्मांडांचें आकर्षण करिते. त्याचप्रमाणें सर्व प्राणिमात्राला ती जीवंत ठेवून सर्वांविषयीं अनेक प्रकारचे संकल्प आणि विचार यांनी दृढता करविते. भावाची गति अति मोठी आहे. त्यामुळें ही भावरूप विद्युत् दुसऱ्याच्या संकल्पांत व्यापून जाऊन जगाच्या क्रिया, विचार वगैरेंना पालटून टाकिते. तें याप्रमाणें कीं, **कोणी महात्मा योगेश्वर आपल्या प्रबल इच्छाशक्तीनें सत्ययुग होण्याचा संकल्प करील तर तत्काल तो भाव सत्ययुगाचीं धर्म, नीति, ज्ञान आणि प्रजा वगैरे झालेलीं दाखवून, ज्यांत सर्व प्रजा सत्यवादी, ज्ञानी आणि परमसुखी आहेत** असें त्या वेळचें जगत् हल्लीच्या जगतापेक्षां भिन्न रूपांतत्र भासवितो. सर्व देशाच्या मतपंथांच्या मूळ पुरुषांच्या कृती यथार्थ जाणल्यानें होऊं शकतो. त्या सर्वांचा सारांश इतकाच कीं, स्थूल विद्युत् जगताच्या सर्व जड पदार्थांचा व्यवहार चालविते. आतां दृढ झालेली भावना प्राण्यांच्या हृदयांत व्यापून कल्पनांचा व्यवहार चालविते, तसा व्यवहार स्थूल विद्युतेला चालवितां येत नाहीं; कारण, ती सूक्ष्म नसून स्वाभाविक जडहि आहे आणि दृढ झालेली भावना स्वभावानें चैतन्यरूप आहे; म्हणून ही आत्म्याबरोबर ऐक्य दाखविते. तें इतकें कीं, ' मी निराकार आहें ' याप्रकारची दृढ कल्प-

ना इच्छाशक्तीनें झाली म्हणजे आपली सर्व कल्पना आणि तिचे संकल्प निराकारपणांत व्यापलेले आपणास समजतात.

तात्पर्य इतकेंच कीं, जसा आपला **भाव, जशी वासना, जसे निश्चितार्थ, जशी दृढता आणि जशी प्रबल इच्छाशक्ति त्या प्रकारानें लाभ, अलाभ, सुख, दुःख, यश, अपयश आणि कीर्ति वगैरे सर्व ऐश्वर्य आपोआप चिंतिल्यावांचून आपल्याला (योग्याला) प्राप्त होऊन जातें.** याच कारणावरून प्रथम उत्पन्न होणाऱ्या संकल्पाला प्रारब्धरूप अथवा इच्छाशक्ति असें सच्छास्त्रांत म्हटलें आहे; कारण कीं, सर्व जन्म प्राप्त करविण्याचें मूळ संकल्प आणि मनच आहे; म्हणून ज्ञानी पुरुषांनीं प्रारब्धाला मुख्य मानिलें आहे. संकल्पाच्या निश्चयार्थाचें नांवच प्रारब्धाचें मूळ आहे. ह्या निश्चयार्थ अनुरूप आत्म्याचें तेजोमय, चालितरूप, अतिसूक्ष्म भावरूप चैतन्य दृढ वासनांच्या योगानें आपल्या संकल्पानुसार इच्छेप्रमाणें दुसऱ्या प्राण्यांमध्यें प्रवेश करूं शकतें; यामुळें **आपला प्राण दुसऱ्या अनेक शरीरांमध्यें प्रवेश करूं शकतो;** आणि **यालाच परकाय प्रवेश म्हणतात.** याच रीतीनें समर्थ शंकराचार्यांनीं एका राजाच्या शरीरांत आपल्या सर्व चैतन्याचा प्राणांसुद्धां प्रवेश केला. या रीतीनें तेजोमय आत्मरूप सूर्याचा असा प्रकाशित गोळा आपल्या दृढ संकल्पाप्रमाणें ज्या वेळेस चालतोसा वाटतो, त्यावेळेस आपला **श्वास दोन बोटांच्या अवकाशांत चालतो** असें समजावें, याला गुप्तविद्येचे ज्ञानी " **धर्ममेघ** " असें म्हणतात.

या धर्ममेघाला कितीएक महात्मे **समाधि** म्हणतात; कारण, समाधीच्या स्थितीप्रमाणें यात ज्ञानरूप धर्माच्या अनंत अमृतमय धारा वर्षतात; अर्थात् गुप्तज्ञानाच्या अनेक स्फूर्ति प्रकट होतात.

कितीएक वैद्य या समाधिनिष्ठाला **मरण पावला** असें समजतात. कारण, त्या समयीं त्याचें श्वाससहित सर्व चैतन्य एकरूपानें आत्म्यामध्यें व्यापून जातें; **त्यामुळें त्याचा देह दुसऱ्याला काष्ठाप्रमाणें भासतो.** अशा स्थितीच्या वेळीं योग्याचा **श्वास एक बोटाच्या अंतरांत** राहिलेला असतो. अशा समयीं आपल्या संकल्पाचे सर्व भाव अनेक वृत्तीनें ऐक्यरूपानें एकत्र होऊन जातात. त्यामुळें संकल्परूपानें अति सूक्ष्म **अंतवाहक शरीर इच्छामात्र अशा अनंतकोटी ब्रह्मांडांच्या स्थानांत गमन करूं शकतें.** इतकेंच **नाहीं तर तेथें अनेक क्रिया करून त्या केलेल्या क्रियांची यथार्थ** जाणण्याची **शक्ति सुद्धां पुष्कळ प्रसंगीं** त्या समाधिष्ठ **योग्याच्या संकल्पाला येते.** पुढें ज्या वेळीं अखंड ज्योति तेजोमय प्रकाशानें स्थिरता पावते, त्या वेळेस महदाकाशस्वरूपाचा भास पडतो. या भासांत असंख्य संकल्प अगणित ब्रह्मांडांची उत्पत्ति, स्थिति आणि लय करिताहेतसें वाटतें. त्या वेळीं अनुरूप आत्मा ओंकाररूप आत्म्यामध्यें पूर्णपणानें एकत्र होऊन जातो, त्यामुळें तो समाधिनिष्ठ योगी स्वतः शुद्ध आकाशाप्रमाणें निर्विकार भावांत अखंड दंडायमान ( येथून तितकें एक अशा ) महादिक्कृतियुक्त आकाशाच्या पाकळात अविभाज्यपणाच्या लक्षणानें ( ऐक्यानें ) पंचभूतयुक्त विद्युतेचा कर्ता अति सूक्ष्म आकारानें सर्वच व्यापक होऊन स्वतः आपल्या मूळ स्वरूपांत स्थिर झालेला समजतो. असा मोठा आदर्श निराकार स्वरूपांत पूर्णानंदानें उदकाच्या लाटांप्रमाणें मिळून जातो. या स्थितीला अनुभवी ज्ञानी '**भूमा**' स्थिति म्हणतात. या स्थानांत मात्र गुप्तबुद्धीनें

**जगताचा द्वैतरूप भास उत्थानसमयीं** वाटण्यांत येतो; म्हणजे पुष्कळ वेळीं त्या योग्याला महदाकाशांत अंतवाहकरूप **द्वैत सृष्टि दिसते.** याकरितां उत्थान ( समाधिभंग ) न होतां जर बुद्धि शांति पावलेलीच राहील, तर अंतवाहकरूप द्वैत सृष्टि दिसणार नाहीं. यावरून स्पष्ट सिद्ध होतें कीं, **द्वैतमय जगद्रूप** दाखविणारी चंचलता पावलेली बुद्धिच होय.

### कुंडलिनीची जागृति.

ध्यानाची निर्विघ्नपणानें पूर्णावस्था व्हावी म्हणून कुंडलीला जागी करून **शून्यपदवीनें ( सुषुम्नामार्गानें )** प्राणाचा लय होण्याचा अभ्यास या अवस्थेंत विशेषेंकरून करण्यास सांगतात. त्याचा प्रकार असा आहे कीं, जसा सर्व पर्वतांसहित पृथ्वीला आधार शेष आहे, त्याप्रमाणें सर्व योगांगांना कुंडली आधार आहे. ही कुंडली निजलेली आहे. ती ज्या वेळेस गुरुकृपेनें जागी होते, त्या वेळेस सर्व चक्रें आणि ब्रह्मग्रंथि, विष्णुग्रंथि, व रुद्रग्रंथि या सर्वांचा भेद होतो. त्या वेळेस सुषुम्ना ही प्राणाला राजमार्गाप्रमाणें होते म्हणजे सुषुम्नेच्या वाटे ब्रह्मस्थानाकडे जाण्याला प्राणास कांहीं अडचण पडत नाहीं. त्या वेळेस चित्त स्थिर होऊन मृत्यूसहि जिंकण्यास समर्थ होतें. याकरितां जसें किल्लीनें कुलूप निघून दार सहज उघडलें जातें, त्याप्रमाणें हठयोगाचा अभ्यास करून कुंडलीनें मोक्षाचें द्वार जें अडवून धरलें आहे तें मोकळें करावें. ब्रह्मस्थानास जाण्यास तो मार्ग आहे. तेथें तोंडाशींच कुंडली मुख पसरून निजली आहे, असें हठयोगप्रदीपिका वगैरे ग्रंथांत सांगितलें आहे.

जिला **शून्यपदवी, ब्रह्मरंध्र, महापथ, श्मशान, शांभवी, मध्यमार्ग** वगैरे अनेक **संज्ञा आहेत,** अशी सुषुम्ना नाडी कंदाच्या मध्यभागीं राहिलेली आहे. ती पाठीमागच्या बाजूनें मेरुदंडांतून ( पाठीच्या कण्यांतून ) ब्रह्मरंध्रापर्यंत जाऊन पोहोंचली आहे. मनुष्याच्या लिंग व गुद यांच्या मध्यभागीं जी शिवण आहे तेथून नऊ बोटें वर बेंबीच्या खालच्या बाजूस एक कंद आहे; तो कंद चार बोटें लांब व चार बोटें जाड असून त्याची आकृती व रंग पक्ष्याच्या अंड्याप्रमाणें आहे व भोंवतालची त्वचा कफवेष्टित झाली आहे ' असें याज्ञवल्क्यांनीं सांगितलें आहे.

या कंदाच्या मधून सुषुम्नानाडी निघून आधारचक्रांत जाते, तेथून पुढें क्रमाक्रमानें स्वाधिष्ठान, मणिपूर, अनाहत व विशुद्ध या चक्रांत जाते. तेथें तिला एक पश्चिमेकडे व एक पूर्वेकडे असे दोन फांटे फुटतात. त्यांत पश्चिमेकडील फांटा, मानेच्या पाठीमागें **मेरुदंड** आहे, त्यांतून ब्रह्मरंध्रापर्यंत जाऊन पोहोंचतो; व दुसरा पूर्वेकडील फांटा भुवयांच्या मध्यभागीं जें **आज्ञाचक्र** आहे त्यांतून ब्रह्मरंध्रांत जाऊन पोहोंचला आहे. या दोन मार्गांपैकीं **पश्चिमेकडील मार्ग उत्तम आहे;** कारण, अथर्ववेदाच्या योगशिखा उपनिषदांत सांगितलें आहे कीं, ' योगमार्गांत जे निपुण योगी आहेत ते सुषुम्नेचा जो पवित्र **पश्चिममार्ग** आहे त्यांत प्राणकलेसुद्धां प्रवेश करितात. हठयोगप्रदीपिका व खेचरीपटल वगैरे ग्रंथांतही सुषुम्नेच्या पश्चिममार्गांत प्राणाचा प्रवेश करणें प्रशस्त सांगितलें आहे. या मार्गानें प्राण ब्रह्मस्थानांत जाऊन पोहोंचतो खरा; परंतु त्याच्या तोंडींच कुंडली तोंड पसरून मार्ग अडवून निजली आहे, तिला जागी करून मोक्षमार्ग मोकळा करावा लागतो.

कंदाच्या वरच्या जागेंत व नाभीच्या खालीं कुंडली सुषुम्नेला आपल्या अंगाचे साडेतीन वेढे देऊन व शेपूट तोंडांत बळकट धरून

राहिली आहे; त्यामुळें पुरुषाला प्राणाचा प्रवेश इतर नाडींप्रमाणें सुषुम्नेंत सहज करितां येत नाहीं; म्हणून दशम स्थान जें ब्रह्मस्थान त्यांत प्राणाचा लय करण्याविषयीं उत्सुक असणाऱ्या साधक पुरुषानें विधीप्रमाणें कुंडलीचें चालन करावें असें याज्ञवाक्यांनीं सांगितलें आहे.

## धारणा.

"देशबन्धश्चित्तस्य"

नाभिचक्र, हृदय, उर, कंठ, मुख, नाकाचा अग्रभाग, नेत्र, भुवईचा मध्यभाग, मस्तक व त्यावरचा प्रदेश या दहा ठिकाणीं क्रमाक्रमानें दुसऱ्या विषयावरील चित्त काढून धारण (स्थिर) करणें याला **धारणा** असें म्हणतात. त्यांत ध्रुवादि नक्षत्रें वगैरे भौतिक पदार्थ, म्हणजे ज्यांची प्रतीति अत्यंत बाह्य रूपानें होते, ते आधिभौतिक धारणेचे प्रदेश होत.

नासिकाग्र, ( नासिकामूल ) आधारचक्र, स्वाधिष्ठान, मणिपूरक, अनाहत, विशुद्धांबुज, तालुचक्र, आज्ञाचक्र, ब्रह्मचक्र वगैरे आध्यात्मिक धारणेचे विषय होत. परंतु ह्या धारणा प्रथम साधत नसल्यानें पृथिव्यादि स्थूल पदार्थांच्या धारणा आरंभीं कराव्या.

'जो बुद्धिमान् पुरुष पंचभूतांच्या धारणेचा उत्तम अभ्यास करीत आहे त्याला शेंकडों ब्रह्मदेवाचें आयुष्य जरी खपलें तथापि **कालाचें भय** असत नाहीं.'

## प्रत्याहार.

**प्रत्याहाराच्या** बलानें ज्या वेळेस अंतर्दृष्टि होते त्या वेळेस **अंतःसृष्टीचा देखावा स्पष्ट होतो** आणि त्या काळापर्यंत राहिलेल्या अज्ञात लीलांचा साक्षात्कार होतो म्हणजे जशीं विषयी पुरुषाचीं नेत्र वगैरे इंद्रियें पदार्थांचा संबंध झाल्यानें ज्ञान उत्पन्न करणारीं होतात, तशीं तीं प्रत्याहारानें आंत फिरूं लागतात व त्यामुळें बाह्य वस्तूंची प्रतीति होत नाहीं, तर अंतःसृष्टीचा सर्व देखावा दिसूं लागतो.[1]

विधात्याची अद्भुत कारागिरी दाखविणारें हें शरीराचें संस्थान मोठें विचित्र आहे. जशी त्याची बाहेरची रचना भव्य पाहण्याजोगी आहे, त्यापेक्षां आंतील रचना विशेष आश्चर्यकारक आहे. ही एक अशी अमूल्य देणगी ब्रह्मदेवानें जीवाला दिली आहे कीं, जर तो तिची किंमत समजेल **आणि तिचा योग्य उपयोग करील तर तो स्वतंत्र होऊन विश्वांत विराजमान होईल.** परंतु जसा मृग आपल्या नाभीच्या ठिकाणीं कस्तूरी असतां सर्व वनांत तिच्या शोधाकरितां भ्रांतीनें भटकत फिरतो, तसा पुरुष **बाह्य विषयांत आसक्त होऊन परतंत्र होतो.** ज्या वेळेस प्रत्याहारानें इंद्रियांचा प्रतिलोम ( उलट ) परिणाम होतो, त्या वेळेस तो आपली योग्यता समजून आत्म्याच्याच ठिकाणीं रममाण होऊन आपणास कृतार्थ मानतो. पुढें तो प्रत्याहारपरायण मुनी अंतःसृष्टीचें परम सौंदर्य पाहून, बाह्य विघ्नांचा जय करून सदाप्रत्यग्दृष्टि ( आत्म्याच्याच ठिकाणीं आहे दृष्टि ज्याची असा ) होऊन निर्भयपणानें राहतो. पुढें अंतःशरीरांत ( नाभिस्थानाजवळ ) राहिलेला कंद आणि त्यांतून निघालेल्या नाड्या इत्यादिकांच्या विशेष रचनेची चांगली माहिती होऊं लागते; आणि व अभ्यास केल्यानें त्यांचें पूर्ण स्वरूप समजतो. व या अमुक चक्राचें स्वरूप कसें आहे, किती पांकळ्या आहेत, देवता कोण आहे वगैरे सर्व साक्षात्कार त्यास होतो.

## पंचभूतधारणा.

पांच भूतांत धारणा पांच प्रकारची होते. त्यांत पायांपासून आरंभ करून गुडघ्यांपर्यंत

१ सांप्रत Clairvoyance ज्याला म्हणतात त्याचेंच हें रूप आहे.

पृथ्वीतत्त्वाचें स्थान आहे. गुडघ्यांपासून गुद-द्वारापर्यंत जलतत्त्वाचें स्थान, गुदद्वारापासून हृदयापर्यंत अग्नितत्त्वाचें स्थान, हृदयापासून दोन्ही भ्रुकुटीच्या मध्यदेशापर्यंत वायुतत्त्वाचें स्थान आणि भ्रूमध्यप्रदेशापासून ब्रह्मरंध्रापर्यंत आकाशतत्त्वाचें स्थान आहे. स्वरोदयांत असेंच सांगितलें आहे कीं, ' या पंचतत्त्वमय देहांत पांच तत्त्वें सूक्ष्म रूपानें राहिलीं आहेत; त्यांना तत्त्ववेत्ते योगी जाणूं शकतात.' हा धारणा करण्याचा विधि देवताबीजसहित याज्ञवल्क्य संहितेंत याप्रमाणें सांगितला आहे. त्यांत पृथ्वीधारणेचें स्वरूप असें.

**पृथ्वीधारणाः**—पृथ्वीस्थानांत प्राणाचा निरोध करून **मकार**बीजासहित चतुर्भुजाकृति सृष्टि करणाऱ्या अशा ब्रह्मदेवाचें चित्तांत ध्यान करावें. याप्रमाणें पांच घटिकांपर्यंत धारणा केल्यानें योगी पृथ्वीतत्त्वाचा जय करूं शकतो.

**तेजोधारणाः**—अग्निस्थानीं प्राणाचा निरोध करून रकारबीजासहित त्रिलोचन, तरुण आदित्याप्रमाणें प्रसन्नमुख आणि ज्यानें सर्वांगाला भस्म लेपन केलें आहे, अशा भगवान् **महारुद्राचें** चिंतन करावें. याप्रमाणें पांच घटिकांपर्यंत धारणा केल्यानें अग्नीपासून तो दग्ध होत नाहीं, आणि अग्नितत्त्वाचा जय होतो.

**जलधारणाः**—जलस्थानांत प्राणाचा निरोध करून वकारबीजासहित चतुर्भुजावान् शुद्ध स्फटिकसमान, तसाच पीतांबर, शुचिस्मित अशा श्रीनारायणाचें चिंतन करावें. याप्रमाणें पांच घटिकांपर्यंत धारणा केल्यानें पापापासून मुक्त होऊन जलतत्त्वाचा जय होतो.

**वायुधारणाः**—वायुस्थानांत प्राणाचा निरोध करून **यकार**बीजासहित सर्वज्ञ, सर्वशक्तिमान् शांत, सर्वव्यापक, सर्वकारण अशा भगवान् **ईश्वराचें चिंतन करावें. या रीतीनें पांच घटि**कांपर्यंत धारण केल्यानें वायूप्रमाणें वेग होतो, आणि वायुतत्त्वाचा जय होतो.

**आकाशधारणाः**—आकाशस्थानांत प्राणनिरोध करून हकारबीजासहित प्रणवाची अर्धमात्रारूप, व्योमाकार म्हणजे विभु, शुद्धस्फटिकसमान गौरवर्ण, ज्याचा मौलिभाग बालचंद्रानें विभूषित असा, पंचवदन व ज्याच्या प्रत्येक मुखाला तीन लोचनें ( डोळे ) आहेत, जो दिव्यायुधें आणि आभरणें इहींकरून सुशोभित आहे, अशा सर्व कारणकारण अर्धनारीश्वर भगवान् शंकराचें चिंतन करावें. ही आकाशधारणा रोज केवळ एक मुहूर्तभर केली असतां तो मुक्त होतो, असें तांत्रिक ग्रंथांत सांगितलें आहे.

## राजयोग.

योगाविषयीं स्फुट विचारः—योग म्हणजे समाधि. तो साधण्याचे उपाय एकंदर चार; हठयोग, राजयोग, मंत्रयोग आणि लययोग. या सर्वांस यम, नियम वगैरे अंगें अवश्य असावीं लागतात; तीं असलीं म्हणजे मग पुढील तीन प्रकारचे उपाय करून योग साध्य होतो. आणि तीं जर नसतील तर समाधीस कोणताहि उपाय लागू पडणार नाहीं.याकरितां प्रथम यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान व समाधि हीं आठ अंगें हठयोगांत सांगितलीं आहेत. त्यांत चित्ताचे मलिन संस्कार दूर होऊन त्याची **सत्वगुणाकडेच** प्रवृत्ति एकसारखी राहण्यास यमनियमांची आवश्यकता आहे. शरीर व मन यांस जडता व चंचलता जी उत्पन्न होते ती तमोगुणाच्या व रजोगुणाच्या प्रभावानें उत्पन्न होते; ती दूर करण्याकरितां **आसनांची** जरूरी आहे. **कितीएक आसनांपासून तर प्राणाची सुद्धां स्थिरता होते.** प्राणनिरोध झाल्यावांचून साधारण अधिकाऱ्याचें चित्त स्थिर होत नाहीं;

व तशा अधिकाऱ्याचा प्राणनिरोध प्राणायामावांचून होणार नाहीं; म्हणून **प्राणायामाची** अत्यंत आवश्यकता आहे. आतां अभ्यासानें प्राणायाम सिद्ध झाला म्हणजे क्रमानेंच **चित्त स्थिर** होतें; **चित्त स्थिर** झालें म्हणजे इंद्रियें सुद्धां अभ्यासानें **मनाप्रमाणें वागूं** लागतात; हाच **प्रत्याहार** होय. प्रत्याहार झाल्यामुळें चित्ताचा ज्या एका वस्तूशीं संबंध करावा त्यावरच तें सुखानें राहूं शकतें; हीं **धारणा** झाली. धारणा झाल्यावर चित्ताला दुसऱ्या कोणत्याही वस्तूचा विचार करण्याचें व्यवधान नसल्यामुळें तें ज्यावर लाविलें असेल त्याच्याच स्वरूपाचा निरंतर पूर्ण विचार करण्यास समर्थ होतें; हें **ध्यान** झालें. ध्यान पूर्णदशेस जाऊन पोंचलें म्हणजे तें ज्याचें ध्यान करीत आहे, त्यांच्यांत अगदीं गढून जातें; हा **समाधि** झाला. याप्रमाणें आस्थापूर्वक निरंतर अभ्यास चालविला असतां सत्वगुणाची वृद्धि होऊन व शेवटीं सर्वविषयींच अत्यंत कडकडीत वैराग्य उत्पन्न होऊन **असंप्रज्ञातसमाधि** सिद्ध होतो. व त्यापासून **कैवल्यसुख** प्राप्त होतें. याप्रमाणें हठयोगांत समाधि साधण्याचा क्रम आहे; म्हणजे प्रथम मोठ्या श्रमानें प्राणनिरोध करावयाचा; व पुढें चित्तनिरोधानें समाधि. यांत श्रम फार पडतात.

राजयोगांत असा प्रकार नाहीं; कारण, त्यांत प्रथम चित्तनिरोधानेंच प्राणनिरोध करावयाचा असतो; यामुळें त्यांत कांहीं विशेष प्रयास नसतात. याकरितां ज्यांचें चित्त स्थिर होऊं शकेल त्यांनीं राजयोगाचा अभ्यास करावा; त्यांना हठयोगाचा क्रम घेण्याची जरूरी नाहीं.

आतां राजयोगाचे क्रियायोग व ज्ञानयोग असे दोन विभाग पाडून पहिल्यास नुसती ‘ राजयोग ’ अशी संज्ञा व दुसऱ्यास ‘ सहज समाधि ’ अशी संज्ञा देऊन दोन्ही राजयोगांच्या अनुष्ठानाचा क्रम सांगतों; तो असा,—राजयोगांत ( क्रियायोगांत ) प्रथम, पूर्वेस किंवा उत्तरेस तोंड करून पद्मासन घालून बसावें. दोन्ही जांघांवर दोन्ही हात, **ध्यानमुद्रा** ( म्हणजे आंगठ्या जवळचें बोट-तर्जनी, आंगठ्याच्या मधल्या भागास लावून बाकीचीं बोटें लांब करून ठेविलीं असतां ध्यानमुद्रा होते ) करून ठेवावे; डोळे अर्धवट उघडे ठेवून, नासिकाग्राचे ठिकाणीं दृष्टि स्थिर करून मनास बिलकूल चंचल न होऊं देतां श्वासोच्छ्वास बंद ठेवावे. अर्थात् कुंभक प्राणायाम करावा. पुढें आज्ञाचक्राचे ठिकाणीं प्राण, अपान, नाद व बिंदु या सर्वांना लीन करून **पराङ्मुखी** म्हणजे षण्मुखी मुद्रा करावी; आणि तेथें **रुद्रग्रंथीचा** भेद झाल्यावर तेथें होणाऱ्या नादाचें अनुसंधान करण्याचा सतत अभ्यास करावा; म्हणजे तेथें चित्ताचा लय होऊन राजयोग सिद्ध होईल व राजयोग सिद्ध झाला असतां योगी जन्ममरणापासून मुक्त होईल.

## राजयोगाचीं अंगें.

**राजयोगाचीं** एकंदर **पंधरा अंगें** आहेत. तीं येणेंप्रमाणें:—१ यम, २ नियम, ३ त्याग, ४ मौन, ५ देश, ६ काल, ७ आसन, ८ मूलबंध, ९ देहसाम्य, १० दृक्स्थिति ( स्थिर दृष्टि ), ११ प्राणसंयमन ( प्राणायाम १२ प्रत्याहार, १३ धारणा, १४ आत्मध्यान ( ध्यान ) व १५ समाधि.

## वैराग्याचे प्रकार.

**वैराग्य चार प्रकारचें**—त्यांत विषयांत इंद्रियांची प्रवृत्ति करविणारे जे काम, क्रोध इत्यादिक चित्तमल, त्यांचा दाह करण्याकरितां जो प्रयत्न, तें ( १ ) **यतमानसंज्ञा** वैराग्य. पुढें चित्ताचा थोडासा मल दग्ध झाल्यावर,

हा इतका नष्ट झाला व आतां इतका नष्ट, होण्याचा बाकी राहिला,' असा स्पष्टपणें दोहोंच्या भेदाचा निश्चय होणें, याला ( २ ) **व्यतिरेकसंज्ञा** वैराग्य म्हणतात. इंद्रियें बाह्य. विषयांच्या ठिकाणीं प्रवृत्त होण्यास असमर्थ झाल्यामुळें त्यांची केवळ औत्सुक्यमात्रानें मनाच्याच ठिकाणीं स्थिति होणें, याला (३) **एकेंद्रियसंज्ञा** वैराग्य म्हणतात. ह्या तीन वैराग्यांपासून चौथें ( ४ ) **वशीकारसंज्ञा** वैराग्य सिद्ध होतें.

## लययोग.

प्रथम मूलाधाराचे ठिकाणीं जो दिव्याच्या ज्योतीप्रमाणें जीव आहे त्यास प्रणवानें विधिपूर्वक ओढून वेऊन दहाव्या द्वारांत ( मस्तकांत ) त्याचा प्रवेश करवावा. नंतर मूलाधारापासून निघून दहाव्या द्वारांत जाऊन पोहोंचलेला व आनंदस्वरूप अशा प्रणवाचा जप करावा. जसा ओंकारजप विधिपूर्वक केला असतां मस्तकास जाऊन पोहोंचतो; तसा योगी ओंकाररूप बनून परमात्म्याच्या ठिकाणीं निरंतर स्थिर राहतो. योगी याप्रमाणें नित्य करीत असतां ज्या वेळेस, हंस, बिंदु, शिखा व ज्योति यांस अंतर्दृष्टीनें पाहतो; तेव्हां त्याला लय ( लययोग ) प्राप्त होतो. ब्रह्मद्वार ह्मणजे ब्रह्मरंध्र त्याचे ठिकाणीं अतिशय सूक्ष्म विकल्परहित, व्यापक व श्रेष्ठ अशा ज्योतिस्वरूप परमात्म्याला प्राप्त होऊन योगी तन्मय होऊन जातो. विकल्परहित असें स्थान प्राप्त होऊन व जीवाचा त्या ठिकाणीं लय होऊन त्या अंतर्यामी परमात्म्याच्या ठिकाणीं लय झाला असतां योग्याचीं सर्व शुभाशुभ कर्में नष्ट होतात. जसा झाडाच्या शेंड्यावर पक्षी एकाएकींच पाहण्यांत येतो, त्याप्रमाणें हृदयामध्यें असणारा भगवान् तत्काल प्रकट होतो. तो असा आहे कीं, जो पुढें, मागें, मध्यें, बाजूंस अर्थात् सर्व भागीं विजांप्रमाणें चमकत आहे; कोट्यवधि सूर्यांप्रमाणें ज्याची प्रभा पसरली आहे. याप्रमाणें त्या परमात्म्याचें दर्शन योग्याला झाल्यावर जसे स्त्रीपुरुष दोघे रमत असतां रतिसमाप्तीस त्यांना क्षणभर आनंद होऊन 'मी कोण आहें' याचें भान रहात नाहीं. तशी आनंदानें योग्याची निर्भान स्थिति होते.

## ध्यानाचें फल.

ध्यानानें चित्ताचे रजस्तमोरूप मल दूर होऊन तें शुद्ध होतें; म्हणून योग्याला ध्यान करणें अवश्य आहे; म्हणूनच छांदोग्योपनिषदांत 'पृथ्वी, अंतरिक्ष, स्वर्ग, उदक, पर्वत, देवता व मनुष्य इत्यादि सर्व ध्यान करितात, म्हणून त्यांना जें महत्व प्राप्त झालें आहे, तें सर्व ध्यानाच्या फलाचा एक अंश मात्र आहे; त्याप्रमाणेंच जे अधम कलहप्रिय, दुर्जन व निंदक आहेत, ते सर्व ध्यान न केल्यामुळेंच असे झाले आहेत. म्हणून, हे नारदा' तूं ध्यानाची उपासना कर; असें सनत्कुमारांनीं नारदास सांगितलें आहे.

## नादानुसंधान.

लययोग साधण्यास 'नादानुसंधान' हा उपाय मुख्य सांगितला आहे. त्या नादानुसंधानाचा प्रकार असा—'सिद्धासन करून बसून शांभवी मुद्रा करावी. तिचें स्वरूप असें:— "दृष्टि नाकाच्या अग्रभागीं निश्चल करून भुवयांना थोड्याशा उंच कराव्या; डोळ्यांच्या पापण्यांची उघडझांक अगदीं बंद करावी. पुढें आंत आधारचक्राला आरंभ करून तें ब्रह्मचक्रापर्यंत ध्यान करावें. चित्त व वायु यांना विलीन करून ध्यानांत मग्न व्हावें" ही वेदशास्त्रांत गुप्त असणारी, मनाचा लय करणारी, मुक्ति देणारी व दुर्लभ अशी **शांभवी मुद्रा** होय. प्रथम प्रथम अभ्यास करीत अस-

त्यांना अनेक प्रकारचे मोठमोठे नाद ऐकूं येतात. पुढें अभ्यास एकसारखा केल्यानें सूक्ष्म सूक्ष्म ऐकूं येऊं लागतात. त्यांत प्रथम प्राण ब्रह्मरंध्रांत प्रवेश करूं लागतो त्या वेळीं त्याचा शब्द समुद्र, मेघ, भेरी, झर्झर यांच्या ध्वनीसारखा मोठ्यानें होतो. मध्यें म्हणजे ज्या वेळीं प्राण ब्रह्मरंध्रांत जाऊन पोहोंचतो त्या वेळेस मर्दल, शंख, घंटा, व काहल यांच्या शब्दासारखा शब्द होऊं लागतो. आणि शेवटीं म्हणजे प्राण ब्रह्मरंध्रांत बराच वेळपर्यंत स्थिर होतो, त्या वेळीं किंकिणी ( घागऱ्या ), मुरली, अलगुजें, वीणा आणि भ्रमर यांच्या शब्दासारखा फारच हलका ध्वनि ऐकूं येतो. याप्रमाणें देहांत अनेक प्रकारचे नाद होऊं लागतात.

**लययोगांतील नादानुसंधानाच्या चार अवस्था.**

**१ आरंभावस्थाः**—ज्या वेळीं प्राणायामाच्या अभ्यासानें अनाहत चक्राच्या ठिकाणीं असणाऱ्या ब्रह्मग्रंथीचा भेद होतो तेव्हां मनास आनंद देणारा व तोरड्या इत्यादि भूषणांच्या शब्दासारखा मंजुल असा हृदयाकाशांत उत्पन्न झालेला ध्वनि शरीरामध्यें ऐकूं येतो. हृदयाकाशांत नाद होण्यास सुरवात झाली म्हणजे योग्याचें हृदय आनंदानें भरून जातें. त्याला दिव्यरूप, लावण्य ( सौंदर्य ), बल इत्यादि गुण प्राप्त होतात. तो योगी मोठा प्रतापी, निरोगी व ज्याच्या शरीराला उत्तम सुगंध येत आहे असा नादाच्या आरंभावस्थेंत होतो.

**२ घटावस्थाः**—ज्यानें दृढासन म्हणजे स्थिरासन केलें आहे अशा योग्याचा प्राणवायु जेव्हां अपान, नाद व बिंदु यांच्या सुद्धां मध्यचक्रांत म्हणजे कंठस्थानीं येतो, तेव्हां कंठामध्यें असणाऱ्या विष्णुग्रंथीचा भेद होऊन कंठाकाशांत अनेक नादांनीं मिश्रित झालेला असा भेरी ( नगाऱ्या ) प्रमाणें शरीरांत शब्द ऐकूं येऊं लागतो. पुढें परमानंद (ब्रह्मानंद ) प्राप्त होणार अशाचा सूचक तो शब्द कंठांत होऊं लागला म्हणजे योगी पूर्वीपेक्षां अधिक ज्ञानी होऊन शरीर संपत्तीनें देवासारखा तयार होतो. अशी घटावस्थेंत योग्याची स्थिति असते.

**३ परिचयावस्थाः**—तिसऱ्या म्हणजे परिचयावस्थेंत शर्वपीठ जें आज्ञाचक्र त्या ठिकाणीं प्राणाचा लय झाला असतां भुवयांच्या मध्यें असणाऱ्या रुद्रग्रंथीचा भेद होऊन विशेष ज्ञान उत्पन्न करणारा असा मर्दलासारखा शरीरांत शब्द ऐकूं येऊं लागतो. त्या वेळेस योग्यास मनास वाटतील त्या, अणिमा इत्यादि सिद्धी प्राप्त होऊं शकतात; व स्वाभाविक आत्मसुख प्राप्त झाल्यामुळें आधि, व्याधि, जरा, दुःख वगैरे कांहीं रहात नाहीं. ही परिचयावस्था होय.

**निष्पत्त्यवस्थाः**—ब्रह्मरंध्रांत प्राण लीन झाल्यावर वीणा, मुरली इत्यादिकांच्या शब्दासारखा ध्वनि ऐकूं येऊं लागतो व योग्याला फारच विलक्षण सामर्थ्य प्राप्त होतें. ह्या चौथ्या अवस्थेंतील चित्ताच्या एकाग्रतेलाच राजयोग, तुर्यावस्था इत्यादि संज्ञा आहेत. अथर्व वेदाच्या हंसोपनिषदांत असें सांगितलें आहे कीं, ‘ कोटी वेळां हंस मंत्राचा जप केला असतांना त्याप्रमाणें नादाचा अनुभव येतो. ’ याच उपनिषदांत नाद अनेक प्रकारचे सांगितले आहेत. परंतु त्या सर्वांत मेघनादच श्रेष्ठ सांगितला आहे; कारण त्यापासून सच्चिदानंदप्राप्ति हें फल सांगितलें आहे; करितां त्याचेंच अनुसंधान करावें.

नादानुसंधान करीत असतांना जो मेघइत्यादिकांचा घननाद ऐकूं येतो, आणि सूक्ष्मांत सूक्ष्म असा जो आत्म्याचा ‘ हुं हुं हुं ’ नाद

ऐकूं येतो; त्यांत पूर्ण ज्ञानवान् योगी चंचल गुणयुक्त विषयांचा त्याग करून ' हुं हुं हुं ' अशा ध्वनींत आपल्या सर्व वृत्ती स्थिर करून ' ब्रह्माहं ' शिवोहं, अजरोहं, मुक्तोहं ' इत्यादिक आत्मरूप भावाच्या शब्दांनीं हृदयांत अंतर्जप करितो. ' अजपाजपाला गुप्तमंत्र, गायत्रीमंत्र, सिद्धिमंत्र आणि मोक्षमंत्र सुद्धां म्हणतात. या मंत्रानें लवकर सिद्धि प्राप्त होण्याकरितां कितीएक संपूर्ण ब्रह्मचर्यव्रत पाळणारे योगी कांहींएक पवित्र क्रिया सुद्धां करीत असतात.

या पवित्र क्रिया नैष्ठिक ब्रह्मचर्यव्रत पाळणारे सिद्ध पुरुष चार घटिका रात्रीच्या वेळीं म्हणजे प्रातःकाळच्या चार घटिका पूर्वीं उठून शौचविधि, दंतधावन आणि स्नानादिक नित्य क्रिया करून एका पंचपात्रींत सुमारें चार पैसेभार तांदूळ धुऊन त्या धुतलेल्या पाण्यांत उत्तम सुवासाचें चंदन उगाळून त्याचें दोन पैसेभार गंध घेऊन त्यांत दोन पैसेभार मध टाकून तें प्राशन करितात; पुढें दिवसां केवळ दूध आणि भाताचें हलकें व थोडेंसें भोजन करितात, आणि रात्रीच्या वेळीं मध, भाकरी, पोळी, तूप, दूध, आणि वरण वगैरे निर्गुण पदार्थांचे भोजन करितात; आणि तेल, तिखट आणि हिंग वगैरे रजोगुणी पदार्थांचे सेवन मुळींच करीत नाहींत. याप्रमाणें भोजन करून व रात्रीं स्नान करून एकांतवासांत समाधीकरितां स्थिर होतात आणि तेथें वर सांगितलेला अजपाजप करितात. पुढें चार घटिका रात्र संपली म्हणजे पुनः स्नान करून वर सांगितल्याप्रमाणें चंदन प्राशन करून ते योगी झोंप घेतात; त्यामुळें त्यांना रात्रीं झोंप येत नाहीं. याप्रमाणें एकवृत्तीनें व दृढनिश्चयानें ही क्रिया करणाऱ्या योग्याला स्वतः पुष्कळ वेळां सात दिवसांत वर सांगितलेल्या अंधाराच्या एकांत स्थानांत एक प्रकाशमान ज्योति ब्रह्मरंध्रांतून निघालेली त्या प्रकाशावरून समजते. असें झाल्यावर तो योगी जर अशी क्रिया सारख्या निश्चयानें करूं लागेल तर त्याला एक पक्षांत (पंधरादिवसांत) गुप्तविद्येच्या मूलतत्त्वाचें ज्ञान होऊं लागेल. पुढें एक महिन्याच्या शेवटीं त्याला आपल्या श्वासची गति मंद चाललेली समजेल. त्यापुढें फारकरून दोन महिन्यांच्या अखेरीस त्याला आपल्या कल्पनांप्रमाणें जगतांत अनेक रचना होताहेतशा समजतील. चार महिन्यांच्या शेवटीं प्रत्येक मनुष्याच्या मनाच्या कल्पनांना जाणण्याची शक्ति येईल. पांच महिन्यांत अंतवाहक भावरूपी शरीराची म्हणजे ईश्वरी रचना समजूं लागेल. त्यांत पृथ्वीच्या अनेक प्रदेशांत कोणकोणतीं कार्यें होताहेत, तें जाणण्याची शक्ति येईल. त्याचप्रमाणें आपली वृत्ति असली तर, अनेक देव, योगात्मे आणि महापुरुष यांचे आकार प्रकट होऊन आपल्या इच्छेप्रमाणें गुप्त विद्येचें ज्ञान त्यांच्या द्वारें आपणांस मिळूं शकेल. याप्रमाणें ही क्रिया पुण्यवान् पुरुषानें अत्यंत दृढनिश्चयानें केल्यानें सहा महिन्यांत त्याच्यासारखीच एक आकृति प्रबळ इच्छाशक्तीच्या योगानें त्याच्या समोर प्रकट झालेली दिसेल, आणि ती सांगेल कीं, 'तुझा शुद्ध आत्मा तुझ्या प्रबळ इच्छाशक्तीप्रमाणें कार्य करण्याला समर्थ आहे; ' असा साक्षात्कार झाल्यावर तो योगी कांहीं एक इच्छा न धरितां ' कृपा ठेवावी ' एवढेंच भाषण करितो. अशा रीतीनें निरंतर वागल्यानें वर सांगितलेला आकार आपल्या गुप्त इच्छेनें आपल्या शरीरांतून आपल्या प्रबळ इच्छेप्रमाणें पांच, सात आकार धारण करून भिन्न भिन्न स्थानांत गमन करून आपल्या पहिल्या दृढ

इच्छेप्रमाणें अनेक कार्यें करूं शकतो. हे सर्व आकार आपल्यांतच प्रकट होतात. याप्रमाणें पूर्वींचे दत्तात्रेय, गोरक्षनाथ, मत्स्येंद्रनाथ आणि वसिष्ठ वगैरे महात्मे करीत होते; आणि सांप्रत काळांत प्रसंग पडेल तेव्हां हिमालयांतील महात्मे आणि योगी करितात सुद्धां. अशी क्रिया दृढनिश्चयानें व प्रबळ इच्छाशक्तीनें नैष्ठिक योग्याला कांहीं वर्षेपर्यंत हल्लींच्या काळीं करण्याची आवश्यकता आहे. हें सर्व गृहस्थाश्रमी गुप्त विद्येचा अभ्यास करणाराला असें करण्याची जरूरी नाहीं. त्यांना तर आपल्या सनातन धर्माच्या मर्यादेंत दृढनिश्चयानें वर्तून व्यावहारिक कार्य करीत असतां व जनक राजाप्रमाणें सर्व मनोविकारांचा लय करण्याचा निश्चय ठेवल्यानें योग्य समई वर सांगितल्याप्रमाणें महाअद्भुत शक्ति प्राप्त होऊं शकेल. कारण, दृढनिश्चय आणि प्रबल पावलेल्या इच्छाशक्तीच्या योगानें ज्या वेळीं सर्व वृत्ति मनांत स्थिर होऊन जातात त्या समयीं ब्रह्मरंध्रांत प्राणवायु प्रवेश करितो; आणि तसें झाल्यानें कुंडली अथवा वासनाचक्रांत ज्ञानदृष्टि एकत्र होते, त्यामुळें शेवटीं सविकल्पसमाधि प्रकट होतो. त्या प्रसंगीं सर्व वृत्ति स्तंभित होऊन त्या ब्रह्मनादांत स्थिर होतात.

## भक्तियोग.

" ईश्वरप्रणिधानम् "—ईश्वराला सर्व कर्मे अर्पण करणें. याला भक्तियोग असेंहि म्हणतात. आपलें सर्व सामर्थ्य, गुण, कर्में, प्राण, आत्मा, व मन यांच्या सर्व बाह्य, आंतर शक्ति यांचा विनियोग सत्कर्मे करण्यांत करावा व तीं सर्व कर्में परमेश्वराला अर्पण करावीं. पहा—

शय्यासनस्थोऽथ पथिव्रजन्वा स्वस्थःपरिक्षीण—वितर्कजालः ॥ संसारबीजक्षयमीक्षमाणः स्यान्नित्यमुक्तोऽमृतभोगभागी ॥ १ ॥ व्यास भाष्यम् ।

## भक्तीचें माहात्म्य.

ईश्वराचे ठिकाणीं आवेशित आहे चित्त ज्याचें अशा योग्याला केवळ भक्तीनेंच योगसिद्धि होते. याचें कारण स्पष्टच आहे; कारण कीं, जशी ध्यानांत प्रत्ययाची एकतानता, त्याप्रमाणें भक्तीमध्यें सुद्धां एकवस्तुविषयता असल्यामुळें समाधिसिद्धि होऊं शकते. म्हणूनच भगवान् पतंजलींनीं 'ईश्वरप्रणिधानाद्वा " या सूत्रानें केवळ भक्तीनेंहि समाधि सिद्ध होतो असें सुचविलें. भक्तिप्रधानवादी असें म्हणतात कीं, 'सुख' हा पुरुषार्थ असल्यामुळें दुःखानें अगदीं रहित व जिला कांहीं मर्यादा नाहीं अशी सुखधारारूप प्रेमभक्तिच पुरुषार्थ आहे.

भक्ति ही कर्माहून श्रेष्ठ व योगाहूनहि उच्च प्रतीची आहे. कारण, त्या दोहोंत--कर्मांत व योगांत--कांहीं एक तिसरा हेतु साधावयाचा असतो. पण भक्तीचें तसें नसतें. भक्ति हेंच भक्तीचें फल; तेंच तिचें साधन, तीच तिचा लय. खरा प्रेमी भक्त म्हणतो " त्वमेव माताच पितात्वमेव, त्वमेव बंधुश्च सखात्वमेव। त्वमेव विद्या द्रविणं त्वमेव त्वमेव सर्वं मम देव देव " अर्थात् ईश्वरप्रेमच त्याचें सर्वस्व. विवेकानंद म्हणतात. " पराभक्तींतल्या प्रेमाचे आड कांहींच येऊं शकत नाहीं. एकाएकीं एखादें जहाज लोहचुंबकाचे पर्वताजवळ जावें व मग त्याचे लोखंडी खिळे व कांबी लोहचुंबकाच्या आकर्षणानें उचटून जाऊन फळ्या सुटून जशा स्वच्छंदपणें पाण्यावर तरंगत रहाव्या त्याप्रमाणेंच त्या दयाघनाच्या प्रेमाकर्षणामुळें आत्म्याचे सर्व खिळे व कोयंडे ( बंधनें ) सुटे होऊन भक्त पूर्ण स्वच्छंदानें प्रेमसागरांत डुंबूं लागतो, असल्या भक्तीचे सिध्यर्थ जो परि-

त्याग अंगीं बाणावा लागतो त्यांत कठोरपणा व कोरडेपणा मुळींच नसतो. तो घडवून आणतांना कांहीं झटापट किंवा दाबादाबी करावी लागत नाहीं. भक्ताला आपल्या अंतःकरणांतील एकाहि भावनेचा निरोध करावा लागत नाहीं. तो जें काय करितो तें एवढेंच कीं, त्या भावनांचा वेग अतिशय वाढवून त्यांची धांव तो परमेश्वराकडे वळवितो.

सारांश, भक्तियोग हें उच्चप्रतीच्या प्रेमाचें शास्त्र आहे. म्हणजे मनुष्याचें उपजत प्रेमभावनेला कोणतें वळण द्यावें, तिला आपल्या ताब्यांत कसें ठेवावें, तिला कसें चालवावें; तिचा उच्च विषयाकडे विनियोग कसा करावा व त्यायोगें उत्तम व दिव्य फलें कशीं प्राप्त करून घ्यावीं, आणि अखेरीस परमानंदास कशी गांठ घालावी, हें सर्व हा भक्तियोग दाखवून देतो. हें सोडून द्या, तें सोडून द्या,' असें तो सांगत बसत नाहीं. 'अहो जनहो, प्रेम-प्रेम-ईश्वरविषयक आत्यंतिक प्रेम-बाळगा, एवढेंच काय तें हा भक्तियोग सांगत असतो; आणि या योगानें जो प्राणी त्या परात्पर गुरूच्या प्रेमरसांत एकदां डुबूं लागला,त्याच्या मनास इतर नश्वर पदार्थांची कल्पना सुद्धां शिवत नाहीं. सुंदर स्त्रीच्या मुखांत, चंद्रबिंबांत नक्षत्रगणांत किंवा दुसऱ्या कोणत्याहि मोहक पदार्थांत जें कांहीं सौंदर्य म्हणून आहे तें सर्व त्याचें आहे, हें समजून जो त्या निखिल सौंदर्यनिधान प्रभुविषयींच गोपींप्रमाणें लंपट होऊन जातो त्याचें सर्व क्षणभंगुर व्यक्तिसाम्राज्य विस्मृतिसागरांत गडप होऊन जातें व तो केवळ आनंदरूप होऊन जातो.

### समाधीचे पर्याय शब्द.

योगी लोकांत राजयोग, समाधि, उन्मनी, मनोन्मनी, अमरत्व, लय, तत्त्व, शून्याशून्य, परंपद, अमनस्क, अद्वैत, निरालंब, निरंजन, जीवन्मुक्ति, सहजा, तुर्या, हे शब्द एकार्थकच वापरतात.

### समाधीचें प्रकार.

**वितर्कविचारानंदास्मितारूपानुगमात्संज्ञातः ॥ १७ ॥**

समाधि दोन प्रकारचा; एक संप्रज्ञात व दुसरा असंप्रज्ञात. संप्रज्ञात समाधीचें स्वरूप असें,—भाव्यपदार्थाविषयीं संशय किंवा खोटें ज्ञान वगैरे कांहीं नसून त्याचें स्वरूप जेणेंकरून उत्तम प्रकारें समजतें, त्यास संप्रज्ञात समाधि असें म्हणतात. संप्रज्ञात समाधींत चित्त अगदीं वृत्ति रहित होत नसून, ज्याचें ध्यान करावयाचें त्या पदार्थाविषयीं वृत्ति तशीच कायम राहत असल्यामुळें वृत्तीचें बीज कायम असतें, म्हणून त्यास **सबीज समाधि** म्हणतात.

**विरामप्रत्ययाभ्यासपूर्वः संस्कारशेषोऽन्यः १८ ॥ ॥**

सर्व वृत्तींचा प्रकृतींत लय होऊन ज्यांत संस्कार मात्र बाकी राहिला असतो असा जो चित्ताचा निरोध त्यास **असंप्रज्ञात समाधि** म्हणतात.

### समाधि सिद्ध झाल्याचें चिन्ह.

योगाचा अभ्यास करितां करितां जेव्हां ब्रह्माचा साक्षात्कार होण्याचा समय येतो, तेव्हां पहिल्यानें क्रमानें धुकें, धूर, सूर्य, अग्नि, वायु, काजवे, वीज, स्फटिक व चंद्र यांच्या स्वरूपाचा मनास भास होतो; नानाप्रकारचे नाद होतात व अनेक चमत्कार होतात. घटामध्यें पाणी भरतांना जसा 'घट घट' आवाज होतो; त्याप्रमाणें आपल्या पोटांत 'घट घट' आवाज होतो. असें झालें म्हणजे **सुषुम्ना व कुंभक सिद्ध** झालें असें समजावें. पृथ्वी, आप, तेज, वायु व पांच महाभूतें उठलीं व पांच योगगुणांची प्रवृत्ति झाली म्हणजे योगा-

ग्निरूपी शरीराचा लाभ होतो. व नंतर रोग, जरा व दुःख हीं त्या योग्यास बाधत नाहींत. देहास हलकेपणा येतो, आरोग्य प्राप्त होतें, अधाशीपणा जातो, अंगाचा वर्ण प्रसन्न होतो, स्वरास माधुर्य येतें, अंगास सुवास सुटतो, लघ्वी थोडी व शौचासही थोडें होतें. असें होऊं लागलें म्हणजे पहिल्या योगप्रवृत्तीस आरंभ झाला असें समजावें.

जेव्हां ब्रह्मरंध्रांत किंवा मस्तकाचा मध्यभाग जी टाळू तीमध्यें प्राण स्थिर होतो, तेव्हां त्या योग्याला निर्विकल्प समाधींत निर्वाणस्थिति प्राप्त होते. त्यापासून त्याला काळ व कर्म इत्यादि कोणाचें भय राहत नाहीं. त्या स्थितींत जो आनंद प्राप्त होतो तो तसा पूर्वी कधींच झाला नसेल असा अलौकिक व अखंड आनंद होतो. असा आनंद ब्रह्मऋषींना प्राप्त होतो.

जशी सोन्याची, रुप्याची किंवा इतर धातूंची मूर्ति तावून काढिली किंवा पाण्यानें स्वच्छ धुतली म्हणजे तिचा चिकटलेला मळ निघून जाऊन ती चमकूं लागते, त्याप्रमाणेंच त्या आत्मतत्वाचें दर्शन झालें म्हणजे देहधारी पुरुष होतो; व ऐक्य पावून कृतार्थ होऊन त्याचा सर्व प्रकारचा शोक नाहींसा होतो. जेव्हां योगाभ्यासानें दीपासारख्या आत्मरूप पदार्थानें ब्रह्मरूप पदार्थास तो पाहतो, तेव्हां जन्मरहित, अविकार्य व अविद्येच्या सर्व गुणांनीं, अस्पृष्ट अशा देवाचें ज्ञान होऊन सर्व पाशांतून सुटतो; तिन्ही लोकांत गमन करितो; व शेवटीं जीवात्मा स्वतः ब्रह्मस्वरूप होतो.

### आत्म्याचा भास.

आतां आत्म्याचा भास कशा रीतीचा आहे त्याचा थोडा विचार करूं. ज्याप्रमाणें घरांत दिवा असतो, आणि त्याचे अनंत किरण चहूंकडे प्रकाशताहेत असें दिसतें, त्याप्रमाणें स्थूल देहांत ओंकाररूप आत्मा दीपक आहे, आणि त्याचें किरण 'सोऽहं' आहे. त्यानें पंचप्राण, अंतःकरणपंचक, देहचतुष्टय आणि सर्व इंद्रियें वगैरे उत्पन्न केलीं आहेत. त्यामुळें प्रथम मन, पुढें इंद्रियें, त्यानंतर सर्व प्राणवायू यांना क्रमानेंच स्वाधीन केल्यानें हृदयाकाशांत जी दीपकाची ज्योति आहे, तिच्या मध्यें 'सोऽहं' शब्द ओळखण्यांत येतो. नंतर त्याच्या पुढें वृत्ति स्थिर ठेविल्यानें ह्या सोऽहं ओंकाररूप आत्म्याकडे सर्व वृत्तींचें आकर्षण होऊं लागतें. आणि जसें जसें आकर्षण अधिक होऊं लागतें, तसा तसा ओंकाराचा प्राप्तिकाल जवळ येऊं लागतो. पुढें त्यामुळें शेवटीं चित्त संपूर्ण एकाग्रतेला पावतें. याचेंच नांव निदिध्यास असें सांगितलें आहे. एका श्रुतींत याविषयीं असें सांगितलें आहे कीं, वर सांगितलेल्या कृतीप्रमाणें संशयरहित शब्दांच्या अर्थात स्थापन केलेल्या वृत्तीच्या एकाग्रतेला निदिध्यास म्हणतात. अर्थात् या निदिध्यासानें 'सोऽहं' चिदात्मानंद तो ध्यान करणारा पुरुष होतो. कारण हा ओंकाराच्या संवेदनानें प्रकट होतो. म्हणून तो आत्म्यामध्यें ऐक्यभावानें स्थिर राहतो; आणि याच्याच चलितपणानें देहचतुष्टय, चार वाचा, चार अवस्था इत्यादि सहवर्तमान शरीररूप पिंजरा तयार केला आहे. आणि त्यामध्यें गुप्तपणानें आपल्या सूक्ष्म शून्यरूप ज्योतीनें तो स्वतः प्रकाशून राहिला आहे. तसें झाल्यानें ह्या बाहेरच्या ब्रह्मांडांतील अनंत शब्द आणि आकार धारण झालेले दिसतात. त्या योगानें सर्व विश्वाचा व्यवहार शब्दरूपानें चालत आहेसा दिसतो. म्हणून याला नादब्रह्म म्हणतात. म्हणूनच या पंचभूतांत जितके आकार आहेत, तीं सर्व शब्दाचींच रूपें आहेत. म्हणजे बहिर्मुख सृष्टि दिसण्याचें बंद होऊन, अखंड आनंदांत आणि सुखांत राहिलेल्या त्या यो-

ग्याला अनुभव येतो. परंतु तशा रीतीनें झाल्यानें पूर्वीच्या ध्यानाच्या धारणेनें दृष्टीस प्रथम ज्योतिरूप न दिसतां अंधकारासारखी कांहीं वस्तु दिसते; आणि त्यामध्यें पाण्याच्या लाटांप्रमाणें सूक्ष्म, असंख्य, शून्यरूप, चैतन्यरजःकण परस्पर वरखालीं होताहेतसे दिसतात, तेंच ओंकाररूप आत्म्याचे सोहंरूप चिदणु आहेत. परंतु ते मोकळे झाल्यानें देहाची आकृति आणि आंतील भ्रांति प्रकट होऊन येतात. या भ्रांतीची परीक्षा निश्चयात्मक बुद्धिज्ञानाच्या दृढतेनें ओळखली जाते. ती अशी, उन्मनी अथवा तुर्यावस्थेची प्राप्ति होण्याकरितां शीघ्रतेनें भ्रुकुटींत ध्यान करून 'मी आपण स्वतः आत्मा स्थिर आहें' असा दृढ निश्चय झाल्यानें राजयोगाच्या पदाच्या प्राप्तीच्या सुखाचा उपाय अल्पबुद्धिमानाला सुद्धां प्राप्त होतो; आणि तो या नादाच्या प्रतीतींत तुर्यावस्थ चित्ताचा लय करवितो.

### जपाचें लक्षण व प्रकार.

तज्जपस्तदर्थभावनम् ।

अ. १ सू. २८

प्रणवाचा किंवा कोणत्याही मंत्राचा जप म्हणजे नुसती त्या अक्षरांची तोंडानें वटवट नसून त्या मंत्रानें बोधित जो अर्थ म्हणजे जी वस्तु त्या वस्तूची भावना किंवा मूर्ति प्रत्यक्ष मनापुढें ठेवणें, हें त्या जपाचें मुख्य लक्षण समजावें.

जपाचे प्रकार दोन आहेत, १ **वाचिक** २ **मानस.** त्यांत वाचिक जप पुनः दोन प्रकारचा; एक मोठ्यानें उच्चार करून करणें, व दुसरा कोणास ऐकूं न येईल असा हलकेच म्हणणें. मानसिक जपही दोन प्रकारचा आहे; १ ध्यानरहित जप व २ ध्यानसहित जप. या सर्व प्रकारच्या जपांत शेवटचा जो ध्यानसहित मानस जप हा उत्तम आहे. म्हणूनच भगवान् याज्ञवल्क्यांनीं सांगितलें आहे कीं, मोठ्यानें उच्चारण करून जप करण्यापेक्षां कोणास ऐकूं न येईल असा हलकेच जप करण्यांत हजारपट अधिक फल प्राप्त होतें; हलके उच्चारण करून करण्यापेक्षां मानस जप हजारपट फल देणारा आहे; व ध्यानरहित मानस जपापेक्षां ध्यानयुक्त मानस जपांत हजारपट फल आहे.

### तपाचें लक्षण.

तपः—शीतोष्णादि द्वंद्वें सहन करून आपल्या शक्तीप्रमाणें कृच्छ्रचांद्रायणादिकांचें अनुष्ठान करणें, यास तप म्हणतात. भगवान् याज्ञवल्क्यांनीं व भगवद्गीतेंत असेंच सांगितलें आहे कीं, 'शास्त्रांत सांगितलेल्यां विधीप्रमाणें कृच्छ्रचांद्रायण, उपवास इत्यादिकांनीं शरीरास कृश करणें हें सर्व तपांत उत्तम तप होय. ग्रीष्मऋतूंत भोंवतालीं चार अग्नि व मस्तकावर आलेला सूर्य हा पांचवा अग्नि अशा पांच अग्नींचा ताप सहन करणें, शरदृतूंत गळ्याइतक्या पाण्यांत उभें राहणें, पावसाळ्यांत उघड्या मैदानांत पडून राहून पावसाचा त्रास सोसणें, इत्यादि सर्व, तपांतच अंतर्भूत होतात.

'तप केल्यावांचून योगाची सिद्धि होत नाहीं,' असें भाष्यकार भगवान् व्यासांनीं सांगितलें आहे. 'रसायनादिक औषधें, शरीराची आरोग्यता, वेदादिक विद्या, आकाशगमन, अमृतप्राशन, वगैरे दैवस्थिति तपावांचून सिद्ध होत नाहीं; कारण तप त्यांचें साधन आहे.' उपनिषदांतहि "तद्धितपस्तद्धितपः" असें सांगितलें आहे.

### पंचाग्निसंस्कार.

छांदोग्य उपनिषदाच्या पांचव्या अध्यायांत द्युलोक इत्यादि पांच अग्नि वर्णिले आहेत. अग्नींत घातलेल्या धातूप्रमाणें त्यांत संस्कार

पावून जीव पुनः स्थूलदेहधारी बनतो. येथें इतकें सुचविलें पाहिजे कीं, हे अग्नि म्हणजे व्यवहारांतील अग्नीसारखे आहेत, असें कोणीं समजूं नये. १ द्युलोक, २ पर्जन्य, ३ पृथिवी ( वनस्पति ) ४ पुरुष ( रेत ) ५ योषा ( स्त्रीगर्भाशय ) याप्रमाणें द्युलोकादि पांच अग्नींचे ठायीं श्रद्धादिरूप पांच आहुतींचा होम होऊन त्यापासून सोमादि निरनिराळीं रूपांतरें होतां होतां शेवटीं जीव गर्भापर्यंत येऊन पोंचतो.

### अविद्येचें लक्षण.

अनित्याशुचिदुःखानात्मसु नित्य
शुचिसुखात्मख्यातिरविद्या ॥ ५ ॥

अविद्येचें साधारण लक्षण असें आहे कीं, अमुक एका वस्तूविषयींचें खरें ज्ञान नाश पावून त्याविषयीं त्याहून उलट ज्ञान होणें याला, अर्थात् विपरीत ज्ञानाला अविद्या ह्मणतात. याचींच सूत्रांत अनेक उदाहरणें दिलीं आहेत. तीं अशीं,—पृथ्वी इत्यादि अनित्य वस्तूंना नित्य समजणें; अपवित्र व अत्यंत अमंगल अशा देहाला पवित्र समजणें; दुःखकारक पदार्थाला सुखकारक आहे असें मानणें; जो आत्मा नव्हे अशा देहाला आत्मरूप समजणें इ. इ.

### होम.

होमः—मनासुद्धां अकरा इंद्रियांची प्रवृत्ति त्यांच्या विषयांच्या ठिकाणीं न होऊं देतां ब्रह्माकडे करणें याला सात्विक होम ह्मणतात. राजस वृत्तीचे पुरुष, पशूंचा व फळादिकांचा होम करितात; परंतु ज्ञानी लोक अंतर्दृष्टि करून विषयांचा इंद्रियांचे ठिकाणीं व इंद्रियांचा अंतःकरणाच्या ठिकाणीं होम करितात. हें सर्व स्वाध्यायानें होतें.

### विभूतिपाद.

परिणामत्रयसंयमादतीतानागतज्ञानम् ॥ १६ ॥

धर्म, लक्षण व अवस्था असे जे तीन परिणाम आहेत, त्यांच्या ठिकाणीं संयम केल्यानें योग्याला भूतकाळचें व भविष्यकाळचें ज्ञान चांगलें होतें; कारण चित्त हें शुद्ध सत्वगुणाच्या योगानें नेहमीं प्रकाशरूप असल्यामुळें त्याला सर्व पदार्थ जाणण्याची शक्ति आहे. मात्र योगास मध्यें जे जे अडथळे येतील ते सर्व योग्य उपाय योजून दूर केले पाहिजेत; म्हणजे आरशाप्रमाणें स्वच्छ अशा त्या चित्ताला एकाग्रतेमुळें सर्व समजण्याची शक्ति येते.

शब्दार्थ प्रत्ययानामितरेत राध्यासात्संकरस्तत्प्रविभाग—संयमात्सर्व—भूतरुत ज्ञानम् ॥ १७ ॥

ज्याचें कर्णेंद्रियानेंच मात्र ज्ञान होतें तो शब्द; तो आकाशाचेच ठिकाणीं राहणारा गुण आहे. व्यवहारांत, शब्द त्याचा अर्थ व त्याचें ज्ञान या तिहींचा सामान्यतः ( भ्रमानें ) संकर ( एकीभाव ) झाला आहे, म्हणजे शब्दादिक शास्त्रानें व युक्तीनें निरनिराळे प्रसिद्धपणें असतां ते एकरूपानें भासत आहेत; त्यांचे शास्त्र व युक्तीनें निरनिराळे भाग पाडून त्यावर जो संयम करितो, त्याला सर्व मनुष्य, पशु, पक्षी, जलचर प्राणी इत्यादिकांच्या शब्दांचें ज्ञान होतें, म्हणजे ह्या अर्थाचा शब्द तो प्राणी उच्चारीत आहे, असें तो संयम करणारा पुरुष समजतो.

संस्कार साक्षात्करणात्पूर्वजातिज्ञानम् ॥ १८

चित्ताचे वासनारूप संस्कार दोन प्रकारचे; त्यांत कांहीं संस्कार असे आहेत कीं, ज्यांच्या योगानें पूर्वींची आठवण मात्र होते; आणि कांहीं संस्कार असे आहेत कीं; ज्यांच्या योगानें जाति, आयुष्य व भोग हे परिणाम उत्पन्न होतात. जसें धर्मापासून चांगली जाति, पुष्कळ आयुष्य व उपभोग प्राप्त होतात; व अधर्मापासून वाईट जाति, थोडें आयुष्य व

दुःखें प्राप्त होतात. अशा संस्कारांच्या ठिकाणीं चित्ताचा संयम केला असतां म्हणजे 'ह्या पदार्थाचा पूर्वीं मीं अनुभव घेतला किंवा याप्रमाणें मीं पूर्वीं कृत्यें केलीं, अशा पूर्वीं घडलेल्या गोष्टींकडे लक्ष देऊन योगी त्यांजवर संयम करितो, त्या वेळेस संस्कारांस कोणी उत्तेजन देणारें नसतांही केवळ मनांत आणि-त्यानें संस्कार प्रगट होऊन पूर्वीं घडलेल्या सर्व गोष्टींची आठवण त्या योग्याला होते. पुढें क्रमानेंच सर्व संस्कार बुद्धीमध्यें प्रकट झाले म्हणजे पूर्वजन्मीं अनुभविलेल्या जाति वगैरे त्याला प्रत्यक्ष दिसूं लागतात.

**प्रत्ययस्य परचित्तज्ञानम् ॥ १९ ॥**

दुसऱ्याचा चेहरा पाहून व कांहींएक चिन्हांवरून त्याचें चित्त अशा प्रकारचें आहे, असें ओळखून त्याच्या चित्ताचे ठिकाणीं संयम केल्यानें दुसऱ्याच्या चित्तांत काय आहे तें सामान्यरीतीनें समजूं लागतें.

**कायरूपसंयमात्तद्ग्राह्यशक्तिस्तम्भेचक्षुःप्रकाशासंप्रयोगेऽन्तर्धानम् ॥ २१ ॥**

शरीराचें रूप हें डोळयांनीं दिसणारा गुण आहे; त्या आपल्या शरीररूपावर चित्त एकाग्र केलें असतां दुसऱ्याची रूप दिसण्याची जी डोळयाची शक्ति, तिचा प्रतिबंध होऊन योगी आपल्या इच्छेप्रमाणें कोणाला दिसेनासा होतो. याचप्रमाणें आपल्या शब्द, स्पर्श इत्यादि-कांवर चित्ताचा संयम केला असतां दुसऱ्यांला आपला शब्द ऐकूं येत नाहीं व स्पर्श होत नाहीं, इत्यादि सिद्धी प्राप्त होतात.

**सोपक्रमं निरुपक्रमं च कर्म तत्संयमादपरान्त ज्ञान मरिष्टेभ्यो वा ॥ २२ ॥**

जे कर्म पूर्वजन्मांत केलें आहे तें संस्काररूपानें या जन्मांतही असतें. तें पूर्वकर्म दोन प्रकारचे,— १ सोपक्रम आणि २ निरुपक्रम. त्यांपैकीं ज्या कर्मापासून फल लवकर प्राप्त होतें तें सोप-क्रम; जसें, उन्हांत पसरलेलें ओलें वस्त्र लव-कर वाळतें त्याप्रमाणें. आणि ज्याचें फल कांहीं कालांतरीं उत्पन्न होणारें असतें तें निरुपक्रम जसें, त्याच ओल्या वस्त्राचा पिळा, जेथें ऊन्ह नसेल तेथें नुसता ठेवून दिला असतां तो कांहीं काळानें वाळतो तसें. अशा दोन प्रकारच्या कर्मांच्या ठिकाणीं जो चित्तसंयम करितो म्हणजे ' काय, माझ्या कर्मांचें फल मला लवकर मिळ-णार किंवा कांहीं कालांतरीं प्राप्त होणार आहे ' असें ध्यान करितो, त्याला आपण अमुक ठिकाणीं अमुक वेळीं मरूं असें ज्ञान होतें. त्यांत सोपक्रम कर्माचा साक्षात्कार झाला असतां त्याचें फल लवकर भोगून संपवून टाकण्या-करितां योगी एका वेळींच अनेक देह धारण करून त्यांनीं सर्व फल उपभोगानें सारून देह-त्याग करितो;

**मैत्र्यादिषु बलानि ॥ २३ ॥**

मैत्री, दया, आनंद उदासीनता यांच्या ठिकाणीं जर संयम केला तर त्याच्या संबं-धानें बल प्राप्त होते. म्हणजे तो योगी सर्व प्राण्यांला सुख देणारा व अनाथांला दुःखापा-सून सोडविणारा व दुष्टपक्षाचा अभिमान न धरणारा असा होतो.

**बलेषु हस्तिबलादीनि ॥ २४ ॥**

हत्ती, मारुति, भीमसेन, गरुड इत्यादिकां-पैकीं ज्याच्या बलाच्या ठिकाणीं चित्त एकाग्र करावें, तीं तीं हत्ती इत्यादिकांचीं बलें प्राप्त होतात; कारण चित्ताच्या ठिकाणीं सर्व प्रका-रचें सामर्थ्य स्वाभाविक आहे.

**प्रवृत्त्या लोकन्या सात्सूक्ष्मव्यवाहितवि-प्रकृष्ट ज्ञानम् ॥ २५ ॥**

पूर्वीं ज्योतिष्मती[1] नांवाची प्रवृत्ति सांगितली, तिच्या सात्विक प्रकाशाच्या योगानें सर्व विषयांचे

१ विषयवती व अस्मितामात्र प्रवृत्ति.
समाधिपाद. सू० ३५।३६

ठिकाणीं चित्त एकाग्र केलें असतां तेणेंकरून जें विषयांचें ज्ञान होतें त्या ज्ञानापासून आपल्या अंतःकरणांत व इंद्रियांचे ठिकाणीं विलक्षण शक्ति प्राप्त होते, त्या योगानें परमाणु इत्यादि सूक्ष्म पदार्थ, जमिनींत पुरून ठेवलेलें द्रव्य व फार दूर असलेल्या मेरुपर्वतावर असणारीं रसायनें इत्यादि पदार्थांचें ज्ञान होतें.

**भुवनज्ञानं सूर्ये संयमात् ॥ २६ ॥**

सूर्यमंडलाचे ठिकाणीं चित्त एकाग्र केलें असतां घट इत्यादिक पदार्थ जसे आपण प्रत्यक्ष पाहतों, त्याप्रमाणें **चवदा भुवनांचें ज्ञान उत्तम रीतीनें होतें.** तीं चवदा भुवनें व्यासभाष्यांत विस्तारपूर्वक सांगितलीं आहेत.

**चन्द्रे ताराव्यूहज्ञानम् ॥ २७ ॥**

चंद्राच्या ठिकाणीं चित्तसंयम केला असतां सर्व नक्षत्रसंबंधी ज्ञान होतें; म्हणजे सूर्याच्या तेजामुळें जें नक्षत्रांचें ज्ञान होत नाहीं तें होतें.

**ध्रुवे तद्गतिज्ञानम् ॥२८ ॥**

ध्रुव ताऱ्याचे ठिकाणीं चित्त एकाग्र केलें असतां, प्रत्येक ताऱ्याची गति इतक्या वेळांत इतकी आहे, म्हणजे हें नक्षत्र व हा ग्रह अमुक काळांत अमुक राशीवर व अमुक नक्षत्रावर जाईल, अशा प्रकारचें ज्ञान उत्पन्न होतें.

**नाभिचक्रे कायव्यूहज्ञानम् ॥ २९ ॥**

सोळा पांकळ्यांचें एक चक्र जें शरीराच्या मध्यभागीं सांगितलें आहे, त्याला नाभिचक्र म्हणतात; त्याचे ठिकाणीं चित्त एकाग्र केलें असतां शरीरांत जे **रस, मल, धातु, नाड्या** वगैरे आहेत, त्यांचें उत्तम रीतीनें ज्ञान होतें.

**कण्ठकूपे क्षुत्पिपासानिवृत्तिः ॥ ३० ॥**

जिभेच्या खालीं मध्यभागीं जी एक शीर आहे, तिच्या खालीं गळ्यांत एक कूप म्हणजे खळगा आहे; जेथें प्राण इत्यादि वायूचा स्पर्श झाल्यामुळें भूक व तहान हीं लागत असतात, त्याला कंठकूप असें म्हणतात; तेथें चित्त एकाग्र केलें असतां योग्याला भूक व तहान लागत नाहींत.

**कूर्मनाड्यां स्थैर्यम् ॥ ३१ ॥**

पूर्वीं जो कंठकूप सांगितला त्याच्या खालच्या बाजूला हृदयाच्या ठिकाणीं एक कासवाच्या आकाराची नाडी आहे तिला कूर्मनाडी म्हणतात; तेथें संयम केल्यानें म्हणजे संयमानें चित्त तिच्यामध्यें प्रवेश करील तर त्याला व शरीराला स्थिरता प्राप्त होईल.

**मूर्ध ज्योतिषि सिद्धदर्शनम् ॥ ३२ ॥**

मस्तकांत ब्रह्मरंध्र नांवाचें एक छिद्र ( भोंक ) आहे, तें सुषुम्नानाडीच्या योगानें व हृदयांतील चित्तरूप मण्याच्या प्रकाशानें फारच तेजस्वी आहे, त्याच्या ठिकाणीं चित्त एकाग्र केलें असतां योग्याला जगांतील **सिद्ध पुरुष गुप्त असले तरी** दिसूं लागतात; म्हणजे त्यांचें दर्शन होतें.

**प्रातिभाद्वा सर्वम् ॥ ३३ ॥**

कांहीं कारणावांचून केवल मनापासून जें ज्ञान होणारें व ज्यांत कांहीं असंगतपणा नसतो, त्यास **प्रतिभा** म्हणतात; त्या ठिकाणीं चित्ताचा संयम केला असतां जशी सूर्योदय होण्यापूर्वीं प्रथम सूर्याची प्रभा प्रकट होते, व त्या योगानें आतां सूर्योदय होणार असा पूर्ण निश्चय होतो; तसें, **विवेकख्याति** आतां पुढें निश्चयानें होणार, अशाचें सूचक असें सर्व पदार्थांविषयींचें ज्ञान उत्पन्न होतें. त्याला प्रतिभेनें म्हणजे केवल तर्कानें झालेलें म्हणून **प्रातिभज्ञान** म्हणतात. तें ज्ञान झालें असतां मग दुसऱ्या चित्तसंयमाची गरज न लागतां केवल त्या प्रातिभज्ञानाचेंच योगी सर्व जाणतो.

**हृदये चित्तसंवित् ॥ ३४ ॥**

हृदय म्हणून एक शरीराचा विशेष भाग आहे. त्या ठिकाणीं खालीं तोंड केलेलें असें एक कमल आहे. तेथें चित्ताची राहण्याची

जागा आहे; त्या ठिकाणीं संयम केला असतां योग्याला आपल्या तसेंच दुसऱ्याच्या चित्ताचें वासनासहित ज्ञान होतें.

[ ततः ] **प्रतिभश्रावणवेदनादर्शास्वाद वार्ता जायन्ते ॥ ३६ ॥**

इंद्रियविषयांचे ठिकाणीं संयम केल्यापासून योग्याला प्रातिभ, श्रावण, वेदना, आदर्श, आस्वाद व वार्ता असें सहा प्रकारचें ज्ञान प्राप्त होतें. त्यांत प्रातिभ म्हणजे पूर्वी सांगितलेलें सर्वविषयक ज्ञान; तें तप, स्वाध्याय इत्यादिकांच्या निर्मल अनुष्ठानानें शुद्ध झालेल्या केवल मनापासून उत्पन्न होतें. तें झालें असतां योगी सूक्ष्म इत्यादि पदार्थ पाहतो. श्रावण म्हणजे श्रोत्रेंद्रियानें होणारें ज्ञान; त्यापासून योग्याला दिव्य म्हणजे स्वर्गांतील शब्द ऐकूं येऊं लागतात. वेदना म्हणजे स्पर्शेंद्रियानें होणारें ज्ञान; त्यापासून योग्याला स्वर्गांतील स्पर्शाचें ज्ञान होतें. आदर्श म्हणजे चक्षुरिंद्रियानें होणारें ज्ञान; त्या योगानें स्वर्गांतील रूपाचें ज्ञान होतें. आस्वाद म्हणजे रसनेंद्रियानें होणारें ज्ञान; तें झाल्यामुळें योग्याला स्वर्गांतील रसाचें ज्ञान होतें. वार्ता म्हणजे घ्राणेंद्रियानें होणारें ज्ञान; तें झाल्यापासून योग्याला स्वर्गांतील गंधाचें ज्ञान होतें. असें हें सहा प्रकारचें ज्ञान व्युत्थान अवस्थेंत सुद्धां कायम राहतें.

**ते समाधावुपसर्गा व्युत्थाने सिद्धयः॥३७॥**

पूर्वीं ज्या प्रातिभ इत्यादिक सिद्धी सांगितल्या त्या असंप्रज्ञात समाधींत तत्पर झालेल्या योग्याला समाधीस विघ्न करणाऱ्या आहेत; म्हणजे त्या प्राप्त झाल्यामुळें आनंद, आश्चर्य इत्यादिक उत्पन्न होऊन समाधीस कमीपणा येतो. याकरितां मुमुक्षु त्यांच्या लोभांत पडत नाहीं. आतां ज्या वेळेस व्युत्थान अवस्था असते त्या वेळेस तर त्याच सिद्धी योग्याला सुखकारक होतात.

**बन्धकारणशैथिल्यात्प्रचारसंवेदनाच्चि-त्तस्य परशरीरप्रवेशः ॥ ३८ ॥**

सर्व प्रदेशांत व्याप्त होणें हा चित्ताचा स्वभाव खरा, परंतु धर्म व अधर्मरूप कारणानें तें केवळ आपल्या शरीरांतच बांधल्यासारखें संकोचानें राहिलें आहे. तें धर्माधर्मरूप बंधकारण संयमाच्या योगानें कमी होतें; आणीक चित्ताचा संचार करण्याचा मार्ग ज्या नाड्या त्यांच्या ठिकाणीं संयम केल्यानें संवेदन म्हणजे आमक्या वेळेस अमुक नाडीनें चित्ताचा संचार होत आहे असें ज्ञान होतें. तसेंच प्राण व इंद्रियें यांचा संचार करण्याचा मार्ग ज्या नाड्या त्यांचें संयमानें ज्ञान होतें. तें झालें असतां जसें आपल्या किंवा दुसऱ्याच्या घरांत प्रवेश करण्याला दार इत्यादिकांचा प्रतिबंध असतो, तो दूर झाल्यानें प्रवेश सहज करितां येतो; त्याप्रमाणें आपल्या चित्ताचा दुसऱ्याच्या मृत शरीरामध्यें अथवा जिवंत शरीरामध्यें प्रवेश करवितां येतो; त्या मागून बाकीचीं इंद्रियें सुद्धां प्रवेश करितात. यालाच परकाया-प्रवेश म्हणतात.

**उदानजयाज्जलपङ्ककण्टकादिष्वसंग उत्क्रान्तिश्च ॥ ३९ ॥**

उदान वायूचा संयमानें जय झाला असतां बाकीच्या वायूंचा व्यापार बंद पडल्यामुळें योग्यास ऊर्ध्वगति म्हणजे सर्वांपेक्षां वर राहण्याची गति प्राप्त होऊन तो मोठ्या नद्या वगैरेमध्यें किंवा मोठ्या गाळांत अथवा मोठाल्या कांट्यांच्या जाळ्यांत फसून राहत नाहीं, म्हणजे तो सर्वांपेक्षां हलका झाल्यामुळें हलक्या काष्ठाप्रमाणें नदी इत्यादि ठिकाणीं तो पडला तरी वर येतो.

**समानजयात्प्रज्वलनम् ॥ ४० ॥**

नाभीच्या जवळ राहणारा जो जठराग्नि, त्याच्या भोंवतीं व्यापून ( वेढून ) राहणारा जो समानवायु त्याचा संयमानें जय झाला असतां, त्या अग्नीवरील आच्छादन दूर झाल्यानें त्याच्या ज्वाला वर येऊं लागतात; या योगानें योगी अग्नीप्रमाणें प्रदीप्त दिसतो. याप्रमाणें प्राणादिकांचा संयमानें जय केला असतां योग्याला आपल्या इच्छेप्रमाणें त्या त्या क्रियेची सिद्धि प्राप्त होते; असें जाणावें.

**कायाकाशयोः संबन्धसंयमाल्लघुतूल समापत्तेश्चाकाशगमनम् ॥ ४२ ॥**

पंचभूतांनीं तयार झालेलें शरीर व त्यास राहण्यास जागा देणारें आकाश, या दोहोंचा जो संबंध त्या ठिकाणीं चित्तसंयम केला असतां आणि कापूस वगैरे हलक्या वस्तूंच्या ठिकाणीं चित्ताची तदाकार वृत्ति करून समाधि साधली असतां योगी कापसाच्या गोळ्याप्रमाण हलका होऊन पहिल्यानें जलविहार करितो, नंतर कोळी नांवाच्या किड्यानें केलेल्या जाळ्यावरून संचार करितो, नंतर सूर्याच्या किरणांबरोबर फिरूं लागतो, नंतर इच्छेस वाटेल तिकडे आकाशांत फिरूं लागतो.

**स्थूलस्वरूप सूक्ष्मान्वयार्थ वत्वसंयमाद्भूतजयः ॥ ४४ ॥**

पृथ्वी इत्यादिक पंचमहाभूतें, त्यांच्या ज्या १ स्थूलत्व २ स्वरूपत्व ३ सूक्ष्मत्व ४ अन्वयत्व आणि ५ अर्थवत्व अशा पांच विशेष अवस्था याच्या ठिकाणीं चित्त एकाग्र केलें असतां पंचमहाभूतें योग्याच्या अगदीं स्वाधीन राहतात. म्हणजे १ पंचमहाभूतांचें दिसण्यासारखें विशेष आकाराचें जें रूप तें स्थूलरूप होय. २ ह्यांचीं अनुक्रमानें कठिनता, स्नेह, उष्णता, प्रेरण, व अवकाश देणें हीं पांच स्वरूपें आहेत. ३ ह्या भूतांच्या अनुक्रमानें कारणरूपानें असलेलीं जीं गंध, रस, रूप, स्पर्श व शब्द हीं तन्मात्रें तीं सूक्ष्म रूपें होत. ४ प्रकाश, प्रवृत्ति, व स्थिति हे तीन गुण नेहमीं सर्वत्र एक ठिकाणीं मिळून असतात, हें अन्वयत्व होय. ५ त्याच गुणांमध्यें असलेली उपभोग व मोक्ष मिळवून देण्याची जी शक्ति ती अर्थवत्त्व होय. याप्रमाणें येथें ज्यांचीं लक्षणें सांगितलीं आहेत अशा पांच अवस्थांनीं युक्त असलेल्या पंचमहाभूतांच्या प्रत्येक अवस्थेमध्यें चित्त एकाग्र केलें असतां योग्याला पंचभूतें वश होतात. चित्त एकाग्र करण्याची रीति अशी आहे कीं, पहिल्यानें स्थूलरूपाचे ठिकाणीं संयम करावा, त्यानंतर सूक्ष्मरूपाचे ठिकाणीं संयम करावा. याप्रमाणें क्रमानें जो संयम करीत जातो त्याच्या पाठीमागें, जशा वांसराच्या पाठीमागें गायी जातात त्याप्रमाणें पंचभूतें जातात; आणि त्याचे मनोरथ पूर्ण करितात.

**ततोऽणिमादिप्रादुर्भावः कायसंपत्तद्धर्मानभिघातश्च ॥ ४५ ॥**

भूतजय झाला असतां योग्याला अणिमा इत्यादिक आठ सिद्धि प्राप्त होतात. त्यांत, १ परमाणूसारखें सूक्ष्मरूप होणें ही अणिमासिद्धि जाणावी; २ कापसाच्या गोळ्यासारखा हलकेपणा येणें ही लघिमा; ३ मेरुपर्वतासारखा जडपणा येणें ही गरिमा; ४ बोटानें चंद्रमंडलाला सुद्धां स्पर्श होणें अशा प्रकारची जी शक्ति ती महिमा; ५ तोंडांतून निघेल त्याप्रमाणें संकल्प सिद्ध होणें ही **प्राकाम्य;** ६ शरीर व अंतःकरण हीं आपल्या स्वाधीन राहणें ही **ईशित्व;** ७ सर्व ठिकाणीं वरचढपणा असणें म्हणजे सर्व प्राणिमात्र योग्याच्या मनाप्रमाणें वागणारे असल्यामुळें त्याचें भाषण कधींही मोडीत नाहींत, ही **वशित्वसिद्धि;** आणि योग्याला ज्याविषयीं इच्छा उत्पन्न होते ती इच्छा पूर्ण होणें ही आठवी कामाव-

सायित्व सिद्धि जाणावी. पंचभूतें स्वाधीन झाल्यानें समाधीला उपयोगी पडणाऱ्या ह्या आठ सिद्धि प्राप्त होतात. उदाहरण, योग्याला परमाणुरूप प्राप्त झालें असतां तो हिरे इत्यादि कठिण पदार्थांत सुद्धां शिरून राहतो; याचप्रमाणें इतर सिद्धि जाणाव्या. ह्या अणिमादि सिद्धींस समाधीला अनुकूल म्हणून महासिद्धि असें म्हणतात, ह्या प्राप्त झाल्यावर योग्याला पुढें सांगितलेली शरीरसंपत्ति प्राप्त होते, आणि शरीराचें रूप इत्यादि जे गुण त्यांचा नाश कशानेंही होत नाहीं. म्हणजे त्याच्या रूपाला अग्नि जाळूं शकत नाहीं किंवा त्याला वायु शुष्क करूं शकत नाहीं; या प्रमाणें ह्या गुणाचीं फलें समजावीं.

**रूपलावण्यबलवज्रसंहननत्वानि कायसंपत् ॥ ४६ ॥**

रूप म्हणजे चक्षुरिंद्रियाला आवडणारा गुण, लावण्य म्हणजे सर्वांगाची सुंदरता, बल म्हणजे पराक्रम व वज्राप्रमाणें शरीरास कठिणता; या प्रकारची शरीरसंपत्ति समजावी. ही योग्यास प्राप्त होते.

**ग्रहणस्वरूपास्मितान्वयार्थवत्त्वसंयमादिन्द्रियजयः ॥ ४७ ॥**

इंद्रियांच्या १ ग्रहण, २ स्वरूप, ३ अस्मिता, ४ अन्वयत्व व ५ अर्थवत्व अशा पांच अवस्था प्रत्येकाच्या आहेत. त्यांत षड्ज, ऋषभ वगैरे स्वरमय शब्द; शीत, उष्ण वगैरे स्पर्श; पिंवळा, निळा इत्यादि रूप; गोड, आंबट वगैरे रस; सुरभि (चांगला वास) वगैरे गंध; हे इंद्रियांचे विषय होत. १ या प्रकारच्या विषयांकडे त्या इंद्रियाची प्रवृत्ति होणें याला ग्रहण म्हणतात. २ इंद्रियांची साधारणपणें शक्ति दृष्टोत्पत्तीस येणें हें स्वरूप; ३ अस्मिता म्हणजे अहंकार; ४ अन्वयत्व व ५ अर्थवत्व यांचा अर्थ मागील (४४ वे) सूत्रांत सांगितला आहे. इंद्रियांच्या ह्या पांच अवस्थांमध्यें संयम केला असतां इंद्रियजय होतो.

**ततो मनोजवित्वं विकरणभावः प्रधानजयश्च ॥ ४८ ॥**

इंद्रियजय झाल्यानंतर मनोजयित्व म्हणजे मनाच्या वेगाप्रमाणें शरीराला गति प्राप्त होते, म्हणजे योग्याच्या मनांत अमुक ठिकाणीं जावयाचें आहे तर ही गोष्ट मनांत आल्याबरोबर तो त्या इच्छिलेल्या स्थळीं जाऊन पोहोंचतो; विकरण म्हणजे इंद्रियांना देहाशिवाय आपलीं कार्यें करितां येणें; व सर्व जगत् वश होणें; ह्या गोष्टी इंद्रियजयानें प्राप्त होतात. या सिद्धींना या शास्त्रांत 'मधुप्रतीका' ही संज्ञा आहे.

**स्थान्युपनिमन्त्रणे सङ्गस्मयाकरणं पुनरनिष्ट प्रसङ्गात् ॥ ५१ ॥**

चार प्रकारच्या अवस्थाभेदांमुळें १ प्रथमकल्पिक, २ मधुभूमिक, ३ प्रज्ञाज्योति व ४ अतिक्रांतभावनीय असे चार प्रकारचे योगी आहेत. त्यांपैकीं १ अभ्यास करणारा असून ज्यास शुद्ध तत्वाचें मात्र ज्ञान झालें आहे तो **प्रथमकल्पिक** योगी होय. २ ज्यास ऋतंभरा नांवाची प्रज्ञा प्राप्त झाली असते तो **मधुभूमिक** योगी; याला ऋतंभरप्रज्ञ असेंही म्हणतात. ३ ज्याचे स्वाधीन पंचभूतें व इंद्रियें झालीं असतात तो **प्रज्ञाज्योति** योगी ४ संयम करण्याच्या पदार्थांपलीकडे जो गेला काहे तो **अतिक्रांतभावनीय** चौथ्या प्रकारचा योगी होय. तो चौथा योगी; ज्याच्या सात प्रकारच्या प्रांतभूमिप्रज्ञा (सात पायऱ्या) सांगितल्या आहेत अशा समाधीला जाऊन पोहोंचलेला असतो. तो त्या समाधी-

१ नैनं दहति पावकः नचैनं क्लेदयंत्यापो न शोषयति मारुतः। भगवद्गीता.

च्या शेवटल्या मधुमती नामक पायरीचा अनुभव घेत असतां त्याजकडे स्वर्गांतील देवता येऊन त्याला योगापासून भ्रष्ट करण्याकरितां अति सुंदर अप्सरा, कन्या व अमृत इत्यादिक देतात. त्या वेळेस योग्यानें त्यांचें ग्रहण करूं नये; व 'काय हो, हा माझ्या योगाचा प्रभाव' असें आश्चर्यहि मानूं नये. जर कां त्यानें त्या वेळेस त्यांच्याविषयीं आपली इच्छा दर्शविली, तर तो तत्काळ योगापासून भ्रष्ट होतो. आणि जर आश्चर्य मानलें तर आपण धन्य झालों असें मानून त्याला समाधीविषयीं उत्साह वाटणार नाहीं, याकरितां योग्यानें त्यांची इच्छा बिलकुल धरूं नये; व त्याबद्दल आश्चर्यही मानूं नये.

**क्षणतत्क्रमयोः संयमाद्विवेकजं ज्ञानम्**

क्षण म्हणजे कालाचा अगदीं शेवटचा भाग होय; त्यापेक्षां आणखी सूक्ष्म भाग करितां येत नाहीं. अशा क्षणाच्या ठिकाणीं अथवा त्यांची जी परंपरा त्या ठिकाणीं चित्तसंयम केला असतां संयम कर्त्यास विवेकख्याति नांवाचें ज्ञान उत्पन्न होतें. याचें तात्पर्य असें आहे कीं, हा क्षण त्या क्षणाच्या पूर्वींचा, व तो क्षण दुसरा आहे. या अशा प्रकारच्या क्षणांच्या पूर्वापरक्रमाचे ठिकाणीं संयम केला असतां अत्यंत सूक्ष्म वस्तु जेथें मिसळून एक अशा वाटत आहेत त्या भिन्न आहेत असें स्पष्ट समजूं लागतें. त्यानंतर प्रकृतिपुरुषाचें भेदज्ञान स्पष्ट होऊन पुरुष मुक्त होतो. हें क्षणसंयमापासून होणारें ज्ञान सर्व वस्तूविषयींचें असतें असें पुढें सांगावयाचें आहे.

**जातिलक्षणदेशैरन्यतानवच्छेदात्तुल्य योस्ततः प्रतिपत्तिः ॥ ५३ ॥**

या पदार्थाहून हा पदार्थ भिन्न आहे, असा भेद पडण्याला कारण १ जाति, २ लक्षण, व ३ देश हे आहेत. त्यांत कोठें भेदाचें कारण जाति असतें; जसें, ही गाय, हा रेडा, इत्यादि. कोठें जातीनें सारखे असले तरी लक्षणानें भेद होतो; जसें, ही चित्रवर्णाची, ही लालवर्णाची, इत्यादि. कोठें कोठें जाती व लक्षण हीं जरी एक असलीं तथापि तेथें भेद होण्याला कारण देश असतो; जसें, सारख्या प्रमाणाचे ( आकाराचे ) व सारख्या रंगाचे दोन आंवळे त्यांत एक एका ठिकाणचा व दुसरा दुसऱ्या ठिकाणचा असा असतो. यांहून चौथें कारण पदार्थांचा भेद ठरविण्यास असत नाहीं; जसें पृथ्वीचें पांढऱ्या वर्णाचे दोन परमाणु यांचा भेद ठरवितां येत नाहीं. अशा प्रकारच्या पदार्थांच्या ठिकाणीं भेदज्ञान होण्याकरितां संयम करणाराला भेदज्ञान उत्पन्न होतें. त्या ज्ञानापासून अभ्यासाच्या योगानें सूक्ष्मतत्त्वाचें सुद्धां भिन्नपणानें ज्ञान होतें. सारांश, ज्या ठिकाणीं भेद कोणत्याही साधनानें ठरवितां येत नाहीं. तेथें चित्त एकाग्र केलें असतां त्यांचें सुद्धां भेदज्ञान होतें.

**तारकंसर्व-विषयं सर्वथाविषयमक्रमं चेति विवेकजं ज्ञानम् ॥ ५४ ॥**

पूर्व सूत्रांत सांगितल्याप्रमाणें क्षणसंयम करीत गेलें असतां त्या योगानें शेवटच्या भूमिकेंत तारक या नांवाचें विवेकज्ञान उत्पन्न होतें. त्याला तारक अशी संज्ञा असण्याचें कारण, ज्याला कधीं अंत नाहीं अशा घोर संसारसमुद्रापासून तें योग्याला तारून पार नेतें, अशा अर्थाच्या धोरणानें त्याला तारक असें नांव दिलें आहे. या ज्ञानाच्या योगानें सर्व वस्तु तळहातावर घेतलेल्या आंवळ्याप्रमाणें एकदम त्यांच्या स्वरूपभेदांसुद्धां स्पष्ट दिसूं लागतात; व पुरुषाविषयीं ज्ञान या योगानें चांगलें होतें.

**सत्व पुरुषयोः शुद्धिसाम्ये कैवल्य मिति ॥ ५५ ॥**

सत्व म्हणजे बुद्धि व पुरुष म्हणजे आत्मा यांचीं लक्षणें पूर्वीं सांगितलीं. ह्या दोहोंची शुद्धि सारखी झाली असतां योग्याला मोक्ष प्राप्त होतो. त्यांत बुद्धीची शुद्धि म्हणजे 'सर्वकर्त्री बुद्धि आहे' असा अभिमान दूर होऊन बुद्धीचा आपल्या कारणांत लय होणें; व पुरुषाची शुद्धि म्हणजे पुरुष हा भोग भोगणारा नसून त्यावर अज्ञानानें जो 'पुरुष भोग भोगतो' असा मनाचा खोटा ग्रह झाला आहे तो दूर होणें.

इति श्रीपातञ्जल योगशास्त्राभिप्राये
विभूतिपादः समाप्तः ॥ ३ ॥

